

महर्षि श्रीवाल्मीकिप्रणीत

# योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान,

## सुरस गोष्टी व सुभाषितें.



भाग पहिलाः—तत्त्वज्ञान.
भाग दुसरा :—सुरस गोष्टी.
भाग तिसराः—सुभाषितें.





लेखक
रघुनाथ भास्कर पावगीशास्त्री.

शके १८७३.
मार्गशीर्ष शु. १.

सन १९५१
दि. २९ नोव्हेंबर.

किंमत रुपये बारा.

# चित्रांची सूची.

## भाग १ ला—तत्त्वज्ञान.



## भाग २ रा—गोष्टी.

# सर्व ग्रंथाची अनुक्रमणिका.



एकूण पृष्ठसंख्या ८२५

॥ श्री रामचंद्राय नमः ॥



पूर्णानंदस्वभावः स्वजनहितकृते माययोपात्तकायः ।
कारुण्याद्दुद्दिधीर्षुर्जनमनवरतं मोहपङ्के निमग्नम् ॥
आविश्यान्तर्वसिष्ठं बहिरपि कलयन् शिष्यभावं वितेने ।
यः संवादेन शास्त्रामृतजलधिममुं रामचंद्रं प्रपद्ये ॥

[या श्लोकाचा अर्थ या ग्रंथाचा ' उपोद्घात ' याच्या पहिल्या पृष्ठावर दिला आहे.]

# अध्यात्मशास्त्राचा रंगीत नकाशा.

**( मराठी व हिंदी ) आकार १४ इंच × २० इंच.**

( याचा उल्लेख ' उपोद्घात ' पृष्ठ ३ वर करण्यांत आला आहे )




लेखकः—रघुनाथ भास्कर पावगीशास्त्री.

२०२।२ सदाशिव पेठ, मावेस्कूलजवळ, पुणे २.

नकाशाची किं. एक रुपाया. त्याच्या स्पष्टीकरणाऱ्या पुस्तकाची किं. चार आणे.

व्ही. पी. केल्यास १० आणे जादा खर्च येईल.

# अर्पण पत्रिका.



ज्यांनीं श्रीयोगवासिष्ठासारख्या मोठमोठ्या अध्यात्म ग्रंथांवर
प्रवचनें करून त्यांत मोठें प्राविण्य मिळविलें व ज्यांच्या
कृपेनें मला श्रीयोगवासिष्ठादि ग्रंथांचें परिशीलन
करितां आलें व हा ग्रंथ लिहितां आला, त्या
परमपूज्य कै. वेदशास्त्रसंपन्न तीर्थरूप
भास्करशास्त्री पावगी यांच्या चरणीं हा
योगवासिष्ठाचा सारभूत ग्रंथ मी अनन्य
भावानें व भक्तीनें अर्पण केला आहे.

—रघुनाथ भास्कर पावगीशास्त्री.



लेखक

वे. शा. सं. र. भा. पावगीशास्त्री.

# उपोद्घात.

पूर्णानंदस्वभावः स्वजनहितकृते माययोपात्तकायः ।
कारुण्यादुद्दिधीर्षुर्जनमनवरतं मोहपङ्के निमग्नम् ॥
आविश्यान्तर्वसिष्ठं बहिरपि कलयन् शिष्यभावं वितेने ।
यः संवादेन शास्त्रामृतजलधिममुं रामचंद्रं प्रपद्ये ॥

" ज्याचा पूर्ण आनंदी स्वभाव आहे, ज्यानें आपल्या भक्तांचें कल्याण करण्याकरितां मायेच्या योगानें देह धारण केला आहे, ज्याला मोहरूपी पंकांत सतत निमग्न झालेल्या लोकांची दया येऊन त्यांचा उद्धार करण्याची इच्छा झाली, म्हणून ज्यानें वसिष्ठांच्या अंतःकरणांत शिरून व बाहेरहि आपण स्वतः शिष्यभाव पत्करून संभाषणरूपानें अध्यात्मशास्त्ररूपी अमृताचा समुद्र ( योगवासिष्ठ ) निर्माण केला, त्या ह्या **श्री प्रभु रामचंद्राला** मी ( अनन्य भावानें ) शरण आलों आहें."

अशा तऱ्हेनें वरील श्लोकांत वर्णन केलेल्या **श्री प्रभु रामचंद्राचें** स्मरण करून मी माझ्या स्वतः विषयीं व या माझ्या ग्रंथाविषयीं थोडी माहिती माझ्या वाचकांच्या पुढें ठेवीत आहे.

शुचीनां श्रीमतां गेहे गुप्ते गुणवतां सतां ॥ नि पू १२६-५०
अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ॥ भ. गी. ६-४६

महर्षि वसिष्ठांच्या व भगवान् श्रीकृष्णाच्या वरील उक्तीप्रमाणें माझा जन्म कै. वे. शा. सं. भास्करशास्त्री रघुनाथ पावगी यांच्या पोटीं झाला. एखाद्या श्रीमंताच्या पोटीं जन्माला येण्यापेक्षां मी एका मोठ्या बुद्धिमान् योग्याच्याच पोटीं जन्माला आलों, यांतच मी आपल्याला मोठा भाग्यवान् समजतों. सुमारें तीस वर्षांपूर्वी म्हणजे लोकमान्य टिळकांचे वेळीं ज्या मोठ्या विद्वान् पंडित व्यक्ती प्रसिद्धीस आल्या, त्यांपैकीं माझे वडील एक होते. योगवासिष्ठादि अध्यात्म ग्रंथावर यांच्यासारखा वाखाणलेला प्रवचनकार त्या वेळीं सबंध महाराष्ट्रांत दुसरा कोणी नव्हता व अवघड अध्यात्मविषय सोप्या भाषेत समजून सांगण्याची पद्धत त्यांना चांगलीच साधली

होती, असें त्यावेळीं लोक म्हणत असत. त्यांची योगवासिष्ठावर प्रवचनें पुणें येथील श्रीरामेश्वराचे मंदिरांत कित्येक वर्षे चालू होतीं, ही गोष्ट पुष्कळ लोकांना माहीतच आहे.

यावन्नानुग्रहः साक्षाज्जायते परमेशितुः ।
तावन्न सद्गुरुं कश्चित्सच्छास्त्रं नापि विंदति ॥

" परमेश्वराचा अनुग्रह झाला नाहीं तोंवर्यंत सद्गुरु व सच्छास्त्र यांची कोणालाहि प्राप्ति होत नाहीं."

या वसिष्ठांच्या उक्तीप्रमाणें या कुलांत माझा जन्म होऊन माझें सर्व शास्त्रांचें अध्ययन माझ्या वडिलांच्या जवळ झालें. माझे वडील हेंच माझे गुरु असल्याकारणानें मला दुसरा गुरु करण्याची जरूरी वाटली नाहीं. हाच माझ्यावर परमेश्वराचा खास अनुग्रह होय. परमेश्वराचा अनुग्रह म्हणजे परमेश्वरानें प्रत्यक्ष मूर्तरूपानें दर्शन देणें असा नसून आपल्या अंतःकरणांत विवेक उत्पन्न झाला म्हणजे तो त्याचा अनुग्रहच होय. परमेश्वर प्रसन्न झाला कीं, तो आपल्या भक्ताच्या कल्याणाकरितां विवेक नांवाचा दूत पाठवितो, असें या ग्रंथाच्या पहिल्या भागांतील 'खरा देव कोण ? व त्याची पूजा कोणती ?' या ४७ व्या प्रकरणांत पृष्ठ ३८५ मध्यें वर्णन करण्यांत आलें आहे. माझ्या वडिलांनीं श्री जगदंबेची एकनिष्ठपणानें व मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें श्री सप्तशतीचें नित्य पठनरूप अनुष्ठान करून जी आराधना केली, त्याचें त्यांना योग्य फळ मिळालेंच व मलाहि या भगवतीच्या कृपाप्रसादानें लहानपणींच या अध्यात्म विषयाची गोडी लागून या शास्त्रांत माझी इतकी प्रगति झाली कीं, माझ्या हातून हा एवढा मोठा ग्रंथ तयार होऊन तो मला लोकांच्या पुढें मांडतां आला. असो,माझ्या वडिलांच्या देखतच सुमारें माझ्या वयाच्या २० व्या वर्षापासूनच वेदान्त ग्रंथांवर मी प्रवचनें करण्यास सुरवात केली व शके १८४६ फाल्गुनमध्यें ( म्हणजेच इ. स. १९२४ मार्चमध्यें ) माझे वडील ब्रह्मस्वरूपीं विलीन झाल्यावर मी येथील नायगांवींतील श्रीरामचंद्राचे मंदिरांत दररोज सकाळीं ७ ते ८ पर्यंत प्रवचनें करूं लागलों. या मंदिरांत तेव्हांपासून दोन तपाचे वर विविध वेदान्त ग्रंथांवर मी प्रवचनें केलीं. विशेषतः योगवासिष्ठावर

माझी पुष्कळ वर्षे प्रवचनें झालीं. या ग्रंथाच्या वाचनाची पहिली आवृत्ति परिपूर्ण होण्यास मला सुमारें १० वर्षे लागलीं. पुढें दुसऱ्या आवृत्तीला सुमारें १२ वर्षे लागलीं. अशा या प्रचंड बृहत्योगवासिष्ठाचें पुष्कळ काल परिशीलन केल्यानंतर सेवानिवृत्त होण्याचे वेळीं म्हणजे सुमारें इ. स. १९४७ मध्यें माझ्या मनांत असा विचार आला कीं, "आतां नोकरी संपली तर या पुढें आपण आजपर्यंत जें योगवासिष्ठाचें परिशीलन केलें आहे व ज्यांतील तत्त्वज्ञान आपण दुसऱ्यांना प्रवचनाच्या रूपानें सांगितलें आहे, तेंच तत्त्वज्ञान ग्रंथाच्या रूपानें निर्माण करून ठेवावें. महाभारत, रामायण व भागवत या ग्रंथांचे उपसंहारात्मक ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत; पण योगवासिष्ठाचा उपसंहारात्मक ग्रंथ प्रसिद्ध झाला नाहीं, ही उणीव भरून काढावी असें मला वाटलें." पुढें मी सेवानिवृत्त झाल्यावर हा ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली. ग्रंथ लिहिण्याचें काम किती अवघड असतें व किती जबाबदारीचें असतें, हें मला त्या वेळीं कळून आलें. हा ग्रंथ मी प्रथमच लिहिला आहे, त्यामुळें त्यांत साहित्यशास्त्राच्या दृष्टीनें जितकी परिपूर्णता यावयास पाहिजे तितकी आलेली नसेल, तरीपण अध्यात्म विषयावर लहानमोठे निबंध व लेख मी लिहिलेले आहेत व ते वर्तमानपत्रांतून व मासिकांतून प्रसिद्धहि झालेले आहेत. याशिवाय मी एक अध्यात्म-शास्त्राप्रमाणें जन्ममरण, स्वर्गनरकाच्या फेऱ्यांचा व मोक्षमार्गाचा रंगीत नकाशा व त्याच्या स्पष्टीकरणाचें एक छोटेसें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. या नकाशाची पहिली आवृत्ति संपल्यामुळें गतवर्षी सुधारलेली दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली आहे. त्याचें छायाचित्र या ग्रंथाच्या आरंभीं दुसऱ्या पानावर दिलें आहे. ही आवृत्ति मराठींत व हिंदींत आहे. हा नकाशा पुष्कळ लोकांना फारच आवडला, ही गोष्ट त्याच्या प्रतींच्या खपावरूनच सिद्ध होत आहे. अनेक विद्वान् लोकांचे त्याच्यावर चांगले अभिप्रायहि आलेले आहेत. या सर्व गोष्टी मी माझी नोकरी संभाळून व प्रपंच करूनच केल्या. मी हा ग्रंथ लिहिण्याचें काम इ. स. १९४८ मध्यें सुरू केलें व तें गेल्या सालींच संपविलें. मी योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञानाचा अभ्यास केल्यामुळें मला जें सुख, समाधान मिळावयास पाहिजे होतें, तें मला मिळालें आहे व यापुढेंहि मला तें मिळत राहीलच. मी अभ्यासिलेलें तत्त्वज्ञान जनताजनार्दनाच्या

सेवेला अर्पण करितां यावें म्हणून हा ग्रंथ लिहून पुरा केला व आज तो मोठ्या आनंदानें माझ्या प्रेमळ श्रोत्यांच्या व वाचकांच्या पुढें ठेवीत आहे.

### ग्रंथाचें प्रकाशन व लोकांची मदत.

सुमारें ८०० पानांचा ग्रंथ लिहून पुरा केला खरा पण तो छापून प्रसिद्ध करणें म्हणजे सध्यांचे दिवसांत मोठें दिव्य करण्यासारखेंच आहे. या कामाकरितां सुमारें रु. ५००० खर्च येतो असें मला कळलें, तेव्हां मात्र आतां काय करावें ! हें समजेना, कारण इतकी मोठी रकम कशी उभारावी ! हा प्रश्न माझ्या मनांत सारखा येत राहिला. ' हताश होऊन स्वस्थ बसूं नकोस, नेटानें पौरुषप्रयत्न कर. तुला त्याचें फल अवश्य मिळेल ' या वसिष्ठांच्या शिकवणुकीप्रमाणें मी पुढील मार्गाला लागलों. विचार करितां करितां मला असें आढळून आलें कीं, कांहीं ग्रंथकार आगाऊ ग्राहक मिळविण्याची योजना प्रसिद्ध करून ग्रंथाच्या छपाईला लागणारा खर्च मिळवितात; तर मग आपणहि असा कांहीं तरी प्रयत्न करून पहावा, म्हणून मी एक आगाऊ ग्राहकांची योजना तयार करून ती श्रोत्यांच्या पुढें मांडली. या आगाऊ ग्राहकांच्या योजनेसंबंधीं मुंबई-पुण्यांतील कांहीं प्रसिद्ध विद्वान् लोकांनीं माझ्या ग्रंथासंबंधीं एक हस्तपत्रक काढलें. त्याचा उपयोग पुष्कळच झाला. मी त्याबद्दल त्या सर्व थोर व्यक्तींचा आभारी आहे. या ग्रंथाकरितां मला ज्या लहानमोठ्या देणग्या मिळाल्या त्यांपैकीं उल्लेख करण्यासारखी देणगी म्हणजे कोल्हापूरच्या श्रीमंत इंदुमतीबाई राणीसाहेब यांची रु. २०१ ची होय. हा देणगीबद्दल मी त्यांचा मनःपूर्वक आभारी आहे. याशिवाय इतर देणगीदारांचाहि मी आभारी आहे.

### ग्रंथ लिहिण्याची आवश्यकता.

आज जगांत खऱ्या शांतीची आवश्यकता भासत आहे. पण ही खरी शांति नुसते ' ॐ शांतिः शांतिः शांतिः ' असे त्रिवार शांतीचे पाठ करीत बसून मुळींच मिळणार नाहीं; किंवा इतर आधिभौतिक शास्त्रांच्या ज्ञानानेंहि ती मिळणार नाहीं. जगांत कितीहि सुधारणा झाल्या व मानवी जीवन सुखमय करण्याकरितां इतर कितीहि प्रयत्न करण्यांत आले, तरी

खरी शांति, सुख व समाधान मिळविण्याचे हे खरे मार्गच नव्हेत. परस्परांतील व्यक्तिगत द्वेष, मत्सर, चुरस, राष्ट्राराष्ट्रांतील हेवेदावे वगैरे सर्व नाहींसे होऊन शांति नांदण्याकरितां सध्यां चालू असलेले प्रयत्न म्हणजे धर्माचें उच्चाटन, वर्णव्यवस्थेचा विध्वंस वगैरे खरे मार्ग नाहींत. अशा मार्गानें जाऊन खऱ्या शांतिसुखाची आशा करणें म्हणजे कडू लिंबाचीं पानें खाऊन अमृतासारख्या गोड आंबरसाची आशा करण्यासारखेंच आहे; फक्त तत्त्वज्ञानप्रदीप हा खऱ्या शांतिसुखाच्या प्रकाश सर्व अज्ञजनांच्या चित्ताकाशांत पाडून त्यांच्या ठिकाणीं असलेलें सर्व अज्ञान व त्यामुळेंच निर्माण झालेले सर्व दोष नाहींसे करून त्यांचें जीवित खात्रीनें सुखमय करील, याच हेतूनें योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान जगाचे पुढें ठेवण्याचें काम या ग्रंथाच्या रूपानें केलें आहे. तत्त्वज्ञान सर्व द्वैत नाहींसें करितें व सर्व ठिकाणीं आत्मबुद्धि निर्माण करितें, अशा स्थितींत कोण कोणाला परका लेखील. 'यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्। तत्र केन कं पश्येत्' या श्रुतिवचनाप्रमाणें तत्त्वज्ञानानें सर्व भेद नाहींसे होऊन जातात. हें वासिष्ठांतील तत्त्वज्ञान एवढ्याकरितांच निर्माण झालेलें आहे. या वासिष्ठांत ज्ञानावताराचा इतिहास सांगतांना वसिष्ठांनीं असें सांगितलें आहे कीं, ब्रह्मदेवाला मानवांचें दुःख पाहून करुणा आली व त्याचें निवारण करण्याकरितां प्रथम त्यानें तप, धर्म, दान, सत्य व तीर्थे वगैरे उपाय निर्माण केले;परंतु तेवढ्यानें त्यांचें दुःख नाहींसें होत नाहीं असें पाहून निर्वाणात्मक परम सुख जगापुढें आणलें. हें सुख केवळ ज्ञानानेंच प्राप्त होतें याचें सविस्तर वर्णन या ग्रंथाचा भाग १ ला, प्रकरण ९ वें 'योगवासिष्ठांतील ज्ञानावताराचा इतिहास' यांत आलेलें आहे. वास्तव तत्त्वज्ञान हाच खऱ्या सुखशांतीचा मार्ग आहे. अशा प्रकारचें तत्त्वज्ञान योगवासिष्ठांत (दुधांतील तुपाप्रमाणें) जिकडे तिकडे भरून राहिलें आहे. त्या शास्त्राचें मंथन करून त्यांतील तत्त्वज्ञान एके ठिकाणीं गोळा करून लोकांच्यापुढें मांडावें हाच हा ग्रंथ लिहिण्याच्या मुख्य हेतु होय.

## ग्रंथाचें स्वरूप.

असा विचार करून जें तत्त्वज्ञान या योगवासिष्ठांत निरनिराळ्या ठिकाणीं पसरलेलें असल्यामुळें समग्र वाचणें किंवा ऐकणें अतिशय कष्टप्रद

वाटतें, म्हणून त्याचें शास्त्रीयदृष्ट्या प्रकरणशः विभाग पाडून त्यांतील युक्तिवादासह तें सर्व तत्त्वज्ञान या ग्रंथांतील **पहिल्या भागांत** निरनिराळ्या ५१ प्रकरणांत मांडलें आहे. या प्रकरणांतून मांडलेले तत्त्वज्ञानाचे सिद्धांत किंवा केलेलें इतर निरुपण बरोबर आहे कीं नाहीं, यावद्दल शंका राहूं नये म्हणून मूळ ग्रंथांतील संस्कृत वचनें, त्यांचा स्थलनिर्देश व त्यांचें मराठींत शक्य तितकें सोपें सरळ भाषांतर यांसह दिलीं आहेत. ग्रंथाची रचना अशी केली आहे कीं, संस्कृत न जाणणारा वाचक संस्कृत श्लोक सोडून देऊन ग्रंथ वाचूं लागला, तरी त्याच्या वाचनांत अर्थाचा कोठेंहि खंड पडणार नाहीं. मूळ योगवासिष्ठांतील विस्तृत आख्यानें या ग्रंथाच्या **दुसऱ्या भागांत** गोष्टींच्या रुपानें तयार करून अगदीं सोप्या व सरळ भाषेंत मांडलीं आहेत. या गोष्टी एकूण ५१ आहेत. या गोष्टींपैकीं प्रत्येक गोष्टींत वेदान्ताचें कोणतें ना कोणतें तरी तत्त्व सांगितलें आहे. हें तत्त्व प्रत्येक गोष्टीच्या शेवटीं तात्पर्यरुपानें दिलें आहे. या सर्व गोष्टींचें स्वरूप थोडक्यांत समजावें म्हणून या भागाला एक लहानशी स्वतंत्र प्रस्तावना जोडली आहे. या वासिष्ठामध्यें अनेक सुंदर सुभाषितें आलेलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं निवडक अशीं ३०५ सुभाषितें मराठी भाषांतरांसह या ग्रंथाच्या **तिसऱ्या भागांत** दिलीं आहेत. हीं सुभाषितें (१) आध्यात्मिक (२) नैतिक व (३) धार्मिक अशा स्वरूपांत विभागलीं आहेत. या भागालाहि एक लहानशी स्वतंत्र प्रस्तावना जोडली आहे. त्यांत ग्रंथामध्यें सुभाषितांची किती योग्यता असते वगैरे वर्णन केलें आहे. असा हा सारभूत ग्रंथ वाचकांच्या पुढें ठेवून त्यांना माझी नम्र विनंति आहे कीं, आपण सुज्ञ व विचारी आहांत, तेव्हां हा सारभूत ग्रंथ चांगला बोधप्रद वाटत असेल तर त्याचा प्रेमानें स्वीकार करा. कारण या योगवासिष्ठ ग्रंथाचें वर्णन करितांना वसिष्ठांनीं मुमुक्षु व्यवहार प्रकरण सर्ग १८ मध्यें 'कोणताहि ग्रंथ सामान्य माणसांच्या लेखणींतून बाहेर पडला असला, तरी जर तो युक्तियुक्त व मोठा बोधप्रद वाटत असेल तर त्याचा स्वीकार करावा,' असें खालील श्लोकांत सांगितलें आहे.

अपि पौरुषमादेयं शास्त्रं चेद्युक्तिबोधकम् ॥
अन्यत्वार्षमपि त्याज्यं भाव्यं न्याय्यैकसेविना ॥ २-१८-२.

"युक्तीनें बोध करून देणारें शास्त्र, मग तें एखाद्या सामान्य पुरुषानें केलेलें असलें, तरी तें ग्राह्य आहे. परंतु एखाद्या प्राचीन ऋषीनें केलेलें शास्त्र तत्त्वनिर्णयाला निरुपयोगी असेल, तर न्यायाला अनुसरून वागणाऱ्या मनुष्यानें त्याचा त्याग करणेंच उचित आहे."

यावरून असें दिसून येतें कीं, वसिष्ठ केवळ अंधश्रद्धेला मान न देतां खऱ्या विद्वत्तेचे व ज्ञानाचेंच चहाते होते.

स्वामी रामतीर्थांनीं देखील धर्माच्या बाबतींत निरनिराळ्या तऱ्हेनें मोठा विचार करून असें सांगितलें आहे कीं, तो धर्म फार जुना आहे, किंवा तो अलीकडचा आहे, किंवा तो पुष्कळ लोकांनीं स्वीकारलेला आहे, किंवा एखाद्या महात्म्यानें स्वीकृत केला आहे, किंवा राजेरजवाड्यांनीं स्वीकारलेला आहे, म्हणून तुम्ही त्याचा स्वीकार करूं नका तर त्या धर्माचे गुण जाणून त्या धर्माचा स्वीकार करा. Accept a thing and believe in a religion on its own merits. Examine it yourself ( Heart of Ram. p. 27. )

## 'योगवासिष्ठ' या नांवाचा लोकांच्या मनावर झालेला परिणाम.

मला असा पुष्कळ ठिकाणीं अनुभव आला आहे कीं, योगवासिष्ठ या नांवांतील 'योग' हा शब्द कानावर पडल्याबरोबर पुष्कळ लोक बिचकतात. कारण 'योग' म्हणजे अरण्यांत जाऊन जटा वाढवून अंगाला राख फासून सतत नाक धरून बसणें व प्राणायामासारखें कांहीं तरी दिव्य कृत्य करणें आहे, अशी त्यांची समजूत झालेली असते. योग म्हणजे हटयोग (प्राणायामाचा), किंवा पातंजल योग (चित्ताच्या वृत्तींचा निरोध करणें) हाच असला पाहिजे, अशातऱ्हेची समजूत झाल्याकारणानें 'आम्हांला असला योग नको, व हा योग या योगवासिष्ठामध्यें सांगितला आहे म्हणून तुमचें योगवासिष्ठहि नको' असे उद्गार अनेकांनीं काढले आहेत. या योगवासिष्ठासंबंधीं अशातऱ्हेची कल्पना करून घेतल्यामुळें पुष्कळ लोक या ग्रंथाचें परिशीलन करीत नाहींत व त्याच्यावर फारसे कोणी निरूपणहि करीत नाहींत. अशामुळें हा ग्रंथ एका बाजूला पडून राहिला आहे; पण

लोकांनीं अज्ञातऱ्हेची कल्पना करून घेऊं नये, कारण योगवासिष्ठांतील 'योग' शब्दाची व्याख्या

संसारोत्तरणे युक्तिर्योगशब्देन कथ्यते ॥ नि. उ. १३-३

संसारांतून तरून जाण्याचा ( म्हणजेच मोक्ष प्राप्तीचा ) उपाय; अशी केलीं आहे; म्हणूनच या ग्रंथाला 'मोक्षोपायसंहिता' असें नांव देण्यांत आलें आहे ( या ग्रंथाचा भाग १ ला, प्रकरण १ लें, पृ. ३ ). अशा 'योग' शब्दाचा अर्थ ध्यानांत घेतला म्हणजे योगवासिष्ठासंबंधी झालेली अनास्थेची कल्पना फोल ठरते.

## स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं योगवासिष्ठासंबंधीं प्रकट केलेले विचार.

स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं आपल्या 'जन्मठेप' नांवाच्या पुस्तकांत पृष्ठ २४७ वर योगवासिष्ठासंबंधानें जे विचार प्रकट केलें आहेत, ते लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. त्याचा थोडासा भाग त्यांच्याच शब्दांत खालीं दिला आहे.

" योगवासिष्ठ एकदां वाचावें म्हणून सहज घेतलें. तो त्याची गोडी इतकी लागली कीं, वेदांतावर लिहिलेल्या आमच्या अवलोकनांत आलेल्या ग्रंथांत असा सुंदर ग्रंथ विरळा असें वाटूं लागलें. काय ते निरपवाद सिद्धांत आणि काय ती सुंदर कविता कीं, जिच्या मोहक मुखांतील मधुर सुस्वरांत ते सिद्धांत श्रवणास आणि मनास तल्लीन करीत आत्म्यास परिसावयास मिळतात. तत्त्व आणि कविता यांची सांगड संस्कृत कवीच घालूं जाणत. "

तत्त्वज्ञान व काव्य ह्या दोहोंचा योग्य संगम उत्तम प्रकारें कसा घडूं शकतो, हें दाखविण्याकरितां मूर्तिमंत निदर्शन योगवासिष्ठ हा ग्रंथ होय. असें या ग्रंथाच्या 'तत्त्वज्ञान' या नांवाच्या पहिल्या भागांतील 'योगवासिष्ठाची योग्यता' या ४ थ्या प्रकरणांत सांगितलें आहे.

स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं असेंहि पुढें आपल्या पुस्तकांत म्हटलें आहे कीं, " कित्येक वेळीं योगवासिष्ठाचे श्लोक म्हणतां म्हणतां हातांतील दोर-

खंड हातांतच राहून मन इतकें कर्म पराङ्मुख व्हावें की, तास तास अव-
.यव देहास आहेत कीं नाहींत याचें भानहि राहूं नये. पाऊल पुढें पडूं नये.
बाटें सर्व सोडून द्यावें. ”

हे वरील विचार लक्षांत घेतल्यावर योगवासिष्ठांतलि तत्त्वज्ञान किती बहारीचें आहे हें कोणालाहि सहज समजेल व योगवासिष्ठासंबंधानें समाजांत पसरलेला गैरसमज दूर होऊन समाज एकदम खडबडून जागा होईल व त्याला यांतील तत्त्वज्ञानाची व ते मनांत चांगले ठसावे म्हणून सांगितलेल्या गोष्टींची गोडी लागेल असा मला पूर्ण भरंवसा वाटतो.

म्हणूनच हा ग्रंथ वाचल्यावर वाचकांची अशी खात्री पटेल कीं, कोणत्याहि माणसानें या ग्रंथांत दर्शविलेल्या मार्गानें नेटानें प्रयत्न केला तर त्याची अध्यात्म ज्ञानांत चांगलीच प्रगति होईल, त्याचें ठिकाणीं शांति, सुख व समाधान प्राप्त होईल आणि शेवटीं आत्मसाक्षात्कारहि होईल यांत शंका नाहीं. असा हा मागासलेला ग्रंथ जगापुढें आणावा व त्याचा सर्वत्र प्रसार करावा या हेतूनें हा ग्रंथ लिहून काढला आहे व त्याच्यावरच ठिकठिकाणीं प्रवचनें करून त्यांतील उच्च दर्जाचें तत्त्वज्ञान लोकांच्यापुढें ठेवण्याचें कार्य माझ्या उर्वरित आयुष्यांत करण्याचें योजिलें आहे आणि माझी अशी खात्री आहे कीं, श्रीवसिष्ठांच्या कृपेनें हें कार्य माझ्या हातून सतत होत राहील.

## उपदेशामध्यें पुनरुक्ति हा दोष नाहीं.

या योगवासिष्ठ ग्रंथांत अध्यात्मशास्त्रांतील सिद्धांत मनांत चांगले ठसावे, म्हणून पुनः पुनः निरनिराळ्या युक्तींनीं, आख्यानें, रूपकें इत्यादि विस्तारानें पुष्कळवेळा तेंच तेंच सांगितलें आहे. पण पुनः पुनः या चर्वितचर्वणाचा काय उपयोग? अशी शंका येणें स्वाभाविक आहे. परंतु बुद्धिमान् लोकांची गोष्ट निराळी, त्यांना फक्त एकदां जरी सांगितलें, तरी तें त्यांच्या बुद्धींत चांगलें ठसतें. पण सामान्य लोकांची गोष्ट अशा तऱ्हेची नाहीं. म्हणूनच इतका विस्तार करून पुनः पुनः जरी सांगितलें, तरी तें आत्मतत्त्व त्यांच्या बुद्धींत दृढ होत नाहीं. यास्तव त्याचा आवृत्तिरूप अभ्यास आवश्यक आहे. अशा अर्थाचें ‘ आवृत्तिरसकृदुपदेशात् ’ असें भगवान् बादरा-

णाचें सूत्र प्रसिद्ध आहे. म्हणूनच या मोक्षशास्त्राचा पुनः पुनः दीर्घकाल जर अभ्यास केला, त्याचें श्रवण केलें, तें दुसऱ्याला व्याख्यानानें समजून सांगितलें तर अशाहि तज्ज्ञ होईल, यांत शंका नाहीं. या शास्त्रामध्यें वेदांत शास्त्रांतील सर्व तर्क व सिद्धांत ग्रथित केले आहेत.

अभ्यासाच्या दृष्टीनें विचार केल्यास पुनरुक्तीचा दोष येत नाहीं असें वसिष्ठांचें म्हणणें आहे.

> अविद्योपशमस्त्वेष जातोऽपि भवतामिह ॥
> अभ्यासेन विना साधो न सिद्धिमुपगच्छति ॥नि.उ. १०३-१९
> पुनः पुनरिदं राम प्रबोधार्थं मयोच्यते ॥ नि. पू. ११-१

यांचा भावार्थः—अविद्येचा उपशम म्हणजेच आत्मसाक्षात्कार जरी झाला तरी तो अभ्यासावांचून सिद्धीला प्राप्त होत नाहीं. तो दृढ होण्यासाठीं अभ्यासच केला पाहिजे. म्हणून तुला चांगला बोध व्हावा या हेतूनेंच मी हें तत्त्वज्ञान पुनः पुनः सांगत आहें. ( अशा तऱ्हेचें वर्णन या ग्रंथाचा भाग पहिला ' योगवासिष्ठाचें बहिरंग निरीक्षण ' या ३ ऱ्या प्रकरणांत पृष्ठ १० मध्यें आलेलें आहे. )

ह्या वसिष्ठांच्या म्हणण्याचा हेतु असा अगदीं स्पष्ट आहे कीं, आत्मबोधाच्या उपदेशामध्यें पुनरुक्ति हा दोष येत नाहीं. माझ्या या ग्रंथामध्यें कांहीं ठिकाणीं पुनरुक्ति झाली आहे, पण या वरील दृष्टीनें विचार केल्यास ही पुनरुक्ति दोषाई ठरत नाहीं, असें मला वाटतें.

एखाद्या मनुष्याला एखादे वेळीं घटकाभर साक्षात्कार झाला तरी त्यापासून त्याला कायमचा फायदा होत नाहीं. कारण ज्ञान होऊन जर तें दृढ झालें नाहीं तर तो ब्रह्मनिष्ठ होणार नाहीं व त्याचें तें ज्ञान शेवटपर्यंत म्हणजे मरेपर्यंत टिकलें नाहीं, तर मरणसमयीं मनांत असलेल्या वासनेप्रमाणें पुढें पुनर्जन्म टळणें शक्य नाहीं. म्हणून इतर बाबींप्रमाणें मन ब्रह्मनिष्ठ करण्याची संवय असावी लागते. उभ्या जन्मांत ज्यानें हा अभ्यास केला नाहीं, त्याला केवळ ही ब्राह्मी स्थिति अंतकालीं एकदम प्राप्त होणें परम दुर्घट किंबहुना अशक्यच होय. म्हणून प्रत्येकानें आपलें मन निर्विषय करण्याचा अभ्यास नित्य चालू ठेवावा. म्हणजे अंतकालींहि ही स्थिति

कायम रहाण्यास अडचण पडणार नाहीं, असें वसिष्ठांचें महत्त्वाचें सांगणें आहे. याविषयीं मुमुक्षु प्रकरणाच्या आरंभीं शुकाची गोष्ट सांगून आत्मज्ञान झालें तरी त्याचें दृढीकरण झाल्याशिवाय त्याचें फल जी जीवन्मुक्ति ती प्राप्त होत नाहीं असें सिद्ध केलें आहे. ( या ग्रंथाचा भाग २ रा, शुकाची गोष्ट १ ली). भगवद्गीतेंतहि असेंच सांगितलें आहे:—

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ॥
स्थित्वा स्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ २–७२

याचा भावार्थ असा कीं, ही ब्राह्मी स्थिति अंतकालापर्यंत टिकून राहिली, तर त्याला ब्रह्मनिर्वाण म्हणजे ब्रह्मांत मिळून जाण्याच्या स्वरूपाचा मोक्ष प्राप्त होतो.

### श्री प्रभु रामचंद्रानें उपदेश्याची भूमिका कां स्वीकारली ?

श्री रामचंद्र म्हणजे साक्षात् परब्रह्म होय. असें असतांना त्याच्या ठिकाणीं अज्ञान उत्पन्न झालें असें म्हणणें म्हणजे सूर्याच्या ठिकाणीं अंधार निर्माण झाला असें म्हणण्यासारखेंच आहे. राम व कृष्ण हे सगुणब्रह्माचे म्हणजेच श्रीभगवान् विष्णूचे पूर्णावतार आहेत व त्यांचें ज्ञान स्वतःसिद्ध आहे. असें असतांना श्रीरामचंद्राला वसिष्ठांनीं अध्यात्मज्ञानाचा उपदेश करण्याचें वास्तविक कांहींच कारण नव्हतें. परंतु रामचंद्राला विश्वामित्र मुनींनीं धनुर्विद्या शिकविली आणि वसिष्ठ मुनींनीं त्याला ज्ञानोपदेश केला. यांतील हेतु असा आहे कीं, सामान्य जनतेला आदर्शभूत आणि सर्वदा अनुकरणीय होतील, अशा तऱ्हेचीं कृत्यें करून दाखविणें हा होय. योगवासिष्ठांतील वैराग्य प्रकरणाच्या पहिल्याच सर्गामध्यें ज्ञानीपुरुषांचें वसतिस्थान असा जो सत्यलोक त्या ठिकाणीं सनत्कुमार रहात असतां एकदां श्रीभगवान् विष्णु वैकुंठाहून त्या ठिकाणीं प्राप्त झाले. तेव्हां ब्रह्मादि देवांनीं भगवंताची षोडशोपचारें पूजा केली. परंतु सनत्कुमार मात्र त्या वेळीं तेथें हजर नव्हते. पुढें तेथून जाण्याचे वेळीं सनत्कुमारांना पहातांच भगवान् विष्णु म्हणाले, " हे सनत्कुमारा ! निष्कामतेबद्दल गर्व उत्पन्न होऊन ज्या अर्थी तूं स्तब्ध राहिला आहेस, त्या अर्थी कामसंतप्त होऊन तुला शरजन्मा या नांवानें जन्म

घ्यावा लागेल." यावर सनत्कुमारांनीं श्रीभगवान् विष्णूला उलट असा शाप दिला कीं, "हे भगवन् ! तूं विचार न करितां मला शाप दिला आहेस, त्या अर्थी आपलें सर्वज्ञत्व टाकून तुलाहि किंचित्काल अज्ञानी व्हावें लागेल." अशा तऱ्हेच्या शापाचें निमित्त करून भगवंतानें या रामचंद्राच्या अवतारामध्यें आपल्या ठिकाणीं अज्ञान धारण केल्याचें सोंग करून व आपण उपदेश्याची भूमिका स्वीकारून श्रीवसिष्ठांच्याकडून आत्मज्ञानाचा उपदेश ग्रहण केला. हा जो सर्व अध्यात्मशास्त्राचा अभ्यास रामचंद्रानें केला, तो आपल्या स्वतःकरितां नसून इतर अज्ञ जीवांनीं आपला उद्धार कसा करून घ्यावा व प्रपंचांत राहूनच सर्व प्रकारचीं कर्मे करीत असतांना देखील आपल्या मनाचा समतोलपणा राखून शांति, सुख, व समाधान कसें संपादन करावें, यांचें त्यांना शिक्षण मिळावें याकरितांच केलेला आहे. हा भगवंताचा लोकसंग्रह आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीभगवान् आपल्या भक्ताकरितां वैकुंठांतून खालीं मृत्युलोकांत आले इतकेंच नव्हे तर त्यांच्याकरितां अज्ञानीहि बनले. आतां यापेक्षां आणखी किती त्यानीं खालीं उतरावयाचें ! *राम अवतारामध्यें कृष्णावतारापेक्षां हीच विशेष अपूर्व गोष्ट आहे,* असें दिसून येतें. पुढें वसिष्ठांच्या उपदेशानें रामाला ज्ञानविज्ञान प्राप्त झाल्यावर जीवन्मुक्त अवस्था प्राप्त झाली व त्या अवस्थेमध्यें म्हणजे ज्ञानोत्तर रामचंद्र आपलीं सर्व कर्मे अनासक्त बुद्धीनेंच करीत राहिला, असें पूर्वरामायणांतील त्याच्याच चरित्रावरून दिसून येतें. (या ग्रंथाचा भाग १ ला, प्रकरण ७ वें 'योगवासिष्ठाचा उपक्रम व उपसंहार,' पृष्ठ ४१). म्हणून ज्ञानोत्तर आपल्या कर्तव्यकर्मांचें आचरण करीत रहाणेंच श्रेयस्कर होय.

## योगवासिष्ठाचा अधिकारी.

योगवासिष्ठांतील 'योग' शब्दाचा अर्थ पाहून विचकून न जातां त्याचा अभ्यास करण्याचा अधिकार सर्व सामान्य लोकांना आहे. जसा वेदाचा अभ्यास करण्याचा अधिकार फक्त त्रैवर्णिकांना व त्यांतील पुरुषांनाच आहे तसा या शास्त्राच्या अधिकाराच्या बाबतींत कांहीं अशा प्रकारचे निर्बंध नाहींत. या शास्त्राचा अधिकारी कोण ? या प्रश्नाचें उत्तर वसिष्ठांनीं पुढील श्लोकांत दिलें आहे.

अहं बद्धो विमुक्तः स्यामिति यस्यास्ति निश्चयः ॥
नात्यंतमज्ञो नो तज्ज्ञः सोस्मिन्शास्त्रेऽधिकारवान् ॥ १-२-२

' मी या संसारांत बद्ध झालेला आहे, याच्यांतून मी आपली सुटका करून घेईन असा ज्याचा निश्चय झाला आहे, तसेंच जो अगदीं अडाणी नाहीं व मोठा ज्ञानीहि नाहीं, असा मनुष्य या शास्त्राचा अधिकारी आहे.' यावरून असा अर्थ निघतो कीं, सर्वसामान्य समजुतदार माणसांना या शास्त्राचा अधिकार आहे व त्यांनें याचा अभ्यास करावा.

## वैराग्य.

श्रीरामचंद्रानें वैराग्य प्रकरणांत जें वैराग्याचें वर्णन केलें आहे तें सर्वांना पटण्यासारखें आहे, यांत मुळींच शंका नाहीं. पण या वर्णनामध्यें रामचंद्रानें स्त्रीची निंदा करीत असतां असें म्हटलें आहे कीं, ' यौवनदशेमध्यें तर मनुष्य तरुण स्त्रियेच्या नादाला लागून अत्यंत दुःख भोगीत असतो. ' ( या ग्रंथाचा भाग १ ला, ' श्रीरामचंद्राचें वैराग्य ' या नांवाचें प्रकरण ११ वें, पृष्ठ ५७ ). हें वर्णन वाचल्यावर कोणालाहि असें वाटणें शक्य आहे कीं, रामचंद्रानें स्त्रीविषयीं असे उद्गार काढले, त्यावेळीं रामचंद्रानें जगाच्या स्थितीकडे दुर्लक्ष्य केलें होतें कां ? जगांतील बहुतेक सर्व लोक तरुणपणीं स्त्रीच्या नादाला लागतात, पण रामचंद्रानें सांगितल्याप्रमाणें त्यांना दुःख होत असतें, तर ते तिच्या नादाला खास लागले नसते; आणि ज्याअर्थी सर्व लोक स्त्रीसुखाला लोलुप झालेले आहेत त्याअर्थी रामचंद्राच्या या वरील बोलण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें वाटेल; पण हें म्हणणें बरोबर नाहीं. रामचंद्राच्या बोलण्याचा आशय असा आहे कीं, माणसानें विषयसेवन करावें पण त्याचा अतिरेक करूं नये. कारण अतिरेक झाला तरच त्या स्त्री वगैरे विषयापासून दुःख होणें योग्य आहे. ब्रह्मचर्य हें सर्वांत श्रेष्ठ व्रत आहे. परंतु हें सर्वांना पाळतां येणें शक्य नाहीं. म्हणून शास्त्रानें असें सांगितलें आहे कीं, स्त्रीसंभोगाविषयीं जे नियम करून ठेवलेले आहेत, ते सर्व नियम पाळून जर स्त्रीसंभोग केला तर गृहस्थाश्रमी पुरुषांनाहि ब्रह्मचारी म्हणण्यास हरकत नाहीं, कारण अशा नियमानें वागणाऱ्या त्या पुरुषाला त्याच्या तारुण्यामध्यें किंवा

त्याच्या उतरवयांत त्याच्या शरीराचा ऱ्हास होऊन व नानातऱ्हेचे रोग जडून त्याला दुःख भोगण्याचा प्रसंग येणार नाहीं व जर त्यानें मनसोक्त आचरण केलें तर मात्र तरुण स्त्रीच्या नादाला लागल्यामुळें त्याची शरीरहानि होऊन त्याला अत्यंत दुःख भोगावें लागेल. असा रामचंद्रांच्या बोलण्याचा अर्थ आहे असें दिसतें. तरुणपणीं माणसाच्या ठिकाणीं विवेक असावयास पाहिजे, तसा असेल तर त्याचें खरें जीवित होय, असें वसिष्ठांचें सांगणें आहे. (या ग्रंथाचा भाग १ ला, प्रकरण ४८ वें. 'वसिष्ठांचा सर्व जीवांना आत्मोद्धाराविषयीं कळकळीचा उपदेश'). ज्ञानोत्तर रामचंद्रानें विवाह केला व प्रपंचहि केला. यावरून रामचंद्राच्या वरील बोलण्याचा जो अर्थ काढला आहे, तो अगदीं बरोबर आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. रामचंद्राच्या संबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे ती अशी कीं, रामानें आपल्या स्त्रीचा त्याग केल्यावर दुसरी पत्नी केली नाहीं. रामचंद्र हा सार्वभौम राजा असल्याकारणानें आपण एकपत्नीव्रताचें आचरण करून आपल्या प्रजाजनांना व पुढें भावी कालांत जन्माला येणाऱ्या पुरुषांना 'माझ्यासारखें तुम्ही आचरण करा' असा जणुं काय त्यानें सर्वांना आदेशच देऊन ठेवला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा वरील आशय तरुणपिढींतील लोकांनीं ध्यानांत ठेवण्याजोगा आहे.

## साधुसमागम आणि सच्छास्त्राचा अभ्यास.

*साधुसमागम व सच्छास्त्राचा अभ्यास या दोन साधनावर वसिष्ठांनीं मोठा* भर दिला आहे. साधूची व सच्छास्त्राची व्याख्या या ग्रंथाचा 'तत्वज्ञान' भाग १ ला, पृष्ठ ९० व पृष्ठ ७६ यामध्यें केलेली आहे. वसिष्ठांनीं रामाला असेंहि सांगितलें आहे कीं,

अनंतं समतानंदं परमार्थं विदुर्बुधाः ॥
सयेभ्यः प्राप्यते नित्यं ते सेव्याः शास्त्रसाधवः ॥ २-६-३४

"समत्वापासून होणाऱ्या शाश्वत आनंदाला ज्ञाते लोक परमार्थ असें म्हणतात. या परमार्थाची प्राप्ति शास्त्र आणि साधु यांच्या योगानें होते, म्हणून निरंतर त्यांची सेवा करावी." रामानें विचारलें कीं, 'मी जीवन्मुक्त

केव्हां होईल ! ' त्याचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें कीं, ' याच जन्मामध्यें अगदीं थोड्या अवधींत तुला जीवन्मुक्त होतां येईल पण मी सांगतों त्याप्रमाणें

साधुसंगमसच्छास्त्रपरो भवसि राम चेत् ॥
तद्दिनैरेव नो मासैः प्राप्नोपि परमं पदम् ॥ ३-८-६

" जर साधूंची संगति धरशील व सच्छास्त्राचा सतत अभ्यास करशील तर कांहीं महिन्यांत नव्हे तर कांहीं दिवसांतच तूं परम पदाप्रत जाऊन पोहोंचशील. " वसिष्ठांनीं सर्व तरुण व वृद्ध माणसांना अशाच तऱ्हेचा उपदेश केला आहे. त्या ग्रंथाचा ' तत्त्वज्ञान ' भाग १ ला, प्र. ४८ वें ' वसिष्ठांचा सर्व जीवांना आत्मोद्धाराविषयीं कळकळीचा उपदेश ' (पृष्ठ ३८९). या ठिकाणीं वसिष्ठांनीं असें म्हटलें आहे कीं, ' या जगांत जिकडे पहावें तिकडे तरुण लोकच नव्हे तर **म्हातारे लोकसुद्धां विषयोपभोगाच्या नादीं लागलेले दिसतात.** ' असें कां व्हावें ! तर याचें कारण असें दिसतें कीं, तरुणपणीं वरील दोन साधनें संपादन करण्याचा ज्यांनीं मुळींच प्रयत्न केला नाहीं त्यांच्या हातून म्हातारपणीं काय होणार ? कारण तरुणपणच्याच संवयी म्हातारपणीं तशाच रहातात. म्हणून या जगांत पुष्कळ वृद्ध लोक विषयोपभोगाच्या नादीं लागलेले आढळतात. वसिष्ठांना ही गोष्ट मुळींच मान्य नाहीं. म्हणून ह्या वसिष्ठांच्या उपदेशाकडे लक्ष देऊन सर्वांनीं ( मग तो तरुण असो कीं वृद्ध असो ) साधूंची संगति धरून, सच्छास्त्राचा अभ्यास करणें हें अत्यंत श्रेयस्कर आहे.

## पौरुषप्रयत्न व दैव.

पौरुषप्रयत्न व दैव यासंबंधानें पुष्कळ वादविवाद चालत असतो. कोणी म्हणतात कीं, पौरुषप्रयत्नच श्रेष्ठ आहे, तर कोणी म्हणतात कीं, दैवच श्रेष्ठ आहे. यासंबंधीं वासिष्ठामध्यें फार मोठा विचार केलेला आहे. त्याच्याकरितां या ग्रंथाच्या पहिल्या भागांत ' पौरुषप्रयत्न, दैव व नियति ' या नांवाच्या १३ व्या प्रकरणांत सर्व तऱ्हेनें साधकबाधक प्रमाणांनीं विचार करण्यांत आला आहे. शेवटीं या प्रकरणाच्या उपसंहारामध्यें (पृष्ठें ७८-७९)

दैव व प्रयत्न यांचा अशा तऱ्हेनें समन्वय केला आहे कीं, दैव म्हणजे पूर्वजन्मींच्या शुभ व अशुभ प्रयत्नांचेंच फल आहे. आपण शुभ प्रयत्न करून दैवहि ( पूर्वीचा शुभ प्रयत्न ) अनुकूल असलें म्हणजे चांगल्या गोष्टी प्राप्त होतात. ह्याविपर्यी कोणीच वाद करीत नाहीं. या जन्मीं चांगला प्रयत्न करूनहि वाईट गोष्टी प्राप्त झाल्या असतां, "प्राक्तन जन्मांतील वाईट कर्माचें हें फल मला मिळत आहे, तेव्हां या जन्मीं तरी माझ्या हातून वाईट-कर्मे होऊं नयेत" असें ठरवून माणसानें योग्य दिशेनें प्रयत्न करीत रहाणेंच श्रेयस्कर होय; कारण कोणतीहि चांगली गोष्ट चांगल्या प्रयत्नानेंच साध्य होत असते. म्हणून या वासिष्ठांत असें स्पष्ट सांगितलें आहे कीं,

अप्यापदि दुरंतायां नैव गंतव्यमक्रमे ॥ ४-३२-४०

"केवढीहि भयंकर आपत्ति कोसळली तरी सन्मार्ग सोडून जाऊं नये" व कधींहि शुभ प्रयत्न करण्याचें सोडूं नये.

## योगवासिष्ठांतील महायोग.

योगवासिष्ठांतील 'योग' शब्दाचा अर्थ संसारांतून सुटण्याची युक्ति म्हणजे जीवब्रह्माच्या ऐक्य ज्ञानानें मोक्ष मिळविण्याचा उपाय असा अर्थ या ग्रंथाचा भाग १ ला 'योगवासिष्ठ या नांवाची उपपत्ति' या १ ल्या प्रकरणांत सांगण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें 'महायोग' याचा अर्थ म्हणजे सहज समाधीची स्थिति असा त्याच प्रकरणांत सांगितला आहे. यावरून वासिष्ठाचें ध्येय 'सहज समाधि' हें होय. कारण वसिष्ठांनीं हट-योगानें किंवा राजयोगानें प्राप्त होणारी सविकल्प व निर्विकल्प या दोन्ही समाधींचा निषेध केलेला आहे. याचें कारण असें आहे कीं, ज्ञानी पुरुषाला समाधींत दगडाप्रमाणें निष्क्रिय होऊन बसण्यांत काय अर्थ आहे ? हट-योगी प्राणाचाच विचार करितात व प्राणाच्या निरोधानें मनाचा निरोध करून समाधि लावण्याचा अभ्यास करितात, तर ( पातंजलयोगी ) चित्तापर्यंतच विचार करितात व त्याच्या वृत्तींचा निरोध करून समाधि लावण्याचा अभ्यास करितात. समाधि म्हणजे शरीराचीच नव्हे तर मनाची देखील निश्चल स्थिति होय, अशी सर्वसामान्य समजूत आहे. पण

वसिष्ठ त्याच्याहि पुढें जाऊन ' ज्या स्थूल शरीरांत प्राण रहातात, तें स्थूल शरीर व त्यांतील प्राण व स्थूल शरीरांतील चित्त, मन, बुद्धि व अहंकार हीं तत्त्वें परमार्थतः मुळींच नाहींत. इतकेंच नव्हे तर, हें सर्व दृश्य जगहि तत्त्वतः मुळींच नाहीं, तर तें केवळ ब्रह्मच आहे, असें सांगतात. ह्या अजातवादाच्या सिद्धांताप्रमाणें सर्व द्वैतजगाचा निषेध करून ज्याचा निषेध करितां येत नाहीं असें, सर्व तत्त्वांच्या पलीकडे असणारें एक आत्मतत्त्व फक्त आहे. ' हेंच तत्त्व आपण आहोंत ' असें कळल्यावर मनुष्य जीवन्मुक्त होतो व त्याला या स्थितींत ' सहज समाधीची ' स्थिति प्राप्त होते. या सहज समाधीचा विचार या ग्रंथाच्या पहिल्या भागांत 'समाधि' या नांवाच्या ४६ व्या प्रकरणांत करण्यांत आला आहे. ही समाधि म्हणजे दगडासारखे अचल होऊन रहाणें अशी नसून चालतांना बोलतांना किंवा आणखी सर्व तऱ्हेचीं कर्मे करीत असतांना देखील आत्मस्वरूपाचें अखंड अनुसंधान होत असल्यामुळे ती सहज समाधीच असते. म्हणूनच या समाधीला 'चालती बोलती' समाधि असें म्हटलें आहे. यावरून असें दिसून येतें कीं, पतंजलीनें मानलेल्या समाधीपेक्षां ही वसिष्ठांनीं सांगितलेली समाधि फारच श्रेष्ठ आहे, कारण पतंजलीच्या समाधींत तो योगी दुसऱ्याच्या उपयोगी पडत नाहीं, तर वासिष्ठाच्या समाधींत तो ज्ञानी ज्ञानोत्तर जगाच्या कल्याणाकरितांच जगत असतो व तो ज्ञानोत्तर लोकसंग्रहाकरितांच सर्व तऱ्हेचीं कार्यें करीत असतो किंवा त्यानें तसें करीत रहावें अशी वसिष्ठांची इच्छा आहे. हेंच तत्त्व या ग्रंथाचा भाग १ ला, ' ज्ञानोत्तर कर्मयोग का कर्मत्याग ? ' या नांवाच्या ४५ व्या प्रकरणांत सांगितलें आहे. सारांश, हटयोगी आधिभौतिक शरीराचा म्हणजे या स्थूल शरीरांतील प्राणाचा विचार करितात, व पतंजली वगैरे अतिवाहिक शरीराचा म्हणजे अंतःकरण तत्त्वाचा विचार करितात. म्हणजे पतंजलीचें योगशास्त्र मोक्षाच्या बाबतींत अपुरेंच पडतें. पण वसिष्ठ ह्या दोन्ही शरीरांच्या पलीकडे असणारे एक, सत्, चित् व आनंदरूप ब्रह्मतत्त्वच परमार्थतः सत्य असें मानतात. भगवद्गीतेंतहि ' यो बुद्धेः परतस्तु सः ' बुद्धीच्या पलीकडे जो आहे तो आत्मा, असे सांगून आत्मा हा बुद्धीचाहि विषय होत नाहीं असें सांगितलें आहे. म्हणून वसिष्ठांनीं सांगितलेला योग म्हणजे

यो. वा. ल. प्र. ३

तत्त्वज्ञान हेंच प्रथम जीवन्मुक्तीची प्राप्ति करून देऊन नंतर विदेहस्थितीला पोहोंचविणारें असल्यामुळें श्रेष्ठ दर्जाचें आहे.

## तत्त्वज्ञान माणसाला मोठा कर्तबगारी बनवितें.

तत्त्वज्ञानानें मनुष्य निष्क्रिय होत नसून तो मोठा कार्यकर्ता होत असतो, कारण त्याच्या ठिकाणींच असणारी शरीराविषयीं मीपणाची भावना तत्त्वज्ञानानें पार नाहीशी होते. म्हणूनच त्याच्यापुढें प्रारब्धानुसार जें कार्य करण्याकरितां येईल तें कार्य तो कोणताहि विचार न करितां करीत राहील. म्हणूनच त्या कार्यामध्यें त्या पुरुषाला हमखास यश येईल. हेंच तत्त्व सिद्ध करण्याकरितां या वासिष्ठांत ' भीम, भास व दृढ ' या तीन दैत्यांची गोष्ट सांगितली आहे. ( या ग्रंथाचा भाग २ रा, गोष्ट ११ वी ). या गोष्टींतील तीन दैत्यांच्या ठिकाणचा अहंकार तत्त्वज्ञानानें नाहीसा झाला होता, त्यामुळें या दैत्यांनीं देवांच्या बरोबर अनेक वर्षे युद्ध केलें; पण त्यांच्या ठिकाणीं अभिमान नसल्यामुळें त्यांना मरणाची भीति मुळींच नव्हती. म्हणून त्यांचा युद्धांत कधींहि पराभव झाला नाहीं. यावरून असें दिसतें कीं, युध्दक्षेत्रात काम करणाऱ्या वरच्या अधिकारी माणसापासून तो खालील सामान्य शिपायापर्यंत सर्वांना थोडेसें अध्यात्मशास्त्राचें शिक्षण दिल्यास याचा चांगला उपयोग होऊन " आपल्या देहाहून आपण निराळे आहोंत व आपलें स्वरूप अविनाशी आहे" असें समजून त्यांचा स्थूल शरीरावरील अभिमान थोडासा तरी नाहींसा होऊन त्यांच्या हातून होणारें युद्धरूपकार्य सामान्य माणसापेक्षा केव्हांहि श्रेष्ठ दर्जाचें होईल यांत शंका नाहीं. याचप्रमाणें दुसऱ्या कोणत्याहि कर्माचें आचरण करतेवेळीं माणसानें निरभिमानीपणा व निष्कामपणा धारण केला तर त्याला त्याचें कर्म इतर माणसापेक्षां खास उत्तम रीतीनें पार पाडतां येईल व त्याला त्याचें योग्य फळ मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं.

असो, यासंबंधीं आणखी किती जरी विचार केला तरी तो अपुराच पडेल, शेवटीं थोडक्यांत वसिष्ठांच्याच भाषेंत मी असें सांगतों कीं,

> यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥
> इमं समस्तविज्ञानशास्त्रकोशं विदुर्बुधाः ॥ ३-८-१२

जें या ग्रंथांत (वासिष्ठांत) आहे तेंच इतर ग्रंथांतून आहे, आणि जें यांत नाहीं तें कोठेंहि नाहीं. कारण हा ग्रंथ म्हणजे सर्व विज्ञानशास्त्ररूपी धनाचें भांडार आहे, असें जें मोठ्या विद्वान पुरुषांनीं वर्णन केलेलें आहे तें अक्षरशः खरें आहे.

योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञानाचा उपदेश वयातीत व वृद्ध माणसांकरितांच आहे, किंवा ज्यांना प्रपंच्याचा वीट आला आहे त्यांच्या करितांच आहे, तरुणाकरितां नाहीं, असें नसून तो सर्व आबालवृद्धांना आहे. प्रपंचाचा त्याग न करितां तो तात्त्विक दृष्टया कसा केला पाहिजे किंवा जे अजून प्रपंचांत पडले नाहींत त्यांनींहि आपली बुद्धि निर्मळ करावी व या संसारासंबंधानें आरंभीं चांगला विचार करून नंतर त्यामध्यें प्रवेश करावा, हें सांगण्याकरितांच योगवासिष्ठाची प्रवृत्ति झालेली आहे. म्हणूनच रामचंद्राप्रमाणें पूर्ववयांतच या मोक्षशास्त्राचा अभ्यास करून या संसाराचें रहस्य जितक्या लवकर समजून घेणें शक्य असेल तितक्या लवकर तें प्रत्येकानें समजून घ्यावें अशी माझी सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना नम्र विनंति आहे. श्री. ज. स. उर्फ तात्यासाहेब करंदीकर, माजी संपादक, 'केसरी', पुणें व श्री. शं. वा. उर्फ सोनोपंत दांडेकर, माजी प्रिन्सिपॉल, स. प. कॉलेज, पुणें, यांनीं या माझ्या ग्रंथाला प्रस्तावना लिहून दिल्या आहेत. तसेंच नामदार श्री. बाळासाहेब खेर, पंतप्रधान, मुंबई, यांनींहि या ग्रंथाला अभिप्राय दिला आहे. हे सर्व या 'उपोद्घाताच्या' पुढें क्रमानें दिलें आहेत. याबद्दल मी या सर्व थोर विद्वान पुरुषांचें मनःपूर्वक आभार मानतो. इतकें सांगून शेवटीं हा ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा ज्याच्या कृपेनें मला झाली व ज्याच्या अनुग्रहामुळेंच हा ग्रंथ परिपूर्ण होऊन मला तो त्याच्या विराट् स्वरूपाला म्हणजेच जनता जनार्दनाला अर्पण करितां आला, त्या सत्चिदानंदरूपी श्री प्रभु रामचंद्राचें पुनः एकवार स्मरण करून व त्याला वंदन करून ही प्रस्तावना संपवितों.

मार्गशीर्ष शु. २ शके १८७३.
दिनांक २९ नोव्हेंबर १९५१.

रघुनाथ भास्कर पावगीशास्त्री.

## श्री. ज. स. ( ऊर्फ ) तात्यासाहेब करंदीकर,
## माजी संपादक ' केसरी ' पुणें. यांची

# प्रस्तावना.

वे. शा. सं. पावगीशास्त्री यांनीं **' योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान, गोष्टी व सुभाषितें.'** या नावाचा सुमारें ८०० पानांचा ग्रंथ तयार केला आहे. त्याविषयीं त्यांनीं 'उपोद्घाता'मध्यें 'ग्रंथ लिहिण्याची आवश्यकता' या मथळ्याखालीं जे विचार प्रकट केले आहेत, ते योग्यच आहेत; कारण एवढा मोठा ३२०००श्लोकांचा ग्रंथ सर्वांना समग्र वाचणें फारच कठीण, किंबहुना अशक्य. म्हणूनच त्यांनीं मूळ योगवासिष्ठाचें सार काढून ह्या ग्रंथाच्या रूपानें त्यांतील तत्त्वज्ञान, गोष्टी व सुभाषितें लोकांना एकेठिकाणीं वाचावयास मिळावींत अशी चांगली सोय करून टेवली आहे.

मूळ ग्रंथाला ' योगवासिष्ठ ' हें नांव देण्याचें कारण असें आहे कीं, श्रीवसिष्ठ मुनींनीं श्रीरामाला केलेला उपदेश यांत ग्रथित केलेला आहे. म्हणूनच या ग्रंथाला **' योगवासिष्ठ '** असें नांव रूढ झालें आहे. हा उपदेश सामान्य व्यवहाराचा उपदेश नसून मोक्षोपायाचा उपदेश आहे. म्हणून या ग्रंथाला **' मोक्षोपायसंहिता '** असेंहि म्हणतात. संसारांतून तरून मुक्ति प्राप्त करून घेण्याचा जो उपाय त्याला ' योग ' असें म्हणतात. 'संसारोत्तरणें युक्तिर्योगशब्देन कथ्यते' असा या वासिष्ठांतल्या योग शब्दाचा अर्थ दिला आहे. वास्तव असा मोक्षप्राप्तीचा उपाय ज्या ग्रंथांत सांगितला त्या ग्रंथाला योगशास्त्र म्हणणें स्वाभाविक आहे; आणि हा उपदेश करणारे मुनि वसिष्ठ असल्यानें त्यांच्या या उपदेशाला **' योगवासिष्ठ '** असें नांव रूढ झालें आहे. हा ग्रंथ इतर कांहीं नांवांनीं ओळखला जातो; तथापि **' योगवासिष्ठ '** हेंच त्याचें नांव अधिक रूढ व सर्वप्रसिद्ध आहे; कारण हें नांव जितकें अन्वर्थक आहे, तितकें दुसरें कोठलेंहि नांव अन्वर्थक नाहीं.

श्रीवसिष्ठ हे रघुकुलाचे कुलगुरु आणि राम हा रघुकुलावतंस; तेव्हां वसिष्ठांनीं श्रीरामाला उपदेश करणें हें निसर्ग क्रमप्राप्त कर्तव्यच होय, तथापि

या उपदेशाची जी पार्श्वभूमि या ग्रंथांत वर्णिली आहे ती तितकीशी निसर्गप्राप्त दिसत नाहीं. तीर्थयात्रा करून परत आल्यावर श्रीरामाला वैराग्य प्राप्त झालें व तो संसाराविषयीं उदासीन झाला तेव्हां त्याचें राज्यकारभाराकडे मन वळविण्यासाठीं हा उपदेश केला गेला अशी या ग्रंथाची भूमिका आहे. श्रीरामाला असें वैराग्य प्राप्त झाल्याची कथा वाल्मीकिरामायणांत नाहीं. त्यांतून रावणवधार्थ राम हा परमेश्वराचा अवतार असून त्याला अज्ञानानें घेरलें आणि वसिष्ठांनीं त्याला उपदेश करून त्यास ताळ्यावर आणलें. असें मानण्यांत परमेश्वरी अवताराचा अपमान होत असल्याचा भास होतो; पण श्री पावगीशास्त्री यांनीं आपल्या उपोद्घातामध्यें म्हटल्याप्रमाणें परमेश्वराचा अवतार लोकसंग्रहाकरितां होत असतो, याच हेतूनें परमेश्वरानें ह्या रामअवतारामध्यें उपदेश्याची भूमिका ग्रहण करून हा जो सर्व ज्ञानाचा अभ्यास केला तो आपणाकरितां नसून अज्ञ जीवांनीं आपला उद्धार कसा करून घ्यावा व प्रपंचांत राहूनच सर्व प्रकारचीं कर्में करीत असतांना देखील आपल्या मनाचा समतोलपणा राखून शांति, सुख, समाधान कसें संपादन करावें याचें त्यांना शिक्षण मिळावें याकरितांच केलेला आहे.

महाभारतान्तर्गत अर्जुनोपदिष्ट श्रीमत्भगवद्गीता हीच मूळची आधारभूत गीता होय. त्यानंतर इतर सर्व गीता केवळ अनुकरणात्मक होत. सध्यां उपलब्ध असणारे बृहद्योगवासिष्ठ हाहि एक असाच अनुकरण केलेला ग्रंथ आहे. ग्रंथांतलें विवेचन मूळ भगवद्गीतेच्या तत्त्वज्ञानाप्रमाणेंच मोक्षोपायसंबंधांत शिरोधार्य असलें तरी त्यांत इतर अवांतर भरमसाट वर्णनात्मक तपशील कंटाळवाणा वाटतो. म्हणूनच श्री. पावगीशास्त्री यांनीं तो सर्व वगळून हा सारभूत ग्रंथ तयार केला आहे. भगवद्गीतेंतील उपदेश अगदीं सूत्रबद्ध असल्यानें चटकदार झाला आहे. म्हणूनच शास्त्रीबोवांनीं **'योगवासिष्ठ व भगवद्गीता'** या १५ व्या प्रकरणात पृ. १८ वर असें नमूद केले आहे कीं, गीता हा ग्रंथ सूत्रप्राय आहे आणि योगवासिष्ठ हा ग्रंथ फार विस्तृत आहे. म्हणूनच या ग्रंथाचा संक्षेप करण्याचे प्रयत्न **'लघुयोगवासिष्ठ'** व **'योगवासिष्ठसार'** अशा ग्रंथरूपानें करण्यांत आले असावेत.

आपल्या प्राचीन ग्रंथांच्या अध्ययनांत ग्रंथकर्ता, ग्रंथाचा काल, ग्रंथोत्पत्तीचा प्रसंग इत्यादि अवान्तर गोष्टींचा विचार करण्याची पद्धति नाहीं. प्रस्तुतचे ग्रंथाचे कर्ते श्री. पावगीशास्त्री हे जुन्या शास्त्रीपरंपरेंत चढलेले असले तरी त्यांनीं योगवासिष्ठाचा कालनिर्णय व कर्त्याचा निर्णय ठरविण्याविषयीं प्रयत्न केला आहे. असा निर्णय करण्यासाठीं त्यांच्या विवेचकबुद्धीला असें दिसून आलें कीं, वाल्मीकिकृत प्राचीन रामायण ग्रंथाची भाषा आणि योगवासिष्ठ ग्रंथाची भाषा या दोहींत बरेंच अंतर आहे. मूळ रामायणाची भाषा सोपी, सहजसुंदर आणि प्रासादिक असून योगवासिष्ठाची भाषा समासघटित आणि कांहींशी क्लिष्ट आहे. असा कालनिर्णयाचा साधक बाधक विचार केल्यावर सध्या उपलब्ध असणारें योगवासिष्ठ वाल्मीकीनें केलें आहे असें निश्चित म्हणता येत नाहीं व हा ग्रंथ महाभारतापूर्वी म्हणजे श्रीमद्भगवद्गीतेच्या पूर्वी होता असेंहि म्हणतां येत नाहीं. तरीपण त्यांनीं या ग्रंथासंबंधानें असें अनुमान काढलें आहे कीं, महाभारतापूर्वी योगवासिष्ठ ग्रंथ सध्याच्या मोठ्या स्वरूपांत जरी नसला तरी तो लहानशा स्वरूपांत असावा व त्याचें कर्तृत्व श्रीवाल्मीकि महर्षींच्याकडे असावें.

या ग्रंथांतील तत्त्वज्ञान बौद्ध कालानंतरचें तर आहेच पण श्री शंकराचार्यांच्याहि कालाच्या नंतरचें असावें, कारण यांत केवळ मायावाद विवर्तवाद प्रामुख्यानें नसून अजातवाद प्रामुख्यानें प्रतिपादन केलेला आहे आणि अजातवाद श्री शंकराचार्यांच्या पूर्वीचा असला तरी तो त्यांच्या शिष्य प्रशिष्य संप्रदायांतच अधिक रूढ झाला आहे. यावरून योगवासिष्ठ हा ग्रंथ आठव्या नवव्या शतकांतला असावा असें दिसतें. या कालनिर्णयासंबंधानें अधिक संशोधन केल्यास वासिष्ठाचा काल यापेक्षाहि पूर्वी कदाचित् असूं शकेल असें श्री. पावगीशास्त्री यांनीं या ग्रंथाच्या ' कालनिर्णय ' भागांत अनुमान केलें आहे.

या ग्रंथांतील निवडक व उद्बोधक प्रकरणांत ' पौरुषप्रयत्न, दैव व नियति ' हें प्रकरण विशेष तात्त्विक व महत्त्वाचें आहे. यांत पौरुष व दैव या दोन्ही शब्दांच्या व्याख्या दिल्या असून ज्यास आज आपण दैव म्हणतों तेंच कालच्या आपल्याच कर्माचें फळ असतें. यावरून ' दैव चांगलें याचा अर्थ पूर्वीचें कर्म चांगलें ' असाच होतो. भगवद्गीतेप्रमाणें ' उद्धरे-

दात्मनात्मानम् ' अर्थें म्हणून जें स्वोद्धाराचें साधन व स्वातंत्र्य आपल्याच स्वाधीन ठेवलें आहे, त्यांतलें मर्म योगवासिष्ठास मान्य आहे. ' जानामि धर्मं नच मे प्रवृत्तिः । जानाम्यधर्मं नच मे निवृत्तिः ॥ ' यांतील रडकथा योगवासिष्ठाला मान्य नाहीं. मनुष्य जर अशा नियतीनें जखडलेला असला तर विधि-निषेध, न्याय-अन्याय, आणि नीति-अनीति इत्यादि शास्त्रांचा उपदेश व्यर्थच ठरणार ! वरील प्रकरणांत ' उपसंहार ' या मथळ्याखालीं श्री. पावगीशास्त्री यांनीं विचार करून असा निष्कर्ष काढला आहे कीं, 'वाईट गोष्टी प्राप्त झाल्या असतां प्राक्तन जन्मांतील वाईट कर्मांचें हें फल मला मिळत आहे, तेव्हां या जन्मीं तरी माझ्या हातून वाईट कर्में होऊं नयेत असा विचार करून मनुष्यानें योग्य दिशेनें प्रयत्न करीत रहाणेंच श्रेयस्कर आहे.' हा शास्त्रीबोवांनीं काढलेला निष्कर्ष मोठा उद्बोधक आहे.

भगवद्गीतेच्या अनुकरणानें योगवासिष्ठ ग्रंथ निर्माण झालेला असल्या-मुळें त्यांत गीतेंतील अनेक श्लोक जसेच्या तसे अंतर्भूत केले गेले असल्यास नवल नाहीं. हे दोन्ही ग्रंथांत जुळणारे श्लोक श्री. पावगीशास्त्री यांनीं ' योगवासिष्ठ व भगवद्गीता ' या प्रकरणाच्या शेवटीं दिले आहेत. ( पृष्ठ १०६–१०९ ). या दोन्ही ग्रंथांतील मुख्य प्रतिपाद्य विषय एकच आणि त्यांतील तत्त्वज्ञानाचा गाभाहि एकच असला पाहिजे आणि तो तसाच आहे. गीतेचा विषय निष्काम कर्मयोग आहे. त्याचप्रमाणें योगवासिष्ठां-तील विषय जीवन्मुक्ति म्हणजेच निष्काम कर्मयोग होय. ही जीवन्मुक्ति आत्मज्ञानानेंच प्राप्त होते. असें खालील श्लोकांत सांगितलें आहे—

जीवन्मुक्तित्वमास्मिंस्तु श्रुते समनुभूयते ॥ ३-८-१५

अशा स्थितींत केलेलें कर्म बंधनकारक होत नाहीं म्हणूनच वसिष्ठांनीं शेवटीं 'धर्मेण राज्यमनुपालय वीर्णतृष्णः' अशा प्रकारें तृष्णारहित होऊन म्हणजे निष्काम होऊन राज्याचें परिपालन करण्याला सांगितलें आहे. अशा प्रकारें राज्य करणें नुसतें साहजिक कर्म नसून तोच निष्काम कर्मयोग होय व त्यांत अलौकिकत्व असल्यानें तोहि शास्त्राचा विषय होऊं शकतो. हा कर्मयोग किंवा जीवन्मुक्ति ज्ञानानें प्राप्त होत असते म्हणून ज्ञान हा योग-वासिष्ठाचा विषय आहे व त्याच्या करितां योगवासिष्ठांतील वचनें ' योग-

वासिष्ठांतील प्रतिपाद्य विषय ' या प्रकरणांत दिलीं आहेत. अशा रीतीनें उपक्रमोपसंहाराच्या दृष्टीनें गीता व योगवासिष्ठ यांत सादृश्य आहे.

जगाच्या उत्पत्तीसंबंधानें ज्या चार पांच कल्पना आहेत व ज्यांचें विवरण या ग्रंथाच्या २१ ते २७ प्रकरणामध्यें केलेलें आहे, त्यापैकीं ( १ ) आजातवाद, ( २ ) मायावाद व ( ३ ) विवर्तवाद हे युक्तीला पटण्यासारखे नाहींत, वास्तव ते गीतेनें स्वीकारले नाहींत. योगवासिष्ठांत ते मान्य धरले आहेत. बाकीच्या दोन कल्पना म्हणजे ' चिद्विलास 'वाद व 'सर्वब्रह्म वाद' हे दोन वाद तर्कशुद्ध असून सर्वमान्य होण्याजोगे आहेत. या सर्व कल्पनांचें वर्णन 'वर दर्शविलेल्या प्रकरणामध्यें श्री. पावगीशास्त्री यांनीं चांगल्या तऱ्हेनें केलें आहे. गीतेतल्याप्रमाणें जगदुत्पत्तीविषयीं एकच ठाम निर्णय योगवासिष्ठांत आढळत नाहीं.

मरणोत्तर आपापल्या कर्मानुसार सुखदुःखादि भोग भोगण्याकरितां जीव एका लोकांतून दुसऱ्या लोकांत जातो अशी सामान्य समजूत आहे व ही गीतेनेंहि मान्य केलेली आहे. पण वसिष्ठांना ही कल्पना मान्य नसून मरणोत्तर जीव दुसरीकडे कोठें जात नाहीं, तर जेथें पूर्वी होता तेथेंच आपल्या भावनेप्रमाणें तो स्वर्गनरकादि लोक आणि विविध योनी स्वतःच्या कल्पनेनें निर्माण करितो आणि सुखदुःखादि फळें भोगतो. अशा तऱ्हेनें सर्व प्रपंच मनच निर्माण करीत असतें, असें वसिष्ठानें मानलें आहे. म्हणूनच मनाचा नाश झाला कीं सर्व प्रपंच खलास होतो.

योगवासिष्ठकारास जीवन्मुक्ति ( सदेहमुक्ति ) आणि विदेहमुक्ति अशा दोन्ही प्रकारच्या मुक्ती मान्य आहेत. यांतील जीवन्मुक्तीची कल्पना गीतेंतील स्थितप्रज्ञाच्या कल्पनेसारखीच आहे. परंतु विदेहमुक्ति म्हणजेच सायुज्यमुक्ति कीं काय याचा खुलासा स्पष्टपणें कोठेंहि आढळत नाहीं. तथापि शास्त्रीबोवांनीं ' बंधमोक्षाचें स्वरूप ' या प्रकरणांत 'मोक्ष अथवा निर्वाण' या मथळ्याखालीं पुराण ग्रंथांतून मानलेल्या सालोक्यादि चारी मुक्तींचा उल्लेख करून हे चार मुक्तीचे प्रकार गौण मानले आहेत व संपूर्ण वासनांचा परित्याग ज्या अवस्थेंत होतो तीच उत्तम मुक्ति, म्हणजेच परब्रह्मांत मिळून जाऊन पूर्ण शाश्वत आनंदस्थिति होय.

शांकर तत्त्वज्ञानांतील मायावाद मुख्यत्वेंकरून न स्वीकारतां योगवासिष्ठांत

मनाच्या कल्पनेला प्राधान्य दिल्या कारणानें जगताला आभासिक किंवा भ्रमात्मक अस्तित्व नसून जग हें केवळ कल्पनामय आहे असें यांत प्रतिपादलें आहे. अर्थात् कोणत्याहि वस्तूला स्वतंत्र अस्तित्व नसून मनानें भावना केली म्हणजे ती वस्तु ह्या भावनेनुसार दिसूं लागते आणि भावना संपली कीं, त्या वस्तूचें अस्तित्वहि संपलें, असा हा 'दृष्टिसृष्टिवाद' यांत स्वीकारलेला दिसतो. यामुळेंच वासनाक्षय म्हणजे मनोनाश आणि मनोनाश म्हणजेच मुक्ति असें समीकरण योगवासिष्ठकारांनीं स्वीकारलें आहे. यांविषयीं 'मनाचें स्वरूप,' 'मनाचें सामर्थ्य' हीं प्रकरणें विशेष अभ्यासनीय आहेत, कारण या प्रकरणांत श्री. पावगीशास्त्री यांनीं मनाच्या कल्पनेसंबंधीं चांगलें समर्पक वर्णन केलें आहे.

जीवन्मुक्ताची जी व्यवहारस्थिति योगवासिष्ठांत वर्णिली आहे, ती गीतेंतील स्थितप्रज्ञाच्या आचरणाहून अधिक व्यावहारिक आहे. गीतेंतला स्थितप्रज्ञ हा पूर्णतः सुखदुःखातीत असतो. योगवासिष्ठांतला जीवन्मुक्त हाहि स्वतः सुखदुःखातीत असतो. तथापि तो बालाशीं बालाप्रमाणें, ज्ञान्याशीं ज्ञान्याप्रमाणें, यथाप्राप्त स्थितींत आसक्तिरहित वागत असून त्यांची लोकसंग्रहाची वृत्ति स्थिर असते.

शांकरमतानुयायी वेदान्ती ज्ञानोत्तर कर्म संभवत नाहीं असें मानतात. त्यांच्यामतें ज्ञान व कर्म यांच्यांत तमःप्रकाशवत् विरोध आहे. योगवासिष्ठकार हे ज्ञानोत्तर ज्ञान व कर्म यांचा समुच्चय शक्य मानतात. आत्मज्ञान प्राप्त झाल्यावरहि ज्ञानी माणसानें स्वकर्मत्याग करूं नये, किंबहुना मनुष्यदेह आहे तोंपर्यंत स्वकर्मत्याग संभवतच नाहीं, असें गीतेप्रमाणेंच योगवासिष्ठाचेंहि ठाम मत आहे आणि हें मत आपाततः कोठेंतरी एकदां आलें आहे असें नसून त्याच्याकरितां 'जीवन्मुक्ताची वागणूक' हें ४४वें संबंध प्रकरणच श्री. पावगीशास्त्री यांनीं खर्चीं घातलें आहे. या योगवासिष्ठाची खरी महती व शिकवणूक 'जीवन्मुक्ताची वागणूक' आणि '**ज्ञानोत्तर कर्मयोग कां कर्मत्याग?**' या दोन प्रकरणांत आहे. कारण व्यावहारिक माणसांना व्यवहारांत मार्गदर्शक आणि लोकसंग्रहार्थ आचरणांत आणून समाजाला वळण लावण्याला उपयुक्त असा उपदेश त्याच दोन प्रकरणांत आहे. योगवासिष्ठांत आसक्ति दोन प्रकारची मानली आहे. ( १ ) वंध्या आसक्ति

म्हणजे अज्ञानी माणसाच्या ठायीं विषयासंबंधानें जी वास करिते ती. (२) बंध्या आसक्ति. ही आत्मज्ञानोत्तरची असून ती संसारस्थितीला कारणीभूत होत नाहीं. अशा बंध्या आसक्तीनें युक्त असलेला पुरुष सर्व तऱ्हेचीं कामें अनासक्तीनें करीत असतो. कोणतेंहि कार्य करण्याविषयीं किंवा न करण्याविषयीं त्याचा आग्रह नसून 'यथाप्राप्तेन तिष्ठामि ह्यकर्मणि क आग्रहः' अशी त्याची स्थिति असते. त्याची हेयोपादेयदृष्टीच क्षीण झाली असल्यानें 'क्रियात्यागेन कोऽर्थः स्यात्। क्रियासंश्रयणेन वा॥' असें म्हणून तो अनासक्तीनें प्राप्त कार्य व सहजकर्म करीत असतो.

आत्मज्ञानी मनुष्य बालोन्मत्त पिशाचवत् कांहीं तरी आचरण करें तरी करीत रहातो. ही भूमिकाहि योगवासिष्ठाला मान्य नाहीं. जीवन्मुक्त पुरुष विधिनिषेधातीत असतो. याचा अर्थ अशा पुरुषाला दुराचरण माफ आहे, असा नव्हे. तो स्वतः ज्ञाता असल्यामुळें त्याला कर्माची युक्तायुक्तता इतरांनीं सांगावी लागत नाहीं, पण त्याचें स्वतःचें शुद्ध, नित्य, सत्त्वस्थ मन त्याला युक्तायुक्ततेची जाणीव सहजगत्याच देत असतें; आणि त्याचीं इंद्रियें ज्ञानमय झालीं असल्यानें तीं इंद्रियेंच दुराचारापासून आपोआप परावृत्त होतात. ज्ञान प्राप्त होण्यापूर्वी त्याच्यावर जो संस्कार झालेला असतो, त्या संस्कारानें तो निषिद्ध कर्मांपासून निवृत्त झालेला असतो आणि विहित कर्माचें आचरण सहज प्रवृत्तीनें तो करीत रहातो, ही त्याची नैसर्गिक स्थिति होय.

कर्तव्यबुद्धीविषयीं आणखी एक पाऊल पुढें टाकून गीतेप्रमाणेंच योगवासिष्ठ असें कंठरवानें सांगतें कीं, ज्ञानी माणसानें स्वतःकरितां नसलें तरी लोकसंग्रहाकरितां कर्म करावें. योगवासिष्ठानें हा सिद्धांत गीतेपेक्षां अधिक स्पष्ट भाषेंत मांडला आहे. श्री. वसिष्ठमुनी स्वतःसंबंधीं सांगतात कीं,

> कर्तव्यमस्ति न ममेह किंचिदेव।
> स्थातव्यमित्यतिमना भुवि संस्थितोऽस्मि॥

'या जगांत मला कोणत्याच तऱ्हेचें कर्तव्य नाहीं, तरीहि मी उन्मन स्थितींत या भूतलावर संचार करीत आहें.'

अशा प्रकारें ज्ञानोत्तर मनुष्याच्या हातून कर्म घडूं शकतें आणि ज्ञानी माणसानें स्वतःकरितां नव्हे तर लोकसंग्रहाकरितां सदाचरण करीत राहिलें पाहिजे. हे महत्त्वाचे सिद्धांत योगवासिष्ठानें सांगून ठेवून वेदान्ताला चांगलें वळण लावलें आहे.

श्री शंकराचार्यांनींहि गीताभाष्यांत ज्ञानोत्तर लोकसंग्रहार्थ कर्म करण्याचा उपदेश केला आहे, हें दर्शविण्यासाठीं श्री. पावगीशास्त्री यांनीं 'तत्त्वज्ञान' या १ ल्या भागाच्या पृ. ३६४–३६५ वर गीताभाष्यांतील पांच उतारे दिले आहेत. हे सर्व उतारे गीतेंतील कर्मयोगाला आणि योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञानाला पुष्टिदायक असले तरी आचार्यांचें हें मत सिद्धान्तरूप मानण्याला अडचण ही कीं, इतरत्र आचार्यांनीं ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय केव्हांच मानला नाहीं. ईशावास्यामधील 'कुर्वन्नेवेह कर्माणि' या कारिकेवर भाष्य करितांना आचार्यांनीं हें प्रकरण अज्ञ व अनाधिकारी जीवाकरितां आहे, असा शेरा मारून तें डावललें आहे. गीतेसंबंधींहि अशीच प्रकरणभेदाची सबब पुढें केली जाते. तें कसेंहि असलें तरी योगवासिष्ठकारांचें हें मत असें डळमळीत नसून ठाम आहे, तें केव्हांहि बदललेलें नाहीं.

यास्तव '**ज्ञानोत्तर कर्मयोग कां कर्मत्याग?**' या प्रकरणांतील 'जीवन्मुक्ताचा लोकसंग्रह,' 'खरा कर्मत्यागी कोण?' या मथळयाखालील विचार व '**जीवन्मुक्ताची वागणूक**' या प्रकरणांतील 'जीवन्मुक्ताचा बाह्यव्यवहार, जीवन्मुक्तच महाकर्ता, जीवन्मुक्तांचें जीवितच खरें जीवित' इत्यादि मथळयाखालील विचार सिद्धांत म्हणून मानून चालण्यास हरकत नाहीं.

'ज्ञानोत्तर कर्मयोग कां कर्मत्याग?' या प्रकरणाचा उपसंहार करितांना पृष्ठ ३६८ वर श्री. पावगीशास्त्री यांनीं असें नमूद करून ठेवलें आहे कीं, 'ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तर कर्में केलींच पाहिजेत असा आग्रह धरणें शास्त्रीयदृष्ट्या योग्य ठरणार नाहीं.' वेदान्त परंपरेला शास्त्रीयदृष्ट्या हें योग्य वाटो किंवा न वाटो, लौकिक दृष्ट्या तसा आग्रह धरणें समाजाच्या हिताचें आहे. म्हणूनच श्री. पावगीशास्त्री यांनीं यात्र प्रकरणाच्या पृष्ठ ३६९ वर असें नमूद केलें आहे कीं, जीवन्मुक्तानेंहि ज्ञानोत्तर जगाच्या कल्याणाकरितां जें कर्म

प्राप्त होईल तें यथाशास्त्र करीत राहणेंच श्रेयस्कर होय, कारण वसिष्ठांनीं स्वतःपुरता तर असा निर्णय सांगून ठेविला आहे कीं, " जोंपर्यंत प्राणिमात्रांची परंपरा कायम आहे, तोंपर्यंत मी या भूतलावर उपदेश करीत राहीन."

असो, या ग्रंथांतील इतर प्रकरणासंबंधीं विचार करितां ' समाधि ' ' खरा देव कोणता व त्याची पूजा कोणती ' ! ' वसिष्ठांचा सर्व जीवांना आत्मोद्धाराविषयीं कळकळीचा उपदेश इत्यादि प्रकरणें विशेष अभ्यसनीय आहेत

## भाग २ रा—गोष्टी.

मूळ योगवासिष्ठांत तत्त्वज्ञानाच्या उपदेशाबरोबरच तो उपदेश मनावर ठसण्यासाठीं कांहीं गोष्टी सांगितल्या आहेत. तत्त्वज्ञानाची प्रणालिका अभ्यासित असतां मध्यंतरींच आलेल्या गोष्टींनीं चित्ताचा विक्षेप होऊन विचार मालिका तुटण्याचा संभव असतो. याकरितां श्री. पावगीशास्त्री यांनीं त्या सुरस गोष्टी वेगळ्या काढून त्याचा वेगळा भाग या पुस्तकाला जोडला आहे. या गोष्टीपैकी कांहीं गोष्टींत जीं भरमसाट वर्णनें आलीं आहेत. तीं वगळून त्या गोष्टी सोप्या भाषेंत दिल्या आहेत त्यामुळें केवळ गोष्टीपर कथानकें वाचणाऱ्यांची चांगली सोय झाली आहे.

या सर्व गोष्टी अध्यात्मशास्त्रांतील तत्त्वें मनावर ठसण्याकरितां म्हणून उदाहरणादाखल सांगितल्या असून प्रत्येक गोष्टीच्या आरंभीं त्या गोष्टींतील तत्त्वदर्शक असा एक श्लोक प्रास्ताविक म्हणून दिला आहे आणि गोष्टीच्या अखेरीस त्या गोष्टींतलें तात्पर्य सारांशरूपानें उलगडून सांगितलें आहे.

योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञानांत ज्याप्रमाणें, हें जगत् मुळीं झालेंच नाहीं, सर्व देखावा केवळ मनोमय भ्रांति आहे, असा ' अजातवाद ' सांगून नंतर आत्मज्ञान झाल्यानंतरहि ज्ञानी माणसास कर्मत्याग घडत असून कर्मयोग आचरावा लागतो असा अखेरीस उपदेश केला आहे. त्याप्रमाणें त्या तत्त्वज्ञानाच्या दृढीकरणार्थ सांगितलेल्या गोष्टींमध्यें कांहीं गोष्टी सर्व संसार हा मनोमय भ्रांतिरूप आहे अशा तात्पर्यानें सांगितलेल्या असून कांहीं थोड्या गोष्टी कर्मयोगप्रधान आहेत. आकाशज ब्राह्मण; शिला, महाशिला, त्रिवक्र(ळ), तीन

राजपुत्र, खोटयराज्य, किराट, मिथ्या पुरुष, ब्रह्मांड इत्यादि गोष्टी काल्पनिक आहेत. असें श्री. पावगीशास्त्री यांनींहि त्या भागाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. कल्पनेनेंहि ज्याचें आकलन करितां येत नाहीं अशा मायावी वर्णनानें त्या गोष्टी फुलविल्या आहेत. जगत् हे मनोमय मायेचें इंद्रजाल आहे, असें दर्शविण्याचाच यांत हेतु दिसतो. लीलेची व तापसाची गोष्ट या दोन गोष्टींत मरणोत्तर स्थितीचा अनुभव मनालाच येत असतो असें सांगितलें आहे. ही कल्पना श्रुतिस्मृतीला मान्य नाहीं. पण 'तत्त्वज्ञान' भाग १ ला यांतील 'महर्षि वसिष्ठ' या प्रकरणांत असें सांगितलें आहे कीं, उपदेश करीत असतां मांडलेल्या तात्त्विक सिद्धांताच्या परिपोषणार्थ वसिष्ठांनीं श्रुतिस्मृति प्रमाणांचें आधार दिलेले नसून केवळ स्वतःच्या बुद्धीनें विचार करून प्रत्यक्ष प्रमाणानें जे विचार अनुभविले तेच त्यांनीं सांगितलें आहेत. कचगाथा, वीतहव्याचा आत्मविचार भास व विलास इत्यादि गोष्टी बहुतेक आत्मगत भाषणाच्या स्वरूपाच्या असून त्यांत संसार हा असार आहे, आणि मी देह नव्हे, तेव्हां मी या देहासाठीं कर्म कां करावें ? अशा आशयाचें आत्मचिंतन आहे.

याशिवाय राहिलेल्या इतर गोष्टींत बराचसा बोध घेण्यासारखा आहे. कर्कटी राक्षसीची गोष्ट, वेताळाची गोष्ट, अर्जुनाची गोष्ट, भृंगीशाची गोष्ट, या गोष्टींत यक्ष प्रश्नासारखे कांहीं प्रश्न असून त्यांची तत्त्वज्ञानपर उत्तरें दिलेलीं आहेत. शिवपूजेच्या गोष्टींत खरी देवपूजा कशी असते तें सांगतांना पर्यायानें 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य' हें गीतेंतलें तत्त्वच प्रतिपादन केलें आहे. या विषयाचें सविस्तर प्रतिपादन करण्याकरितां श्री. पावगीशास्त्री यांनीं 'तत्त्वज्ञानाच्या' भागांत एक स्वतंत्र प्रकरण ४७ वे खर्ची घातलें आहे तें वाचनीय आहे. कर्कटीच्या गोष्टींत समचित्तत्व कसें असतें तें सांगून ज्याची अशी समदृष्टि झाली नाहीं तो खरा राजा नव्हे व खरा मंत्रीहि नव्हे असा स्पष्ट इशारा दिला आहे.

सुरघुच्या गोष्टींत सहज समाधीचें स्वरूप सांगून अशा तऱ्हेची समाधि ज्याला साध्य झाली त्यानें निग्रहानुग्रहासारखी राज्यकार्यें केलीं तरी त्यापासून त्याला सुखदुःखाची बाधा होत नाहीं, असें सुचवून ज्ञानोत्तर कर्मयोगाचें समर्थन केलें आहे.

किराटाच्या गोष्टींत हरवलेल्या कवडीचाहि मनःपूर्वक शोध करणारा कवडीचुंबक हा चिंतामणि प्राप्त करून घेता झाला. असें सांगून क्षुद्र वस्तूच्या शोधार्थ मनाची एकाग्रता आत्मज्ञानाला उपयोगी पडते असा निष्कर्ष काढला आहे. एकनाथाच्या चरित्रांतील अशीच कथा येथें वाचतांना आठवल्याशिवाय रहात नाहीं.

भगीरथाची गोष्टहि ज्ञान प्राप्त झाल्यावर राज्य स्वीकारण्याचा बोध करण्यासाठींच सांगितली आहे. मनूचा इक्ष्वाकूला जो बोध आहे त्याचेंहि तात्पर्य तेंच आहे. या सर्वांपेक्षां चूडालाख्यान म्हणून प्रसिद्ध असलेली चूडालेची गोष्टहि कर्मयोगाचें स्वरूप स्पष्टपणें दर्शविणारी आहे. चूडालेनें आपल्या पतीला आत्मबोध करून शेवटीं राज्यत्याग न करितां राज्योपभोग घेण्याविषयीं त्याचें मन वळविलें.

प्रल्हाद आणि बली यांच्या कथांचेंहि तात्पर्य तेंच आहे. प्रल्हादाच्या कथेंत महाविष्णूच्या तोंडीं जे विचार घातले आहेत ते मननीय आहेत. प्रल्हाद दैत्य समाधींत गढून गेलेला पाहून महाविष्णूला तें दृश्य पटलें नाहीं. महाविष्णूनें विचार केला कीं, " दैत्य जिवंत राहिलेच पाहिजेत, असें मला वाटतें. दैत्य जगले म्हणजे देवहि सावध राहातील. देव असले म्हणजे माणसे यज्ञादि क्रिया करूं लागतील आणि मग हा संसाराचा गाडा अव्याहत चालू राहील. " असा विचार करून जगताचा गाडा चालू रहावा म्हणून महाविष्णूनें पाताळांत जाऊन प्रल्हादाला त्याच्या समाधींतून जागें केलें.

## सुभाषितें भाग ३ रा.

तत्त्वज्ञान आणि बोधप्रद गोष्टी यांच्या शेवटीं सुभाषित संग्रहाचा तिसरा भाग जोडला आहे. तो अतिशय महत्त्वाचा आहे. तत्त्वज्ञानाचें वर्णन दहावीस पानें वाचूनदेखील जेवढा बोध मनाला होत नाहीं, तेवढा बोध एकेक सुभाषित पाठ केल्यानें होतो. सुभाषितरूपानें सांगितलेलें तत्त्वज्ञान कंठगत केल्यानें तें सदैव आपणास जागृत ठेवीत असते. यास्तव या ग्रंथाच्या शेवटीं दिलेली सुभाषितें मननपूर्वक अभ्यासावीं आणि कंठगत करावीं.

भर्तृहरीच्या नीतिशतक व वैराग्यशतक या दोहोंत मिळून जितका

सद्बोध सांठविला आहे त्याहून अधिक सद्बोध या सुभाषितसंग्रहांत साठविला आहे. सुभाषितांत आध्यात्मिक नैतिक आणि धार्मिक असा पोटभेद केला असला तरी तत्त्वदृष्टीनें पाहिल्यास सर्वच सुभाषितें नीतिपर आहेत.

या सुभाषितांत सांगितलेली नीति आचरणांत आणण्यास सुलभ असून आत्यंतिक श्रेयाची प्राप्ति करून देणारी आहे. श्री. पावगीशास्त्री यांनीं त्या सुभाषितांचा परिचय करून देण्यासाठीं नमुन्यादाखल म्हणून कांहीं सुभाषितांचें तात्पर्य प्रस्तावनेंत दिग्दर्शित केलें आहे. याकरितां मी त्यांची पुनरुक्ति करीत नाहीं. तथापि अभ्यास, तप, उद्योग, सदाचार, पंडितलक्षण, मूर्खलक्षण, कर्तव्यबोध, कर्मत्यागाची अशक्यता, सत्संगाची महती, खरी समाधि, आर्यांचें लक्षण, इंद्रियजयाचें महत्त्व, आळशी नरपशु, राजधर्म, समत्वदृष्टीची साधुता, दुसऱ्यांच्या हिंसेंत स्वधर्म, निरिच्छिता इत्यादि संबंधीं जीं सुभाषितें आहेत, त्यांचें सतत चिंतन व आचरण करावें, असें पुनः पुनः सांगितल्याशिवाय राहवत नाहीं.

एकंदरींत हा ' योगवासिष्ठसारभूत ' ग्रंथ म्हणजे सद्बोधाची खाणच आहे. मूळ ग्रंथ अतिविस्तृत व पाल्हाळिक असतांना शास्त्रीबोवांनीं त्यावर दोन तपांचेवर सतत चिंतन व प्रवचन करून त्यांतला महत्त्वाचा भाग, हंसक्षीर न्यायानें, वेचून काढून तो पुस्तकरूपानें प्रकाशित केला हा मराठी वाचकांवर मोठा उपकारच होय. ' शास्त्रें फार अपार जीवित तुझें अत्यल्प कीं मानला ' यांत म्हटल्याप्रमाणें मानवाला सर्वच शास्त्रें समग्र अवलोकन करणें शक्य नसतें. यास्तव जो ग्रंथकार स्वतः अनेक वर्षे परिश्रम करून त्या शास्त्रांतला निवडक भाग वाचकांना सुलभ करून देतो तो वाचकांचा उपकर्ताच होय. श्री. पावगीशास्त्री यांनीं वाचकांवर असा उपकार करून ठेवला आहे. आतां त्याचें चीज करून त्या उपकाराची अल्पांशानें तरी परत फेड करणें हें महाराष्ट्रीय वाचकांचें कर्तव्य होय.

—ज. स. करंदीकर.

श्री. शं. वा. ऊर्फ सोनोपंत दांडेकर, माजी प्रिन्सिपॉल, स. प. कॉलेज, पुणें, यांचे

# प्रास्ताविक चार शब्द.

यालागीं सर्व प्रकारें। वासिष्ठीं प्रवेश करा वारे।
अर्थु कळलिया निर्धारें। ब्रह्मचि तुम्ही॥

रंगनाथी योगवासिष्ठ निर्वाण प्र. १५६.

मराठी वाङ्मयांत जीं मौलिक व उपयुक्त पुस्तकें प्रकाशित होतात त्यांत श्री. पार्वतीशास्त्री कृत "योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान, सुरसगोष्टी व सुभाषितें" या पुस्तकाची गणना अवश्य केली पाहिजे. मूळचा 'योगवासिष्ठ' हा ग्रंथ संस्कृतांत आहे. तो पुराण नव्हे. तत्त्वज्ञानाचा ग्रंथ आहे. या ग्रंथराजाचें अध्यात्मपर संस्कृत वाङ्मयांत केवढें स्थान आहे, हें अध्यात्माची आवड असणाऱ्या वाचकांस सांगावयास पाहिजे असें नाहीं. गौडपादाचार्य, भर्तृहरि, शंकराचार्य, पंचदशीकार विद्यारण्यस्वामी, यांच्यासारखे अद्वैतमताचे अधिकारयुक्तवाणीनें प्रतिपादन करणारे तत्त्वज्ञ यांच्या ग्रंथांवर या ग्रंथाची छाप पडलेली आहे, हें सर्वमान्य आहे. उपनिषदें, भगवद्गीता यांच्या पंक्तीस बसण्याजोगा हा ग्रंथ आहे. याबद्दल विद्वानांत दुमत नाहीं असें म्हटल्यासहि हरकत नाहीं.

जुन्या काळीं संस्कृतांत झालेल्या महत्त्वपूर्ण ग्रंथांवर या ग्रंथाची छाप पडलेली आहे, ही गोष्ट महत्वाची आहेच. पण मराठी वाचकांच्या दृष्टीनें आणखी सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे मराठींतील आद्यकवी असें ज्यांना संबोधतां येईल असे महाराष्ट्राचे एक जनक संतश्रेष्ठ अलंदीप श्रीज्ञानराज यांच्या 'ग्रंथावर 'हि या ग्रंथाची छाप पडलेली आपणास दिसून येईल. अनुभवामृतांतील स्फूर्तिवाद, ज्ञानेश्वरींतील विपुल दृष्टान्त देण्याची पद्धत, फार काय ज्ञानेश्वरी व अनुभवामृतांतील कित्येक

दृष्टान्त हे सर्व आपणास योगवासिष्ठांत आढळून येतील. ज्ञानेश्वर महाराजांचें म्हणून एक योगवासिष्ठ प्रसिद्धहि आहे. (ज्ञानेश्वर महाराजांनीं योग वासिष्ठाचें सार मराठींत मांडलें असल्याचा संभव आहे. पण प्रस्तुतचें सार त्यांचें आहे, असें प्रस्तुत लेखकास वाटत नाहीं ). श्री एकनाथ, श्री समर्थ, श्री रंगनाथ, श्री तुकारामादि मराठी संतश्रेष्ठ कवींच्या ग्रंथा-वरहि याचा परिणाम झालेला आहे असें आढळून येतें; कारण योगवासिष्ठांतील कित्येक संस्कृत वचनें यावरील कवींच्या ग्रंथामध्यें मराठींत तंतोतंत आलेलीं आहेत. तीं प्रस्तुतच्या लेखकानें आपल्या ग्रंथांत नमूद केलीं आहेत. या ग्रंथांतील चर्चेचा प्रसंग मोठा मौजेचा आहे. विश्वामित्र हे दशरथ राजाजवळ यज्ञांत विघ्न करणाऱ्या राक्षसापासून यज्ञाचें रक्षण करण्यास रामलक्ष्मणांस आपणावरोबर द्यावें, अशी याचना करण्याकरितां आले आहेत.अशा वेळीं तीर्थयात्रेहून नुकतेच परत आल्यामुळें जगन्मिथ्यात्व मनावर पूर्ण बिंबल्यामुळें श्रीरामाचें मन उदासीन झालें आहे. अशा उद्विग्न मन झालेल्या रामास कर्तव्योन्मुख करण्याकरिता वसिष्ठांनीं जो उपदेश केला तो हा योगवासिष्ठ ग्रंथ.

श्रीमद्भगवद्गीतेंत पूर्णब्रह्म श्रीकृष्णनाथ हे उपदेशक वक्ते व नररूपी अर्जुन हा श्रोता असा प्रसंग आहे. या ग्रंथांत 'रामराम स्मरतां घोष। जेणे तुटती भवपाश ॥' असें पूर्णब्रह्म श्रीराम हे शिष्य श्रोते गुरु वसिष्ठांच्या चरणाजवळ बसून 'शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्' म्हणून विनंति करीत आहेत.

बत्तीस हजार श्लोकांचा हा योगवासिष्ठ ग्रंथराज ही आध्यात्मिक रत्नांची खाण आहे, असें म्हटलें तर त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. लढाईस नेण्याकरितां आलेल्या विश्वामित्रासमोर पण राजवाड्यांत चर्चा होत असल्यामुळें हा ग्रंथ ज्ञानसत्राच्या स्वरूपाचा आहे. यांत बहुत दिवस ज्ञान चर्चा चाललेली असल्यामुळें अनेक विषय विस्तृतपणानें चर्चिले आहेत. अद्वैतवाद, मायावाद, विवर्तवाद, स्फूर्तिवाद, अज्ञातवाद, ईश्वरवाद, दैवपुरुषवाद इत्यादि वादांना या ग्रंथांत मोकळेपणानें वावरण्यास वाव मिळाला आहे. पुनर्जन्म, मोक्ष, ज्ञान कर्मप्रभृतिमार्ग यांचीहि सविस्तर

चर्चा यांत आहे. विशेष महत्त्वाची गोष्ट ही कीं, 'निर्वाणीची कथा सांगत असतांनासुद्धां श्रीवसिष्ठ या जगांत मुक्ताच्या देहास वावरावयाचें आहे हें विसरले नाहींत. त्यांचा श्रीरामचंद्राला अत्यंत महत्त्वाचा व शेवटचा उपदेश असा आहे कीं,

> जाग्रत्येव सुषुप्तस्थः कुरु कर्माणि राघव ।
> अन्तःसर्वपरित्यागी बहिः कुरु यथागतम् ॥

' अतस्त्यागी ' राहून संसार कर.

शिखिध्वजादिकांच्या गोष्टींतूनहि हेंच सार सांगितलें आहे. गीतेप्रमाणेंच या ग्रंथांत परमार्थ व प्रपंच यांची उत्तम सांगड घातली आहे.

या ग्रंथांतील ( १३ ) पौरुषप्रयत्न व दैव, ( १५ ) योगवासिष्ठ व भगवद्गीता ( २१ ) चिद्विलास, ( २३ ) अजातवाद, ( २४ ) सर्वब्रह्मवाद ( ४० ) ज्ञानयोगाच्या सात भूमिका; ( ४४ ) जीवन्मुक्ताची वागणूक, ( ४५ ) ज्ञानोत्तर कर्मयोग कां कर्मत्याग ? ( ४६ ) समाधि, ( ४७ ) खरा देव कोण ? व त्याची पूजा कोणती ? व ( ४८ ) वसिष्ठांचा सर्व जीवांना आत्मोद्धाराविषयीं कळकळीचा उपदेश. हीं प्रकरणें मनाला चांगलाच बोध करून देणारीं आहेत.

उच्च अशा तात्त्विक, आध्यात्मिक मूल्यांची चर्चा करीत असतां वसिष्ठांनीं विषय सोपा करून सांगण्याकरितां अनेक दृष्टांत दिले आहेत. येवढेंच नव्हे तर अनेक कथाहि सांगितल्या आहेत. यामुळें

> जें अपेक्षिजें विरक्तिं । सदा अनुभाविं जें संतीं ।
> सोहंभावें पारंगतीं । रमिजें जेथ ॥

या ओवींत वर्णन केल्याप्रमाणें जसा हा ग्रंथ ज्ञानी पुरुषांना योग्य आहे, त्याचप्रमाणें परमार्थपथावर प्रथमच पाऊल टाकणाऱ्या बालजिज्ञासूंसहि आवडणारा व उपयोगी असा हा ग्रंथ आहे. श्री. पावगीशास्त्रींनींहि या ग्रंथांतील ' अध्यात्मशास्त्रांतील ज्ञानाचा अधिकारी ' या १० व्या प्रकरणांत शेवटीं असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, ' योगवासिष्ठ हा ग्रंथ सिद्ध व साधक या दोघांनाहि लागू होणारा आहे. '

श्री. ज्ञानदेवांनीं उत्कृष्ट काव्याच्या ' रसिकत्व ' व ' परतत्वस्पर्श ' ह्या ज्या दोन कसोटया सांगितल्या आहेत, त्यांत हा ग्रंथ उतरेल यांत शंका नाहीं. श्री. ज्ञानदेवांनीं खालील ओव्यांत महाभारताचें जें वर्णन केलें आहे तें थोड्या फरकानें या ग्रंथासहि लागू आहे. असा हा ग्रंथ आहे.

ना तरी सर्व सुखाचि अब्धि । जे प्रमेय महानिधि ।
नाना नवरस सुधाब्धि । परिपूर्ण ॥
कीं परमधाम प्रकट । ... ... ... ... ।
ना तरी सकळधर्मांचें माहेर । सज्जनांचे जिव्हार ।
लावण्यरत्नभांडार । शारदेचे ॥

असा हा ग्रंथ उत्कृष्ट असतांना अर्वाचीन काळांत त्याकडे दुर्लक्ष झाल्याचें दिसतें, त्याचें कारण त्याचें विशालत्व व बहुधा त्याचें योगवासिष्ठ हें नांव 'योगा'संबंधीं अनेक विपरीत कल्पना समाजांत पसरलेल्या असल्यानें हा एक योगाचा ग्रंथ म्हणून त्याकडे फारसें कोणी पहावयासच तयार होत नाहीं, असा अनुभव येतो. योगवासिष्ठांतील योग कोणता याचें स्पष्टीकरण प्रस्तुतच्या ग्रंथांत लेखकानें स्पष्ट शब्दांत केलें आहे. त्यानें या ग्रंथासंबंधीं-च्या विपरीत कल्पना दूर होतील अशी आशा आहे.

या योगवासिष्ठावर सन १९३६ मध्यें काशी विश्वविद्यालयांतील प्राध्यापक श्री. आत्रेय यांनीं इंग्रजींत 'The Philosophy of Yogavasishtha' या नांवाचा एक उत्कृष्ट ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. श्री पावगीशास्त्री यांच्या ग्रंथाची मांडणी त्याच धर्तीवर केलेली आहे असें दिसतें. प्रस्तुतच्या मराठी ग्रंथाचे तीन विभाग आहेत. एकांत योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान, दुसऱ्यांत त्यांतील सुरस गोष्टी व तिसऱ्यांत त्यांतील उत्कृष्ट अशी कांहीं सुभाषितें. मराठींत पुण्याच्या चिपळूणकर मंडळीनें योगवासिष्ठाचें समग्र *भाषांतर छापलें आहे. कै. विष्णुशास्त्री बापट यांनीं योगवासिष्ठाचें* मराठींत सारस्प भाषांतर ( श्लोकशः नव्हे ) छापलें आहे. परंतु संपूर्ण योगवासिष्ठावर विषयांचें पृथक्करण करून विषयाची मांडणी करणारा हा मराठी भाषतील पहिलाच ग्रंथ आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हा ग्रंथ इतका मोठा आहे व त्याचे अभ्यासू इतके दुर्मिळ आहेत कीं, जसा महाभारताचा उपसंहार लिहून घेऊन छापला, त्याप्रमाणें योगवासिष्ठाचाहि उपसंहार त्याचें भाषांतर छापून प्रसिद्ध केल्यावर छापावा म्हणून चिपळूणकर मंडळीचें व्यवस्थापक मंडळ खटपट करीत होते परंतु त्यांना यावर लिहिण्यास अधिकारी व ज्यास्त वेळ ज्यास वेळ आहे असा मनुष्य मिळणें कठीण झालें. पण श्रीरामचंद्राच्या कृपेनें आज हा ग्रंथ प्रसिद्ध होऊन एकप्रकारें ती उणीव भरून काढण्याचा सुयोग येत आहे. या ग्रंथाचें लेखक श्री पावगीशास्त्री यांना त्यांच्या वडिलांकडून योगवासिष्ठाचें बाळकडू लहानपणींच मिळालें आहे. यांचे वडील कै. भास्करशास्त्री हे योगवासिष्ठाचे प्रख्यात वक्ते होते. त्यांनीं कित्येक वर्षे योगवासिष्ठावर पुराण सांगितलें. श्री. पावगीशास्त्री हे त्यांच्याच तालमींत तयार होऊन ते हयात असतांनाच या ग्रंथाचें प्रवचन करूं लागले होते व तो क्रम दोन तपांवर त्यांनीं अव्याहतपणें चालूं ठेवला. तात्पर्य, या ग्रंथाचा श्री. पावगीशास्त्री यांचा दोन तपांवर व्यासंग आहे. शिवाय त्यांनीं या ग्रंथावरील संस्कृत, प्राकृत व इंग्रजी भाषेंतून लिहिलेले अनेक ग्रंथहि मनःपूर्वक अभ्यासिले आहेत.यामुळें या ग्रंथाची मांडणी करितांना त्यांनीं जुनी चाकोरी सोडून नवीन पद्धतीनें विषयांची मांडणी केली आहे. प्रस्तुतचें पुस्तक म्हणजे योगवासिष्ठाचें भाषांतर नव्हे. ग्रंथाचा सूक्ष्म अभ्यास करून, त्यांतील विषयांची छाननी करून वेगवेगळे विषय निवडून त्यावरील वसिष्ठांचें मत वाचकांच्यासमोर त्यांनीं मांडलें आहे. त्याचप्रमाणे ग्रंथांतून येणारे पण ग्रंथासंबंधीं उत्पन्न होणारे, ग्रंथाचा कर्ता, त्याचा काल, त्याची इतर ग्रंथाशीं तुलना इत्यादि प्रश्न यांचाहि ऊहापोह शास्त्रीबोवांनीं जुनी नवी दृष्टि ठेवून केला आहे. यामुळें ही सर्व चर्चा नव्या–जुन्या सर्वांस रुचकर अशीच वाटेल. अर्थातच त्यांचीं मतें सर्वांनाच पटतील असें नाहीं पण वाचक एवढें खास म्हणतील कीं, कोणच्या मताचा आग्रह न धरतां येथें विचार मांडले आहेत. योगवसिष्ठाचें मंथन करून हें ग्रंथरूपी नवनीतच शास्त्रीबोवांनीं वाचकांसमोर ठेवलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

तत्त्वज्ञानाच्या चर्चेस तोड म्हणून योगवासिष्ठांतील कथांचा वेगळा संग्रह दिला आहे. त्या संग्रहांत एकंदर एकावन्न कथांचा संग्रह केलेला

आहे. प्रत्येक कथेंत एक एक उत्कृष्ट तत्त्व ग्रंथित केलेलें आहे. प्रवचनकार, कीर्तनकार यांना हा एक अमूल्य ठेवाच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

अभ्यासूकरतां या दोन भागांस जोड म्हणून ग्रंथांतील सुभाषितें वेगळीं काढून त्याचा एक स्वतंत्र भाग केला आहे. सुभाषितांचें भाषांतर लिहिलें आहे. हीं सुभाषितें कंठगत करण्यासारखीं आहेत.

तात्पर्य, या ग्रंथांत अध्यात्मविषयावर विपुल अशी माहिती निवड करून ठेवलेली वाचकास आढळून येईल. अध्यात्माची ज्यांना आवड आहे त्यांना हें पुस्तक सर्वदा संग्राह्य असें झालें आहे. गोष्टीच्या व सुभाषितांच्या भागानें सामान्य वाचकांचीहि सोय झाली आहे. तत्त्व-जिज्ञासु व सामान्य वाचक या उभयवाचक वर्गांस उपयोगी होईल असा हा ग्रंथ तयार केल्यावद्दल शास्त्रीबोवांचें अभिनंदन करणें अवश्य आहे. या ग्रंथाची किंमत रु. १२ ठेविली आहे. या ग्रंथांत दिलेल्या सर्व तऱ्हेच्या माहितीच्या मानानें ही किंमत कमी वाटते. श्री पावगीशास्त्री यांना विचारल्यावर त्यांनीं असा खुलासा केला कीं, अध्यात्माची आवड असणाऱ्या मध्यम स्थितींतल्या लोकांनाहि हा ग्रंथ घेतां यावा या दृष्टीनें ही किंमत ठेविली आहे. योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान कथासह सामान्य वाचक वर्गाच्या आटोक्यांत आणून देवल्यावद्दल हा वाचकवर्ग शास्त्रीबोवांचे खात्रीनें आभारच मानील यांत शंका नाहीं. अध्यात्मप्रेमी मराठी वाचक-वर्ग श्री. पावगीशास्त्री यांच्या श्रमाचें चीज करील अशी खात्री आहे.

शं. वा. दांडेकर



## नामदार श्री. बाळासाहेब खेर,
## पंत प्रधान, मुंबई, यांचा अभिप्राय.

आपला ग्रंथ पाहिला. आपण योगवासिष्ठांतील सुंदर तत्वज्ञान सर्वांस सुलभ व्हावें म्हणून जी कामगिरी केली आहे, याबद्दल आपणाला धन्यवाद द्यावे तेवढे थोडे. गोष्टीचा भाग व तत्वज्ञानाचा भाग वेगळा काढून आणि गोष्टींच्या शेवटीं त्या गोष्टींचें तात्पर्य देऊन अज्ञलोकांसहि तत्व समजण्यास मदत केली आहे. गोष्टीचा भाग लोकांना नेहमींच आवडतो पण ह्या गोष्टीहि अत्यंत बोधप्रद आहेत. त्यामुळें गोष्ट वाचण्याच्या मोहानें सुद्धां जे लोक पुस्तकाचा कांहीं भाग वाचतील त्या लोकांना देखील सहज उपदेश प्राप्त होईल. योगवासिष्ठांतील तत्वज्ञान हा भाग तर अत्यंत महत्वाचा आहे व ज्यांना अध्यात्माची गोडी आहे ते नेहमीं कृतज्ञतेनें आपल्या परिश्रमांचें कौतुक करतील. धर्माबद्दल कांहीं फार घातुक कल्पना लोकांमध्यें रूढ आहेत. त्यांचा विराम करण्याला हा भाग फार उपयोगी पडेल. या ग्रंथाच्या तिसऱ्या भागांतील सुभाषितांची निवड आपण उत्कृष्ट प्रकारें केलेली आहे. आपल्या ह्या बहुमोल सेवेबद्दल मी व्यक्तिशः आपलें अभिनंदन करतों.

—बा. गं. खेर.

# योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान.

## सविस्तर अनुक्रमणिका.

॥ श्रीगणेशाय नमः ॥



# योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान.

## प्रकरण १ लें.

### योगवासिष्ठाला दिलेलीं अनेक नांवें व 'योगवासिष्ठ' या नांवाची उपपत्ति.

योगवासिष्ठ या ग्रंथाला वासिष्ठमहारामायण, उत्तररामायण, मोक्षोपायसंहिता वगैरे अनेक नांवें देण्यांत आलेलीं आहेत. निर्णयसागर छापखान्यानें योगवासिष्ठाची जी सटीक आवृत्ति दोन भागांत प्रसिद्ध केली आहे, त्यांवर श्री आनंदबोधेंद्र भिक्षूची टीका आहे. त्यांत प्रत्येक सर्गाच्या अखेरीस " इत्यार्षे श्रीमद्वासिष्ठमहारामायणे वाल्मीकीये मोक्षोपाये द्वात्रिंशत्साहस्त्र्यां संहितायाम् " इत्यादि संकल्पात्मक मजकूर आढळतो. यावरून योगवासिष्ठाला वासिष्ठमहारामायण किंवा उत्तर रामायण हें नांव पूर्वी देण्यांत आलें असावें, असें दिसतें. हें नांव अन्वर्थक आहे, असें ह्या ग्रंथाच्या पूर्वपीठिकेवरून दिसून येतें. कारण या ग्रंथाच्या आरंभीं म्हणजे वैराग्य प्रकरणाच्या दुसऱ्या सर्गामध्यें या

ग्रंथाचा इतिहास म्हणून अशी हकीगत आलेली आहे कीं, श्रीवाल्मीकि ऋर्षींनी रामकथा वर्णन केल्यानंतर तें रामायण आपल्या भरद्वाज नामक शिष्याला पढविलें व तेंच रामचरित्र भरद्वाजानें एकदां मेरुपर्वतावर भगवान् ब्रह्मदेवाला ऐकविलें. पुढें रामकथामृतानें संतुष्ट झालेले भगवान् ब्रह्मदेव भरद्वाजाबरोबर वाल्मीकीच्या आश्रमांत येऊन त्याला म्हणालेः— " मुने ! ज्या रामायणाला तूं सांप्रत आरंभ केला आहेस, तें अर्धवट सोडून देऊं नकोस. तर तें तसेंच पुढें चालूं ठेवून समाप्त कर. कारण नौकेचा आश्रय केल्यानें समुद्राचें उल्लंघन करतां येतें, त्याप्रमाणें ह्या पूज्य ग्रंथाच्या सहाय्यानें अज्ञजन या संसारसागरांतून फार थोड्या अवधींत लीलेनें तरून जातील. " यावरून ज्यांत चित्तशुद्धिकारक रामकथा वर्णन केल्या आहेत, अशा रामायणाच्या पूर्वभागाला पूर्वरामायण आणि ज्यांत मोक्षोपाय कथा गायिलेल्या आहेत, अशा भागाला उत्तररामायण हें नांव देण्यांत आलें असावें व ही गोष्ट वाल्मीकि रामायणांतील पुढील श्लोकांवरून दिसून येतेः—

चतुर्विंशत्सहस्राणि श्लोकानामुक्तवानृषिः ।
तथा सर्गशतानां च षट् कांडानि तथोत्तरम् ॥
कृत्वा तु तन्महाप्राज्ञः सभविष्यसहोत्तरम् ।
चिंतयामास कोऽन्वेतत्प्रयुंजीयादिति प्रभुः॥(बालकांड४–२–१).

वरील दुसऱ्या श्लोकांतील 'सभविष्यसहोत्तरम्' या सामासिक पदावरून पुढें लिहिलेलें उत्तररामायण असा अर्थ करण्यास कांहींच हरकत दिसत नाहीं. तसेंच उत्तररामायणांत मुख्य संवाद वसिष्ठ व राम यांचा आहे. यामुळें या ग्रंथाला वासिष्ठरामायण असें नांव प्रचारांत आलें असावें.

आतां या " उत्तररामायण " किंवा " वासिष्ठरामायण " ग्रंथाला जें योगवासिष्ठ हें नांव दिलेलें आहे, तें या ग्रंथांतील विषयाला घरूनच देण्यांत आलेलें आहे व तें अन्वर्थकहि आहे. ' योगवासिष्ठ ' या नांवांतील ' योग ' हा शब्द ' युज् ' म्हणजे ' जोडणें ' या धातूपासून झालेला आहे. म्हणूनच ' योग ' म्हणजे दोन भिन्न वस्तूंचें एकीकरण हा होय. सर्व अध्यात्मग्रंथ जीवब्रह्माचें ऐक्य दाखविण्याकरितांच प्रवृत्त

झालेले असतात. प्रत्येक अज्ञ जीवाला 'मी निराळा व ईश्वर (ब्रह्म) निराळा' असें वाटत असतें. हें त्याचें अज्ञान युक्तीनें दूर करून प्रत्येक जीव हा ईश्वर (ब्रह्म) आहे, असें जीवब्रह्माचें ऐक्य "तत्त्वमसि" इत्यादि महावाक्यांनीं दर्शविलें जातें. अर्थात्च 'जीवो ब्रह्मैव नापरः' हा सिद्धांत सर्व अध्यात्मग्रंथांतून प्रथित केलेला असतो. हें जें जीवब्रह्माचें ऐक्य याचच 'योग' असें म्हणतात. जीवाला 'आपण ब्रह्म आहों' असें ज्ञान झालें कीं, तो जन्म-मरणात्मक संसारांतून मुक्त होतो. हाच सिद्धांत ध्यानांत घेऊन या ग्रंथांत

संसारोत्तरणे युक्तिर्योगशब्देन कथ्यते ॥ नि. उ. १३-३.

या श्लोकांत 'संसारांतून तरून जाण्याची युक्ति म्हणजेच जीवब्रह्माच्या ऐक्य ज्ञानानें मोक्ष मिळविण्याचा उपाय,' असा योग शब्दाचा अर्थ दाखविला आहे. यावरून वसिष्ठांनीं सांगितलेला योग म्हणजे मोक्षप्राप्तीचा उपाय, ज्या ग्रंथांत वर्णन केला आहे, त्या ग्रंथाला योगवासिष्ठ असें नांव देण्यांत आलेलें आहे. हा मोक्षप्राप्तीचा उपाय एकच नसून अनेक आहेत, म्हणून,

मोक्षोपायमयीं वक्ष्ये संहितां सारनिर्मिताम् ॥ २-१०-४.
मोक्षोपायाभिधानेयं संहिता सारनिर्मिता ॥ २-१७-६.

ह्या दोन्ही श्लोकार्धांत या ग्रंथाला मोक्षोपायसंहिता (म्हणजे मोक्षप्राप्तीचे उपाय सांगणारी संहिता) असें नांव देण्यांत आलें आहे.

याशिवाय योग या शब्दाचा मुख्यार्थ 'समाधि' असा आहे. पातंजल योगसूत्रांतील 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' या सूत्रांतील 'योग' शब्दाचा अर्थ 'समाधि' हाच आहे. या दृष्टीनें योग हें साध्य आहे. परंतु योग हा शब्द साध्याप्रमाणें चित्त चिद्रूप करण्याच्या अभ्यासक्रमाला, अर्थात् साधनपरंपरेलाहि लावण्यांत येतो. योगवासिष्ठ ग्रंथांत साध्य आणि साधन अशा दोन्ही दृष्टींनीं योग शब्दाचा उपयोग करण्यांत आलेला आहे. साध्य ह्या दृष्टीनें योग शब्दाला 'महायोग' ही संज्ञा या ग्रंथाच्या स्थितिप्रकरणांतील ६२ व्या सर्गामध्यें 'प्रविचार्य महायोगात्पदमासाद्यतेऽनघ' (४-६२-२) या श्लोकांत दिली आहे.

'महायोग' याचा अर्थः—आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाल्यावर जी सहजसमाधीची (म्हणजे चालत्याबोलत्या समाधीची) स्थिति उदयाला येते व जी जीवन्मुक्तांच्या ठिकाणीं अनुभवास येत असते, याच स्थितीला *'महायोग' असें म्हटलें आहे.

पतंजलीनें मानलेल्या चित्तवृत्तिनिरोधरूप जड समाधिपेक्षां वसिष्ठांना चेतनसमाधि (म्हणजे चालतीबोलती समाधि) अधिक अभिमत आहे. सारांश, योगाचा साधन या दृष्टीनें या सर्व ग्रंथांत मोक्षप्राप्तीच्या अनेक युक्त्या सांगितल्या आहेत व वर जी योग शब्दाची व्याख्या दर्शविली आहे, त्यावरून या ग्रंथाला योगवासिष्ठ असें नांव देण्यांत आलेलें आहे. तें अगदीं अन्वर्थक आहे, यांत तिळमात्र शंका नाहीं.

आतां 'योगवासिष्ठ' या ग्रंथाला पडलेलें 'बृहद्योगवासिष्ठ' हें नांव सापेक्ष आहे. त्याचें कारण योगवासिष्ठ हा ग्रंथ फार मोठा आहे, असें पाहून पुढें पुढें विद्वान् पंडितांनीं मूळ ग्रंथांतील सारभूत श्लोक निराळे काढून त्यांच्या संग्रहाला जेव्हां 'लघुयोगवासिष्ठ' असें नांव देण्यांत येऊं लागलें, तेव्हां त्याच्या अपेक्षेनें मूळ ग्रंथाला 'बृहद्योगवासिष्ठ' हें नांव देण्यांत येऊं लागलें असें दिसतें. अशा तऱ्हेनें या ग्रंथाला निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं असून तीं त्या त्या दृष्टीनें अन्वर्थक आहेत.

या ग्रंथांत मोक्षप्राप्तीचे अनेक उपाय सांगण्याचा वसिष्ठांच्या मनांतील हेतु असा आहे कीं, या उपायांपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी उपायानें (युक्तीनें) मनुष्यानें आत्मज्ञान संपादन करून भवसागरांतून तरून जावें.



* यत्र पश्यति चात्मानं नित्यानंदं निरंजनम्।
मयैक्यं स 'महायोगो' भाषितः परमः स्वयम्॥
(कूर्म पुराण उत्तरभाग ११-६.)

# प्रकरण २ रें.

## योगवासिष्ठाच्या इतर छोट्या प्रतिकृती.

मूळ योगवासिष्ठ हा ग्रंथ अतिशय विस्तृत असल्यामुळें वाचण्याला फारच अवजड वाटतो, यासाठीं काश्मीरच्या गौड अभिनंदा नांवाच्या पंडितानें इ. स. ८५० च्या सुमारास संदर्भाचा भंग होऊं न देतां मूळ योगवासिष्ठांतील निष्कर्षभूत असे श्लोक बहुतेक जसेच्या तसेच घेऊन ६००० श्लोकांचा ( पण ही संख्या ४८२९ च भरते ) एक सारभूत लघुयोगवासिष्ठ या नांवाचा ग्रंथ तयार केला आहे. तो निर्णयसागर छापखान्यानें इ. स. १८८७ मध्यें प्रसिद्ध केलेला आहे. या लघुयोगवासिष्ठांत मूळ योगवासिष्ठांतील निर्वाण प्रकरणांतील पूर्वार्धाच्या शेवटपर्यंतचाच भाग घेतला आहे व त्याच प्रकरणांतील उत्तरार्ध ( सर्गसंख्या २१६ ) यापैकीं कांहींहि भाग घेतलेला नाहीं. यामुळें लघुयोगवासिष्ठांत मूळयोगवासिष्ठाचें सर्वच सार आलें आहे, असें म्हणतां येत नाहीं. याशिवाय योगवासिष्ठसार या नांवाचा २२५ श्लोकांचा एक लहानसा सारभूत ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथाचा कर्ता कोण आहे, हें उपलब्ध नाहीं. पण या ग्रंथावर महीधराची टीका आहे. हा ग्रंथ बेळगांव येथील 'रामतत्त्व प्रिंटिंग प्रेसनें' छापून प्रसिद्ध केला आहे. याशिवाय सध्यां प्रचलित असणारी महोपनिषद्, अन्नपूर्णोपनिषद्, मुक्तिकोपनिषद्, वराहोपनिषद् व अक्षीउपनिषद् इत्यादि सर्व उपनिषदें या वासिष्ठांतील श्लोक घेऊनच बनविलेलीं आहेत, असें दिसून येतें. याशिवाय भर्तृहरीचें वैराग्यशतक तर वासिष्ठाच्या वैराग्य प्रकरणाची जवळ जवळ प्रतिकृतिच आहे, असें म्हटलें तरी चालेल. कालिदासाच्या मेघदूताची कल्पना मूळ वासिष्ठांतील निर्वाण प्रकरण उत्तरार्ध सर्ग ११८ श्लोक ३० व ३१, तसेच सर्ग ११९ यांतील श्लोक २ ते ६ यांतील मेघदूताच्या कल्पनेशीं तंतोतंत जुळते. याशिवाय मेघ-

दुर्वांतल्या " अद्रेः शृंगं हरति पवनः " इत्यादि १४ व्या श्लोकार्धी योगवासिष्ठांतील पुढील श्लोकाचा पूर्वार्ध थोड्या फरकानें म्हणजे ' एतत् ' ऐवजीं ' अद्रेः ' हा शब्द ठेवला तर तंतोतंत जमत आहे.

एतच्छृंगं हरति पवनः किं स्विदित्युन्मुखीभि-
र्दृष्टोत्साहश्चकितचकितं मुग्धसिद्धाङ्गनाभिः ॥ नि. उ.११५--६८

अशा तऱ्हेची कल्पना श्रीमद्भागवत स्कंद १०, अ. ९० श्लोक २० मध्येंहि आढळते. या श्लोकांत श्रीकृष्णाविषयीं त्याच्या स्त्रियांची विरह-भावना व मेघांस उद्देशून काढलेले उद्गार वासिष्ठांतील कल्पनेशीं जुळतात.

वरील सर्व ग्रंथ संस्कृत भाषेंत आहेत. गुरुगीतेंतील " ब्रह्मानंदं परमसुखदं "' सद्गुरुं तं नमामि " हा श्लोक * मूळचा वासिष्ठांतीलच अगदीं शेवटचा आहे. या श्लोकाच्या शेवटच्या ओळींतील " श्रीवसिष्ठं नताः स्मः " या पदाऐवजीं " सद्गुरुं तं नमामि " असा पाठ घालून गुरुगीतेंत घेतलेला आढळतो.

## योगवासिष्ठाचे मराठींत अवतार.

मराठी भाषेंत श्रीज्ञानेश्वर महाराजांचें म्हणून एक योगवासिष्ठ ( ८००. ओव्यांचें ) धुळे येथील श्री. गोविंद काशिनाथ चांदोरकर यांनीं शके १८३६ सालीं प्रसिद्ध केलें आहे. हें योगवासिष्ठ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं केलें आहे किंवा नाहीं, याबद्दल बराच वाद आहे. पण आधुनिक प्रसिद्ध विद्वानांच्या दृष्टीनें हें वासिष्ठ, श्रीज्ञानेश्वर महाराजांचें नसून त्यांच्या नांवावर दुसऱ्या कोणींतरी प्रसिद्ध केलेलें आहे. याशिवाय जवळ जवळ ६००० ओव्यांचें रंगनाथी योगवासिष्ठ प्रसिद्ध आहे. याशिवाय योगवासिष्ठावर पूर्णानंद शिवराम, माधवदास नारायणांकित हरिदास व व्यंकट-

---

* ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ॥
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं
भावातीतं त्रिगुणरहितं श्रीवसिष्ठं नताः स्मः ॥ नि. उ. २१६–२६.

कवि या पंडितांच्या टीका आहेत. याशिवाय एक अनामिका या नांवाची टीका आहे, असें श्री. चांदोरकर यांनीं श्रीज्ञानेश्वरांच्या योगवासिष्ठावरील प्रस्तावनेंत म्हटलें आहे. याप्रमाणें एकंदर मराठीमध्यें सात टीका सध्यां उपलब्ध आहेत. या टीका मूल ग्रंथावर केलेल्या नसून ' लघुयोगवासिष्ठ ' व ' योगवासिष्ठसार ' या दोहोंपैकीं कोणत्या तरी एका ग्रंथाचा आधार घेऊन तयार केलेल्या आहेत. यास अपवाद फक्त श्रीज्ञानेश्वर महाराजांचें म्हणून प्रसिद्ध असणारें योगवासिष्ठ होय.

## योगवासिष्ठाचे इतर भाषेंत अवतार.

या बृहद्योगवासिष्ठाचें मराठींत भाषांतर ' गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळी, पुणें ' यांनीं तीन भागांत छापून प्रसिद्ध केलें आहे. या भाषांतराचें संशोधन माझे **परमपूज्य वडील कै. वे. शा. सं. भास्कर रघुनाथ पावगी शास्त्री** यांनीं केलेलें आहे. या पूर्वी कै. वे. शा. सं. विष्णु वामन बापट शास्त्री यांचें ' बृहद्योगवासिष्ठसार ' मुंबईच्या ' ग्रंथसंपादक व ग्रंथप्रसारक मंडळीनें ' प्रसिद्ध केलें आहे. हा ग्रंथ म्हणजे चिपळूणकर मंडळींच्या ग्रंथाप्रमाणें श्लोकशः भाषांतर नसून तें सार रुपाचें आहे, हें त्या ग्रंथाच्या नांवावरूनच उघड होत आहे.

या योगवासिष्ठ ग्रंथाचीं भाषांतरें मराठी, हिंदी, गुजराथी, बंगाली वगैरे भाषांतून झालेलीं आहेत. याशिवाय या ग्रंथांतील चूडालेचें आख्यान इंग्रजी भाषेंत श्रीहरीप्रसाद शास्त्री यांनीं लंडन येथील फोव्हिल प्रेसमध्यें छापून सन १९३७ मध्यें प्रसिद्ध केलें आहे. यावरून योगवासिष्ठ ग्रंथ सर्वमान्य झाला आहे, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. कारण यांतील तत्त्वज्ञान जगांतील सर्व धर्मांच्या लोकांना मान्य होण्याजोगें आहे.

# प्रकरण २ रें.

## योगवासिष्ठाचें बहिरंग निरीक्षण.

प्रस्तुत ग्रंथाच्या बहिरंगासंबंधानें विचार करूं लागलें, म्हणजे तीन गोष्टी प्रामुख्यानें डोळ्यापुढें उभ्या रहातात. एक ग्रंथाच्या स्वरूपासंबंधाची, दुसरी ग्रंथाच्या कर्तृत्वासंबंधाची व तिसरी त्याच्या कालनिर्णयाची. प्रथम या ग्रंथाच्या स्वरूपाचा विचार करूं.

### ग्रंथाचें स्वरूप.

योगवासिष्ठाची गणना पुराण ग्रंथांमध्यें करितां येत नाहीं, कारण पुराणाची प्रसिद्ध असणारीं 'सर्गविसर्गादि' दहा लक्षणें या ग्रंथांत आढळत नाहींत. म्हणून योगवासिष्ठाला 'पुराण ग्रंथ' असें म्हणण्याऐवजी "इतिहास" असें म्हणणें योग्य ठरेल. कारण उत्पत्ति प्रकरणामध्यें ह्या ग्रंथाची योग्यता वर्णन करतांना,

इतिहासोत्तमादस्माच्छ्रुताद्बोधः प्रवर्तते ॥
सर्वेषामितिहासानामयं सारउदाहृतः ॥ ३-८-९

ह्या श्लोकांत ह्या ग्रंथाला इतिहास असेंच म्हटलें आहे. ह्या ग्रंथाची मांडणी जवळ जवळ श्रीमत् भागवत् पुराणासारखी दिसते. त्यास दोन तीन कारणें आहेत. तीं पुढें दिलीं आहेत. भागवतामध्यें प्रथम नारायणानें त्याच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवाला 'सृष्टी कर' असें सांगितलें. यावर 'जर मी सृष्टि केली, तर माझ्या ठिकाणीं सृष्टीच्या कर्तेपणाचा अभिमान उत्पन्न होऊन मला बंध प्राप्त होईल' अशी शंका प्रदर्शित केल्यावर भगवान् म्हणाले "ब्रह्मदेवा! माझें अत्यंत गुह्य असें ज्ञान मी तुला सांगतों. तें तुला प्राप्त झालें, म्हणजे मग तूं कितीहि कल्पामध्यें कितीहि प्रकारची सृष्टि करीत राहिलास, तरी

'मी सृष्टीचा कर्ता' हा अहंकार तुझ्या ठिकाणीं उत्पन्न होणार नाहीं." असें सांगून भगवंतानें अगदीं थोडक्यांत जें ज्ञान सांगितलें, तें फक्त चार श्लोकांत ग्रथित केलें आहे, या चार श्लोकांना चतुःश्लोकी भागवत् असें म्हणतात. हेंच पुढें ब्रह्मदेवानें नारदांना सांगितलें व तेंच नारदांनीं व्यासांना सांगितलें. व्यासांनीं आपल्या लोकोत्तर बुद्धिमत्तेनें याच संक्षिप्त भागवताचें १८००० श्लोकांचें विस्तृत स्वरूप निर्माण केलें. तेंच सध्यां उपलब्ध असलेलें भागवत पुराण होय. याचप्रमाणें कल्पाच्या प्रारंभीं भगवान् ब्रह्मदेवानें सांगितलेलें आत्मज्ञान श्रीवसिष्ठांनीं रामाला सांगितलें व त्यामुळें रामाचा सर्व मोह दूर झाला.अर्थात्च हें ज्ञान ब्रह्मदेवानें त्यावेळीं इतक्या विस्तृत स्वरूपांत सांगितलें, असें म्हणतां येत नाहीं; कारण वसिष्ठांच्या सारख्या बुद्धिमान् पुरुषांना 'तत्त्वमसि' अशासारखा अगदीं सूत्रभूत उपदेश केला, तरी त्यांना सहज ज्ञान होतें. यावरून हेंच ज्ञान वाल्मीकि महर्षींनीं आपल्या लोकोत्तर बुद्धीनें एवढ्या मोठ्या विस्तृत स्वरूपांत तयार करून तें जगापुढें ठेवलें आहे, असें म्हणणें योग्य दिसतें. भागवताप्रमाणें याहि ग्रंथांत उत्पत्ति प्र० सर्ग २५ मध्यें पृथ्वीवरील सप्तद्वीपें व सप्तसमुद्र यांचें वर्णन थोड्या क्रमाच्या फरकानें आलेलें आहे. म्हणूनच हा ग्रंथ भागवताच्या धर्तीवर रचलेला आहे, असें वर म्हटलें आहे.

मुमुक्षु व्यवहार प्रकरण सर्ग १७ मध्यें या ग्रंथाची श्लोकसंख्या ३२००० आहे असें सांगितलें आहे. परंतु सध्यां मुंबईच्या 'निर्णय सागर' मध्यें छापलेल्या योगवासिष्ठाची ही श्लोकसंख्या ३२००० नसून ती फक्त २९२८९ च आढळून येते. यापुढें प्रत्येक प्रकरणाची श्लोकसंख्या दिली आहे, त्याच्यापुढें खरी श्लोकसंख्या कंसांत दिली आहे. श्लोकसंख्येमध्यें फरक असला तरी सर्गसंख्या मात्र बरोबर जमते. या ग्रंथांत (१) वैराग्य (२) मुमुक्षु व्यवहार (३) उत्पत्ति (४) स्थिति (५) उपशम व (६) निर्वाण (पूर्वार्ध व उत्तरार्ध मिळून) अशीं सहा प्रकरणें आहेत. हीं सहा प्रकरणें त्यांच्या नांवानें बोधित होणाऱ्या मुख्य सहा विषयांकरितांच केलेलीं आहेत, असें जरी त्यांच्या नांवावरून दिसत असलें, तरी त्यांतील प्रत्येक प्रकरणांत इतर प्रकरणांतील विषय घुसडलेले आहेत, असें दिसून येतें. या प्रकरणांतील विषयांची

मांडणी शास्त्रीय मीमांसा पद्धतीनें जशी व्हावयास पाहिजे, तशी झालेली दिसत नाहीं व पुष्कळ ठिकाणीं विषयांची पुनरुक्ति झालेली आहे. पण हा ग्रंथ फार मोठा असल्याकारणानें हा दोष क्षम्य आहे. शिवाय कोणतेंहि वाङ्मय निष्कलंक असूं शकत नाहीं. 'नाऽकलंका च वागस्ति ...' नि. उ. २९–३७ असें वसिष्ठांनीं स्पष्ट सांगितलें आहे. भगवद्गीतेंतहि 'सर्वारंभाहि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः' (१८–४८). 'निर्दोषं हि समं ब्रह्म' (५–१९) 'सर्व कर्मे दोषांनीं युक्त असतात, जर कोणी निर्दोष असेल, तर तें एक ब्रह्मच आहे' असें सांगितलें आहे. यावरून वेदच फक्त निर्दोष आहेत. कारण ते ब्रह्मरूप आहेत. बाकीच्या सर्व ग्रंथांतून दोष असणें स्वाभाविक आहे.

शिवाय अध्यात्माच्या उपदेशामध्यें पुनरुक्ति हा दोष मानीत नाहींत. कारण सामान्य बुद्धीच्या लोकांना या शास्त्रांतील सिद्धान्त पुनः पुनः सांगावे लागतात, तेव्हांच ते त्यांच्या बुद्धींत चांगले ठसतात. यास्तव त्याचा आवृत्तिरूप अभ्यास आवश्यक आहे. अशा अर्थाचें 'आवृत्तिरसकृदुपदेशात्' असें भगवान् बादरायणांचें सूत्र प्रसिद्ध आहे. वसिष्ठांनींहि आपल्याकडून पुनरुक्ति कां होते याचें कारण 'बोध करून देणें' हेंच होय, असें खालील श्लोकांत सांगितलें आहे.

पुनः पुनरिदं राम प्रबोधार्थं मयोच्यते ॥
अभ्यासेन विना साधो नाभ्युदेति आत्मभावना ॥ नि.पू. ११-१.

"मी तुला पुनः पुनः चांगला बोध होण्यासाठीं सांगत आहे. कारण अभ्यासावांचून 'आपण आत्मा आहों,' ही भावना उत्पन्न होत नाहीं." म्हणून ह्या वरील वसिष्ठांच्या उक्तीप्रमाणें अभ्यासाच्या दृष्टीनें विचार केल्यास पुनरुक्तीचा दोष येत नाहीं.

पहिल्या वैराग्य नांवाच्या प्रकरणाची श्लोक संख्या १५०० (११४६) व त्याचे सर्ग ३३ आहेत. या प्रकरणांत कोणता विषय आला असावा हें या प्रकरणाच्या नांवावरूनच लक्षांत येण्याजोगें आहे. श्रीरामचंद्रानें आपल्याला सर्व बाबतींत कसें वैराग्य प्राप्त झालें आहे, ह्याचें फारच सुंदर व सविस्तर वर्णन करून सांगितलें आहे. त्याचा विचार यापुढील "राम-

चंद्राचें वैराग्य " या ११ व्या प्रकरणांत केलेला आहे. दुसरें प्रकरण मुमुक्षुव्यवहार होय. याची श्लोक संख्या १००० (८०७) आहे व त्याचे सर्ग २० आहेत. ह्यांत मुमुक्षुपुरुषांनीं परमार्थाचा अधिकार कोणत्या उपायानें प्राप्त करून घ्यावा, याचें वर्णन मोठ्या युक्तीनें फारच सुंदर करण्यांत आलें आहे. यानंतरचें तिसरें प्रकरण उत्पत्ति हें आहे. याची श्लोकसंख्या ७००० (६३०४) आहे व त्याचे सर्ग १२२ आहेत. यांत जगाची उत्पत्ति कशी झाली आहे, हें दाखवून अजातवाद स्पष्ट करून दाखविला आहे. अजातवादाची मीमांसा यापुढील २३ व्या प्रकरणांत करण्यांत आली आहे. चौथे प्रकरण स्थिति या नांवाचें आहे. याची श्लोकसंख्या ३००० (२४१४) आहे व त्याचे सर्ग ६२ आहेत. यांत प्रपंचाची वास्तविक स्थिति कशी काय आहे याचा बोध करून देणाऱ्या अनेक कथा आल्या आहेत. 'मी' आणि 'जगत्' या भावनांची उत्पत्ति होऊन द्रष्टा, दृश्य, व भोक्ता, भोग्य वगैरे संबंध कसे उत्पन्न झाले आहेत व जगांतील नाना तऱ्हेच्या भोग्य पदार्थांचा भास व जगताचा भ्रम कसा बुद्धिंगत झाला आहे, याचें वर्णन करण्यांत आलें आहे. उपशम हें पांचवें प्रकरण असून त्याची श्लोकसंख्या ५००० (४३२२) आहे व त्याचे सर्ग ९३ आहेत. या प्रकरणांत मी, तूं, वगैरे भ्रांति कशी उत्पन्न झाली व ती कशी नाहींशी होते, यासंबंधानें अनेक युक्त्या व आख्यानें सांगितलीं आहेत. या नंतरचें सहावें प्रकरण निर्वाण हें असून त्याची श्लोकसंख्या पूर्वार्ध व उत्तरार्ध मिळून १४५०० (१४२९६) आहे. त्याचे सर्ग ३४४ आहेत. या प्रकरणांत अत्यंत महत्वाचे आत्मज्ञानविषयक सिद्धांत विविध आख्यानांच्या द्वारें स्पष्ट मांडले आहेत. विशेषतः उत्तरार्धामध्यें उच्च दर्जाचें तत्त्वज्ञान सांगण्यांत आलें आहे. अशा तऱ्हेच्या सहा प्रकरणांनीं युक्त, मोक्षाचे उपाय कथन करणारी आणि निर्वाणाची प्राप्ति करून देणारी अशी ही संहिता आहे.

निर्वाण प्र. पू. सर्ग १२५ मध्यें श्री वसिष्ठांचा उपदेश ऐकतां ऐकतां श्रीरामचंद्राला आत्मसाक्षात्कारभूत ज्ञान होऊन तो निर्विकल्प समाधीमध्यें परमपदीं विश्रांत पावला. पुढें विश्वामित्र मुनींच्या प्रार्थनेवरून श्रीवसिष्ठांनीं रामाला समाधींतून जागृत केलें व सांगितलें कीं 'हा तुझा विश्रांतीचा

काल नाहीं. तुला जरी आनंद प्राप्त झाला असला, तरी तूं लोकांना आनंद देणारा हो. जोपर्यंत योग्यांनीं आपल्या अधिकारानुरूप प्राप्त झालेलें कर्तव्यकर्म पूर्ण केलें नाहीं, तोंपर्यंत त्यांनीं समाधि लावून बसणें योग्य नाहीं. म्हणून कांहीं काल राज्यवैभवाचा उपभोग घेऊन नंतर समाधीचें सेवन कर व सुखी हो.' ही वसिष्ठांची आज्ञा शिरसामान्य करून रामचंद्रानें सर्व लोकांना सांगितलें कीं, 'लोकहो ! या जगांत आत्मज्ञानाहून व आत्मवेत्त्या गुरूहून दुसरें कांहीं एक श्रेष्ठ नाहीं.' अशा तऱ्हेचें वर्णन करून वाल्मीकींनीं आपल्या ग्रंथाचा उपसंहार केला आहे. त्यावरून येथेंच वासिष्ठ संपलें कीं काय असा संशय येतो. कारण लघुयोगवासिष्ठात निर्वाण प्रकरणाच्या उत्तरार्धाचा मुळींच भाग घेतला नाहीं. म्हणून वाल्मीकिरामायणांतील उत्तरकांडाप्रमाणें हा निर्वाण प्रकरणाचा उत्तरार्ध कोणीतरी मागाहून ग्रथित केलेला आहे, असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु तसें नसून रामचंद्रानें जीवन्मुक्त झाल्यावर ज्ञानाच्या पुढील भूमिकांवर म्हणजे पांचवी, सहावी व सातवी या भूमिकांवर कशा तऱ्हेनें आरूढ होत जावें व वसिष्ठांच्या सारखें पूर्ण ब्रह्मनिष्ठ कसें व्हावें, याकरितांच निर्वाण प्रकरणाचा उत्तरार्ध ग्रथित केला आहे, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. म्हणूनच उत्तरार्धांतील तत्त्वज्ञान उच्च दर्जाचें आहे असें अनुभवास येतें.

याच उत्तरार्धांत १७३ ते १८६ या सर्गांच्या शेवटीं " इति वासिष्ठरामायणे नि. प्र. उ. ब्रह्मगीतासु..." इत्यादि जो संकल्पात्मक मजकूर आढळतो, त्यांतील ब्रह्मगीतासु या पदावरून या १४ सर्गांच्या भागाला ब्रह्मगीता असें म्हटलें आहे व ही गीता इतर गीतेंबरोबर प्रसिद्धहि झालेली आहे. ब्रह्मगीता म्हणजे ब्रह्मदेवानें गायलेली असा अर्थ केला तर या वरील सर्गांतून 'ब्रह्मदेवानें सांगितलेली' असा कोठें उल्लेख आलेला नाहीं. फक्त या वरील सर्व सर्गांचे शेवटीं आलेल्या संकल्पांतच याचा उल्लेख आढळतो. या ग्रंथाचा टीकाकार श्रीआनंदबोधेंद्र भिक्षु याविषयीं मुग्धच राहिला आहे. म्हणून ह्या भागाला ब्रह्मगीता असें नांव कां देण्यांत आलें याचा उलगडा होत नाहीं. तरी पण या गीतेंत एकंदर ( १ ) ब्रह्मांडाख्यान ( २ ) ऐंदवाख्यान व ( ३ ) तापसाख्यान अशीं तीन आख्यानें आलीं आहेत. तीं या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत (४८), (४९) व (५०) या गोष्टींत आलेलीं आहेत.

या तीन आख्यानांत ब्रह्मदेवाशीं संबंध येत असल्याकारणानें कदाचित् या भागाला ब्रह्मगीता असें नांव देण्यांत आलें असावें. ही ब्रह्मगीता स्कंद-पुराणांतील ब्रह्मगीतेहून निराळी आहे. याशिवाय निर्वाण प्र. पूर्वार्ध सर्ग ५२–५८ मध्यें जें अर्जुनाचें आख्यान सांगितलें आहे, तें या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांतील (२९) व्या गोष्टींत आलें आहे. त्यांत कृष्णावतारी भगवंतानें अर्जुनाला सांगितलेल्या भगवद्गीतेचें सार, भगवद्गीतेंतील अनेक श्लोक जसेच्या तसेच घेऊन गोवलेले आहे. तसेंच उपशमप्रकरण सर्ग आठ श्लोक ९–१८ या दहा श्लोकांना सिद्धगीता असें म्हटलें आहे. ही गीता या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांतील १६ व्या जनकाच्या गोष्टींत (पृष्ठें १०५–१०९) आली आहे. त्यांत मूळ श्लोक त्यांच्या अर्थासह दिले आहेत.

## ग्रंथाचा कर्ता.

योगवासिष्ठ ग्रंथाच्या बाह्यांगासंबंधाची दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे या ग्रंथाच्या कर्तृत्वासंबंधाची होय. योगवासिष्ठाच्या प्रत्येक सर्गाचे अखेरीस ‘ इत्यार्षे श्रीमद्वासिष्ठमहारामायणे वाल्मीकीये ’ इत्यादि संकल्पात्मक मजकूर आलेला आहे. त्यांतील ‘ वाल्मीकीये ’ या पदावरून योगवासिष्ठाचें कर्तृत्व वाल्मीकीरामायणाप्रमाणें श्रीवाल्मीकी महर्षीकडे असल्याची आजपर्यंत सर्वांची समजूत आहे; व पूर्वपरंपरेनें चालत आलेल्या ह्या सामान्य जनांच्या समजुतीला धक्का देण्याचा पूर्वीचे साधुसंत, टीकाकार किंवा पंडित यांपैकीं कोणीहि प्रयत्न केला नाहीं. परंतु कै. लोकमान्य टिळकांनीं मात्र या समजुतीला थोडा धक्का देऊन असें सांगितलें कीं, हा ग्रंथ भगवद्गीतेच्या नंतरचा आहे, हें त्याच्या रचनेवरून उघड होतें ( गीतारहस्य प्र. १ पृष्ठ ६ ).

याशिवाय वाल्मीकीरामायण बालकांड सर्ग ३ मध्यें दिलेला रामायणाचा इतिहास व या ग्रंथाच्या आरंभीं वैराग्य प्र. सर्ग २ मध्यें या ग्रंथाचा जो इतिहास दिला आहे त्या दोहोंचा थोडा सारांश खालीं देत आहेः—

पूर्वरामायणाची रचना करण्याविषयीं भगवान् ब्रह्मदेवानें वाल्मीकींना प्रेरणा केली होती, असें वाल्मीकीरामायण बालकांड सर्ग ३ मध्यें सांगितलें आहे. हा रामकथात्मक रामायण ग्रंथ तयार केल्यानंतर वाल्मीकींनीं आपल्या भरद्वाज शिष्याला सांगितला. पुढें भरद्वाजानें त्यांतील सर्व कथा मेरुपर्वता-

वर ब्रह्मदेवाला सांगितल्या. आपल्या सांगण्याप्रमाणें वाल्मीकीनें रामकथात्मक ग्रंथ तयार केला असें पाहून ब्रह्मदेव संतुष्ट झाले व भरद्वाजाला बरोबर घेऊन वाल्मीकिऋषींच्या आश्रमांत येऊन म्हणाले कीं, " हे मुने ! रामाच्या आत्मज्ञानप्राप्ती संबंधानें ज्यांत वर्णन आहे, अशा ह्या प्रचंड ग्रंथाची समाप्ति कशी होईल, असा विचार करीत न बसतां हा ग्रंथ पूर्ण कर. हा ग्रंथ मध्येंच सोडून देऊं नकोस, असें सांगण्यासाठींच मी मुद्दाम या ठिकाणीं आलों आहे. कारण या शास्त्राचें महत्त्व फार मोठें आहे. तरी लोकहितार्थ हा ग्रंथ पुरा कर." यावरून या ग्रंथाचें कर्तृत्व श्रीवाल्मीकि ऋषींच्याकडे असल्याची आजपर्यंत सर्वांची समजूत आहे.

याशिवाय निर्वाण प्र. पूर्वार्ध सर्ग २२ मध्यें ( या ग्रंथाचा भाग २ रा भुसुंडाची गोष्ट (२५ वी) पृष्ठ १८० ) भुसुंडानें वसिष्ठांना पूर्वीच्या कांहीं आठवणी व चमत्कार सांगतांना असें सांगितलें कीं,

कृतं वाल्मीकिना चैतदधुना यत्करिष्यति ॥
अन्यच्चप्रकटं लोके स्थितं ज्ञास्यसि कालतः ॥ नि. पू. २२-२४.

( पूर्वीच्या युगांतील एक लक्ष श्लोक असलेलें ) हें वसिष्ठरामसंवादरूप रामायण वाल्मीकीनें केलेलें आहे. आतां यापुढें तो जें दुसरें ( बत्तीस हजाराचें ) करणार आहे, त्याचाहि मला दिव्य ज्ञान दृष्टीनें अनुभव आलेला असून तें मला आठवत आहे. तूंहि त्याला लवकरच जाणशील. या ग्रंथांतील वरील आधारावरून हा ग्रंथ वाल्मीकींचा असावा अशी समजूत आहे. परंतु थोड्याशा चिकित्सकबुद्धीनें पाहिल्यास ही समजूत चुकीची वाटते. कारण वाल्मीकिरामायण आणि योगवासिष्ठ या दोन ग्रंथांतील भाषापद्धतीची तुलना केली असतां असें दिसतें कीं, वाल्मीकि-रामायणांतील भाषा अतिशय साधी आहे. त्या ग्रंथांत मोठेमोठे समास क्वचितच येतात; तसेंच त्यांत छांदस प्रयोग ठिकठिकाणीं आढळून येतात. परंतु योगवासिष्ठाची स्थिति याहून भिन्न आहे. या ग्रंथाची भाषा फार क्लिष्ट आणि समासघटित आहे. एकंदरींत या ग्रंथांतील लांबच्या लांब समास पाहिले म्हणजे बाणभट्टाच्या ' कादंबरी 'ची आठवण होते. यावरून हा ग्रंथ वाल्मीकींचा असावा किंवा काय अशी शंका येणें स्वाभाविक आहे.



ब्रह्मदेवः—हे मुने ! रामाच्या आत्मज्ञानप्राप्ती संबंधानें ज्यांत वर्णन आहे, अशा ह्या प्रचंड ग्रंथाची समाप्ति कशी होईल, असा विचार करीत न बसतां हा ग्रंथ पूर्ण कर. असें सांगण्यासाठींच मी मुद्दाम या ठिकाणीं आलों आहे. (पृ.१४)

आतां हा ग्रंथ वाल्मीकींचाच आहे, असें गृहीत धरलें, तर वाल्मीकांच्या वेळीं विज्ञानवाद, शून्यवाद मानणारे बौद्ध, माध्यमिक वगैरेंचें अस्तित्व नव्हतें. असें असतांनाहि या ग्रंथांत वरील वादांचा व मतांचा उल्लेख केलेला आढळतो. (उत्पत्ति प्रकरण ५–६ व उपशम प्र. ८७, १८–२०).* या वरून तर सध्यां प्रचलित असणारा ग्रंथ वाल्मीकींनीं केलेला आहे, असें निश्चित म्हणतां येत नाहीं.

आद्य श्रीशंकराचार्यांच्या भाष्यांतून या ग्रंथासंबंधानें कोठेंहि उल्लेख आलेला आढळत नाहीं, त्याअर्थी हा ग्रंथ आचार्यांच्या वेळीं अस्तित्वांत आलेला नसावा, असें अनुमान करणें ओघानेंच प्राप्त होतें. अर्थात् आचार्यांच्या नंतर कोणींतरी मोठ्या अलौकिक विद्वान् पंडितानें हा सध्यां उपलब्ध असणारा ग्रंथ रचला असावा असें दिसतें. ह्या ग्रंथाच्या मांडणीवरून हा ग्रंथ काश्मीर देशांतील एखाद्या विद्वान् पंडितानें तयार केलेला असावा व तो कदाचित् आचार्यांच्या पाहण्यांत आलेला नसल्यामुळें त्याचा उल्लेख आचार्यांनीं आपल्या ग्रंथांत केलेला नसावा, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अथवा कदाचित् हा ग्रंथ आचार्यांच्या पाहण्यांत येऊन देखील त्या ग्रंथांतील तत्त्वज्ञान कांहीं थोडे विरोधी विचार सोडल्यास अद्वैतमताचेंच प्रतिपादन करणारे आहे व त्यांतील तत्त्वज्ञानाचें वर्णन करण्याची पद्धत शास्त्रीय मीमांसा पद्धतीला धरून नसून विशेषतः पौराणिक पद्धतीलाच धरून असल्याकारणानें आचार्यांनीं मुद्दाम या ग्रंथाकडे कानाडोळा केला असावा; कारण आचार्यांनीं प्रमाणभूत मानलेले ग्रंथ श्रुति व स्मृति हेच आहेत.

महाभारतांतील अनुशासनपर्वामध्यें "दैवापेक्षां पौरुष प्रयत्न श्रेष्ठ" या विषयासंबंधीं जें विवेचन आलेलें आहे, तें योगवासिष्ठांतील मुमुक्षु प्र. सर्ग ५ ते १० मध्यें आलेल्या अशा तऱ्हेच्या विवेचनाशीं तंतोतंत जुळणारें आहे. धर्मराजानें 'दैव व प्रयत्न यांपैकीं श्रेष्ठ कोण ?' असा प्रश्न विचारला

---

* यच्छून्यवादिनां शून्यं......॥ विज्ञानमात्रं विज्ञानवादिनाम् ॥ मध्यं माध्यमिकानां च......॥

असतां भीष्मांनीं धर्मराजास यासंबंधीं 'वसिष्ठ व ब्रह्मदेव' यांचा एक पुरातन संवादरूप इतिहास आहे असें सांगितलें. त्यांत ह्याच प्रश्न वसिष्ठांना ब्रह्मदेवाला विचारला होता. त्याचें उत्तर ब्रह्मदेवानें मोठें सयुक्तिक असें दिलें आहे. (महाभारत अनुशासनपर्व ६-२). यावरून महाभारतापूर्वी योगवासिष्ठ ग्रंथ सध्यांच्या मोठ्या स्वरूपांत जरी नसला तरी तो लहानशा स्वरूपांत असावा व त्याचें कर्तृत्व श्रीवाल्मीकि महर्षींच्याकडे असावें असें दिसतें. अशाच तऱ्हेचें मत रावबहादूर पी. सी. दिवानजी व बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे डॉ. बी. एल. अत्रेय यांनीं प्रकट केलें आहे. ( vide p. 12 of a paper on Samuchayawad by Rao Bahadur P. C. Divanji and page 8 of the paper on the brobable date of composition of Yogawasishtha by Dr. B. L. Atreya of Benares ).

## काल निर्णय.

योगवासिष्ठ ग्रंथाच्या बाह्यांगासंबंधाची तिसरी गोष्ट म्हणजे या ग्रंथाच्या कालनिर्णयाबद्दलचा विचार ही होय. हा ग्रंथ केव्हां निर्माण झाला, हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. कित्येक विद्वानांचें मत असें आहे कीं, हा ग्रंथ अगदीं अलीकडचा आहे. पण हें म्हणणें अगदीं चुकीचें आहे. कारण १४०० शकाच्या प्रारंभीं श्रीविद्यारण्यस्वामींनीं आपल्या **पंचदशी** व **जीवन्मुक्तिविवेक** या दोन ग्रंथांत योगवासिष्ठांतील श्लोक जसेच्या तसेच घेतले आहेत व त्याबद्दल त्या ग्रंथांतून त्यांनीं तसा उल्लेखहि केला आहे. गौडपादांच्या मांडुक्योपनिषदावरील कारिका पाहिल्यास त्यांतील अद्वैत तत्त्वज्ञान योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञानाशींच पुष्कळ अंशीं जितकें जमतें तितकें तें शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाशीं जमत नाहीं. म्हणून या गौडपादांच्या कारिका योगवासिष्ठानंतरच्याच असल्या पाहिजेत असें दिसतें. शिवाय दुसरें एक कारण असें आहे कीं, या कारिका मांडुक्य उपनिषदावर टीका म्हणून आहेत, स्वतंत्र तत्त्वज्ञान म्हणून नाहींत. पण वासिष्ठांतील तत्त्वज्ञान हें स्वतंत्र आहे. कारण वसिष्ठांना हें ज्ञान ब्रह्मदेवापासून प्राप्त झालें होतें; व तें त्यांनीं स्वतः त्याचा अनुभव घेऊनच रामाला उपदेशिलें आहे. यावरून गौडपादांच्या पूर्वी योगवासिष्ठ खास उपलब्ध होतें, यांत शंका नाहीं.

गौडपाद हे शंकराचार्यांचे गुरु असल्यामुळें शंकराचार्यांच्या पूर्वी हें योगवासिष्ठ होतें, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

याच सुमारास म्हणजे इ. स. ८५० च्या सुमारास काश्मीरच्या 'गौड अभिनंदा' नांवाच्या पंडितानें या मोठ्या योगवासिष्ठाचें सारभूत म्हणून एक लहानसा ६००० श्लोकांचा 'लघुयोगवासिष्ठ' या नांवाचा एक ग्रंथ तयार केला आहे. तो निर्णयसागर छापखान्यानें इ.स. १८८७ सालीं प्रसिद्ध केला आहे. निर्णयसागरच्या प्रतीमध्यें लघुयोगवासिष्ठावर प्रकरण १ ते ३ पर्यंत 'आत्मसुखाची' टीका आहे. या टीकेच्या प्रारंभींच टीकाकारानें असें म्हटलें आहे कीं, काश्मीरच्या गौड अभिनंदा नांवाच्या पंडितानें हें 'लघुयोगवासिष्ठ' तयार केलें आहे. या लघुयोगवासिष्ठाच्या बाकीच्या ४ ते ६ प्रकरणांपैकीं ६ व्या प्रकरणाच्या २५ सर्गापर्यंतच 'मुम्मडी देवाची' टीका छापलेली आढळून येते. या मुम्मडी देवाच्या टीकेच्या प्रारंभीं (हस्तलिखित प्रतीमध्यें) हें लघुयोगवासिष्ठ गौड अभिनंदा नांवाच्या पंडितानें केलें आहे असा उल्लेख केलेला नाहीं व अमूक एका पंडितानें हें केलें आहे असाहि उल्लेख नाहीं.

याशिवाय हरिदास* नांवाच्या कवीनें आपल्या लघुयोगवासिष्ठावरील 'भावार्थ दीपिका' नामक प्राकृत (मराठी) टीकेमध्यें असें लिहिलें आहे कीं, हा लघुयोगवासिष्ठ नांवाचा ६००० श्लोकांचा ग्रंथ, मूळ ग्रंथावरूनच 'हरिहराचार्य' नांवाच्या पंडितानें तयार केला असून त्यावर 'योगेश्वर' याची 'स्वात्मानुभव' नामक टीका आहे. योगेश्वराची टीका असलेलें लघुयोगवासिष्ठ कोणत्या छापखान्यांत प्रसिद्ध झालें आहे, याविषयीं पुष्कळ शोध केला तरी त्याचा कांहींच पत्ता लागत नाहीं. टीकेची लेखी प्रतहि उपलब्ध झाली नाहीं. या सर्व साधनांच्या अभावीं हा 'लघुयोगवासिष्ठ' ग्रंथ हरीहराचार्य पंडितानें तयार केला आहे व त्यावर योगेश्वरांची टीका आहे, हें निश्चित सांगतां येत नाहीं. म्हणून सध्यां जी सामुग्री उपलब्ध आहे, त्यावरून हें लघुयोगवासिष्ठ काश्मीरच्या 'गौड अभिनंदा' नांवाच्या

---

* पुणें येथील श्री. गो. का. चांदोरकर, यांनीं संपादित केलेल्या श्रीज्ञानेश्वर महाराजांचें योगवासिष्ठ या पुस्तकाची प्रस्तावना.

पंडितांनींच इ. स. ८५० च्या सुमारास रचलें असावें असेंच गृहीत धरून चाललें पाहिजे.

भवभूतीच्या पूर्वी योगवासिष्ठ अस्तित्वांत असावें असें दिसतें, कारण भवभूतीनें केलेला 'विवर्ताचा' उल्लेख उपनिषदें व भगवद्गीता यामध्यें कोठेंहि आढळत नाहीं. शिवाय गौडपादांनींहि याचा उल्लेख केलेला नाहीं; व म्हणूनच भवभूतीनें शंकराचार्यांच्यापासून हा विवर्त घेतला, असें म्हणतां येत नाहीं. वासिष्ठामध्यें विवर्ताचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं केलेला आढळतो. म्हणून भवभूतीनें ही कल्पना वासिष्ठावरूनच घेतली असली पाहिजे, असें दिसून येतें. भर्तृहरीचें 'वाक्यपदीय' व 'वैराग्यशतक' यांच्याशीं वासिष्ठाची तुलना करून पाहिल्यास असें दिसतें कीं, या दोन्ही ग्रंथांतील पुष्कळसे श्लोक अगदीं सारखे दिसतात. पण योगवासिष्ठ भर्तृहरीच्या पूर्वी असलें पाहिजे, त्याचें कारण भर्तृहरीच्या ग्रंथामध्यें येणारा 'शब्दब्रह्म' हा शब्द ह्या वासिष्ठांत कोठेंहि आढळत नाहीं. भर्तृहरी इ. स. ६५० च्या सुमारास निवर्तला. म्हणून योगवासिष्ठ त्याच्यापूर्वी अस्तित्वांत असावें. कालीदासाच्या मेघदूत काव्यांतील पुष्कळसे शब्द योगवासिष्ठांतील नि. प्र. उ. सर्ग ११९, २-५ या श्लोकांत एका प्रवाशानें मेघाला दूत बनवून आपल्या प्रियेला निरोप पाठविल्याचें जें वर्णन आलें आहे, त्यांत आढळतें. यावरून या ग्रंथाचा काल कालीदासाच्या व भर्तृहरीच्या पूर्वी असला पाहिजे असें वाटतें. या-संबंधानें अधिक संशोधन केल्यास वासिष्ठाचा काल याच्याहि पूर्वी कदाचित् असूं शकेल असें वाटतें. अशाच तऱ्हेचा निष्कर्ष बनारसचे डॉ. बी. एल्. अत्रेय यांनीं आपल्या 'योगवासिष्ठ व त्याची फिलॉसफी' या इंग्रजी ग्रंथांत काढला आहे.

# प्रकरण ४ थें.

## योगवासिष्ठाची योग्यता.

योगवासिष्ठ हा ग्रंथ अध्यात्मशास्त्राची केवल खाण आहे. संस्कृत भाषेमध्यें वेदांत शास्त्रावर गीता, उपनिषदें, ब्रह्मसूत्रें अशासारखे शेंकडों ग्रंथ आहेत व ते सर्व आपापल्या परीनें बहुमोल आहेत. परंतु योगवासिष्ठाइतका व्यापक, सरस आणि सर्वांग परिपूर्ण असा ग्रंथ संस्कृत वाङ्मयामध्यें दुसरा नाहीं, असें विधान केल्यास तें निःसंशय अतिशयोक्तीचें होणार नाहीं. तत्त्वज्ञान व काव्य या दोहोंत उत्तर दक्षिण ध्रुवाइतकें अंतर आहे, असें पुष्कळ लोक म्हणतात. परंतु या दोहोंचा योग्य संगम उत्तम प्रकारें कसा घडूं शकतो, हें दाखविण्यास मूर्तिमंत निदर्शन योगवासिष्ठ हा ग्रंथ होय, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. या ग्रंथांत एखादी अवघड गोष्ट समजावून देण्याकरितां वसिष्ठांनीं उपमा व दृष्टांत यांचाच विशेष उपयोग केलेला आहे. श्रीशंकराचार्यांसारखे वसिष्ठ प्रत्येक गोष्टीला उपनिषदांचा किंवा स्मृति वाक्यांचा आधार देत बसले नाहींत. गौडपादांच्या सारखे थोडक्या शब्दांत तात्त्विक सिद्धांतांचें वर्णन वासिष्ठांत आढळत नाहीं. पण वसिष्ठांचें असें म्हणणें आहे कीं, 'एखादा ग्रंथ गोड व सरळ भाषेंत लिहिला असला, तर तो सर्वांना आवडतो. पण जर तो रूक्ष व शास्त्रीय भाषेंत असला, तर तो वाचण्याचा कंटाळा येतो.' म्हणून वासिष्ठांतहि तत्त्वज्ञान काव्याच्या रूपानें ग्रथित केलें आहे व काव्याला लागणारे प्रसिद्ध दहा* गुण या ग्रंथांत सर्वत्र दिसून येतात; म्हणूनच या ग्रंथाला 'महाकाव्य' असें म्हटलें आहे. उत्पत्ति प्र. सर्ग ८४ मध्यें वसिष्ठांनीं असें सांगितलें आहे कीं, "जें कांहीं चांगल्या गोड शब्दांत सांगितलें जातें व जें समजावून देण्याकरितां उपमा व दृष्टांत यांचा भरपूर उपयोग केलेला असतो, तें श्रोत्यांच्या मनांत एकदम प्रवेश करितें व त्याठिकाणीं पाण्यांत

---

* श्लेषः प्रसादः समता समाधिर्माधुर्यमोजः पदसौकुमार्यम् ।
*अर्थस्य च व्यक्तिरुदारता च कान्तिश्च काव्यस्य गुणा दशैते ॥*

टाकलेल्या तैल बिंदुप्रमाणें तें निःसंशय प्रसृत होतें. ज्या गोष्टींत उपमान चांगलें नसतें, शब्दयोजना भरपूर नसते, जी गोष्ट समजण्यास कठीण, जिच्यांतील वर्णन मुद्याला सोडून किंवा अपुरें असतें, अशा प्रकारच्या गोष्टींतील रहस्य श्रोत्यांच्या मनांत उतरत नाहीं. तर भस्मांत टाकलेली तुपाची आहुति विफल होते, त्याप्रमाणें अशा तऱ्हेचा उपदेश विफल होत असतो. नानाविध आख्यानें, लहान लहान कथा, अभिज्ञांचें रंजन करणारीं अध्यात्मपर्यवसायीं काव्यें, नाटकें व निबंध वगैरे दृष्टांतमुखानें श्रोत्यांच्या अंतकरणांतील अज्ञानांधकार नाहींसा करून त्यांना सुप्रकाशित करीत असतात." वसिष्ठांना स्वतःच्या अनुभवाचा आधार आहे. ते एखादें तत्त्व समजावून देण्याकरितां उपनिषदांचे आधार देत बसत नाहींत. त्यांना प्रत्येक बाबतींत आत्मप्रत्यय आलेला असतो, यासंबंधीं सविस्तर वर्णन "महर्षि वसिष्ठ" या ५० व्या प्रकरणांत आलेलें आहे.

या ग्रंथाचें वर्णन सदरहू ग्रंथांतच ज्या श्लोकांत करण्यांत आलेलें आहे, ते श्लोक खालीं दिले आहेतः—

शास्त्रं सुबोधमेवेदं सालंकारविभूषितम् ॥
काव्यं रसमयं चारु दृष्टान्तैः प्रतिपादितम् ॥ २-१८-३३
एतच्छास्त्रघनाभ्यासात्पौनःपुन्येन वीक्षणात् ॥
पांडित्यं स्यादपूर्वं हि चित्तसंस्कारपूर्वकम् ॥ २-१८-३६
अस्मिञ्श्रुते मते ज्ञाते तपोध्यानजपादिकम् ॥
मोक्षप्राप्तौ नरस्येह न किंचिदुपयुज्यते ॥ २-१८-३५

वरील श्लोकांत सदरहू ग्रंथाचें वर्णन फार थोडक्यांत परंतु अत्यंत समर्पक रीतीनें करण्यांत आलें आहे. या श्लोकांचा भावार्थ असा आहेः— "हें शास्त्र सुबोध आहे; तसेंच उपमादि नानाविध अलंकार आणि दृष्टांत यांच्या योगानें हें काव्य अत्यंत सरस आणि रमणीय बनलें आहे. या शास्त्राचें एकतानतेनें अध्ययन केलें आणि त्याचें पुनः पुनः पर्यालोचन केलें, म्हणजे चित्तावर उत्तम संस्कार होऊन मनुष्याच्या ठिकाणीं अपूर्व पांडित्य उदय पावतें. या सरस काव्यमय शास्त्राचें श्रवण केलें आणि मननाच्या योगानें त्यांतील हृद्गत आपलेंसें करून घेतलें, म्हणजे मोक्ष

प्राप्तीसाठीं मनुष्याला तप, ध्यान व जप वगैरे साधनांचा मुळींच 'उपयोग नाहीं."

या शिवाय निर्वाण प्र. उत्तरार्धांतहि वसिष्ठांनीं स्वतः या ग्रंथाची योग्यता खालील श्लोकांत स्पष्ट दाखविली आहेः—

इदमुत्तममाख्यानमध्येयं वेदवत्सदा ॥
व्याख्येयं पूजनीयं च पुरुपार्थफलप्रदम् ॥ नि. उ. १६३-५०
यद्यत्प्राप्यते शास्त्रात्तत्तद्वेदादवाप्यते ॥
अस्मिन् ज्ञाते क्रिया ज्ञानं द्वयं याति पवित्रताम् ॥ नि. उ. १६३-५१
वेदान्ततर्कसिदान्तस्त्वास्मिन् ज्ञाते च बुध्यते ॥
इदमुत्तममाख्यानं व्याख्यातं शास्त्रदृष्टिपु ॥ नि. उ. १६३-५२
अस्माद्ग्रंथादृते ग्रंथो नान्यः स्वात्मावबोधने ॥ नि. उ. १०३-३९
आत्मज्ञानमिदं शास्त्रं प्रकाशयति दीपवत् ॥
पितेव बोधयत्याशु कांतेवरमयत्यलम् ॥ नि. उ. १०३-४०

या श्लोकांचा भावार्थ असा कीं, "मोक्षपुरुषार्थरूप फल देणाऱ्या ह्या उत्तम आख्यानाचें वेदाप्रमाणें सदा अध्ययन करावें, त्याचें व्याख्यान करावें, पूजन करावें. वेदापासून जें फल प्राप्त होतें, तेंच या शास्त्रापासून मिळतें. याचें ज्ञान झालें असतां क्रिया व ज्ञान हीं दोन्हीं पवित्र होतात. हें शास्त्र जाणलें असतां वेदान्तशास्त्रांतील बादरायणादिकांनीं दाखविलेले, तात्पर्य निर्णयाविषयीं अनुकूल असे तर्क व त्यावर रचलेले सिद्धांत, यांचें ज्ञान होतें. आत्मज्ञान करून देण्यास या ग्रंथासारखा दुसरा ग्रंथ नाहीं. हें शास्त्र-दीपाप्रमाणें आत्मज्ञान प्रकाशित करतें, पित्याप्रमाणें सत्वर समजावून देतें व पत्नीप्रमाणें चित्तरंजन करितें."

सारांश, काव्य आणि तत्त्वज्ञान यांचा या ग्रंथांत अपूर्व मिलाफ झालेला असल्यामुळें ह्या ग्रंथ वाचतांना कोठेंहि रुक्षपणा वाटत नाहीं. तत्त्वज्ञाना-सारख्या गंभीर विषयावरील ग्रंथ सामान्य लोकांना बहुधा शुष्क आणि नीरस वाटतात. परंतु योगवासिष्ठ ग्रंथाची तशी स्थिति नाहीं. अगोदर श्रीवाल्मीकींची काव्यप्रतिभा उदात्त आणि उज्ज्वल; त्यांतून परमपावन श्रीरामचंद्रांचें चरित्र गाइल्यानंतर त्या अभ्यासामुळें अत्यंत उदात्त आणि

श्रीवाल्मीकि ऋषींनीं प्रथम घालून दिली, तिचेंच अनुकरण पुढें श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं आपल्या ज्ञानेश्वरीमध्यें केलेलें आहे. असें हे दोन्ही ग्रंथ वाचणाऱ्या मनुष्याला उघड दिसून येतें. अत्यंत पवित्र झालेल्या आपल्या काव्यप्रतिभेला त्यांनीं तत्त्वज्ञानाच्या अगाध वातावरणांत संचार करावयास लावल्यामुळें या ग्रंथाला विलक्षण ओजस्विता आणि रमणीयता प्राप्त झाली आहे. प्रसाद माधुर्यादि गुण, दृष्टांतादि सरस अलंकार यांच्या द्वारा अध्यात्मविषय प्रतिपादन करण्याची जी अपूर्व पद्धति

योगवासिष्ठासंबंधानें दुसरी अपूर्व गोष्ट अशी आहे कीं, ह्या ग्रंथ जागोजागीं अत्यंत मनोहर कथानकांनीं आणि आख्यानांनीं विभूषित झालेला असल्यामुळें ह्या ग्रंथ वाचीत असतां वाचकाचें मन रमून जातें आणि त्याबरोबरच ग्रंथांतील तत्त्वज्ञानाची गोडी लागून वेदान्तांतील उच्च आणि आत्मोन्नतिकारक सिद्धान्त हळु हळु मनावर ठसत जातात. ह्या वासिष्ठांत आलेलीं ५१ आख्यानें किंवा गोष्टी ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत थोडक्यांत सोप्या भाषेंत दिलेलीं आहेत. ह्यांपैकीं कांहीं गोष्टी निव्वळ उपमा व रूपकेंच आहेत आणि बाकीच्या गोष्टी मोठ्या मनोरंजक आहेत. ह्या गोष्टींना ऐतिहासिक दृष्टीनें कितपत सत्यता असावी, हें सांगणें मोठें कठीणच आहे. कांहीं कांहीं गोष्टी तर ग्रंथकर्त्याच्या कल्पनेवरूनच निघालेल्या आहेत असें वाटतें. असें जरी असलें तरी ह्या ग्रंथांतील प्रत्येक आख्यान किंवा उपाख्यान अध्यात्मशास्त्रांतील कोणतें ना कोणतें तत्त्व विशद करण्याच्या दृष्टीनें रचण्यांत आलें आहे. कोणत्या आख्यानानें कोणतें तत्त्व विशद केलें आहे, हेंहि प्रत्येक आख्यानाच्या शेवटीं तात्पर्य-रूपानें दिलें आहे.

अशा तऱ्हेनें नानाविध रम्य आख्यानांनीं भरलेला ह्या समग्र ग्रंथ कादंबरीप्रमाणें मोठा मनोरंजक असल्यामुळें तो मनोरंजनाबरोबर तत्त्व-ज्ञानाचे सिद्धांत वाचकांच्या चित्तावर बिंबविण्याचें मोठें कार्य करितो; व हीच ह्या योगवासिष्ठ ग्रंथाची अपूर्वता आहे. उत्पत्ति प्र. सर्ग ८ मध्ये श्रीवसिष्ठांनीं तत्त्वज्ञान होण्याला सच्छास्त्राची आवश्यकता किती आहे, या सिद्धांताचें स्पष्टीकरण करीत असतां असें सांगितलें आहे कीं,

आत्मज्ञानप्रधानानामिदमेव महामते ॥
शास्त्राणां परमं शास्त्रं महारामायणं शुभम् ॥ ३-८-८ ,
जीवन्मुक्तत्वमस्मिंस्तु श्रुते समनुभूयते ॥ ३-८-१५

"सर्व अध्यात्मशास्त्रामध्यें हें महारामायण ( योगवासिष्ठ ) शास्त्र श्रेष्ठतम आहे व म्हणूनच हें श्रवण केलें असतां मनुष्याला जीवन्मुक्ति प्राप्त होते."

ह्या शास्त्राचें महत्त्व अगदीं थोडक्यांत खालील श्लोकांत सांगितलें आहे:—

* यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥
इमं समस्तविज्ञानशास्त्रकोशं विदुर्बुधाः ॥ ३-८-१२

याचा भावार्थ असा कीं, " जें ह्या ग्रंथांत आहे, तेंच इतर ग्रंथांतून आहे, आणि जें यांत नाहीं, तें कोठेंहि नाहीं. कारण ह्या ग्रंथ म्हणजे सर्व विज्ञानशास्त्ररूपी धनाचें भांडार आहे, असें ज्ञाते मानतात."

असें वर्णन करून वसिष्ठ पुढें सांगतात कीं, " ह्या ग्रंथ इतका उत्तम असूनहि पूर्वपातकामुळें ज्या नीरस मनुष्याला आवडणार नाहीं, त्यानें अध्यात्मशास्त्रावरील दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथाचें अवलोकन करावें व आपली उन्नति करून घ्यावी. हें शास्त्र ऋषीनें केलें आहे, म्हणून तें स्मृतिरूप आहे. स्मृतीचें मूळ श्रुति आहे. वास्तव आम्हीं श्रुतीचाच आश्रय करूं. या भावनेनें हें शास्त्र कोणाला न रुचल्यास त्यानें दुसऱ्या उपनिषदादि अध्यात्मशास्त्राचाच विचार करावा. पण अध्यात्मशास्त्रापासून विन्मुख होऊं नये. अविचारानें आपलें आयुष्य व्यर्थ घालवूं नयें. कारण

आयुषः क्षण एकोऽपि बहुरत्नैर्न लभ्यते ॥ नि. उ. १७५-७६.

" आयुष्याचा एक क्षण देखील पुष्कळ मौल्यवान् रत्नें दिल्यानेंहि मिळणार नाहीं."

---

* ' यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ' हा ओळ श्रीमहाभारतांमध्यें ' तत्क्वचित् ' या ऐवजीं ' कुत्रचित् ' या शब्दाच्या फरकानें आली आहे ( स्वर्गारोहणपर्व अ. ५ श्लोक ५० ).

यावरून अज्ञ जीवांच्याविषयीं श्रीवसिष्ठांच्या मनांत किती दयार्द्र भावना वसत होती हें स्पष्ट होत आहे. पूर्वपुण्याईशिवाय या ग्रंथाच्या श्रवणपठणाची इच्छा होणार नाहीं, अशा अर्थाचें जें वर विधान केलें आहे, तशाच तऱ्हेचें विधान *श्रीमत्‌भागवतमहात्म्यांतहि केलेलें आढळतें. धन, दान, तप यांच्यायोगानें, तसेंच शास्त्राध्ययन, वेदाध्ययन करून त्यांत सांगितल्याप्रमाणें शेकडों कर्मे केल्यानें संसारदुःख नाहींसें होणार नाहीं, परंतु तें दुःख या ग्रंथांतील कथांचें श्रवण करून त्यांच्या तात्पर्याचा विचार केल्यानें निःसंशय दूर होईल.

खरें पाहूं गेलें तर परमार्थप्राप्तीसाठीं प्रत्यक्ष प्रयत्नांची कांहीं आवश्यकता नाहीं. फुलें चिरडून टाकावयाचीं झालीं, तर त्याकरितां हाताच्या बोटांना थोडा तरी त्रास सोसावा लागतो. परंतु परमार्थाच्या प्राप्तीमध्यें स्थूल शरीराच्या चालनेचें मुळींच काम नाहीं. बुद्धीचा निरोध इतकेंच काय तें हवें असतें. शास्त्रविरुद्ध मार्गाचें आचरण न करितां, सुखासनावर बसून खातपीत असतां किंवा विहित विषयांचा उपभोग घेत असतां, जो मनुष्य ज्या देशांत आणि ज्या कालीं असेल त्या देशांत आणि त्या कालीं सत्संगांत राहून विचार करीत असला, म्हणजे त्याला हें शास्त्र किंवा उपनिषदादि शास्त्रें यांचे सिद्धांत अनुभवतां येतात; आणि सर्व संसाराची शांति करणारें आत्मज्ञान प्राप्त होऊन गर्भवासाच्या यातनेंतून जीवाला कायमचे मुक्त होतां येते.



* जन्मांतरे भवेत्पुण्यं तदा भागवतं लभेत् ॥ भागवत महात्म्य १-६२.

# प्रकरण ५ वें.

## योगवासिष्ठांतील आत्मज्ञानाच्या बाबतींत स्वीकारलेलीं प्रत्यक्षादि प्रमाणें.

वेदांत शास्त्रामध्यें आत्मज्ञानाविषयीं स्वीकारलेलीं जीं साधनें त्यांना 'प्रमाण' असें म्हणतात. एकंदर हीं प्रमाणें सहा आहेत. (१) प्रत्यक्ष, (२) अनुमान, (३) उपमान, (४) शाब्द, (५) अर्थापत्ति, व (६) अनुपलब्धि, अशीं एकंदर सहाप्रमाणें आत्मज्ञानाचीं योग्य साधनें म्हणून आद्य श्रीशंकराचार्यांनीं मानलीं आहेत. वरील सहा प्रमाणां-पैकीं चार्वाक फक्त 'प्रत्यक्ष' प्रमाण मानणारे आहेत. बौद्ध 'प्रत्यक्ष' व 'अनुमान' मानणारे आहेत. सांख्य 'प्रत्यक्ष', 'अनुमान' व 'शाब्द' हीं तीन प्रमाणें मानणारे आहेत. नैय्यायिक या तीन प्रमाणां-शिवाय आणखी एक 'उपमान' प्रमाण मानतात. प्रभाकर मीमांसक आणखी एक 'अर्थापत्ति' प्रमाण मानतात. भट्टमीमांसक या पांचा-शिवाय आणखी एक 'अनुपलब्धि' प्रमाण मानतात. श्रीमंत शंकराचार्य वरील सहाहि प्रमाणें मानतात. याशिवाय संभव, ऐतिह्य, हींहि प्रमाणें मानलीं आहेत. नि. प्र. उत्तरार्ध सर्ग ७९ मध्यें वसिष्ठांनींहि ह्या सर्व प्रमाणांचा उल्लेख केला आहे.

योगवासिष्ठामध्यें वरील प्रमाणाविशीं 'प्रत्यक्ष' अथवा 'अनुभव' हेंच आत्मज्ञानाचें मुख्य प्रमाण आहे असें वसिष्ठ सांगतातः—

सर्वप्रमाणसत्तानां पद्मब्धिरपामिव ॥
प्रमाणमेकमेवेह प्रत्यक्षं तदतः शृणु ॥ २-१९-१६
सर्वाक्षसारमध्यक्षं वेदनं विदुरुत्तमाः ॥
नूनं तत्प्रतिपत्सिद्धं तत्प्रत्यक्षमुदाहृतम् ॥ २-१९-१७
प्रत्यक्षमेव निर्मात् तस्यांशास्त्वनुमादयः ॥ २-१९-२३.

या श्लोकांचा भावार्थः—" चार्वाकांच्या प्रत्यक्षाच्या व्याख्येप्रमाणें

म्हणजे " इंद्रियगोचर तेंच प्रत्यक्ष " असें वासिष्ठांतील प्रत्यक्ष नसून, तें
समुद्रामध्यें सर्व पाण्याचा समावेश होतो, त्याप्रमाणें प्रत्यक्षामध्यें बाकीच्या
सर्व प्रमाणांचा समावेश होतो. हें एकच प्रत्यक्ष प्रमाण कोणतें ? तें ऐक.
सर्व प्रमाणांचें सार इंद्रियें होत आणि सर्व इंद्रियांचें सार अपरोक्षज्ञान
असल्यामुळें तेंच मुख्य प्रत्यक्ष, असें ज्ञाते समजतात. हें अपरोक्ष ज्ञान
म्हणजे आत्मा व हा आत्मा 'मी घट जाणतों' या त्रिपुटीच्या साक्षीरूपानें
व्यक्त होतो. म्हणून याला मुख्य प्रत्यक्ष असें म्हणतात. अनुमानादि-
प्रमाणें त्याचे अंश आहेत.

नि. प्र. उत्तरार्ध सर्ग ६८ मध्यें वसिष्ठांनीं एक 'योगीप्रत्यक्ष' व
दुसरें 'मनःप्रत्यक्ष' अशीं दोन प्रकारचीं प्रत्यक्षें सांगितलीं आहेत.
'मनःप्रत्यक्ष' म्हणजे मनाला प्रत्यक्ष दिसणारे म्हणजे अनुभवाला येणारे
हे सर्व आधिभौतिक स्थूल देहादि दृश्य पदार्थ होत. हे सर्व कल्पनेनें
उद्भवलेले असल्यामुळें असत् आहेत. 'योगीप्रत्यक्ष' म्हणून सांगितलेलें
तें सत्प्रत्यक्ष आहे. कारण योग्याला स्वस्वरूपाचें अपरोक्ष ज्ञान होत असतें.
म्हणूनच वसिष्ठ सांगतात कीं:—

प्रत्यक्षेणैवमध्यक्षं प्रत्यक्षं प्रविचार्यताम् ॥
यदाद्यं तत्सदध्यक्षं तत् प्रत्यक्षेण दृश्यताम् ॥ नि. उ. ६८-३२.

'प्रत्यक्ष प्रमाणानें स्वस्वरूपाचा साक्षात् विचार करावा व जें आद्य तेंच
सत् व अपरोक्ष होय. म्हणूनच त्याला मुख्य प्रत्यक्ष असें पहावें.'

यावरून असें दिसून येतें कीं, मनःप्रत्यक्षामध्यें म्हणजे आधिभौतिक
दृश्यसृष्टींतहि मानलेलीं प्रत्यक्षादि प्रमाणें योगीप्रत्यक्षानें म्हणजे आत्म-
साक्षात्कारानें बाधित होतात; तर त्या सर्व प्रमाणांमध्यें वास्तविक सत्ता
कोठून असणार ? तत्त्वतः असिद्ध असलेल्या प्रमाणांनीं ज्याची सिद्धि
केली जावे, तें सत् कोठून असणार ? 'अक्ष्णोः प्रति प्रत्यक्षम्' या
व्युत्पत्तिप्रमाणें म्हणजे 'डोळ्यांना दिसणारें तेंच प्रत्यक्ष' असें मानलें तर
डोळ्यांना दिसणारें आधिभौतिक दृश्य आत्मसाक्षात्कारानें बाधित होत
असल्यामुळें प्रत्यक्ष प्रमाणाचेंच अस्तित्व जेथें नाहींसें होतें, तेथें अनु-
मानादिकांची काय कथा ? म्हणूनच वसिष्ठांनीं मानलेल्या प्रत्यक्षादि

प्रमाणांपेक्षां ' योगीप्रत्यक्ष ' अथवा ' अनुभव ' हेंच मुख्यप्रत्यक्ष मानलें आहे.

वसिष्ठ नैय्यायिकाप्रमाणें ईश्वराचें अस्तित्व अनुमानानें मानीत नाहींत; किंवा वेदांत्याप्रमाणें शब्दप्रमाणांनीं मानीत नाहींत, तर ते प्रत्यक्ष किंवा अनुभव प्रमाणानेंच मानतात. हें खालील श्लोकांत स्पष्ट दाखविलें आहे:—

तद्विदा तत्पदस्थेन तन्मुक्तेनानुभूयते ॥
अन्यैः केवलमाम्नातैरागमैरेव वर्ण्यते ॥ नि. उ. ५२-२९.
नात्माऽस्त्यनुमयो राम न चाप्तवचनादिना ॥
सर्वदा सर्वथा सर्वं सप्रत्यक्षोऽनुभूतितः ॥ ५-७३-१५
न शास्त्रैर्नापि गुरुणा दृश्यते परमेश्वरः ॥
दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्त्वस्थया धिया ॥ नि. उ. ११८-४
अनुभूतिं विना राम खंडादेर्नानुभूयते ॥
अनुभूतिं विना रूपं नात्मनश्चानुभूयते ॥ ५-६४-४३

या श्लोकांचा भावार्थः—" ज्याला आत्म्याचें ज्ञान झालें असतें, जो आत्मस्वरूपीं स्थित असतो व जो खरोखरच सर्व बंधनांपासून मुक्त झालेला असतो, त्याला तें आत्मतत्त्व अनुभवास येतें. बाकीचे परोक्षज्ञानी केवल शब्दप्रामाण्याच्या आधारानेंच ( म्हणजे वेदप्रामाण्य ) त्याचें वर्णन करितात. आप्तवाक्यांच्या योगानें आत्म्यासंबंधानें केवल अनुमान करावयाचें नाहीं, तर तो स्वानुभवानें प्राप्त करून घ्यावयाचा आहे. परमेश्वर, शास्त्रें किंवा गुरु यांच्या योगानें तो दिसत नाहीं. तर आत्मा ( ईश्वर ) आपल्या सत्त्वस्थ बुद्धीनेंच मात्र स्वतःकडूनच पाहिला जातो. ज्याप्रमाणें खडीसाखरेची गोडी माहीत नसलेल्या माणसानें ती खाल्ल्याशिवाय तिच्या गोडीचें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याच्या परमार्थस्वरूपाचें ज्ञान स्वानुभवावांचून होणें शक्य नाहीं.

यावरून असें दिसून येतें कीं, आत्म्याचें शब्दानें कितीहि वर्णन करून सांगितलें किंवा तो समजून देण्याकरितां कितीहि अनुमानादि प्रमाणें स्वीकारिलीं, किंवा त्याच्याकरितां अनेक दृष्टांत व युक्त्याहि सांगितल्या तरी शेवटीं त्याचें अपरोक्ष ज्ञान ज्याचें त्यानेंच अनुभवानें करून घेतलें

पाहिजे, यांत शंका नाहीं. ज्याला खडी साखरेची चव माहीत नाहीं, अशा माणसानें 'खडीसाखरेची चव कशी असते ?' असें विचारलें असतां आपण जर त्याला सांगितलें कीं, 'ती गोड असते.' पण 'तिची गोडी कशी असते ?' असें पुनः पुनः तिच्या चवीसंबंधानें त्यानें पुष्कळ प्रश्न विचारले. म्हणजे शेवटीं आपण त्रासून त्याला असें सांगतों कीं, "अरे बाबा ! इतका काथ्याकूट करीत बसण्यापेक्षां तूं एक त्या खडीसाखरेचा खडा तोंडांत घालून पहा म्हणजे 'तिची चव कशी असते ?' 'तिची गोडी कशी असते ?' वगैरे सर्व प्रश्नांचा उलगडा तुला आपोआप होईल." म्हणून शाब्दिक ज्ञानापेक्षां अपरोक्ष म्हणजेच अनुभविक ज्ञान केव्हांहि श्रेष्ठ आहे. यावरून आत्मस्वरूपाचें ज्ञान अनुभवावांचून होणें शक्य नाहीं. असें 'अनुभूतिं विना रूपं नात्मनश्चानुभूयते' या वरील श्लोकांत वसिष्ठांनीं स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे.

आपल्या नेहमीच्या व्यवहारामध्यें विषयाचें ज्ञान होण्याकरितां दोन गोष्टींची अत्यंत जरूरी आहे. त्यांपैकीं एक ज्ञेय ( पदार्थ ) व दुसरा ज्ञाता ( इंद्रियें ) या दोघांचा संबंध म्हणजे ज्ञान होय. वेदांतशास्त्रांत यालाच त्रिपुटी असें म्हणतात. 'मी घट पाहिला' या त्रिपुटीची सिद्धि झाली खरी, पण त्या घटाचें ज्ञान म्हणजे अनुभव येण्याकरितां त्या त्रिपुटीला चिदाभासानें व्यापून टाकायला पाहिजे. त्याशिवाय त्याचें ज्ञान होऊं शकत नाहीं. अशा तऱ्हेनें 'मी घट पाहिला' व 'मी तो जाणला' ह्या ज्या दोन वृत्ती उत्पन्न होत असतात, त्याला वेदांतशास्त्रामध्यें 'वृत्तिव्याप्ति' व 'फलव्याप्ति' अशीं अनुक्रमें नांवें दिलीं आहेत. आत्मस्वरूपाच्या बाबतींत त्रिपुटीची आवश्यकता नाहीं; कारण ज्ञाता व ज्ञेय ह्या दोन वस्तू नाहींत; तर ज्ञाता हा आत्माच आहे व ज्ञेयहि आत्माच आहे, म्हणून ज्ञान देखील कांहीं निराळें नाहीं, तेंहि आत्माच आहे. म्हणूनच वसिष्ठांनीं वर सांगितलें आहे कीं, 'दृश्यते स्वात्मनैवात्मा' आत्मा आत्म्याकडूनच पाहिला जातो व हें ज्ञान प्रत्यक्ष आहे. हें आत्मस्वरूप कसें आहे, हें प्रत्यक्ष वर्णन करून सांगतां येण्याजोगें नाहीं; तर तें अभ्यासानें आपल्या स्वतःच्या ठिकाणीं अनुभवण्याजोगें आहे, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे. हा त्याचा अनुभव जीवन्मुक्तांच्या ठिकाणीं प्रत्यक्ष आलेला असतो. म्हणून सर्व प्रमाणामध्यें 'आत्मप्रत्यक्ष' हेंच मुख्य प्रमाण आहे, असें वसिष्ठांनीं सांगितलें

आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं देखील आपल्या ' अमृतानुभवा 'मध्यें हेंच तत्त्व प्रगट केलें आहे. आत्मानुभव हेंच खरें अमृत आहे, असें वसिष्ठांनीं सांगितलें आहे.

आलोकः सुमनोमौनं चिद्ब्रह्मास्म्यमृतं परम् ॥ ऽ
अनारतगलद्रूपं नित्यं चानुभवामृतम् ॥ * नि. पू. ११-७१.

" तें योग्यांच्या अनुभवाचा विषय जरी होत असलें, तरी शब्दांनीं ज्याचें वर्णन करतां येत नाहीं असें जें परमअमृत म्हणजेच निरतिशयानंद-रूप परब्रह्म, तें मीं आहें. अहंकाररूप सर्व भोक्तृसमूहास निरनिराळ्या भोगवृत्तींच्या धारांनीं मधाच्या धारेप्रमाणें सतत आनंदामृताचा अनुभव देणारें असें ब्रह्म मीं आहें."

अशा ह्या अनुभवामृताचेंच आम्हीं सेवन करितों, असें वसिष्ठ सांगतात:—

अक्षीरार्णवसंभूतमशशांकमुपस्थितम् ॥
अहार्यममृतं सत्यं चिदात्मानमुपास्महे ॥ नि. पू. ११-१०९

" प्रसिद्ध अमृताप्रमाणें क्षीरसागरापासून उत्पन्न न झालेलें, चंद्राशिवाय उपस्थित झालेलें व गरुडादिकांना हरण न करितां येणारें, असें जें सत्य अमृत, तद्रूप चिदात्म्याची आम्हीं उपासना करितों. "

म्हणून आत्मानुभव हेंच खरें अमृत होय. असें शेवटीं वसिष्ठांनीं सिद्ध केलें आहे.



---

* श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या 'अमृतानुभवाचें' मूळ नांव 'अनुभवामृत' असें असावें व तें त्यांनीं योगवासिष्ठांतील वरील श्लोकांतील ' अनुभवामृतम् ' या पदावरून कदाचित् ठेवलें असावें असें वाटतें.

ऽ तसेंच मुकुंदरायांनीं आपल्या ' परमामृत ' ग्रंथाचें नांव वरील श्लोकांतील ' अमृतंपरम् ' या पदावरून ठेवलें असावें असें वाटतें.

# प्रकरण ६ वें.

## योगवासिष्ठांतील दृष्टांत व उपमा.

अशा तऱ्हेनें आत्मज्ञान हें प्रत्यक्ष अथवा अनुभव यावर अवलंबून असल्यामुळें ज्यांना त्याची कांहींच माहिती नाहीं, अशा पुरुषांना तें समजावून देणें फारच कठीण आहे. ज्या वस्तूचा प्रत्यक्ष अनुभव येत नाहीं व ज्याला प्रत्यक्ष ' ही वस्तु ' म्हणून दाखवितां येत नाहीं, अशी वस्तु समजावून देण्याकरितां दृष्टांताचा स्वीकार करावा लागतो. कारण—

दृष्टान्तेन विना राम नापूर्वार्थोऽवबुध्यते ॥ २-१८-५१

' दृष्टांतावाचून अदृष्ट अर्थाचा बोध होत नाहीं. '

म्हणूनच ही दृष्टि ठेवून ग्रंथकर्त्यानें वासिष्ठामध्यें हजारों मार्मिक दृष्टांत व उपमा दिल्या आहेत. त्यांच्या योगानें हा ग्रंथ अत्यंत सरस बनलेला आहे. यास्तव दृष्टांत म्हणजे काय यासंबंधानें थोडेसें व्याख्यान करणें जरूर आहे. दृष्टांताची व्याख्या योगवासिष्ठांत अशा तऱ्हेची करण्यांत आली आहे.

येनेहाननुभूतेऽर्थे दृष्टेनार्थेन बोधनम् ॥
बोधोपकारफलदं तं दृष्टान्तं विदुर्बुधाः ॥ २-१८-५०

" पाहिलेल्या पदार्थांतील ज्या सादृश्याच्या योगानें न अनुभवलेल्या पदार्थाचा अनुभव येतो, अशा बोधोपकारक शब्दसमुच्चयाला दृष्टांत असें ज्ञाते म्हणतात. " अथवा परिचिताच्या साम्यानें अपरिचिताचें ज्ञान करून देणें यालाच दृष्टांत किंवा उपमा असें म्हणतात.

दृष्टांत हे नेहमीच एकदेशी असतात; म्हणजे दृष्टांत आणि दार्ष्टान्तिक यांच्यामधील साधर्म्य तितक्यापुरतेंच घ्यावयाचें असतें. सर्वस्वीं घ्यावयाचें नसतें. एखादें स्त्रीचें वर्णन करतांना तिचें मुख चंद्राप्रमाणें आहे, असें म्हटलें म्हणजे चंद्र आणि मुख यांचें सर्वस्वी साम्य आहे, असा अर्थ ग्रहण करावयाचा नसून चंद्रामधील रमणीयत्व या धर्मापुरतेंच साधर्म्य आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण चंद्रावर पर्वत व मेघ आहेत, असें

अधुनिक कालांतील ज्योतिषशास्त्र सांगतें; व ही गोष्ट मनांत आणून एखाद्या मनुष्यानें स्त्रीसौंदर्याचें वर्णन करणाऱ्या गृहस्थाला विचारलें कीं, ' काय हो ! स्त्रीचें मुख चंद्राप्रमाणें आहे म्हणतां, तर मग त्याठिकाणीं पर्वत व मेघ कोठें आहेत ?' अर्थात् हा विचारलेला प्रश्न हास्यास्पद होय. यावरून प्रत्येक दृष्टांत एकदेशीय असतो, ही गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे. हाच न्याय अध्यात्मशास्त्रांतील विषयांचें प्रतिपादन करितांना आलेल्या दृष्टांतांच्या बाबतींत तर विशेषच लागू करावयास पाहिजे; कारण ब्रह्म हा विषयच मुळीं

" निर्विकल्पमनंतं च हेतुदृष्टांतवर्जितम् ॥ "

असा आहे. याचा अर्थ असा कीं ' ब्रह्म हें निर्विकल्प, अनंत, तसेंच कार्यकारणपरंपरा आणि दृष्टांत यांच्या अतीत आहे. ' ब्रह्म ही एकमेव अद्वितीय वस्तु असल्यामुळें म्हणजे ' गगनं गगनाकारम्,' ' सागरः सागरोपमः ' या अनन्वय अलंकारांतील उदाहरणांत वर्णन केल्याप्रमाणें त्याची स्थिति असल्यामुळें ब्रह्माला वस्तुतः कोणताहि दृष्टांत लागू पडत नाहीं. कारण त्याच्यासारखी वस्तु जगांत एकहि नाहीं. वास्तव ब्रह्माचें वर्णन करण्याच्या बाबतींत कितीहि दृष्टांत दिले, तरी ते वास्तविक लंगडेच पडतात. 'यतोवाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह' म्हणजे ब्रह्माचें वर्णन करतांना मनासहित वाणी कुंठित होतात. अशी ब्रह्माची स्थिति आहे. सारांश, दृष्टांतादिकांच्या योगानें ह्याचें यथार्थ वर्णन करितां येणें अशक्य आहे. शब्दानें ब्रह्माचें अपरोक्ष ज्ञान होऊं शकत नाहीं, असें ज्याप्रमाणें श्रुति सांगते, त्याचप्रमाणें ' शब्दादेवापरोक्षधीः ' अथवा ' शाब्दे ब्रह्मणि निष्णातः परं ब्रह्माधिगच्छति ' म्हणजे शाखाचंद्रन्यायानें शब्दानेंच अपरोक्षज्ञान होतें, असेंहि श्रुतिच सांगते. यांतील तात्पर्यार्थ इतकाच कीं, ब्रह्म ही सिद्ध वस्तु असल्यामुळें ह्या ब्रह्माचें ज्ञान उत्पन्न होतें, असें तरी तत्त्वतः कसें म्हणतां येईल ? अर्थात् मिथ्या अज्ञानाचा कोणत्यातरी युक्तीनें निरास होऊन अखेर नित्य सिध्द असें ब्रह्म शिल्लक रहातें. अशा दृष्टीनें ब्रह्माला ' निषेधावधिभूतम् ' म्हणजे सर्व आरोपित वस्तूंचा पूर्णपणें निरास किंवा बाध होऊन शिल्लक राहिलेली वस्तु असें म्हणतात.

आतां वेदांतदृष्ट्या सर्व जग मिथ्या असल्यामुळें या स्वप्नतुल्य जगांतील मिथ्या दृष्टांतांनीं या जगद्रूप स्वप्नाला अधिष्ठानभूत असलेल्या ब्रह्माचें ज्ञान कसें होणार ? असा एक प्रश्न उत्पन्न होतो. परंतु यावर वेदांत असें उत्तर देतो कीं, एका काट्यानें दुसरा काटा काढावा त्याप्रमाणें दृष्टांत हे जरी काल्पनिक असले, तरी असल्या दृष्टांतांच्या योगानेंच काल्पनिक जगाचें मिथ्यात्व पूर्णपणें अनुभूत झालें म्हणजे दृष्टांतांचें कार्य आटोपलें. कारण आरोपित वस्तु नाहींशी झाली कीं, त्याचें अधिष्ठान शिल्लक रहातें. अशा दृष्टीनें दृष्टांताचा उपयोग फार मोठा आहे. यास्तव

ब्रह्मोपदेशे दृष्टान्तो यस्तवेह हि कथ्यते ॥
एकदेशसधर्मत्वं तत्रांतः परिगृह्यताम् ॥ २-१८-५४

" ब्रह्मज्ञानाचा उपदेश करीत असतांना जो जो दृष्टांत सांगण्यांत येईल, त्याचें त्याचें दार्ष्टांतिक ब्रह्मवस्तूशीं जितक्या बाबतींत साधर्म्य वर्णन केलें असेल, तितकाच ग्राह्यांश ग्रहण करीत जाऊन अंतःकरणांत ब्रह्मतत्त्वाचा निश्चय करीत जा. " असा वसिष्ठांनीं रामाच्या निमित्तानें आपणा सर्वांना इषारा दिला आहे. ज्याप्रमाणें समुद्राच्या पृष्ठ भागावर लक्षावधि तरंग उत्पन्न होतात, त्याप्रमाणें ब्रह्मावर कोट्यवधि सृष्टी उत्पन्न होतात, असा दृष्टांत विवर्तवाद सिद्ध करितांना ग्रंथांत आला, तर मग जग खरोखरच उत्पन्न झालें आहे कां ? असा विकल्प मनांत येऊं देऊं नये, कारण समुद्राच्या पृष्ठ भागावर हजारों तरंग उत्पन्न होतात व नाहींसे होतात, हाहि दृष्टांत त्याच्या शेजारींच आलेला असतो व तो लक्षांत ठेवून अधिष्ठानाची सत्यता आणि त्यावरील विवर्तांची असत्यता सिद्ध करण्यासाठीं असले दृष्टांत देण्यांत येतात, हें विसरतां कामा नये. आतां विवर्त भावनेचा निरास होऊन अधिष्ठानाच्या सत्यतेची दृष्टि दृढ झाली, म्हणजे अधिष्ठान दृष्टीनें विवर्तांकडे पाहून दोहोंचें ऐक्य अनुभवाला यावें अशा हेतूनें ' पाण्यावरील तरंग पाण्याहून भिन्न दिसले तरी ते भिन्न नसून त्याच्याशीं एकरूप असतात, त्याप्रमाणें ब्रह्मा-मध्यें भासमान होणाऱ्या सर्ग परंपरा ब्रह्माहून व्यतिरिक्त दिसल्या, तरी त्या ब्रह्मरूपच आहेत. ' अशा तऱ्हेचा एखादा दृष्टांत दिला जातो. सारांश,

दृष्टांत आणि दार्ष्टांतिक यांच्यामधील साम्य एकदेशीय असतें हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

अशा तऱ्हेचे दृष्टांत देण्याला सुरवात झाली कीं, एकामागून एक अशा सरीवर सरी येतात. हें म्हणणें उत्पत्ति प्र. सर्ग १४ मध्यें ब्रह्म व जग ह्यांच्यामध्यें ऐक्य दाखविण्याकरितां दिलेल्या अनेक दृष्टांतावरून दिसून येतें. हे विविध दृष्टांत असे आहेतः—ब्रह्म हा अग्नि व जग त्याची उष्णता, ब्रह्म हा शंख व जग हा त्याचा पांढरेपणा, ब्रह्म हें जल व जग हें त्याचें द्रवत्व, ब्रह्म हा ऊस व जग ही त्याची माधुरी, ब्रह्म हें दूध व जग ही त्याची स्निग्धता, ब्रह्म ही मोहरी व जग हें त्याचें तेल, ब्रह्म हें बर्फ व जग हें त्याचें शैत्य, ब्रह्म ही नदी व जग ही त्यावरची लाट, ब्रह्म हा मध व जग हें त्याचें माधुर्य, ब्रह्म हें सोनें व जग हा अलंकार, ब्रह्म हें पुष्प आणि जग हा त्याचा सुगंध. अशा तऱ्हेचें एक तत्त्व सिद्ध करण्याकरितां या ग्रंथांत कित्येक ठिकाणीं अनेक दृष्टांत देण्यांत आले आहेत.

## अनेक दृष्टांत देण्याचें कारण.

एकाच बाबतींत दिलेल्या अनेक दृष्टांतांचें स्वारस्य वेगवेगळें दिसून येतें. उदा० ब्रह्मापासून जग कसें उत्पन्न झालें आहे, याला एकामागून एक अनेक दृष्टांत दिले आहेत. पहिला दृष्टांत दुधाचें दहीं होणें, दुसरा बीजवृक्षाचा तिसरा सुवर्ण अलंकाराचा व चवथा रज्जु सर्पाचा पहिल्या दृष्टांतामध्यें ब्रह्माचा विस्तार सृष्टींत परिणामवादानें होण्यापुरता ठीक आहे. परंतु सृष्टि परब्रह्मांत विलीन होते, याला लागू पडत नाहीं. शिवाय ब्रह्माचा कांहीं परिणाम होऊन सृष्टि होते असेंहि नाहीं. म्हणून दुसरा दृष्टांत बीज वृक्षाचा कांहीं बरा. कारण वृक्षापासून पुन्हा बीज निर्माण होतें.पण या दृष्टांतामध्यें बीज नष्ट होऊन वृक्षाच्या रूपानें परिणाम पावतें, तसें ब्रह्म नष्ट होऊन जगाच्या रूपानें परिणाम पावतें, असें नाहीं, म्हणून हा दृष्टांत समर्पक नाहीं. म्हणून तिसरा दृष्टांत सुवर्ण अलंकाराचा दुसऱ्यापेक्षां पुष्कळच बरा आहे. कारण, सोन्याचा अलंकार बनला, तरी सोनें जसें आपलें मूळरूप सोडीत नाहीं, तसें ब्रह्म जरी जगाच्या रूपानें

भासूं लागलें तरी तें आपलें स्वरूप सोडीत नाहीं. पण ह्याहि दृष्टांतामध्यें सोनें आपलें स्वरूप सोडीत नसलें, तरी दागिना बनल्यावर त्याचा आकार बदलतो. तसा ब्रह्माचा आकार बदलून जग निर्माण होतें, असें म्हणावें लागेल. पण ब्रह्माला आकार आहे कोठें ! तर त्याचा बदलण्याचा प्रश्न उत्पन्न होणार. म्हणून ह्याहि दृष्टांत समर्पक नाहीं. चवथा दृष्टांत रज्जु-सर्पाचा. हा दृष्टांत मात्र समर्पक आहे. कारण दोरीच्या ठिकाणीं साप भासला, तरी दोरी आपलें स्वरूप व आपला आकार सोडीत नाहीं इतकेंच नव्हे तर आपल्या ठिकाणीं दुसऱ्याला साप भासत आहे, असें तिला माहीतहि नसतें. तसें अज्ञ लोकांना ब्रह्माच्या ठिकाणीं जगाचें भान होत असलें, तरी ही गोष्ट ब्रह्माला माहीतच नाहीं. असो, यावरून असें दिसतें कीं, ज्या ठिकाणीं एकापेक्षां अधिक दृष्टांत दिलेले असतात, त्या ठिकाणीं पहिल्या दृष्टांतापेक्षां दुसरा दृष्टांतच जास्त समर्पक असतो व दुसऱ्यापेक्षां तिसरा समर्पक असतो व तिसऱ्यापेक्षां चवथा समर्पक असतो. यांवरून दृष्टांत पूर्ण समर्पक मिळेपर्यंत या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं एकापेक्षां जास्त दृष्टांत दिलेले आहेत. अशाच तऱ्हेचे दृष्टांत ज्ञानेश्वरीमध्यें * आढळतात. सारांश, जगाचें बुडाशीं एकमेवाद्वितीय असें ब्रह्मतत्त्व आहे. त्याचें ज्ञान करून देणें हेंच दृष्टांतांचें कार्य आहे आणि सर्व वेदांत ग्रंथांचें तात्पर्यहि हेंच आहे.



---

* माझें या विस्तारलेपणा नांवें। हें जगचि नोहे आघवें। जैसें दूध मुरालें स्वभावें। तरी तेंचि दहि ॥ ज्ञानेश्वरी ९-६४.

कां बीजचि झालें तरु। अथवा भांगाराचि अळंकारु। तैसा मज एकाचा विस्तारु। तें हें जग ॥ ज्ञानेश्वरी ९-६५.

# प्रकरण ७ वें.

## योगवासिष्ठाचा उपक्रम व उपसंहार.

ब्रह्मचर्याश्रमांतील अध्ययन संपवून रामचंद्र घरीं परत आल्यावर त्यानें ते दिवस मोठ्या आनंदानें घालविले. राजा दशरथ पृथ्वीचें परिपालन करीत असतां प्रजेला कोणत्याहि तऱ्हेची पीडा किंवा दुःख माहीत नव्हतें. अशा तऱ्हेनें पूर्ण आनंदांत काळ जात असतां तीर्थे आणि पुण्याश्रम यांचें दर्शन घ्यावें, असें मनांत येऊन रामचंद्राचें मन त्याविषयीं अत्यंत उत्कंठित झालें व दशरथ राजाकडे येऊन रामचंद्र मोठ्या विनयानें म्हणाला "बाबा! पुण्यतीर्थे व पवित्र क्षेत्रें यांचें दर्शन घ्यावें, अशी माझ्या मनांत उत्कट इच्छा झाली आहे. तरी ही माझी एवढी इच्छा आपण परिपूर्ण करावी, अशी माझी आपणांस प्रार्थना आहे. आपण माझ्या ह्या पहिल्याच प्रार्थनेचा अव्हेर करणार नाहीं, अशी माझी खात्री आहे." रामाची ही प्रार्थना ऐकून वसिष्ठांचा विचार घेऊन दशरथ राजानें रामाचा मनोभंग होऊं नये म्हणून त्याला जाण्याची अनुज्ञा दिली. नंतर सर्वांना विचारून आपल्याबरोबर कांहीं निवडक लोक घेऊन, रामचंद्रानें शेकडों प्रदेशांचें निरीक्षण करीत अनेक अरण्यांतून प्रवास केला. वाटेंत पुण्यकारक नद्यांचीं तीरें, पवित्र क्षेत्रें, अरण्यें, समुद्र आणि पर्वत यांचे तट वगैरे स्थानीं स्नान, दान, तप आणि ध्यान वगैरे पुण्यकारक क्रिया करीत चारी दिशांच्या तीर्थयात्रा रामचंद्रानें संपविल्या व आपल्या राजधानींत परत आला. दशरथ राजा राज्य करीत असतां राम, लक्ष्मण व शत्रुघ्न ह्यांचे अशा रीतीनें सोळावें वर्ष संपण्याची वेळ आली होती. भरत मात्र पूर्वीपासूनच आपल्या आजोळीं आनंदानें रहात होता. आपले मुलगे आतां विवाहाला योग्य झाले आहेत असें पाहून दशरथ राजा आपल्या मंत्र्याबरोबर त्यांच्या विवाहाविषयीं विचारविनिमय करूं लागला. याच अवधींत तीर्थयात्रा आटोपून रामचंद्र परत आलेला होता व आपल्या राजमंदिरांत रहात असतांहि दिवसानुदिवस कृश होत चालला व त्याचें मन अत्यंत उद्विग्न

झालें; त्याच्या मुखावरील तेज कमी होऊन तें पांढरें फिक्कट दिसूं लागलें; तो पद्मासन घालून आपला हात गालावर ठेवून अहोरात्र एकांतांत चिंतन करीत राहिला. ' संसार असार आहे ' असें वाटून त्याला त्याच्याबद्दल अनास्था वाटूं लागली. अशा स्थितींत एकदां विश्वामित्र मुनि दशरथ राजाच्याकडे आले. राजानें त्या मुनीची अर्घ्यराद्यादि द्रव्यांनीं यथाशास्त्र पूजा केली व मोठ्या विनयानें सांगितलें कीं, "मुने ! जो हेतु धारण करून किंवा ज्या कार्यासाठीं आपण येथपर्यंत आलां आहांत, तें आपलें कार्य झालेलेंच आहे असें खुशाल समजा. कारण कोणालाहि अशक्य वाटणारी गोष्ट करण्यास मी आपल्याकरितां तयार आहें". असें ऐकल्यानंतर विश्वामित्र मुनींनीं राक्षसांकडून आपल्या यज्ञामध्यें होणाऱ्या विघ्नांचा वृत्तांत सांगितला. विघ्न करणाऱ्या राक्षसांचा पराभव करून आपल्या यज्ञयागादिकांचें रक्षण करण्यासाठीं रामचंद्राला आपल्याबरोबर पाठवावें, अशी त्यांनीं दशरथ राजाची प्रार्थना केली. त्यावर पुत्रप्रेमानें मोहित झालेल्या दशरथानें रामाचें बालवय, त्याची युद्धानभिज्ञता, राक्षसांचें अचाट सामर्थ्य आणि युद्धकौटिल्य वगैरे अनेक कारणें सांगून रामाला विश्वामित्राबरोबर न पाठविण्याचा आपला मनोरथ व्यक्त केला. त्यामुळें क्रुद्ध झालेला विश्वामित्र संतापाच्या भरांत राजा दशरथाला वाटेल तसें टाकून बोलला आणि तेथून निघून जाण्याच्या बेतांत होता. इतक्यांत विश्वामित्राला इच्छित दानाचें आपलें वचन पाळण्याविषयीं वसिष्ठ मुनींनीं दशरथाला उपदेश केला. पुढें दशरथ राजानें रामाला सभेंत बोलावून आणलें व राम आपल्या बंधूंच्या सहवर्तमान दशरथराजाच्या सभास्थानीं येऊन दाखल झाला. रामानें दुरून पाहिलें तों राजसमुदायामध्यें विराजमान झालेला राजा दशरथ त्याच्या दृष्टीस पडला. वसिष्ठ विश्वामित्र मुनी दशरथराजाच्या दोन्ही बाजूस दिव्य आसनावर विराजमान झालेले असून सर्व मंत्रिमंडळ राजाच्या भोंवतीं बसलेलें होतें. सभेच्या एका बाजूला सर्व स्त्रिया बसलेल्या होत्या; दुसऱ्या बाजूला सर्व पुरुष बसलेले होते.

रामानें सभास्थानीं आल्याबरोबर सर्वांना दुरून नमस्कार केला. नंतर दशरथराजाजवळ येऊन त्याला प्रथम अभिवादन केलें. तदनंतर वसिष्ठ, विश्वामित्र मुनींना त्यानें वंदन केलें. वसिष्ठ, विश्वामित्र मुनींनीं रामाला

आशिर्वाद दिल्यानंतर राजा दशरथ रामाला म्हणाला, " रामा ! ये, माझ्या अंकावर बैस " असें जो म्हणत आहे तोंच राम भूमिवर पसरलेल्या गालीच्यावरच जाऊन बसला. पुढें राजा दशरथ, वसिष्ठ व विश्वामित्र यांनीं विचारल्यावरून रामानें आपल्या मनाची उद्विग्न स्थिति होण्याचीं कारणें निवेदन केलीं, हें सर्व वर्णन वैराग्यप्रकरण सर्ग १२ ते ३१ मध्यें सविस्तर आलेलें आहे. शेवटीं याच प्रकरणाच्या ३१ व्या सर्गामध्यें रामानें असें स्पष्ट विचारलें कीं:—

व्यवहारवतो युक्त्या दुःखं नायाति मे यथा ॥
अथवा व्यवहारस्य ब्रूत तां युक्तिमुत्तमाम् ॥ २-३१-१७
तत्कथं केन वा किं वा कृतमुत्तमचेतसा ॥
पूर्वं येनेति विश्रामं परमं पावनं मनः ॥ २-३१-१८
यथा जानासि भगवंस्तथा मोहनिवृत्तये ॥
ब्रूहि मे साधवो येन नूनं निर्दुःखतां गताः ॥ २-३१-१९

या श्लोकांचा भावार्थः—

" व्यवहार करीत असतां ज्याच्या योगानें दुःख होणार नाहीं, अशी युक्ति मला सांगा. तसेंच पूर्वी या युक्तीचा कोणत्या महात्म्यांनीं उपयोग केला आहे, त्यामुळें त्यांचें चित्त शांत आणि पवित्र झालें आहे तेंहि मला सांगा. हे भगवन् ! मोहनिवृत्ति होऊन ज्याच्या योगानें सत्पुरुष दुःखरहित स्थितीप्रत जाऊन पोहोंचतात, असा उपाय मला कथन करा.

हें सर्व वर्णन वाचल्यावर किंवा ऐकल्यावर रामाला किती उच्च दर्जाचें विवेकयुक्त वैराग्य झालें होतें आणि त्याला दुःख निवारणाकरितां किती उत्कंठा लागली होती, याची कल्पना येईल. वसिष्ठांनीं या रामाच्या वैराग्याची प्रशंसा मुमुक्षु प्र. सर्ग ११ मध्यें केलेली आहे. स्मशान, आपत्ति, दैन्य व बीभत्सपणा इत्यादि निमित्तानें उत्पन्न झालेलें वैराग्य राजस होय व असलें वैराग्य खरें नव्हे. कारण त्याचें निमित्त संपल्यावर तें वैराग्यहि नाहींसें होतें. पण वरील कोणत्याहि निमित्तानें झालेलें नसून जें केवळ विवेकाच्या जोरावर निर्माण झालेलें असतें, तेंच सात्त्विक वैराग्य होय. अशा तऱ्हेच्या वैराग्य वृक्षालाच आत्मज्ञानाचें गोड फळ लागतें. असेंच



रामचंद्र राजसभेमध्यें आल्यावर दशरथ राजा त्याला म्हणालाः— " रामा ! ये, माझ्या अंकावर बैस. " असें जो राजा म्हणत आहे तोंच राम भूमीवर पसरलेल्या गालीच्यावर जाऊन बसला.

( पृष्ठ ३८ )

वैराग्य रामाच्या ठिकाणीं उत्पन्न झालें होतें. वसिष्ठांनीं मुमुक्षु प्र. सर्ग ११ मध्यें अशा तऱ्हेची कबुली दिली आहे. रामाचें दुःख नाहींसें करण्यासाठीं आत्मज्ञानाशिवाय दुसरा उपाय नाहीं, असें आपल्या मनाशीं ठरवून वसिष्ठांनीं कल्पाच्या आरंभीं भगवान् ब्रह्मदेवानें सांगितलेलें आत्मज्ञान रामाला सांगितलें. असा एकंदर योगवासिष्ठाचा उपक्रम आहे.

## उपसंहार.

निर्वाण प्र० सर्ग १२७ मध्यें वसिष्ठांचा उपदेश ऐकतां ऐकतां रामाला ज्ञान होऊन त्याची समाधि लागली. तेव्हां वसिष्ठांनीं त्याला समाधींतून जागृत केलें व सांगितलें कीं, " हा तुझा विश्रांतीचा काल नाहीं. तुला जरी आनंद झालेला असला तरी यापुढें तूं लोकांना आनंद देणारा हो. जोंपर्यंत आपल्या अधिकारानुरूप प्राप्त झालेलें आपलें कर्तव्य कर्म पूर्ण झालें नाहीं, तोंपर्यंत समाधि लावून बसणें योग्य नाहीं. म्हणून कांहीं काल राज्य-वैभवाचा अनुभव घेऊन नंतर समाधीचें सेवन कर व सुखी हो. " ही वसिष्ठांची आज्ञा रामानें शिरसामान्य केली. रामचंद्रानें जीवन्मुक्त झाल्यावर ज्ञानाच्या पुढील भूमिकांवर म्हणजे पांचवी, सहावी व सातवी या भूमिकांवर कशातऱ्हेनें आरूढ होत जावें व वसिष्ठांच्यासारखे पूर्ण ब्रह्मनिष्ठ कसें व्हावें, याकरितांच निर्वाण प्र० उत्तरार्धांमध्यें वसिष्ठांनीं रामाला उच्च दर्जाचें तत्त्वज्ञान सांगितलें व शेवटीं म्हणजे निर्वाण प्र. उत्तरार्ध सर्ग २१३ मध्यें वसिष्ठांनीं आपल्या समग्र उपदेशाचा उपसंहार पुढील श्लोकांत केला आहेः—

ज्ञानं सदेतदखिलं श्रुतमुत्तमं चित्संसारदीर्घरजनी
सितरश्मिबिंबम् ॥
जातस्त्वमभ्युदयवानमलैकबोध उत्सार्यमोहमनुतिष्ठ
यथागतं त्वम् ॥ ४९ ॥
तिष्ठंस्तदात्मनि परे विमलस्वभावे सर्वात्मके
तपति सर्वपदार्थमुक्तः ॥
निर्वाणशांतमतिरंबरकोशकांतो
धर्मेण राज्यमनुपालय तीर्णतृष्णः ॥ ५० ॥

या श्लोकांचा जरुर तेवढा भावार्थ असा आहेः—" हे रामा ! मी उपदेशिलेलें परमात्मस्वरूपाचें समग्र ज्ञान तूं ऐकलें आहेस. त्यामुळें तूं मोह व अज्ञान यांना घालवून शुद्ध ब्रह्मरूप झाला आहेस. यास्तव तृष्णारहित होऊन तूं वंशपरंपराप्राप्त स्वराज्याचें धर्मानें परिपालन कर. "

असें वसिष्ठांचें बोलणें ऐकून त्याप्रमाणें रामानें शेवटीं वागण्याचें खालील श्लोकांत कबूल केलें आहे.

नष्टो मोहः पदं प्राप्तं त्वत्प्रसादान्मुनीश्वर ॥
संपन्नोऽहमहं सत्यमत्यंतमवदातधीः ॥ नि. प्र. उ. २१४-१४
स्तितोऽस्मि गतसंदेहः स्वभावे ब्रह्मरूपिणि ॥
निरावरणविज्ञानः करिष्ये वचनं तव ॥ नि. प्र उ. २१४-१५
नैवमेऽयकृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥
यथास्थितोऽस्मि तिष्ठामि तथैव विगतज्वरः ॥नि.प्र.उ.२१४-१७

या श्लोकांचा भावार्थ असा आहेः—" हे मुनीश्वरा ! माझा मोह नष्ट झाला, आपल्या प्रसादानें मी परमपदाला प्राप्त झालों. मी सत्य ब्रह्मरूप झालों. माझी बुद्धि शुद्ध झाली; माझे सर्व संशय नाहींसे होऊन मी आपल्या ब्रह्मस्वरूपांत स्थित झालों आहे माझें विज्ञान आवरणशून्य झालें आहे मी आतां आपल्या उपदेशाप्रमाणें वागण्यास तयार आहें. आतां कांहीं कर्म केल्यानें मला मोठा लाभ होणार आहे असें नाहीं व कांहीं न केल्यानें माझी कांहीं हानि होणार आहे असेंहि नाहीं. मी जसा पूर्वी व्यवहार करीत होतो, तसा यापुढेंहि करीत राहीन. पण पूर्वीसारखा संतप्त होणार नाहीं."

कोणत्याहि अध्यात्म ग्रंथामध्यें उपदेशाला वैराग्याचें कांहींतरी कारण घडून आल्याचें वर्णन असावें व नंतर उपदेशकाकडून आत्मज्ञानाचा उपदेश केला जावा अशी पद्धति आहे. त्याप्रमाणें यात्रेच्या निमित्तानें श्रीरामचंद्राच्या मनांत विषय असार आहेत, अशा तऱ्हेचें वैराग्य उत्पन्न होऊन पुढें श्रीवसिष्ठांनीं ज्ञानोपदेश केला आहे, असें एकंदर वर्णन आहे. वसिष्ठांच्या उपदेशावरून रामाला ज्ञानविज्ञान झाल्यावर जीवन्मुक्त अवस्था प्राप्त झाली व त्या अवस्थेमध्यें म्हणजे ज्ञानोत्तर वसिष्ठांच्या उपदेशाप्रमाणें पूर्वीसारखा व्यवहार करीत राहीन व राज्य करून सर्व राजवैभवाचा

अनासक्त बुद्धीनें उपभोग घेईन अशी रामानें वसिष्ठांना कबुली दिली आहे व प्रत्यक्ष आपल्या पुढील चरित्रांत रामचंद्र आपलीं सर्व कर्में अनासक्त बुद्धीनेंच करीत राहिला आहे, असें पूर्वरामायणांतील त्याच्या चरित्रावरून दिसून येतें. रावणादिकांच्या वधानें सर्व स्त्रीसंगी पुरुषांना भूलोकीं अस्वास्थ्य, शोक व शेवटीं नाश प्राप्त होतो, हें रामानें सर्व जगाच्या निदर्शनाला आणून दिलें. अग्निप्रवेशानें सीतेची शुद्धि करणाऱ्या व पुढें अयोध्येंत गेल्यावर एका यःकश्चित् परटानें केलेली निंदा कानावर आली असतां सीतेचा प्रत्यक्ष त्याग करणाऱ्या रामचंद्रानें आपल्याला लोकांच्या संतोषाचें किती महत्त्व वाटतें, शिष्टजनांना आपलें आचरण मान्य व्हावें अशी आपली किती उत्कंठा आहे हें व्यक्त केलें. तो स्वतः जीवन्मुक्त व निस्पृह असूनहि कर्माधिकारी लोकांना कर्मानुष्ठानानेंच उचित फल मिळतें, तें आपल्या प्रत्यक्ष यज्ञयागादि कर्मांच्या अनुष्ठानानें दाखवून दिलें.

उपशम प्र० सर्ग ३९ मध्यें भगवान् श्रीविष्णूनें प्रल्हादाला सांगितलें कीं "बा प्रल्हादा! तूंहि सर्व प्रारब्धाचा क्षय होईपर्यंत वासनारहित बुद्धीनें झोपेंतून अर्धवट जागा झालेल्या मनुष्याप्रमाणें व्यवहार कर आणि राज्यावर बसून प्रजा परिपालन कर."

यावरून ज्ञानी पुरुषाला स्वतःच्या कारितां जरी कांहीं कर्तव्य उरलेलें नसलें, तरी त्याला लोकांच्या करतां कर्माचें आचरण करावें लागतें, असें दिसून येतें; व हेंच तत्त्व राजा जनक, राजा भगीरथ व राजा शिखिध्वज इत्यादिकांच्या वासिष्ठांतील आख्यानावरून सिद्ध झालें आहे. 'ज्ञानोत्तर कर्मयोग कां कर्मत्याग' यापुढें आलेल्या ४४ व्या प्रकरणांत या गोष्टीचा सविस्तर विचार करण्यांत आला आहे.

# प्रकरण ८ वें.

## योगवासिष्ठाचा प्रतिपाद्य विषय.

ग्रंथ तात्पर्य निर्णयासंबंधानें मीमांसकांनीं आपलें म्हणणें खालील श्लोकांत मांडलें आहे:—

उपक्रमोपसंहारौ अभ्यासोऽपूर्वताफलम् ।
अर्थवादोपपत्ती च लिंगं तात्पर्यनिर्णये ॥

या श्लोकांत सांगितलेल्या **सहा गोष्टी** ग्रंथ तात्पर्य निर्णयाच्या बाबतींत साधन म्हणून मीमांसकांनीं मानल्या आहेत. त्या सहा गोष्टींचा विचार अवश्य केला पाहिजे. यांपैकीं 'उपक्रम उपसंहार' म्हणजे ग्रंथाचा आरंभ आणि शेवट या पहिल्या गोष्टीचा विचार मागील सातव्या प्रकरणांत केला आहे. त्यावरून या ग्रंथाचा विषय ज्ञानच असला पाहिजे, हें दाखविलें आहे. **दुसरी गोष्ट** म्हणजे 'अभ्यास' म्हणजे पुनरुक्ति म्हणजेच वारंवार काय सांगितलें आहे तें पहाणें. कारण ग्रंथकाराच्या मनांत जी गोष्ट सिद्ध करावयाची असते, तिच्या समर्थनार्थ तो अनेक वेळीं अनेक कारणें दाखवून प्रत्येक वेळीं 'हेंच तें आहे' अशी एकच गोष्ट सिद्ध करीत असतो. मोक्ष ज्ञानानेंच प्राप्त होतो, असें निरनिराळ्या ठिकाणीं दर्शविलें आहे. त्यांपैकीं कांहीं वचनें याच प्रकरणांत पुढें दिलीं आहेत. ग्रंथ तात्पर्य काढण्याचीं ( **तीन व चार** ) ही **साधनें** म्हणजे 'अपूर्वता' आणि 'फल' हीं होत. ह्या ग्रंथांत 'जीवन्मुक्ति' ही अपूर्व गोष्ट सांगितली आहे; व तेंच प्रत्येक मुमुक्षूचें ध्येय असून तें त्यानें आपल्या अभ्यासाचें किंवा पौरुष प्रयत्नाचें 'फल' म्हणून मिळवावयाचें आहे, असें दिसतें. जीवन्मुक्ति ही ज्ञानाशिवाय प्राप्त होत नाहीं, असा अध्यात्मशास्त्राचा सिद्धांत असल्यामुळें या ग्रंथाचें ध्येय जर जीवन्मुक्ति आहे, तर विषयहि ज्ञानच असला पाहिजे, असें ओघानेंच प्राप्त होतें. **पांचवें साधन "अर्थवाद."** ग्रंथकार आपल्या ग्रंथाची प्रशंसा करण्याकरितां जीं वर्णनें करीत

असतो त्यास मीमांसक अर्थवाद असें म्हणतात. अशा तऱ्हेचीं वर्णनें वासिष्ठांत पुष्कळ ठिकाणीं आलीं आहेत. त्यांपैकीं थोडीशीं 'योगवासिष्ठाची योग्यता' या चवथ्या प्रकरणांत दाखविलीं आहेत. हीं वर्णनें केवळ अर्थवाद म्हणून सोडून दिलीं, तरी या ग्रंथांतील इतर साधकबाधक प्रमाणावरून याचा प्रतिपाद्य विषय ज्ञानच ठरतो. आतां **सहावें साधन** 'उपपादन.' एखादी गोष्ट सिद्ध करून दाखविण्यासाठीं बाधक प्रमाणांचा त्याग करून साधक प्रमाणांची तर्कशास्त्रानुसार जी व्यवस्थित मांडणी करितात, तिला उपपत्ति किंवा उपपादन म्हणतात. हीच पद्धति, या ग्रंथाचा विषय आत्मज्ञानच आहे, हें सिद्ध करण्याकरितां स्वीकारली आहे. ही तात्पर्य निर्णयाची पद्धति लक्षांत ठेवून या ग्रंथाचा प्रतिपाद्य विषय आत्मज्ञानच कसा आहे, याचा विचार करूं.

## आत्मज्ञान हाच या ग्रंथाचा विषय.

या ग्रंथाच्या आरंभीं केवळ कर्मानें किंवा केवळ ज्ञानानें किंवा कर्म आणि ज्ञान यांच्या समुच्चयानें मोक्ष प्राप्त होतो असा प्रश्न निर्माण करून हारीत स्मृतींतील पक्ष्याच्या पंखांचा दृष्टांत घेऊन पुढील श्लोकांत त्याचें उत्तर दिलें आहे:—

> उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथा खे पक्षिणां गतिः ॥
> तथैव ज्ञानकर्मभ्यां जायते परमं पदम् ॥ १-१-७
> केवलात्कर्मणो ज्ञानान्नहि मोक्षोऽभिजायते ॥
> किन्तूभाभ्यां भवेन्मोक्षः साधनं तूभयं विदुः ॥ १-१-८

"आकाशांत उडण्याकरितां पक्ष्याला त्याच्या दोन्ही पंखांची जरूरी असते, तसें कर्म व ज्ञान हीं मोक्षप्राप्तीचीं साधनें आहेत. केवळ कर्मानें किंवा केवळ ज्ञानानें मोक्ष साध्य होत नाहीं."

या विधानावरून ज्ञानकर्मसमुच्चय पक्ष योगवासिष्ठाला मान्य आहे असें दिसतें. पण वरील दृष्टांत यौगपद्यानें ( म्हणजे एकदम ) न घेतां केवळ कर्म व ज्ञान या दोहोंची क्रमानें आवश्यकता आहे, या अंशीच फक्त घेतला पाहिजे, कारण दृष्टांत नेहमीं एकदेशीयच असतात, हें तत्त्व

" योगवासिष्ठांतील दृष्टांत व उपमा ' या सहाव्या प्रकरणांत दाखविलें आहे. " ज्ञानादेव तु कैवल्यम् " ज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो, असा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे. पण तें ज्ञान होण्याकरितां अज्ञानाची निवृत्ति झाली पाहिजे. ज्याप्रमाणें आरशांत प्रतिबिंब दिसण्याकरितां आरशावरील धूळ पुसून टाकणें व त्यावर प्रकाश पाडणें या दोन्ही गोष्टींची आवश्यकता आहे, त्याप्रमाणें निष्काम स्वकर्माच्या आचरणानें संपादन केलेली चित्तशुद्धि व शास्त्रीय प्रमाणांनीं झालेलें ज्ञान या दोन्हीं गोष्टीः मोक्ष प्राप्तीच्या बाबतींत आवश्यक आहेत; कारण अशुद्धांतःकरण असलेल्या मनुष्यानें शेकडों वेळा जरी अध्यात्मशास्त्र श्रवण केलें तरी त्याला आत्मसाक्षात्काररूपी फळ मिळत नाहीं. म्हणूनच ' चित्तस्य शुद्धये कर्म न तु आत्मोपलब्धये ' चित्ताच्या शुद्धीकरतांच कर्माचें आचरण, आत्म्याच्या प्राप्तीकरतां नव्हे, या श्रीमदाचार्यांच्या सिद्धांताप्रमाणें वसिष्ठांनाहि ज्ञानकर्मसमुच्चय मुळींच मान्य नाहीं. आजन्म केवळ कर्माचें आचरण करीत राहिल्यानें मोक्ष मिळत नाहीं, किंवा अंतःकरणाला निर्मळ न करतां केवळ अध्यात्मशास्त्राचा अभ्यास करून संपादन केलेल्या नुसत्या शाब्दिक ज्ञानानेंहि मोक्ष मिळत नाहीं, तर अंतःकरण निर्मळ केल्यावर ज्ञानाचा अभ्यास केला असतां मोक्ष मिळतो, हें दाखविण्याकरितांच वर वर्णन केलें आहे व पुढें हाच अर्थ सविस्तर सिद्ध करून दाखविण्याकरितां सर्व योगवासिष्ठ ग्रंथ सांगितला आहे. म्हणून या वासिष्ठांत ज्या ज्या ठिकाणीं " आत्मप्राप्ति ज्ञानानें कां कर्मानें " असा प्रश्न उत्पन्न झाला त्या त्या ठिकाणीं 'आत्मप्राप्ति ज्ञानानेंच होते, कर्मानें नव्हे', अशीं स्पष्ट विधानें केलीं आहेत. त्यापैकीं उदाहरणादाखल म्हणून कांहीं वचनें खालीं दिलीं आहेतः—

मुमुक्षु व्यवहार प्रकरण सर्ग १० मध्यें

निर्वाणं नाम परमं सुखं येन पुनर्जनः ॥
न जायते न म्रियते तज्ज्ञानादेवलभ्यते ॥ २१ ॥
संसारोत्तरणे जन्तोरुपायो ज्ञानमेवहि ॥
तपोदानं तथा तीर्थमनुपायाः प्रकीर्तिताः ॥ २२ ॥

जन्ममृत्यूचें भय ज्या ठिकाणीं रहात नाहीं, असें निर्वाण सुख ज्ञानानेंच प्राप्त होतें. संसारांतून तरून जाण्याला ज्ञान हाच एक उपाय आहे. तें काम, तप, दान, तीर्थें यांच्या योगानें होत नाहीं.

उत्पत्ति प्रकरण सर्ग ६ मध्यें

अस्य देवाधिदेवस्य परस्य परमात्मनः ॥
ज्ञानादेव परासिद्धिर्न त्वनुष्ठानदुःखतः ॥ १ ॥
किंचिन्नोपकरोत्यत्र तपोदानव्रतादिकम् ॥
स्वभावमात्रे विश्रांतिमृते नात्रास्ति साधनम् ॥ ४
साधुसंगमसच्छास्त्रपरतैवात्र कारणम् ॥
साधनं बाधनं मोहजालस्य यदकृत्रिमम् ॥ ५ ॥

सर्व देवांचा जो देव असा हा परमात्मा त्याची प्राप्ति ज्ञानानेंच होतें-जपतपादि क्लेशदायक साधनें करून त्याची प्राप्ति होत नाहीं. ज्ञान हें त्याच्या प्राप्तीचें एकच साधन आहे. दुसरें कोणतेंहि या बाबतींत उपयोगी पडत नाहीं. ब्रह्मज्ञान होण्याला साधुसंगति व सच्छास्त्राचा अभ्यास हाच खरा उपाय आहे. जगद्रूपी मोहजालांचा निरास करण्याविषयीं आत्मज्ञानाशिवाय दुसरा कोणताच उपाय उपलब्ध नाहीं.

उपशम प्रकरण सर्ग ८८ मध्यें

ज्ञानमासादय परं ज्ञानान्मुक्तिर्हि लभ्यते ॥ ५-८८-११-२
ज्ञानान्निर्दुःखतामेति ज्ञानादज्ञानसंक्षयः ॥
ज्ञानादेव परासिद्धिर्नान्यस्माद्राम वस्तुतः ॥ ५-८८-१२

" हें श्रेष्ठ ज्ञान संपादन कर; कारण ज्ञानानेंच मुक्ति मिळते. ज्ञानानेंच मनुष्याचें दुःख नाहींसें होतें. ज्ञानानेंच त्याच्या अज्ञानाचा सर्वथा क्षय होतो व ज्ञानानेंच त्याला परासिद्धि मिळते.

निर्वाण प्रकरण पूर्वार्ध सर्ग ८७ मध्यें चूडालेच्या आख्यानांत कुंभरूपी

चूडालेनें ' क्रिया व ज्ञान यांमध्यें श्रेयस्कर कोणतें ' असा ब्रह्मदेवाला प्रश्न विचारला असतां ब्रह्मदेवानें सांगितलें कीं,

ज्ञानमेव परं श्रेयः कैवल्यं तेन वेत्यलम् ॥
कालतिवाहनायैव विनोदायोदिता क्रिया ॥ १६ ॥

' ज्ञान हेंच परमश्रेष्ठ आहे. ज्ञानानेंच पुरुष मोक्षाला जाणतो. क्रिया-कर्में केवळ आयुष्याचा काळ घालविण्याकरितां व स्वर्गादिभोगप्राप्ती-विषयीं केवळ चित्ताची करमणूक करण्यासाठींच प्रवृत्त झालीं आहेत.' याच्याच पुढें कर्मांचा उपयोग सांगतांना ब्रह्मदेवानें असें सांगितलें कीं,

अलब्धज्ञानदृष्टीनां क्रिया पुत्र परायणम् ॥
यस्यनास्त्यंबरं पट्टं कंबलं किं त्यजत्यसौ ॥ १७ ॥

" ज्यांना ज्ञानदृष्टि प्राप्त झालेली नाहीं, त्यांना क्रिया हेंच परमसाधन आहे. (कारण तें स्वाभाविक दुराचरणाची व्यावृत्ति करतें). ज्याच्या जवळ उंची वस्त्र नाहीं तो कांबळें टाकतो कीं काय ? " याचा अर्थ असा नव्हे कीं नेहमीं कांबळें पांघरूनच समाधान मानावयाचें. भरजरीच्या शाले-सारखीं उंची वस्त्रें मिळविण्याची खटपट कधींच करावयाची नाहीं. तसें नेहमीं जन्मभर कर्मेंच करीत बसावयाचें नसून अधिकार प्राप्त झाला कीं, आत्मज्ञान संपादन केलेंच पाहिजे. कारण आत्मज्ञानानेंच मोक्ष मिळतो. यावरील सर्व विधानांवरून योगवासिष्ठाचा प्रतिपाद्य विषय आत्मज्ञानच आहे यांत शंका नाहीं.



# प्रकरण ९ वें.

## योगवासिष्ठांतील ज्ञानावताराचा इतिहास.

मुमुक्षु व्यवहार प्रकरण सर्ग १० मध्यें ज्ञानावताराचा इतिहास सांगितला आहे. अगदीं प्रथम ब्रह्मदेवानें सृष्टि केली, तेव्हां त्यानें जंबुद्वीपाच्या एका कोपऱ्यामध्यें असलेल्या भरतखंडांत मनुष्यांची उत्पत्ति केली. हीं मनुष्यें संसार दुःखांनीं पछाडलेलीं पाहून ब्रह्मदेवाला करुणा आली व त्यांचीं दुःखें नाहींशीं व्हावींत म्हणून तप, धर्म, दान, सत्य, तीर्थें यांची त्यानें स्वतः उत्पत्ति केली, परंतु तेवढयानें जीवांचें दुःख नाहींसें होणार नाहीं, असें जाणून निर्वाणात्मक परमसुख जगापुढें आणलें. हें सुख केवळ ज्ञानानेंच प्राप्त होतें. म्हणून संसारांतून मुक्त होण्याला ज्ञान हाच एक उपाय आहे. असें ठरवून, ब्रह्मदेवानें आपल्या मनापासून वसिष्ठाला उत्पन्न केलें. उत्पन्न झाल्यानंतर कमंडलु आणि रुद्राक्षमाला धारण करणाऱ्या वसिष्ठानें ब्रह्मदेवाला नमस्कार केला व त्याच्यासमोर उभा राहिला.

### ब्रह्मदेवाचा वसिष्ठाला शाप.

ब्रह्मदेव म्हणाले 'हे वसिष्ठा ! इकडे ये, माझ्यासमोर बैस, किंचित् काल तुझ्या चित्तामध्यें अज्ञानाचा प्रवेश होवो.' असा शाप दिल्यानंतर वसिष्ठाच्या ठिकाणीं आत्मविस्मृति झाली; व 'हा कष्टमय संसार कसा उत्पन्न झाला' असा विचार मनांत येऊन वसिष्ठ अत्यंत दीन दुबळा आणि दुःखी कष्टी झाला. ती त्याची स्थिति पाहून ब्रह्मदेवानें वसिष्ठाला अत्यंत निर्मल असा तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. वसिष्ठ आतां पूर्णज्ञानी झाला आहे. असें पाहून ब्रह्मदेव त्याला म्हणाले 'हे वसिष्ठा ! शापाच्या योगानें मी तुझ्या ठिकाणीं अज्ञान उत्पन्न केलें व तें नाहींसें करण्याकरितां तुला ज्ञान दिलें. परमबोधाचा उदय तुझ्या ठिकाणीं झालेला असल्यामुळें तूं आतां पृथ्वीवर संचार करीत रहा व जंबुद्वीपांतील भरतखंडांत रहाणाऱ्या लोकांवर अनुग्रह कर. त्या ठिकाणीं जे लोक कर्माचे अधिकारी असतील, त्यांना कर्मकांडाचा

उपदेश करून क्रमाक्रमानें ज्ञानाचा बोध करून दे; व जे बुद्धिमान्, विचारी आणि विरक्त असतील, त्यांना एकदम ज्ञानाचा उपदेश कर." याप्रमाणें वसिष्ठाला ज्ञान देऊन सर्व लोकांचें अज्ञान दूर करण्याकरितां भूतलावर पाठविलें. आतां वसिष्ठ हे जन्मतःच ज्ञानी असतांना त्यांना मुद्दाम शापानें अज्ञानी बनवून ज्ञानाच्या उपदेशानें पुनः ज्ञानी बनविलें याचा हेतु काय? असा सहाजिकच प्रश्न निर्माण होतो. पण याचें समाधान असें कीं, वाईट गोष्टीचा थोडा तरी अनुभव आल्याशिवाय चांगल्यागोष्टीचें महत्व कळत नाहीं. जसें दारिद्र्याच्या अनुभवाशिवाय श्रीमंतीची किंमत कळत नाहीं, त्याप्रमाणें अज्ञानाचा अनुभव आल्याशिवाय ज्ञानाचें महत्त्व ध्यानांत येणार नाहीं. शिवाय वसिष्ठाला अज्ञानी बनविल्याशिवाय आपल्या जवळच्या ज्ञानाचा उपदेश त्याला करतां येणार नाहीं. कारण ज्ञानी हा उपदेशाचा विषय होत नसतो. या दृष्टीनें ब्रह्मदेवानें वसिष्ठांना मुद्दाम शाप देऊन अज्ञानी बनविलें असें दिसून येतें. याप्रमाणें वसिष्ठांना ज्ञान देऊन सर्व लोकांचें अज्ञान दूर करण्याकरितां भूतलावर पाठविलें. त्याचप्रमाणें सनत्कुमार, नारद वगैरे, महर्षींनाहि लोकांना संसार सागरांतून बाहेर काढण्यासाठीं ब्रह्मदेवानें भूतलावर पाठविलें; व त्यांना कर्मकांड व ज्ञानकांड यांचा प्रचार करण्याची आज्ञा केली.

## राजविद्या.

कृतयुग संपल्यावर पृथ्वीवरील पुण्य कारक क्रिया हळु हळु नाहींशा झाल्या. अशा वेळीं निरनिराळ्या महर्षींनीं या जगांत वैदिक क्रियाकर्मांची मर्यादा चालून देण्याकरितां निरनिराळ्या स्मृती निर्माण केल्या. पुढें कालचक्र फिरतां फिरतां वैदिक क्रियाकर्माचा बहुतेक लोप झाला व लोक विषयोपभोगामध्ये गढून गेले. राजाराजांमध्यें निरनिराळे प्रदेश जिंकून घेण्याची महत्वाकांक्षा उत्पन्न होऊन युद्धें सुरू झालीं व जिंकल्या गेलेल्या प्रदेशांतील लोकांचे हाल होऊं लागले. युद्ध केल्याशिवाय राजांना पृथ्वीचें पालन करितां येईनासें झालें. प्रजेबरोबर राजेहि दीन दुबळे झाले. हें दैन्य नाहींसें करण्याकरितां आत्मज्ञानाशिवाय दुसरा रामबाण उपाय नाहीं, हें लक्षांत घेऊन त्या आत्मज्ञानाचा प्रचार करण्याकरितां वसिष्ठासारख्या अनेक ऋषींनीं क्षत्रिय राजांना

या ज्ञानाचा उपदेश केला. म्हणून या विद्येला 'राजविद्या' असें म्हणण्यांत येऊं लागलें, असें मुमुक्षु प्र. सर्ग ११ मध्यें पुढील श्लोकांत सांगितलें आहे:—

अध्यात्मविद्या तेनेयं पूर्वराजसु वर्णिता ॥
तदनुप्रसृता लोके राजविद्येत्युदाहृता ॥ १७ ॥
राजविद्या राजगुह्यमध्यात्मज्ञानमुत्तमम् ॥*
ज्ञात्वा राघव राजानः परां निर्दुःखतां गताः ॥ १८ ॥

"लुप्तप्राय झालेली अध्यात्मविद्या वसिष्ठांसारख्या ऋषींनीं क्षत्रिय राजांना शिकविली व त्यानंतर तिचा लोकांत प्रसार झाला, म्हणून तिला राजविद्या असें म्हटलें आहे. ही राजविद्या, हें अत्यंत गुह्य अध्यात्मज्ञान राजांच्या हस्तगत होऊन त्यांचें दुःख नाहींसें झालें आहे."

पुढें कालांतरानें असले आत्मज्ञानी पुण्यश्लोक राजेहि नाहींसे झाले. पुढें रामचंद्र वैराग्यानें अगदीं दुबळा व हताश झालेला पाहून वसिष्ठांनीं त्याला ब्रह्मदेवांनीं सांगितलेल्या ज्ञानाचा उपदेश करून त्याचें दैन्य व दुबळेपणा नाहींसा केला. हें जें रामचंद्राला उपदेशिलेलें ज्ञान तेंच हें योगवासिष्ठ होय.

## ज्ञानोपदेशाचें सत्र.

हें ज्ञानोपदेशाचें सत्र अठरा दिवस सतत चाललें होतें. सकाळीं सूर्योदयापासून वसिष्ठ उपदेशाला प्रारंभ करून मध्यान्ह कालपर्यंत उपदेश करीत असत. मध्यान्हकाल झाला आहे, असें सुचविण्याकरितां शंखांचा गंभीर नाद होऊं लागला कीं, वसिष्ठ आपलें भाषण बंद करीत असत. थोडा वेळानें शंखनादामुळें उत्पन्न झालेला गोंगाट शांत झाल्यावर वसिष्ठ रामाला असें सांगत कीं, "रामा! आतां सांगितलें इतकेंच पुरें; कारण द्विजांचें

* भगवद्गीतेंतहि अध्याय ९ मध्यें

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ॥

या श्लोकार्धांत अशाच तऱ्हेचें वर्णन आलें आहे.

मध्यान्हकालचें नियतीनें प्राप्त झालेलें जें कर्तव्य, तें करण्यासाठीं मला आतां गेलें पाहिजे, तसेंच तूंहि आतां आपलें कर्म करण्यासाठीं आपल्या मंदिरांत जा." असें सांगून वसिष्ठ विश्वामित्रांना घेऊन आपल्या आश्रमांत जात असत. राम, लक्ष्मण व शत्रुघ्न हे वसिष्ठांच्या आश्रमापर्यंत त्यांना पोहोंचविण्याकरितां जात असत व वसिष्ठांनीं परत जाण्याची अनुज्ञा दिली, म्हणजे ते सर्व राजपुत्र वसिष्ठ, विश्वामित्र मुनींना वंदन करून आपआपल्या राजमंदिरांत जात असत. याप्रमाणें दुपारीं थोडावेळ विश्रांति घेतल्यानंतर वसिष्ठ पुनः उपदेशाला सुरवात करून संध्याकाळीं सूर्यास्तावरोबर उपदेश बंद ठेवीत असत; व दुसरे दिवशीं सकाळीं दशरथ राजाच्या भव्य सभागृहामध्यें शिरणाऱ्या सूर्याच्या किरणाबरोबर सर्व लोक जमा होत असत. तदनंतर सर्व मंडळी आली आहेत असें पाहून वसिष्ठ पुनः उपदेशाला सुरवात करीत. असें वाल्मीकि महर्षींनीं वर्णन केलें आहे.

## रामाचें आन्हिक व रात्रिचर्या.

वसिष्ठांच्या आश्रमांतून परत आपल्या मंदिरांत आल्यावर ते सर्वजण आपलीं सर्व कर्में करीत असत व नंतर आपल्या पुष्पशय्येवर पडून रामाशिवाय सर्व गाढ झोपीं जात असत. रामाला मात्र रात्रीं मुळींच झोप येत नसे. त्याच्या मनांत वसिष्ठांचें मधुर आणि गंभीर भाषण एकसारखें घोळत असें व त्याचें मनन करण्यांत संबंध रात्र निघून जात असे.

## प्रातःकाळचें कृत्य.

प्रातःकाळीं मंगलवाद्यांचा घोष होऊं लागतांच राम आपल्या शय्येवरून प्रसन्न मनानें उठून शौचमुखमार्जन करी. नंतर प्रातःस्नान, संध्यावंदन वगैरे द्विजांना उचित असलेलीं सर्व कर्में केल्यानंतर आपल्या लक्ष्मणादि बंधूंना बरोबर घेऊन तो वसिष्ठांच्या आश्रमांत जात असे. तेव्हां वसिष्ठ आपल्या आश्रमांत नित्य नियमाप्रमाणें एकांतांत समाधिस्थितींत बसलेले असत. पुढें सूर्याचा उदय होतांच वसिष्ठांची समाधि उतरत असे व विश्वामित्रासहवर्तमान रामादिकांच्या बरोबर वसिष्ठ, दशरथ राजाच्या सभागृहांत जात असत. वसिष्ठांचा उपदेश आतां सुरु होणार

म्हणून राजसभेमध्यें इतकी शांतता नांदत असे कीं, पिंजऱ्यामध्यें बसलेले झारीत व शुकपक्षी आपला खेळ टाकून देऊन स्वस्थ बसलेले असत. यामुळें त्यांच्या पायांतील घुंगरांचा आवाजहि शांत झालेला असे. राजसभेंतील सर्व स्त्रिया आपले सर्व विलास विसरून भिंतीवरील चित्राप्रमाणें स्वस्थ बसलेल्या असत. सर्व मंडळी आपआपल्या ठराविक स्थानीं जाऊन शांत बसत असत. अशा तऱ्हेनें जिकडे तिकडे पूर्ण शांतता प्रस्थापित झाली असतां राम वसिष्ठांच्या मुखाकडे आपली दृष्टि दृढ़च लावीत असे. असें पाहून सर्व मंडळी आली आहेत किंवा कसें, हें अजमावण्याकरितां एकदां सर्व बाजूला पाहून वसिष्ठ रामाला प्रकृत उपदेशाची आठवण करून देऊन म्हणजे 'हे रामा! मी तुला काल जो विषय सांगितला, तो सर्व तुझ्या लक्षांत आहे ना? आतां याच्यापुढें ऐक.' असें प्रथम सांगून नंतर प्रकृत विषयाचा उपदेश करीत असत.



# प्रकरण १० वें.

## आध्यात्मशास्त्रांतील ज्ञानाचा अधिकारी.

कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, हा योगवासिष्ठ ग्रंथ सिद्धावस्थेचा आहे व गीता व उपनिषदें हे ग्रंथ साधकावस्थेचे आहेत. तेव्हां साधकांना या ग्रंथाचा अभ्यास करून कांहीं फायदा होईलसें वाटत नाहीं. परंतु ही समजूत चुकीची आहे. कारण या ग्रंथाला दिलेल्या 'मोक्षोपायसंहिता' या नांवांतील अर्थावरून म्हणजे मोक्षप्राप्तीचे उपाय सांगणारी ही संहिता आहे व या ग्रंथांत प्रत्यक्ष प्रतिपादिलेल्या मोक्षाच्या अनेक उपयावरून वरील विधान साफ चुकीचें आहे, यांत मुळींच शंका नाहीं. सामान्यतः अज्ञ माणसालाहि या ग्रंथाच्या अभ्यासानें तत्त्वज्ञान प्राप्त होतें, असें वसिष्ठांनीं स्पष्ट सांगितलें आहे:—

मोक्षोपायानिमान्पुण्यान्प्रत्यक्षानुभवार्थदान् ॥
बालोप्याकर्ण्य तज्ज्ञत्वं याति का त्वादृशे कथा ॥ नि.उ.२१५-६

'सामान्य अज्ञ मनुष्य देखील या ग्रंथांतील प्रत्यक्ष अनुभवार्थाची प्राप्ती करून देणारे हे मोक्षप्राप्तीचे उपाय ऐकून तज्ज्ञ होतो, तर तुझ्या सारख्याची काय कथा!'

अध्यात्मशास्त्राच्या उपदेशाला प्रारंभ झाल्यावरोबर 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' असें सांगण्यांत येतें. पण हें जगाचें मिथ्यात्व निव्वळ अज्ञानी माणसांना पटत नाहीं. कारण जगत् सत्य आहे अशी अनेक दिवस हाडींमांसीं खिळून गेलेली समजूत एकदम नाहींशी होऊं शकत नाहीं. 'हें जग खोटें आहे व ब्रह्म सत्य आहे,' असें कोणी बोलूं लागला, तर तो वेड्याच्या कोटींत गणला जातो, किंवा मूर्ख म्हणून त्याची टवाळी केली जाते! परंतु मद्यप्राशनानें झिंगलेल्यांची आणि इतरांची संगति कशी जमावी? प्रकाश आणि अंधकार यांचें ऐक्य होणें केव्हांच शक्य नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानी आणि अज्ञानी यांचें ऐक्य होणें शक्य नाहीं. बरें अगदीं

अज्ञानी माणसांना ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' ' सर्व ब्रह्म आहे ' अशा तऱ्हेचा उपदेश करून ताळ्यावर आणावें म्हटलें तर तें शक्य नाहीं. प्रेताला ' चाल ' म्हणून म्हटलें तरी त्याला चालतां येणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें अज्ञानी मनुष्याला कितीहि उपदेश केला, तरी त्याचा काडीमात्र उपयोग व्हावयाचा नाहीं; अर्थात् ' सर्व जग ब्रह्मरूप आहे ' हा उपदेश अज्ञानी माणसांना करीत बसणें व्यर्थ आहे; व जो प्रबुद्ध आहे, त्याच्या ठिकाणीं ' मी ' ही भावनाच नसते, तो सर्वदा ' सर्व जग ब्रह्मरूप आहे ' असें पहात असतो, म्हणूनच त्याला उपदेशाचें कारण नाहीं. तत्त्वज्ञाला ज्याप्रमाणें जग परमार्थतः भासत नाहीं, त्याप्रमाणें अज्ञ मनुष्याला परमार्थाची कल्पना येणेंहि शक्य नाहीं. मूढ मनुष्य मिथ्या अहंपणानें भरलेला असतो आणि ज्ञानी सत्यब्रह्ममय झालेला असतो. दोघांचे अशा तऱ्हेचे स्वभाव बनून गेलेले असल्यामुळें त्यांत बदल करतां येणें कठीण आहे.

* योयन्मयस्तस्य तास्मिन्युज्यतेऽपन्हवंःकथम् ॥ ४-२१-२०

"कारण जो ज्या कल्पनेनें मरून गेलेला असतो, म्हणजे जो ज्या कल्पनेशीं तद्रूप झालेला असतो, त्याला त्या कल्पनेपासून सोडवितां येणें अशक्य आहे." तर मग आत्मज्ञानाच्या उपदेशाला अधिकारी कोण ? असा प्रश्न उद्भवतो. या प्रश्नाचें उत्तर हेंच कीं, जो अप्रबुद्ध असेल व ज्यानें यज्ञ, दान व तप यांच्या योगानें आपली बुद्धि सुसंस्कृत केलेली असेल व जो अशा तऱ्हेनें साधनचतुष्टय संपन्न झालेला असेल, तोच आत्मज्ञानाच्या उपदेशाला अधिकारी आहे हेंच तत्त्व वसिष्ठांनीं या शास्त्राचा अधिकारी कोण ? या प्रश्नाचें उत्तर देतांना पुढील श्लोकांत स्पष्ट केलें आहेः—

अहं बद्धो विमुक्तः स्यामिति यस्यास्ति निश्चयः ॥
नात्यंतमज्ञो नो तज्ज्ञः सोस्मिन्शास्त्रेधिकारवान् ॥ १-२-२

" मी या संसारांत बद्ध झालेला आहे. याच्यांतून मी आपली सुटका

---

* अशाच अर्थाचा श्लोक भगवद्गीतेंत आलेला आहे तो असाः—
' श्रद्धामयोऽयं पुरुषो योयच्छ्रद्धः सएव सः ॥ भं. गीता १७-३

करून घेईन, असा ज्याचा निश्चय झाला आहे, तसेंच जो अत्यंत अज्ञहि नाहीं व तज्ज्ञहि नाहीं; असा मनुष्य या शास्त्राचा अधिकारी आहे. ”

या श्लोकांतील पहिल्या अर्धांत 'विमुक्तःस्याम' या पदांनीं तीव्रमुमुक्षा हें साधन सांगितलें आहे. वैराग्य उत्पन्न झाल्याशिवाय संसारांतून सुटण्याची इच्छा म्हणजे मुमुक्षा उत्पन्न होत नाहीं. यावरून 'इहामुत्रफलभोगविराग' म्हणजेच वैराग्य हें दुसरें साधन सांगण्यांत आलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'नात्यंतमज्ञः' या पदानें 'नित्यानित्यवस्तुविवेक' 'शमदमादिषट्कसंपत्ति' हीं दोन्हीं साधनें त्याला प्राप्त झालीं आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. यावरून साधनचतुष्टयसंपन्न असलेला पुरुषच या ग्रंथांतील तत्त्वज्ञान संपादन करण्याचा अधिकारी आहे असें ग्रंथकर्त्यानें वरील श्लोकांत सांगितलें आहे.

शिष्य हा अधिकारसंपन्न आहे किंवा नाहीं, याची परीक्षा करून नंतर शिष्याला गुरूनें उपदेश करावा असें वसिष्ठांचें सांगणें आहे. ज्याची बुद्धि अर्धवट विवेकसंपन्न आहे, त्याला एकदम 'सर्व ब्रह्म आहे' व 'तूंहि ब्रह्म आहेस' असा उपदेश करणें योग्य नाहीं, असेंहि वसिष्ठांचें म्हणणें आहे.

> आदौ शमदमप्रायैर्गुणैः शिष्यं विशोधयेत् ॥
> पश्चात्सर्वमिदं ब्रह्म शुद्धस्त्वमिति बोधयेत् ॥ ४-३९-२३
> अपरीक्ष्य च यःशिष्यं प्रशास्त्यतिविमूढधीः ॥
> सएव नरकं याति यावदाभूतसंप्लवम् ॥ ४-३९-२६

“ शमदम वगैरे गुण शिष्याच्या ठिकाणीं प्रथम निर्माण होतील व त्याची बुद्धि शुद्ध होईल अशा तऱ्हेनें प्रथम त्याला उपदेश करून नंतर 'हें सर्व ब्रह्म आहे व तूंहि शुद्ध ब्रह्म आहेस' असा त्याला उपदेश करणें योग्य आहे. परंतु शिष्याची परीक्षा न करितां आणि त्याची योग्यता न जाणतां जो गुरु त्याला ज्ञानोपदेश करतो, तो चिरकाल नरकवासाचें दुःख भोगतो. ”

याप्रमाणें वसिष्ठांनीं जगांतील सर्व उपदेशकांना मोठा दंडक घालून ठेवला आहे. अर्थात् हा दंडक जीवन्मुक्त गुरूच्या बाबतींत लागू नाहीं, हें

सांगावयास नको; कारण त्याच्या हातून असें वर्तन कधींच होणार नाहीं. जे ज्ञानाच्या पूर्णावस्थेला पोंचलेले नाहींत, त्यांच्याच हातून अशा तऱ्हेचें वर्तन होण्याचा संभव आहे, म्हणून हें वरील वसिष्ठांचें म्हणणें अशाच लोकांच्याकरितां आहे यांत शंका नाहीं.

## सिद्धाचीं लक्षणें तींच साधकाचीं साधनें.

या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं सिद्ध म्हणजेच जीवन्मुक्ताचीं लक्षणें सांगण्यांत आलीं आहेत. त्याचें संकलित वर्णन "जीवन्मुक्ताची वागणूक" या ४४ व्या प्रकरणांत करण्यांत आलें आहे. त्यांचा साधकाला काय उपयोग? असा एक आक्षेप करण्यांत येत असतो. पण या सिद्धाच्या लक्षणांचा साधकाला फारच मोठा उपयोग होत असतो. कारण हीं सिद्धाचीं लक्षणें अभ्यासु पुरुषानें आपल्याला प्राप्त करून घेण्याचें ध्येय ठेवून तीं आपल्या अंगीं बाणवून घेण्याचा प्रयत्न केला असतां आज ना उद्यां तो साधकच सिद्ध दशेला पोहोंचेल. यावरूनच सिद्धाचीं लक्षणें तींच साधकाचीं साधनें होत असतात. असें अध्यात्मग्रंथांतून प्रतिपादन करण्यांत आलेलें आहे.

सारांश, योगवासिष्ठ हा ग्रंथ नुसत्या सिद्धावस्थेचाच आहे असें नसून तो सिद्ध, साधक या दोन्ही अवस्थांना लागू होणारा आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हेंच तत्त्व पहिल्या प्रकरणांत 'योगवासिष्ठ' या नांवांतील 'योग' या शब्दाची व्याख्या करितांना दर्शविलें आहे तें पहावें.



# प्रकरण ११ वें.

## श्रीरामचंद्राचें वैराग्य.

सर्व अध्यात्मग्रंथांतून साधनचतुष्टयसंपन्न पुरुषाला अधिकारी समजून त्याला आत्मज्ञानाचा उपदेश करावा असें सांगण्यांत येत असतें. 'अध्यात्मशास्त्रांतील ज्ञानाचा अधिकारी' या मागील १० व्या प्रकरणांत याच्या संबंधानें सविस्तर वर्णन करण्यांत आलें आहे. त्याप्रमाणें रामचंद्र साधनचतुष्टयसंपन्न झालेला आहे, असें पाहूनच वसिष्ठांनीं त्याला आत्मज्ञानाचा बोध केला आहे. या साधनचतुष्टय संपत्तीमध्यें असणारें मुख्य साधन, जें वैराग्य, तें रामाच्या ठिकाणीं पूर्णपणें प्राप्त झालें होतें, त्याचें वर्णन वासिष्ठाच्या वैराग्य प्रकरणांत आलेलें आहे. रामचंद्राचें वैराग्य सामान्य स्वरूपाचें नसून तें कोणत्याहि बाह्यनिमित्तानें उत्पन्न झालेलें नव्हतें, तर केवळ विवेकामुळेंच उत्पन्न झालेलें होतें. **हेंच खरें उत्कृष्ट सात्त्विक वैराग्य होय.** वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षींच तीर्थयात्रा करून परत आल्यावर या संसाररचनेसंबंधानें विवेकपूर्वक विचार करितां करितां रामाचें मन उद्विग्न झालें. संसार असार आहे, असा त्याच्या बुद्धीचा पूर्ण निश्चय होऊन त्याला त्याबद्दल अनास्था वाटूं लागली. त्याचें शरीर कृश झालें. चित्त उदासीन झालें आणि तो आपल्याशीं एकांतांत बसून अहोरात्र वैराग्य विषयक विचार करूं लागला. पुढें दशरथ राजानें त्याला आपल्या सभेमध्यें बोलावून आणलें. वसिष्ठ विश्वमित्रांनीं त्याला विचारल्यावरून रामानेंहि आपलें मन उद्विग्न होण्याचीं कारणें सविस्तर निवेदन केलीं. हें सर्व वर्णन वैराग्य प्रकरण सर्ग १२ ते २८ मध्यें सविस्तर आलेलें आहे. रामाच्या भाषणाचा सारांश पुढीलप्रमाणें आहेः—

रामः—मी आपल्या घरीं लहानाचा मोठा झालों. विद्याध्ययन केल्यावर सज्जनांनीं घालून दिलेल्या नियमाप्रमाणें मी तीर्थयात्रा केली. माझ्या यात्रेमध्यें जो काल गेला त्यामध्यें संसारासंबंधाची आस्था नाहींसे करणारे विचार माझ्या मनांत उत्पन्न झाले. माझ्या ठिकाणीं विवेक जागृत

झाला व तेव्हांपासून विषयोपभोगाविषयीं प्रीति नाहींशी झाली. विषय-
सुख किती क्षुद्र आहे ! परंतु असल्या ह्या क्षुद्र, क्षणभंगुर सुखाच्या पाठी-
मार्गे लागून सर्व जीव जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडले आहेत. या
प्रपंचांतील सर्व विषय असार आणि अनर्थकारक आहेत. त्याचप्रमाणें तें
ज्या संपत्तीच्या जोरावर मिळविले जातात, तीहि अशाश्वत आणि अनर्थ-
मूलक आहे. संपत्तीपासून नानातऱ्हेचीं सुखें प्राप्त होतात, अशी मूढ
मनुष्याची समजूत असते. परंतु संपत्ति मनुष्याला सुख देण्याऐवजी त्याला
विवेकहीन बनवून मोहांत पाडण्यालाच कारणीभूत होते. संपत्तीप्रमाणें
आपलें आयुष्यहि दुःखासच कारणीभूत होतें. मला जीवित नकोसें झालें
आहे. जगांत वृक्ष, पशुपक्षी जगतच आहेत. पण हें जगणें खरें नव्हे. खरें
जगणें म्हणजे तत्त्वबोधामुळें जीवन्मुक्ति सुखाची प्राप्ति होऊन जें जगणें
तेंच खरें जगणें होय. माझ्या ठिकाणीं असणारा देहादिकाविषयींचा
अहंकार सर्व अनर्थांना कारणीभूत आहे. तसेच मनाला जोंपर्यंत
आपल्या ताब्यांत आणतां आलें नाहीं, तोंपर्यंत तें मोठमोठे अनर्थ
निर्माण केल्याशिवाय रहाणार नाहीं. विषयतृष्णाहि मनुष्याला अत्यंत छळ-
णारी आहे, असें माझें ठाम मत झालें आहे. जीवाला प्राप्त झालेल्या स्थूल
देहाच्या बाल, यौवन, वार्धक्यादि अवस्थेमध्यें त्याला अनंत दुःखें भोगावीं
लागतात. त्यामुळें त्याचें जीवित अतिशय कष्टमय झालें आहे. यौवन
दशेमध्यें तर मनुष्य तरुण स्त्रीच्या नादाला लागून अत्यंत दुःख भोगीत
असतो. वास्तविक पहातां स्त्रीच्या ठिकाणीं काय सौंदर्य आहे, हेंच मला
समजत नाहीं. स्त्रीहि केवळ हाडामांसाची पुतळी असून तिच्यामध्यें
रमणीय असें काय आहे ! त्वचा, मांस, रक्त व मेद हीं निरनिराळीं
केली, म्हणजे स्त्रीच्या डोळ्यामध्यें रमणीयता ती कोठें राहिली ! इकडे
केस, तिकडे रक्त, अशा तऱ्हेचें स्त्रीचें शरीर असल्यामुळें विवेकी मनुष्याला
असल्या घाणेरड्या शरीराबद्दल प्रेम कसें वाटणार ! निरनिराळीं वस्त्रें
आणि सुगंधी द्रव्यें यांच्या योगानें स्त्रीच्या शरीराला रमणीयता आणण्यांत
येत असते. परंतु सर्व मनुष्यांचीं शरीरें अखेर, गिधाडे, किडे वगैरेंच्या
भक्ष्यस्थानींच पडतात. परंतु अशा त्या स्त्रीशरीराबद्दल केवढी आसक्ति
वाटते. वर वर पाहिलें असतां, स्त्रीचें शरीर रमणीय आणि मोहक भासतें

खरें पण याला एका मोहाशिवाय दुसरें कांहीं कारण नाहीं. स्त्री ही शृंगारादिरसांनीं युक्त असून विषयोपभोगाची आश्चर्यकारक भूमि आहे. अशी स्त्री प्राप्त झाली म्हणजे मनुष्याला शाश्वत सुख मिळाल्यासारखें वाटतें. पण स्त्री ही सर्व तऱ्हेच्या दोषरूपी रत्नांची मोहक पेटी असून, ती दुःखाची कायमची शृंखलाच आहे. सारांश, ज्याला स्त्री आहे, त्यालाच भोगेच्छा उत्पन्न होते. ज्याला स्त्री नाहीं तो भोग कशाचे भोगणार? म्हणून मला सर्व भोगांचा वीट आला आहे. ज्याला आपण विष म्हणतों, तें वास्तविक विष नसून विषय हेंच खरें विष आहे. विष प्राशन केलें असतां एका देहाचा नाश होतो. परंतु विषयांचें सेवन हें अनेक जन्मांतील देहांचा नाश करतें. अशा तऱ्हेनें हजारों अनर्थांनीं युक्त असलेल्या संसाररूपी अंधकूपामध्यें सर्व जीव बुडून गेले आहेत, असें पाहून माझें चित्त भ्रमण पावत आहे.

अशा तऱ्हेनें रामानें संसारांतील विविध अनर्थांचें वर्णन करून कालरूपी राजपुत्राची मृगया, कालाचें नृत्य, संसारातील दुर्दशा व जगांतील वस्तुमात्राच्या स्थित्यंतरांचें वर्णन करून, जीवित सुखकारक होण्याला उपाय काय आहेत यासंबंधानें वैराग्य प्र. सर्ग ३१ मध्यें प्रश्न विचारले आहेत ते असेः—

## रामचंद्राचे विविध प्रश्न व सत्याग्रह.

" रामः—संसार हा दुःखमय आहे व या लोकांतले व परलोकांतले सर्व भोग नाशिवंत आहेत, असा बोध ज्यांना झाला आहे, अशा मानवांनीं संसारांत कसें वागावें? संसारामध्यें, रागद्वेषरूपी महारोग, विषयोपभोग आणि संपत्ति कोणत्या उपायानें बाधत नाहींत? कोणत्या ज्ञानामृताचा अवलंब केला असतां मनुष्य संसाररूपी अग्नीमध्यें होरपळून जाणार नाहीं? व्यवहार करीत असतां ज्याच्या योगानें मला दुःख होणार नाहीं, अशी युक्ति कोणती? मोहनिवृत्त होऊन ज्याच्या योगानें मनुष्य दुःखरहित स्थितीप्रत जाऊन पोहोंचतील असा उपाय कोणता?" असे विविध प्रश्न विचारून शेवटीं रामानें स्पष्ट सांगितलें कीं, 'जर असा एखादा उपाय नसेल तर बोलणेंच संपलें. पण असून जर मला कोणी सांगत नसेल अथवा स्वतः-

ऱ्या प्रयत्नानें माझ्या चित्ताला जर पूर्ण विश्रांति मला मिळवितां येण्याजोगी नसेल, तर खाणेंपिणें वगैरे सर्व व्यापार बंद करून, प्रायोपवेशन व्रत धारण करून मी स्वस्थ बसेन. सर्व तऱ्हेच्या आकांक्षा, ममत्व, मत्सर यांना रजा देऊन चित्रांतल्या मूर्तिप्रमाणें सर्व व्यापार बंद करून मी राहीन, आणि शेवटीं देहत्याग करीन."

अशा तऱ्हेचें अपूर्व वैराग्य रामाच्या ठिकाणीं विवेकानें प्राप्त झालें होतें. म्हणूनच तो आत्मज्ञानाविषयीं पूर्ण अधिकारी झाला होता असें सर्व वसिष्ठ विश्वामित्रादि महर्षींनीं आपल्या मुखांतून स्पष्ट उद्गार काढले आहेत. मुमुक्षु व्यवहार प्रकरणाच्या सर्ग ११ मध्यें तर वसिष्ठांनीं रामाच्या वैराग्याविषयीं मोठी प्रशंसा केली आहे.

## रामचंद्राचें उत्कृष्ट वैराग्य.

वसिष्ठः—या रामचंद्रा ! तुझ्या ठिकाणीं बाह्यतः कांहींहि कारण नसतां उत्कृष्ट वैराग्य उत्पन्न झालें आहे. पुष्कळांच्या ठिकाणीं वैराग्य उत्पन्न होत नाहीं असें नाहीं, पण तें कांहीं तरी निमित्तानें उत्पन्न होत असल्यामुळें राजस वैराग्य होय. पण तुझ्या ठिकाणीं जें वैराग्य उत्पन्न झालें आहे, तें निमित्ताशिवाय व केवळ विवेकामुळेंच उत्पन्न झालें आहे. हें तुझें सात्त्विक वैराग्य पाहून सत्पुरुषांनाहि मोठें आश्चर्य वाटेल ! स्मशानांत गेल्यावर किंवा आपत्ति आणि दैन्य प्राप्त झाल्यावर कोणाला वैराग्य उत्पन्न होत नाहीं ? परंतु असलें वैराग्य खरें नव्हे. स्वतःच्या विवेकानें जें वैराग्य उत्पन्न होतें, तेंच श्रेयस्कर होय. अशा तऱ्हेचें श्रेष्ठ वैराग्य तुझ्या ठिकाणीं निर्माण झालें आहे.



# प्रकरण १२ वें.

## संसार दुःखाचें कारण व त्याच्या निवृत्तीचा उपाय.

संसार एव दुःखानां सीमांत इति कथ्यते ॥ ५-९-४१-

"संसार हा दुःखमय आहे," असा कोणताहि विचारी मनुष्य कबूल केल्याशिवाय रहाणार नाहीं. बौद्ध धर्माचा हा एक मोठा सिद्धांत आहे. वसिष्ठांनींहि ही गोष्ट मान्य केली आहे कीं, सामान्य मनुष्याचें जीवित दुःखमय व कष्टमय असतें व त्याला या संसारांत विविध तऱ्हेचा त्रास व यातना भोगाव्या लागतात.

### संसाराची अनर्थ कथा.

मुमुक्षु व्य प्र. सर्ग १२ मध्यें संसाराची अनर्थ कथा वसिष्ठांनीं वर्णन केली आहे. ती अशीः—

"हा संसाररूपी रोग अत्यंत विषम आहे. हा संसार रोग सर्पाप्रमाणें दंश करितो; तरवारीप्रमाणें कापतो, भाल्याप्रमाणें भोंक पाडतो, दोरीप्रमाणें बांधतो, अग्नीप्रमाणें जाळतो, डोक्यावर मारलेल्या दगडाप्रमाणें मूर्छित करितो. बुद्धि हरण करतो. मर्यादेचा उच्छेद करतो. मोहरूपी अंधकूपांत ढकलतो, तृष्णा उत्पन्न करून जीवाला ग्रासून टाकतो. संसारी मनुष्याला जें त्रास देत नाहीं, असें या जगांत कोणतेंच दुःख नाहीं."

ही विषयरूपी महामारी खरोखरच कठीण आहे. तिच्यावर वेळींच उपाय केला नाहीं तर नरकांतील नानातऱ्हेचीं दुःखें मनुष्याला भोगावीं लागल्याशिवाय रहाणार नाहींत. ही महामारी योगरूपी गारुड मंत्रानें नाहींशी होते आणि हा योगमंत्र (परमार्थाचें ज्ञान) सज्जनासह अध्यात्मशास्त्राचा विचार केल्यानेंच निःसंशय प्राप्त होतो. या जगांत विचाराच्या योगानें सर्व दुःखांचा क्षय होतो, म्हणून मनुष्यानें विचारी बनून शांत अंतःकरणानें अखिल जगत् केवळ नुसता मायेचा खेळ आहे,

असें समजावें. परंतु अशा तऱ्हेची विचार दृष्टि ज्याच्या ठिकाणीं निर्माण झाली नाहीं, त्याला नेहमीं दुःखांत दिवस कंठावे लागतात.

* अनंतानीह दुःखानि सुखं तृणालवोपमम् ॥ २-१३-३३.

"या संसारांत सुख पहावें तर अत्यंत अल्प आहे, ( पण तें देखील आभासात्मक आहे. अशा सुखाच्या-मागें देखील दुःखाचा ससेमिरा लागला आहे. ) दुःख पहावें तर अनंत आहे."

## सुखदुःखाचें चक्र.

यासाठीं दुःखापासून येणाऱ्या सुखासंबंधानें आस्था बाळगणें अविचारीपणाचें आहे.

सुखस्यानंतरं दुःखं दुःखस्यानंतरं सुखम् ।
घटीयंत्रवदश्रांतं भ्रमन्याति पुनः पुनः ॥

या श्लोकांत दर्शविल्याप्रमाणें सुखाच्यामागून दुःख व दुःखाच्या मागून सुख असें हें सुखदुःखाचें चक्र रहाटगाडग्याप्रमाणें नेहमीं भ्रमण करीत असतें. या चक्रांत सांपडलेल्या माणसाला कधींहि विश्रांति मिळूं शकत नाहीं. रौरवादि नरकांत दुःख असतें हें खरें, पण एका दृष्टीनें तें संसारांतील दुःखापेक्षां बरें. कारण नरकांतील दुःख एकदा अंगवळणीं पडलें, म्हणजे त्या दुःखाची तीव्रता तितकी भासत नाहीं. परंतु संसारांतील दुःखें वर वर्णन केल्याप्रमाणें सुखाभासमिश्रित असल्यामुळें अत्यंत दुःसह होतात. संसार म्हणजे दुःखाची पराकाष्ठा असें सत्पुरुष सांगतात तें अनुभवानीं खरें ठरतें. तेव्हां अशा संसारांत पडलेल्या जीवांना सुख कोठून मिळणार ! पण काय चमत्कार आहे पहा कीं, संसारदुःखांत पडलेल्या जीवांना त्यांतील सामान्य दुःखें तुलनेनें मोठीं सुखेंच वाटतात ! तरवारीच्या वारापुढें चाबकाचा मार सुखकर वाटावा, अशांतलाच हा प्रकार होय.

---

* संत तुकाराम महाराजांनीं असेंच म्हटलें आहे.

सुख पाहातां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥

## जगामध्यें खरा सुखी कोण आहे ?

व्यवहाराच्या दृष्टीनें या प्रश्नाचें उत्तर देणें मोठें कठीण आहे; कारण या जगामध्यें प्रत्येक प्राण्याच्या वरचढ कोणीतरी आहेच. त्यामुळें त्याला सुख होणें फारच कठीण आहे. प्रबलांकडून दुर्बलांना पीडा व्हावयाचीच, असा सृष्टीचा नियमच आहे. उपशम प्रकरण सर्ग १४ मध्यें यासंबंधीं वर्णन केलें आहे. त्याचा थोडक्यांत सारांश असा आहेः—

पाण्यांतील मोठमोठे मासे लहान माशांना खाऊन टाकतात. अणुसारख्या सूक्ष्म जीवांना मासा गट्ट करतात. माशांना कोळी आपल्या जाळ्यांत पकडतो. कोळ्याला वनमक्षिका भक्षण करतात. वनमक्षिकेला बेडूक खाऊन टाकतो. बेडकाचा समाचार सर्प घेतो. सर्पाला मुंगुस मारतें. मुंगसाला मांजर पकडतें. मांजराला कुत्रा धरतो. कुत्र्याला अस्वल मारतें. अस्वलाला वाघ खाऊन टाकतो. वाघाला सिंह मारतो. सिंहाला शरभ * ठार करतो व तो शरभहि आकाशांत मेघ गर्जना होतांच उंच उड्या मारूं लागतो. अशा रीतीनें आकाशांत उड्डाण करितां करितां अखेर खालीं पडून एखाद्या दगडावर आपटून मरून जातो. मेघाला वायु उडवितो. वायूची गति पर्वत कुंठित करतात. वज्र पर्वताचें चूर्ण करतें. हें वज्र इंद्राच्या ताब्यांत असतें. इंद्र हा विष्णूच्या ताब्यांत असतो. कारण त्यानेंच इंद्राला या त्रैलोक्याचा अधिपति बनविलें आहे. आतां विष्णु तरी सुखी असेल असें म्हणावें, तर तसेंहि दिसत नाहीं. तोहि मत्स्य, कूर्म वगैरे अवतार धारण करितो व दुःख भोगीत असतांना दिसतो. शेवटीं प्रलय कालीं त्यालाहि महादेव रुद्रावतार घेऊन आपल्या उदरांत गट्ट करून टाकतो. रुद्रहि सर्व ब्रह्मांडाचा संहार केल्यावर कालाच्या स्वरूपांत विलीन होतो व कालहि परब्रह्माच्या ठिकाणीं नाहींसा होऊन जातो.

सारांश, या जगामध्यें प्रत्येक प्राणी दुःखांनीं अभिभूत झाला आहे. या जगांत एखादाच मनुष्य दुःखी असतां तर त्याच्याबद्दल वाईट वाटलें

---

* **शरभः**—काल्पनिक हिंस्र पशु यास आठ पाय असून तो सिंहाला ठार मारतो असें वर्णन आहे.

असतें. परंतु जेथें सर्वच दुःखी कष्टी आहेत तेथें खेद तरी कोणाबद्दल करावयाचा आणि कोणाबद्दल करावयाचा नाहीं. राजापासून रंकापर्यंत, मोठ्यापासून लहानापर्यंत सर्व लोक आपआपल्या परीनें दुःख भोगतांना आढळतात. असें पाहून श्रीसमर्थ रामदासांच्या " जगीं सर्वसुखी असा कोण आहे ? ' या उक्तीची आठवण होते. वसिष्ठ म्हणतात कीं, या जीवांची दुःखपरंपरा पाहून मला अतिशय दुःख होतें, आणि कितीहि विचार केला तरी यांच्या दुःखाचें निवारण करण्याचा उपाय सुचेनासा होऊन बुद्धि भांबावल्या सारखी होते. अर्थात् सतत उत्पत्ति आणि विनाश यांनीं युक्त असलेल्या या संसारांत कोणीं कोणाविषयीं सुखदुःख मानूं नये, हेंच शेवटीं योग्य दिसतें. या जगांतील सर्व प्राणिमात्रांची करुणा येऊन त्यांचें दुःख निवारण करितां येणें शक्य नसतांहि भूतदयेची शेखी मिरविणारा एखादा मनुष्य सर्वांचें दुःख नाहींसें करण्याचा प्रयत्न करूं लागला असतां, तें त्याचें कृत्य आपल्या डोक्यावरील छत्रीनें आकाशांतील सर्व उन्हाचें निवारण करण्यास तयार होण्याइतकें हास्यास्पद आहे.

## अज्ञान हेंच संसारदुःखाचें कारण.

अशा या संसारदुःखाचें कारण अज्ञान आहे. असें वसिष्ठ सांगतातः—

न व्याधिर्न विषं नापत्तथा नाधिश्च भूतले ॥
खेदाय स्वशरीरस्थं मौर्ख्यमेकं यथा नृणाम् ॥ २-१२-१३.
वरं शरावहस्तस्य चांडालागारवीथिषु ॥
भिक्षार्थमटनं राम न मौर्ख्यहतजीवितम् ॥ २-११-१७.
वरं घोरांधकूपेषु कोटरेष्वेव भूरुहाम् ॥
अंधकीटत्वमेकांते न मौर्ख्यमतिदुःखदम् ॥ २-११-१८.
सर्वापदां शिरसि तिष्ठति मौर्ख्यमेकम् ॥ नि. पू ८८-२७.
इयं संसारसरणिर्वहत्यज्ञप्रसादतः ॥ नि. पू. ८८-२७.

या श्लोकांचा भावार्थ असाः—अज्ञानामुळें मनुष्याला जितकें दुःख भोगावें लागतें, तितकें आधि, व्याधि, विष किंवा आपत्ति यांच्यामुळेंहि भोगावें लागत नाहीं. चांडालाच्या वस्तींतून हातांत थाळी घेऊन भिक्षा मागण्याचा प्रसंग आला तरी पुरवला, परंतु अज्ञानांत जीवित कंठण्याचा

कर्मांचें आचरण करावें, प्राणांचें धारण पोषण होईल एवढ्यासाठींच आहार करावा, प्राण तत्त्वजिज्ञासेकरितां धारण करावेत. अशा तऱ्हेनें वागून आत्मज्ञान संपादन करावें, म्हणजे पुनः कधींहि संसारांतील दुःखें भोगण्याचा प्रसंग येणार नाहीं."

अशा तऱ्हेनें विवेकाचा आश्रय करून आणि वैराग्य आपल्या अंगीं बाणवून घेऊन या घोर संसार नदींतून तरून जाण्याचा प्रत्येक मनुष्यानें प्रयत्न केला पाहिजे. विषाप्रमाणें मूर्छा व मोह उत्पन्न करणारी संसाररूप माया किती भयंकर आहे, हें जाणणाऱ्या विवेकी मनुष्यानें नेहमीं जागृत राहिलें पाहिजे. यासाठीं श्रवण मननाच्या योगानें व निदिध्यासाच्या योगानें मनुष्यांनीं आत्मस्वरूपाचीच यावज्जीव उपासना करावी. स्वानुभव, शास्त्र व गुरूचा उपदेश यांची एकवाक्यता ज्या श्रवणादिकांच्या अभ्यासानें होते, त्यानेंच आत्मस्वरूपाचें अखंड ज्ञान होतें. अशा तऱ्हेनें त्या आत्मपदाचें ज्ञान होणें, हीच त्याची प्राप्ति होय. हें आत्मपद किंवा ब्रह्मपद प्राप्त झालें असतां शोकाचें कारण रहात नाहीं व जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत पडण्याची धास्ती उरत नाहीं, 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' याची प्राप्ति फक्त ज्ञानानेंच होत असल्यामुळें त्याच्या अस्तित्वाबद्दल मुळींच शंका नाहीं. अज्ञानी पुरुषांना आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल शंका वाटते, कारण तो आत्मा इतर पदार्थांप्रमाणें प्रत्यक्ष दाखवितां येत नाहीं. म्हणूनच त्याची प्राप्ति करून घेण्याचे जे उपाय शास्त्रांत सांगितले आहेत, त्यांचें ते अवलंबन करीत नाहींत. परंतु अशा विचारानें व वागण्यानें मनुष्याचें कल्याण होणार नाहीं.

### संशयस्थितींत कसें वागावें ?

कोणत्याहि गोष्टींत शंका आली असतां कसें वागावें हें पुढील श्लोकांत सांगितलें आहेः—

संदिग्धे परलोकेऽपि वरं श्रुतिपथाश्रयम् ।
यदि नस्यातदाकिंस्याद्यादिस्याद्मास्तिकोहतः ॥

" परलोक आहे किंवा नाहीं या संबंधानें शंका आली तर वेदानें परलोक आहे असें सांगितलें आहे, म्हणून त्यावर विश्वास ठेवून रहाणें श्रेयस्कर

होय. कारण समजा कीं जर परलोक नसेल, तरी देखील परलोक प्राप्ति करितां पुण्य कर्माचें आचरण करण्यापासून काय नुकसान आहे ? पण जर परलोक खराच असेल तर त्या लोकाची प्राप्ति होण्याकरितां पुण्य कर्माचें आचरण न केल्यानें मरणोत्तर त्या लोकाची प्राप्ति होणार नाहीं. त्यामुळें त्याची मोठीच हानि झाली असें म्हणावयास हरकत नाहीं." याच न्यायानें वसिष्ठ सांगतात कीं,

नास्तिचेत्तद्विचारेण दोषः को भवतां भवेत् ॥
अस्तिचेत्तत्समुत्तीर्णा भविष्यथ भवार्णवात् ॥ २-१३-३५

"ब्रह्म नाहीं असें जरी असलें तरी त्यासंबंधीं आध्यात्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें विचार केला तर त्यांत तुम्हाला कोणता दोष लागणार आहे ? पण जर कदाचित् त्याचा विचार करितां करितां तें आहे, अशी खात्री झाली, तर त्याचें ज्ञान होऊन तुम्ही भवसागरांतून तरून जाल."

सारांश, संसारदुःखांतून तरून जाण्याला आत्मज्ञानाशिवाय दुसरा उपाय नाहीं.



प्रसंग नको. घोर अशा अंधकूपामध्यें, वृक्षाच्या ढोलीमध्यें किंवा अंधकीटकाप्रमाणें अंधारामध्यें रहावें लागलें तरी हरकत नाहीं. परंतु अत्यंत दुःखदायी अज्ञानांत रहाणें नको.. अज्ञान हीच श्रेष्ठ आपत्ति आहे. अज्ञानी पुरुषांच्या प्रसादामुळेंच संसाररूपी नदी एकसारखी वहात आहे.

अज्ञान हीच सर्व आपत्तींची निधि असल्यामुळें अज्ञ पुरुषाला या संसारांत कोणत्या आपत्ती व कोणतीं दुःखें भोगावीं लागत नाहींत? यासाठीं दृढ प्रयत्नानें अज्ञानाचा नाश केला पाहिजे.

## ज्ञानच अज्ञानाचा नाश करितें.

या संसारांत दुःख भोगीत पडलेल्या जीवाची हताश स्थिति पाहून परमेश्वराला करुणा आली व 'त्यांचें दुःख नाहींसें होऊन त्यांची उन्नति कशी होईल?' असा विचार मनांत येऊन त्यानें क्षणभर एकाग्र चिंतन केलें; व तप, धर्म, दान, सत्य, तीर्थें यांची स्वतः उत्पत्ति केली. परंतु तेवढ्यानें सृष्टींतील जीवांचें दुःख नाहींसें होणार नाहीं, असें जाणून निर्वाणात्मक परमसुख उत्पन्न केलें. हें सुख केवळ ज्ञानानेंच प्राप्त होतें; व तें प्राप्त झालें असतां जन्ममृत्यूचें भय रहात नाहीं. यासाठीं वसिष्ठ म्हणतात कीं,

संसारोत्तरणे जंतोरुपायो ज्ञानमेव हि ॥
तपोदानं तथातीर्थमनुपायाप्रकीर्तिताः ॥ २-१०-२२.

" संसारांतून तरून जाण्याला ज्ञान हाच एक उपाय आहे. तें काम तप, दान, तीर्थ यांच्या योगानें होऊं शकत नाहीं."

हें ज्ञान म्हणजेच आत्मस्वरूपाचें साक्षात्कारभूत ज्ञान होय. हें ज्ञान इतकें श्रेष्ठ आहे कीं, "एकं विज्ञातं सर्वं विज्ञातं भवति" ह्या वेदान्तांतील सिद्धांताप्रमाणें एक आपला आत्मा आपल्याला समजला म्हणजे जगांतील सर्व कांहीं समजल्यासारखें होतें.

## आत्मज्ञान हेंच खरें ज्ञान.

म्हणूनच वसिष्ठ सांगतात कीं,

आत्मज्ञानं विदुर्ज्ञानं ज्ञानान्यन्यानि यानि तु ॥
तानि ज्ञानावभासानि सारस्यानवबोधनात् ॥ नि.उ.२१-७.

" आत्मस्वरूपाच्या ज्ञानालाच ज्ञान म्हणतात. दुसरीं जीं भौतिक ज्ञानें तीं केवळ ज्ञानाचे अवभास आहेत, कारण त्यापासून सर्व जगांतील चराचर वस्तूंचें सारभूत असणाऱ्या आत्म्याचें संशोधन होत नाहीं व त्यामुळें खऱ्या ब्रह्मानंदाचा लाभहि होत नाहीं."

या वरील श्लोकांत " आत्मज्ञानालाच ज्ञान म्हणतात" ही जी ज्ञानाची व्याख्या केली आहे, अशाच तऱ्हेची व्याख्या सध्याचे थिऑसफिस्ट " Phylosophy is the foundation and top of all sciences " करीत असतात. पण हा त्यांनीं कांहीं नवीन शोध लावला आहे असें नसून वासिष्ठामध्यें अशा तऱ्हेची ज्ञानाची व्याख्या वरील श्लोकांत अगोदरच केलेली आहे. श्रीसमर्थ रामदासांनींहि दासबोधामध्यें * अशीच व्याख्या केली आहे.

आतां कोणी असें म्हणेल कीं, या संसारामध्यें राज्यादिकांची प्राप्ति झाली असतां मनुष्याला आनंद होतो, तर मग आत्मज्ञानाची प्राप्ति होऊन काय करावयाचें आहे ? याचें उत्तर असें आहे कीं, तो आनंद केवळ भासमान होय, तो नित्य निरतिशय आनंद नव्हे. एखाद्या भुवनावर राज्य करण्याचा अधिकार प्राप्त होवो, इंद्रपदाचा लाभ होऊन पर्जन्यवृष्टि करण्यासाठीं मेघामध्यें प्रवेश करितां येवो, किंवा योगसामर्थ्यानें वाटेल तेथें संचार करितां येवो, जोंपर्यंत मनुष्याला आत्मज्ञान झालेलें नाहीं, तोंपर्यंत त्याला शाश्वत सुखाची प्राप्ति होणें शक्य नाहीं. यावरून आत्मस्वरूपाचें अज्ञानच सर्व संसारांतील दुःखांचें उगमस्थान होय. याकरितां मनुष्यानें कसें वागावें हें खालील श्लोकांत दाखविलें आहेः—

आहारार्थं कर्म कुर्यादनिंद्यं कुर्यादाहारं प्राणसंधारणार्थम् ॥
प्राणाः संधार्यास्तत्त्वजिज्ञासनार्थं तत्त्वं जिज्ञास्यं येन भूयो न दुःखम् ॥
नि. उ. २१-१०

" मुमुक्षु पुरुषानें योग्य आहार मिळविण्याकरितां चोख व शास्त्र

---

* जाणिजे परमात्मा निर्गुण । त्यासीच म्हणावें ज्ञान ।
त्या वेगळें तें अज्ञान । सर्व कांहीं ॥ दासबोध ६-१-१९.

# प्रकरण १३ वें.

## पौरुषप्रयत्न, दैव व नियति.

अत्रैकं पौरुषं यत्नं वर्जयित्वेतरा गतिः ॥
सर्वदुःखक्षयप्राप्तौ न काचिदुपयुज्यते ॥ ३-६-१४.

सर्व संसारदुःखें व जन्ममरणाच्या यातना नाहींशा होण्याविषयीं आत्मज्ञान हाच एक उपाय आहे. हें ज्ञान होण्याकरितां पौरुषप्रयत्नाशिवाय दुसरा उपाय नाहीं. आपत्ति, संपत्ति, सुख व दुःख, दैवामुळेंच आपणांस प्राप्त होतें, असें पुष्कळांना वाटतें, त्यामुळें ते प्रयत्न न करितां स्वस्थ बसून रहातात. असे लोक शेवटीं आपला सर्वप्रकारें नाश करून घेतात. अशा लोकांना या लोकीं अभ्युदय व निश्रेयस् ( मोक्ष ) प्राप्त होत नाहीं. यास्तव सर्व दुःखें नाहींशीं होण्याकरितां पौरुषप्रयत्नाशिवाय दुसरा मार्ग नाहीं, असें वसिष्ठांनीं रामाला उपदेश करण्यापूर्वीं वरील श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे. आतां यासंबंधीं वसिष्ठांनीं जें विवेचन केलें आहे, त्याचा विचार करूं:—

### पौरुषाची व्याख्या.

-मनुष्यानें योग्य दिशेनें व चिकाटीनें प्रयत्न केला असतां, त्याला ऐहिक, पारलौकिक व पारमार्थिक सुख निःसंशय प्राप्त झालेंच पाहिजे. चंद्रापासून शीतल आणि आल्हादकारक प्रकाश मिळतो, त्याप्रमाणें पौरुषप्रयत्नापासून चित्तशुद्धीच्या द्वारां जीवन्मुक्तिसुखाचा आनंद प्रत्येक जीवाला मिळणें शक्य आहे. हा आनंद मिळणें हाच खरा पुरुषार्थ. सज्जनसंगति आणि सच्छास्त्राचा अभ्यास यांच्या योगानें बुद्धि सूक्ष्म करून नेटानें सतत शास्त्रीय पौरुषप्रयत्न करीत राहणें, हाच पौरुष शब्दाचा खरा अर्थ होय, असें ज्ञाते लोक म्हणतात. अशा पौरुषाचा आश्रय केल्यानेंच इहलोकीं मनुष्याचें कल्याण होतें व शेवटीं त्याला सद्गतिहि मिळते. शास्त्रांनीं व सत्पुरुषांनीं देश, काल, वर्तमान यांस अनुसरून करावयास सांगितलेल्या

कर्माचें आचरण केलें तर चित्त शुद्ध होऊन आत्मज्ञानप्राप्तीकडे ...चें मन वळतें; व तें ज्ञान प्राप्त करून घेण्याची उत्कट इच्छा त्याचे ठिकाणीं उत्पन्न होते. तदनुसार तो अध्यात्मशास्त्राचा अभ्यास करण्यास प्रारंभ करतो. अशा तऱ्हेनें जो पुरुषार्थ प्राप्त करून घ्यावयाचा तो पौरुषानेंच प्राप्त होतो, हें जाणून आत्मसाक्षात्कार करून घेण्यासाठीं निरंतर प्रयत्न करावा व सच्छास्त्र आणि सत्पुरुष यांची सेवा करून तो सफल करून घ्यावा. सारांश, दुःखनिवृत्ति होऊन सुख मिळावें, म्हणून सच्छास्त्रांनीं व सत्पुरुषांनीं आंखून दिलेल्या मार्गानें काया, वाचा, मन यांनीं नेटानें जें कार्य केलें जातें, तेंच पौरुष होय व असें पौरुषच फलद्रूप होतें.

## पौरुष ( प्रयत्न ) आणि दैव यांचें ऐक्य.

पौरुषाचे दोन प्रकार आहेत. एक प्राक्तन व दुसरें ऐहिक.

( १ ) प्राक्तन पौरुष म्हणजेच स्वतःचें पूर्वजन्मांतील फलोन्मुख झालेलें संचित पुण्य व पाप कर्म होय. अशा पौरुषाला दैव अथवा प्रारब्धकर्म असें म्हणतात. याच्याशिवाय दैव म्हणून कांहीं निराळें नाहीं. या जन्मांत मनुष्यानें नेटानें प्रयत्न केला असतां पूर्व जन्मांतील पौरुषाला म्हणजेच दैवाला हाणून पाडतां येतें. बुद्धि आणि साहस यांनीं युक्त असलेल्या पुरुषांनीं दृढ प्रयत्नानें अभ्यास केला असतां समुद्रमंथनासारखीं अचाट कृत्यें करितां येतात. मग पूर्वजन्मांतील पौरुष ( दैव ) नाहींसें करितां येईल यांत नवल तें काय ?

( २ ) ऐहिक प्रयत्नांचे शास्त्रीय व अशास्त्रीय असे दोन प्रकार मानले आहेत. त्यांपैकीं अशास्त्रीय प्रयत्न अनर्थाला कारण होतो व शास्त्राला अनुसरून केलेला प्रयत्न परमार्थ* प्राप्त करून देतो. दोन एडके आपआपसांत लढूं लागले म्हणजे कधीं एकाचा जय होतो तर कधीं दुसऱ्याचा जय होतो. त्याप्रमाणें

---

* परमार्थः—अनंतं समतानंदं परमार्थं विदुर्बुधाः ॥ २–६–३४
बुद्धीच्या समत्वापासून उत्पन्न होणाऱ्या आनंदाच्या नित्य स्थितीला ज्ञाते लोक **परमार्थ** म्हणतात.

प्राक्तन आणि ऐहिक प्रयत्न एकमेकावर जय मिळविण्यासाठीं लढत असतात. त्यामध्यें सामर्थ्यानें जो कमी त्याला अर्थातच हार खावी लागते.यासाठीं मनुष्यानें शास्त्रीय नियमाप्रमाणें धैर्य धरून उत्तम उद्योग करावा, म्हणजे या जन्मांत केलेला शास्त्रीय प्रयत्न यशस्वी झाल्याशिवाय निःसंशय रहाणार नाहीं.कित्येक वेळां शास्त्रानें आंखून दिलेल्या मार्गानें मनुष्य प्रयत्न करीत असला तरी रोगादिकांसारखे अनर्थ उत्पन्न होतात; परन्तु आपलें पूर्वीचेंच कर्म अनर्थ उत्पन्न करीत आहे असें त्या ठिकाणीं समजावें. अशा ठिकाणींहि शास्त्रीय प्रयत्नानें अनर्थ उत्पन्न करणाऱ्या पूर्वीच्या कर्माचा पाडाव करावा. पूर्वजन्मांतील कर्मफलें मला विघ्न करीत आहेत, असें मनांत आणून, त्यांना जोरानें पायाखालीं तुडवावें. कारण प्राक्तन कर्म झालेलीं असल्यामुळें तीं आहेत त्यांच्यापेक्षां बलवत्तर होणें शक्य नाहीं. या जन्मीच्या प्रत्यक्ष क्रियापुढें त्यांची कांहींच किंमत नाहीं. पूर्वीच्या जन्मांतील कर्मफलें नाहींशीं होईपर्यंत मनुष्यानें आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न करावा. कालच्या दिवशीं झालेलें अजीर्ण आज केलेल्या लंघनामुळें नाहींसें होतें, त्याप्रमाणें पूर्वीच्या जन्मांतील कर्मांचे दोष या जन्मांतील शुभकर्मांनीं नाहींसे होतात. म्हणूनच पापग्रहांची बाधा होऊं नये म्हणून त्या ग्रहांची शांति, दानें, मंत्र-तंत्र सांगण्यांत आलेलीं आहेत. मनुष्यानें शास्त्रशुद्ध प्रयत्न केला असतां त्याच्या ऐहिक, पारलौकिक व पारमार्थिक सुखाच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. पण शास्त्रविधीला धाब्यावर बसवून उद्योग न करतां जो केवळ दैवावर अवलंबून राहतो, त्याला वरील सुखांपैकीं कोणतेंहि सुख मिळत नाहीं. तर उलट तो आपलें अकल्याण करून घेतो. सारांश, शास्त्रांत सांगितलेल्या नियमांना धरून शुभ प्रयत्न केले असतां, त्यांपासून शुभ फल मिळतें व अशुभ प्रयत्न केले असतां त्यांपासून अशुभ फल भोगावें लागतें.

### दैवाची व्याख्या.

प्राक्तनं पौरुषं तद्वै दैवशब्देन कथ्यते ॥ २-६-३५

"पूर्वजन्मांत केलेले शुभ आणि अशुभ प्रयत्न यांनाच दैव असें म्हणतात."

'मला दैव प्रेरणा करीत आहे' 'मी स्वतंत्र नसून दैवाच्या आधीन आहें' 'दैव किती बलवत्तर आहे', असे दुबळे विचार ज्या दुर्दैवी मनुष्याच्या मनांत येतात, त्याला पूर्वकालीं ज्या श्रेष्ठ महात्म्यांनीं स्वतःच्या पौरुषप्रयत्नांनीं पुरुषार्थप्राप्ति करून घेतली आहे, अशांची उच्च दृष्टि प्राप्त झालेली नसते व अशा निर्बुद्ध मनुष्याला पाहून लक्ष्मी आपली पाठ फिरविते. कोणतीहि गोष्ट दैवानें प्राप्त होते, अशी ज्याची भावना असते, तो मनुष्य मूढबुद्धीचा असून त्याचा अखेरीस नाश होतो. आतां अशी स्थिति असतां सर्व लोक प्रयत्नशील कां होत नाहींत? असा प्रश्न उत्पन्न होतो. याचें उत्तर 'आळस' आहे, असें वसिष्ठ सांगतातः —

**आलस्यं यदि न भवेज्जगत्यनर्थः कोवास्याद्बहुधनको बहुश्रुतोवा ॥**
**आलस्यादियमवनिः ससागरांता संपूर्णा नरपशुभिश्च निर्धनैश्च ॥**

२-५-३०.

"या जगांत आळस नसता तर शेकडों अनर्थ उत्पन्न झाले नसते. आळस नसता तर प्रत्येक मनुष्य संपत्तिमान् आणि विद्वान् झाला असता. परंतु जगांत आळस असल्यामुळें ही संपूर्ण पृथ्वी असंख्य नरपशू आणि निर्धन मनुष्यें यांनीं भरून गेली आहे."

"दैव मला अशा रीतीनें प्रेरणा करीत आहे" या म्हणण्यांत कांहींच अर्थ नसून ही केवळ कुकल्पना आहे. पौरुषप्रयत्नाचा त्याग करून जो मनुष्य आळसानें स्वस्थ बसतो, तो अधम असून त्याचा त्याग करणेंच योग्य आहे. आपल्या व्यवहारांत कित्येक वेळां आपण स्वतःच्या प्रयत्नानें मिळविलेली वस्तु जर नष्ट झाली, तर त्याबद्दल खेद करीत बसणें योग्य नाहीं; कारण ज्या ठिकाणीं आपल्या सामर्थ्याचा उपयोग नाहीं, त्या ठिकाणीं शोक करण्यांत अर्थ कोणता? आपले प्रयत्न ज्या ठिकाणीं व्यर्थ आहेत, त्या ठिकाणीं दुःख करीत बसणें म्हणजे आपण केव्हां तरी मरणार आहोंत म्हणून रोज रडत बसण्यासारखेंच आहे! जगांतील सर्व गोष्टी देश, काल, क्रिया व द्रव्य यांच्या सामर्थ्यामुळें सिद्ध होत असतात, आणि जो अधिक प्रयत्न करितो, तो यशस्वी होतो, असा सिद्धांत आहे. यासाठीं

पौरुषाचा आश्रय करून सच्छास्त्र व सत्समागम यांच्या साहाय्यानें अंतःकरण शुद्ध करून घेऊन मनुष्यानें संसारसमुद्रांतून तरून जावें.

## दैवाचें मिथ्यात्व.

दैव म्हणतात तें काय आहे ? दैवाला विशिष्ट आकार नाहीं. दैव दिसूं शकत नाहीं. किंबहुना त्याला अस्तित्वच नाहीं. विवेकी पुरुषाच्या दृष्टीनें दैव ही नुसती कल्पना आहे. पौरुषप्रयत्नामुळेंच प्राप्त होणाऱ्या इष्ट किंवा अनिष्ट फलालाच लोक दैव म्हणतात. यत्नावांचून पुढें प्राप्त होणाऱ्या भोगांनाच दुसरे कित्येक ( लोकायतिक ) दैव असें म्हणतात. दैव हें प्रत्यक्ष या जगांत दिसत नाहीं ! तें दुसऱ्या कोणत्या लोकांत आहे, असेंहि नाहीं. मनुष्य उत्पन्न होतो, वाढतो व शेवटीं म्हातारा होतो, परन्तु या तिन्ही अवस्थांमध्यें दैव म्हणून कोठें असल्याचें दिसून येत नाहीं. दैव हें आकाशाप्रमाणें असून तें कोणाचेंहि बरें वाईट करूं शकत नाहीं. आकाशाला वास्तविक कांहीं रंग नसतां त्यामध्यें नीलवर्णाचा भास होतो, त्याप्रमाणें दैव चांगलें किंवा वाईट करितें, असें मूढ मनुष्यांना केवळ भ्रांतीमुळें वाटतें. मूढपणामुळें ज्याला दैव आहे असें वाटतें, त्यानें त्या दैवाची परीक्षा करण्याकरितां अग्निमध्यें उडी टाकून अंगाचा दाह होतो कीं नाहीं, तें पहावें व दाह झाला असतां दैव त्याचें निराकरण करितें कां काय तें पहावें ! सर्व गोष्टी जर दैवानें होत असतील, तर स्नानदानादि क्रियाहि दैवच करूं शकेल ! मग शास्त्रोपदेश निरर्थक ठरून मनुष्य भाषण करण्याला सुद्धां असमर्थ होईल. वाणीला प्रेरणा जर दैवानें होत असेल, तर कोण कोणाला उपदेश करणार ? दैव प्रत्यक्ष दिसत नसलें, तरी क्रियेचें फल प्राप्त होण्याला त्याची मदत होते, असें म्हणावें, तर तसाहि अनुभव येत नाहीं. हालचाल केल्यानें फलप्राप्ति होत असल्यानें अखेरीस दैवाची कल्पना करणें व्यर्थ आहे, असेंच म्हणावें लागतें. शरीरांतील हाताशीं लेखणी किंवा शस्त्र यांचा संयोग होणार नाहीं, तर त्याच्या ठिकाणीं कांहींच कर्मकर्तृत्व रहाणार नाहीं. कारण हातच पंगु झाला, तर हाताचें कार्य दैवाला करितां येणार नाहीं, मन, बुद्धि यांच्याप्रमाणें दैवाला कांहीं करण्याचें सामर्थ्य

आहे, असाहि अनुभव नाहीं. अर्थात् दैव खोटें आहे, असेंच म्हणावें लागतें. कर्तृत्वासंबंधानें जर कल्पना करावयाची तर पौरुषाकडेच कर्तृत्व कां देऊं नये ? सर्व कार्य करण्याचें सामर्थ्य जर दैवामध्यें आहे, असें असेल तर सर्व मनुष्यांनीं खुशाल घोरत पडावें. दैव काय करावयाचें आहे तें करील, असा अर्थ निष्पन्न होतो. सारांश, दैव केवल मूढांची कल्पना आहे. त्या कल्पनेंत जे गुरफटून जातात, त्यांचा नाश होतो. आतां दैवाच्या कल्पनेचा काय उपयोग होतो. तो वसिष्ठ सांगतातः—

**दैवमाश्वासनामात्रं दुःखे पेलवबुद्धिषु ॥ २-७-१५**

दुबळ्या बुद्धीच्या मनुष्यांना दुःखांत किंचित् समाधान व्हावें, इतकाच दैवाचा उपयोग आहे.

## दृष्टांत, युक्ति आणि ऐतिहासिक प्रमाणें यांच्या योगानें पौरुषप्रयत्नाच्या श्रेष्ठपणाचें समर्थन.

बुद्धिमान् पुरुष पौरुषाचा आश्रय करूनच उत्तम गतीला प्राप्त होतात. या जगांत जे लोक शूर, पराक्रमी, बुद्धिमान् व पंडित म्हणून प्रसिद्धीस आले, ते पौरुषाचा आश्रय केल्यामुळें. अशा स्थितींत दैवावर अवलंबून रहाण्यांत काय अर्थ आहे ? एखादा मनुष्य पुष्कळ दिवस जगणार, असें भविष्य ज्योतिषानें वर्तविलें आणि अशा स्थितींत त्या मनुष्याचा शिरच्छेद केला असतांहि तो जगला, तर मात्र दैव कार्यकारी आहे असें म्हणतां येईल. एखादा मनुष्य पंडित होणार, असें ज्योतिषानें भाकित केलें; परन्तु अध्ययन न करतां तो मनुष्य विद्वान् होऊं शकला, तर दैवांत सामर्थ्य आहे, असें म्हणणें योग्य होईल. बुद्धि, मन आणि इंद्रियें यांचा प्रयत्न हें पुरुषार्थाचें साधन असून त्यांच्या योगानें फल प्राप्त झाल्यावाचून रहात नाहीं. चित्ताच्या ठिकाणीं विषयाची ज्याप्रमाणें स्फूर्ति होते, त्याप्रमाणें मनाचा व्यापार सुरू होतो. तदनुसार देहांतील अवयवांच्या क्रिया होऊं लागतात; व अखेरीस क्रियेप्रमाणें फलसिद्धि होते. बाल्यावस्थेपासून सर्व ठिकाणीं ही गोष्ट अनुभवानें सिद्ध झालेली आहे. परंतु दैवानें कार्य सिद्ध होतें, असें मात्र कोठेंहि दिसून येत नाहीं. अर्थात् जगांत पौरुषच श्रेष्ठ आहे. यासंबंधीं खालील दाखले प्रसिद्ध आहेत.

(१) शिलाद—या नांवाचा एक मुनि निपुत्रिक होता त्यानें पुत्रप्राप्त्यर्थ शंकराची आराधना करून त्याला प्रसन्न करून घेतले. शंकरानें 'वर माग' असें म्हणतांच आपल्याला पुत्रप्राप्ति व्हावी, असा त्यानें वर मागितला. त्यावर 'मीच अंशावतार धारण करून तुझ्या पोटीं येईन, परंतु माझ्या अंशापासून झालेला तो पुत्र सोळाव्या वर्षी मृत्यु पावेल,' असें शंकरानें सांगितलें. पुढें शंकराच्या वराप्रमाणें शिलादाला नंदि नांवाचा पुत्र झाला. आपला मृत्यु सोळाव्या वर्षी आहे, ही गोष्ट समजतांच नंदीनें तपश्चर्या करून शंकराची आराधना करण्यास सुरवात केली. सोळावें वर्ष भरत आलें तरी नंदीचें तप चालूंच होतें. इतक्यांत त्याचा मृत्युसमय प्राप्त झाला. नंदि सरोवराच्या काठीं शिवलिंगार्चन करीत असतां यमानें आपले पाश टाकून त्याला बांधलें, परन्तु तितक्यांत शंकर प्रगट होऊन त्यांनीं त्याला यमाच्या हांतून सोडवलें; आणि त्याला जरामरणरहित असा आपला अनुचर केलें.

(२) बलि—प्रभृति दानवांनीं तपादि शुभ उद्योग करून हत्ती कमलिनीचा विध्वंस करून टाकतात, त्याप्रमाणें सकल ऐश्वर्यसंपन्न आणि महापराक्रमी अशा देवांचाहि विध्वंस केला.

(३) मरुत—राजाच्या यज्ञांत इंद्रानें विघ्न उत्पन्न केलें, तेव्हां संवर्त ऋषीनें आपल्या तपोबलानें देवासुरांनें युक्त असलेली ब्रह्मदेवाच्या सृष्टिसारखी दुसरी सृष्टि निर्माण केली.

(४) विश्वामित्रानें मोठ्या दृढनिश्चयानें वारंवार उग्र तपश्चर्या करून दुष्प्राप्य असें ब्राह्मणत्वहि संपादन केलें.

(५) उपमन्यु—पाण्यांत कालवलेलें पीठ अमृताप्रमाणें प्राशन करणाऱ्या, अठरा विश्वें दरिद्री उपमन्यूनें आपल्या तपःसामर्थ्यानें क्षीर-समुद्र प्राप्त करून घेतला.

(६) श्वेतमुनि—त्रैलोक्यांतील केवळ मल्लच असे ब्रह्मा, विष्णू आणि महेश यांना तृणाप्रमाणें भक्षण करणाऱ्या कालालाहि श्वेतमुनीनें आपल्या दृढ भक्तीनें जिंकलें.

(७) सावित्री—पतिव्रता सावित्रीनें नम्रपणानें यमाशीं भाषण करून मोठया युक्तीनें यमाला जिंकलें आणि आपल्या सत्यवान् नामक पतीला परलोकांतून परत आणलें.

(८) अगदीं अलीकडचें उदाहरण म्हणजे श्री शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापिलें, तें पौरुषाच्या सामर्थ्याचेंच प्रत्यक्ष फल होय.

अशा तऱ्हेचीं अनेक ऐतिहासिक उदाहरणें देतां येतील. असो, आपल्या कुटुंबाचें पोषण करणें, शत्रूवर चढाई करून जाणें, विलास भोगणें वगैरे सर्व गोष्टी मनुष्याच्या पौरुषप्रयत्नांचेंच फल आहे. ताईत, मंत्र वगैरेचा त्या ठिकाणीं कांहीं उपयोग नाहीं.इतकेंच नव्हे,तर नानातऱ्हेच्या उच्चनीच स्थितींच्या फेऱ्यांत सांपडलेले बुद्धिमान् पुरुष पौरुषाचा आश्रय केल्यामुळें त्यांच्यावर आलेल्या मोठमोठया संकटांतून बचावले आहेत. औरंगजेब बादशहाच्या कारागृहांत सांपडलेले श्री शिवाजी महाराज दैवावर भरंवसा न ठेवतां मोठया युक्तीनें व पौरुषानें आग्र्याहून सुटले, ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. सारांश, सर्व गोष्टी पौरुषानेंच सिद्ध होतात. जो भोजन करितो, तोच तृप्त होतो. जो भोजन करीत नाहीं, तो तृप्त होत नाहीं. जो वाट चालतो, तोच मुक्कामाला जाऊन पोहोंचतो. जागच्याजागीं बसून राहणारा पोहोंचत नाहीं. जो भाषण करितो, तो दुसऱ्यावर परिणाम करूं शकतो. जो बोलतच नाहीं, त्याचा कांहींच परिणाम होऊं शकत नाहीं, या उदाहरणावर पौरुषामुळेंच फलप्राप्ति होते हें ठरतें. जो मनुष्य जसाजसा प्रयत्न करतो, तसें तसें फल त्याला मिळतें, परंतु स्वस्थ बसून कोणतेंहि फल मिळत नाहीं.

सर्व दुःखांचा क्षय होण्याच्या कामीं पौरुषप्रयत्नाव्यतिरिक्त दुसरा उपाय नाहीं. परंतु वाटेल तसा प्रयत्न करून कांहीं उपयोग नाहीं. कारण कितीहि भरमसाट प्रयत्न केला तरी दगडापासून रत्न कधीं तरी पैदा झालें आहे कां ? तो पौरुषप्रयत्न सच्छास्त्राचा व्यासंग आणि सत्पुरुषांचा सहवास यांनीं युक्त असला तर तो आत्मज्ञान करून देण्याला समर्थ होतो. याविरहित केलेला प्रयत्न सफल होत नाहीं. हा पुरुषप्रयत्न लहानपणापासूनच केला पाहिजे. तेव्हांपासून

त्याला वर सांगितल्याप्रमाणें सच्छास्त्र व सत्संग यांची जोड असली पाहिजे. तशी असेल तर आत्मज्ञान होऊं शकतें.

लोक आणि शास्त्र यांना अविरोधी अशा वृत्तीचा अवलंब करून मनाला संतुष्ट राखावें. आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न करून आत्मज्ञानाच्या बाबतींत मनाला उद्विग्न होऊं न देतां सज्जनांचा* सहवास आणि सच्छास्त्राचा+ निरंतर अभ्यास करावा. प्राप्त झालेल्या अर्थानें संतुष्ट राहून जो निंद्यकर्मापासून पराङ्मुख होतो आणि सत्पुरुष व सच्छास्त्र यांची कास धरतो तो लवकर मुक्त होतो.

पूर्वजन्मांतील कर्मानें मनुष्याच्या मनामध्यें शुभ व अशुभ वासना उत्पन्न होतात व त्यामुळेंच कायिक, वाचिक व मानसिक कर्में निर्माण होतात. 'जशी वासना तसें कर्म', असा नियम आहे. शुभ आणि अशुभ असे वासनेचे दोन प्रकार आहेत. आपल्या मनांत पूर्वकर्मामुळें अशुभ वासना उत्पन्न झाली आहे, असें दिसून आलें कीं, दृढ विचारानें व अभ्यासानें शुभ वासना जोरदार करून अशुभ वासना क्षीण करून टाकावी. प्राक्तन कर्मानें (दैवानें) आपली सध्याची स्थिति नियमित झाली आहे व आपल्याला कर्मांच्या बाबतींत मुळींच स्वातंत्र्य नाहीं, अशी भावना झालेली असते, ती बरोबर नाहीं. वासना (शुभ किंवा

---

* सज्जनः—लोभमोहरूषां यस्य तनुतानुदिनं भवेत् ॥
यथाशास्त्रं विहरति स्वस्वकर्मसु सज्जनः॥ ४-३३-१५

" ज्याचे लोभ, मोह व क्रोध हे दोष कमी कमी होत चालले आहेत व जो वर्णाश्रमाला अनुसरून प्राप्त झालेलीं कर्में यथाशास्त्र करण्यांत मग्न झाला आहे, त्याला **सज्जन** म्हणतात.

+ सच्छास्त्रः—अध्यात्मविद्या विद्यानां प्रधानं तत्कथाश्रयम् ॥
शास्त्रं सच्छास्त्रमित्याहुर्मुच्यते तद्विचारणात्॥३-६-२१

सर्व विद्यांमध्यें अध्यात्मविद्या श्रेष्ठ असून ज्या शास्त्रामध्यें अध्यात्मविषयक कथा प्राधान्यें करून असतात त्याला सच्छास्त्र असें म्हणतात आणि ह्या शास्त्राच्या परिशीलनानें मनुष्य मुक्त होतो.

अशुभ ) पूर्वकर्मानें निर्माण होईल; परंतु तदनुसार कर्म करणें किंवा न करणें हें आपल्या हातचें आहे. याशाठीं शुभवासना वाढवून 'अशुभ वासनांचा नायनाट करावा व या कार्मी मनाचें सर्व सामर्थ्य खर्ची घालावें. शुभ वासना दृढ करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पुढें स्वकर्माच्या निष्काम आचरणानें चित्त शुद्ध होऊन साक्षात्कार झाला म्हणजे शुभ वासनांचाहि त्याग करण्याचा अभ्यास केला पाहिजे. कारण, सर्व वासना नाहींशा झाल्याशिवाय परमानंदाची स्थिति लाभणार नाहीं.

## उपसंहार.

सारांश, या जगांत सर्व कांहीं पौरुषप्रयत्नानें साध्य होत असतें. राजेलोक झाले तरी पौरुषप्रयत्नानें राज्यें संपादन करीत असतात. कोणीं आयतें राज्य आणून त्यांच्या स्वाधीन केलें आहे, असें केव्हांहि घडत नाहीं. यास्तव राजस आणि तामस यांसारख्या कोणत्याहि कनिष्ठ जातींच्या पुरुषांनीं निराश होऊन स्वस्थ बसूं नये; तर त्यांनींहि चिखलांत रुतलेल्या गाईप्रमाणें आपल्या बुद्धीला विषयपंकांतून बाहेर काढण्याचा प्रयत्न करावा. संतांना सात्त्विकी जातीचा जो उत्तम जन्म प्राप्त झालेला असतो, तेंहि त्यांच्या आत्मविवेकाचें व पौरुष प्रयत्नाचेंच फल होय. *चित्तरूपी स्फटिक मणि पौरुषप्रयत्नामुळें अत्यंत निर्मळ झाला म्हणजे* त्याच्यामध्यें शुद्ध आत्मस्वरूपाचें प्रतिबिंब पडतें. यास्तव बाहेर शास्त्रानें आंखून दिलेल्या मार्गानें सदाचरण करावें, पण आंतून सर्व एषणांचा त्याग करावा. कोल्ह्याप्रमाणें स्वार्थैकपरायण आणि परवंचक बनूं नये. तसेंच मूढ बालकाप्रमाणें यथेष्टाचरणहि करूं नये. शुद्ध सात्त्विक जीवन्मुक्तांचे ठिकाणीं असणारे शमदमादि स्वाभाविक गुण, जे पुरुष पौरुषप्रयत्नामुळें आपल्या अंगीं बाणवून घेतात, ते क्रमाक्रमानें ज्ञानसंपन्न होऊन शेवटीं जीवन्मुक्त होतात. या भूतलावर, अंतरिक्षांत किंवा देव लोकांत अशी एकहि वस्तु नाहीं कीं, जी पौरुषप्रयत्न करणाऱ्या गुणवान् पुरुषाला प्राप्त होत नाहीं. अर्थात् दीर्घोद्योगानें सर्व कांहीं प्राप्त होतें. सारांश, दैव आणि पौरुष यांच्या बलाबलाचा विचार करून पौरुषप्रयत्नानें वागलें असतां निश्चयानें यशप्राप्ति होते, अशी मुमुक्षूंनीं आपल्या मनाशीं खूणगांठ बांधून

ठेवावी, आणि सत्पुरुषांची सेवा करून आत्मज्ञानासाठीं प्रयत्न करावा. या जन्मांत केलेला पौरुषप्रयत्न निश्चयानें सिद्धीस जातो असें जाणून, ब्रह्मज्ञानी पुरुषांना अनन्यभावानें शरण जाऊन त्यांनीं दिलेल्या उत्कृष्ट आणि मधुर अशा आत्मज्ञानोपदेशरूपी औषधाचें सेवन करून जन्ममरणरूपी रोग नाहींसा करावा.

आतां यावर कोणी असें म्हणेल कीं, दैवाचें सर्वस्वी निराकरण करून चालणार नाहीं; कारण दैव जर मुळींच मानलें नाहीं, तर आपण ज्या अनेक अघटित घटना पाहतों, त्यांची उपपत्ति लावतां येणार नाहीं. एखाद्या राजाला वारस नसल्यामुळें हत्तीला शृङ्गारून त्याच्या सोंडेंत एक हार देण्यांत येतो व तो हत्ती ज्या मनुष्याच्या गळ्यांत हार घालील, त्याला राज्यपद देण्याची पूर्वी वहिवाट असे.* अशा तऱ्हेनें हत्तीनें एखाद्या भिक्षुकाच्या गळ्यांत हार घालावा व त्याला राज्यपद देण्यांत यावें ! अगदीं अशासारखी अलीकडील गोष्ट म्हणजे श्री सयाजी महाराज राज्यपदावर आरूढ होण्याच्या पूर्वी गुरें राखीत असतां त्यांची निवड होऊन ते एका दोन कोटींच्या संस्थानाचे अधिपति झाले, ही होय ! गिरणींतील एखाद्या मजुरानें लॉटरीचें तिकिट घ्यावें व त्याचें पन्नास हजार रुपये बक्षीस येऊन तो मजूर अनेक नोकर ठेवण्यासारखा एकदम श्रीमंत व्हावा; याची उपपत्ति लावतां येत नाहीं. या उलट मनुष्याच्या ध्यानीमनीं नसतां त्याला अपघात व्हावा ! रस्त्यांतून चालतां चालतां अंगावर वीज पडावी ! राष्ट्रांत लढाई अगर यादवी उत्पन्न होऊन आपला कांहीं एक संबंध नसतांना व आपण सद्वर्तनानें व सद्विचारानें वागत असतांहि आपलीं बायकापोरें आपल्या डोळ्यादेखत मारलीं जावींत ! यावरून दैवगति विचित्र आहे, असें मानणें भाग पडतें.

यांस उत्तर असें आहे कीं, दैवगति हें तरी पूर्वजन्मींच्या शुभ व अशुभ प्रयत्नांचेंच प्राप्त फल आहे, असा विचार करून चांगल्या गोष्टी ( सयाजी महाराजांना राज्य मिळालें त्याप्रमाणें ) प्राप्त झाल्या असतां या जन्मींच्या

---

* या ग्रंथाचा भाग दुसरा–गाधि ब्राह्मणाची गोष्ट २० वी यांत चांडालाच्या गळ्यांत हत्तीनें माळ घातली म्हणून त्याला राज्यपद मिळालें, असें वर्णन आहे.

प्रयत्नांत भर पडून दुधांत साखर पडल्यासारखें होईल व वाईट गोष्टी प्राप्त झाल्या असतां, प्राक्तन जन्मांतील वाईट कर्मांचें हें फल मला मिळत आहे, तेव्हां या जन्मीं तरी माझ्या हातून वाईट कर्मे होऊं नयेत, असा मनास बोध मिळून नेटानें उद्योग केला असतां वाईटांतूनहि चांगलें निघेल. याप्रमाणें विचार करून योग्य दिशेनें प्रयत्न करीत राहणेंच श्रेयस्कर ठरतें.

शिवाय वरील उदाहरणें हीं नियम नसून अपवाद आहेत, म्हणून त्यांचा आधार घेऊन स्वस्थ बसणें योग्य होणार नाहीं. पुरुषार्थाचा परिणाम मनुष्यास सतत अधिक कार्यक्षम करण्यांत व दुर्दैवाच्या कल्पनेची तीव्रता कमी करण्यांत होईलच होईल, असा सूज्ञ माणसानें विचार करून सतत पौरुष प्रयत्नाचाच अवलंब करावा, हेंच योग्य ठरतें.

## नियतीचें स्वरूप.

उत्पत्ति प्रकरण सर्ग ६२ मध्यें या नियतीचें वर्णन आलें आहे. वसिष्ठांनीं परब्रह्माची स्पंदरूपधारण करणारी जी चिच्छक्ति हिलाच नियति असें म्हटलें आहे. या नियतीला महाशक्ति, महासत्ता, महादृष्टि, महाक्रिया इत्यादि निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं आहेत. ही ईशसंकल्प-रूप नियति ईश्वराच्या सामर्थ्यामुळें उदयास आली असून तिच्यामध्यें केव्हांहि बदल होऊं शकत नाहीं. या नियतीच्या अनुरोधानें परमेश्वर सृष्टीच्या आरंभीं ज्या ज्या पदार्थांचे संकल्प करितो, ते ते पदार्थ भासमान होऊं लागतात व ते कल्पांतापर्यंत कायम टिकतात. उदाहरणार्थ स्पंद हा वायूचा गुणधर्म असावा, अशी कल्पना ईश्वरानें सृष्टीच्या आरंभीं केली असून वायूचा तो धर्म अद्यापि कायम आहे. ज्या पोकळीची कल्पना ईश्वरानें केली, तिला आकाश म्हणतात व त्या पोकळीमध्यें जी स्पंद कल्पना केली आहे, तिला वायु म्हणतात. सर्व वस्तूंमध्यें जी हालचाल होतांना दिसते, तिचें कारण हा वायूच होय. अखिल स्थावरजंगम पदार्थांमध्यें वायु असतो. ह्या वायूला प्राण असें म्हणतात. जंगम वस्तूमध्यें प्राणवायूची हालचाल व्यक्तरूपानें दिसते, पण स्थावर पदार्थांत तशी दिसत नाहीं, हाच काय तो स्थावर आणि जंगम वस्तूंमध्यें भेद आहे. सारांश, आदिसर्गामध्यें परमेश्वरानें पदार्थांच्याबद्दल जशी भावना केली आहे, तदनुसार जगांतील पदार्थ सक्रिय

किंवा अक्रिय बनले आहेत; आणि ही नियति आदिसर्गापासून अद्याप-पावेतों अबाधित राहिली आहे व यापुढेंहि जगाच्या अंतापर्यंत तशीच रहाणार. ह्या नियतीला दैव असेंहि म्हटलें आहे. ही दैवरूप नियति जगामध्यें उत्पन्न होणाऱ्या सर्व प्राण्यांच्या कर्मानुसार त्याला फल देण्याची व्यवस्था लावीत असते. "अमुक प्राण्यानें अमुक अमुक तऱ्हेनें हालचाल करावी व अमुक रीतीनें भोग्य विषय भोगावे." अशा प्रकारचें प्रत्येक प्राण्याविषयींचें विचित्र भविष्य ही नियतिच ठरवीत असते. प्राण्यांचे अदृष्ट (प्राक्तन कर्म) आणि ईश्वरसंकल्परूप नियति ही दोघेंहि हें जग अस्तित्वांत असेपर्यंत निरनिराळीं राहून एकमेकांना सहाय्यभूत होत असतात. अदृष्ट आणि नियति या दोन्ही सत्ता पौरुषप्रयत्नाच्या अधीन असल्यामुळें प्रत्येक कल्याणेच्छु पुरुषानें आपल्या स्वाधीन करून घ्याव्या. आतां याविषयीं कोणी असा प्रश्न करील कीं, अदृष्ट आणि नियति यांच्या सत्तेपुढें पौरुषप्रयत्नाचें काय चालणार? परंतु याचें समाधान असें आहे कीं, परमेश्वरसुद्धां आदिसर्गापासून प्रयत्नाविषयीं पराङ्मुख असतां, तर त्याची बुद्धि, तिच्या स्पंदापासून उत्पन्न होणारें कर्म, कर्मापासून उत्पन्न होणारे भूतभौतिकादि सर्व पदार्थ, यापैकीं कांहींच उत्पन्न झालें नसतें. म्हणून परमेश्वरानें सत्यसंकल्परूप पौरुषप्रयत्न केल्यामुळें सृष्टीच्या वेळीं निर्माण केलेले पदार्थ आतांपर्यंत जसेच्या तसे टिकून राहिले आहेत व यापुढें ते कल्पान्तापर्यंत तसेच टिकून रहातील. या जगामध्यें जीवांना ज्या वस्तू प्राप्त करून घ्यावयाच्या असतील, त्या वस्तू त्यांना पौरुषप्रयत्नानेंच साध्य व्हाव्या, अशी नियति त्या जगन्नियंत्यानें ठरविली आहे. फक्त फरक काय तो एवढाच कीं, कोणाला स्वतःच्या प्रयत्नानें तर कोणाला दुसऱ्याच्या प्रयत्नानें सर्व वस्तू मिळाव्यात अशी जणूं काय परमेश्वरानें व्यवस्था करून ठेवली आहे. स्वतःच्या प्रयत्नानें मिळालें, म्हणजे त्याला पौरुषप्रयत्न म्हणतात व दुसऱ्याच्या प्रयत्नानें मिळालें म्हणजे त्याला दैव असें म्हणतात. बापाच्या पैशावर मुलानें चैन करावी किंवा सासऱ्याला मुलगा नसला कीं जावयाची पोळी पिकलीच. एखाद्याचा प्रयत्न दुसऱ्याला जसा फळ देतो तसा तो दुसऱ्याच्या हानीसहि कारण होतो.

## दैव मोठें गमतीदार आहे !

प्रयत्नानें फळ मिळालें तरी दैवच. नाहीं मिळालें तरी दैवच. दोघां विद्यार्थ्यांनीं वर्षभर सारखा अभ्यासरूप प्रयत्न केला. परंतु त्यांपैकीं एक परीक्षेंत उत्तीर्ण झाला. तो म्हणतो कीं, मी उत्तीर्ण झालों, तें माझ्या दैवांत होतें म्हणूनच झालों. दुसरा उत्तीर्ण झाला नाहीं. तो म्हणतो, कीं माझ्या दैवांतच उत्तीर्ण होण्याचें नव्हतें. याप्रमाणें प्रत्येकजण दैव मानीत असतो व प्रयत्न मात्र करीतच असतो. अशी मोठी गंमत आहे. यावरून या जगामध्यें प्रत्येक प्राणिमात्राला जें कांहीं मिळत असतें, तें त्याच्या पूर्वजन्मांतील स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या प्रयत्नाचेंच फळ आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मोक्षपुरुषार्थ मात्र ऐहिक पौरुषप्रयत्नानेंच सिद्ध होत असतो, यांत तिळमात्र शंका नाहीं.

## पौरुषप्रयत्नच श्रेष्ठ ठरतो.

प्रश्नः—अजगरवृत्तीच्या पुरुषांना स्वस्थ बसूनहि दैवानें आयतें खावयास मिळतें, तर मग प्रयत्नाची काय जरूरी आहे ?

उत्तरः—हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण दैवानें अन्न प्राप्त होतें, असें एक वेळ धरून चाललें, तरी तें चावण्याला आणि पचविण्याला प्राणवायूची हालचाल वगैरे सारखे प्रयत्न चालू असतातच कीं नाहीं ? मग त्याची क्रियाशून्यस्थिति ती कोठें राहिली ?

प्रश्नः—अन्न न खातां वायु भक्षण करूनहि कांहीं काल जगतां येणें शक्य नाहीं कां ? अशा स्थितींत जर जगतां येतें, तर त्या ठिकाणीं प्रयत्नाची काय जरूरी आहे ?

उत्तरः—हें म्हणणें चुकीचें आहे. अन्नपाण्यावांचून कांहीं काल मनुष्य जगला, तरी त्याला श्वासोच्छ्वासादि क्रिया करावी लागते ना ? कारण श्वासोच्छ्वासरूप प्रयत्न न झाल्यास मनुष्य जगणेंच शक्य नाहीं ! सारांश, अन्न मिळविणें, खाणें, पिणें, जगणें वगैरे सर्व गोष्टी प्रयत्नाधीन आहेत.

प्रश्नः—चित्ताला विश्रांति देणाऱ्या प्राणनिरोधाचा अभ्यास करून जो योगी निर्विकल्प समाधींत स्थिर झालेला असतो, तो प्राणनिरोधानें जगत असल्यामुळें, जगण्याला प्राणवायूची जरूरीच आहे, असें तरी निश्चयानें कसें म्हणतां येईल ?

उत्तरः—हेंहि म्हणणें बरोबर नाहीं. कारण जो योगी प्राणाच्या हलचालीवांचून कांहीं काल जगूं शकतो, त्याच्या त्या जगण्याला प्राणनिरोधाचा प्रयत्न कारणीभूत झालेला असतो. त्याला कांहीं नुसत्या दैवावरच जगतां येत नाहीं.

यावरून शेवटीं शास्त्रीय पौरुषप्रयत्नच दैवाहून श्रेष्ठ आहे, असेंच स्पष्ट दिसून येतें.



# प्रकरण १४ वें.

## मोक्षाचे चार द्वारपाल.

अंतःकरणाची शुद्धि झाल्याशिवाय आत्मज्ञानाचा उपदेश ग्रहण करण्याचा अधिकार प्राप्त होत नाहीं, हा जो सर्व अध्यात्मग्रंथांचा सिद्धांत, तो वासिष्ठाला पूर्णपणें मान्य आहे. हें खालील श्लोकावरून स्पष्ट दिसतें:—

मनस्युपशमं याते त्यक्तभोगैषणे स्थिते ॥
कशायपाके निवृत्ते सर्वेंद्रियगणस्य च ॥नि. पू. १०१-१०
यांति चेतसि विश्रांतिं विमला देशिकोक्तयः ॥
यथा सितांशुके शुद्धे बिंदवः कुंकुमांभसः ॥ नि. पू.१०१-११
वासनात्मसु यातेषु मलेषु विमलं सखे ॥
यद्वक्ति गुरुरन्तस्तद्विशतीषुर्यथा बिसे ॥ नि. पू. १०१-१४

" सर्व विषयोपभोगांच्या तृष्णा टाकून मन शांत झालें असतां व सर्व इंद्रियांची आपआपल्या विषयांसंबंधीं असणारी आसक्ति निवृत्त झाली असतां, चित्तांत सद्गुरूंच्या निर्मल उपदेशोक्ति शुभ्र वस्त्रावर केशरी रंगाच्या थेंबाप्रमाणें विश्रांति पावतात. वासनारूपी मळ निघून गेले असतां कमलनालांत बाण जसा घुसतो, त्याप्रमाणें शुद्ध झालेल्या अंतःकरणांत गुरु जें बोलतो तें प्रवेश करतें."

स्मृतिकारांनीं सांगितल्याप्रमाणें ' कशाये कर्मभिः पक्के ततो ज्ञानं प्रजायते ' म्हणजे स्वकर्मांच्या अनुष्ठानानें मनाचे कामक्रोधादि मळ नाहींसे झाले असतां आत्मज्ञान प्रकट होतें. असा शुद्धांतकरण झालेला मनुष्य आत्मज्ञानाचा अधिकारी म्हणजे श्रीमत् शंकराचार्यांचे वेळेपासून थोड्याशा निराळ्या तऱ्हेनें प्रसिद्धीस आलेलें साधनचतुष्टय यानें संपन्न होतो. हें साधनचतुष्टय पुढीलप्रमाणें आहे.

### साधनचतुष्टय.

( १ ) नित्यानित्यवस्तुविवेकः—नित्यवस्तु व अनित्यवस्तु कोणती हें समजणें.

( २ ) इहामुत्रफलभोगविरागः—इहलोकांतील व परलोकांतील विषयासंबंधीं वैराग्य.

( ३ ) तीव्रमुमुक्षाः—संसारांतून सुटण्याची उत्कट इच्छा.

( ४ ) शमदमादिषट्कसंपत्तिः—( १ ) शमः—मनाची शांति, ( २ ) दमः—सर्व इंद्रियांचा जय, ( ३ ) उपरमः—विषयोपभोगाविषयीं आसक्ति नसणें, ( ४ ) तितिक्षाः—सुखदुःखादि द्वंद्वें सहन करणें, ( ५ ) श्रद्धाः—वेद, शास्त्र व गुरु यांवर विश्वास, आणि ( ६ ) समाधानः—प्रारब्धानुसार जें कांहीं मिळेल, त्यावर संतुष्ट रहाणें.

हीं चार साधनें प्राप्त झाल्याशिवाय आत्मज्ञानाचा उपदेश ग्रहण करण्याचा अधिकार प्राप्त होत नाहीं. पण मुमुक्षुव्यवहार प्रकरण सर्ग १६ मध्यें

संतोषः साधुसंगश्च विचारोऽथ शमस्तथा ॥
एतएव महांभोधावुपायास्तरणे नृणाम् ॥ २-१६-८

" वसिष्ठांनीं संसारसमुद्रांतून तरून जाण्यास शम, संतोष, विचार व साधुसमागम हे चार उपाय किंवा चार साधनें सांगितली आहेत. " हीं साधनें वरील श्रीमदाचार्यांच्या साधनचतुष्टयाहून थोडीशीं निराळीं आहेत. कारण आचार्यांनीं चारीहि साधनें आवश्यक म्हणून मानलीं आहेत. पण वासिष्ठांतील हीं चार साधनें वैकल्पिक मानलीं आहेत. कारण या चारांपैकीं कोणतेंहि साधन चांगलें संपादन केलें म्हणजे बाकीचीं तिन्हीं साधनें आपोआपच प्राप्त होतात, हें पुढील दोन श्लोकांत दाखविलें आहेः—

एकस्मिन्नेव वै तेषामभ्यस्ते विमलोदये
चत्वारोऽपि किलाभ्यस्ता भवंति सुधियां वर ॥ २-१६-२१
एकोऽप्येकोऽपि सर्वेषामेषां प्रसवभूरिव ॥
सर्वसंसिद्धये तस्माद्यत्नेनैकं समाश्रयेत् ॥ २-१६-२२

'या चार उपायांपैकीं कोणत्याहि एका उपायाचा एकाग्रतेनें अभ्यास करून त्याची प्राप्ति करून घेतली असतां बाकीच्या सर्व उपायांची प्राप्ति होते. यासाठीं दृढ प्रयत्नानें कोणताहि एक उपाय संपादन करावा.'

मोक्षाचे चार द्वारपाल




**शम, विचार, संतोप व सत्संग हे मोक्षमंदिराच्या** द्वारावरील चार द्वारपाल आहेत. यापैकीं कोणताहि एखादा 'द्वारपाल जरी तुझ्या हस्तगत झाला, तरी बाकीचे द्वारपाल तुला वश होऊन मोक्षरूपी राजमंदिराचें द्वार तुला खुलें करून देतील. (पृष्ठ ८६.)

हे वरील चार उपाय म्हणजेच शम, विचार, संतोष व सत्संग हे मोक्षमंदिराच्या द्वारावरील चार द्वारपाल आहेत, असें वर्णन करण्यांत आलें आहे. यांपैकीं कोणताहि एखादा द्वारपाल जरी तुझ्या हस्तगत झाला, तरी बाकीचे द्वारपाल तुझ्या वश होऊन मोक्षरूपी राजमंदिराचें द्वार तुला खुलें करून देतील. या चार मोक्षोपायांचें खालीं संक्षेपानें वर्णन केलें आहेः—

## (१) शम.

शमेनासाद्यते श्रेयः शमोहि परमं पदम्॥
शमः शिवः शमः शांतिः शमो भ्रांतिनिवारणम्॥ २-१३-५२

"शमानेंच मनुष्याला मोक्ष प्राप्त होतो. शम हेंच परमपद, म्हणजेच मोक्षपद आहे. शम म्हणजेच शिव व शम म्हणजे शांति व शम हाच सर्व भ्रांतीचें निवारण करणारा आहे."

शम म्हणजे शांति ही ज्याला लाभली त्याचे शत्रुसुद्धां मित्र बनतात. शमसंपन्न मनुष्याबद्दल सर्व मृदु आणि क्रूर पशूंना प्रेम वाटूं लागतें. शमानें संपन्न असून सर्व जीवांवर प्रेम करणाऱ्या मनुष्याच्या ठिकाणीं आत्मज्ञान आपोआप प्राप्त होतें. शम हेंच खरें अमृत आहे, कारण या शमामुळें मनुष्याच्या मनाला जितकें सुख प्राप्त होतें, तितकें स्वर्गांतील अमृताचें आकंठ पान करण्यास मिळालें असतांहि होऊं शकत नाहीं. ज्याची बुद्धि शांत झाल्यामुळें इतरांची कुटिलता पाहूनहि ज्याच्या चित्तांत विषाद उत्पन्न होत नाहीं, तोंच खरा शांत होय. मरण, उत्सव व युद्ध अशा प्रसंगींहि ज्याचें मन नेहमींसारखेंच शांत असतें, त्यालाच शांत असें म्हणतात. ज्याची दृष्टि सर्वांवरून दयेनें फिरत असतां आपल्यावर अमृताचा वर्षाव होत आहे कीं काय असें लोकांना वाटतें, तोंच शांततेचा पुतळा होय. अशा शांतीचा ठेवा मोठमोठ्या पूज्य पुरुषांनीं अत्यंत दक्षतेनें रक्षण केला आहे व तिच्याच आश्रयानें ते परमपदाप्रत जाऊन पोहोंचले.

## ( २ ) विचार.

कोऽहं कथमयं दोषः संसाराख्यउपागतः ॥
न्यायेनेति परामर्शो विचार इति कथ्यते ॥ २-१४-५०.

" देहादिक मी आहे, कां मी त्यांच्याहून निराळा आहे ? हा संसाररूपी दोष आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं कसा उत्पन्न झाला ? वगैरे प्रश्नांचें श्रुतिस्मृतींनें दाखविलेल्या मार्गानें निरंतर चिंतन करणें यालाच **विचार** असें म्हणतात."

अशा तऱ्हेचा विचार करण्याला मनुष्याची बुद्धि शास्त्रज्ञानानें प्रथम शुद्ध झाली पाहिजे. अशा शुद्ध झालेल्या बुद्धीनें विचार केला असतां तिच्यामध्यें परमपदाचा ( ब्रह्माचा ) अनुभव घेण्याचें सामर्थ्य उत्पन्न होतें. संसाररूपी दीर्घरोगावर विचार हेंच जालीम औषध आहे, प्रपंचामध्येंहि एकदां मनुष्य संकटांत सापडला असतांना त्या वेळीं आपलें कर्तव्य काय ? संकटांचें निवारण करण्यासाठीं कोणता उपाय सफल होईल ? व कोणता निष्फल होईल ? वगैरे गोष्टींचा निर्णय मनुष्य विचारानेंच करूं शकतो. त्याचप्रमाणें वेद आणि वेदांताचे सिद्धांत व त्यापासून उत्पन्न होणारे विविध प्रश्न यांचा निर्णय करण्याला मनुष्य विचारामुळेंच समर्थ होतो. व्यवहारांत वागत असतांना देखील सुज्ञ मनुष्यानें नेहमीं विचारयुक्त असावें.

शास्त्रकारांनीं विचार हा पांच प्रकारचा सांगितला आहेः—

( १ ) अर्थानर्थानुबंध विचारः—विषयोपभोगाविषयीं मनुष्याची स्वाभाविक प्रवृत्ति अनर्थ निर्माण करणारी आहे व शास्त्रीय प्रवृत्ति मोक्षरूपी पुरुषार्थ निर्माण करणारी आहे असा विचार.

( २ ) सारासार विचारः—सर्व देह बीजतः व परिणामतः अमंगल आहेत व ब्रह्मलोकापर्यंतचें सर्व सुख अनित्य व दुःखमिश्रित आहे असा विचार.

हे दोन विचार वैराग्य व मुमुक्षा निर्माण करणारे आहेत.

( ३ ) हेयोपादेय विचारः—मोक्षाचें साधन, कर्म, उपासना किंवा ज्ञान आहे ? किंवा यांचा समुच्चय आहे ? कां केवळ ज्ञानच आहे ?

इत्यादिकांचा निर्णय करून शेवटीं टाकावयाचें काय व घ्यावयाचें काय असा विचार.

( ४ ) प्रणामतात्पर्य विचारः—ज्ञानच मोक्षाचें साधन आहे, असें ठरल्यावर तें सांख्य वैशेषिकादिकांना अभिमत असणारें ? कीं कपिल गौतमादिकांनीं सांगितलेलें ? कीं श्रुतिप्रतिपादित ? यांचा विचार.

( ५ ) आत्मतत्त्वपरीक्षा विचारः—श्रुत्यादि प्रमाणांनीं एक सच्चिदानंद ब्रह्मच आहे, असा जरी निश्चय केला असला तरी तो आपल्या स्वतःच्या ठिकाणीं संभवतो कीं नाहीं याचा गुरुशास्त्रपुरःसर केला जाणारा विचार.

अशा तऱ्हेनें विचार केला असतां तत्त्वज्ञान होतें व त्यायोगें आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं चित्ताला विश्रांति मिळते. आतां ' मी कोण आहें ' इत्यादि आत्मस्वरूपक विचारहि वैराग्याभ्यासपूर्वक होत असेल, तरच सफल होतो. ज्याप्रमाणें औषधाचें पथ्यपूर्वक सेवन करीत गेलें, तर हळुहळु रोगनिवृत्ति होत जाते, त्याचप्रमाणें आत्मानात्मविवेकाबरोबर इंद्रियजयाचा अभ्यास करीत गेलें, तरच तो विवेक सफल होण्याची आशा आहे. विवेक वरकांती उपयोगी नाहीं, असें वसिष्ठ सांगतातः—

विवेकोऽस्ति वचस्येव चित्राग्निरिव भास्वरः ॥
यस्य तेनापरित्यक्ता दुःखायैव विवेकिता ॥ ४-१८-६७.

" तोंडाच्या बडबडींत मात्र विवेक पण अंतर्यामीं त्याचा गंधहि नाहीं, असें असेल तर चित्रांतील अग्नीप्रमाणें असल्या वाचिक विवेकाचा काडीमात्र उपयोग नाहीं. असला विवेक अविवेकता नष्ट न करितां परिणामीं दुःखालाच कारणीभूत होतो. "

नुसता वारा हा शब्द कानावर पडल्यानें त्याचें अस्तित्व कळत नसतें, तर त्यासाठीं वायूचा अंगाला स्पर्श व्हावा लागतो. त्याचप्रमाणें ' मी विवेकी आहे ' असें तोंडानें बडबडल्यानें विवेकाची पारख होत नाहीं, तर विषयतृष्णेच्या न्यूनतेवरून विवेकाची खरी पारख होत असते. हीच गोष्ट वसिष्ठ आणखी जास्त स्पष्ट करून सांगतातः—

चित्रामृतं नामृतमेव विद्धि चित्रानलं नानलमेव विद्धि ॥
चित्रांगना नूनमनंगनेति वाचोविवेकस्त्वविवेक एव॥ ४-१८-६९

" चित्रांतील अमृत हें खरें अमृत नव्हे, चित्रांतील अग्नि हा खरा अग्नि नव्हे, चित्रांतील स्त्री ही खरी स्त्री नव्हे, त्याप्रमाणें केवळ वाचेंतील विवेक म्हणजे खरा विवेक नव्हे तर तो अविवेकच होय. "

प्रथम विवेकाच्या योगानें विषयप्रीति क्षीण होते, नंतर आत्मज्ञानाचा उदय होऊन इष्टानिष्टविषयक रागद्वेषाची प्रवृत्ति अजिबात नाहींशी होते. यास्तव ज्या पुरुषांच्या ठिकाणीं विवेक बुद्धि निरंतर जागृत झाली असेल, अशा पुरुषांनाच सर्व ठिकाणीं ब्रह्मदृष्टि होऊं शकेल.

## ( ३ ) संतोष.

संतोषोहि परं श्रेयः संतोषः सुखमुच्यते ॥
संतुष्टः परमभ्येति विश्राममरिसूदन ॥ २-१५-१.

' संतोष हाच मोक्ष, संतोष हेंच आत्यंतिक सुख व संतोष हीच परम विश्रांति, म्हणजेच आत्यंतिक दुःखनिवृत्ति होय. "

अशा संतोषानें युक्त असणाऱ्या मनुष्याला साम्राज्यसुद्धां तृणवत् वाटतें. प्राप्त झालेल्या वस्तूबद्दल हर्ष व अप्राप्त वस्तूबद्दल विषाद यांचा ज्याच्या स्थिर चित्ताला स्पर्शहि होत नाहीं, त्यालाच संतुष्ट असें म्हणतात. अप्राप्त वस्तूंची ज्याला हाव नसते व जो आपल्या प्रारब्धानें मिळालेलें सुखदुःख निर्विकार मनानें भोगतो, तसेंच ज्याचें आचरण उत्तम असून लोकांना आनंददायी असतें, त्यालाच संतुष्ट असें म्हणतात. ज्याच्या मनामध्यें पूर्ण संतोष नांदत असतो, त्याची सेवा करण्याकरितां ऋद्धिसिद्धि नेहमीं तत्पर असतात. म्हणजेच अशा संतुष्ट माणसाचा योगक्षेम प्रयत्नावांचून होत असतो. म्हणूनच असें म्हणतात कीं, "आशाया दासाये दासास्ते सर्व लोकस्य। आशा दासी येषां तेषां दासायते लोकः॥ " "आशेचे जे दास झाले आहेत, ते सर्व लोकांचे दास झाले आहेत व ज्यांची आशा दासी झाली आहे, त्यांचे सर्व लोक दास आहेत. "

## (४) सत्संग (साधुसमागम).

साधूचें लक्षण वासिष्ठांत पुढील श्लोकांत सांगितलें आहेः—

देशे यं सुजनप्राया लोकाः साधुं प्रचक्षते ॥
सविशिष्टः स साधुस्यात्तं प्रयत्नेन संश्रयेत् ॥ २-६-२०.

"एखाद्या देशांतले श्रुतिस्मृतिविहित आचारधर्म पाळणारे लोक ज्यास साधु म्हणून म्हणतात, असा मनुष्य ज्ञान वैराग्यादि गुणांनीं युक्त असेल तर तो साधु आहे, असें समजावें व त्याचा प्रयत्नानें आश्रय करावा."

अशा साधुपुरुषाच्या संगतीचें महत्त्व सांगतातः—

विशेषेण महाबुद्धे संसारोत्तरणे नृणाम् ॥
सर्वत्रोपकरोतीह साधुः साधुसमागमः ॥ २-१६-१.

"आतांपर्यंत मोक्षाचे जे उपाय सांगितले त्यांमध्यें साधुसमागमाचें महत्त्व विशेष आहे. कारण साधुसमागम हा कोणत्याहि अवस्थेंत उपकारकच आहे."

सत्समागम बुद्धीची वाढ करतो, अज्ञानतरूला कापून काढतो आणि सर्व मानसिक दुःखें नाहींशीं करतो. सत्संग या जगांत सन्मार्ग दाखविणारा आहे आणि हृदयांतील अंधार नाहींसा करणारा दीप असून ज्ञानरूपी सूर्याला अंतःकरणांत प्रकाशित करणारा आहे. ज्यानें सत्संगरूपी शीतल पाण्यात स्नान केलें, त्याला दानधर्म, तीर्थयात्रा, नानाविध तपें व यज्ञयागादि कर्में यांच्यापासून कोणतें पुण्य प्राप्त व्हावयाचें राहिलें आहे? अज्ञानग्रंथीचा नाश झालेल्या सत्पुरुषाची सेवा हा भवसागरांतून तरून जाण्याचा सर्वमान्य उपाय आहे. साधुसमागमाची इतकी योग्यता आहे कीं वसिष्ठांनीं रामाला असें प्रतिज्ञापूर्वक सांगितलें आहे कीं,

साधुसंगमसच्छास्त्रपरो भवसि राम चेत् ॥
तद्दिनैरेव नो मासैः प्राप्नोपि परमं पदम् ॥ २-८-६.

" साधुपुरुष व सच्छास्त्र यांची कास धरशील तर कांहीं महिन्यांत नव्हे तर कांहीं दिवसांतच तूं परमपदाप्रत जाऊन पोहोंचशील. "

सारांश, शम, विचार, संतोष व सत्संग हींच काय तीं मनुष्याला संसारसमुद्रांतून तरून नेणारीं साधनें आहेत,

संतोषः परमोलाभः सत्संगः परमा गतिः ॥
विचारः परमं ज्ञानं शमो हि परमं पदम् ॥ २-१६-१९.

" संतोष हाच श्रेष्ठ लाभ, सत्संग ही परमगति, विचार हें परमज्ञान आणि शम हेंच श्रेष्ठपद होय."

भवभय छेदून टाकणारे हे चार निर्मल उपाय असून ज्यांनीं त्यांचा अभ्यास केला आहे, असे पुरुष मोहसागरांतून तरून जातात. या चार उपायांपैकीं कोणत्याहि एका उपायाचा एकाग्रतेनें अभ्यास केला असतां बाकीच्या सर्वांची त्यापासून निष्पत्ति होते. यासाठीं दृढ प्रयत्नानें कोणत्याहि एका उपायाचा आश्रय करावा व मोठ्या प्रयत्नानें आपल्या मनाला ताब्यांत ठेवावें; अशा रीतीनें सद्गुण अंगीं बाणवून घ्यावे. मनुष्य कोणत्याहि जातीचा असला किंवा कोणत्याहि लोकांत रहात असला, तरी त्याला हे वरील सद्गुण अंगीं आणण्याशिवाय या जगांत पुरुषार्थाचा दुसरा कोणताहि उपाय नाहीं. हे गुण आपल्या अंगीं बाणवून घेण्या-करितां सत्पुरुषाची संगति धरावी. सर्व गुण एकाच पुरुषाच्या ठिकाणीं आढळून आले नाहींत, तर ज्या पुरुषाच्या ठिकाणीं जो जो विशेष गुण असेल, त्याचें ग्रहण करून आपली बुद्धि वाढवावी. मनुष्याच्या अंगीं कितीहि दोष असले तरी त्यानें एक उत्तम गुण दृढ केला असतां त्याचे सर्व दोष आपोआपच क्षीण होऊं लागतात व दोष बुद्धिंगत झाले म्हणजे गुणांचें कांहीं चालेनासें होतें. जीवाच्या मनांतील मोहरूपी वनांत वासना-रूपी प्रचंड नदी नेहमीं वहात असते. शुभ आणि अशुभ वासना हे हा नदीचे दोन तट आहेत. यांपैकीं अनिष्ट असलेला तट पाडून आपल्याला इष्ट असलेल्या मार्गानें या नदीचा प्रवाह आपल्याला दृढ प्रयत्नानें वळवितां येतो. यासाठीं अशुभ वासनांचा तट प्रयत्नानें हलुहलु पाडून टाकला म्हणजे मग सर्व वासना शुभ मार्गाचाच आश्रय करतील.

असे हे शम, विचार, संतोष व सत्समागम चार द्वारपाल मोक्षरूपी राजाच्या राजवाड्याच्या मोठ्या दरवाज्यावर बसलेले आहेत. यांना प्रसन्न करून घेण्यास फारसें कठीण नाहीं. पण या प्रपंचांत पडलेले सर्व लोक अज्ञानामुळें अविवेकी किंवा अंधळे झाले असल्यामुळें ते ह्या मोक्ष-रूपी राजाच्या राजवाड्याच्या भोंवतीं - सारखे फिरत असूनहि त्यांना ते मोठमोठे दरवाजे दिसत नाहींत व त्यामध्यें बसलेले द्वारपालहि दिसत नाहींत; तर केवळ नुसत्या राजवाड्याच्या तटाच्या भिंती मात्र सापडतात. जसा एखादा आंधळा मनुष्य राजवाड्यांत शिरण्याकरितां दरवाजा सापडावा म्हणून त्याच्या तटाच्या भिंतींना हात लावीत फिरत रहावा व दरवाजा येतांच दुर्दैवानें त्याच्या अंगाला कंड सुटून खाजविण्याकरतां भिंतीचा हात सुटावा व त्यामुळें दरवाज्याच्या जागेपुरताच दूर व्हावा, तशीच स्थिति या सर्व अज्ञानी जीवांची झाली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मोक्ष मिळविण्याची इच्छा आहे व ती परिपूर्ण करण्याकरितां अंधळ्यासारखे फिरत आहेत. ते स्वतःच जरी ब्रह्मरूप आहेत, तरीपण हें न कळल्या-मुळें म्हणजेच मोक्षाचा मार्ग अविवेकामुळें न सांपडल्याकारणानें दुर्दैवानें या भवचक्राच्या फेऱ्यांत सांपडले आहेत. पण यदाकदाचित् जर त्यांनीं अभ्यासानें व परमेश्वराच्या कृपाप्रसादानें विवेकदृष्टि प्राप्त करून घेतली, तर या मोक्षाच्या चार द्वारपालांपैकीं एकाचें तरी दर्शन घडून एकदां त्याला आपल्याला वश करून घेतां आलें कीं, मोक्षाचें द्वार खुलें झालेंच व मग सहज आंत शिरकाव होऊन मोक्षाची प्राप्ति झाल्याशिवाय राहणार नाहीं. अशा तऱ्हेचें हें मोक्ष प्राप्तीच्या साधनांचें रूपक वसिष्ठांनीं मोठ्या मार्मिक रीतीनें बनविलें आहे.



# प्रकरण १५ वें.

## योगवासिष्ठ आणि भगवद्गीता.

योगवासिष्ठ आणि भगवद्गीता या दोन ग्रंथांचा तुलनात्मक अभ्यास केला असतां या दोन्ही ग्रंथांतील विषयांपैकीं कांहीं विषय एकमेकांशीं तंतोतंत जुळणारे आहेत व कांहीं जुळणारे नाहींत, असें आढळून येतें. या दोन ग्रंथांपैकीं भगवद्गीता ही सध्यां प्रसिद्ध असलेल्या वृद्धयोगवासिष्ठा-पेक्षां पुरातन असली, तरी योगवासिष्ठ लहानशा स्वरूपांत गीतेच्यापूर्वींहि (भारतापूर्वी) असावें, असा जो तर्क या ग्रंथाचें बहिरंग निरीक्षण या मागील तिसऱ्या प्रकरणांत केला आहे, त्यावरून असें अनुमान काढल्यास कांहीं हरकत दिसत नाहीं कीं, हे दोन्ही ग्रंथ कालाच्या मानानें पुरातन आहेत व त्यांचे कर्तेहि म्हणजे श्रीमहर्षि वाल्मीकि व श्रीमहर्षि व्यास हे दोघेहि मोठे अलौकिक पुरुष असून त्यांचे ग्रंथहि मोठे अप्रतीम आहेत, यांत शंका नाहीं.

या दोन्ही ग्रंथाना जीं नांवें दिलीं आहेत, त्यांत 'योग' हा शब्द समान आहे. 'योगवासिष्ठ' या नांवांतील 'योग' या शब्दाची व्याख्या 'योगवसिष्ठ या नांवाची उपपत्ति' या पहिल्या प्रकरणामध्यें केली आहे. भगवद्गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं "इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे" इत्यादि जो संकल्पात्मक मजकूर आढळतो, त्यांत 'योगशास्त्र' या पदावरून गीतेलाहि 'योगशास्त्र' असें नांव दिलेलें आहे. 'योग' शब्दाचा अर्थ संसारांतून तरून जाण्याची युक्ति, असा जो पहिल्या प्रकरणांत दाखविला आहे, त्याप्रमाणें करण्यास हरकत नाहीं. कारण गीतें-तहि निरनिराळे योग म्हणजे मोक्षप्राप्तीचे उपाय व हे योग किती आहेत, हे प्रत्येक अध्यायाच्या अखेरीस आलेल्या संकल्पांतील 'अर्जुन-विषादयोग', 'सांख्ययोग', 'कर्मयोग' या विविध नांवावरून दिसून येतें.

योगवासिष्ठ आणि भगवद्गीता यांचा उपक्रम व उपसंहार यांसंबंधीं

विचार केल्यास असें आढळून येतें कीं, उपक्रम जरी थोडासा भिन्न असला तरी उपसंहारामध्यें तंतोतंत साम्य आहे, 'हें ' स्थितोऽस्मि गतसंदेहः ', 'नष्टोमोहः ', ' करिष्ये वचनं तव ' या भगवद्गीतेंतील १८व्या अध्यायाच्या शेवटीं आलेल्या वचनासारखीं निर्वाण प्रं. उ. सर्ग२१४मध्यें वचनें आलेलीं आहेत, त्यावरून उघड होतें. (प्रकरण ७,उपसंहार पृष्ठ४०) आतां उपक्रमाकडे पाहिलें तर मात्र दोन्ही ग्रंथांमध्यें बाह्यतः थोडा फरक दिसतो. कोणत्याहि अध्यात्मग्रंथामध्यें उपदेशाला वैराग्याचें कांहींतरी कारण घडून आल्याचें वर्णन असावें व नंतर उपदेशकाकडून त्याला आत्मज्ञानाचा उपदेश केला जावा, अशी पद्धति आहे. त्याचप्रमाणें यात्रेच्या निमित्तानें श्रीरामचंद्राच्या मनांत विषय असार आहेत, अशी विरक्तबुद्धि उत्पन्न झाल्याचें वर्णन येऊन पुढें विश्वामित्रांनीं आपल्या यज्ञामध्यें विघ्न आणणाऱ्या राक्षसांचा विध्वंस करण्याकरितां रामाला आपल्या बरोबर पाठवावें, अशी दशरथ राजाची प्रार्थना केली असतां राम विरक्त झाल्याकारणानें आपलें क्षत्रियाचें कर्तव्य वजाविण्याविषयीं सध्यां असमर्थ झालेला आहे, असें पाहून त्याला आपलें कर्तव्य कर्म पार पाडण्याचें सामर्थ्य यावें यासाठीं श्रीवसिष्ठांनीं त्याला ज्ञानोपदेश केला. परंतु अर्जुनाची स्थिति थोडी निराळी आहे. ' न योत्स्ये ' मी युद्ध करीत नाहीं, असा अर्जुनाचा हट्ट होता, असें गीतेंत वर्णन करण्यांत आलें आहे. पण हा अर्जुनाचा हट्ट कां निर्माण झाला, याचें कारण पाहिलें तर असें दिसून येतें कीं, अर्जुनाला युद्धामध्यें स्वजनांना मारल्यामुळें पातक लागण्याची भीति वाटत होती. अर्थातच हे पापपुण्याचे प्रश्न अज्ञानमूलक आहेत व हें अज्ञान दूर झालें कीं, हे सर्व प्रश्न आपोआपच सुटतील, असा विचार करून भगवंतानें त्याला ज्ञानाचा उपदेश केला व त्याला स्थितप्रज्ञ अथवा जीवन्मुक्त बनविण्याचा प्रयत्न केला. अशा तऱ्हेनें त्याची समजूत घातल्यावर शेवटीं अठराव्या अध्यायांत ' स्वभावजेन कौंतेय ' तसेंच ' ईश्वरः सर्व भूतानां ' या दोन श्लोकांत नियतीचा किंवा प्रारब्धाचा सिद्धांत स्पष्टपणें सांगितल्यावर अर्जुनाला आपला उपदेश पूर्णपणें पटला आहे, असें जेव्हां भगवंतानें पाहिलें, तेव्हां ' यथेच्छसि तथा कुरु ' असे उद्गार त्यांनीं काढले आहेत. कारण अर्जुनाला आपला उपदेश पटल्याशिवाय आपल्या केवळ भिडेस्तव

त्यानें युद्ध करावें, असें भगवंताच्या मनांत मुळींच नव्हतें. कारण स्वयंस्फूर्तीनें होणारें कर्म केव्हांहि यशस्वी होत असतें. अर्जुनानेंहि भगवंताचा सर्व उपदेश पटल्यावरच युद्धकरणें हें आपलें सध्याचें कर्तव्यकर्म व धर्म आहे, असें आपल्या मनाशीं ठरवून ' करिष्ये वचनं तव ' अशी कबुली दिली व त्याप्रमाणें युद्धहि केलें. यावरून भगवद्गीता आणि योगवासिष्ठ यांच्या उपसंहाराची पूर्ण एकवाक्यता आहे, असें दिसून येतें. आतां अर्जुनानें युद्ध केलें व रामचंद्र विश्वामित्राबरोबर त्याच्या यज्ञामध्यें विघ्न करणाऱ्या राक्षसांचा विध्वंस करण्याकरितां गेले, एवढयावरूनच कांहीं लोक भगवद्गीता व योग वासिष्ठ यांचा विषय कर्मयोग आहे असें मानतात, पण तें मुळींच योग्य नाहीं; कारण शास्त्राचा विषय नेहमीं अलौकिक असावा लागतो. आत्मज्ञान हें निसर्गतः प्राप्त नसल्यामुळें आणि कर्म हें स्वभावतः प्राप्त असल्यामुळें आत्मबोध हाच अध्यात्मशास्त्राचा विषय होण्यास योग्य आहे. आतां वास्तविक पाहूं गेलें तर गीता ही एकट्या अर्जुनाकरितां नव्हे आणि योगवासिष्ठ हेंहि एकट्या रामाकरितां नव्हे; तर अर्जुन आणि राम यांच्या निमित्तानें या दोन्ही ग्रंथांतील तत्त्वज्ञानाचा उपदेश जगांतील सर्व अज्ञजीवांच्या आत्मकल्याणाकरितां आहे. रामअवतारामध्यें भगवंतांनीं उपदेश्याची भूमिका स्वीकारली असून श्रीवसिष्ठांच्याकडे उपदेशकाची भूमिका दिली आहे. परंतु कृष्णावतारांत याच्या उलट आहे; म्हणजे भगवंतांनीं स्वतः श्रीकृष्णरूपानें उपदेशकाची भूमिका अंगिकारली आहे व आपलेंच दुसरें रूप असलेल्या अर्जुनाला उपदेश्याची भूमिका दिलेली आहे. रामअवतार व कृष्णअवतार या दोन अवतारांतील उपदेश्य व उपदेशक या जोडींतील बाह्यतः दिसणाऱ्या फरकामुळें योगवासिष्ठ आणि भगवद्गीता यांच्या उपक्रमामध्यें थोडासा फरक पडला आहे. तो असा कीं, रामाच्या मनांतील वैराग्य स्वभावतःच उत्पन्न झाल्याचें वर्णन योगवासिष्ठांत करण्यांत आलें आहे. परंतु श्रीकृष्णांनीं गीतेची भूमिका रचण्याकरितांच कीं काय, अर्जुनाच्या मनांत एकाएकीं प्रेरणा केल्यामुळें अर्जुन मोहवश झाला व आपल्या स्वाभाविक क्षात्रधर्माच्या विरुद्ध ' न योत्स्ये ' मी युद्ध करीत नाहीं, असे त्याच्या मुखांतून उद्गार निघाले. हें अर्जुनाचें वैराग्य स्वजन-

हत्येच्यामुळें लागणाऱ्या पातकाच्या भीतीमुळे निर्माण झालें होतें. जर त्याला कौरवांनीं युद्ध केल्याशिवाय राज्य दिलें असतें तर अर्जुनाला खास वैराग्य झालें नसतें. यावरून अर्जुनाच्या वैराग्यापेक्षां रामचंद्राचें वैराग्य केव्हांहि श्रेष्ठ आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणूनच मुमुक्षुप्रकरण सर्ग ११ मध्यें वसिष्ठांनीं रामाच्या वैराग्याची मोठी प्रशंसा केली आहे. त्याचें वर्णन ' श्रीरामचंद्राचें वैराग्य ' या ( ११ ) व्या प्रकरणाच्या शेवटीं करण्यांत आलें आहे.

रामचंद्राचें वैराग्य इतक्या परिपूर्ण अवस्थेला पोहोंचलें होतें कीं,प्रत्यक्ष विश्वामित्र मुनींनीं मुमुक्षुप्रकरणाच्या प्रारंभीं रामाच्या वैराग्याची प्रशंसा करतांना असें सांगितलें आहे कीं, रामाचें वैराग्य महर्षी व्यासांचा मुलगा जो शुक त्याच्यासारखेंच आहे. रामानें आपल्या सूक्ष्म बुद्धीनें सर्व कांहीं जाणलेंच आहे व तो जवळ जवळ ज्ञानी झाल्यासारखाच आहे. फक्त त्याच्या बुद्धिरूप आरशावरील साचलेला संशयाचा मळ झाडून काढण्याचें कामच तेवढें शिल्लक राहिलें आहे. शुकाच्याप्रमाणें त्याच्या बुद्धीला फक्त दृढविश्वासाचीच काय ती अपेक्षा आहे, असें सांगून शुकाची गोष्ट सांगितली. ( या ग्रंथाचा भाग दुसरा, गोष्ट पाहिली ). यावरून अर्जुनाच्या वैराग्यापेक्षां रामचंद्राचें वैराग्य कितीतरी पटीनें श्रेष्ठ आहे हें कोणीहि कबूल करील. शिवाय ' न योत्स्ये ' मी युद्ध करीत नाहीं, असा अर्जुनाचा हट्ट होता. पण रामाचा तसा कोणताच हट्ट नव्हता. उलट राम व्यवहारामधील सर्व कर्मे करण्यास तयार होता, कारण शरीर असेंपर्यंत कर्मत्याग होणें शक्य नाहीं, हें त्याला पूर्णपणें माहीत होतें. फक्त त्याची तक्रार एवढीच होती कीं, सर्व तऱ्हेचा व्यवहार करीत असतां आपल्याला दुःख न होतां मन शांत कसें राहील ? यासंबंधीं तर रामानें वैराग्य प्र. सर्ग २७ मध्यें वसिष्ठांना युक्ति विचारली आहे. तीच युक्ति वसिष्ठांनीं या समग्र ग्रंथांत सांगितली आहे. ती युक्ति म्हणजे आत्मस्वरूपाचें साक्षात्कारभूत ज्ञान होय व तें झालें असतां तो मनुष्य जीवन्मुक्त होतो. अशा स्थितींत सर्व तऱ्हेचा व्यवहार करून देखील त्याला कोणत्याहि तऱ्हेचें दुःख प्राप्त होत नाहीं, असें वसिष्ठांनीं निरनिराळ्या ठिकाणीं सिद्ध केलें आहे. गीतेंतहि भगवंतानें ' स्थितप्रज्ञाचें ' म्हणजेच जीवन्मुक्ताचें असेंच वर्णन केलें आहे.

ही स्थितप्रज्ञाची अवस्था आत्मसाक्षात्कारभूत ज्ञानाशिवाय प्राप्त होत नाहीं, असें भगवंतांचेंहि म्हणणें आहे. पुढें वसिष्ठांच्या उपदेशानें रामाला ज्ञान झालें व तो जीवन्मुक्त झाला. त्या स्थितींत पुढें त्यानें सर्व तऱ्हेचा व्यवहार केला. वनवास पत्करला. त्याची स्त्री रावणानें हरण केली. पुढें रावणाला मारल्यानंतर अयोध्येंत परत आल्यावर सीतेच्या संबंधानें आपल्या प्रजाजनांकडून भलभलते आरोप कानावर पडतांक्षणींच रामानें सीतेचा त्याग केला. अशा विविध प्रसंगीं रामाच्या अंतःकरणाचा समतोलपणा टिकून त्याची शांतता रेसभरही कमी झाली नाहीं. इकडे भगवंताचा उपदेश ऐकून अर्जुनाचा मोह तात्पुरता दूर झाला व त्यानें युद्ध केलें, परंतु रामासारखा तो ज्ञानी व जीवन्मुक्त झाला नाहीं. तर तो अज्ञानीच राहिला. कारण पुनः त्याला मोह झाला व तो घालविण्याकरितां भगवंताला 'अनुगीता' सांगावी लागली असा भारतांत उल्लेख आहे. हाच काय तो राम व अर्जुन यांच्यामध्यें फरक आहे.

यावरून या दोन्ही ग्रंथांचा मुख्य हेतु ज्ञान सांगण्याचा आहे असें सिद्ध होतें. ज्ञान झाल्यावर तो 'जीवन्मुक्त' होतो. ज्ञानाच्या चवथ्या भूमिकेच्या शेवटीं आत्मसाक्षात्कारभूत ज्ञान होतें व पांचवी, सहावी व सातवी या तीन भूमिकेमध्यें ज्ञानी जीवन्मुक्त अवस्थेंत असतो. त्याचें सविस्तर वर्णन 'ज्ञानयोगाच्या सात भूमिका' या पुढील ४० व्या प्रकरणांत करण्यांत आलें आहे. कर्म हें कधींच सुटत नाहीं. कारण तें निसर्गतः प्राप्त आहे. म्हणून ज्ञान झालें तरी तो त्याच्या प्रारब्धाप्रमाणें प्राप्त झालेलें कर्म करीत राहणारच व तें कर्म लोकसंग्रहाकरितां होत राहीलच, मग त्याला तूं लोकसंग्रहाकरितां कर्म कर, असें सांगण्यांत काय अर्थ आहे ?

जीवन्मुक्त झाल्यावर ज्ञानी पुरुष दोन तऱ्हेचे दृष्टीस पडतात. कित्येक ज्ञानी आपल्या प्रारब्धकर्माच्या अनुरोधानें सुखदुःखांनीं भरलेल्या या संसारांतील अनेकविध व्यवहारांत गर्क झालेले असूनहि अंतर्यामीं आत्मानुसंधानांत निमग्न असतात. भगवद्गीतेमध्यें पहिल्या तऱ्हेचे ज्ञानी दाखविण्याकरितां जनकादिकांचें उदाहरण दिलें आहे (भगवद्गीता ३-२०), तर योगवासिष्ठांत पहिल्या तऱ्हेचे ज्ञानी दाखविण्याकरितां जनक, दिलीप,

मनु, मांधाता, बलि, नमुचि, वृत्रासुर, प्रल्हाद, शंबरासुर, भगीरथ, शिखिध्वज वगैरेंचीं उदाहरणें देऊन हे सर्व ज्ञानी छत्रचामरादि वैभवानें संपन्न असून आपआपल्या राज्याचें यथार्थ पालन करीत राहिले. दुसऱ्या प्रतीचे ज्ञानी दाखविण्याकरितां ज्ञानाच्या परम सीमेप्रत जाऊन पोंचलेले भृगु, भरद्वाज, विश्वामित्र, शुक इत्यादि ज्ञानीमहर्षि यांचीं उदाहरणें देऊन हे सर्व ज्ञानी संसाराचा त्याग करून अरण्यांत जाऊन शांत होऊन राहिले. पण वसिष्ठांच्या मतें ज्ञानोत्तर म्हणजे जीवन्मुक्त स्थितींत लोकसंग्रहाकरितां ज्ञानी पुरुषानें कर्म करीत रहावें असें आहे, म्हणूनच त्यांनीं रामाला तशा तऱ्हेचा म्हणजे

धर्मेण राज्यमनुपालय तीर्णतृष्णः ॥ नि. उ. २१३–५०

" तृष्णारहित होऊन तूं स्वराज्याचें धर्मानें परिपालन कर " असा शेवटीं उपदेश केला आहे. त्याप्रमाणें रामानेंहि जीवन्मुक्तस्थितींत सर्व तऱ्हेचा व्यवहार केला आहे, असें वर वर्णन करण्यांत आलेंच आहे.

असो, एकंदर पहातां गीता हा ग्रंथ सूत्रप्राय आहे आणि योगवासिष्ठ हा ग्रंथ फार विस्तृत आहे. त्यामुळें गीतेंतील उपक्रम उपसंहारावरच काय पण त्यांतील समग्र विषयप्रतिपादनावरहि योगवासिष्ठाच्या अध्ययनानें अतिशय प्रकाश पडतो.

निर्वाण प्रकरण ( पूर्वार्ध ) सर्ग ५२ ते ५८ ( एकूण श्लोक २५४ ) मध्यें अर्जुनाचें आख्यान सांगितलें आहे. हें अर्जुनाचें आख्यान या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत ' अर्जुनाची गोष्ट ' ( २९ वी ) यांत दिलें आहे. हें अर्जुनाचें आख्यान व महाभारतांतील श्रीमद्भगवद्गीता हीं दोन्हीं कथानकें जवळ जवळ सारखींच आहेत. भगवद्गीतेंतील ७०० श्लोकांपैकीं फक्त २७ श्लोकच योगवासिष्ठांतील अर्जुनाच्या आख्यानांत आलेल्या श्लोकाशीं तंतोतंत जुळतात. हे जुळणारे श्लोक या प्रकरणाच्या शेवटीं दिले आहेत. या आख्यानांतील श्लोकांशिवाय आणखी कांहीं ठिकाणचे वासिष्ठांतील पुष्कळसे श्लोक गीतेंतील श्लोकाशीं अक्षरशः किंवा थोड्या पाठभेदानें जुळतात. तेहि त्या ठिकाणीं दिले आहेत. आतां हे जुळणारे श्लोक वासिष्ठांतून गीतेंत घेतले आहेत, कां गीतेंतून वासिष्ठांत घेतले आहेत, हा वादग्रस्त प्रश्न आहे. परंतु ' योगवासिष्ठाचे बहिरंग निरीक्षण ' या मागील ३ ऱ्या

प्रकरणांत सध्या प्रचलित असणाऱ्या वृहद्योगवासिष्ठाचा काल भगवद्गीतेच्या नंतरचा असला पाहिजे, असें जें दर्शविलें आहे, त्यावरून गीतेंतील श्लोकांशीं जुळणारे श्लोक गीतेंतूनच वासिष्ठांत घेतले आहेत, हेंच म्हणणें योग्य दिसतें. आतां वासिष्ठांतील अर्जुनाचें आख्यान हें इतर आख्यानाप्रमाणें भूतकालीन नसून भविष्यकालीन आहे असें दाखविण्याकरितां वसिष्ठांनीं या आख्यानास प्रारंभ करण्यापूर्वी नि. प्र. (पूर्वार्ध) सर्ग ५२ मध्यें भविष्यकाळाचे सर्व प्रयोग केले आहेत. वसिष्ठ ब्रह्मनिष्ठ असल्यामुळें त्रिकालज्ञानी होते, त्यामुळें त्यांना भविष्यकाळांत घडणाऱ्या गोष्टींचें ज्ञान असणें अगदीं स्वाभाविक आहे. वृहद्योगवासिष्ठाच्या कर्त्यानें हें आख्यान आपल्या ग्रंथांत घालून हा ग्रंथ फारच प्राचीन आहे, हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे असें दिसतें. परंतु अगदीं मूळ वाल्मीकीच्या योगवासिष्ठांत हें आख्यान असेलच असें कांहीं सांगतां येत नाहीं. या आख्यानांत अनासक्ति योगाचा अभ्यास केला असतां मनुष्य जीवन्मुक्त होतो, असें सांगितलें आहे. ही अनासक्ति म्हणजेच वासिष्ठाच्या इतर भागांत सांगितलेली असंसक्ति होय.

## सांख्य व योग.

आतां गीतेमध्यें सांख्य व योग एकच आहेत, असें जें प्रतिपादन केलें आहे, तें वासिष्ठामध्यें थोड्या निराळ्या तऱ्हेनें सांगितलें आहे याचा विचार करूं. गीतेमध्यें ' सांख्ययोग ' म्हणजे ' ज्ञानयोग ' व ' योग ' म्हणजे ' कर्मयोग' असा अर्थ केला आहे. वासिष्ठांत सांख्य म्हणजे ज्ञान असा गीतेंतल्या सारखाच अर्थ केला आहे. पण योग म्हणजे ' कर्मयोग ' असा अर्थ न करितां योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोधरूपी योग असा केला आहे. कर्मयोग म्हणजे फक्त स्वकर्माचें निष्काम अनुष्ठान चित्तशुद्धीकरितां हवें आहे. संसार समुद्रांतून तरून जाण्यास साक्षात् त्याचा उपयोग नाहीं, असें वसिष्ठांचें ठाम मत आहे. योगामध्यें स्वकर्मांचें अनुष्ठान आणि ईश्वराची उपासना ( भक्ति ) यांचा अंतर्भाव होतो. सांख्य आणि योग या दोन उपायांपैकीं कोणत्याहि एका उपायानें निर्वाणाची प्राप्ति होते, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे.

चित्ताच्या हालचालींमुळें जगताचा भ्रम उत्पन्न होतो व चित्ताचा निरोध केल्यामुळे हा भ्रम नष्ट होतो. अशाच तऱ्हेचें पतंजलीचें ' योगश्चित्तवृत्ति निरोधः ' असें सूत्र आहे. पण वसिष्ठ चित्ताच्या निरोधापेक्षां चित्ताचा नाशच श्रेयस्कर मानतात. कारण चित्ताचा निरोध केला तरी निरोधकालानंतर पुनः चित्त तयार होतें व संसार जसाचा तसाच राहतो. यास्तव चित्ताचा नाश करणेंच श्रेयस्कर आहे असें वसिष्ठ सांगतातः—

चित्तत्यागादहं मन्ये चित्तनाशः सुसिद्धये ॥ नि. पू. ९४-१२/१

" चित्ताच्या त्यागापेक्षां चित्ताचा नाश करणेंच मोक्षसिद्धीचें साधन आहे, असें मी मानतों. "

## चित्तनाशाचे मार्ग.

आतां चित्तनाशाचे दोन मार्ग आहेत असें वसिष्ठ सांगतातः—

द्वौ क्रमौ चित्तनाशस्य योगो ज्ञानं च राघव ॥
योगस्तद्वृत्तिरोधोहि ज्ञानं सम्यगवेक्षणम् ॥ ५-७८-८

" चित्तनाशाचे योग आणि ज्ञान असे दोन मार्ग आहेत. चित्तवृत्तीच्या निरोधाला योग ( पतंजलीच्या म्हणण्याप्रमाणें ) असें नांव असून सम्यक् अवलोकन करणें ( हें दृश्य जग ब्रह्मरूपानें पहाणें ) यालाच ज्ञान असें म्हणतात."

## योगाचें स्वरूप.

प्राणापान वायूंचें नियमन करणाऱ्या योगनामक युक्तीनें हें चित्त केव्हां आणि कशा प्रकारें अत्यंत सुखकर आणि शांत अशा स्थितीप्रत जाऊन पोहोंचतें, त्याचा विचार करूं. ' शरीरांतः संचारी वायुः प्राणः " म्हणजे या शरिरांतील सर्व नाड्यांमधून संचार करणाऱ्या वायूला प्राण ही संज्ञा दिली आहे. या प्राणवायूच्या हालचालींमुळें शरीरामध्ये क्रियावैचित्र्य उत्पन्न होतें. *या वैचित्र्याच्या अनुरोधानें या प्राणवायूलाच अपानादि* भिन्नभिन्न नांवें कल्पिलेलीं आहेत. अर्थात् अपानादि वायू हे प्राण-

वायूचेच वृत्तिभेद आहेत. प्राण चित्ताचा आधार असून तो चित्ताहून भिन्न नाही. अंतर्गत असलेल्या प्राणवायूच्या स्पंदामुळे संकल्प करण्यास उद्युक्त झालेली जी संविस्कला आहे, तिलाच चित्त असें म्हणतात. म्हणून चित्त म्हणजेच प्राणाचा परिस्पंद आहे, असें वेदवेत्ते म्हणतात. अर्थात् प्राणवायूचें चलनवलन बंद झालें म्हणजे त्याबरोबर चित्तहि आपोआप शांत होतें व संसार निश्चयानें विलीन होतो. आतां ह्या प्राणस्पंदाचा निरोध करण्याविषयीं सांगितलेल्या उपायांपैकीं कांहीं पुढें दिले आहेतः—

( १ ) यमनियमादिकांच्या सहाय्यानें ध्यानाच्या अभ्यासानें चित्ताची एकाग्रता संपादन केली असतां प्राणस्पंदाचा निरोध होतो.

( २ ) प्राणायामानें व ध्यानाभ्यासाच्या योगानें परमात्म्याच्या ठिकाणीं पूर्ण एकाग्रता बाणली असतांहि प्राणस्पंदाचा निरोध होतो.

( ३ ) प्रणवाचा—ॐकाराचा दीर्घ उच्चार करून शेवटच्या नादामध्यें बाह्यविषयांची कल्पना पूर्णपणें निमाली असतांहि प्राणस्पंदाचा निरोध होतो.

## ज्ञानाचें स्वरूप.

अनादि, अनंत व स्वयंप्रकाश असा एक परमात्माच या जगांत आहे, अशा प्रकारच्या निश्चयालाच सम्यक् ज्ञान असें म्हणतात.

अशा तऱ्हेचे चित्तनाशाचे म्हणजे संसारांतून सुटण्याचे दोन मार्ग आहेत.

**संसारोत्तरणे युक्तिर्योगशब्देन कथ्यते ॥**
**तां विद्धि द्विप्रकारां त्वं चित्तोपशमधर्मिणीम् ॥** नि. पू. १३-३

"संसारांतून पार तरून जाण्याविषयीं जी युक्ति तीच योग शब्दानें सांगितली जाते. ही चित्ताचा उपशम करणारी युक्ति वर दर्शविल्याप्रमाणें दोन प्रकारची ( म्हणजे एक आत्मज्ञान आणि दुसरा वृत्तिनिरोध अशी ) सांगितली आहे." *योग ह्या एकाच शब्दानें दोन्ही प्रकार* जरी सांगितले आहेत तरी तो शब्द '*प्राणाचा निरोध*' *या अर्थी अतिशय* रूढ झाला आहे. तरी पण योग हा शब्द वासिष्ठामध्यें संसारांतून तरून जाण्याकरितां सांगितलेल्या उपायानांच लावण्यांत आला आहे. म्हणून

एक ' सांख्य योग ' व दुसरा ' योगयोग ' असे हे दोन्ही-उपाय एकच फल देणारे असून संसारांतून तरून जाण्यास एकसारखेच समर्थ आहेत. पण ज्याचें चित्त सुकुमार असल्यामुळें प्राणनिरोधाचें दुःख ज्याला सहन करवत नाहीं त्याला योग असाध्य आहे; आणि ज्याचें चित्त कठोर असून विचार करण्यास समर्थ नाहीं, त्याला ज्ञाननिश्चय असाध्य आहे, असें जरी असलें, तरी हे दोन्ही उपाय शास्त्रीय आहेत व गीतेप्रमाणें वासिष्ठांतहि त्यांना एक सांख्य व दुसरा योग असें म्हटलें आहे. यांची व्याख्या वासिष्ठांत पुढील श्लोकांत केली आहे:—

> सम्यग्ज्ञानावबोधेन सुसिद्धैकसमाधिना ॥
> संख्ययैवावबुध्येयुस्ते सांख्यायोगिनः स्मृताः नि. पू. ६९-१८
> प्राणाद्यनिलसंशांती युक्त्या ये पदमागताः ॥
> अनामयमनाद्यंतं ते स्मृता योगयोगिनः नि. पू. ६९-१९

यथार्थ ज्ञानाच्या प्राप्तीनें सिद्ध झालेल्या समाधीनें जे विचारविवेकप्रयुक्त राजयोगानें आत्मज्ञानी झालेले असतात, ते सांख्य योगी होत. प्राणादि वायूची शांति करून जे चित्तवृत्तिनिरोधानें अनामय, आदि अंतशून्य पदास प्राप्त झालेले असतात. ते योगयोगी म्हणून म्हटलें आहे. यास्तव

> एकं सांख्यं च योगं च यः पश्यति सपश्यति ॥
> यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं परं योगैस्तदेव हि ॥ नि. पू. ६९-२९

' सांख्य व योग एकच आहेत, असें जो पहातो, तोच तत्त्वज्ञ होय. जें परमस्थान सांख्याकडून प्राप्त केलें जातें, तेंच योग्याकडून मिळविलें जातें.' अशा रीतीनें हे दोन्ही उपाय जरी एकच असले तरी या दोहोंपैकीं वसिष्ठ म्हणतात कीं,

> ममत्वभिमतः साधो सुसाध्यो ज्ञाननिश्चयः नि. पू. १३-८

" मला तर ज्ञाननिश्चय सुसाध्य वाटतो. "

सारांश, सांख्य ( ज्ञान ) व योग हे दोन्ही मार्ग मोक्षाची प्राप्ति करून

देणारे जरी असले, तरी ज्ञानाशिवाय नुसत्या हटानें चित्तवृत्तिनिरोधरूप योगाभ्यासानें खऱ्या पूर्ण शांतीचा लाभ होत नाहीं. योगाभ्यासानें चित्तवृत्तींचा निरोध करून संपादन केलेल्या समाधीमध्यें जगाचा भ्रम नसतो हें खरें, परंतु समाधि उतरल्यानंतर जगाचा भ्रम पूर्ववत् उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. दोरीच्या ठिकाणीं भासणारा सर्प वस्तुतः नाहीं, असें साक्षात् ज्ञान झाल्याशिवाय सर्पभ्रमाचा केव्हांहि निरास होणार नाहीं. सर्पाकडे नुसती डोळेझाक केल्यानें सर्प नाहींसा होतो असें नाहीं. कारण डोळे उघडतांच तो पुनः दिसूं लागतो, साप नाहीं असें नुसतें तोंडानें म्हणत बसल्यानेंहि साप नाहींसा होत नाहीं तर रज्जुज्ञानानें सर्पभ्रमाचा बाध झाला पाहिजे, म्हणजे सर्प उत्पन्न झालेलाच नाहीं, असें निश्चित ज्ञान झालें पाहिजे. एरवी सर्पाची भीति अजिबात नाहींशी होणार नाहीं. जगद्रूपी भ्रमाची स्थिति हुबेहूब अशीच आहे. आत्मसाक्षात्कार झाल्याशिवाय जगद्रूपी भ्रमाचा निरास होण्याला दुसरा कोणताहि उपाय नाहीं. संसार नाहीं, संसार नाहीं, असा तोंडानें नुसता जप करून 'संसृतिर्न निवर्तते' संसार नाहींसा होत नाहीं असें भागवत स्कंध ११ मध्यें श्रीकृष्णानें उद्धवाला सांगितलें आहे. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं, "सांख्ययोग व योगयोग यांमध्यें मला सांख्ययोगच म्हणजे ज्ञानयोगच अभिमत आहे" यासाठीं दृश्य जगाचा अत्यंत अभाव आहे, असा निश्चय करून आत्मस्वरूपाचा पूर्ण अनुभव आला असतां जीवन्मुक्तीचा लाभ होतो.

या वरील विवेचनावरून असें दिसून येतें कीं, गीतेमध्यें ज्याला कर्मयोग असें म्हटलें आहे, त्याला वासिष्ठामध्यें प्राणायामाच्या सहाय्यानें चित्तवृत्तींचा निरोध करणें यास योग असें म्हटलें आहे. हेंच शास्त्रीय दृष्ट्या योग्य दिसतें. गीतेमध्यें योगाला जे कर्मयोग असें म्हटलें आहे, त्यांत देखील 'कर्म' या शब्दाच्या अर्थामध्यें प्राणायामादि सर्व कर्मांचाहि अंतर्भाव होतो, असा अर्थ

केला, तर वासिष्ठ व गीता ह्यामध्यें जो वरील थोडा विरोध दिसतो, तो नाहींसा होईल यांत शंका नाहीं.

## योगभ्रष्ट.

एखादा मनुष्य योगाचा अभ्यास करीत असतां प्रारब्ध कर्म संपून ज्ञानप्राप्ति न होतां मध्येंच मृत झाला, तरी त्याला दुर्गति प्राप्त होत नाहीं. तर उलट तो स्वर्गाला जाऊन तेथें नानातऱ्हेचे दिव्य भोग भोगून तो पुनः या मृत्युलोकांत चांगल्या कुलामध्यें जन्माला येतो व त्याठिकाणीं पूर्वी केलेल्या अभ्यासाला आठवून त्याच्यापुढें अभ्यास करूं लागतो. ही विचारसरणी जशी गीतेंत अ. ६ मध्यें श्लोक ४० ते ४४ मध्यें आली आहे, त्याचप्रमाणें वासिष्ठांतहि नि. प्र. पूर्वार्ध सर्ग १२६ मध्यें खालील श्लोकांतून आली आहेः—

योगभूमिकयोत्क्रांतजीवितस्य शरीरिणः ॥ ४७ ॥
भूमिकांशानुसारेण क्षीयते पूर्वदुष्कृतम् ॥
ततः सुरविमानेषु लोकपालपुरेषु च ॥ ४८ ॥
मेरूपर्वतकुंजेषु रमते रमणीसुखः ॥
ततः सुकृतसंभारे दुष्कृते च पुराकृते ॥ ४९ ॥
भोगजालपरिक्षीणे जायंते योगिनो भुवि ॥
शुचीनां श्रीमतां गेहे गुप्ते गुणवतां सताम् ॥ ५० ॥
जनित्वा योगमेवैते सेवंते योगवासिताः ॥
तत्र प्राग्भावनाभ्यस्तयोगभूमिक्रमं बुधाः ॥
स्मृत्वा परिपतंत्युच्चैरुत्तरं भूमिकाक्रमम् ॥ ५१ ॥

" पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या किंवा चवथ्या भूमिकेवर आरूढ झालेला योगी जर मध्येंच मरण पावला, तर त्या जीवाचें पूर्वपातक भूमिकेच्या अंशानुसार क्षीण होतें. त्यामुळें तो देवांच्या विमानांतून, इंद्रादिलोक-

पार्लांच्या पुन्यांतून, मेरुपर्वतांतील कुंजांत सुंदर स्त्रियांबरोबर रममाण होतो. त्यानंतर फलभोगानें पूर्वी केलेलें पुण्य व पाप क्षीण झालें असतां ते योगी पुनः या भूलोकीं अत्यंत पवित्र व श्रीमान् गुणी सज्जनांच्या सुरक्षित गृहांत जन्माला येतात व त्या ठिकाणीं पूर्वजन्मीच्या योगवासनेनें पुनः योगाचाच अभ्यास करितात. या नव्या जन्मांत ते सूज्ञ पूर्व जन्मांत अभ्यासिलेल्या योगभूमिकेच्या क्रमास आठवून पुढील भूमिकेवर आरूढ होतात.

## जीवाचा पुनर्जन्म.

प्राणी मृत झाल्यानंतर आपल्या बऱ्यावाईट कर्मांचीं फलें भोगण्या-करितां एका लोकांतून दुसऱ्या लोकांत जातो. ही कल्पना गीतेमध्यें अ. १४ श्लोक १८ व अ. १५ श्लोक ८ मध्यें स्वीकारली आहे. पण ही कल्पना व उपनिषदांनीं मानलेले देवयान व पितृयानमार्ग किंवा भगवद्गीतेनें मानलेले शुक्ल व कृष्णमार्ग ( अ. ८ श्लोक २४, २५ व २६ ) वसिष्ठ मानीत नाहींत. तर प्राणी ज्या ठिकाणीं मरतो त्याच ठिकाणीं पुनर्जन्माच्या सर्व कल्पना आपल्या मनांतच अनुभवीत असतो. याविषयीं सविस्तर वर्णन ' मृत्यु व मृत्यूनंतरची स्थिति ' या नांवाच्या १९ व्या प्रकरणांत केलें आहे; व याचाच सविस्तर खुलासा या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांतील लीलेची गोष्ट ( तिसरी ) ( मंडपाख्यान ) यांत केलेला आहे, तो पहावा.

## दृश्य जगाचें स्वरूप.

भगवद्गीता ह्या दृश्य जगाला सत्य मानून सांख्यशास्त्रांतल्या प्रक्रिये-प्रमाणें परमेश्वरानें आपल्या त्रिगुणात्मक प्रकृतीच्या योगानें त्याची उभारणी व संहारणी केली आहे असें मानते; पण योगवासिष्ठ वस्तुतः जगत् मुळींच उत्पन्न झालेलें नाहीं, असें मानीत असून जें जगाचें भान होत आहे, तें केवल चिद्रूप पर परब्रह्माच्या चिच्छक्तीचाच म्हणजे कल्पना-शक्तीचाच नुसता विलास आहे असें मानतें.

# योगवासिष्ठ व भगवद्गीता या दोन ग्रंथांत जुळणारे श्लोक.

भगवद्गीता. योगवासिष्ठ.

मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ॥ नि. पू.
आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ २-१४ ॥ ५४-२
नासतो विद्यते भावो नाभावोविद्यते सतः ॥ नि. पू.
उभयोरपि दृष्टोऽतस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ २-१६ ॥ ५५-१२
अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ॥ नि. पू.
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हति ॥ २-१७ ॥ ५५-१३
अंतवंतइमे देहानित्यस्योक्ताः शरीरिणः ॥ नि. पू.
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ २-१८ ॥ ५५-१४
य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ॥ नि. पू.
उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ २-१९ ॥ ५२-३७
न जायते म्रियते वा कदाचित्
नायं भूत्वा भविता वा न भूयः ॥
अजोनित्यः शाश्वतोऽयं पुराणो नि. पू.
न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २-२० ॥ ५२-३६
अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ॥
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २—२४ ३-१४-६०
( वासिष्ठामध्यें ' अयम् ' च्या ऐवजी ' अहम् '
व ' सनातनः ' च्या ऐवजी ' इति स्थितम् ' असा पाठ आहे. )
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ २—४७/२ ॥ नि. पू.
योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ॥ २—४८/१ ॥ ५४-२६
या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ॥ नि. उ.
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ २—६९ ४३-३१

| भगवद्गीता. | योगवासिष्ठ. |
|---|---|
| आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं<br>समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ॥ | नि. पू. |
| तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे<br>स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ २-७० ॥ | ५४-३८ |
| | नि. पू. |
| कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ॥ | ५४-३६ |
| इंद्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ३-६ ॥ | नि. पू. |
| यास्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ॥ | ५४-३७ |
| कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ३-७ ॥ | नि. उ. |
| नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥ | ३७-३६ |
| न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ ३-१८ ॥ | नि. पू. |
| प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ॥ | ५३-५ |
| अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमितिमन्यते ॥ ३-२७ ॥ | नि. पू. |
| कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ॥ | ५४-२५ |
| स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ ४-१८ ॥ | नि. पू. |
| त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ॥ | ५४-२८ |
| कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित् करोति सः ॥ ४-२० ॥ | नि. पू. |
| यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपिगम्यते ॥ | ६९-२१ |
| एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५-५ ॥ | नि. पू. |
| कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ॥ | ५३-९ |
| योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥ ५-११ ॥ | नि. उ. १६२-१८. |
| आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैवरिपुरात्मनः ॥ ६-५ ॥ | नि पू. |
| सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ॥ | ५३-४३ |
| ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ ६-२९ ॥ | नि. पू. |
| सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ॥ | ५३-४४ |
| सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥६-३१॥ | ( वासिष्ठांतील वचन ) |
| ( न सभूयोभिजायते ) | |
| भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ॥ ७-४ ॥ | नि. पू. ५५-३६ |

भगवद्गीता. योगवासिष्ठ.

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ॥ नि. पू.
यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरूष्व मदर्पणम् ॥ ९-२७ ॥ ५४-२
( यत्करिष्यसि कौंतेय तदात्मेति स्थिरोभव ) -( वासिष्ठांतील वचन )
मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥ नि. पू.
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ९-३४ ॥ ५४-३४
भूयएव महाबाहो शृणु मे परमं वचः ॥ नि. पू.
यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १०-१ ॥ ५४-१
मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् ॥
( तच्चित्ता तद्गतप्राणा.................. ) —( वासिष्ठांतील वचन )
कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ १०-९ ॥ नि.उ.१६३-४०
तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ॥ नि. उ.
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १०-१० ॥ १६३-४१
( जायते बुद्धियोगोसौ येन ते यांति तत्पदम् ) ( वासिष्ठांतील वचन )
असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ॥ नि. पू.
नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ १३-९ ॥ ७४-२८
मयिचानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ॥
( आत्मनोनन्ययोगेन तद्भावनमनारतम् ) ( वासिष्ठांतील वचन )
विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १३-१० ॥ नि. पू. ७४-२९
अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ॥ नि. पू.
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ १३-११ ॥ ७४-३०
सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ॥ नि. उ.
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३-१३ ॥ १४-९
( संस्थितम् ) ( वासिष्ठांतील वचन )
सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ॥
( सर्वेंद्रियगुणैर्मुक्तं सर्वेंद्रियगुणान्वितम् ) ( वासिष्ठांतील वचन )
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १३-१४ ॥ नि. उ. १४-१०

| | भगवद्गीता. | योगवासिष्ठ. |
|---|---|---|
| | | नि. उ. |
| बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ॥ | | १४-११ |
| सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ | १३-१५ ॥ | २-१८-३०/१- |
| न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ | १४-२२/२- ॥ | नि. उ. |
| निर्मानमोहाजितसंगदोषा | | ५३-६६ |
| अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ॥ | | व |
| द्वंद्वैर्विमुक्ता सुखदुःखसंज्ञै | | १५३-५८ |
| र्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् | ॥ १५-५ ॥ | |
| ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ | १६-१४/२- ॥ | ३-२७-२४/१- |
| यस्य नाहंकृतोभावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥ | | नि. पू. |
| हत्वापि स इमांल्लोकान्नहंति न निबध्यते ॥ | १८-१७ ॥ | ५३-२ |
| नष्टोमोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ॥ | | नि. पू. |
| स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ | १८-७३ ॥ | ५८-१ |



# प्रकरण १६ वें

## ब्रह्मदेवाचें स्वरूप.

हें दृश्य जग मनोमात्र आहे, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे. हें सिद्ध करण्याकरितां वसिष्ठांनीं, ब्रह्मदेवानें आपल्या मनानें हें जग निर्माण केलें आहे, असें सांगितलें. पण ब्रह्मदेव देखील मनोमात्रच आहे हें दाखविण्याकरितां वासिष्ठामध्यें ब्रह्मदेवाच्या उत्पत्तीच्यासंबंधानें जें वर्णन केलें आहे, त्याचा थोडासा विचार करूं.

'एकमेवाऽद्वितीय' असें ब्रह्म एकच आहे, पण या दृश्य जगाच्या स्वरूपाची स्थिति सिद्ध करण्याकरितां हेंच ब्रह्म शुद्ध व शबल असें दोन प्रकारचें वेदांतशास्त्रांत मानण्यांत आलें आहे. शुद्ध ब्रह्म हें कोणाचें कार्य व कोणाचें कारणहि नाहीं. पण शबलब्रह्म म्हणजे त्रिगुणात्मक मायाशक्तीनें जणुं मलिन झालेलें ब्रह्म हेंच ह्या जगाचें कारण होऊं शकतें. पुढें जेव्हां सर्गारंभ काल येतो, तेव्हां मायेंतील रजोगुणाचें प्राबल्य होऊन शबल ब्रह्माच्या ठिकाणीं 'बहु स्यां प्रजायेय' मी पुष्कळ प्रकारें उत्पन्न होईन, 'मी देहवान् आहे' अशा वृत्ती उत्पन्न होऊं लागतात. अशा ह्या शबलब्रह्माच्या वृत्तीस्फुरणाला मन असें म्हणतात. म्हणजेच स्थिर समुद्राच्या पृष्ठभागावर चंचल स्वरूपाची लाट उत्पन्न व्हावी, त्याप्रमाणें ह्या स्थिर चित्समुद्रावर अस्थिर मनरूपी लाट उदय पावतें व एक भ्रामक आकार दिसूं लागतो. हेंच समष्टिरूप मन आणि हाच हिरण्यगर्भ अथवा ब्रह्मदेव होय. पण समुद्रावर लाट निर्माण होण्याला वायु किंवा चंद्रसूर्य यांचें आकर्षण लागत असतें, तसें चित्समुद्राच्या ठिकाणीं ही मनरूपी लाट उत्पन्न होण्याला कोणतें साधन आहे? बौद्ध म्हणतात कीं, अज्ञानामुळें ही लाट उत्पन्न होतें. पण तें अज्ञान आत्म्याच्या बाहेर आहे कां आतच अव्यक्त स्थितींत रहातें, याचा त्यांनीं मुळींच विचार केला नाहीं. श्रीशंकराचार्य या गोष्टीला अनिर्वचनीय म्हणतात. पण वसिष्ठ म्हणतात कीं, ही लाट उत्पन्न होण्याला ज्या शक्तीची जरूरी आहे, ती शक्ति अगोदरच आत्म्यामध्यें अस्तित्वांत

आहे. ही शक्ति आत्म्याच्या ठिकाणीं सृष्टिकालापूर्वी व नंतर नेहमींच अस्तित्वांत असते, व ज्या ज्या वेळीं तिची जरूरी लागेल, त्या त्या वेळीं ती प्रकट होते. अशा त्या ब्रह्मदेवाचा भासणारा आकार पूर्वसंस्कारावांचूनच भासमान होतो. कारण तो वस्तुतः चिद्रूपच आहे; म्हणून तो कशापासूनहि उत्पन्न झालेला नाहीं. कल्पनेमध्यें मनुष्याची आकृति भासते, त्याप्रमाणें ब्रह्मदेवाचा देह भासमान होतो. परंतु तो जरी साकार व सावयवस्वरूपाचा भासला तरी तो वंध्येच्या पुत्राप्रमाणें वस्तुतः खरा नाहीं. तो भासमान होणारा देहं आतिवाहिक (शुद्ध सत्त्वरूप) आहे. परंतु तो इतर देहांच्यासारखा आधिभौतिक नाहीं. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

नास्य भूतमयोदेहो नास्यास्थीनि शरीरके ॥
अवष्टब्धुमसौ मुष्ट्या शक्यते न तु केनचित् ॥नि.उ.७३-४१

'याचा देह पंचमहाभूतांनीं बनलेला नाहीं, ह्याच्या शरीरांत हाडें नाहींत, त्यामुळें कोणालाहि त्याला हातांनीं धरतां येत नाहीं.'

आतिवाहिक आणि आधिभौतिक असे दोन प्रकारचे देह आहेत. सर्व भूतांना दोन देह आणि ब्रह्मदेवास तेवढा एकच आतिवाहिक देह, असें कां ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, सर्व भूतें आपल्या पूर्वसंस्कारानुरूप उत्पन्न होत असल्यामुळें त्यांना आतिवाहिक आणि आधिभौतिक असे दोन देह असतात; परंतु ब्रह्मदेवाला पूर्वकालीन अविद्यामय संस्कार नसल्यामुळें त्याला फक्त एक आणि तोहि आतिवाहिक देहच आहे. आतिवाहिक देहाचासुद्धां त्याच्या ठिकाणीं नुसता भास होत असतो, कारण चित्त हेंच त्याचें शरीर आहे. पृथ्वी आदिकरून भूतांपासून त्याचा देह उत्पन्न झालेला नाहीं. स्वप्नांतील स्त्री मिथ्या असली, तरी ती सत्य आहे, असा त्या स्थितींत अनुभव येऊन तिच्या संभोगाचा परिणामहि (वीर्यस्खलन) खरा होतो, याच न्यायानें ब्रह्मदेवाचा देह चिद्रूप असूनहि साकार आहे व स्वयंभु असूनहि पुरुषाकार आहे, असा भास होतो. अशा या चिद्रूप ब्रह्मदेवापासून म्हणजेच समष्टि मनापासून सर्व जग उत्पन्न झालें आहे. जगांतील सर्व जीवांना आत्मस्वरूपाची आणि आतिवाहिक देहाची विस्मृति झाल्यामुळें आधिभौतिक देहाची कल्पना पिशाच्च कल्पनेप्रमाणें त्यांना

खरी वाटूं लागली. परंतु ब्रह्मदेव हा स्वतः चिद्रूप आणि शुद्धसंविद्रूप असल्यामुळें त्याला आपल्या आत्मस्वरूपाची आणि आतिवाहिक देहाची विस्मृति होत नाहीं. ब्रह्मदेव हा जर मनोमय आहे व पंचमहाभूतात्मक नाहीं, तर सर्व विश्वहि मनोमयच आहे. कारण, कार्य हें नेहमीं कारणरूपच असतें. असा शेवटीं वसिष्ठांनीं सारांश काढला आहेः—

मनोनाम्नो मनुष्यस्य विरिञ्च्याकारधारिणः ॥
मनोराज्यं जगदिति सत्यरूपमिवस्थितम् ॥ ३-३-३३
ब्रह्मैवासत्य पुरुषः सत्यवच्चानुभूयते ॥ नि. उ. १०३-८७.

'ब्रह्मदेवाचा आकार धारण करणाऱ्या मन नांवाच्या मनुष्याचें हें जग केवळ मनोराज्य आहे. तें सत्य आहे असा फक्त भास होतो. तसेंच तत्त्वतः ब्रह्मदेवदेखील असत्य पुरुष आहे, पण तो सत्य असल्यासारखा भासतो.'

## ब्रह्मदेवाची कल्पना म्हणजेच जगत्.

कल्पना हेंच ब्रह्मदेवाचें स्वरूप आहे. त्यानें आपलें शरीर कल्पनेनेंच विस्तृत करून मनानें हें जग निर्माण केलें आहे. यामुळें पृथ्वी आदिकरून पंचमहाभूतें या जगांत खरोखर नाहींत. पंचमहाभूतें हीं केवळ त्याची कल्पना आहे. स्वप्नांतील पुरुष ज्याप्रमाणें निरनिराळ्या पदार्थांची कल्पना करितो, त्याप्रमाणें

संकल्पयति यन्नाम प्रथमोऽसौ प्रजापतिः ॥
तत्तदेवाशु भवति तस्येदं कल्पनं जगत् ॥ नि. उ.१८९-६५

'सृष्टीच्या आरंभीं आद्य प्रजापतीनें (ब्रह्मदेवानें) ज्याची ज्याची कल्पना केली तेंच तें तत्काल घडलें व तेंच अद्यापपावेतों भासत आहे. त्या ब्रह्मदेवाचा संकल्प हेंच प्रस्तुतचें जग आहे.' आद्यप्रजापतीला स्वयंभु म्हणतात; व त्याच्या ठिकाणीं जगताच्या उत्पत्तिसंबंधाचे पूर्वसंस्कार नसतात. महाप्रलयाचे वेळीं सर्व ब्रह्मदेव मुक्त होतात; आणि प्रत्येक कल्पाच्या आरंभीं सृष्टीचे उत्पत्तिकर्ते ब्रह्मदेव निरनिराळे असतात.

अर्थात् सृष्टि उत्पन्न करण्याला किंवा जगद्रचनेला अनुकूल अशी स्मृति, त्यांना पूर्वीच्या सृष्टीचा अनुभव नसल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं असणें शक्य नाहीं. ब्रह्मदेवाच्या ठिकाणीं पूर्वीचें कर्मच नाहीं तर त्यापासून होणारे नवीन संस्कार आणि तज्जन्य स्मृति कोठून आणि कशी उत्पन्न होणार? 'धाता यथापूर्वमकल्पयत्' या श्रुतिवचनानें त्याच्या ठिकाणीं स्मृति संभवते, असें म्हणतां येत नाहीं; कारण जगत् सत्य आहे, असें समजणाऱ्या अज्ञ माणसांच्या बुद्धीला अनुसरून अनादिसिद्ध कर्ममार्गाचा प्रवाह तसाच पुढें चालविण्यासाठीं श्रुतीनें तसें सांगितलें आहे. पण तत्त्ववेत्त्यांच्या दृष्टीनें हें संभवत नाहीं. दृश्य जगत् खरोखरच उत्पन्न होऊन जर विद्यमान असेल, तर त्याचा अनुभव येऊन त्यापासून पुढें कालांतरीं त्याची स्मृति होईल. 'या या स्मृतिः सा साऽनुभवपूर्विका' असें स्मृतीचें लक्षण आहे. पण जेथें कोणत्याहि कल्पामध्यें दृश्य जग मुळींच नाहीं, तेथें त्याच्या स्मृतीच्या कल्पना तरी कोठून सत्य असणार? त्यामुळें प्रजापतीच्या ठिकाणीं पूर्वकल्पाची स्मृति संभवत नाहीं.

## ब्रह्मदेवाचा शरीरधारणक्रम.

'बहु स्यां प्रजायेय' असें संकल्पोन्मुख झालेलें ब्रह्म म्हणजेच समष्टि मन आकाशादि क्रमानें आपल्या आविर्भावाची कल्पना करूं लागलें म्हणजे आकाशाची स्वच्छ भावना, शब्दाचें बीज आणि श्रोत्रेंद्रिय होण्यास प्रवृत्त होतें. नंतर आकाशरूपानें आविर्भूत झालेलें मन वायूच्या स्पंदाची कल्पना करितें, तसेंच स्पर्शवान् पदार्थाचें बीज आणि त्वगिंद्रिय यांचें रूप धारण करितें. शब्द आणि स्पर्श या दोन रूपांची वृद्धि होऊन परस्परसंघात झाला म्हणजे अग्नि, रूपवान् पदार्थ व चक्षुरिंद्रिय यांचा उदय होतो. पुढें लगेच मन रसतन्मात्राची भावना करितें आणि सूक्ष्म जल होतें. पुढें या चार भूतांचा संघात झाल्यानंतर मन गंधतन्मात्राची भावना करून पृथ्वीचें सूक्ष्म रूप धारण करतें. या पांच भूतांच्या एकीकरणानें (पंचीकरणानें) त्यांचें सूक्ष्मत्व जाऊन त्यांना स्थूलरूप प्राप्त होतें. नंतर पंचभूतांच्या योगानें वृद्धि पावलेलें मन आकाशामध्यें अग्निकणाच्या आकाराचें असें आपलें शरीर पहातें. हें शरीर अहंकारानें आणि बुद्धीनें युक्त असून

त्यालाच पुर्यष्टक* असें म्हणतात. हें मनोरूपी लिंगशरीर स्थूल शरीराची भावना करूं लागलें कीं, तेजःपुंज असें स्थूल रूप धारण करितें व लगेच त्या स्थूल आकारांत भावनेमुळें अवयवांचा उद्भव होतो. वर डोकें, खालीं पाय, दोन्ही बाजूंना हात, मध्यें उदर आणि बोटें वगैरे सर्व अवयव त्यांत उत्पन्न होतात. अशा रीतीनें हा ब्रह्मदेव आपल्या मनोरथाच्या योगानें शरीरवान् होतो. ब्रह्मपदापासून आविर्भूत झालेल्या ह्या पुरुषाचा हा प्रथम जन्म असून तोच पहिला देहधारी पुरुष होय. बुद्धि, सत्त्व, बल, विज्ञान आणि ऐश्वर्य यांनीं युक्त असलेला असा सर्वलोकपितामह ब्रह्मदेव हाच होय. असा हा शरीरधारी ब्रह्मदेव विचार करूं लागला कीं, 'या नीलवर्ण आणि विशाल आकाशांत माझ्या उत्पत्तीच्या पूर्वी काय बरें असावें ?' अशा रीतीनें विचार करूं लागतांच त्याला निर्मल अशी आत्मदृष्टि प्राप्त झाली आणि त्याला आपली उत्पत्ति समजली. नंतर आपल्या विचित्र संकल्पांच्या योगानें त्यानें लीलेनें प्रजा उत्पन्न केली. सारांश, ब्रह्मदेवाचें रूप धारण करणाऱ्या ह्या प्रभूनें आपल्या कल्पनेनें नाना प्रकारची रचना करून केवळ विलासाकरितां आपल्या मनानेंच ही सर्व सृष्टि निर्माण केली.

## ब्रह्मदेवांची ( प्रजापतींची ) विविध तऱ्हेनें उत्पत्ति.

ब्रह्मदेवाच्या उत्पत्तीसंबंधानें बोध व्हावा म्हणून वसिष्ठांनीं नमुन्यादाखल एका सृष्टीच्या प्रजापतीची उत्पत्ति सांगितली. परंतु ह्या प्रजापतीच्या उत्पत्तीप्रमाणें इतर प्रजापतींच्या बाबतींत कोणताहि एक नियम दिसून

---

* पुर्यष्टकाची व्याख्याः—

कर्मज्ञानेंद्रियगणौ भूतप्राणमनोगणाः ।
अविद्याकामकर्माणि लिंगं पुर्यष्टकं विदुः ॥

( १ ) पांच कर्मेंद्रियें, ( २ ) पांच ज्ञानेंद्रियें, ( ३ ) पांच भूतें, ( ४ ) पांच प्राण, ( ५ ) अंतःकरणचतुष्टय, ( ६ ) अविद्या, ( ७ ) काम व ( ८ ) कर्म ह्या सर्वांना मिळून पुर्यष्टक असें म्हणतात.

येत नाहीं, हें दाखविण्याकरितां वसिष्ठांनीं स्थिति प्र. सर्ग ४७ मध्यें निर-निराळ्या तऱ्हेनें प्रजापतींची उत्पत्ति होते, असें सांगितलें आहे. केव्हां केव्हां पहिल्यानें आकाश उत्पन्न होतें. नंतर त्याच्यापासून ब्रह्मदेव होतो, त्याला 'व्योमज प्रजापति' असें म्हणतात. केव्हां केव्हां प्रथम वायु उत्पन्न होतो व त्याच्यापासून ब्रह्मदेव होतो. त्याला 'वायुज प्रजापति' म्हणतात. अशा तऱ्हेनें 'तैजस प्रजापति', 'वारिज प्रजापति', 'पार्थिव प्रजापति' इत्यादि नांवें त्याला प्राप्त होतात. केव्हां केव्हां नारायणाच्या नाभीपासून कमल उत्पन्न होतें, त्यांतून ब्रह्मदेव उत्पन्न होतो. अशा प्रजापतीला 'पद्मज प्रजापति' असें नांव प्राप्त होतें. याप्रमाणें सर्व प्रजापतींची उत्पत्ति मनाच्या अचिंत्य शक्तीमुळेंच होते. यांच्या उत्पत्तीसंबंधानें तर्कवितर्क करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. परमेश्वराच्या अचिंत्य माया-शक्तीचाच हा खेळ आहे.

## पद्मज प्रजापतीची सृष्टि.

आता पद्मजप्रजापतीनें सृष्टि कशी केली, याच्या संबंधानें वसिष्ठांनीं असें सांगितलें कीं, नारायणाच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेलें पहिलें बालक आपल्या पद्मशय्येवर उठून बसून 'ब्रह्मा' 'ब्रह्मा' असा शब्द करूं लागलें, म्हणून त्याला 'ब्रह्मा' किंवा 'ब्रह्मदेव' असें नांव प्राप्त झालें. अशा ह्या ब्रह्मदेवाला प्रथम जन्मतःच पांच मुखें होतीं. पण पुढें शंकरानें मत्सरानें आपल्या नखानें त्यापैकीं एकाचें विदारण केलें, म्हणून तेव्हां-पासून ब्रह्मदेव हा 'चतुर्मुख' असाच राहिला. प्रथम त्यानें आपल्या संकल्पानें महा तेज निर्माण केलें. पुढें त्या चतुर्मुख ब्रह्मदेवानें आपल्या दुसऱ्या शरीराचा संकल्प केला. त्याबरोबर त्या तेजापासून सूर्य झाला व तो अद्यापहि उदय पावत आहे आदित्य निर्माण केल्यानंतर जें तेज शिल्लक राहिलें, त्याचे त्या महाबुद्धिवान् ब्रह्मदेवानें नऊ विभाग केले. हेच मरीच्यादि नऊ प्रजापती निर्माण झाले व पुढें त्यांनी देव, दानव, मानव, पशु, पक्षी इत्यादि नानाविध भूतगणांना निर्माण केलें. नंतर ब्रह्मदेवानें आपल्या प्रजांना स्वर्गमोक्षाची प्राप्ति करून देण्यासाठीं यज्ञचक्र, धर्म, अर्थ व काम हे पुरुषार्थ, चार वेद, अध्यात्मादि विविध शास्त्रेंहि निर्माण

केली. अशा रीतीनें ब्रह्मदेवाच्या मनःसंकल्पापासून ही सर्व विचित्र सृष्टि निर्माण झाली आहे.

ह्या प्रमाणें ब्रह्मदेवाचें शरीर हें चिद्रूप परब्रह्माचें पहिलें स्वप्न होय. एका स्वप्नामध्यें दुसऱ्या अनेक स्वप्नांचा उदय व्हावा, त्याप्रमाणें आपण सर्व व्यष्टि जीव त्या स्वयंभूच्या स्वप्नमय शरीरांतून उत्पन्न झालेलों आहोंत; म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

गंडस्योपरि जातानां स्फोटानामतएव नः ॥ नि. उ. १०३-८६.

" गालगुंडावर झालेल्या फोडाप्रमाणें आमची स्थिति आहे. " गालच गालगुंड होतो व त्यावरील फोड जसे गालच होतो, त्याप्रमाणें ब्रह्मच ब्रह्मदेव आहे व तुम्ही आम्ही सर्व जीव ब्रह्मच आहों, असें सिध्द होतें.



# प्रकरण १७ वें.

## व्यष्टि जीवांचें स्वरूप व उत्पत्ति.

मागील प्रकरणांत वर्णन केलेला ब्रह्मदेव हा समष्टि जीव असून सर्व व्यष्टि जीव त्याचींच प्रतिबिंबें होत. वास्तविक पहातां ब्रह्मदेव जसा ब्रह्मच आहे तसा ' जीवोब्रह्मैव नापरः ' या वेदांताच्या सिद्धांताप्रमाणें सर्व व्यष्टि जीव परब्रह्मच आहेत.( मागल्या प्रकरणांत दाखविल्याप्रमाणें ) ज्याप्रमाणें समष्टि जीवाची ( ब्रह्मदेवाची ) उत्पत्ति होत असते, त्याचप्रमाणें एखाद्या क्षुद्र व्यष्टि जीवाचीहि उत्पत्ति होत असते. आतां ह्या दोहोंमध्यें जो फरक असतो, तो हाच कीं, ब्रह्मदेवाची उपाधि ( शुद्धसत्त्वप्रधान माया ) शुद्ध असते व क्षुद्र जीवाची उपाधि ( मलिनसत्त्वप्रधान अविद्या ) मलिन असते आणि त्या उपाधीशीं त्याची तद्रूपता झालेली असल्यामुळें तो क्षुद्र जीव क्षुद्र कर्मे करणारा होतो. जीवाजीवामधील फरक त्यांच्या उपाधीमुळें होत असतो. उपाधीच्या भिन्नतेमुळें त्यांचें कर्महि भिन्न भिन्न होत असतें. सुकृताच्या उत्कर्षाचें अत्यंत श्रेष्ठ फल ब्रह्मदेव असून दुष्कृताचें अत्यंत नीच फल कीटक ( स्तंब नांवाचा किडा ) हें आहे. म्हणूनच जगांतील सर्व प्राण्यांचें वर्णन करण्याचे वेळीं ' आब्रह्मस्तंबपर्यंत ' असें म्हणण्याची प्रथा पडली आहे. प्रत्येक जीवानें आपल्या भोंवतीं जो मिथ्या प्रपंच निर्माण करून आपल्याला त्याच्यांत बद्ध करून घेतलें आहे, तो प्रपंच जीवानें आपल्या स्वतःच्या कल्पनेनेंच निर्माण केलेला आहे. परंतु ही त्याची कल्पनासुद्धां समष्टि ब्रह्मदेवाच्या सृष्टिविषयक संकल्पानुसारच झालेली आहे. कारण ब्रह्मदेव व्यष्टि जीवांच्या प्राक्तनकर्मानुसार ज्या ज्या तऱ्हेची कल्पना करितो, त्या त्या तऱ्हेनें व्यष्टि जीवांना आपल्या कर्मफलाचे भोग घडतात. अशा रीतीनें हे अनंत व्यष्टि जीव ह्या ब्रह्मांडांतील चतुर्दश भुवनामध्यें रहातात व आपल्या कर्माप्रमाणें विविध योनीमध्यें जन्म पावून सुखदुःखरूपी फलें भोगीत असतात. कांहीं स्वर्गासारख्या उर्ध्वगतीप्रत जाऊन पोहोंचतात, कांहीं नरकासारख्या अधोगतीला जातात, तर कांहीं या भूमी-

वरच असंख्य योनींत भ्रमण पावत रहातात. अशा तऱ्हेनें अनेक जीव आपल्या स्वरूपाच्या अज्ञानानें मोहित होऊन कित्येक कल्पपर्यंत अनंत जन्म घेत रहातात; तर कित्येक संसारांतून मुक्त होण्याच्या मार्गाला लागतात, तर कित्येक ज्ञानसंपन्न होऊन परमपदाप्रत जाऊन पोहोंचतात.

## उपाधिभेदामुळें जीवांचे भिन्न भिन्न प्रकार.

चतुर्दश भुवनामध्यें निरनिराळ्या स्थलीं इतस्ततः उत्पन्न होणाऱ्या जीवोपाधींचे सात्त्विक, राजस आणि तामस ह्या गुणांमुळें उत्पन्न होणारे उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ किंवा विधिसृष्टि, देवसृष्टि आणि मानवसृष्टि, असें एकंदर सामान्यतः सृष्टीचे आणि तदंतर्गत व्याष्टि जीवांचे तीन वर्ग कल्पित करण्यांत आलेले आहेत. या तीन प्रकारांचेच पुढें एकंदर १४ प्रकार झालेले आहेत. त्यांचें सविस्तर वर्णन उत्पत्ति प्र. सर्ग ९४ व स्थिति प्र. सर्ग ५९ ते ६१ मध्यें आलेलें आहे. त्या उपाधींचीं नांवें आणि स्वरूप पुढें दिलें आहे:—

( १ ) इदंप्रथमताः–पूर्वकालांतील अखेरच्या जन्मांत ज्ञानाचा अभ्यास होऊन कांहीं बलवत्तर प्रतिबंधामुळें साक्षात्कार न होतां ह्या कल्पांत प्रथम जन्म घेणाऱ्या व त्याच जन्मांत मुक्त होणाऱ्या जीवाची उपाधि.

( २ ) गुणपीवरीः–पूर्वकालांत वैराग्याच्या मंदतेमुळें शुभलोकप्राप्तीची इच्छा झाल्यामुळें मुक्त न झालेल्या व म्हणूनच या कल्पांत प्रथम जन्म घेणाऱ्या जीवाची उपाधि. ह्या उपाधीनें युक्त असलेला जीव दहापांच जन्मांतच वासनाक्षय होऊन, अखेर मोक्षाला जातो.

( ३ ) ससत्त्वाः–सत्त्वगुणाची वाढ होत जाऊन शेकडो जन्मांनीं कां होईना पण ज्ञान होऊन मोक्षाला प्राप्त होणाऱ्या जीवाची उपाधि.

( ४ ) अधमसत्वाः–अनेक प्रकारच्या कर्मांनीं आणि वासनांनीं दूषित झाल्यामुळें हजारों जन्मांनीं ज्ञानसंपादन करणाऱ्या जीवाची उपाधि.

( ५ ) अत्यंततामसीः–लक्षावधि जन्म घेऊनसुद्धां जिला मोक्षस्थिति प्राप्त होण्याची वानवाच असते, अशी उपाधि.

( ६ ) राजसीः–पूर्वकर्मानुसार उत्पन्न होऊन दोनतीन जन्मानंतर जिच्या योगानें जीवाला मनुष्यजन्म प्राप्त होतो, शिवाय मोक्ष मिळण्याचीहि खात्री नसते, अशी उपाधि.

( ७ ) राजससात्त्विकीः–वैराग्य प्राप्त होऊन ज्याला दुसऱ्या जन्मांतच ज्ञानप्राप्तीचा योग असतो अशी जीवाची उपाधि. या उपाधीला दुसरें 'मोक्षयोग्या' असें नांव देण्यांत आलें आहे.

( ८ ) राजसराजसीः–मनुष्याखेरीज यक्षगंधर्वांसारखे कांहीं थोडे जन्म घेऊन अखेर मोक्षाची प्राप्ति करून देणारी उपाधि.

( ९ ) राजसतामसीः–शंभर जन्म घेऊन अखेर मोक्षाची प्राप्ती करून देणारी उपाधि.

( १० ) राजसात्यंततामसीः–हजारों जन्म घेऊनसुद्धां जिला मोक्ष मिळण्याची वानवा असेल अशी उपाधि.

( ११ ) तामसीः–ह्या कल्पामध्यें अनेक जन्म घेऊन मोक्षाची प्राप्ति करून देणारी उपाधि.

( १२ ) तामससत्त्वाः–प्रऱ्हाद, कर्कटीसारख्या तामसी योनींत जन्माला येऊन त्याच जन्मांत ज्ञानप्राप्ति होऊन मोक्ष मिळवून देणारी उपाधि.

( १३ ) तमोराजसीः–पूर्वी तामसीयोनीमध्यें अनेक जन्म घेऊन ह्या कल्पामध्येंहि दानव, राक्षस, पिशाच्च इत्यादिकांच्या योनीमध्यें जन्म घेणारी उपाधि.

( १४ ) तामसतामसीः–पूर्व कल्पांत हजारों जन्म घेऊन ह्या कल्पांत शंभर जन्मानंतर मोक्ष मिळवून देणारी उपाधि.

ह्या सर्व जीवोपाधी ब्रह्मापासून उत्पन्न होत असतात. ह्या विश्वांतील अखिल जीवजातींपैकीं कांहीं जीव हजारों जन्मांनीं मुक्त होतात आणि कित्येक जीव तर कल्पपर्यंतहि मुक्त होत नसून एकसारखे जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडत असतात. सारांश, या विविध सृष्टीमध्यें अग्नीपासून उत्पन्न होणाऱ्या ठिणग्यांप्रमाणें असणाऱ्या विचित्र जीवोपाधी ब्रह्मापासून उत्पन्न होतात, ब्रह्माच्याच ठिकाणीं रहातात, आणि अशा रीतीनें जन्म परंपरा-

मध्यें भ्रमण करितां करितां अखेरीस केव्हांतरी ज्ञान प्राप्त होऊन ब्रह्मांतच विलीन होतात.*

## व्यष्टि जीवांचे संसार.

समष्टि मनानें ( ब्रह्मदेवानें ) निर्माण केलेल्या पदार्थांच्या अनुरोधानें सर्व व्यष्टि मनें ( जीव ) आपआपलीं जगें निर्माण करीत असतात, म्हणून सर्वांना जगाच्या वावरतींत सारखाच अनुभव येत असतो. प्रत्येक व्यष्टि जीवाच्या मनामध्यें जग आहे; व त्या जगामध्यें पुनः पुष्कळ जीव आहेत. पुनः त्या प्रत्येक जीवाच्या आंत मन आहे व त्यांत जग आहे. अशा तऱ्हेनें जगामध्यें जग आहे. ह्या गोष्टीला मुळींच अंत नाहीं. अशा या अनंत जगांतील प्रत्येक जीवांचे संसार त्यांच्या स्वतःच्या वासनेनुसार कल्पिलेले असून ते एकमेकाहून निरनिराळे आहेत; म्हणून ज्या जीवांची संसाराची कल्पना नाहींशीं होते.'

त्यांचा संसार नाहींसा होऊन ते मुक्त होत असतात, असें वसिष्ठांचें मत आहे. यावर अशी शंका येते कीं, सर्व जीवांचे संसार जर निरनिराळे आहेत, तर एका जीवाचा संसार दुसऱ्याला दिसतो, कां ज्याचा त्यालाच फक्त दिसतो ? एकमेकांचे संसार एकमेकांना दिसतात, असें धरून चाललें तर संसार हा सर्वसाधारण आहे, असें ठरून एका जीवाला आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें व त्याचा संसार नाहींसा झाला, तरी दुसऱ्या जीवांचे संसार त्याला दिसत राहिल्यानें त्याला मुक्तीची आशा नाहींशीं होऊं लागेल व अनिर्मोक्ष प्रसंग ओढवेल. आतां स्वप्नांतील संसारांचें मेलन होत नाहीं, तद्वत् जीवांच्या संसारांचेंहि मेलन होत नाहीं, असें म्हटलें तर, गुरु आणि शिष्य यांचे दोघांचे संसार निरनिराळे असल्यामुळें त्यांचा संबंध घडणें शक्य नाहीं व असें झालें म्हणजे अध्यात्मशास्त्राच्या उपदेशाचा लाभ शिष्याला न झाल्यामुळें पुनः अनिर्मोक्ष प्रसंगच येणार. याच न्यायानें गुरूला देखील त्याच्या गुरूच्या उपदेशाचा लाभ न झाल्या-

* अशाच तऱ्हेचें वर्णन भगवद्गीतेंतहि खालील श्लोकांमध्यें आलेलें आहे.
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ६-४५.
बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ॥ ७-१९.

मुळें त्यालाहि अनिर्मोक्ष प्रसंगच येईल ! असें झालें म्हणजे जगांतील कोणालाहि मोक्ष मिळणार नाहीं. त्यामुळें अध्यात्मशास्त्र व्यर्थ ठरेल. अशा अडचणीतून कसें पार पडतां येईल त्यासंबंधीं वसिष्ठांनीं उपाय सांगितला आहे.

मलिनं हि मनो वीर्यं न मिथः श्लेषमर्हति ॥
अयोऽयसि च संतप्ते शुद्धे तप्तं तु लीयते ॥ ४-१७-१९.
चित्ततत्त्वानि शुद्धानि संमिलंति परस्परम् ॥
एकरूपाणि तोयानि यांत्यैक्यं नाविलानि हि ॥ ४-१७-२०.

याचा भावार्थ असा कीं, मलिन मनाचें शुद्ध मनाशीं मेलन होऊं शकत नाहीं, कारण मलिन मनाच्या ठिकाणीं शुद्ध मनाशीं मिसळून जाण्याला लागणारें सूक्ष्म सामर्थ्य नसतें; पण जीं दोन्हीं मनें शुद्ध झालेलीं असतात, तीं एकमेकांशीं मिसळून जातात. देवांचीं मनें शुद्ध असल्यामुळें त्यांच्यामध्यें मेलन सामर्थ्य असतें. यामुळें ते आपल्या भक्ताच्या स्वप्नांत शिरून त्याच्यावर अनुग्रह करूं शकतात. देवाप्रमाणें ज्ञानी देखील शुद्धचित्त असतात म्हणून त्यांनाहि आपल्या शिष्यांनीं कल्पिलेल्या संसारखंडांना पहातां येतें, आणि त्या संसारखंडांत प्रवेश करून शिष्यांना उपदेश करण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं असतें. अशा रीतीनें गुरु व शिष्य या दोघांच्या संसारांचें मेलन होतें. आतां असें मेलन होत असल तर सर्व जग साधारण ठरून पुनः अनिर्मोक्ष प्रसंग उत्पन्न होणारच ! परंतु जगाचे ठिकाणीं साधारणत्व नसून जितके जीव तितके संसार ( जगें ) असा वसिष्ठांचा सिद्धांत असल्यामुळें या शंकेला जागाच रहात नाहीं.

## मलिन चित्तांचें परस्पर मेलन.

शुद्ध चित्ताचा शुद्ध व मलिन चित्ताशीं कसा संबंध होतो हें वर दर्शविलें आहे. आतां मलिन चित्तांचा मलिन चित्ताशीं कसा संबंध होतो याचा विचार करूं. जीवमात्रांनीं कल्पिलेले संसारखंड प्रत्येकाचे भिन्न भिन्न आहेत, असें सांगितलें. पण ते संसार वस्तुतः भिन्न नसून स्वयंप्रकाश व चिद्रूप आत्म्याच्या ठिकाणीं ती केवळ कल्पना आहे. अर्थात् ही भिन्नता फक्त प्रातिभासिक आहे. जीवांच्या संसारकल्पनांचें अधिष्ठान एकच

चिन्मात्र व सर्वसाक्षिभूत परब्रह्म असल्यामुळें जीव एकमेकांचे कल्पित सर्ग पाहूं शकतात. चिन्मात्रनामक एकाच मार्गानें हें विचित्र असे संसाररूपी जलाशय एकमेकांत मिसळतात. कांहीं जीवांचे भिन्न भिन्न संसार तुल्य वासनेच्या योगानें परस्परांत मिसळतात, म्हणजे परस्परांच्या सुखदुःखानें परस्पर सुखीदुःखी होतात. तरी कांहीं जीवांचे संसार सर्वसाधारण नसून ज्यांचा त्यांच्याशीं संबंध येईल, त्यांना त्यांनाच ते दृग्गोचर होतात. ज्यांच्याशीं त्यांचा संबंध पोहोंचत नाहीं, अशा दूरच्या जीवांच्या संसारांना त्यांचें दर्शन होत नाहीं. अशा तऱ्हेनें मलिन चित्तांचा मलिन चित्तांशीं संबंध होत असतो.

## शुद्ध चित्ताला दुसऱ्याच्या मनोराज्याचें ज्ञान कसें होतें ?

चित्ताची पूर्ण शुद्धि म्हणजेच चित्त आत्मरूप बनणें होय. आत्मरूप अधिष्ठानावरच सर्व चित्तांची कल्पना झालेली आहे. ज्याचें चित्त शुद्ध झालेलें आहे, त्याला वाटेल त्याच्या चित्तामध्यें प्रवेश करितां येतो. ज्याप्रमाणें एखादा हटयोगी आपले प्राणवायु आपल्या शरीरांतून बाहेर काढून दुसऱ्याच्या शरीरांत प्रविष्ट करवितो आणि त्याठिकाणीं त्याच्या इंद्रियादिकांकडून सेवन केलेल्या शब्दादि विषयांना जाणतो; त्याप्रमाणें शुद्ध झालेलें मन प्रथम आतिवाहिक म्हणजे चिद्रूप बनून त्या चिद्रूप अधिष्ठानावर कल्पिलेल्या अन्य व्यष्टि जीवाच्या मनामध्यें शिरून त्यांच्या मनोराज्यांतील किंवा स्वप्नांतील सर्व गोष्टींचा अनुभव घेतें. अशा तऱ्हेनें शुद्धांतःकरण झालेल्या ज्ञानी जीवांना दुसऱ्याच्या मनांतील सर्व गोष्टींचें ज्ञान होत असतें.

# प्रकरण १८ वें.

## आतिवाहिक व आधिभौतिक देह.

जगांतील सर्व अज्ञ जीवांना एक आतिवाहिक (सूक्ष्म) व दुसरा आधिभौतिक (स्थूल) असे दोन देह आहेत. यांपैकीं आतिवाहिक देह अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें तो चक्षुरादि ज्ञानेंद्रियांना गोचर होत नाहीं व हाडामांसाचा स्थूल देह ह्याच सर्वांना दिसतो, म्हणून सर्व जीवांना एकच देह आहे, अशी सामान्य लोकांची समजूत आहे, पण ती बरोबर नाहीं. या दोन देहांचा विचार करण्यापूर्वी प्रथम जीवाच्या स्वरूपाचा शास्त्रीयदृष्ट्या विचार करूं.

### जीवाचें स्वरूप.

" जीवो ब्रह्मैव नापरः " या सिद्धांताप्रमाणें जीव हा तत्त्वतः ब्रह्मच आहे. पण हें ब्रह्मच तो जीव कसा झाला हें प्रथम पाहूं. ब्रह्म ' एक-मेवाद्वितीयम् ' म्हणजे स्वगत, सजातीय, विजातीय भेदशून्य आहे. अर्थात् मूलतः तें एकच आहे. त्याला आकार, रूप व नांव वगैरे कोणतेच धर्म व गुण नाहींत. परंतु पुढें जीव-जगाची सृष्टि कशी कशी झाली त्याची उपपत्ति लावण्याकरितां प्रथम प्रकृतीची (मायेची) कल्पना केली, व तिच्या संसर्गामुळें शुद्ध ब्रह्मच सगुण म्हणजे शबल झालें; कारण शुद्ध ब्रह्मापासून केव्हांहि सृष्टि होणें शक्य नाहीं. म्हणूनच त्याचे ठिकाणीं शबलपणा स्वीकारला आहे. अशी वेदांतशास्त्रांत कल्पना केली आहे. कोणतेंहि शास्त्र नवीन पदार्थ उत्पन्न करीत नसून ईश्वरनिर्मित पदार्थांचेंच संशोधन करून त्यांचें पृथःकरण किंवा एकीकरण करून व्यवहाराच्या उपयोगी पडणाऱ्या वस्तू कशा निर्माण कराव्या हें सांगत असतें. उदाहरणार्थ, ज्योतिःशास्त्र नवीन ग्रह किंवा तारे उत्पन्न करीत नसून ईश्वरानें अगोदर निर्मिलेल्या ग्रह नक्षत्रांचीच व्यवस्था लावीत असतें; त्याचप्रमाणें वेदान्त-शास्त्र जीव किंवा जगत् निर्माण करीत नसून तें स्वरूपतः कसे आहेत या

गोष्टींचाच विचार करीत असतें; म्हणूनच वेदांतशास्त्रांत तत्त्वतः जरी कांहीं उत्पन्न झालें नाहीं, असा अजातवादाचा सिद्धांत असला, तरी पण प्रत्यक्ष व्यवहारांत सर्व दृश्य जगाचा अनुभव येत असल्यामुळें त्याची व्यवस्था लावण्याकरितां मायेची कल्पना करून या सर्व दृश्य जगाची सृष्टि कशी झाली, याची मोठी सयुक्तिक कल्पना रचली आहे. असो, मायेमुळें झालेलें शबल ब्रह्मच प्रथम 'सत्' म्हणजे 'आहे' असें झालें आहे व हीच शुद्ध सत्ता होय. ह्या सत्तेलाच वेदांत शास्त्रांत 'सामान्य सत्ता' किंवा 'सत्तासामान्य' असें म्हणतात. हे सत् पुढें होणाऱ्या समष्टि जीवांचें कारण होतें, म्हणूनच त्याला 'कारणदेह' असेंहि दुसरें नांव दिलें आहे. येथून पुढें कारणकार्यभावाची कल्पना सुरू झाली. ह्याच 'सत्' मध्यें स्फुरण होऊं लागलें, म्हणजे 'मी आहे' असा संकल्प उत्पन्न झाला कीं, त्यालाच 'चित्त' असें म्हटलें आहे. ह्यालाच वेदांतशास्त्रांत 'चिदाभास' असें नांव दिलें आहे. हा चिदाभास म्हणजेच जीवाची प्रातिभासिक सत्ता होय. हा चिदाभास विषयोन्मुख झाला म्हणजे त्याला आपल्या व्यतिरिक्त विषयांचें सेवन करावें असें वाटूं लागतें व लागलीच तो अहंकारयुक्त बुद्धि, चित्तयुक्त मन, ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, व प्राण या तत्त्वांची आपळे ठिकाणीं कल्पना करितो. या सर्व सतरा तत्त्वांच्या संघातालाच आतिवाहिक किंवा सूक्ष्मदेह असें म्हणतात. प्रतिबिंबाच्या प्रातिभासिक सत्तेलाहि जशी आरसा या उपाधीची गरज असते, तशी जीवाच्या वरील प्रातिभासिक सत्तेलाहि वरील सूक्ष्म तत्त्वांच्या संघातरूपी उपाधीची जरूरी आहे. त्या आतिवाहिक शरीरांत सांपडलेला चिदाभासच जीव होय. अशाच तऱ्हेची जीवाची व्याख्या* विद्यारण्य स्वामींनीं पंचदशींत केलेली आहे. जीवाच्या संबंधीं वसिष्ठ म्हणतात कीं,

---

* जीवाची व्याख्याः—

चैतन्यं यदधिष्ठानं लिंगदेहश्च यः पुनः ॥
चिच्छाया लिंगदेहस्था तत्संघो जीव उच्यते ॥ पंचदशी ॥ ४–११

जीवश्च चेतनाकाशः वातात्मा हृदये स्थितः ॥ नि. पू. ७८-२३.

" जीव चेतनाकाश आहे, प्राण ही त्याची उपाधि आहे व तो हृदयांत स्थित आहे. " तो आंतून स्वांतर्यामी विश्वचैतन्यानें परिपूर्ण होऊन जिवंत राखला जातो. हा जीव व आतिवाहिक देह यांचें इतकें तादात्म्य झालें आहे कीं, जीव निराळा व आतिवाहिक देह निराळा ही भेदकल्पनासुद्धां सामान्य लोकांच्या मनांत येत नाहीं. वास्तव प्रतिबिंब म्हणजेच जसा आरसा, तसें जीव म्हणजेच आतिवाहिक देह; कारण आरसा हा जसा नेहमीं प्रतिबिंबाला सोडून रहात नाहीं, तसा तो जीव जीवदशा असेपर्यंत आतिवाहिक शरीराला सोडून कधींच राहणें शक्य नाहीं. म्हणूनच वसिष्ठ सांगतात कीं आतिवाहिक देह मोक्ष मिळेपर्यंत विलीन होत नाहीं.

## आतिवाहिक देह.

वासनासंघाला ' अतिवाह ' असें म्हटलें आहे, कारण तो वासनासंघ बाह्य व आंतर पदार्थांविषयीं रागद्वेषादिकांना उत्पन्न करून आत्म्याला त्यांच्याकडे नेत असतो. त्या वासनासंघापासून ( अतिवाहापासून ) उत्पन्न झालेल्या लिंगदेहाला आतिवाहिक किंवा सूक्ष्म देह असें म्हणतात.

ह्या आतिवाहिक देहांतील वरील सतरा तत्त्वांमध्यें मन प्रधान असल्यामुळें ह्या देहाला वासिष्ठांत मनोमय देह असेंहि म्हटलें आहे. हा देह आकाशाहूनहि सूक्ष्म आहे. त्याच्या ठिकाणीं वृद्धि वगैरे विकार नसून मोक्ष मिळेपर्यंत तो नाहींसा होत नाहीं. हा सूक्ष्म देह इहलोक व परलोक या ठिकाणीं सर्व व्यवहार करण्याविषयीं समर्थ आहे. अशा ह्या मनोमय शरीराला निरोध करणें एका परमेश्वराशिवाय कोणालाहि शक्य नाहीं.

## आधिभौतिक देह.

अशा प्रथम आतिवाहिक देहाशीं तादात्म्य पावलेल्या जीवाला ' मला खातां पितां यावें, मला सुख व आनंद मिळावा' या भावनेनें त्याच्या ठिकाणीं पुढें हस्तपादादि अवयवांनीं युक्त अशा आधिभौतिक देहाची कल्पना

झाली. नंतर मी हा हाडामांसाचा पांचभौतिक स्थूलदेह आहे, असें जीवाला वाटूं लागलें व या दृढ भावनेनें तो तसा स्थूलदेहरूप बनून गेला. सारांश, जगांतील सर्व जीवांना केवळ अज्ञानामुळें म्हणजेच आत्म्याची (स्वतःची) व आतिवाहिक देहाची विस्मृति झाल्यामुळें आधिभौतिक देहाची 'हा देहच मी आहे' ही आभिमानाची कल्पना पिशाच्च कल्पनेप्रमाणें खरी वाटूं लागली आहे.

## स्थूल व सूक्ष्म देहाचें तादात्म्य.

अज्ञ जीवांच्या ठिकाणीं स्थूल व सूक्ष्म देहाचें इतकें तादात्म्य झालेलें आहे कीं, आपल्या ह्या स्थूल देहाहून सूक्ष्म देह कांहीं निराळा असेल ही कल्पनाहि त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होत नाहीं. उदाहरणार्थ, डोळा (गोलक) हा स्थूल देहाचा एक भाग आहे व त्यांत राहिलेलें चक्षुरिंद्रिय हें सूक्ष्म देहांतील एक तत्त्व आहे. परंतु स्थूल व सूक्ष्म देहाच्या तादात्म्यामुळें डोळा निराळा व चक्षुरिंद्रिय निराळें, हा विवेक त्यांच्या ठिकाणीं मुळींच उत्पन्न होत नाहीं. म्हणूनच अज्ञ जीवांचा सूक्ष्म देह, ते जिवंत असेपर्यंत स्थूल देहाला सोडून रहात नाहीं. मृत झाल्यावरहि त्या जीवाच्या भावनेनें त्याला दुसरा भौतिक देह (पांथदेह) प्राप्त होऊन नंतरच तो यमलोकाला जातो, असें पुराणांतरीं प्रसिद्ध आहे.

## केवळ आतिवाहिक स्थिति.

आतां स्थूल देहाला सोडून नुसत्या आतिवाहिक देहांत राहणें फक्त एका परमेश्वराला किंवा ज्ञानी जीवन्मुक्त बनलेल्या जीवालाच शक्य आहे. इतर सामान्य जीवांना तें मुळींच शक्य नाहीं. सर्व जीव आपापल्या पूर्व संस्कारानुसार उत्पन्न होत असल्यामुळें त्यांना नेहमीं स्थूल व सूक्ष्म असे दोन देह असतात. परंतु समष्टि जीवाला (ब्रह्मदेवाला) पूर्वकालीन अविद्यामय संस्कार नसल्यामुळें त्याला फक्त एक आतिवाहिक देह आहे. कारण ब्रह्मदेव हा प्रथम म्हणजे पंचमहाभूतांच्या उत्पत्तीपूर्वी असल्यामुळें त्याला भौतिक देह नाहीं. आतिवाहिक देहहि शुद्धसत्त्वमय असून तत्त्वतः पाहूं लागल्यास तो सुद्धां त्याच्या ठिकाणीं नुसता भास आहे. ब्रह्मदेव हा स्वतः

चिद्रूप आणि शुद्ध संविद्रूप असल्यामुळें त्याला आपल्या स्वस्वरूपाची व आपल्या भासमान आतिवाहिक देहाची विस्मृति होत नाहीं. ब्रह्मदेवाचा देह चिद्रूप असून साकार आहे आणि स्वयंभु असूनही पुरुषाकार आहे, असा फक्त इतरांना भास होतो.

परमेश्वराप्रमाणें ज्ञानी जीवन्मुक्त जीवांनाहि स्थूलदेहाव्यतिरिक्त आतिवाहिक देहांत राहतां येतें. अभ्यास करितां करितां आत्मस्वरूपाचें साक्षात्कारभूत ज्ञान होऊन वासना अत्यंत क्षीण झाल्या म्हणजे चित्तांत शुद्ध सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो व त्यामुळें तें शुद्ध सात्त्विक बनलेलें चित्त आपल्या आधिभौतिकतेचा भ्रम सोडून आतिवाहिक स्थितीप्रत पोहोंचतें. असा त्याचा आतिवाहिक देह शुद्ध सत्त्वात्मक असल्यामुळें परमात्म्याहून फारसा भिन्न नाहीं. या चिद्रूप देहानें ज्ञानी जीवाला पाहिजे तिकडे संचार करतां येतो व इतरांच्या मनोमय देहाशीं तादात्म्य पावतां येतें. अन्य सर्गातील किंवा अन्य जन्मांतील सिद्ध, देव वगैरेंशीं तें एकरूप होऊं शकतें व अशा तऱ्हेनें तो ज्ञानी जीव परमेश्वराप्रमाणें सर्वज्ञ व सत्यसंकल्पहि बनतो. ( अशा तऱ्हेचें वर्णन 'सिद्धिसामर्थ्य' या पुढील २० व्या प्रकरणांत करण्यांत आलेलें आहे ). आतां चिद्रूप आत्माच जरी सूक्ष्म व स्थूल देहांचें अधिष्ठान आहे, म्हणून अधिष्ठानदृष्टीनें दोन्हीहि शरीरें काल्पनिकच आहेत. फक्त त्यांच्यांत फरक इतकाच आहे कीं, स्थूल शरीराच्या स्वैरगतीला प्रतिबंध होतो व सूक्ष्म शरीराच्या होत नाहीं.

**आतिवाहिक स्थितीच्या बाबतींत वसिष्ठांचा अनुभव.**

सिद्ध पुरुषांना नेहमीं सूक्ष्म देहच आहे. स्थूल देह नाहीं. कारण ज्ञानानें त्यांनीं त्याचा अगोदर बाध केलेला असतो. असें जर असेल तर त्यांचा दुसऱ्या माणसाशीं व्यवहार कसा होतो ? या प्रश्नाचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं, समाधिकाल व विवेकदशा या अवस्थेंत ज्ञानी पुरुषाचें शरीर सूक्ष्मच असतें. समाधि सोडून जागे झाल्यावर व्यवहार करण्याचे वेळीं सूक्ष्म शरीराचें विस्मरण होऊन ज्ञानी पुरुष सत्यसंकल्प असल्यामुळें त्याला स्थूल देहाची कल्पना करितां येतें. पण असें जरी असलें तरी 'मी ह्या लोकांना दिसावा' असा त्याला संकल्प करावा लागतो, तरच त्याच्या ठिकाणीं अधिभौतिक देह प्रकट होतो व तो इतर

लोकांना दिसूं लागतो. अशा तऱ्हेचा संकल्प जर केला नाहीं व दुसऱ्याशीं व्यवहार करूं लागला, तरी त्या व्यवहाराचा दुसऱ्याला कांहींच उपयोग होत नाहीं. हीच गोष्ट नि. प्र. उ. सर्ग ९४ मध्यें वसिष्ठांनीं आपल्या स्वतःच्या अनुभवांवरून स्पष्ट केली आहे. त्या ठिकाणीं वसिष्ठ सांगतातः—

वसिष्ठः—लोकपालांच्या नगरांतून सूक्ष्म देहानें भ्रमण करीत असतां मी सूक्ष्म देहांतच आहे असें विसरलों व लोकांशीं व्यवहार करूं लागलों. पण मला कोणीच पाहीना. मी मोठमोठ्यांनीं जरी ओरडलों तरी माझा शब्द त्या देवलोकांतील कोणींहि ऐकेना. ज्याप्रमाणें स्वप्नांत ओरडणाऱ्याचा शब्द कोणालाही ऐकूं येत नाहीं, त्याप्रमाणें माझें ओरडणें कोणाच्याहि कानीं पडलें नाहीं. त्यावेळीं कोणी वरून पडत असलें व मी त्याला सावरण्याकरितां आपला हात पुढें केल्यास, तो त्याच्या उपयोगी पडत नसे. अशा तऱ्हेनें मी जणूं काय आकाशांतील पिशाच्च झालों. मी देवादिकांच्या अंगावर पाय दिला तर तो त्यांना समजतहि नसे. पुढें मी विचार केला कीं, 'असें कां व्हावें ! आम्ही तर सत्यसंकल्प आहो. मग असे क्लेश का भोगावे ! ' लागलीच ' मला देवगण पाहोत ' असा संकल्प केल्याबरोबर त्या देवलोकांत राहणारे सर्व आबालवृद्ध मला आपल्यासमोर प्रत्यक्ष पाहूं लागले व देवांच्याबरोबर सर्व व्यवहार सुरू झाला.

सारांश, आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व जीवांच्या ठिकाणीं आतिवाहिक किंवा सूक्ष्म देहच तत्त्वतः आहे. आधिभौतिक देह वस्तुतः नाहीं; तरी पण सर्व जीवांच्या ठिकाणीं अभ्यासामुळेंच आतिवाहिक देहालाच आधिभौतिकता प्राप्त झाली आहे. अविवेकी मनुष्याच्या ठिकाणीं आसक्तिमुळ ही आधिभौतिकता अत्यंत सत्य झाली आहे व हा मी, हें माझें, हे पर्वत, हें आकाश, या दिशा हा सर्व मिथ्या भ्रम स्वप्नांतील पर्वताप्रमाणेंच सर्व जीवांना झालेला आहे. हा भ्रम तत्त्ववेत्त्यांनाहि प्रारब्धक्षय होईपर्यंत पूर्णपणें टाळतां येणें शक्य नाहीं; कारण व्यवहार करण्याचा प्रसंग आला कीं दृश्य भ्रम होणारच. सारांश, आतिवाहिक देहांत राहणें व त्यानें संचार करणें हें जसें आत्मज्ञानानें शक्य आहे तसें तें परमेश्वराच्या वरानेंहि शक्य होत असतें. आतिवाहिक देहानें संचार करण्याचें सामर्थ्य लीला राणीला श्री सरस्वती देवीच्या वरानें व विपश्चित् राजाला अग्नीच्या वरानें

प्राप्त झालें होतें. (या ग्रंथाचा भाग २ रा, लीलेची गोष्ट ३ री, पृष्ठ १३
व विपश्चितराजाची गोष्ट ४४ वी, पृष्ठ २६९). परंतु आत्मज्ञानानें
हें सामर्थ्य स्वतःच मिळवितां येतें, त्यामुळें त्यांत पूर्ण स्वातंत्र्य असतें व
परमेश्वरी वरामुळें मिळालेल्या या सामर्थ्यांत तितकें पूर्ण स्वातंत्र्य नसल्या-
मुळें तें केव्हांहि गौणच ठरणार. कारण, वरानें मिळालेल्या या सामर्थ्यानें
मोक्ष मिळत नाहीं. सारांश, आतिवाहिक देहच तत्त्वतःसत्य आहे. आधि-
भौतिक देहाला तत्त्वतः मुळींच अस्तित्व नाहीं. मी स्थूल देह आहे ही
भावना अभ्यासानें चित्तांत दृढ झाली, म्हणजे चित्ताचें स्थूल देहाशीं
तादात्म्य होतें परंतु उलट अभ्यासामुळें ही भावना नाहींशी झाली आणि
स्थूल देहाचा पूर्णपणें निरास झाला म्हणजे मूळचाच सिद्ध असणारा
आतिवाहिक देहच जसाच्या तसा शिल्लक राहून स्थूल देह हा स्वप्नांतील
देह आहे, असा ज्ञानी पुरुषाला अनुभव येतो. अशा तऱ्हेनें ज्ञानी पुरुषाला
आतिवाहिक देहांत रहातां येऊं लागल्यामुळें त्याला वाटेल तेथें सहज
जातां येतें. आत्मबोधाच्या जागृतीमुळें योग्याच्या स्थूल देहाचा जडपणा
नाहींसा होऊन तो अत्यंत हलका होतो व एकाद्या पक्ष्याप्रमाणें तो योगी
आतिवाहिक देहानें आकाशांत संचारहि करण्यास समर्थ होतो. अज्ञलोकांचा
स्थूल देह अनेक दिवसांच्या वासनामुळें दृढ बनलेला असतो. पण जीव
जेव्हां असल्या स्थूल देहाला सोडून निघून जातो, तेव्हां त्याच्या मृत
शरीराला दग्ध करण्यांत येतें; व अशा रीतीनें स्थूल देहाचा नाश झाला
तरी जीव आतिवाहिक देहानेंच परलोकास जातो. मग ज्या ज्ञान्याचें चित्त
प्रबोधातिशयामुळें निर्वासन. झालें, अविद्या सर्वस्वीं नष्ट होऊन ज्याचा
स्थूल देह बाधित झाला, त्याच्या ठिकाणीं जिवंत असतांच आतिवाहिक
देहाचा उदय होईल यांत काय नवल आहे !

### ज्ञानयोग्याचें ज्ञानोत्तर जीवन.

ज्ञानयोग्याचा स्थूल देह ब्रह्मज्ञानानें बाधित झाल्यावर तो ज्ञानी
आतिवाहिक देहांत रहातो. परंतु या आतिवाहिक देहांत प्रत्यक्ष विषयांचें
सेवन घडत नसतें व ज्ञानानें इतर कर्में नष्ट झालीं, तरी प्रारब्धकर्में
भोगल्याशिवाय नाहींसें होत नाहीं व म्हणूनच त्याच्या भोगाकरितां

त्याला प्रत्येक वेळीं स्वेच्छेनें स्थूल देहाची कल्पना करावी लागते. अशा वेळीं तो इतर लोकांना दिसतो. परंतु तेवढा प्रारब्धकर्माचा भोग संपला कीं, तो कल्पिलेला स्थूल देह नाहींसा होतो, म्हणजे तो अंतर्धान पावतो. असेंच म्हणणें जास्त शोभेल, स्वप्नांत ज्याप्रमाणें एका देहाचा त्याग करून मनुष्य दुसऱ्या देहांत प्रवेश करितो त्यावेळीं त्याचा पूर्वीचा काल्पनिक देह शिल्लक रहात नाहीं, त्याप्रमाणें योग्याच्या ह्या अनेक देहांची स्थिति असते. आतां या जीवन्मुक्त योग्याचा स्थूल देह इतर लोकांना दिसत असतो, याचेंहि कारण 'आपण स्थूल शरीरानें लोकांना दिसावें' असा त्याचा सत्य संकल्पच होय. जेव्हां योग्याचे ठिकाणीं आत्मज्ञानाचा उदय होतो तेव्हांच त्याचा स्थूल देह बाधित होत असल्यामुळें आधिभौतिक देहविषयक भ्रांति त्याच्या चित्तांत अवशिष्ट रहात नाहीं. मग तो योगी असेंच म्हणतो कीं, "स्थूल देह आहे कोठें ? त्याला सत्यता कसली आहे ? नाश व्हावयाचा तो कशाचा आणि कोठून ? जें माझें पारमार्थिक स्वरूप त्रिकालाबाधित आहे तेंच कायम आहे फक्त अज्ञान होतें तेवढेंच नष्ट झालें !"

सारांश, ज्ञानयोग्याचा मुख्य देह आतिवाहिक आहे व लोकांना दिसणारा त्याचा आधिभौतिक स्थूल देह नुसता भासणारा असल्यामुळें तो पंचमहाभूतांच्या आघाताला किंवा शस्त्र, विष वगैरेंना बळी पडत नाहीं. याच दृष्टीनें विचार केला असतां प्रल्हादाचा देह ज्ञानानें पूर्ण आतिवाहिक म्हणजेच शुद्धसत्त्वात्मक बनल्यामुळें हिरण्यकशिपूनें त्याला मारण्याचे जे जे प्रयत्न केले ते ते सर्व व्यर्थ गेले. या विषयीं वाटणाऱ्या आश्चर्याचा उलगडा सहज होऊं शकतो. याप्रमाणें इतर साधुसंतांना मारण्याचा दुष्ट लोकांनीं प्रयत्न केला असूनहि त्याचा परिणाम त्यांच्यावर मुळींच झाला नाहीं असें जें आपण पुराणांतून व इतिहासांतून वाचतों व ऐकतों त्याचीहि उपपत्ति याच दृष्टीनें विचार केला असतां सहज लागूं शकते.

यावरून जो ब्रह्मरूप झालेला असतो त्याचा नाश कोणालाहि करितां येत नाहीं असें वसिष्ठ सांगतातः—

अच्छेद्योऽहमदाह्योऽहमक्लेद्योऽशोष्यएव च ॥
नित्यःसर्वगतःस्थाणुरचलोऽहमिति स्थितम्॥ ३-१४-६०

मी आत्मरूप असल्यामुळें मला कोणालाहि शस्त्रानें तोडतां येत नाहीं, अग्नीला जाळतां येत नाहीं, पाण्याला भिजवितां येत नाहीं व वायूला शुष्क करितां येत नाहीं. कारण मी नित्य सर्वव्यापी, स्तंभाप्रमाणें स्थिर व अचल आहे. * ज्या ठिकाणीं शास्त्रीय दृष्ट्या उपपत्ति लागत नाहीं त्या ठिकाणीं ही ईश्वरी करणी आहे, असें सामान्य लोक समजत असतात.

## ज्ञानयोग्याचें मरण अथवा निर्वाण.

आतां ज्यावेळीं सर्व प्रारब्धकर्म भोगल्यावर क्षीण होतें, त्यावेळीं तो योगी विदेहमुक्त होतो. तेव्हांहि योग्याचा देह इतर लोकांना भासमान होत असला तरी तो वस्तुतः नसतोच. परंतु तो नेहमीं लोकांच्या दृष्टीस पडेलच; असाहि कांहीं निश्चयानें नियम करितां येत नाहीं. कारण योग्यानें ' आपलें भौतिक शरीर नष्ट व्हावें, तें कोणाच्याहि दृष्टीस पडूं नये ' असा संकल्प केल्याबरोबर त्याचा स्थूल देह प्रत्यक्ष योग्यांनाहि दिसूं शकत नाहीं, मग सामान्य जनांना तो दिसण्याची गोष्ट सुद्धां बोलावयास नको !' वास्तविक पाहतां योगी जिवंतहि नसतो व मरतहि नाहीं. कारण तो परब्रह्मरूपच झालेला असतो. परंतु अज्ञ जनांच्या ठिकाणीं जन्ममरणाच्या वासना हाडींमांसी खिळून राहिल्यामुळें ' तो जिवंत आहे किंवा मृत झाला आहे ' असा प्रत्यय त्याचे ठिकाणीं येणें अपरिहार्य आहे. सारांश ह्याप्रमाणें सिद्धदशेला पोहोंचलेला ज्ञानी सत्यसंकल्प बनत असल्यामुळें त्याला प्रारब्धकर्म संपल्यावर एकदम अदृश्य होतां येतें व असें झालें म्हणजे लोक तो सिद्धपुरुष सदेह वैकुंठाला गेला किंवा परलोकवासी झाला असें म्हणतात. याच तात्त्विक सिद्धांताला अनुसरून श्री तुकाराममहाराज स्थूल

* भगवद्गीतेंतहि अशाच तऱ्हेचें वर्णन आलेलें आहे.
अच्छेद्यो ऽ यमदाह्यो ऽ यमक्लेद्यो शोष्य एव च ॥
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २-२४

शरीरासहित गुप्त झाले. तुकोबाराय ' कीर्तन करितां करितां अदृश्य झाले,' असेंच एका लेखांत म्हटलें आहे हेंच म्हणणें योग्य दिसतें. आतां योग्याचा आधिभौतिक देह जर शून्य आहे तर तुकाराममहाराज विमानांत बसून वैकुंठास गेले असें जें सांगण्यांत येतें किंवा वाचण्यांत येतें, किंवा निर्वाणाच्या वेळीं शुकाचार्य सूर्यमंडळांत जात असतां जवळच्या लोकांना आढळून आले, अशा तऱ्हेचीं जीं वर्णनें आढळतात त्यांचीं वाट काय लावावयाची ? याचें उत्तर हेंच कीं, तत्त्वज्ञानी पुरुषाचा देह आतिवाहिकच असतो; व त्याचा स्थूल देह तत्त्वज्ञानामुळें बाधित झालेला असल्यामुळें तो लोकांना दिसणें शक्यच नसतें. परंतु सामान्य लोकांच्या मनावर स्वाभाविक अज्ञानाचा पगडा बसलेला असल्यामुळें अज्ञानानें कल्पित केलेल्या योग्याच्या देहाला आपण पहात आहों, असा त्यांना फक्त भास होतो. श्री तुकाराममहाराज सशरीर वैकुंठास गेले किंवा त्यांचा देह कीर्तन करितां करितां अदृश्य झाला ही गोष्ट अपूर्व तर खरीच, पण असाच प्रकार आणखी कांहीं महात्म्यासंबंधानें झालेला आहे.

( १ ) मुक्ताबाई अशाच पहातां पहातां गुप्त झाल्या.

( २ ) कबीरांनीं आपल्या निर्याणाचे वेळीं शिष्यमंडळीस गुलाबाची पुष्पशय्या करावयास सांगितली व ते अंगावर शाल घेऊन तिच्यावर निजले. कांहीं वेळानें लोकांनीं शाल उचलली तों खालीं पुष्पशय्येशिवाय कांहीं आढळलें नाहीं.

( ३ ) शीख धर्माचे संस्थापक गुरु नानक निवर्तल्यावर त्यांचा अंत्य-संस्कार हिंदुधर्माप्रमाणें करावा कीं मुसलमानी धर्माप्रमाणें करावा याचा शिष्यमंडळींत वाद चालला असतां एकानें त्यांच्या मृत शरीरावरील वस्त्र उचललें, तों मृत शरीरच नाहींसें झालेलें आढळून आलें. त्यामुळें जाळावें कीं पुरावें हा वादच मिटला.

( ४ ) द्रविडसाधु तिरुपन्न व शैवसाधु माणिक्य वाचकर यांविषयीं अशाच कथा तिकडे प्रसिद्ध आहेत.

( ५ ) खिस्तीधर्मशास्त्र जें बायबल त्यांतहि प्रेषितांचीं कृत्यें या नवव्या प्रकरणांत हुबेहूब असेंच वर्णन आहे.

## उपसंहार.

सारांश, आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व जीवांच्या ठिकाणीं आतिवाहिक देहालाच भावनेमुळें आधिभौतिकता प्राप्त झाली आहे. वस्तुतः आधिभौतिकता ही मुळींच नाहीं. वास्तविक पहावां आतिवाहिक देहहि तत्त्वतः असत्च आहे. एक परब्रह्मच सर्व जीवजगाच्या रूपानें भासत आहे, म्हणूनच 'अहंब्रह्माऽस्मि' (मी ब्रह्म आहे) व 'सर्वं खल्विदं ब्रह्म' (हें सर्व गज ब्रह्म आहे) हाच सिद्धांत शेवटीं सिद्ध होतो.

# प्रकरण १९ वें.

## मृत्यु व मृत्यूनंतरची स्थिति.

मृत्यु आणि मृत्यूनंतरची स्थिति यासंबंधीं प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध नसल्यामुळें पूर्वीच्या कांहीं लोकांची अशी समजूत होती कीं, याविषयींचा अनुभव योगसामर्थ्यानें मिळवितां येण्याजोगा आहे; परंतु वसिष्ठांनीं यासंबंधानें जें वर्णन केलें आहे, तें आपल्या स्वतःच्या अनुभवावर आधारलेलें आहे. नुसत्या तर्कानें केलेलें नाहीं.

### मरणाची व्याख्या.

वसिष्ठांनीं मरणाची व्याख्या अशा तऱ्हेची केली आहे कीं:—

देहान्तरार्थं देहस्य संत्यागोमरणं स्मृतम् ॥ ५–४०–१.

" दुसरा देह मिळण्याकरितां जो पहिल्या देहाचा त्याग याला मरण असें म्हणतात." मरणानंतर दुसरा नवीन देह मिळत असल्यामुळें वसिष्ठांचें म्हणणें असें आहे कीं, मरणासंबंधानें भिण्याचें कांहींच कारण नाहीं.

### मरणासंबंधीं दोन विचार.

कारण मरणासंबंधीं आपल्याला नक्की कांहीं माहीत नसलें, तरी मरणासंबंधीं दोन गोष्टींची शक्यता आहे. एक मरण म्हणजे अत्यंत नाश व दुसरें मरण म्हणजे देहांतर ( दुसरा देह ग्रहण करणें ).'

पहिला विचार म्हणजे अत्यंत नाश जरी गृहीत धरला, तरी मरणासंबंधीं दुःख करण्याचें कारण नाहीं. कारण,

मृतिरत्यंतनाशश्चेत्तद्भवामयसंक्षयः ॥ नि. उ. १०१–२६.

" मरण म्हणजे अत्यंत नाश असेल, तर त्यामुळें संसाररूपी रोगाचा क्षय होईल."

दुसरा विचार म्हणजे देहांतर जरी गृहीत धरला, तरीहि शोक करण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण,

मृतस्य देहलाभश्चेन्नवएव तदुत्सवः ॥
मृतिर्नाशोहि देहस्य सा मृतिःपरमं सुखम् ॥ नि.उ.१०१-२५.

" मृताला जर दुसऱ्या देहाचा लाभ होत असेल, तर तो नवीन देहाचाच होणार हें उघड आहे; त्यामुळें दुःख न मानतां हर्षच मानणें उचित आहे."

या वरील दोन्ही विचारामध्यें आपल्या देहाचाच नाश होतो, कारण मरण म्हणजेच स्थूल देहाचा नाश होय. या देहांत असणारा जो चिद्घन आत्मा त्याचा केव्हांहि नाश होत नाहीं. तेव्हां ' मरणानें माझा नाश होतो' असें मानून शोक करणें व्यर्थ आहे. जीर्ण झालेल्या देहाचा त्याग करून दुसरा नवीन देह धारण करण्यास कारण होणारें जें मरण तें उपस्थित झालें असतां, आनंद मानणेंच, उचित आहे.

ह्या वरील दोन्ही विचारांचा निर्णय वसिष्ठांनीं असा दिला आहे कीं,

मरणं सर्वनाशात्म न कदाचन विद्यते ॥
स्वसंकल्पांतरस्थैर्यं मृतिरित्यभिधीयते ॥ नि. उ. १८-१.
मृतो नष्ट इति प्रोक्तो मन्ये तच्चमृषाह्यसत् ॥
सदेशकालांतरितो भूत्वा भूत्वाऽनुभूयते ॥ ५-७१-६५.

" मरण हें सर्वनाशात्मक आहे, असें म्हणतां येत नाहीं. आपल्या ठिकाणीं या देहासंबंधीं उत्पन्न होणारे संकल्प नष्ट पडणें व दुसऱ्या संकल्पित शरीराच्या ठिकाणीं ' हा मी ' असा संकल्प स्थिर होऊन पूर्व शरीराची अत्यंत विस्मृति होणें, यास मरण असें म्हणतात. यावरून देह नष्ट झाला म्हणजे जीवहि नष्ट होतो, अशी जी अज्ञानामुळें समजूत होत असते, ती निःसंशय भ्रामक आहे. तो जीव देशकालांतरानें पुनः पुनः कोणत्या तरी देहाची कल्पना करून उत्पन्न होतो."

यावरून मरण म्हणजे आत्म्याचा कायमचा विनाश असें म्हणतां येत नाहीं. कारण तसें म्हटलें तर असा प्रश्न उद्भवतो कीं, हा आत्म्याचा नाश स्वतःकडून होतो ? कीं दुसऱ्याकडून ? स्वतःकडून होतो, असें म्हणतां येणार नाहीं, कारण स्व आणि आत्मा या कल्पना अविरोधी

आहेत. ' जें ज्याचें विरोधी असतें तेंच त्याचें नाशक असतें ' या सिद्धांताप्रमाणें आत्मा स्वतःचा विरोधी नाहीं म्हणून त्याचा नाश स्वतः-कडून होत नाहीं.. बरें दुसऱ्या कोणाकडून आत्म्याचा नाश होत असेल, असें म्हणावें तर तसेंहि म्हणतां येत नाहीं. कारण आत्मा निराकार, निरवयव व असंग असल्यामुळें त्याचा दुसऱ्याकडून नाश होणें कालत्रयींहि शक्य नाहीं, असें या वासिष्ठांत व भगवद्गीतेंतहि स्पष्ट सांगितलें आहेः —

अच्छेद्योऽयमदाह्योऽयं चिदादित्योतिनिर्मलः॥ नि.पू. ७८-४४.
नैनं छिन्दंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ॥
नचैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ भ. गी. २-२३.

" ह्या निर्मल चित्सूर्याचा छेद करितां येत नाहीं व दाहहि करितां येत नाहीं. ह्या आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत, अग्नि दग्ध करीत नाहीं, उदक भिजवीत नाहीं आणि वायूहि शुष्क करीत नाहीं."

याकरितां मरण म्हणजे विनाश असा अर्थ न करितां अन्य देहाची प्राप्ति असें मानण्याशिवाय गत्यंतर नाहीं. म्हणून ' मरणं सर्वनाशात्म न कदाचन विद्यते " हा वर दिलेला वसिष्ठांचा निर्णयच योग्य आहे.

## मनुष्याच्या आयुष्याची मर्यादा.

परमेश्वरानें सृष्टीच्या वेळीं जे नियम करून ठेविले आहेत, त्याला वासिष्ठामध्यें नियति असें म्हणण्यांत आलें आहे. उत्पत्ति प्र. सर्ग ५४ मध्यें या नियतीप्रमाणें कृत, त्रेता, द्वापर व कलि या चार युगांमधून मनुष्य प्राण्याच्या आयुष्याचें प्रमाण अनुक्रमें चारशें, तीनशें, दोनशें व शंभर वर्षे असावें; असें ठरून गेलें आहे. यावरून् वरील युगांमध्यें जन्माला येणाऱ्या मनुष्यप्राण्याला त्या त्या युगाच्या आयुर्मर्यादेपर्यंत जगण्याचा हक्क आहे, असें दिसून येतें. पण ही आयुर्मर्यादा कमी जास्ती झालेली दिसते, याचें कारण मनुष्याचें कर्म आहे. उदाहरणार्थ, सरकारी नोकर कायम झाल्यावर त्याला ३० वर्षे नोकरी करण्याचा हक्क आहे व इतक्या कालपर्यंत त्यानें सरकारची नोकरी इमानें इतबारें केली, तरच त्याचा हा हक्क टिकूं शकतो. पण जर त्यानें कांहीं गैरवर्तन केलें, तर तीस वर्षे पूर्ण होण्याच्या अगोदरच एकदम

त्याला नोकरीवरून कमी करण्यांत येतें. तद्वत् मनुष्यानें अन्यायानें व मन-सोक्त वागण्यास सुरवात केली, तर त्याच्या आयुर्मर्यादेचा ऱ्हास होत असतो. कारण ' कर्मणा जायते जंतुः कर्मणैव विलीयते ' कर्मानेंच मनुष्य जन्माला येत असतो व कर्मानेंच मरत असतो. कर्म हें आयुष्याच्या वृद्धि-क्षयाचें निमित्त आहे, असें वसिष्ठ सांगतातः—

स्वकर्मधर्मे ह्रसति ह्रसत्यायुर्नृणामिह ॥
वृद्धे वृद्धिमुपायाति सममेव भवेत्समे ॥ ३-५४-३०.
बालमृत्युप्रदैर्बालो युवा यौवनमृत्युदैः ॥
वृद्धमृत्युप्रदैर्वृद्धः कर्मभिर्मृतिमृच्छति ॥ ३-५४-३१
यो यथाशास्त्रमारब्धं स्वधर्ममनुतिष्ठति ॥
भाजनं भवति श्रीमान् स यथाशास्त्रमायुषः॥ ३-५४-३२.

भावार्थः—" ज्या ज्या मनुष्याची जीं जीं विहित कर्मे असतात, तीं त्याच्याकडून यथाशास्त्र करण्यांत आलीं नाहींत, तर त्याचें आयुष्य कमी होतें. कर्माचें अनुष्ठान यथाशास्त्र झालें म्हणजे आयुर्मर्यादेनें ठरलेल्या मुदतीपर्यंत मनुष्य वांचतो व शास्त्रांत सांगितलें आहे, त्याहूनहि उच्च भावनेनें आणि श्रद्धेनें कर्मे करणाऱ्या मनुष्याची आयुर्मर्यादा युगमर्यादे-पेक्षांहि जास्त वाढते, अशी नियति आहे. कांहीं निषिद्ध कर्मे अशीं असतात कीं, त्यामुळें मनुष्य बालपणींच मरतो. कांहीं कर्मे अशीं असतात कीं, त्यामुळें मनुष्य तारुण्याच्या भरांत आला असतां मरतो व कांहीं कर्मे अशीं असतात कीं, त्यामुळें मनुष्य वृद्धावस्थेंत मरण पावतो, असें ठरलेलें आहे. जो मनुष्य धर्माचें पालन करितो आणि यथाशास्त्र कर्मे करितो, असा भाग्यवान् मनुष्य शास्त्रानें आंखून दिलेल्या आयुष्याच्या मर्यादेपर्यंत जाऊन पोहोंचतो. "

सारांश, मनुष्याच्या आयुष्याची समाप्ति होऊन तो मृत्यु पावतो, त्याचें कारण त्याचीं कर्मेच होत. (या ग्रंथाचा भाग २ रा, आकाशज ब्राह्मणाची गोष्ट १ री. पृष्ठ ७).

## मरणकालच्या वेदना.

आयुष्याची मर्यादा संपल्यावर मृत्यूच्या प्रांतांत प्रवेश करणारे पुरुष तीन प्रकारचे असतात. एक मूढ ( अज्ञानी ), दुसरा ( धारणाभ्यासी ) व तिसरा सिद्धयोगी. धारणाभ्यासी पुरुष अनायासानें देहत्याग करूं शकतो. सिद्धयोगी पुरुषाविषयीं तर बोलायलाच नको. कारण तो स्वस्वरूपांत स्थित असल्यामुळें निरंतर आत्मसुखांतच असतो व त्याचा देहपातहि सुखांतच होतो. आतां मरणाऱ्या पुरुषाचा जो तिसरा वर्ग त्यांतील पुरुषांची अंतकाळची स्थिति मात्र अत्यंत कष्टप्रद असते. अशा मूढ पुरुषाला मरणकालीं असह्य वेदना भोगाव्या लागतात. अशा मूढांचें चित्त निरंतर विषयवासनांच्या जाळ्यांत गुरफटून गेलेलें असल्यामुळें अंतकाळीं विषयचिंतनाशिवाय त्यांना दुसरें कांहींच सुचत नाहीं. ज्याचें आचरण अशास्त्रीय आणि दुष्टांच्या संगतींतच ज्याचा सारा जन्म गेला आहे; अशा मनुष्याला मरणाच्यावेळीं अग्नींत टाकल्याप्रमाणें भयंकर वेदना भोगाव्या लागतात. असा मनुष्य मृत्युपंथाला लागला म्हणजे त्याचा कंठ घरघर वाजूं लागतो, दृष्टि फिरते आणि मरणाची भीति उत्पन्न होऊन त्याची सारांबळ उडून जाते. त्याच्या डोळ्यापुढें अंधेरी येते, मर्मस्थानीं घांव पडावे त्याप्रमाणें व्यथा होऊं लागतात. सर्व दिशा गरगर फिरत आहेत, असें भासतें. कित्येक वेळां अंतकालचा घोर लागून त्याच्या ध्वनीमुळें इंद्रियरूपी कणांना अत्यंत पीडा होऊ लागतात. त्यावेळीं स्मरणशक्ति लुप्तप्राय होऊन कल्पनासामर्थ्य नष्ट होतें. अशारीतीनें जेव्हां मरणकाळच्या वेदना असह्य होऊं लागतात, तेव्हां पित्तादिरसांनीं भरलेल्या शरीरांतील नाड्या वाजवीपेक्षां जास्त संकोच किंवा विकास पावतात. त्यामुळें शरीरांतील नाड्यांतून अन्नपानादिकांचा रस जाण्याच्या क्रियेंत बिघाड होतो; व शरीरांतील वायु आपली स्थिति सोडून देतो. जेव्हां बाहेरचा वायु नाड्यांतून प्रवेश करीनासा होतो आणि आंत गेलेला वायु बाहेर पडेनासा होतो, तेव्हां नाड्यांचें व्यापार थांबल्यामुळें इंद्रियांचे व्यापारहि बंद पडतात. हृदयकमलरूपी यंत्र हलेनासें होतें. पंखा हलविण्याचें बंद केलें असतां वारा जसा शांत होतो, त्याप्रमाणें हे प्राण अगदीं शांत होतात

व त्याबरोबरच पुर्यष्टकहि शांत होतें. अशा रीतीनें प्राणवायूचें गमनागमन आणि नाड्यांची हालचाल बंद पडूं लागली कीं, मरणकालच्या मरणरूपी मूर्छेचा पूर्ण अंमल बसतो. त्याबरोबर शरीरांतील चेतनाहि नष्ट होवे. नंतर लिंगदेहाचें स्थूल शरीरांतून उत्क्रमण होतें. तेव्हां मनुष्य मरण पावला असे लोक म्हणतात. त्यावेळीं ह्या देहाला जड हें नांव प्राप्त होतें. अर्थात् मरण हा धर्म देहाला आहे, आत्म्याला नाहीं.

## मरणानंतरची स्थिति.

मरणसमयीं मनाचा व प्राणाचा नाश होत नाहीं,तर मरणाची मूर्छा प्राप्त झाली असतां पाण्यांत विरघळून गेलेल्या मिठाप्रमाणें अविचेत त्यांचें वासना-रूपानें अवस्थान होतें व उत्क्रमणसमयीं पुनः त्यांचा आविर्भाव होतो. कारण बृहदारण्यकांत ‘ सविज्ञानोभवति सविज्ञानमेवान्वक्रामति ’ मरणमूर्छा संपल्यावर तो पुनः शुद्धीवर येतो व त्या स्थितींतच शरीरांतून निघून जातो असें म्हटलें आहे. प्राण जेव्हां हें शरीर सोडतात, तेव्हां काम, कर्म यांनीं उपस्थित केलेल्या भावी देहाकाराचा अनुभव घेऊन बाह्य आकाशांत तशा देहाच्या आरंभास अनुकूल अशा भूतमात्राशीं ते संगम पावतात. पुढें पांच देह प्राप्त होऊन जीव आपल्या बऱ्या वाईट कर्माचीं फळें-भोगण्याकरितां या लोकांतून ते दुसऱ्या लोकांत जातात. अशी कल्पना पुराणांतरीं करण्यांत आली आहे. पण ही कल्पना वसिष्ठांना मान्य नाहीं. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, देह प्रेत झाल्यावरहि जीव चित्ताकाशांतच असतो, तो वास्तविक कोठें जात नाहीं. जीव जेव्हां प्राक्तन देहाचा त्याग करून परलोकगमनादि क्रिया करण्यांत गुंतलेला असतो, तेव्हां त्या क्रिया वास्तविक होत असतात व तो कोठें बाहेर जात असतो, असा अर्थ नाहीं; तर स्वप्नांतील स्थितीप्रमाणें तो जीवात्मा आपल्या वासनेनें नानाविध लोक निर्माण करितो आणि त्यांत आपल्या निरनिराळ्या संकल्पा-नुसार निरनिराळे आकार निर्माण करून त्यांच्याशीं रममाण होतो. अशी वस्तुस्थिति आहे, असें वसिष्ठ सांगतात.

तस्मिन्नेव प्रदेशेंऽतः पूर्ववत्स्मृतिमान् भवेत् ॥
तदैव मृतिमूर्छांते पश्यत्यन्यशरीरकम् ॥ ३-५४-९

यत्रैव म्रियते जंतुः पश्यत्याशु तदैव सः ॥
तत्रैव भुवनाभोगमिममित्थमिव स्थितम् ॥ ३-४०-४५

"ज्या ठिकाणीं जीव पूर्वदेहाचा त्याग करितो त्याच ठिकाणीं तो असतो; व मरणकालची मूर्छा नाहींशी झाल्यावर पूर्वजन्मांतील संस्कारानुरूप स्मरणयुक्त होऊन त्याला आपल्या नव्या संकल्पाप्रमाणें नवा देह तेथेंच दिसूं लागतो; व त्याच ठिकाणीं सर्व भुवनांचा देखावादि दिसूं लागतो." हेंच तत्त्व लीला व तापस यांच्या गोष्टीमध्यें सिद्ध केलें आहे. (या ग्रंथाचा भाग २ रा, लीलेची गोष्ट १ ली, पृष्ठ २३ व तापसाची गोष्ट ५० वी, पृष्ठ २९२).

आतां यावर असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, अत्यंत अल्प अशा मरण प्रदेशांत दूर प्रदेशीं गमन करणें वगैरे गोष्टी संभवतील कशा ? याचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं, आत्मा हा व्यापक असल्यामुळें त्यांत आकाश, त्यांतील सूर्य, चंद्र, तसेच पृथ्वी यांनीं युक्त असलेलीं कोट्यवधि ब्रह्मांडें मावूं शकतात. आत्मा व जीव यांत तत्त्वतः ऐक्य असल्यामुळें हा सर्व प्रपंचाभास मृत पुरुषाच्या आत्म्यामध्यें होण्यास कांहींच हरकत नाहीं. हेंच वासिष्ठांतील तत्त्व एका अधुनिक फिलॉसफरला पूर्ण मान्य असलेलें खालील दिलेल्या त्याच्या म्हणण्यावरून दिसून येतें:—

"Having lost our physical body, our faculties open out on another plane; but that plane is not necessarily some where else in space but we may enter 'heaven' or the other place, through we have never left 'earth' (kingsland : Rational Mysticism p. 118).

मरणकाळची मूर्छा प्रत्येक जीवाच्या अनुभवास येत असते; व ती व्यष्टि जीवाच्या ठिकाणीं महाप्रलयाची निद्राच आहे, असें म्हटलें तरी चालेल. या निद्रेनंतर प्रत्येक जीव भ्रमोतील पर्वताच्या नृत्याप्रमाणें भासणारे, अविद्येमुळें उत्पन्न होणारे संकल्प करितो हेच व्यष्टी जीवांचे निरनिराळे सर्ग होत. ज्या ठिकाणीं प्राणी मृत्यु पावतो, त्या ठिकाणीं सर्व भुवनांचा देखावा त्याला दिसूं लागतो आणि त्याच ठिकाणीं तो पुढील जन्माचा सर्व अनुभव

घेत असतो. सारांश, मृत मनुष्य मरणरूपी मूर्छेचा अनुभव घेतल्यानंतर क्रमाक्रमानें किंवा एकदम आपआपल्या कर्मानुसार पुढील सुखदुःखाचे भोग अनुभवीत असतात. प्रथमतः आपण मेलों आहों, अशी त्याची भावना होते. नंतर आपल्या आप्तबांधवांनीं बारा दिवसपर्यंत पिंडदानादि क्रिया केल्यामुळें आपण शरीरधारी झालों आहों, असा त्याचा समज होतो. नंतर तेराव्या दिवशीं करण्यांत आलेल्या पाथेय श्राद्धामुळें आपण संतुष्ट झालों आहों, आपल्याला यमलोकांत घेऊन जाण्यासाठीं हे यमाचे दूत आले आहेत. आणि आपण त्यांच्याबरोबर त्या लोकांत चाललों आहों, असें त्याला वाटूं लागतें. 'हा पहा मी यमलोकास आलों आहें, हा पहा, यमराज या ठिकाणीं विराजमान झाला आहे, यमसभेमध्यें चित्रगुप्तादिकांकडून माझ्या पापपुण्याचा निवाडा केला जात आहे. यमानें आज्ञा केल्यावरून आपल्या कर्मांचीं फळें भोगण्याकरितां मी स्वर्गाला किंवा नरकाला जात आहे. स्वर्गातील किंवा नरकांतील फळें भोगल्यावर मी निरनिराळ्या योनींत प्रवेश करीत आहे. मी आतां मनुष्य झालों आहें. अशा तऱ्हेचे निरनिराळे अनुभव जीवांना येतात.

आतां या ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, ज्याच्या नांवानें पिंड वगैरे देण्यांत येत नाहींत, त्याची मेल्यानंतर काय स्थिति होते? हें सर्व ज्याच्या त्याच्या भावनेवर अवलंबून असतें. देह जिवंत असो किंवा मृत झालेला असो, त्याची जी भावना बनलेली असते, त्यांत यत्किंचित्‌हि बदल होऊं शकत नाहीं. मला माझ्या आप्तबांधवांकडून पिंड देण्यांत आलेला आहे, अशी ज्याची भावना झालेली असते, त्याला जरी पिंड देण्यांत आलेला नसला, तरीहि त्याला पिंडदानाचें फल जो 'पांथ देह' तो प्राप्त होतो; व मला माझ्या बांधवांनीं पिंड दिला नाहीं, अशी ज्याची भावना झालेली असेल, त्याला जरी खरोखर पिंड दिलेला असला तरी त्याला पिंडदानाचा यत्किंचित्‌हि उपयोग होत नाहीं! पदार्थ नेहमीं भावनेप्रमाणें भासत असतात ही गोष्ट खरी, परंतु भावना उत्पन्न होण्याला योग्य कारण असलें म्हणजे तत्संबंधीं भावना उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं, असा शास्त्राचा नियम आहे. म्हणून मृत मनुष्याच्या आप्तबांधवांनीं

शास्त्रोक्त क्रियाकर्म केल्यामुळें मृत आत्म्याला त्याचा उपयोग व्हावा, अशी दृढ इच्छा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली तर भौतिक देह सोडून गेलेल्या जीवाच्या अंतःकरणांत त्याच्या बांधवांच्या दृढ भावनेनुसार प्रेरणा होऊन 'आपण धर्मवीन् आहों,' असा संस्कार त्याच्या मनावर तत्काल उत्पन्न होतो. परंतु त्याच्या उलट स्थिति असली म्हणजे मृत जीवाचे संस्कार नास्तिकपणाचे असले तर मात्र आप्तांच्या क्रियाकर्मांचा त्याच्यावर कांहींच परिणाम होत नाहीं ! सारांश, मृत जीव आणि त्याचे आप्तबांधव अशा दोघांच्या भावनेपैकीं जी भावना प्रबल असेल तिचा जय होतो; व यासाठींच वसिष्ठांनीं असें सांगितलें आहे कीं,

तस्माच्छुभेन यत्नेन शुभाभ्यासमुदाहरेत् ॥ ३-५६-३९.

" शुभ प्रयत्न करीत जावा व शुभवासना अंगीं बाणवून घेण्याचा सतत अभ्यास करावा."

## मृत जीवांच्या कर्मानुसार भिन्न भिन्न गती.

मृत झालेल्या जीवांच्या बऱ्यावाईट कर्मांप्रमाणें त्यांचे ( १ ) महापापी ( २ ) मध्यम पापी ( ३ ) सामान्य पापी ( ४ ) महापुण्यवान् ( ५ ) मध्यम पुण्यवान् व ( ६ ) सामान्य पुण्यवान् असे त्यांचे सहा प्रकार करण्यांत आले आहेत. पातकी जीवांना त्यांच्या दुष्कर्मांमुळें यमलोकाला जातांना वाटेंत बर्फाच्छादित प्रदेश, काटेकुटें, खाचखळगे, ज्यांत तीक्ष्ण धारेचीं शस्त्रें सर्वत्र पसरलेलीं आहेत अशी अरण्यें यांमधून प्रवास करण्याचे प्रसंग येतात व असह्य क्लेश भोगावे लागतात. पुण्यवान् जीवांना आपला मार्ग सुखकारक आहे, वाटेंत दोन्ही बाजूंना हिरवेंगार गवत आहे, मार्गावर वृक्षांची घनदाट छाया पसरली आहे, ठिकठिकाणीं सुंदर विहीरी आहेत, असें आढळून येतें. जे फारच पुण्यवान् असतात त्यांना वाटेंत जातांना त्यांच्या त्यांच्या पुण्याईनें रमणीय उद्यानें, उत्तमोत्तम विमानें, यांच्यापासून मिळणारें दिव्य सुख प्राप्त होतें. पापी जीव आपल्या दुष्कर्मांचें फल भोगण्याकरितां निरनिराळ्या नरकांत पडतात व तेथील विविध दुःखें व यातना यांचा दीर्घकाल अनुभव घेतात. नंतर भूतलावरील निरनिराळ्या

योनीमध्यें जन्माला येताव. अशा तऱ्हेनें अनंतयोनींतून क्रमाक्रमानें फिरतां फिरतां अखेर मनुष्य योनींत जन्म पावतात. पुण्यवान जीव आपल्या पुण्यकर्मांचें फल भोगण्याकरितां स्वर्गादि लोकांना निर्माण करून त्यांतील दिव्य सुखाचा आस्वाद घेतात व नंतर मनुष्ययोनींत जन्माला येतात.

सर्वच जीव आपल्या कर्मानुसार स्वर्गनरकांतील सुख व दुःख भोगून नंतर वायु, पर्जन्यवृष्टि यांच्या द्वारां यव वगैरे धान्यांत शिरतात व तेथून कर्मानुसार ज्या कुलांत त्यांना जन्म घ्यावयाचा असेल त्या कुलांतील पुरुषाच्या शरीरांत अन्नरूपानें प्रविष्ट होऊन रेताचें रूप पावतात व अखेरीस तें रेत स्त्रीगर्भात शिरून त्या ठिकाणीं गर्भाची पूर्ण वाढ झाल्यावर त्या स्त्रीच्या उदरांतून जीव या मनुष्य लोकांत जन्माला येतात. ही सर्व स्थिति पूर्व कर्मानुसार होत असते.

अशा तऱ्हेनें मूढ जीव जोपर्यंत आपल्या आत्मस्वरूपाला जाणीत नाहींत तोंपर्यंत ते आपआपल्या वासनेनुसार निरनिराळ्या योनींमध्यें एका देहांतून दुसऱ्या देहांत आणि दुसऱ्या देहांतून तिसऱ्या देहांत अशारीतीनें संचार करीत रहातात. परंतु आत्मस्वरूपाच्या साक्षात्कारानें परमगतीला (मोक्षाला) प्राप्त झाल्यावर या लोकीं त्यांना पुनः पुनः जन्म मरणाच्या फेऱ्यांत पडण्याचा प्रसंग येत नाहीं.



## तीन प्रधान नाड्या ( सुषुम्ना, इडा व पिंगला ) कुंडलिनी व षट् चक्रें दाखविणाऱ्या मनुष्याची आकृति.




वरील आकृतींत षट् चक्रामधून दाखविलेल्या दुहेरी तीन रेघा तीन प्रधान नाड्यांचा द्योतक आहेत. त्यांपैकीं मधली काळी रेघा सहस्रारचक्रापर्यंत पोहोंचलेली **सुषुम्ना नाडी** होय. वरील आकृतीच्या उजव्या बाजूची पांटरी रेघा **पिंगला नाडी** होय व डाव्या बाजूची साखळी सारखी रेघा **इडा नाडी** होय. ह्या दोन नाड्या नासिकेपर्यंतच गेलेल्या आहेत.

नावांची मुख्य नाडी आहे व ह्या नाडीशींच सिद्धीसामर्थ्य मिळविण्याचा संबंध येतो. म्हणून या नाडीचा प्रथम विचार करूं.

## सुपुम्ना नाडी.

मनुष्य प्राण्याच्या शरीरांत लिंग व गुदा यांच्या मध्यमार्गी जी शिवण आहे, तेथून वरच्या बाजूस व बेंबीच्या खालच्या बाजूला एक त्रिकोणाकृति कंद आहे. तेथून पाठीच्या कण्याला सुरवात होते. हा पाठीचा कणा 'ळ' या अक्षराच्या आकृतीच्या हाडाचे कित्येक मणके एकावर एक रचून तयार केलेला आहे. या शरीरांत 'सुपुम्ना' म्हणून जी नाडी आहे, ती या कण्याच्या पोकळींतून मागील पानावरील आकृतींत दाखविल्याप्रमाणें प्रथम चार पाकळ्यांच्या मूलाधार चक्रांत जाते व तेथून क्रमाक्रमानें सहा पाकळ्यांचें स्वाधिष्ठान, दहा पाकळ्यांचें मणिपूर, बारा पाकळ्यांचें अनाहत व सोळा पाकळ्यांचे विशुद्ध या चक्रांत जाते. तेथें तिला एक पश्चिमेकडे व दुसरा पूर्वेकडे असे दोन फाटे फुटतात. पश्चिमेकडील फाटा पाठीमागील मेरुदंडांतून (मणक्यांतून) सहस्रार चक्रापर्यंत म्हणजे ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन पोहोंचतो. दुसरा पूर्वेकडील फाटा भुवयांच्या मध्यभागीं असणाऱ्या दोन पाकळ्यांच्या आज्ञा चक्रांतून सहस्रार चक्रापर्यंत म्हणजे ब्रह्मरंध्रांत जाऊन पोहोंचतो. मस्तकांतील संज्ञानवाहक आणि क्रियाप्रेरक असे जे दोन कंद अथवा गोलक आहेत आणि ज्याला थोरला मेंदू आणि धाकटा मेंदू अशीं नांवें आहेत, त्या दोहोंचे मिळून झालेलें हें सहस्रार चक्र होय. त्याला सहस्र म्हणजे अनेक पाकळ्या आहेत. ह्या सुपुम्ना नाडीच्या दोन्ही बाजूस दोन नाड्या आहेत, त्यापैकीं डाव्या बाजूच्या नाडीला 'इडा' व उजव्या बाजूच्या नाडीला 'पिंगला' अशीं नांवें देण्यांत आलीं आहेत. या इडा व पिंगला या दोन नाड्यांच्या योगानें श्वासोच्छ्वास क्रिया होत असते, म्हणून या नाड्यांचा प्रत्यय मनुष्याला क्षणोक्षणीं येत असतो. पण सामान्य मनुष्यामध्यें सुपुम्नानाडीचें द्वार बंद असतें. त्यामुळें तिच्या कर्तृत्वशक्तीचा कांहींच प्रत्यय येत नाहीं. सुपुम्नेच्या क्रियेचा प्रत्यय फक्त योग्यांच्याच ठिकाणीं येत असतो. सामान्य मनुष्य प्राण्यामध्यें मागील पानावरील आकृतींत दाखविल्या-

# प्रकरण २० वें.

## सिद्धि सामर्थ्य.

सामान्य मनुष्याला ज्या गोष्टीची माहिती नसते किंवा जी गोष्ट करितां येत नाहीं, ती करून दाखविण्याचें सामर्थ्य किंवा अलभ्य वस्तु मिळवून देण्याचें सामर्थ्य याचें नांव सिद्धि. उदाहरणार्थ, 'दूरश्रवण' ही सिद्धि योगसामर्थ्यानें मिळवितां येते; पण ज्यांना योगसामर्थ्य नसतें, त्यांना असें वाटतें कीं, ही सिद्धि नसून पूर्वीच्या लोकांची ढोंगबाजी आहे. पण आतां रेडिओचा शोध लागल्यापासून आधुनिक लोकांची अशी खात्री पटत चालली आहे कीं, 'दूरश्रवण' ही सिद्धि पूर्वी योगसामर्थ्यानें मिळवितां येत असली पाहिजे. त्याचप्रमाणें 'टेलिव्हिजन' चा शोध लागल्यामुळें 'दूरदर्शन' ही सिद्धि देखील योगसामर्थ्यानें पूर्वी योगी लोक मिळवीत असले पाहिजेत, असें आतां लोकांना पटूं लागलें आहे. अशा तऱ्हेनें योगसामर्थ्यानें सर्व सिद्धी मिळवितां येण्याजोग्या आहेत, असें मानण्यास आतां विचारी मनुष्य तक्रार करील असें वाटत नाहीं. जन्म, औषधि, मणि, मंत्र व तप यांच्यायोगानें सिद्धी प्राप्त होतात. पण या सर्व सिद्धी योगाभ्यासानें प्राप्त होतात. असें श्रीमत् भागवतांतहि* व पातंजलसूत्रांतहि× सांगितलें आहे. वसिष्ठ सांगतात कीं, मी या सिद्धींचें वर्णन करीत नाहीं. कारण तें ऐकून सामान्य लोकांना त्या सिद्धींचीच इच्छा होईल व ते त्या सिद्धी संपादन करण्याविषयीं प्रवृत्त झाले म्हणजे परमार्थापासून दूर जातील व अशा तऱ्हेनें ते आपला घात करून घेतील. या सिद्धी तीन प्रकारच्या आहेत. (१) स्वाभाविक सिद्धीः–ह्या सिद्धी ब्रह्मनिष्ठ पुरुषाच्या ठिकाणीं स्वभावतःच असतात. पतंजलीनें ह्यांना 'समाधिज' असें म्हटलें आहे.

---

* जन्मौषधितपोमंत्रैर्यावतीरिह सिद्धयः ॥
योगेनाप्नोति ताः सर्वाः नान्यैर्योगगतिं व्रजेत् ॥ ११-१५-३४

× जन्मौषधिमंत्रतपः समाधिजाः सिद्धयः ॥ ४-१.

(२) गौणिक सिद्धी व (३) क्षुद्र सिद्धी. जो पुरुष ज्ञानेंद्रियांचें व कर्मेंद्रियांचें आकलन करून प्राणांचा व मनाचा निग्रह करतो आणि निष्ठापूर्वक परमेश्वरांच्या ( आत्म्याच्या ) ध्यानांत गढून जातो त्यास पाहिजे ती सिद्धि प्राप्त होते. या सिद्धींचें सविस्तर वर्णन श्रीमत्‌भागवत स्कंध ११ अध्याय १५ मध्यें व या वासिष्ठांतील निर्वाण प्रकरण-पूर्वार्ध सर्ग ८० ते ८२ मध्यें करण्यांत आलें आहे. त्याचा सारांश पुढें दिला आहे.

## सिद्धिसंपादनाचे मार्ग.

सामान्यतः सिद्धिसंपादन करण्याचें दोन मार्ग प्रसिद्ध आहेत. एक मार्ग म्हणजे राजयोगाचा, म्हणजेच पतंजलीनें आपल्या योगसूत्रांत सांगितल्या-प्रमाणें धारणा ध्यान समाधिरूप मनाच्या संयमानें सिद्धि संपादन करण्याचा होय; पतंजलीनें या सिद्धींना ' समाधिज सिद्धी ' असें म्हटलें आहे. या सिद्धी निष्कामपणानें योगानुष्ठान करीत असतां सहजपणानें प्रकट होत असतात व दुसरा मार्ग म्हणजे हटयोगाचा, म्हणजे प्राणांच्या नियमनानें कुंडलिनी शक्तीला जागृत करून सर्व सिद्धी संपादन करण्याचा होय. योगवासिष्ठांत जरी या दोन्ही मार्गांचा विचार केला आहे, तरी वसिष्ठांना पहिलाच मार्ग पसंत आहे. तरी वसिष्ठांनीं हा पतंजलीचा ' मनःसंयमनाचा ' मार्ग असें नांव न देतां ' ज्ञानसाध्यसिद्धि ' असें नांव दिलें आहे.

श्रुतं त्वया योगसाध्यमणिमाद्यर्थसाधनम् ।
ज्ञानसाध्यमिदानीं त्वं शृणु श्रवणभूषणम् ॥ नि. पू. ८२-१४

" तूं योगसाध्य आणिमादि सिद्धींचें साधन ऐकलेस, आतां श्रवणाचें भूषण असें ज्ञानसाध्य ऐक." अशा तऱ्हेनें ' योगसाध्य सिद्धि ' आणि ' ज्ञानसाध्य सिद्धि ' अशीं नांवें दिलीं आहेत.

## योगसाध्यासिद्धींचा क्रम.

१४६ पृष्ठावरील मनुष्याच्या आकृतींत दाखविल्याप्रमाणें मनुष्यप्राण्याच्या शरीरांत लहानमोठ्या मिळून एकंदर ७२००० नाड्या आहेत. त्यामध्यें ' शतं चैका हृदयस्य नाड्यः ' एकशेंएक नाड्या मुख्य आहेत. असें योग-शास्त्रांत वर्णन करण्यांत आलें आहे. ह्या सर्व नाड्यांपैकीं एक ' सुषुम्ना '

प्रमाणें या सुषुम्नानाडीला तिच्या मुखाच्या ठिकाणीं आपल्या शरीराचे साडेतीन वेढे देऊन व शेपूट तोंडांत वळकट धरून कुंडलिनीनें आपलें मुख तिच्या द्वारीं ठेविलें आहे. त्यामुळें सुषुम्नानाडीचें द्वार बंद झालें आहे. म्हणूनच सामान्य मनुष्याला इतर नाडीप्रमाणें सुषुम्नानाडींत प्राणाचा प्रवेश करितां येत नाहीं. परंतु प्राणायामाच्या अभ्यासानें ही कुंडलिनी जागृत झाली म्हणजे सुषुम्नेच्या द्वारीं ठेवलेलें आपलें मुख उचलून व आपले वेढे सोडून सुषुम्नेच्या मार्गांत प्रवेश करून वर ब्रह्मरंध्रापर्यंत ( मेंदूपर्यंत ) गमन करितें व सर्व शरीरभर पसरलेल्या ज्ञानवाहक व क्रियाप्रेरक सर्व नाड्यांना उत्तेजित करिते. अशा तऱ्हेनें ज्या योग्याची कुंडलिनी जागृत होऊन ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन पोहोंचली त्या योग्याच्या ठिकाणीं अद्भुत सिद्धीसामर्थ्य प्रकट होत असतें.

## कुंडलिनी.

वीणेच्या मूलप्रदेशीं तार जशी वेगानें झणत्कार करीत असते, त्याप्रमाणें ही साडेतीन वलयांच्या आकाराची कुंडलिनी हीच अत्यंत सूक्ष्म 'पराशक्ति' स्फुरण पावत असते. तीच शब्दब्रह्मात्मिका स्फूर्ति आहे. तीच प्राणाच्या संगानें नाभि, हृदय, कंठ या स्थानीं उत्तरोत्तर अधिक व्यक्त होत जाऊन पश्यन्ती, मध्यमा व वैखरी या भेदास प्राप्त होते. ही सर्व प्राण्यांची परमशक्ति आहे. ही प्राण, इंद्रियें, बुद्धि इत्यादि सर्वांच्या शक्तींना सत्ता व स्फूर्ति देते आणि त्यांना आपआपल्या कार्याविषयीं प्रवृत्त करिते. अतिशय रागावलेल्या भुजंगीप्रमाणें ती एकसारखी आपल्या तोंडानें प्राणाला वर फेकते व अपानाला खालीं ओढते. याप्रमाणें ती सदा निश्वासरूप होऊन राहिली आहे. ही कुंडलिनी देहांत जीवशक्ति होऊन राहिली आहे. ती अपानश्वास प्राप्त होऊन सतत अधोभागीं वहात असून समानरूप होऊन नाभीमध्यें स्थित आहे व उदान संज्ञक होऊन उर्ध्व भागीं स्थित आहे. ती मध्यें सौम्य असते, म्हणजे तिला अपानवृत्ति खालीं व उदानवृत्ति वर जरी ओढीत असली, तरी ती स्वतः निश्चलच रहाते. या मधल्या समानवृत्तीनें घट्ट धरून ठेवल्यामुळेंच उर्ध्ववृत्ति जरी अत्यंत बलाढ्य असली तरी ती उदान रूप बनून स्वस्थ रहाते. लिंगशरीराला बाहेर

घालवीत नाहीं. अशा रीतीनें कुंडलिनीनें आपल्या मधल्या समान वृत्तीनें जर अपान वृत्तीला यत्नानें धारण केलें नसतें व उर्ध्व वृत्तीला जर धरून ठेवलें नसतें, तर जीवसंवित् सर्व बलानें आकर्षण केली जाऊन अधो-मार्गानें किंवा उर्ध्वमार्गानें बाहेर निघून गेली असती व पुरुष मरण पावला असता. पण उर्ध्वगमन व अधोगमन सोडून प्राण्यांच्या देहांत प्राणापानांच्या निरोधानें ती सर्व शरीरांत समानवृत्तीनें जर राहील, तर इतर सर्व वृत्तींचा जय होऊन सर्व व्याधींचा क्षय होईल व मृत्यूलाहि जिंकतां येईल.

सारांश, मागील १४६ पानावरील आकृतींत दाखविल्याप्रमाणें कुंडलिनी ही सर्व प्राण्यांची जीवनशक्ति, उदरांतील मूलाधार संज्ञक चक्रांतून वर जाणाऱ्या सुषुम्नानाडीच्या मुळाशीं आपल्या अंगाचे साडेतीन वेढे देऊन रहात असते. म्हणूनच 'कुंडलिनी' ही शक्ति व 'सुषुम्ना' ही नाडी असल्या-मुळें ह्या दोन्ही भिन्न आहेत, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण सामान्य लोकांचा ह्या बाबतींत बराचसा गोंधळ होत असतो, म्हणून हें मुद्दाम ह्या ठिकाणीं नमूद केलें आहे.

## प्राणांचें वर्णन.

ज्या प्राणापानांच्या निरोधानें वर वर्णन करण्यांत आलेली कुंडलिनी जागृत केली जाते, त्या प्राणांच्या स्वरूपस्थितीचें वर्णन निर्वाण प्र० पू. सर्ग २४ मध्यें केलेलें आहे. त्याचा थोडक्यांत सारांश असा आहे:—

या स्थूल शरीराच्या मध्यभागीं ( उदरांत ) मागील १४६ पानावरील आकृतींत दर्शविलेल्याप्रमाणें सुषुम्नेच्या दोन्ही बाजूला 'इडा' व 'पिंगला' अशा दोन सूक्ष्म नाड्या उजव्या व डाव्या बाजूंच्या कोठ्यांत फारशा व्यक्त न होतां राहिलेल्या असून नासिकेमध्यें प्राणसंचार या चिन्हावरून अभिव्यक्त होऊन राहिल्या आहेत. त्यांत सर्व प्राण शक्तींना आश्रयभूत असें अस्थिमांसमय अशा कमलांच्या तीन जोड्यांचें मिळून झालेलें एक 'हृत्पद्मयंत्र' आहे. बहात्तर हजार नाड्यांचें तें मूळ आहे. त्याला 'पुरीतत्' असें म्हटलें आहे. ह्या यंत्राला एक वर नाळ आहे व एक खालीं नाळ आहे. त्याची

दळें एकमेकांना संपुटाकार होऊन स्पर्श करीत असतात. नासिकेच्या अग्रापासून पायापर्यंत सर्व शरीरांत संचार करणाऱ्या चंद्रसंज्ञक अपान वायूच्या अमृतसेकानें त्याचीं दळें ( पाकळ्या ) विकास पावतात. त्याच प्रमाणें प्राणसंचारानें तीं थोडीशी संकोच पावतात. म्हणूनच त्या कमळाच्या पाकळ्या प्राणवायु व अपानवायु यांनीं व्याप्त होऊन थोडयाशा हलतात. प्रत्येक उच्छ्वासाबरोबर विकास पावतात व निश्वासाबरोबर संकोच पावतात. बाहेरील लतेचीं पानें वारा लागला असतां जशीं हलतात व त्यामुळें सर्व बाजूंनीं वायु उत्पन्न होतो, त्याप्रमाणें प्राणापानांच्या योगानें आंतील कमळांच्या पाकळ्या हालूं लागल्या असतां तो शरीरांतील वायु वृद्धिंगत होऊन 'पुरीतत्'शीं संबंध असलेल्या नाडयांच्या छिद्रांत प्रवेश करून सर्व शरीरभर पसरतो. हृदयांत असलेल्या वायूला प्राण असें म्हणतात. त्याचीच एक शक्ति नेत्रांची उघड झाप करविते. दुसरी शक्ति स्पर्शाचें ग्रहण करते. तिसरी शक्ति नासिकेच्या द्वारां वहाते. चवथी अन्नाला जिरविते. पांचवी वचनें बोलते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जसा एखादा यांत्रिक यंत्राकडून सर्व चेष्टा करवितो, त्याप्रमाणें हा भगवान् वायु शरीरांतील सर्व कांहीं करतो. त्यांत प्राण व अपान या नांवाचे दोन वायू 'वर गमन करणें' व 'खालीं गमन करणें' या दोन क्रियेंचा संकेत करून वर व खालीं पसरले आहेत. कमलनालांतील तंतूचें अंग हजार विभाग करून फाडले असतां त्याचा जो अत्यंत सूक्ष्म भाग होतो, त्याहूनहि अत्यंत सूक्ष्म नाड्यांतून होणारी या प्राणांची गति विद्यमान असूनहि दिसत नाहीं.

अशा ह्या प्राणापानांच्या गतीचा निरोध केल्यानेंच सर्व सिद्धी प्राप्त होतात असें वसिष्ठ सांगतातः—

> राज्यादिमोक्षपर्यंताः समस्ताः एव सिद्धयः ॥
> देहानिलविधेयत्वात्साध्याः सर्वस्य राघव ॥ नि. पू. ८०.३५

राज्यापासून मोक्षापर्यंतच्या सर्व सिद्धी शरीरांतील प्राण वायूशीं संबद्ध असल्यामुळें अधिकारी योग्याला साध्य होतात. म्हणूनच पूरक, कुंभक व रेचक यांचा चांगला अभ्यास केला असतां सर्व प्राण चाकराप्रमाणें योग्याच्या

आधीन होतात. ह्या प्राणायामाचा अभ्यास करणाऱ्या पुरुषानें गुदादि-द्वारांचा संकोच करून सिद्धासनादि आसनें करण्याचा अभ्यास करावा. शरीर, मान व मस्तक यांस सम धारण करावें. नासाग्रदृष्टि करावी. शुद्ध सात्त्विक अन्नाचें परिमित सेवन करावें. उत्तम आचार पाळावा. सज्जनांचा समागम करावा. मनांतील सर्व चिंतांचा त्याग करून सुखानें बसावें आणि प्राणायाम करावा.

## प्राणायाम.

निरोगी प्रकृतीचा मनुष्य एका दिवस–रात्रींत मिळून २४ तासांत किंवा ६० घटकांत २१६०० वेळा श्वासोच्छ्वास करीत असतो. ह्या हिशोबानें एका मिनिटात पंधरा श्वासोच्छ्वास पडतात. हीच अजपागायत्रीच्या मंत्राची संख्या आहे ( या मंत्राचें स्वरूप व संकल्प या ग्रंथाचा भाग २ रा, जनकाची गोष्ट १६ वी; यांतील सिद्धगीतेंत सांगितलें आहे, पृष्ठे १०७–१०८ ). पूरक, कुंभक आणि रेचक यांच्या योगानें श्वास–प्रश्वासांच्या नैसर्गिक गतीचा प्रयत्नानें विच्छेद करणें ह्या प्राणायाम होय. आतां या प्राणायामांतील पूरक, कुंभक व रेचक यांचा विचार करूं. हृदयापासून निघालेल्या प्राणाचें नासिकेच्या द्वारां बाहेर जाणें याला रेचक असें म्हणतात. बाहेरच्या वायूचें नासिकेच्या द्वारां हृदयांत येणें याला पूरक म्हणतात. हृदयांत आलेला वायु तेथेंच कोंडून ठेवणें म्हणजे पुनः त्याचा रेचक होऊं न देणें याला कुंभक असें म्हणतात. हृदयांत होणाऱ्या कुंभकाप्रमाणें बाहेरहि कुंभक होत असतो, त्याला बाह्यकुंभक असें म्हणतात. नासिकेच्या अग्रापासून निघालेला वायु नासाग्राच्या बाहेर बारा अंगुलांपर्यंत संचार करीत असतो. हा त्याचा संचार म्हणजेच बाह्यपूरक होय. हा वायु बाहेरील द्वादशांगुलस्थानीं अस्त पावल्यापासून पुनः जोंवर अपानाचा उगम झाला नाहीं तोंवर त्याला पूर्ण समअवस्थेंत असलेला बाहेरील कुंभक म्हणतात; व त्या द्वादशांगुलस्थानापासून आंत येण्यास निघालेला वायु हा बाहेरील रेचक व तोच नासिकाग्रापासून हृदयांपर्यंत येऊं लागला म्हणजे त्याला अंतःपूरक असें म्हणतात. अशा तऱ्हेनें प्राणायामामध्यें एक हृदयांत होणारा व दुसरा नासिकाग्रापासून बाहेर द्वादशांगुलस्थानीं होणारा असे दोन कुंभक

मानले आहेत. या क्रियेस प्राणायाम * असें म्हटलें आहे. हा प्राणायाम माहीतगार माणसाकडून समजून घेऊन करावा म्हणजे शरीरामध्यें कोणताहि बिघाड होणार नाहीं.

## अजरामर सिद्धि.

प्राणवायु शरीरांतच परिच्छिन्न होऊन राहिला आहे अशी जी साधारण समजूत आहे तिचा परित्याग करून " मी अधिदैव सूत्रात्मा आहें " अशा धारणेनें इंद्रियांच्या व्रतांचा त्याग करणें व केवळ प्राणव्रतच धारण करणें हेंच प्राणापानांचें अनुसरण होय. वाणी 'मी भाषणच करीन' असें व्रत धारण करून बसली, डोळे 'मी पाहीनच' असें म्हणाले, श्रोत्रादि इतर इंद्रियांनीहि असेंच श्रवणादिकांचें व्रत धरलें. पण सर्व इंद्रियांचीं हीं व्रतें आसक्तिरूप पापानें दूषित झालेलीं होतीं, म्हणून मृत्यूनें त्यांच्या त्या व्रतांचा भंग केला. मुखनासिकादि स्थानांतून संचार करणें हेंच प्राणाचें व्रत होतें. तें विषयासक्तीनें दूषित झालेलें नव्हतें. त्यामुळें मृत्यु त्याचा भंग करण्यास समर्थ झाला नाहीं. म्हणूनच व्रतभंग न झालेला एकटा प्राणच मृत्यूकडून ग्रासला जात नाहीं. यास्तव 'तोच मी आहे' अशी धारणा व केवळ त्याच्या व्रताचें आचरण करणें म्हणजेच अनासक्तियोग होय. एतद्रूप प्राणचिंतेनें मृत्यूला जिंकतां येतें. बृहदारण्यकांत ही व्रतमीमांसा दिली आहे.

अशा तऱ्हेची प्राणचिंता भुशुंडानें करून त्यानें मृत्यूला जिंकले होते व तो अजरामर झाला होता असें त्यानें वसिष्ठांना सांगितलें आहे.

वर वर्णन केलेल्या आंतर व बाह्य कुंभकावस्थेंत म्हणजे प्राणापानांचे संधीकालीं आत्म्याचें स्वरूप सदा प्रकाशमान होत असतें. प्राणापानांच्या

---

*प्राणायाम करण्याची पद्धत:—

पूरकाच्या दुप्पट वेळ रेचक करावा व चौपट वेळ कुंभक करावा म्हणजे चार सेकंद पूरक केला तर सोळा सेकंद कुंभक करावा व आठ सेकंदपर्यंत रेचक करावा. यापुढें कुंभकाचें प्रमाण वाढविण्याचा अभ्यास करावा. अशा तऱ्हेनें कुंभकाचें प्रमाण वाढविल्यावर कुंडलिनी जागृत होत असते.

आंतहि हें परमात्मतत्त्व अवस्थित आहे. पण तो आत्मा प्राण नव्हे व अपानहि नव्हे. तथापि त्याचा परिचय होण्यासाठीं ' तो प्राणाच्या आंत आहे' असें म्हटलें आहे. "अशा ह्या प्राणापानामध्यें व त्यांच्या संधिकाला-मध्यें म्हणजे आंतर्बाह्य कुंभकावस्थेमध्येंहि असणाऱ्या चिदात्म्याची सतत उपासना केल्यामुळें आम्हीं अजरामर जीवन्मुक्त झालों आहोंत" असें भुशुंडानें वसिष्ठांना सांगितलें आहे. ही प्राणचिंता आत्मचिंतेची मैत्रीण आहे. आत्मचिंता म्हणजे साक्षात्कार होईपर्यंत आत्मविचार करीत राहणें ही होय. पण ही आत्मचिंता दुष्प्राप्य आहे, असें कित्येकांचें म्हणणें आहे. ' अव्यक्ता हि गतिर्दुःखम् ' असें भगवद्गीतेंतहि सांगितलें आहे. म्हणून भुशुंडानें आत्मचिंतेचा स्वीकार न करितां ह्या प्राणचिंतेचा अभ्यास करून परमपदवी प्राप्त करून घेतली. ( या ग्रंथाचा भाग दुसरा, भुशुंडाची गोष्ट २५ वी. पृष्ठें १८०–१८१ )

सारांश, प्राणचिंतेनें मिळवितां येण्याजोगी ही अजरामर होण्याची मुख्यसिद्धि आहे. असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आत्मचिंता व प्राणचिंता हे दोन्ही मार्ग जरी मोक्षाची प्राप्ति करून देणारे असले तरी वसिष्ठांच्या मतानें आत्मचिंताच सुसाध्य आहे, असें

**ममत्वभिमतः साधो सुसाध्यो ज्ञाननिश्चयः ॥** नि. पू. १३–८

' मला तर ज्ञाननिश्चयच सुसाध्य वाटतो. ' या श्लोकांत स्पष्ट विधान केलेलें आहे (याचें सविस्तर वर्णन 'योगवासिष्ठ व भगवद्गीता' या मागील १५ व्या प्रकरणामध्यें आलेलें आहे )

याशिवाय इतर कांहीं मुख्य सिद्धींचें वर्णन वासिष्ठाच्या नि. प्र. पू. सर्ग ८१ व ८२ मध्यें करण्यांत आलेलें आहे. त्याचा सारांश पुढें दिला आहे.

## गरिमासिद्धि.

पूरकाच्या अभ्यासानें कंठाच्या खालीं कूर्माच्या आकाराची जी नाडी* 

---

* हृदयाचा आकार सामान्यतः कासवासारखा असल्यामुळें ह्यालाच कूर्मनाडी असें म्हणतात. हेंच हृदयस्थानचें अनाहतचक्र असावें असें वाटतें.

आहे, तिच्यामध्यें प्राणाला स्थिर करून जेव्हां पुरुष स्थिर होतो, तेव्हां शरीराला मेरुसारखें स्थैर्य प्राप्त होतें व शरीराला पुष्टि येते. ही गरिमा नांवाची सिद्धि होय.

### आकाशगमनसिद्धि.

पूरकानें देहाचा अंतर्भाग भरून टाकल्यानंतर मूलाधारापासून ब्रह्मरंध्रापर्यंत प्राणवायूचें वर आकर्षण केलें असतां प्राणनिरोधामुळें उद्भवलेला ऊष्मा, त्यामुळें होणारा शारीरक्लेश, मानसिक श्रम यांना अभ्यासपाटवानें व अमृतवृष्टीनें सहन करण्याकरितां जेव्हां कुंडलिनीला वर नेलें जातें, तेव्हां ती वर नेली जाणारी कुंडलिनी आकर्षणामुळें दंडासारखी दीर्घ व सरळ होते आणि नागिणीसारखी झटकन् अभ्यास पाटवानें उर्ध्व गमन करते. ती त्वरेनें वर जातांना देहांतील सर्व नाड्यांचें आपल्या बरोबर आकर्षण करून घेते. त्यामुळें त्यावेळीं ती लतेसारखी दिसते. तेव्हां हें शरीर नाड्यांच्या द्वारां वायूनें सर्वतः भरलेलें असतें. त्यांत थोडासाहि अवकाश नसतो. त्यामुळें अगदीं हलकें झालेलें हें सर्व आपादमस्तक शरीर, विहिरींतून वर ओढली जाणारी मोट आपल्यांत असलेल्या पाण्याला जशी वर उडवितें, त्याप्रमाणें हलकें झालेलें शरीर वर उडूं लागतें, हेंच त्याचें आकाशगमन होय. याप्रमाणें अभ्यासानें योग्याला आकाशगमन सिद्धि प्राप्त होते.

### सिद्धदर्शन सिद्धि.

जेव्हां रेचक वायूच्या प्रयोगानें वर आकर्षण केली गेलेली कुंडलिनी शक्ति सुषुम्नानाडींतील प्राणप्रवाहानें मस्तकांतील कपालद्वयाच्या संधिद्वारां म्हणजेच ब्रह्मरंध्राच्याबाहेर बारा अंगुलाच्या अंतरावर असलेल्या षोडषांत नांवाच्या स्थानांत एक मुहूर्तपर्यंत स्थिर रहाते, तेव्हां आकाशांत संचार करणाऱ्या सिद्धांचें दर्शन होतें.

### परकायप्रवेश सिद्धि.

नासिकाग्राच्या बाहेर बारा अंगुलप्रमाण प्रांतांत रेचकाचा अभ्यास करणें. या युक्तीनें प्राणाला चिरकाळ तेथें स्थिर केलें असतां योगी दुसऱ्या शरीरांत प्रवेश करूं शकतो.

## दूरदर्शन सिद्धि.

प्राण व अपान या दोघांच्या संघर्षापासून स्वभावतःच जठरांत अग्नि उत्पन्न होतो. या अग्नीनें स्वभावतःच थंड असलेला हा देह उष्णतेस प्राप्त होतो. या शरीरांत सर्वतः संचार करणाऱ्या त्या तेजाची योगी आपल्या हृदयांत तारकरूपानें उपासना करितात. त्याचेच चिद्रूपानें चिंतन केलें असतां दिव्य ज्ञान प्राप्त होतें. त्याच्या योगानें शेकडों योजनें दूर असलेली वस्तु नेहमीं दिसते.

## अणिमा व गरिमा सिद्धि.

हृदयांतील कमलकोशाच्या ऊर्ध्व कर्णिकेवर दीप्त जठराग्नीचा कण स्फुरत असतो. ' तो सर्व देहाला व्यापून राहिला आहे ' अशा सतत विचारानें वृद्धिंगत होतो; व हस्तपादादि अंगासह सर्व देहास वितळवितो; म्हणजे शरीरांतील पार्थिव गंध व कठिणपणा यांचा जलांत उपसंहार करतो. नंतर तो त्या जलालाहि सुकवितो. अशा तऱ्हेनें पार्थिव व जलीय अशा दोन्ही शरीरांस सोडून राहिलेला तो अग्नि अतिशय क्षुब्ध झालेल्या प्राणाकडून उपसंहृत होत्साता कोठेंतरी जाऊन लीन होतो अशा रीतीनें पार्थिव शरीरच नाहींसें झाल्यामुळें सुषुम्नानाडीहि नाहींशी होते. कुंडलिनीचें वसतिस्थान ( सुषुम्ना ) नष्ट झाल्यामुळें ती आतिवाहिक शरीरांत अवस्थित होते. या कुंडलिनीमध्यें चित्प्रकाशाचे व स्वेच्छाविहारशक्तीचे चमत्कार असतात. अशा प्रकारें चमत्कारयुक्त असलेल्या त्या कुंडलिनीला अतीशय सूक्ष्म कमलनालाचें छिद्र, पर्वत, तृण, भिंत, दगड, अंतरिक्ष, भूतल इत्यादि कोणत्याहि पदार्थांत शिरून त्याच्याबाहेर पार निघून जातां येतें. तिच्या इच्छेनुसार तिला पर्वतासारख्या मोठ्या व तृणासारख्या फार लहान आकारास प्राप्त होतां येतें. ह्याच अणिमा व गरिमा सिद्धी होत.

या शिवाय आणखी अनेक सिद्धी योगशास्त्रांत प्रसिद्ध आहेत. पण त्यांचें वर्णन वासिष्ठांत आलेलें नाहीं. या वरील सर्व सिद्धी हठयोगानें म्हणजेच प्राणायामाच्या अभ्यासानें कुंडलिनीला जागृत करून मिळवावयाच्या असतात. वासिष्ठामध्यें या सिद्धींना योगसाध्यसिद्धी असें म्हटलें आहे. आतां ज्ञानसाध्यसिद्धींचा विचार करूं:—

## ज्ञानसाध्यसिद्धी.

पतंजलीच्या विभूतिपादांतील योगसूत्रांमध्यें अनेक सिद्धी सांगितल्या आहेत. पण त्या संपादन करण्याचा उपाय प्राणायामाचा अभ्यास नसून 'संयम' आहे. हा संयम म्हणजे 'यत्रमेकत्र संयमः' (३·४) सूत्रांत सांगितल्याप्रमाणें धारणा, ध्यान आणि समाधि हें त्रय एके ठिकाणीं प्रवृत्त होणें हा होय. अमुक ठिकाणीं चित्ताचा संयम केला तर अमुक सिद्धि प्राप्त होते, असें जेथें सांगितलें असेल, तेथें धारणा, ध्यान आणि समाधि ही तिन्हीं एके ठिकाणीं येऊन तरच ती सिद्धि प्राप्त होईल. उदाहरणार्थः—'भुवनज्ञानं सूर्ये संयमात्' (३–२६) या सूत्रांमध्यें सूर्यावर चित्तसंयम केला असतां चतुर्दश भुवनांचें ज्ञान होतें. या ठिकाणीं धारणा, ध्यान आणि समाधि यांची एकत्र प्रवृत्ति होय. सारांश, संयमानें प्राप्त करून घ्यावयाच्या सर्व सिद्धी राजयोगाच्याच होत. हटयोगाच्या नाहींत.

वासिष्ठामध्यें या संयमाला दृढभावना असें म्हटलें आहे आणि ज्या विषयीं दृढभावना करावी तो पदार्थ प्राप्त होत असतो, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे. पण ही भावना दृढ होण्याला आत्मज्ञान प्राप्त झालें पाहिजे. म्हणून ह्या सिद्धींना ज्ञानसाध्यसिद्धी असें म्हटलें आहे. ह्या ज्ञानसाध्यसिद्धी किती आहेत त्याचा आतां विचार करूं:—

## सिद्धदर्शन आकाशगमनादि सिद्धी.

जीवन्मुक्तावस्थेला प्राप्त झालेल्या ज्ञानी पुरुषाचा भौतिक देह आतिवाहिक (सूक्ष्म) बनून जातो. आतिवाहिक देहाचें वर्णन मागील "आतिवाहिक देह व आधिभौतिक देह" या १८ व्या प्रकरणांत करण्यांत आलें आहे. वास्तविक पहातां हा स्थूल देह सत्य नाहीं, तरी त्या ठिकाणीं सत्यतेची दृढ भावना केल्यामुळें तो सत्य भासत आहे. पण अभ्यासानें ह्या स्थूल देहाचा अहंकार नाहींसा केल्यावर हा स्थूल देहच आतिवाहिक देह बनून जातो; आणि मग त्या देहानें सिद्धांचे सत्य व पवित्र लोक पहातां येतात. जीवन्मुक्ताचा देह शुद्ध सत्त्वात्मक असल्यामुळें तो परमात्म्याहून फारसा भिन्न नाहीं. म्हणून त्याला त्याच्या आतिवाहिक देहानें इतरांच्या मनोमय

देहाशीं मिसळून जातां येतें. आत्मज्ञानाच्या उदयाबरोबर जीवन्मुक्ताला आपला स्थूल देह स्वप्नांतील देहासारखा आहे असा अनुभव येतो; व तो आतिवाहिक बनल्यामुळें आकाशांत सर्व ठिकाणीं संचार करण्यास समर्थ होतो, म्हणजेच त्याला आकाशगमनाची सिद्धि प्राप्त होते. अशा तऱ्हेनें ज्ञानी पुरुषाला त्याच्या ठिकाणीं प्राप्त झालेल्या ज्ञानसामर्थ्यानें सर्व तऱ्हेच्या सिद्धी अनायासें प्राप्त होतात.

## ज्ञानी सर्व सिद्धी तुच्छ मानतो.

पण वसिष्ठ म्हणतात कीं, आकाशगमनादि सिद्धी हें ब्रह्मनिष्ठस्थितीचें साध्य किंवा मार्गहि नसून जीवन्मुक्त पुरुष या सिद्धी प्राप्त करून घेण्याचा उद्योग करीत नसतो; व पुष्कळदां त्याच्या अंगीं त्या दिसूनहि येत नाहींत. कारण मोक्षप्राप्तीच्या बाबतींत त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. उलट त्यामध्यें त्या विघ्न मात्र आणतात. असें भागवत स्कंध ११ अ. १५ श्लोक ३३ मध्यें स्पष्ट सांगितलें आहे. या सिद्धी, मणि, मंत्र, जप इत्यादि क्रियांचीं फलें आहेत. तीं प्रयत्नशील अज्ञानी पुरुषासहि प्राप्त होतात. त्यांत ज्ञानाचा कांहीं एक संबंध येत नाहीं. ज्ञानी पुरुषाला ज्या विषयीं लोभ उत्पन्न होईल असा एकहि पदार्थ या भूलोकीं किंवा स्वर्गांत नाहीं. म्हणून ज्ञानी या सर्व सिद्धी तुच्छ मानतो. कारण जेथें तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें सर्व जगच शून्य व असत् आहे, तेथें त्या जगांतील सिद्धी तरी सत्य कशा असणार? म्हणून कोणत्याहि सिद्धीविषयीं त्याच्या ठिकाणीं मुळींच आस्था नसते. ज्ञानी पूर्ण निरिच्छ असतो; तरी पण जर तो एखादे वेळीं कौतुकानें किंवा लोकसंग्रहाकरितां सिद्धीकरितां प्रयत्न करील, तर त्याला त्या सहज प्राप्त करून घेतां येतील. चूडालेच्या आख्यानांत चूडालेनें केवळ कौतुकानें योगाभ्यास करून आकाशगमनादि सर्व सिद्धी संपादन केल्या होत्या असें वर्णन आलें आहे. (या ग्रंथाचा भाग २ रा, चूडालेची गोष्ट ३४ वी पृष्ठ २११). श्रीमत् शंकराचार्यांनींहि परकायाप्रवेशाची सिद्धि संपादन केली होती व तिचा उपयोग त्यांनीं एका मृत राजाच्या शरीरांत प्रवेश करून गृहस्थधर्माचा अनुभव घेतला व मंडनमिश्रावर विजय मिळविला. हा आचार्यांचा परकायाप्रवेश लोकसंग्रहाकरितांच झाला असें म्हणण्यास

हरकत नाहीं. सारांश, जे नित्यतृप्त आत्मज्ञानी झालेले आहेत, त्यांना प्राप्त झालेल्या आत्मसुखापुढें सिद्धीपासून होणारें सुख कःपदार्थ आहे.

## त्रिकालज्ञत्व सिद्धि.

तत्त्वज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं भूत, वर्तमान व भविष्य कालीं होणाऱ्या सर्व गोष्टींचें ज्ञान प्राप्त होतें; परंतु हें त्रिकालज्ञान देखील, जोंपर्यंत ज्ञानी पुरुष चित्ताचें ऐकाग्र्य करून पहात नाहीं, तोंपर्यंत त्याला प्राप्त होत नाहीं, असें वसिष्ठ सांगतातः—

आच्याप्तिरहिता नाम न संभवति देहिनाम् ॥ नि. उ. ९४-२

" देहधारी योग्यांनाहि चित्ताच्या स्थिरतेवांचून भूत-भविष्यकालाचें ज्ञान होत नाहीं. ( या ग्रंथाचा भाग २ रा, पाषाणाची गोष्ट ४३ वी पृष्ठ २६६ ).

## भूतजन्मस्मरण सिद्धि.

ज्ञानी पुरुषाला चित्ताच्या एकाग्रतेनेंच त्याचें स्वतःचें किंवा दुसऱ्याचें पूर्व जन्मांचें स्मरण होत असतें असें वसिष्ठ सांगतातः—

उत्पन्नध्वंसिनः स्वप्नाः स्मर्यंते बहवो यथा ॥
तथैव बुद्धैः स्मर्यंते सिद्धैर्जन्मशतान्यपि ॥ नि. उ. १६१-३०

" याच जन्मांत पडलेलीं स्वप्नें जशीं आठवतात, त्याचप्रमाणें ज्ञानी सिद्धांना पूर्वीच्या शेकडों जन्मांचें स्मरण होतें. "

( या ग्रंथाचा भाग २ रा, लीलेची गोष्ट ३ री. पृष्ठ २४ व पुण्य व पावन यांची गोष्ट १७ वी. पृष्ठ ११९ )

## सत्यसंकल्पता सिद्धि.

सर्व सिद्धींमध्यें सत्यसंकल्पता ही श्रेष्ठ सिद्धि आहे असें तत्त्वज्ञानी समजतात व ही सिद्धि त्यांच्या ठिकाणीं आपोआप प्रकट होते. ज्ञानाच्या ठिकाणीं ही सिद्धि कशी प्रकट होते, याचा विचार स्थिति प्रकरण सर्ग १७ मध्यें केला आहे. याचा सारांश असा आहे. ज्या चित्तांतील सर्व एषणांची शांति झाली आहे, तेंच चित्त शुद्ध होतें. अशा शुद्ध झालेल्या

चित्ताला ' सत्व ' असें म्हटलें आहे; व विमल चिद्रूप ब्रह्म हेंच होय. असें शुद्ध झालेलें चित्त म्हणजे सत्व ज्या ज्या भावना करितें, त्या त्या भावना फलद्रूप होतात; म्हणजेच शुद्ध चित्ताच्या भावना किंवा कल्पना बाहेर प्रत्यक्ष रूपानें दिसूं लागतात. आतां हें चित्त शुद्ध कसें बनतें, ह्या-विषयीं वसिष्ठांनीं युक्ति सांगितली आहे, ती अशी आहे. हें सर्व जगत् दीर्घ स्वप्न असून त्यांतील सर्व पदार्थ असत् आहेत, असा मनाचा निश्चय झाल्यावर सर्व एषणा नाहींशा होतात व अशा तऱ्हेनें पुष्कळ काल चित्त एकाग्र करण्याचा अभ्यास केला असतां चित्त शुद्ध होतें. हें शुद्ध झालेलें चित्तच सत्यसंकल्प बनतें.

ही सत्यसंकल्पता सिद्धि परमेश्वराच्या ठिकाणीं स्वभावतःच सिद्ध असते. पण जीवाला मात्र ती मोठ्या पौरुष प्रयत्नानें संपादन करावी लागते. असें जरी असलें तरी प्रत्येक जीवाच्या ठिकाणीं ही सिद्धि फक्त एक वेळच फलद्रूप होत असते. ती म्हणजे अंतकालाच्या शेवटच्या क्षणीं, ज्या वस्तूचें जीव चिंतन करीत राहील त्या वस्तूच्या स्वरूपाला तो प्राप्त होईल. "यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम्। तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ( भगवद्गीता ८-६ ) असें भगवद्गीतेंत सांगितल्या-प्रमाणें जीवाचा फक्त एकच व तोहि शेवटचाच संकल्प सत्य होत असतो. अशा तऱ्हेनें अंतकालाच्या पूर्वींहि सर्व संकल्प सत्य व्हावेत असे जर जीवाला वाटत असेल तर त्यानें आत्मज्ञान संपादन केलें पाहिजे, कारण आत्मज्ञानामध्यें सर्व सिद्धींची अनायासेंच प्राप्ति होत असते. परंतु मौज अशी आहे कीं आत्मज्ञान झाल्यावर तो पुरुष निरिच्छ होत असतो, त्यामुळें त्याच्या ठिकाणीं सिद्धीच्या प्राप्तीची इच्छाहि नाहींशीं होते. म्हणून ज्ञानी पुरुषाला सिद्धी प्राप्त झाल्या किंवा न झाल्या तरी त्यापासून त्याला हर्ष किंवा विषाद यापैकीं कांहींच होत नाहीं.

# प्रकरण २१ वें.

## चिद्विलास.

आपल्या पुढें दिसणाऱ्या ह्या जडचेतनात्मक जगाचा पसारा म्हणजे चिद्रूप परब्रह्माचा केवल विलास आहे, असें वासिष्ठांत कित्येक ठिकाणीं वर्णन करण्यांत आलें आहे. हा त्याचा विलास म्हणजेच वेदांत शास्त्रांत जगाची व्यवस्था लावण्याकरितां मानलेली जी माया तिचेंच मूर्तरूप होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. भागवत स्कंध ११ मध्यें निमिजायंतेयांच्या संवादांत मायेचें स्वरूप सांगतांना प्रथम सर्व ब्रह्मांडाचें वर्णन करून शेवटीं " एषा माया भगवतः सर्गस्थित्यंतकारिणी ॥ " (भाग. ११-३-१६) ' या जगाची उत्पत्ति स्थिति व लय करणारी हीच परमेश्वराची माया ' असें अखेर मायेचें स्वरूप सांगितलें आहे. थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, ब्रह्म हें मायेच्या योगानें सर्वशक्तिसंपन्न व सत्यसंकल्प ईश्वर बनून हा जगाचा जणुं खेळच खेळत आहे. हा खेळ सुरू करण्यापूर्वीं त्याच्या ठिकाणीं "बहु स्यां प्रजायेय," ' मी पुष्कळ प्रकारें उत्पन्न होईन ' अशी इच्छा उत्पन्न झाली. ही इच्छा परिपूर्ण करण्याकरितां ज्याप्रमाणें एखादा नाटककर्ता नाटकांतील पात्रें तयार करितो, त्याप्रमाणें त्या परब्रह्मरूपी परमेश्वरानें सर्व जीवांच्या अस्तित्वाची कल्पना केली व एका दीपाच्या ज्योतीवरून अनेक दीप लावले जावे, त्याप्रमाणें त्या परमात्म्यापासून सर्व जीव उदयाला आले. ज्याप्रमाणें एका स्वप्नांतून दुसरें स्वप्न उत्पन्न व्हावें, किंवा एका कल्पनेंतून दुसरी कल्पना निर्माण व्हावी, त्याप्रमाणें त्या ईश्वरापासून समष्टि जीवापासून ( हिरण्यगर्भापासून ) सर्व जीव उत्पन्न झाले आहेत. हे सर्व जीव त्या सत्यसंकल्प परमेश्वराच्या अधीन असून त्यानें प्रेरणा केल्याप्रमाणें आपलीं नियत कार्यें करीत राहतात. परमेश्वरानें आपल्या इच्छेनुसार सर्व जीवांचे व्यवहार व्हावें, असा नियम करून ठेवला आहे आणि असा त्याच्या संकल्पानें सृष्टीचे सर्व व्यवहार चाललेले आहेत. आतां कांहीं ऋषी तपोबलानें सत्यसंकल्प झालेले होते, अशीं वर्णनें आढळून

येतात. त्याची उपपत्ति कशी लावावयाची ? अशा प्रश्नाचें वसिष्ठांनीं असें समाधान केलें आहे कीं, तपोबलानें ज्या ऋषींचे संकल्प सिद्ध झालेले असतात, त्यांच्या ठिकाणची ती अद्‌भुत शक्ति ईश्वरानें तशी इच्छा केल्यामुळेंच निर्माण झालेली असते. कारण ईश्वराच्या अनुग्रहाशिवाय कोणचाहि संकल्प सफल होणें शक्य नाहीं. सारांश, ब्रह्मच महाजीव म्हणजे ईश्वर असून तोच समष्टि जीव आणि व्यष्टि जीव केवळ कल्पनेमुळें बनलेला आहे, असाच निष्कर्ष निघतो. सर्व जीवांचा समुदाय शबलब्रह्मामध्यें वस्तुतः नसूनहि जो भासमान होतो, तो केवळ त्या ब्रह्माचाच चमत्कार आहे. अशा तऱ्हेनें सर्व व्यष्टी जीवांना केवळ संकल्पानें निर्माण करून परमेश्वरानें त्या जीवरूपी पात्रांच्या मदतीनें हा जगरूपी खेळ करण्याचें ठरविलें. पण हा खेळ करण्याकरितां जागेचा प्रश्न उत्पन्न झाला. तेव्हां जसा नाटककार आपला खेळ करून दाखविण्याकरितां रंगभूमि ( नाटकगृह ) तयार करितो, त्याप्रमाणें त्या परमेश्वरानें आकाशाची कल्पना केली. कारण कोणतेंहि एखादें कार्य करावयाचें म्हटलें म्हणजे अगोदर जागा हवी असते. ही आकाशाची कल्पना होतांक्षणींच आकाश तयार झालें. हें जें आकाश तेंच ' चिदाकाश ' होय. ह्या आकाशासारख्या आणखी दोन आकाशांचीहि त्यानें कल्पना केली. हीं दोन मिळून एकंदर आकाशें तीन आहेत. अज्ञ लोकांना आत्मतत्त्वाचा उपदेश करितां यावा अशा दृष्टीनें या आकाशत्रयाची कल्पना करण्यांत आली आहे. तरी एका शुद्धचित्‌शक्तीच्या योगानें त्यांतील आकाशांना सत्ता प्राप्त झाली असल्यामुळें त्यांच्या काल्पनिक त्रित्वामुळें परब्रह्माच्या अद्वैत स्वरूपाला मुळींच बाध येऊं शकत नाहीं. असो, आतां वसिष्ठ ह्या तीन आकाशांची लक्षणें सांगतातः—

आकाशाहि त्रयोराम विद्यंते विततांतराः ॥
चित्ताकाशश्चिदाकाशो भूताकाशस्तृतीयकः ॥ ३-९७-१४

" ज्यांचा अंतर्भाग अत्यंत विस्तीर्ण आहे, अशीं तीन प्रकारचीं आकाशें आहेत. पहिलें चिदाकाश, दुसरें चित्ताकाश आणि तिसरें भूताकाश." ह्या तिन्हीं आकाशांना शुद्ध चित्तत्त्वापासून सत्ता प्राप्त झाली

आहे. असें जरी असलें, तरी चिदाकाश हें दुसऱ्या दोन आकाशांशिवाय राहूं शकतें पण दुसरीं दोन आकाशें चिदाकाशाशिवाय राहूं शकत नाहींत. ह्या तिन्हीं आकाशांचीं लक्षणें खालील श्लोकांत दाखविलीं आहेत:—

## ( १ ) चिदाकाश.

सबाह्याभ्यंतरस्थोयः सत्तासत्तावबोधकः ॥
व्यापी समस्तभूतानां चिदाकाशः सउच्यते ॥ ३-९७-१६

' अखिल पदार्थांच्या अंतर्बाह्य राहून त्यांची उत्पत्ति आणि नाश ह्यांना जाणणारें आणि सर्व भूतांना व्यापून राहणारें असें जें *साक्षी* तत्त्व ( *माया शबलब्रह्म* ) त्यालाच चिदाकाश असें म्हणतात.'

## ( २ ) चित्ताकाश.

सर्वभूतहितश्रेष्ठो यः कालकलनात्मकः ॥
येनेदमाततं सर्वं चित्ताकाशः स उच्यते ॥ ३-९७-१७.

" सर्व भूतांच्या सर्व व्यवहाराला कारण होत असल्यामुळें जें सर्वांचें हित करणारें आहे आणि जें देशकालादिकांची कल्पना करीत असतें, तसेंच ज्यानें आपल्या स्वतःच्या कल्पनेनें हें सर्व दृश्य विस्तारलेलें आहे, आणि सर्व कार्यकरणांच्या नियंतृत्वामुळें अदृश्य असून जें सर्वश्रेष्ठ आहे, अशा तत्त्वाला चित्ताकाश असें म्हणतात."

## ( ३ ) भूताकाश.

दशदिङ्मंडलाभोगैरव्युच्छिन्नवपुर्हि यः ॥
भूतात्मासौ य आकाशः पवनाब्दादिसंश्रयः ॥३-९७-१८

" जें दशदिशांना व्यापून टाकतें, भूतमात्रांना अवकाश देतें, तसेंच जें वायु, मेघ, सूर्य इत्यादिकांना आधारभूत होऊन राहिलें आहे, अशा आकाशाला भूताकाश असें म्हणतात."

चित्ताकाश आणि भूताकाश हीं दोन्हीं शुद्ध चिदाकाशाच्या सामर्थ्यानें उत्पन्न झालीं आहेत. ज्याप्रमाणें सूर्य आपल्या अस्तित्वानें आणि सान्निध्यानें

प्राणिमात्रांच्या व्यवहाराचें निमित्त कारण होतो, त्याप्रमाणें चिदाकाश हें सर्व कार्यकारणपरंपरेचें निमित्त कारण आहे. आतां चिदाकाशाचें स्वरूप समजण्याकरितां त्याचें जास्त खुलासेवार लक्षण सांगतातः—

## चिदाकाशाचें स्वरूप.

देशाद्देशांतरप्राप्तौ संविदोमध्यमेव यत् ॥
निमेषेण चिदाकाशं तद्विध्दि वरवर्णिनी ॥ ३-१७-१२

"आपली अंतःकरणाची वृत्ति एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्याच्या दरम्यान जी मधली स्थिति क्षणभर अनुभवास येते, तेंच चिदाकाशाचें स्वरूप होय."

हें चिदाकाश इतकें व्यापक आहे कीं, त्याच्या ठिकाणीं आदि, मध्य व अंत वगैरे कल्पना मुळींच संभवत नाहींत. हें चिदाकाश अमर्यादित, शांत, अनादि व अनंत असून तें विकाररहित आहे. "स्वे महिम्नि प्रतिष्ठितः" या श्रुतींत सांगितल्याप्रमाणें "महत्यात्मनि तिष्ठति" यो. वा. ३-२९-५९. "हें आपल्या मोठ्या स्वरूपांत रहातें." हें किती अपरिच्छिन्न म्हणजे व्यापक आहे, हें दाखविण्याकरितां म्हणून वसिष्ठांनीं पुढील श्लोकांत मोठी गमतीदार कल्पना केली आहे. १६४ पृष्ठावरील चित्रांत दर्शविल्याप्रमाणें

आकल्पमुत्तमबलेन शिला पतेच्चेत्
तस्मिन्बलात्पतगराडऽपि चोत्पतेच्चेत् ॥
तद्योजनं न लभते विमलेंबरेंत
मांकल्पमेकजवगोऽप्यथमारुतोऽपि ॥ ३-२९-६०

"ह्या चिदाकाशांत एखादी शिला वरून अतिशय वेगानें कल्पपर्यंत जरी खालीं पडत राहिली आणि गरुड पक्षी त्यांत खालून वर मोठ्या वेगानें उड्डाण करीत राहिला, अशा ह्या दोघांच्या (शिला व गरुड) मधील अंतराची मोजदाद करण्याकरितां मोठा वेगवान् वायुहि त्यांची भेट घेण्याचा दोन्ही बाजूंनीं म्हणजे वरून खालीं व खालून वर धांवत सुटला तरी त्याला त्यांची भेट घेतां येणें शक्य नाहीं." यावरून हें चिदाकाश सर्व प्रकारें अपरिच्छिन्न आहे. म्हणूनच ह्या चिदाकाशाची लांबी, रुंदी, उंची व खोली

## चिदाकाशाचा व्यापकपणा दाखविणारें चित्र.



चिदाकाश वर व खालीं कोठपर्यंत आहे हें पहाण्याकरितां वरील चित्रांत दाखविल्याप्रमाणें गरुडपक्षी मोठ्या वेगानें कल्पपर्यंत जरी वर उड्डाण करीत राहिला व एखादी शिला वरून खालीं पडत राहिली तरी देखील त्यांना वरचा भाग व खालचा तळ सांपडणें शक्य नाहीं. ( पृष्ठ १६३ )

यांची मोजदाद करण्याच्या बाबतींत कोणतेंहि प्रमाण लंगडेंच ठरतात. हें जितकें मोठें व्यापक आहे, तितकेंच तें सूक्ष्महि आहे. याच्या सूक्ष्मत्वाची किंवा अणुत्वाची कल्पना येण्याकरितां वसिष्ठांनीं या चिदाकाशाला भूताकाशापेक्षां सूक्ष्म असें म्हटलें आहे:—

**संविदाकाशमाकाशादणुर्मेरोरणुर्यथा ॥** नि. उ. १०३-९१

"मेरुपर्वताहून परमाणु जितका सूक्ष्म आहे तितकेंच चिदाकाश भूताकाशाहून सूक्ष्म आहे."

हें सांगण्याचा हेतु असा आहे कीं, भूताकाश जर दिसत नाहीं, व चिदाकाश भूताकाशापेक्षां कितीतरी पटीनें सूक्ष्म आहे, तर चिदाकाश दिसणें कधींच शक्य नाहीं. अशा ह्या चिदाकाशाच्या पोकळींत ह्या आपल्या चतुर्दश भुवनांनीं युक्त असणाऱ्या ब्रह्मांडासारखीं असंख्य ब्रह्मांडें, सूर्याच्या कवडाशांत दिसणाऱ्या त्रसरेणूप्रमाणें स्थित आहेत. एखाद्या रत्नाभोंवतीं सुवर्णाचें वलय असावें, त्याप्रमाणें प्रत्येक ब्रह्मांडगोलकाच्या भोंवतीं पृथ्वी आदिकरून पंचमहाभूतांचीं वेष्टनें पसरलेलीं आहेत. भूतलाच्या स्वाभाविक आकर्षणामुळें हीं पंचमहाभूतांचीं वलयें पृथ्वीला चिकटून राहिलेलीं आहेत. पृथ्व्यात्मक ब्रह्मांडकवचीच्या बाहेर त्याच्या दसपट जलाचें वेष्टन आहे. जलाच्या दसपट ज्वालारूप तेजाचें वेष्टन आहे. त्याच्यापलीकडे तेजाच्या दसपट वायूचें वेष्टन आहे. त्याच्या पलीकडे वायूच्या दसपट भूताकाशाचें वेष्टन आहे. त्याच्यापलीकडे अनंत मायाशबल ब्रह्माकाश (चिदाकाश) पसरलेलें आहे. अहो ! पण पुराणांमध्यें आकाशाच्या पलीकडे त्याच्या दसपट अहंकारतत्त्व, त्याच्यापलीकडे त्याच्या दसपट महत्तत्त्व व त्याच्यापलीकडे अनंत प्रकृति आहे, असें वर्णन केलेलें आहे. ह्या ठिकाणीं ह्या वेष्टनांचा स्वीकार कां केला नाहीं ? याचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं, त्या मायाशबल ब्रह्माकाशांत योग, माहेश्वर, पांचरात्र, कपिल इत्यादि तंत्रांमध्यें अशा भिन्न आवरणांच्या कल्पना केल्या आहेत व त्यांचें वर्णन पुराणामध्यें आहे. पण श्रुतीमध्यें ह्या कल्पना नाहींत, म्हणून त्यांची ह्या ठिकाणीं उपेक्षा केली आहे. कारण त्या तंत्रकारांच्या तांत्रिक कल्पना आहेत. त्या वसिष्ठांना मान्य नाहींत.

## ब्रह्मांडासंबंधीं विचार.

ह्या चिदाकाशांतूनच निर्माण झालेल्या सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवानें जन्माला आल्याबरोबर आपल्या दोन हातांनीं त्या ब्रह्मांडाचें विदारण केलें. वरचा भाग आपल्या हातानें वर लोटला व खालचा भाग खालीं लोटला. अशा तऱ्हेनें ब्रह्मांडाचें विदारण केल्याबरोबर त्याच्या भोंवतालीं असणाऱ्या जलादिवेष्टनांचें विदारण झालें. परंतु त्या चार आवरणांपैकीं फक्त जलावरणच खरोखर विभक्त झालें. हीं ब्रह्मांडकपालें पार्थिव असल्यामुळें जलाला आकर्षण करण्याची शक्ति त्यांत असते. त्यामुळें तीं दोन्हीं ब्रह्मांडकपालें भोंवतालच्या जलावरणाला धारण करतात. जलाच्या बाहेर निरंधन असें दसपट तेज स्थित आहे. त्याच्या पलीकडे वायु व त्याच्या पलीकडे आकाश स्थित आहे. या तैजसादि आवरणांना जलाप्रमाणें आधाराची अपेक्षा नसते. त्या आकाशाच्या पलीकडे शांत व अनंत चिदाकाश आहे. त्याचें वर्णन वर केलेंच आहे. अशा या ब्रह्मांडांत पृथ्वी वगैरे चवदा भुवनें आहेत. या ब्रह्मांडांतील पृथ्वीची स्थिति कशी आहे? या बाबतींत निरनिराळ्या वाद्यांचीं निरनिराळीं मतें आहेत. वसिष्ठ म्हणतात कीं, ब्रह्मांडांतील भूताकाशामध्यें पृथ्वीचा गोलक अंतराळींच स्थित रहावा अशी परमेश्वरी नियति आहे, म्हणून ती खालीं पडत नाहीं. इतर वाद्यांचीं मतें त्यांना मान्य नाहींत. या भूगोलाच्या उत्तरेस मेरुपर्वत व दक्षिणेस लोकालोक पर्वत आहे. लोकालोक पर्वत हा भूगोलाचा सीमाचल आहे. या लोकालोक पर्वताच्या पलीकडे अंधारमय असें मोठें विस्तीर्ण आकाश पसरलेलें आहे. वरच्या बाजूला अंतरिक्षांतून वहाणाऱ्या मंदाकिनी वगैरे नद्या आहेत व ज्योतिश्चक्ररूप नक्षत्र मंडल आहे. त्या भूगोलाचा वायुबंधनवशात् दुरून आश्रय करून त्याला स्पर्श न करतांच वरून चंद्रसूर्यादि ग्रह सतत भ्रमण करीत रहातात. सर्व दिशांमध्यें वर आकाश व खालीं पृथ्वी आहे. पृथ्वीपासून वर सात लोक आहेत पृथ्वीच्या खालीं सात पाताळें आहेत. एकंदर ब्रह्मांडांत पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पंचमहाभूतें एकापेक्षां दुसरें मोठें अशीं स्थित आहेत, व सर्वांत आकाश फार मोठें म्हणजे अनंत आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

अशा तऱ्हेचीं अगणित ब्रह्मांडें चिदाकाशांत दूरवर पसरलेलीं आहेत. हीं पुनः पुनः उत्पन्न होतात व पुनः पुनः लय पावतात. अशा तऱ्हेच्या वर्णनावरूनच परमेश्वराला 'जगन्निवास' असें नांव पुराणांतरांतून देण्यांत आलेलें आहे. या नांवाची व्युत्पत्ति 'जगति निवासः यस्य' (जगामध्यें जो रहातो) अशी करण्यांत येते. परंतु अशा तऱ्हेच्या व्युत्पत्तीच्या ऐवजी 'जगंति निवसंति यस्मिन्' (जगें ज्याच्या ठिकाणीं रहातात) अशी केली असतां, परमेश्वराला ठेवलेलें 'जगन्निवास' हें नांव अगदीं यथार्थ आहे असें दिसून येतें. 'अनंतकोटिब्रह्मांडनायक' हें नांव देखील त्या परमेश्वराला याचमुळें पडलेलें आहे असें दिसतें.

## अविद्या.

तत्त्वतः पाहिल्यास हीं अनंत ब्रह्मांडें म्हणजे अविद्याच आहे, किंवा ब्रह्माच्या अनिर्वचनीय चिच्छक्तीचा आपल्या स्वरूपांत चाललेला विलासच आहे, असें म्हणणें जास्त चांगलें. 'हीं दृश्यरूप अविद्या किती दूरवर विस्तार पावलेली आहे ? तिचा अंत कोठें होतो ? तो आपण पहावा. कारण अविद्येच्या पलीकडे म्हणजे ह्या दृश्य जगाच्या पलीकडे गेल्यावर आपल्याला पूर्ण विश्रांति मिळेल,' या विचारानें पुष्कळांनीं आजपर्यंत आपल्याकडून अविद्येचा अंत पहाण्याचे नानातऱ्हेचे प्रयत्न केले आहेत. पण त्यांना अविद्येचा मुळींच अंत लागला नाहीं. अशा तऱ्हेचा प्रयत्न करणाऱ्यांपैकीं या वासिष्ठामध्यें 'विपश्चिन् राजा', 'वटधाना राजपुत्र' व 'एक व्याध' असे तिघेजण होऊन गेले, असें सांगितलें आहे, यांच्या गोष्टी नि. प्र. उत्तरार्धामध्यें आल्या आहेत. (या ग्रंथाचा दुसरा भाग गोष्टी ४४, ४५ व ४६) ह्या वरील तिन्ही गोष्टींच्या सहाय्यानें वसिष्ठांनीं असें सिद्ध केलें आहे कीं, जसें अंधाराचा नाश, 'हा अंधार किती दूरवर पसरलेला आहे,' हें पहाण्याकरितां धांवत पळत जाऊन होत नसतो, कारण जिकडे जावें तिकडे अंधार असल्यामुळें, त्याप्रमाणें अविद्या म्हणजे ही दृश्यश्री कोठवर पसरलेली आहे हें पहाण्याचा प्रयत्न करून तिचा नाश होत नसतो, तर तो, अविद्येची विरोधी जी विद्या (म्हणजे ज्ञान) ती संपादन केल्यानेंच होत असतो. म्हणूनच आपण कोण आहों ?

व हें दृश्य जगत् काय आहे? हें तत्त्वतः समजल्यावर अविद्या कोठल्या कोठें निघून जाते, त्याचा पत्ताच लागत नाहीं. कारण तत्त्वतः अविद्येचें अस्तित्व आहे कोठें! अविद्या व तिच्यामुळें भासणाऱ्या ह्या दृश्य जगाचा पसारा हा त्या चिद्रूप परब्रह्माचा विलास आहे. सर्व विषयांचें ज्ञान अस्तंगत झाल्यावर तें आपल्या मूळ स्वरूपांत स्थित होतें. स्थावर पदार्थांच्या रूपानें तेंच झोपी गेलें आहे. सारांश, हा सर्व जीव जगाचा पसारा त्या परमात्म्याच्या चिच्छक्तीचाच स्वाभाविक विलास आहे, असेंच म्हणावें लागतें.



# प्रकरण २२ वें.

## जगाचें स्वरूप.

हें दृश्य जगत् सर्व प्राणीमात्रांना खरें आहे, असें वाटतें, म्हणूनच सर्व लोक त्यांतील शब्दस्पर्शादि विषयांमध्यें आसक्त होऊन रहातात. त्यांमुळें, ते या जन्ममरणात्मक प्रपंचांत बद्ध होतात. परंतु हें जग लोकांना जसें दिसतें व वाटतें तसें तें नाहीं, हें वासिष्ठांत सांगितलें आहे. असें सांगण्याचा हेतु असा आहे कीं, हें जगत् मुळींच नाहीं किंवा ब्रह्मरूप आहे, असें ध्यानांत आलें व त्याचा अत्यंत अभाव आहे असें समजून तें भासेनासें झालें कीं, त्यांतील सर्व विषयांवरील आसक्ति दूर होते. अशा तऱ्हेनें आसक्ति संपल्यावर म्हणजे जगांतील विषयांचें खरेंखुरें स्वरूप ओळखल्यानंतर मग जरी प्रारब्ध कर्मानुसार विषयसेवन करीत गेले तरी त्यापासून कोणताहि अनर्थ निर्माण होण्याचा मुळींच संभव नाहीं. याविषयीं वसिष्ठांनीं चोराच्या मैत्रीचा मोठा गमतीदार दृष्टांत दिला आहे:—

परिज्ञातोप भुक्तोहि भोगो भवति तुष्टये ॥
विज्ञाय सेवितोमैत्रमेति चोरो न शत्रुताम् ॥ ४-२३-४१

" अमुक चोर आहे असें पक्कें ज्ञान झाल्यावर त्याच्याशीं केलेली मैत्री उपद्रव करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें विषयांचें वास्तविक स्वरूप ओळखून त्यांचें यथाप्राप्त सेवन करणाराला ते उपद्रव करूं शकत नाहींत. " म्हणून या दृश्य जगाचें स्वरूप समजावून देण्याकरितां वासिष्ठांत चार प्रकारचा विचार करण्यांत आला आहे तो असा:—

पहिला विचार:—अजातवाद म्हणजे हें सर्व दृश्य जग मुळींच उत्पन्न झालें नाहीं.

दुसरा विचारः—सर्वब्रह्मवाद म्हणजे हें सर्व (जग) ब्रह्म आहे (सर्वं खलु इदं ब्रह्म)

तिसरा विचारः—मायावाद म्हणजे हें सर्व (जग) माया आहे.

चवथा विचारः—विवर्तवाद म्हणजे हें सर्व (जग) भ्रम आहे.

या चार विचारासंबंधीं पुढील चार प्रकरणांत सविस्तर विवरण करण्यांत आलें आहे. या पुढील २७ व्या प्रकरणांत या चारी वादांचा उपसंहार करण्यांत आला आहे.



# प्रकरण २३ वें.

## अजातवाद.

जगाचें स्वरूप समजावून देण्याकरितां प्रकरण २२ मध्यें जे चार प्रकारचे विचार सांगण्यांत आले आहेत, त्यांपैकीं पहिला विचार जो अजातवादाचा त्याचें विवरण ह्या प्रकरणांत केलें आहे. परमार्थदृष्ट्या हें दृश्य जग मुळींच उत्पन्न झालेलें नाहीं, हा अजातवादाचा सिद्धांत वसिष्ठांना अत्यंत आवडता असल्यामुळें उपदेश करीत असतांना जेव्हां जेव्हां म्हणून प्रसंग आला, तेव्हां तेव्हां वसिष्ठांनीं या आपल्या आवडत्या सिद्धांताचें समर्थन करण्यास कमी केलें नाहीं. अजातवादाचें तत्त्व एकदां मनांत चांगलें ठसलें व तें बुद्धीवर आरूढ झालें कीं, ह्या दृश्य जगाचा अत्यंताभाव कसा आहे हें समजून घेतल्यावर परमनिर्वाणाची प्राप्ति होते. एकंदर शास्त्रामध्यें जे चार अभाव* मानले आहेत, त्यांपैकीं एक अत्यंताभाव आहे. बाकीच्या तीन अभावांमध्यें केव्हां तरी त्या वस्तूचा भाव म्हणजे अस्तित्व होत असतें. परंतु अत्यंताभावामध्यें ती वस्तु कोणत्याहि कालामध्यें अस्तित्वांत येत नाहीं; जसें वंध्यास्त्रीचा मुलगा हा कधींहि अस्तित्वांत येऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें हें अजातवादाचें तत्त्व चांगलें समजलें ( म्हणजे जगाचा अत्यंताभाव आहे म्हणजे जग मुळींच उत्पन्न झालेलें

---

* (१) **प्रागभावः**—पदार्थ उत्पन्न होण्यापूर्वी जो त्याचा अभाव असतो, तो **प्रागभाव.**

(२) **प्रध्वंसाभावः**—पदार्थाचा नाश झाल्यावर जो त्याचा अभाव होतो, तो **प्रध्वंसाभाव.**

(३) **अन्योन्याभावः**—या पदार्थांत तो पदार्थ नाहीं, म्हणजे घटांत पट नाहीं व पटांत घट नाहीं, हा **अन्योन्याभाव.**

(४) **अत्यंताभावः**—मुळींच किंवा कधींहि नसणें, हा **अत्यंताभाव.** उदाहरणः—वंध्यास्त्रीचा मुलगा, सशाचें शिंग वगैरे.

नाहीं.) कीं, आत्मज्ञानाची प्राप्ति होऊन मोक्षाचा लाभ होतो, हें खालील श्लोकामध्यें स्पष्ट सांगितलें आहे:—

दृश्यात्यंताभावबोधं विना तन्नानुभूयते ॥
कदाचित्केनचिन्नाम स्वबोधोऽन्विष्यतामतः ॥ १-३-३.
दृश्यं नास्तीति बोधेन मनसोदृश्यमार्जनम् ॥
संपन्नं चेत्तदुत्पन्ना परानिर्वाणनिर्वृतिः ॥१-३-६
अन्यथा शास्त्रगर्तेषु लुठतां भवतामिह ॥
भवत्यकृत्रिमाज्ञानां कल्पैरपि न निर्वृतिः ॥१-३-७.

यांचा भावार्थ:—" दृश्य जगाचा अत्यंताभाव आहे हें समजल्याशिवाय कोणाला केव्हांहि त्याचें पूर्णपणें विस्मरण व्हावयाचें नाहीं व आत्मबोधहि होणार नाहीं. म्हणून स्वप्रयत्नानें आत्मसाक्षात्काराची स्थिति प्राप्त करून घेतली पाहिजे. 'दृश्य नाहीं' असा बोध झाला म्हणजे तें मनांतून अजिबात नाहींसें होतें आणि अशी स्थिति झाली म्हणजे मनुष्याला पूर्ण निर्वाणसुखाचा अनुभव करून घेतां येतो. परंतु अशी स्थिति न होतां शास्त्ररूपी गर्तेमध्यें कोट्यवधि वर्षे लोळत राहिलें, तरी ज्यांच्या ठिकाणीं अनादि अज्ञान दृढ झालेलें आहे, त्यांचें तें अज्ञान नाहींसें होणें केव्हांहि शक्य नाहीं."

## जग हा ब्रह्माचा विलास आहे.

अजातवादाच्या सिद्धांताप्रमाणें हें दृश्य जग तत्त्वदृष्ट्या मुळींच उत्पन्न झालेलें नाहीं, तर हें जें अनुभवास येत आहे, तें आहे तरी काय? या प्रश्नाचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं, तो चिद्रूप ब्रह्माचा विलास आहे. याचें सविस्तर वर्णन मागील २१ व्या प्रकरणांत आलेलें आहे. त्यामुळें त्याला स्वप्नांतील स्त्रीसंभोगापेक्षां जास्त सत्यता नाहीं. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

तस्मात्स्वप्नवदाभासः संविदात्मनि कल्पितः ॥ नि.उ.१९५.४४.

"हें दृश्य जग म्हणजे स्वप्नसृष्टीसारखें आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं कल्पिलेलें आहे."

## जगाच्या उत्पत्तीला कारण नाहीं.

आतां जग हें स्वप्नासारखें नसून सत्य आहे, असें मानलें, तर त्याच्या उत्पत्तीला कारण असावयास पाहिजे; पण तसें कारण शोधूं लागलें तर समर्पक कारण आढळत नाहीं. " यतो वा इमानि भूतानि जायंते " ( तैत्तिरीयोपनिषद् ), " विश्वस्य कर्ता भुवनस्य भोक्ता " इत्यादि श्रुति वाक्यांत ब्रह्म हें जगाचें कारण आहे, असें सांगितलें आहे. पण विचारांतीं तें सिद्ध होत नाहीं. कारण,

" यत्तदद्रेश्यमग्राह्यमवर्णचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादं नित्यं विभुं
सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद्भूतयोनिं परिपश्यंति "
( मुंडकोपनिषद १·१·६ ).

या श्रुतिवाक्यावरून आत्मा असंग आणि उदासीन असून तो सर्वेंद्रिय-विहीन अतएव पर्वतासारखा जड आहे, असेंच ठरतें. तेव्हां त्याच्याकडे येणारें जगाचें कर्तृत्व 'मेरुसमोंवतीं सूर्य फिरतो' या लौकिक समजुतीप्रमाणें केवळ औपचारिक आहे, तें खरें कर्तृत्व नव्हे; व अशा दृष्टीनें जगाचें कर्तृत्व ईश्वराकडे आहे, असें प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींचें पर्यवसान जगाच्या मिथ्यात्वाचें प्रतिपादन करण्यांत झालेलें आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. परमार्थदृष्ट्या हें जग कर्तृत्वशून्य असून तें काकतालीय न्यायानें भासमान होत आहे. शिवाय कार्याचें स्वरूप कारणाच्या स्वरूपाहून भिन्न नसतें. पृथ्वी आदिकरून वस्तु जड आहेत आणि ब्रह्म तर चिद्रूप ( चेतन ) आहे, अशा स्थितींत तें जडपृथ्व्या-दिकाचें ( जगाचें ) कारण कसें होऊं शकणार ? तेव्हां जगाच्या उत्पत्तीचें कारण ब्रह्म होऊं शकत नसल्यामुळें कारणाच्या अभावीं जग उत्पन्न झालेलेंच नाहीं, असें म्हणावें लागतें. आतां जें जग दिसत आहे तें ब्रह्मच जगाच्या रूपानें भासत आहे, व हें त्याचें भासणेंहि विवर्तदृष्टीनें आहे, परिणामदृष्टीनें नाहीं.

## ब्रह्म निर्विकारी असल्यामुळें जगाचें कारण नाहीं.

कोणतेंहि कार्य उत्पन्न होण्याचें वेळीं कारण विकार पावत असतें. पण

ब्रह्म निर्विकार असल्यामुळें तें विकार पावत नाहीं. म्हणूनच तें जगाचें कारण होणें शक्य नाहीं. हेंच तत्त्व वसिष्ठांनीं पुढील श्लोकांमध्यें स्पष्ट केलें आहे:—

अकर्तृकर्मकरणमकारणमबीजकम् ॥
अप्रतर्क्यमाविशेयं ब्रह्म कर्तृ कथं भवेत् ॥ नि. पू. ९५-१३
अनाख्योऽप्रतिघःस्वात्मा निराकारो य ईश्वरः ॥
स करोति जगदिति हासायैव वचो धियाम् ॥ नि. पू. ९८-८

यांचा भावार्थः—" जें स्वतः कोणाचा कर्ता, कर्म किंवा करण नाहीं. व ज्याचें दुसरें कोणी कारण ( निमित्त व उपादान ) नाहीं, ज्याच्या विषयीं कांहीं तर्क करितां येत नाहीं व त्यामुळेंच जें विशेषतः ज्ञानसाधनांना विषय होत नाहीं, तें ब्रह्म जगाचें कारण कसें होईल ? जो नामरूपरहित आहे, ज्याच्यावर कोणाचा आघात होत नाहीं, जो आपल्या सर्वांचा आत्मा ( स्वरूप ) आहे, अशा प्रकाराचा ईश्वर ( ब्रह्म ) जगत् निर्माण करितों, हें मूढ लोकांचें बोलणें तज्ज्ञांच्या दृष्टीनें उपहासालाच कारण होते. "

ह्यावरून ब्रह्म जगाचें कारण होऊं शकत नाहीं. कारणाच्या अभावामुळें कार्य वस्तुतः उत्पन्न न होतां जें होतेंसें वाटतें, त्याचें स्वरूप मिथ्याज्ञानावांचून दुसरें संभवत नाहीं. " तदेतद्ब्रह्मापूर्वमनपरम् " इत्यादि श्रुतीवरून तें ब्रह्म कोणत्याहि कार्याचें कारण होत नाहीं व तें कोणाचें कार्यहि होत नाहीं, असें सिद्ध होतें. " असंगोह्ययं पुरुषः "-या श्रुतीवरून ह्या असंग ब्रह्माची अनुवृत्ति संभवत नाहीं; व कारण हें नेहमीं कार्यांत अनुवृत्त असतें, असें तार्किकांचें म्हणणें आहे. कूटस्थाचा परिणाम होऊं शकत नाहीं. अर्थात् सर्व प्रपंचाचें अतिक्रमण करणारा आत्मा-शुद्धब्रह्म-कोणाचें कार्यहि नाहीं व कोणाचें कारणहि नाहीं.

### सन्निधिमात्रानेंहि ब्रह्म जगाचें कारण होत नाहीं

कांहीं वाद्यांचें म्हणणें असें आहे कीं, ब्रह्माच्या सन्निधिमात्रानें जग आपोआप उत्पन्न होतें. आपल्यापासून प्रकाश उत्पन्न व्हावा

अशी रत्नाची इच्छा नसली तरी तो आपोआप पडतो. त्याचप्रमाणें ब्रह्म स्वतः निरिच्छ असलें तरी त्याच्या सत्तामात्रानें जगतांचा समूह उत्पन्न होतो. वास्तव आत्म्यामध्यें कर्तृत्व आहे आणि अकर्तृत्वहि आहे. तो स्वतः निरिच्छ असल्यामुळें अकर्ता आहे, पण सन्निधिमात्रानें कर्ताहि आहे. लोहचुंबकाच्या सान्निध्यामुळें जसें लोखंड हालूं लागतें त्याप्रमाणें आत्मा अकर्ता असूनहि त्याच्या सन्निधिमात्रानेंच जगें उत्पन्न होतात. म्हणून आत्मा त्याचा कर्ता आहे असेंहि या वाद्याचें म्हणणें आहे. असें जरी असलें तरी जगाचें कर्तृत्व खरें कोणाकडे आहे या प्रश्नाचा समाधानकारक उलगडा करितां येत नाहीं. याविषयीं वसिष्ठांनीं स्थिति प्र. सर्ग ५६ मध्यें अरुणानदीचा दृष्टांत दिला आहे. यावरून जगाच्या उत्पत्तीची नीट व्यवस्था लावतां येत नाहीं. तो दृष्टांत असा आहे कीं " अरुणा नावाची एक नदी कुरुक्षेत्राजवळ आहे. या नदीचें तीर पाषाणांच्या योगानें खडबडीत झालेलें असतें; परंतु ते पाषाण प्रवाहाला अडथळा करावा या हेतूनें तेथें बसलेले नसतात. तसेंच जलाचा प्रवाह नेहमीं खोलगट प्रदेशाकडे जाण्याचा असतो. तीरावर पाषाणांना टक्कर देऊन भोंवरे उत्पन्न करावे अशा हेतूनें तें खालीं जात नसतें. अर्थात् पाषाण व जल हीं दोन्हीं उदासीनच असतात. परंतु या उभयतांची गांठ पडली म्हणजे प्रवाहाची समता नष्ट होऊन नदीच्या पाण्यामध्यें भोंवरे उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें ब्रह्म व अनिर्वचनीय माया यांच्या संयोगानें हें जगद्रूपी कार्य कसें तरी उत्पन्न झालेलें दिसत आहे. सारांश, भोवऱ्याचें कर्तृत्व ज्याप्रमाणें अरुणा नदीवरील पाषाणांकडे किंवा तिच्या प्रवाहाकडे वस्तुतः नाहीं; त्याचप्रमाणें या जगाचें कर्तृत्व एकट्या ब्रह्माकडे किंवा मायेकडे नाहीं. परमार्थदृष्ट्या ह्या जगांत कोणी खरा कर्ता नसल्यामुळें तें काकतालीय न्यायानें कसें तरी भासमान होत आहे, म्हणूनच जग वस्तुतः उत्पन्न झालेलें नाहीं असेंच सिद्ध होतें.

### बीजांकुरन्यायानेंहि ब्रह्म जगाचें कारण होऊं शकत नाहीं.

बीजांतील अंकुराप्रमाणें हें दृश्य जग महाप्रलयकालीं आपल्या सूक्ष्म कारणामध्यें लीन होऊन रहातें आणि उत्पत्तिकालीं पुनः त्यांतूनच उदय

पावतें असें कपिलादिसांख्यांचें मत आहे. परंतु वसिष्ठ म्हणतात कीं, असें मत प्रतिपादन करणाऱ्यांचा बुद्धिभ्रंश झालेला आहे. हें जग सत्य आहे असें सिद्ध करण्यासाठीं ते असले प्रलाप करीत असतात. हें मत किती असमंजपणाचें आहे तें वसिष्ठांनीं पुढें दाखविलें आहे. हे सद्वादी बीजांकुराचा दृष्टांत देतात, परंतु त्या दृष्टांतांतील बीज दृश्य आणि इंद्रिय-गोचर असल्यामुळें त्याला भूमि, उदक वगैरे अनुकूल साहित्य मिळाल्या-नंतर दृश्य बीजाला अंकुर येणें स्वाभाविक आहे. परंतु ब्रह्माची स्थिति तशी नाहीं. ब्रह्म अणूपेक्षांहि अणु आहे, त्यामुळें तें पंचज्ञानेंद्रिय, मन ह्यांचा विषय होऊं शकत नाहीं. तसेंच तें स्वयंभु आणि अद्वितीय असल्या-मुळें तें जगाचें बीज कसें होऊं शकणार ? सारांश, तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें ब्रह्म जगाचें बीज होऊं शकत नाहीं.

आतां ब्रह्म सद्रूप आणि एकरस असलें तरी तें अत्यंत सूक्ष्म असल्या-मुळें अज्ञपुरुषांच्या दृष्टीनें असत्च आहे. तेव्हां अज्ञांच्या दृष्टीनेंहि ब्रह्म जगाचें कारण होणें संभवनीय नाहीं; व बीजच नाहीं तर अंकुर तरी कोठला ? तात्पर्य, या बीजांकुर दृष्टांताचें ब्रह्मजगताशीं साधर्म्य आणि साजात्य नसल्यामुळें तो दृष्टांत जगताच्या उत्पत्तीला लागूं पडत नाहीं. यावरून असें सिद्ध होतें कीं:—

> कारणं यस्य कार्यस्य भूमिपाल न विद्यते ॥
> विद्यते नेह तत्कार्यं तत्संवित्तिस्तु विभ्रमः नि.पू. ९४-५४
> अकारणं तु यत्कार्यं सदिवाग्रेऽनुभूयते ॥
> तत्द्रष्टुर्विभ्रमाद्विद्धि मृगतृष्णाजलोपमम् ॥ नि. पू. ९४-५६

"ज्या कार्याचें कारण असत नाहीं तें कार्य खरें नव्हे. त्याचा अनुभव हा शुद्ध भ्रम आहे. कारण नसतां जें कार्य सत् असें अनुभवास येतें तो पहाणाऱ्याच्या बुद्धीचा भ्रम आहे व त्याचें भासणें मृगजळासारखेंच आहे."

आतां जग उत्पन्न झालें नाहीं तर तें जें दिसत आहे, तें आहे तरी काय ? ह्या प्रश्नाचें उत्तर रज्जुसर्पभ्रमाप्रमाणें ब्रह्मच जगाच्या रूपानें भासत आहे, म्हणून तें जग तत्त्वतः मुळींच नाहीं, असें वसिष्ठ सांगतात:—

यथा स्वप्नेऽवनिर्नास्ति स्वानुभूतापि कुत्रचित् ॥
तथेयं दृश्यता नास्ति स्वानुभूताप्यसन्मयी ॥ नि. उ.१६१-१२

'जशी स्वप्नामध्यें अनुभवलेली पृथ्वी कोठेंच विद्यमान नाही, तसें हें दृश्य जग जरी प्रत्यक्ष अनुभवास येत असलें तरी असत्च आहे.

## कारणांच्या अभावीं काय उत्पन्न होत नाहीं.

आतां ब्रह्म हें जगाचें कारण आहे, असें जरी धरून चाललें, तरी नुसत्या ब्रह्मापासून जग कसें उत्पन्न होणार ? कारण कोणतेंहि कार्य उत्पन्न होण्याला दोन कारणें असावीं लागतात. एक उपादान कारण व दुसरें निमित्त किंवा सहकारी कारण. जसें मातीपासून घट निर्माण होण्याला कुंभार; त्याचें चाक, दंड वगैरे सहकारी कारणें असतात व यामुळें माती आणि घट यांच्यामध्यें दिसण्यांत भिन्नता भासते असें वसिष्ठ सांगतात:—

संपद्यते हि यत्कार्यं कारणैः सहकारिभिः ॥
मुख्यकारणवैचित्र्यं किंचित्तत्रावलोक्यते ॥ ३-१८-१९.

"सहकारी कारणांच्या योगानें जें घटरूप कार्य उत्पन्न होतें, तें आपल्या मुख्य कारणाहून ( मातीहून ) किंचित् भिन्न असल्याचा अनुभव येतो." कारण पाणी धारण करण्याचें सामर्थ्य मातींत नसतें, परंतु त्या मातीपासून निर्माण झालेल्या घटामध्यें पाणी रहात असल्याचें आपल्याला प्रत्यक्ष अनुभवास येतें. आतां जगद्रूपकार्य उत्पन्न होण्यास ब्रह्म जरी उपादान कारण मानलें; तरी सृष्टीच्या पूर्वी एका ब्रह्माशिवाय दुसरें कोणीच नसल्यामुळें निमित्तकारणें मुळींच नाहींत. त्यामुळें त्या निमित्तकारणांच्या अभावीं वास्तविक पहातां कार्य उत्पन्न होणें शास्त्रीयदृष्ट्या अशक्य आहे. असें जरी असलें तरी जग उत्पन्न झाल्याचें दिसून येतें याची वाट काय ? या प्रश्नाचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं, सहकारी कारणांच्या अभावीं केवळ उपादान कारणापासून जें कार्य उत्पन्न झाल्यासारखें दिसतें, तें आपल्या मूल कारणाहून भिन्न नसतें, असा सर्वांचा अनुभव आहे. म्हणूनच सहकारी कारणांच्या अभावीं दोरीच्या ठिकाणीं भासलेला सर्प

दोरीहून केव्हांहि भिन्न असत नाहीं. त्याप्रमाणें ब्रह्म जरी जगाचें कारण मानलें, तरी सहकारी कारणांच्या अभावीं जग ब्रह्माहून भिन्न नाहीं. म्हणूनच 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हा सिद्धांत तयार झाला आहे आणि त्याचप्रमाणें वसिष्ठ सांगतात कीं,

न ब्रह्मजगतामस्ति कार्यकारणतोदयः ॥
कारणानामभावेन सर्वेषां सहकारिणाम् ॥ ३-२१-३७

" जग व ब्रह्म यामध्यें कार्यकारणभाव नाहीं, कारण ह्या ठिकाणीं सहकारी कारणांचा पूर्ण अभाव आहे. "

### अज्ञान जगाचें कारण नाहीं.

आतां ' अज्ञानमेवास्य हि मूलकारणम् ' असें रामगीतेंत सांगितल्याप्रमाणें ' अज्ञान हें जगाचें कारण आहे ' असें कोणी म्हणेल; परंतु अज्ञानहि जगाचें परिणाम दृष्टीनें कारण होऊं शकत नाहीं; कारण तसें असतें, तर जगरूपानें अज्ञानच भासलें असतें. अज्ञानाला ज्ञानाच्या अभावाशिवाय दुसरें स्वरूप नाहीं व ज्ञान हें नित्य असल्यामुळें त्याचा कधींहि अभाव होणेंच शक्य नाहीं. म्हणून मुळांतच अज्ञान सिद्ध होत नसल्यामुळें तेंहि जगाचें कारण मानणें योग्य नाहीं. वास्तव, ब्रह्मच जगाच्या रूपानें भासतें असेंच म्हणणें भाग पडतें. स्वप्नामध्यें जो जगाचा भास होतो तोहि ब्रह्माचाच आहे. स्वप्नांतील जगाची जी स्थिति तीच जागृतींतील जगाची स्थिति आहे.

### परमाणूहि जगाचें कारण नाहींत.

आतां नैय्यायिकांच्या सिद्धांताप्रमाणें ' परमाणू एकत्र येऊन जग उत्पन्न करितात, ' असें मानलें तर तें जमत नाहीं; कारण परमाणू आकाशांत नेहमी उडत असतात. त्यामुळें कोणत्याहि प्रदेशीं कोणत्याहि पदार्थांची तीच तीच स्थिति नियमानें अनुभवास येणार नाहीं. तर प्रत्येक ठिकाणीं प्रत्येक दिवशीं अकल्पित परिणाम घडून येतील. कोठें पर्वताप्रमाणें परमाणूंचा संघ दिसेल तर कोठें मोठा थोरला कूप दिसेल. ' ईश्वराच्या इच्छेनें परमाणूमध्यें क्रिया उत्पन्न होऊन परमाणूंच्या संयोगापासून जगाच्या रचनेस

आरंभ होतो, ' असें तार्किक म्हणतात. पण ईश्वराला अशी इच्छा निष्कारण कां व्हावी ? परमाणू तर स्वतः जड आहेत. म्हणून ते स्वतःच सृष्टीमध्यें प्रवृत्त होत नाहींत. ' वायूच परमाणूंचा संघात करील ' असें म्हणावें, तर वायु जड असल्यामुळें वायूला बुद्धिपूर्वक चेष्टा करितां येत नाहीं व तिच्यावांचून परमाणूंचा संघात संभवत नाहीं. त्यामुळें सृष्टीचा कोणी कर्ता नाहीं, म्हणून हें जगत् उत्पन्नच झालेलें नाहीं असें सिद्ध होतें.

### तत्त्वज्ञान्यांच्या दृष्टीनें कांहींच उत्पन्न होत नाहीं.

' उत्पन्न होतो ' याचा अर्थ सत्ताच आहे असें वसिष्ठ सांगतातः—

जातशब्दोहि सन्मात्रपर्यायः श्रूयतां कथम् ॥
प्रादुर्भावे जनिस्तूक्तः प्रादुर्भावस्य भूर्वपुः ॥नि.उ. १४६-१६
सत्तार्थएव भूः प्रोक्तस्तस्मात्संजातमुच्यते ॥
सर्गतो जात इत्युक्ते सन्सर्ग इति शब्दितम् ॥नि.उ.१४६-१७

याचा भावार्थः—" जात म्हणजे 'उत्पन्न होतो' या शब्दाचा सन्मात्र हा पर्याय शब्द आहे म्हणजे अर्थ आहे. तो कसा ! म्हणून विचारशील तर सांगतों. ' जायते ' म्हणजे उत्पन्न होतो. यामध्यें ' जनि ' हा धातु आहे.'जनी प्रादुर्भावे' या पाणिनीच्या म्हणण्याप्रमाणें प्रादुर्भाव होणें हा त्या ' जनी ' धातूचा अर्थ आहे. प्रादुर्भाव ह्या शब्दामध्यें ' प्रादुः ' हें अव्यय ( उपसर्ग ) आहे. व त्यांतील 'भू' धातु हा त्या प्रादुर्भाव शब्दाचें प्रधान शरीर आहे. ' भूः सत्तायाम् ' भू हा धातु सत् या अर्थी आहे, म्हणून ' संजात ' म्हणजे प्रादुर्भाव झाला किंवा प्रकट झाला, असें म्हटलें जातें. प्रादुः शब्दाचा अर्थ सर्गतः (सर्गापासून) झाला, असा जरी केला, तरी प्रादुर्भाव म्हणजे सर्गापासून झाला असें म्हटलें तरी कांहीं बिघडणार नाहीं. कारण सर्ग म्हणजे सत्ता, व भू म्हणजे सत्ता सत्तेपासून सत्ता झाली असाच अर्थ निघतो. सारांश, सत्ता हाच त्या सर्वांचा फलितार्थ असून नित्यसिद्ध स्वयंप्रकाश चिदात्माच सत्तारूप आहे. त्यामुळें तत्त्वज्ञान्यांच्या दृष्टीनें कांहींच उत्पन्न होत नाहीं व कशाचा नाशहि होत नाहीं.

अशा तऱ्हेनें विचार केल्यास दृश्य जग वास्तविक खरें नाहीं. तें

खरोखर आहे असें मानिलें, तर त्याचा कधींहि नाश होणार नाहीं व मोक्षस्थिति खोटी ठरणार. परंतु मोक्षस्थिति असंभवनीय असणें शक्य नाहीं. कारण देव, ऋषि व मुनी वगैरे जातींत जीवन्मुक्त प्रत्यक्ष झालेले आहेत व जग जर सत्य असेल तर अनिर्मोक्ष प्रसंग येईल म्हणून वसिष्ठ सांगतातः—

> तस्माद्राम जगन्नासीन्नचास्ति न भविष्यति ॥
> चेतनाकाशमेवाशु कचतीत्थमिवात्मनि ॥ ४-२-८
> ब्राह्मणः प्रतिभानं यत्तदिदं जगदुच्यते ॥ नि. उ. १४३-९

"ह्या जगाला तिन्ही कालीं सत्ता नाहीं, म्हणजे तें पूर्वी नव्हतें, सध्यां नाहीं आणि पुढेंहि असणें शक्य नाहीं. तर चिदाकाशच आपल्या ठिकाणीं जगद्रूपानें भासतें. ब्रह्माचा जो प्रतिभास त्यालाच जगत् म्हणतात."

ह्याप्रमाणें जगताचा अत्यंताभाव असल्यामुळें "सर्वं खल्विदं ब्रह्म" 'हें सर्व ब्रह्म आहे' हा श्रुतिसिद्धांत यथार्थ होय. श्रीमत् शंकराचार्यांचेंहि असेंच मत आहे. मांडुक्योपनिषदांवरील गौडपादीयकारिकामध्यें (३·४८, ४-७१) हेंच तत्त्व मान्य केलेलें आहे.

## वंध्यापुत्र व आकाशवृक्ष हेच दृष्टांत योग्य आहेत.

आतां कदाचित् कोणी असें म्हणेल कीं, वर दिलेले वंध्यापुत्र, व आकाशवृक्ष हे दृष्टांत जगाला लागू पडत नाहींत, कारण यांचा मुळींच अभाव आहे. आतां दृष्टांत द्यावयाचा असेल, तर वंध्यापुत्र किंवा आकाशवृक्ष यांच्या कल्पनेचा द्यावा म्हणजे झालें. वंध्यापुत्र व आकाशवृक्ष यांच्या कल्पनेला उत्पत्ति आहे व लयहि आहे, त्याप्रमाणें जगाला उत्पत्ति आहे आणि लय आहे असें म्हणण्यास काय हरकत आहे ?

ही वरील तुलना बरोबर नाहीं. कारण जग हें असें आहे कीं, त्याला कशाचीच उपमा देतां येत नाहीं, कारण जगाला ज्या ज्या वस्तूंची उपमा द्यावी ती ती वस्तु जगांत मोडणार ! अशा स्थितींत वंध्यापुत्र किंवा आकाशवृक्ष यांची कल्पना जगाच्या कल्पनेंतच अंतर्भूत होणारी असल्यामुळें त्यांचा दृष्टांत जगाला देणें म्हणजे 'गगन हें गगनासारखेंच आहे आणि सागर हा सागरासारखाच आहे' असें म्हणण्यासारखें निरर्थक असून

त्याचें पर्यवसान जग निरुपम ठरण्यांतच होतें. परंतु वंध्यापुत्र व आकाशवृक्ष, यांचा अंतर्भाव जगांत होत असल्यामुळें ते दृष्टांत विषम नसून समर्पक आहेत. यावरून वंध्यापुत्र व आकाशवृक्ष यांचा ज्याप्रमाणें अत्यंताभाव आहे, त्याचप्रमाणें या जगाचाहि अत्यंताभाव आहे. आतां अफाट विस्तारलेलें हें दृश्य. जग असत् कसें आहे ? या प्रश्नाचें उत्तर वसिष्ठांनीं विविध दृष्टांतांनीं दिलें आहे. त्यांपैकीं एक दोन दृष्टांत खालीं दिले आहेत. मृगजळामध्यें पाण्याचा भास झाला तरी त्या ठिकाणीं वस्तुतः पाणी नसतें, तसेंच दृष्टीदोषामुळें आकाशांत दुसऱ्या चंद्राचा भास झाला, तरी तो चंद्र खरा नसतो, त्याप्रमाणें शुद्ध ब्रह्माच्या ठिकाणीं जगाचें नांवहि नाहीं, कारण ज्याला उत्पन्न होण्याला कोणतेंहि कारण नसतें, तें कधींच उत्पन्न होत नाहीं; मग त्याची स्थिति किंवा नाश संभवणार कसा ? अशा जगाचा विचार करण्यांत तरी काय अर्थ आहे.

**असतो व्योमवृक्षस्य विचारः कीदृशस्ततः ॥** नि.उ. १७७-१४.

"नसलेल्या आकाश वृक्षाचा विचार तो कसला करावयाचा ?" अशा तऱ्हेचें वर्णन दासबोधांतहि * आलेलें आहे.

यावरून जगाचा अत्यंताभाव आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं व असें समजलें तर ब्रह्मपदाची प्राप्ति होणें शक्य आहे असें शेवटीं वसिष्ठांनीं सांगितलें आहेः—

**अत्यंताभावसंपत्त्या जगतश्चैतदाप्यते ॥** ३-१७-१४.

"जगाचा अत्यंत अभाव आहे, असा साक्षात् अनुभव आल्यावरच त्या परमपदाची प्राप्ति होऊं शकते." अशा तऱ्हेचा अनुभव येण्यास वसिष्ठांनीं असा उपाय सांगितला आहे कीं,

---

*हाच अजातवादाचा सिद्धांत श्री समर्थ रामदासानीं आपल्या दासबोधांत "अरे जें झालेंचि नाहीं । त्याची वार्ता पुससी काई । ८-३-१ यामध्यें अगदीं स्पष्ट शब्दांत सांगता आहे

शास्त्रसत्संगमाभ्यासात्सविवेकोजितेंद्रियः ॥
अत्यंताभावमेतस्य दृश्यस्याप्यवगच्छति ॥ ४-४-२-

" शास्त्र आणि सत्संग ह्यांच्या योगानें मनुष्याच्या मनांत विवेक जागृत झाला कीं, त्याच्या योगानें इंद्रियांना जिंकतां येतें आणि एकदां मनुष्य जितेंद्रिय बनला म्हणजे तो 'ह्या सर्व दृश्याचा अत्यंताभाव आहे, ' अशा अनुभवाप्रत जाऊन पोहोंचतो."



# प्रकरण २४ वें.

## सर्वब्रह्मवाद.

जगाचें स्वरूप समजावून देण्याकरितां प्रकरण २२ मध्यें जे चार प्रकारचे विचार सांगण्यांत आले आहेत त्यांपैकीं पहिला विचार जो अजातवादाचा, त्याचें विवरण मागील प्रकरणांत करण्यांत आलें आहे. पण हा अजातवादाचा सिद्धांत ज्यांना पटण्याजोगा नाहीं, त्यांच्याकरितां वसिष्ठांनीं हा दुसरा विचार म्हणजे 'सर्व ब्रह्म आहे' हा प्रकट केला आहे. हा विचार जरी पत्करला तरी जगाचें सत्यत्व सिद्ध होत नाहींच. या विचारासंबंधानें वासिष्ठाची विचारसरणी काय आहे त्याचा विचार या प्रकरणांत केला आहे.

'सर्व खलु इदं ब्रह्म' ह्या वेदांतांतील सिद्धांतवाक्याचा सरळ अर्थ 'हें सर्व (जगत्) ब्रह्म आहे,' असा होतो. परंतु याचा अर्थ वसिष्ठांच्या तात्त्विक दृष्टीनें असा करतां येतो कीं, 'हें सर्व जग मुळीं नाहींच, तर केवळ ब्रह्मच आहे.' हा अर्थ कोणत्या पद्धतीनें व युक्तीनें केला आहे त्याचा थोडक्यांत विचार करूं. ह्या जगामध्यें जे विविध पदार्थ आहेत त्यांत फक्त एक चेतन व दुसरे जड म्हणजे द्रष्टा व दृश्य असे मुख्य दोन प्रकार केलेले आहेत. ह्या दोहोंचा संबंध म्हणजे दर्शन (द्रष्टयाला येणारा दृश्याचा अनुभव) होय. हीच वेदांतशास्त्रांत मानलेली त्रिपुटी होय. उदाहरणार्थ, द्रष्टा, दृश्य व दर्शन, भोक्ता, भोग्य व भोग इत्यादि. या जगांतील सर्व व्यवहार वर निर्दिष्ट केलेल्या विविध तऱ्हेच्या त्रिपुटींनीं भरून गेलेला आहे. अशा या जगांतील सर्व व्यवहाराला अर्थात् सर्व जड चेतन पदार्थांना जी सत्ता आलेली दिसते, ती या जगाच्या बुडाशीं अधिष्ठानभूत असलेल्या ब्रह्मचैतन्याच्या सत्तेमुळेंच आलेली आहे. त्याला स्वतंत्र अशी सत्ता नाहीं. द्रष्टा व दृश्य हे पदार्थ भिन्न आहेत, असें जरी भासलें तरी ते तसे नाहींत; कारण ह्या दोहोंच्या बुडाशीं जी एक अधिष्ठानभूत व अतीसूक्ष्म अशी सत्ता आहे, ती एकच

आहे. हीच परमार्थ सत्ता व हेंच सत् वस्तु ब्रह्म होय. म्हणूनच वसिष्ठ सांगतात कीं:—

> न संभवति संबंधो विषमाणां निरंतरः ॥
> न परस्परसंबंधाद्विनाऽनुभवनं मिथः ॥ ३-१२१-३७.
> ऐक्यं च विद्धि संबंधं नास्त्यसावसमानयोः ३-१२१-४२.

"विषमवस्तूंचा निरंतर संबंध संभवत नाहीं. परस्परांचा संबंध झाल्याशिवाय द्रष्ट्याला दृश्याचा अनुभव येत नाहीं. हा संबंध म्हणजेच ऐक्य व हें विषम वस्तूंचें कधींच होऊं शकत नाहीं." यावरून द्रष्टा व दृश्य यांचा जो संबंध होतो, तो ते दोघेहि एकरूप असल्याशिवाय होणें शक्य नाहीं. द्रष्टा हा चेतन असल्यामुळें ब्रह्म आहे व हें म्हणणें 'जीवो ब्रह्मैव नापरः' या वेदांत शास्त्रांतील सिद्धांतास अनुसरूनच आहे. आतां दृश्य देखील द्रष्ट्याच्या अभावीं म्हणजेच चैतन्यावांचून उत्पन्न होत नाहीं, म्हणजेच त्याचें अस्तित्व सिद्ध होत नाहीं. एखादी वस्तु फार सुंदर असली पण तिला पाहणारच नसला तर त्या वस्तूच्या ठिकाणीं सौंदर्य असून नसल्यासारखेंच ठरतें. गवयाच्या गळ्यांतून मोठा सुरेल व मधुर शब्द निघत असला, पण तो ऐकणाराच कोणी नसेल तर तो शब्द असून नसल्यासारखाच! याप्रमाणें प्रत्येक वस्तूची स्थिति आहे. यांवरून ज्ञानानें ज्ञात होणारी वस्तूच सत् असते, अर्थात् ज्ञानरूपच असते; कारण कोणताहि विषय ज्ञानावांचून केव्हांच प्रतीतीला येत नाहीं. त्यामुळें कोणतेंहि दृश्य ज्ञानाहून भिन्न नाहीं. सारांश, द्रष्टा, दृश्य व दर्शन या व अशा सारख्या इतर सर्व त्रिपूटींतील प्रत्येक अवयवाला बोधरूपत्व हें एकच सार आहे. यावरून कोणतेंहि दृश्य ज्ञानाहून भिन्न नाहीं. म्हणूनच वसिष्ठ सांगतात कीं:—

> सजातीया सजातीयेनैकत्वमधिगच्छति ॥
> अन्योन्यानुभवस्तेन भवत्येकत्वनिश्चयः ॥ नि. उ. २५-१४.

"सजातीय वस्तु सजातीय वस्तूशींच एकरूप होते. तेजोमय नेत्र तेजालाच म्हणजे पदार्थाच्या वरील रूपालाच पहातात. त्यामुळें द्रष्टा

(नेत्र) व दृश्य (पदार्थ) यांचें एकत्व निश्चित होतें व त्याचा (पदार्थाचा) अनुभवहि त्यामुळेंच येतो." काष्ठ, पाषाण वगैरे पदार्थांना जर बोधरूपत्व नसेल, तर त्यांचें अस्तित्व केव्हांहि प्रतीत होणार नाहीं. यावरून जगांतील सर्व दृश्य पदार्थ बोधमात्र (ज्ञानमात्र) आहेत, असें दिसून येतें. आतां जगांतील प्रत्येक पदार्थ बोधमात्र असल्यामुळें तो द्रष्टयाच्या स्वरूपाशीं जेव्हां एकरूप होतो तेव्हांच दृश्यरूपानें त्याचा अनुभव येतो. म्हणूनच वसिष्ठ सांगतात कीं:—

**द्रष्टृदृश्ये न येद्यकमभविष्यच्चिदात्मके ॥**
**तद्दृश्यास्वादमज्ञः स्यान्नाद्रष्ट्रेक्षुमिवोपलः ॥** नि. उ ३८-९.

"द्रष्टा, दृश्य, हीं दोन्हीं चिदात्मक साक्षीमध्यें जर एकरूप न झालीं तर ऊस खावयास प्रवृत्त झालेला मनुष्य उसाला पाहून व तो चोखीत असूनहि त्याचें माधुर्य जाणण्यास पाषाणाप्रमाणें समर्थ होणार नाहीं."

यावरून दृश्य विषय हा मूलतः चिन्मात्र असल्यामुळें तो द्रष्टयाच्या चित्स्वरूपाशीं जेव्हां एकरूप होतो तेव्हांच दृश्यरूपानें त्याचा अनुभव येतो. म्हणूनच द्रष्टा, दृश्य व दर्शन इत्यादि त्रिपुटीयुक्त सर्व जग चिन्मात्र ब्रह्मच आहे असा निश्चय होतो. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

**संबंधे दृश्यदर्शीनां मध्ये द्रष्टुर्हि यद्वपुः ॥**
**द्रष्टृदर्शनदृश्यादिवर्जितं तदिदं पदम्॥** ३-१२१-५३.

"द्रष्टा आणि दृश्य यांच्या संबंधामध्यें त्रिपुटीरहित असें जें द्रष्टयाचें स्वरूप तेंच परमपद (ब्रह्म) होय." यावरून जगांतील सर्व द्रष्टा दृश्य पदार्थ एकरूप आहेत, म्हणजेच ब्रह्मरूप आहेत असें वसिष्ठांनीं सिद्ध केलें आहे व हेंच तत्त्व निरनिराळ्या दृष्टांतांनीं स्पष्ट करून दाखविलें आहे:—

**कटकत्वं पृथग्धेम्नस्तरंगत्वं पृथग्जलात् ॥**
**यथा न संभवत्येवं न जगत्पृथगीश्वरात् ॥** ३-६१-४.

"सोन्याचें कडें असें सोन्याहून निराळें नाहीं, किंवा लाट जशी पाण्याहून निराळी नाहीं, तसें नामरूपात्मक जग ईश्वराहून निराळें नाहीं." याशिवाय आणखीहि दृष्टांत पुढें दिले आहेतः—

वायूची हालचाल जशी वायूहून निराळी नाहीं, ऊसाहून माधुर्य जसें भिन्न नाहीं, तसें ब्रह्माहून जगत् भिन्न नाहीं.

याशिवाय उपशम प्र. सर्ग ५७ मध्यें तर सर्व विश्व ब्रह्मरूप आहे. याविषयीं मोठे मार्मिक दृष्टांत दिले आहेत; त्यांपैकीं थोडे पुढें दिले आहेत:-

आत्मरूपी मिरचींतील जी तिखटपणाची संवेदना, आत्मरूपी मिठामध्यें जें खारटपणाचें संवेदन, आत्मरूपी उसामध्यें जी माधुर्याची संवेदना, आत्मरूपी पाषाणामध्यें जी काठिण्य शक्ति, आत्मरूपीपर्वतामध्यें जी गुरुत्वशक्ति इत्यादि अनेक दृष्टांतांतील ज्या विविध संवेदना किंवा शक्ती त्याच अनंत भुवनांच्या रूपानें स्थित आहेत. सारांश, आत्म्यामध्यें मायिक जगदाकाराचा जो अनुभव येतो, तो वस्तुतः आत्म्याचाच प्रकाश होय. या सर्व दृष्टांतांवरून सर्व विश्व आत्म्याहून मुळींच भिन्न नाहीं, असें वसिष्ठांनीं सिद्ध केलें आहे व शेवटीं असा निष्कर्ष काढला आहे कीं:—

**चित्सत्तैव जगत्सत्ता जगत्सत्तैव चिद्वपुः ॥ ३-१४-७४.**

" चिद्रूप ब्रह्माची सत्ता म्हणजेच जगाची सत्ता आणि जगाची सत्ता म्हणजेच चिद्रूप ब्रह्माचें शरीर. "

सत् आणि असत् रूपानीं भासणारें, जगांतील कार्यकारणांच्या रूपानीं भासणारें सर्व पदार्थ वास्तविक पाहूं गेलें तर चिद्रूप ब्रह्मच आहेत. बीजच अंकुराच्या रूपानें भासतें, तसेंच ब्रह्म समष्टि व व्यष्टि जीवांच्या आणि दृश्य जगाच्या रूपानें भासतें. यावरून सर्व दृश्य जग ब्रह्मरूप आहे, असा वसिष्ठांनीं शेवटीं सिद्धांत केला आहे.

यावरून असें दिसतें कीं, जर जगाला सत्य म्हणावयाचें असेल तर फक्त तें ब्रह्म आहे ह्या दृष्टीनेंच म्हणतां येईल व तें ब्रह्म आहे असें मान्य नसेल तर 'अजातवाद' या २३ व्या प्रकरणांत दाखविल्याप्रमाणें वंध्यापुत्राप्रमाणें जगाचा अत्यंताभाव आहे, म्हणजे तें मुळींच नाहीं, असेंच म्हटलें पाहिजे. सारांश, वसिष्ठांच्या म्हणण्याचा भावार्थ असा आहे कीं, एक जगाला सत् म्हणजे ब्रह्मरूप तरी म्हणा किंवा असत् म्हणजे मुळींच नाहीं, असें तरी म्हणा. या दोहोंपैकीं कांहीं म्हटलें तरी शेवटीं एक ब्रह्मच सिद्ध होतें. जगाचें सत्यत्व सिद्ध होत नाहीं.

# प्रकरण २५ वें.

## मायावाद ( प्रकृति ).

अजातवाद व सर्वब्रह्मवाद या मागील दोन प्रकरणांतील सिद्धांत ज्यांच्या बुद्धीला आकलन करतां येत नाहींत व ज्यांना हें जगत् ' आहे ' असें वाटतें व तें ' सत्यहि आहे ' असें ज्यांनीं आपल्या बुद्धीनें ठरविलें आहे, त्यांच्या या निश्चयाची भ्रामकता सिद्ध करण्याकरितां, हें जगत् असत् किंवा मिथ्या कसें आहे, हें दाखविण्याकरितां व ह्या दृश्य विश्वाची उभारणी करण्याकरितां वसिष्ठांनीं कांहीं वेळ शास्त्रीय मायावादाची कल्पना स्वीकारली आहे ' मायांतु प्रकृतिं विद्यात् ' माया म्हणजेच प्रकृति असें वेदान्ती मानतात.

### सांख्याची प्रकृति.

पण सांख्य शास्त्रकार ज्या दृष्टीनें प्रकृतीकडे पहातात, त्या दृष्टीनें वेदांती पहात नाहींत. सांख्यांनीं प्रकृति ही अनादि, अनंत, ' मूलप्रकृतिरविकृतिः ' निर्विकारी व पुरुष ( ब्रह्म ) सारखी निराळी स्वतंत्र अशी मानिली आहे. फक्त प्रकृतीला हें विश्व निर्माण करण्यास पुरुषाचा संयोग एवढेंच निमित्त कारण पुरेसें होतें. उपनिषदांतूनहि मूळ एका परमात्म्यास ' बहुस्यां प्रजायेय ' आपण अनेक व्हावें, अशी इच्छा झाल्यावर सृष्टि उत्पन्न झाली, असें सांगितलें आहे. ( छांदोग्य ६–२–३ ते २–६ ). सांख्याचें म्हणणें असें आहे कीं, प्रकृतीच्या गुणांची साम्यावस्था मोडून तिच्या गुणांचा विस्तार होऊं लागतो व हा विस्तारच पुढें सर्व दृश्यांची उभारणी करीत असतो.

### वसिष्ठांतील प्रकृति.

वसिष्ठांनीं या प्रकृतीला परमात्म्याहून निराळी स्वतंत्र न मानतां , ती परमात्म्याची स्पंदशक्ति आहे, असें म्हटलें आहेः—

आवर्तः सलिलस्येव यः स्पंदस्त्वयमात्मनः ॥
प्रोक्तः प्रकृतिशब्देन तेनैवेह सएवहि ॥ नि. पू. ४९-३०

"पाण्याचा जसा तरंग त्याप्रमाणें आत्म्याचा जो स्पंद (विवर्त) तीच प्रकृति आहे. यास्तव या प्रकृतींत व तिच्या कार्यांत आत्माच सन्मात्र रूपानें भरलेला आहे."

जसा वायु व त्याचा स्पंद हे नांवानें भिन्न पदार्थ आहेत, सत्तेनें नाहींत. त्याचप्रमाणें आत्मा व प्रकृति हीं नाममात्र भिन्न आहेत, वस्तुतः भिन्न नाहींत, असें वसिष्ठ सांगतातः—

नात्मनः प्रकृतिर्भिन्ना घटान्मृन्मयता तथा ॥
सन्मृन्मात्रे यथा चांतःरामैवं प्रकृतिः स्थिता॥ नि.पू.४९-२९.
यथैकं पवनस्पंदमेकमौष्ण्यानलौ यथा ॥
चिन्मात्रं स्पंदशक्तिश्च तथैवैकात्म सर्वदा ॥ नि. उ. ८४-३.

**भावार्थः**—घटापासून माती जशी भिन्न नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याहून प्रकृति भिन्न नाहीं. जसें घटाचें माती हेंच वास्तविक स्वरूप आहे, त्याप्रमाणें आत्मा हा प्रकृतीचें स्वरूप आहे. ज्याप्रमाणें वायु व त्याचा स्पंद, उष्णता व अग्नि, यांचें ऐक्य असतें त्याप्रमाणें चिन्मात्र ब्रह्म व त्याची स्पंदशक्ति म्हणजेच प्रकृति यांचें सर्वदा ऐक्य असतें.

अशा तऱ्हेनें सर्व शक्तिसंपन्न अशा परब्रह्माची जगताला निर्माण करणारी जी शक्ति तिला वासिष्ठामध्यें स्पंदशक्ति म्हणजे प्रकृति असें म्हटलें आहे. वसिष्ठ सांगतात कीं, ही स्पंदशक्तीच त्या परमात्म्याची इच्छा आहे व तीच सर्व विश्व निर्माण करते.

स्पंदशक्तिस्तदिच्छेदं दृश्याभासं तनोति सा ॥
साकारस्य नरस्येच्छा यथा वै कल्पनापुरम् ॥ नि. उ. ८४-६

" साकार मनुष्याची इच्छा जसें कल्पनामय नगर निर्माण करते, तशी परब्रह्माची स्पंदशक्ति ( म्हणजेच ' बहु स्यां प्रजायेय ' असें छांदोग्यांत वर्णन केल्याप्रमाणें जग निर्माण करण्याची इच्छा ) हें सर्व जग निर्माण करते. "

ही स्पंदशक्ति आपल्यांतील चिदाभासानें प्रदीप्त झाल्यामुळें तिला चिच्छक्ति व जीवचैतन्य अशीं नांवें प्राप्त झालीं आहेत. ती जगदाकारानें परिणाम पावत असल्यामुळें " मायां तु प्रकृतिं विद्यात् ' इत्यादि श्रुतींत तिला प्रकृति म्हटलें आहे. वासिष्ठांतहि ह्या परमेश्वराच्या इच्छेला प्रकृति असें म्हटलें आहे.

सा राम प्रकृतिः प्रोक्ता शिवेच्छा पारमेश्वरी ॥
जगन्मायेति विख्याता स्पंदशक्तिरकृत्रिमा ॥ नि. उ. ८५-४

" ती शिवपरमात्म्याची इच्छा म्हणजेच प्रकृति म्हणून सांगितली आहे. ती परमेश्वराची जगन्माया या नांवानें प्रसिद्ध आहे. तिलाच ब्रह्माची अकृत्रिम स्पंदशक्ति असें म्हणतात. " कारण शक्ति ही कधींहि शक्ताहून निराळी नसते.

## ही प्रकृति ( माया ) त्रिगुणात्मक आहे.

सृष्टिसमयीं आपल्याच स्वरूपांत स्थित असलेलें हें सन्मात्र ब्रह्मवस्तु किंचित् स्पंद पावूं लागलें कीं, आपल्याच ठिकाणीं समुद्रांतील तरंगाप्रमाणें पृथक्सें होऊन गुण-गुणी भेदाच्या व्यवहाराला योग्य होत्सातें प्रकट होतें व आपला मूळचा साम्यभाव सोडून विषमतेला प्राप्त होतें. याच स्पंदशक्तीचा ( म्हणजेच प्रकृतीच्या ) ठिकाणीं कडकडीत ऊन, कोवळें ऊन व छाया यांमध्यें सूर्याच्या तेजाचा उत्तरोत्तर अपकर्ष जसा कल्पितात, त्याप्रमाणें स्थूल, मध्यम व सूक्ष्म अशा तीन अवस्था कल्पिल्या आहेत. या स्थूलादि तीन अवस्थांमध्यें ती सत्त्व, रज व तम अशी तीन प्रकारें कल्पिली जाते. ही त्रिगुणात्मक प्रकृति ( किंवा माया ) होय. वसिष्ठांनीं

अविद्यां प्रकृतिं विद्धि गुणत्रितयधर्मिणीम् ॥ नि. पू. ९-६

या त्रिगुणात्मक प्रकृतीला अविद्या असेंहि म्हटलें आहे.

## प्रकृति सर्वशक्तिसंपन्न आहे.

ही प्रकृति सर्वशक्तिसंपन्न ब्रह्माची शक्ति असल्यामुळें सर्वशक्तिसंपन्न आहे, म्हणूनच तिला सर्व कांहीं करितां येतें. आतां ब्रह्म हें सर्वशक्तिसंपन्न कसें आहे तें वसिष्ठ सांगतातः—

सर्वशक्ति परं ब्रह्म नित्यमापूर्णमव्ययम् ॥
न तदस्ति न तस्मिन्यद्विद्यते विततात्मनि ॥ ३-१००-५

" ब्रह्म हें वस्तुतः सर्वशक्तिसंपन्न, अत्यंत श्रेष्ठ, नित्य, परिपूर्ण आणि अव्यय आहे. त्याच्या व्यापक स्वरूपामध्यें जें विद्यमान नाहीं असें कांहींच नाहीं. "

" सर्वशक्तिसंपन्न असलेला परब्रह्मरूपी भगवान् ज्या ज्या शक्तीची कल्पना करितो ती ती शक्ति प्रकाशित करितो. सर्व शरीरामध्यें त्या ब्रह्माची चिच्छक्तीच व्यापून राहिली आहे. ही सर्वगामी चिच्छक्ति वायूमध्यें स्पंदरूपानें, पाषाणामध्यें जडरूपानें, पाण्यामध्यें द्रवरूपानें, आकाशामध्यें शून्यरूपानें आणि सर्व ठिकाणीं सर्व वस्तूंच्या भावरूपानें आविर्भूत होते. विनाशशील पदार्थांत तिरोभावशक्ति, वीरांचे ठिकाणीं वीरशक्ति, सृष्टीच्या ठिकाणीं सर्गशक्ति आणि कल्पांताचे ठिकाणीं सर्वसंहारशक्ति दृग्गोचर होते. सारांश, त्या ब्रह्माच्या अनंत शक्ती दशदिशांमध्यें प्रविष्ट झाल्याचें दिसून येतें. सर्वगत, नित्य आणि चिद्रूपत्वानें स्फुरणारा आत्मा जेव्हां मननात्मकशक्ति धारण करतो, तेव्हां त्याला मन असें म्हणतात. जीव म्हणजे वास्तविक ब्राह्मीशक्तीच असल्यामुळें तो तत्त्वतः ब्रह्मरूपच आहे. जीवांच्या ठिकाणीं उत्पन्न होणारे मनोधर्म आणि सर्व द्वैतप्रपंचाला कारणीभूत होणारीं कामकर्मवासनादि बीजें हीं वास्तविक ब्रह्मामध्येंच स्थित आहेत. आतां ह्या ठिकाणीं असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, सर्व जीवांच्या ठिकाणीं दिसून येणाऱ्या शक्ती ह्या जर वास्तविक ब्रह्माच्याच शक्ती आहेत, तर जीवामध्यें त्यांचा संकर कां होत नाहीं? या प्रश्नाचें उत्तर असें कीं, निरनिराळ्या ऋतूंमध्यें नानातऱ्हेचीं फुलें आणि फळें उत्पन्न करण्याची शक्ति पृथ्वीमध्यें असते व म्हणूनच स्थलभेदामुळें आणि बीजभेदामुळें निरनिराळीं फुलें आणि निरनिराळीं फळें उत्पन्न होत असतात. हाच न्याय ब्राह्मीशक्तीलाहि लागू आहे. ब्राह्मीशक्ति जीवांच्या कर्माचें सामान्य कारण आहे व जीवांचे पूर्वसंस्कार हे त्यांच्या कर्माचे विशेष कारण आहेत, त्यामुळें जीवांचीं कर्में भिन्न भिन्न दिसून येतात. अर्थात् सर्वशक्ती एकाच वेळीं एकाच अंतःकरणांत उत्पन्न झालेल्या

कधींहि आढळून येत नाहींत. अशा तऱ्हेनें सर्वशक्तिसंपन्न अशा परब्रह्माची जगताला निर्माण करणाऱ्या प्रकृतीमध्यें किंवा मायेमध्यें ब्रह्माप्रमाणेंच वरील सर्व अनंत शक्ती भरलेल्या आहेत.

## माया अघटितघटनापटीयसी आहे.

ही परमात्म्याची माया अघटित घटना करण्यांत मोठी पटाईत आहे. त्यामुळें स्वप्न, भ्रम इत्यादिकाविषयीं असें कसें होऊं शकेल? असें म्हणताच येत नाहीं. भ्रमांत संभवत नाहीं, असें कांहीं नाहीं. या त्रैलोक्यांत विचित्र वस्तुदृष्टी उपलब्ध होतात. जलामध्यें अग्नि पेटतो, जसा समुद्रांत वडवाग्नि. आकाशांत नगरें असतात, जशीं देवांचीं गृहें. दगडावर कमलें उगवतात, जसें मृत्तिकेचा लवलेशहि नसलेल्या मेरुपर्वतावर ( तो सोन्याचा आहे असें पुराणांतून वर्णन आहे.) वृक्ष. एकाच प्रदेशीं पुण्यफळें ( इष्टवस्तु ) रहातात, जसें कल्पवृक्षावर सर्व पदार्थ असतात. शिळा वृक्षाप्रमाणें फळें देतात, जसा चिंतामणि. पाषाणांत प्राणी असतात, जसें दगडांत बेडूक. दगडाला पाझर फुटतात, जसा चंद्रकांत मण्यापासून द्रव सुटतो. झोपेंतील भ्रामक ज्ञानांत एका क्षणामध्यें घट पटत्वास प्राप्त होतो, जसें स्वप्नांत आपलेंच मरण आपण पहातों. यावरून असत्य पदार्थाचाहि बोध होतो, असें ठरतें. आकाशांत पाणी छताप्रमाणें पसरून रहातें, जशी मंदाकिनी (आकाशगंगा). स्थूल शिळाही पक्ष्याप्रमाणें उड्डाण करतात, जसे पूर्वीचे पंखयुक्त पर्वत. अशा तऱ्हेनें ही माया अघटित घटना करण्यांत मोठी पटाईत आहे.

श्रीमद्भागवतांतहि या मायेचें स्वरूप सांगतांना नसलेल्या जगाचा प्रत्यय माया आणून देते व आत्मा स्वतः असूनहि त्याचा प्रत्यय येऊं देत नाहीं असें सांगितलें आहेः—

> ऋतेऽर्थं यत्प्रतीयेत न प्रतीयेत चात्मनि॥
> तद्विद्यादात्मनोमायां यथाऽऽभासो यथा तमः ॥भा. २-९-३३

याचा भावार्थ असाः—'आकाशांत चंद्र एकच असतां पित्तादि विकारामुळें जसे एखाद्याला ते दोन किंवा त्याहून अधिक आहेत असा भास होतो, त्याप्रमाणें आत्मा एकच असतां त्या ठिकाणीं वस्तुतः नसलेल्या

जगाचा प्रत्यय येऊन अनेकत्व भासतें. राहु आकाशांत असूनहि इतर ग्रहाप्रमाणें दृश्यगोलक नसल्यामुळें त्याचें दर्शन होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें आत्मा वस्तुतः सद्रूप असूनहि त्याचा प्रत्यय येत नाहीं. या दोन्ही प्रकारांना आत्म्याची माया असें म्हणतात.'

अशा तऱ्हेची विचित्र माया श्रीमद्विष्णूनें गाधि ब्राह्मणास दाखविली आहे. ( या ग्रंथाचा भाग दुसरा, गाधि ब्राह्मणाची गोष्ट २० वी. )

## सूक्ष्मसृष्टि.

सृष्टीच्या आरंभीं प्रकृति ही परमात्म्याच्या ठिकाणीं अव्यक्तरूपानें असते व पुढें सृष्टीच्या वेळीं ती व्यक्त होऊं लागली कीं, परमात्म्याच्या ठिकाणीं अहंकाराचा अध्यास होऊन 'बहु स्यां प्रजायेय' असें उपनिषदांत सांगितल्याप्रमाणें ईक्षण सुरू होतें. या ईक्षणयुक्त परमात्म्याला सर्वज्ञ, ईश्वर वगैरे नांवें *प्राप्त होतात.

ह्या प्रकृतीचा निकृष्ट दर्जाचा भाग अविद्या या नांवानें वेदांतशास्त्रांत प्रसिद्ध आहे. तिच्या ताब्यांत असलेला जो, तो व्यष्टि जीव× असें म्हटलें आहे. ह्या समष्टि जीवालाच हिरण्यगर्भ असेंहि दुसरें नांव आहे. ह्या समष्टि जीव लिंगशरीराचा अभिमानी असतो. या हिरण्यगर्भानंतर त्या परमात्म्यापासून आकाश उत्पन्न झालें. त्याबरोबरच हिरण्यगर्भाच्या ठिकाणीं अहंकार उत्पन्न झाला आणि त्याला आधुमर्यादा भासूं लागली. हेंच भावी जगाचें बीज होय. या आकाशसत्तेच्या एका अंशास स्पंद उत्पन्न होऊन तीच सत्ता वायुरूपानें भासूं लागली. ती सत्ता पुढें घन बनून शब्द तन्मात्राच्या सूक्ष्म रूपानें व्यक्त झाली. यांपासूनच सर्व प्रमाणभूत वेदांचा विकास झालेला

---

* पंचदशीमध्यें "मायाबिंबं वशीकृत्य तां स्यात्सर्वज्ञ ईश्वरः" ॥ १-१६ व उपनिषदांतहि "मायिनं तु महेश्वरम्" ह्या ठिकाणीं समष्टि जीवाला सर्वज्ञ, ईश्वर व महेश्वर अशीं नांवें दिलीं आहेत.

× अविद्यावशगस्त्वन्यः ॥ पंचदशी १-१५
अविद्येच्या ताब्यांत असणारा जो दुसरा तो जीव होय.

आहे. येणेंप्रमाणें आकाश, वायु या परंपरेनें युक्त असलेल्या परमात्म्यालाच वायूच्या उत्पत्तिनंतर जीव हें नांव प्राप्त झालें, वायूरूप बनलेल्या त्या परमात्म्याच्या भावनेनें क्षणांत स्पर्श तन्मात्र उत्पन्न होऊन नंतर त्याच्यापासून आवहप्रवाहादि निरनिराळ्या एकूण पन्नास वायूंची उत्पत्ति झाली. सर्व भूतांना चालना देण्याचें काम त्याच्या हातून होत असतें. पुढें त्या परमात्मसत्तेपासून तेजाचा संकल्प होऊन तेज आणि नंतर रूप तन्मात्र उत्पन्न झालें. तेजापासून सूर्य, अग्नि वगैरे शाखांची उत्पत्ति झाली. तेजोरूप बनलेला परमात्मा 'मी जलरूप आहें', अशी भावना करतांक्षणींच जलरूपानें भासूं लागला. पाण्यामध्यें जी मधुरता अनुभवास येते, तें रस तन्मात्राचें स्वरूप होय. संकल्पानें जलरूप झालेली परमात्मसत्ताच भावनेनें पृथ्वी झाली व तीच सत्ता गंध तन्मात्र बनली. भावी ब्रह्मांडाचें तें बीज असून मनुष्यादि प्राण्यांचे आकार त्याच्या शाखा होत.

अशा रीतीनें आकाशादि भूतें त्या परमात्म्यापासून उत्पन्न होतात. परंतु उत्पन्न होतात असें म्हणण्यापेक्षां तो परमात्मा केवळ आपल्या भावनेनें (इच्छेनें) हीं सूक्ष्म भूतें बनतो. त्यापासून पुढें स्थूल सृष्टि कशी निर्माण होते, याचा विचार करूं.

### स्थूल सृष्टि.

आपल्या भावनेनें परमात्मा तन्मात्ररूप बनल्यानंतर त्यापासून निर्माण झालेलीं आकाशादि भूतें पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें एकमेकांशीं अशा रीतीनें मिसळून गेलीं आहेत कीं, प्रलयाचे वेळीं सर्व साकार वस्तूंचा नाश होईपर्यंत त्यांचें शुद्ध स्वरूप उपलब्ध होत नाहीं. या पंचमहाभूतांच्या मिश्रणालाच वेदान्त शास्त्रामध्यें 'पंचीकरण'* असें नांव दिलें आहे.

---

* पंचीकरण

द्विधा विधाय चैकैकं चतुर्धा प्रथमं पुनः ।
स्वस्वेतरद्वितीयांशैर्योजनात्पंच पंच ते ॥ (पंचदशी १-२७)

पंचमहाभूतांच्या प्रत्येकाचे दोन दोन भाग करून त्यांपैकीं प्रत्येकाच एक अर्धा भाग तसाच ठेवून दुसऱ्या अर्ध्या भागाचे चार भाग करून

अशा रीतीनें मिश्रित झालेल्या महाभूतांपासून पुढें स्थूलसृष्टि निर्माण झाली. सारांश, चिद्रूप परमात्मा आपल्या स्पंदशक्तीनें म्हणजेच संकल्पानें शब्दादि तन्मात्रें बनून स्वतः निराकार असूनहि साकार जगद्रूप झाला आहे. तन्मात्र हें स्थूलसृष्टीचें बीज आहे. परमात्म्याशीं तद्रूप असलेली मायाशक्ति हें तन्मात्रांचें बीज आहे.

अशा तऱ्हेनें हें जेवढें म्हणून स्थूल दृश्य उपलब्ध होत आहे, तें सर्व या त्रिगुणात्मक मायेचेंच स्वरूप आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. येथें जे प्रकृतीचे तीन गुण सत्त्व, रज व तम असे सांगितले आहेत, ते एक-मेकांत मिसळून नऊ प्रकारचे झाले आहेत, म्हणून माया गुणभेदानें नऊ प्रकारें विभक्त झाली आहे. उदाहरणार्थ ऋषी, मुनि, सिद्ध, नाग, विद्याधर व देव हा या मायेचा सात्त्विक भाग आहे. या सात्त्विक भागांतील नाग, विद्याधर हे तम आहे, म्हणजे तामस सात्त्विक होत. मुनि व सिद्ध हे रज आहे म्हणजे राजस सात्त्विक होत व हरादि देव हें सत्त्व आहे म्हणजे शुध्द सात्त्विक होत. हरिहरादि शुध्दसात्त्विक असल्या-मुळें त्यांची जो उपासना करतो तो मुक्त होतो.

---

आपल्याहून इतर भूतांच्या ठेविलेल्या अर्ध्या भागाशीं खालील कोष्टकांत दर्शविल्याप्रमाणें तें मिळविलें कीं पंचीकरण तयार होतें.

| | आकाश | वायु | तेज | पाणी | पृथ्वी |
|---|---|---|---|---|---|
| | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ |
| आकाश ($\frac{१}{२}$) | o | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ |
| वायु ($\frac{१}{२}$) | $+\frac{१}{८}$ | o | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ |
| तेज ($\frac{१}{२}$) | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | o | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ |
| पाणी ($\frac{१}{२}$) | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | o | $+\frac{१}{८}$ |
| पृथ्वी ($\frac{१}{२}$) | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | $+\frac{१}{८}$ | o |
| पंचीकृत पंचमहाभूतें. | १ | १ | १ | १ | १ |

सारांश, मायाच ह्या सर्व दृश्य जगाचा विस्तार करते, म्हणून हें सर्व जगत् मायाच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीमत् भागवत स्कंध ११, अध्याय ३ मध्यें सर्व जगाचें वर्णन करून नंतर

एषा माया भगवतः सर्गस्थित्यंतकारिणी ॥ १६ ॥

" उत्पत्ति स्थिति लय करणारी ही भगवंताची माया होय," असें सांगितलें आहे. यावरून असें दिसून येतें कीं, जग हें मायेचें कार्य आहे. परमार्थदृष्ट्या माया म्हणून खरोखर कांहीं नाहींच; व मायेचें कार्य जो प्रपंच तोहि मिथ्या होय. एक ब्रह्म मात्र सत्य आहे. हा अध्यात्मशास्त्राचा सिध्दांत आहे. आतां या सिध्दांताला प्रमाण काय म्हणून जर कोणी विचारील तर वसिष्ठ सांगतात:—

अत्र प्रमाणं वेदांता गुरवोऽनुभवस्तथा ॥ ३-२१-३५

" वेदांत ( उपनिषदें ) हें त्याचें मुख्य प्रमाण होय. 'अहं ब्रह्मास्मि' हा आत्मसाक्षात्कार ज्याच्या कृपेनें होतो, तो गुरु हें दुसरें प्रमाण; आणि अखेरीस आपला स्वतःचा अनुभव-( आत्मप्रतीति ) हें तिसरें प्रमाण होय. "

हा सिद्धांत जोंपर्यंत चांगला पटत नाहीं, तोंपर्यंत शास्त्रवचनावर व गुरूपदेशावर विश्वास ठेवून राहणेंच श्रेयस्कर होय. या मायारूपी नदींतून तरून जाण्याला आत्मज्ञानावांचून दुसरा उपाय नाहीं व हें आत्मज्ञान अध्यात्मशास्त्रांतील ज्ञानानेंच प्राप्त होत असल्यामुळें, शास्त्रज्ञानहि आवश्यक आहे. शास्त्रज्ञानानें मायेचें स्वरूप असत् आहे, असें ध्यानांत येतें. असें समजलें कीं, मायेचा आपोआपच नाश होतो. वास्तव ही माया कोठून उत्पन्न झाली ? कशी उत्पन्न झाली ? इत्यादि विचार करणें म्हणजे स्वप्नांतील पाहिलेल्या पुरुषाच्या कुलगोत्राचा तपास करण्यासारखेंच आहे ! वास्तव ही माया मला कशी नाहींशी करितां येईल, याचाच प्रथम विचार करणें जरूर आहे.

## अविद्या.

या मायेलाच वसिष्ठांनीं अविद्या असें म्हटलें आहे. ह्या अविद्येपासून सर्व तऱ्हेचे अनर्थ निर्माण करणारी संवेदना, भावना, वासना आणि कलना अशीं चार प्रकारचीं बीजें उत्पन्न झालेलीं आहेत. ह्या बीजांचें स्वरूप असें आहे:—

( १ ) संवेदना:—इंद्रियांनीं विषयांचा उपभोग घेणें.

( २ ) भावना:—विषय दूर झाला असतां त्याच्या गुणांचें चिंतन करणें.

( ३ ) वासन:—चित्तांत त्याचाच दृढ संस्कार होणें.

( ४ ) कलना:—त्या वासनेमुळें मरण कालींहि त्या विषयांचें स्मरण होणें.

वरील बीजांपैकीं संवेदना व भावना हीं सर्व दोषांचीं मुख्य कारणें आहेत. त्यांतल्या त्यांत संवेदनेपेक्षां भावना ही महान् अनर्थ आहे. या संसारात वासनेमुळेंच प्रवृत्त होणारे लोक उत्तरोत्तर अधिक अनर्थांत पडतात. अशी ही विषयवासना क्षीण होण्यासाठीं विषयांतील दोषांचें चिंतन करणें व त्यायोगें अंगीं वैराग्य संपादन करणें हाच मुख्य उपाय सांगितला आहे.

### अविद्येच्या नाशाचा उपाय.

ज्या अविद्येमुळें आपण ह्या दृश्य जगाला सत्य मानीत आहोंत, ती अविद्या तिच्या खऱ्या स्वरूपाचें ज्ञान झाल्यावरच नाहींशी होत असते, असें वसिष्ठ सांगतात:—

अविद्यैवमविज्ञाता चिरानन्ताऽवभासते ॥
परिज्ञाता तु नास्त्येव मृगतृष्णानदी यथा ॥ नि. उ. १६०-८.
यथोदिते दिनकरे क्वापि याति तमस्विनी ॥
तथा विवेकेऽभ्युदिते क्वाप्यविद्या विलीयते ॥ ३-११४-९.
एवमालोक्यमानैषा क्वापि याति पलायते ॥
असद्रूपा ह्यवस्तुत्वात् दृश्यते ह्यविचारणात् ॥ नि. पू. १०-३६

यांचा भावार्थः—ही अविद्या जोंपर्यंत कळली नाहीं तोंपर्यंत ती चिरकाल अनंत अशी भासत रहाते. पण एकदां का तिचें स्वरूप कळलें म्हणजे मृगजलाच्या नदीप्रमाणें ती तात्काळ नाहींशी होते. सूर्याचा उदय झाल्यावर रात्र जशी कोठें तरी विलीन होऊन जाते, त्याप्रमाणें विवेकाचा उदय होतांच अविद्या कोठें तरी विलीन होऊन जाते; कारण ही अविद्या तत्त्वतः खरी नसल्यामुळें जोंवर हिचा विचार केला नाहीं, तोंवरच ही भासत रहाते. ”

आतां ही दृश्य भ्रमरूप अविद्या कोणची ? व ती कशी नाहींशी होते ? हें वसिष्ठ सांगतातः—

भोगेष्वनास्थमनसः शीतलामलनिर्वृतेः ॥
छिन्नाशापाशजालस्य क्षीयते चित्तविभ्रमः॥ नि. पू. २–३६.

ज्याच्या मनांत विषयोपभोगाविषयीं अनास्था उत्पन्न झाली आहे, ज्याला शीतल व शुद्ध शांति प्राप्त झाली आहे व ज्यानें आशापाशाचें जाळें तोडलें आहे, त्याच्या चित्तांत असलेला दृश्य जगाचा भ्रम ( अविद्या ) शांत होतो. ”

हा दृश्य भ्रम नाहींसा होतो, म्हणजे त्याचा नाश होतो, ही समजूत वसिष्ठांच्या दृष्टीनें बरोबर नाहीं. आपल्याला खऱ्या वस्तूचा नाश करितां येत नाहीं व खोट्या वस्तूचा नाश करणें ह्या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. म्हणून जगामध्यें नाश म्हणून कांहीं नाहीं. याविषयीं वसिष्ठांचा अभिप्राय पुढील श्लोकांत दिला आहेः—

यदस्ति नाम तत्रैव नाशानाशक्रमोभवेत् ॥
वस्तुतो यच्च नास्त्येव नाशःस्यात्तस्य कीदृशः ॥ ३–२१–५८.
रज्वां सर्पभ्रमे नष्टे सत्त्ववोधवशात्सुत ॥
सर्पो न नष्ट उत्पन्नो वेत्येवं कैव सा कथा ॥ ३-२१-५९

“ जें वस्तुतः खरें असेल त्याच्या ठिकाणीं ‘ नाश किंवा अनाश ’ या कल्पना संभवतील, पण वस्तुतः जें मुळींच नाहीं त्याचा नाश कसा होणार ? रज्जूवर सर्पाचा भ्रम होतो, पण सर्पाला अधिष्ठानभूत असलेल्या रज्जूचें

साक्षात् ज्ञान झालें असतां सर्पभ्रमाचा निरास होतो, म्हणजे सर्प नष्ट झाला कीं पळून गेला वगैरे प्रश्नच उरत नाहींत."

ज्याप्रमाणें रज्जूचें ज्ञान झालें म्हणजें सर्प दिसत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञान झाल्यावर भौतिक देह ज्ञान्याच्या सतत अनुभवास येत नाहीं. 'हा प्रपंच पूर्वी होता, पण आतां तो ज्ञानानें बाधित झाला आहे' हें म्हणणें सुद्धां तत्त्वदृष्ट्या बरोबर नाहीं. कारण तो प्रपंच वास्तविक नाहींच, तर ब्रह्मच आहे. तें पूर्ण ब्रह्मच सर्वत्र आहे. देहादि पंच कोशांच्या आंत बाहेर तेंच पूर्ण ब्रह्म व्यापून राहिलें आहे, असाच सर्व अध्यात्मशास्त्रांचा सिद्धांत आहे, असें वसिष्ठ सांगतातः—

वस्तुतस्तु जगन्नास्ति सर्वं ब्रह्मैव केवलम् ॥ ४-१०-३०.
सिद्धांतोऽध्यात्मशास्त्राणां सर्वापन्हव एव हि ॥
नाविद्याऽस्तीह नो माया शांतं ब्रह्मेदमक्रमम् ॥ नि. पू. १२५-१.

"वास्तविक पहातां जगत् म्हणून कांहींच नाहीं, तर केवल ब्रह्मच सर्व रूपानें भासत आहे. सर्व द्वैत जगाचा निरोध हाच सर्व अध्यात्मशास्त्रांचा सिद्धांत आहे येथें अविद्या नाहीं व माया नाहीं, तर हें केवल शांत व ज्याच्या स्वरूपाचें आकलन शास्त्रांनाहि करितां येत नाहीं, असें नित्य अपरोक्ष ब्रह्मच आहे."

अशा ह्या अविद्येचा नाश कोणत्या क्रमानें होत जातो याचें वर्णन वसिष्ठांनीं नि. प्र. उ. सर्ग १२ मध्यें केलें आहे, त्याचा सारांश असा आहे.

अविद्येचा अर्धा भाग सज्जनांच्या संगतीनें नाश पावतो; तिचा चतुर्थांश भाग अध्यात्मशास्त्रार्थाच्या परिशीलनानें नाहींसा होतो; व राहिलेला चवथा भाग स्वतःच्या प्रयत्नानें मिळालेल्या आत्मानुभवानें नाहींसा होतो. हे तीन उपाय जर एकदम प्राप्त झाले, तर एकदम अविद्या नाहींशी होते. पण जर ते क्रमाक्रमानें प्राप्त झाले तर ती अविद्या क्रमाक्रमानें नाहींशी होते.

---

# प्रकरण २६ वें.

## विवर्तवाद.

जगाचें स्वरूप समजावून देण्याकरितां प्रकरण २२ मध्यें जे चार प्रकारचे विचार सांगण्यांत आले आहेत, त्यांपैकीं पहिले तीन विचार म्हणजे अजातवाद, सर्वब्रह्मवाद व मायावाद यांचें विवरण मागील तीन प्रकरणांत सविस्तर करण्यांत आलें. आतां ह्या प्रकरणांत विवर्तवादासंबंधानें विचार करण्यांत आला आहे. ब्रह्म निर्विकार असूनहि त्याच्या ठिकाणीं जो विकार म्हणजे अन्यथाभाव म्हणजेच जें या जगाचें भान होतें तो ब्रह्माचा विवर्त आहे असें वसिष्ठांचें म्हणणें आहे; व हें सिद्ध करण्याकरितां प्रथम ब्रह्म निर्विकार आहे असें वसिष्ठ सांगतातः—

> ब्रह्मतत्त्वमिदं सर्वमासीदस्ति भविष्यति ॥
> निर्विकारमनाद्यंतं नाविद्यास्तीति निश्चयः ॥ नि. पू.४८-११.

" हें सर्व दृश्य जगत् उत्पत्तीच्या पूर्वी निर्विकार, आदिअंतरहित ब्रह्मरूप होतें, आतांहि ब्रह्मरूप आहे आणि पुढेंहि ब्रह्मरूपच रहाणार. त्याच्यामध्यें अविद्या मुळींच नाहीं असा निश्चय आहे. "

ब्रह्मामध्यें विकार म्हणजे अन्यथाभाव संभवत नाहीं, म्हणून त्याच्यापासून कार्याचा आरंभ होऊं शकत नाहीं, मग हें जगत् कसें झालें ? या प्रश्नाचें उत्तर देण्याकरितां कारणाच्या ठिकाणीं कार्याचा उद्भव पांच प्रकारें होत असतो, असें शास्त्रकार मानतात. हे पांच प्रकार खालीं दिले आहेत, त्याचा अर्थहि त्याच्या पुढेंच दिला आहेः—

( १ ) अतिरोहित प्रागवस्थाः—जसा मातीचा घट. घट तयार झाला तरी त्याची पूर्वावस्था ( माती ) लुप्त होत नाहीं, तर घटांतहि ती असते.

( २ ) प्रतिबद्ध प्रागवस्थाः—पाण्याचें बर्फ बनलें कीं, त्याची पूर्वावस्था म्हणजे पातळपणा प्रतीत होत नाहीं.

( ३ ) प्रच्छन्न प्रागवस्थाः—जसा रज्जूचा सर्प. सर्पाचा भास झाला कीं, त्याची पूर्वावस्था-रज्जुपणा त्यांत गुप्त रहातो.

(४) अप्रच्छन्न प्रागवस्थाः—जसा जलाचा तरंगभाव. जलामध्यें लाट या कार्याचा उद्भव झाला, तरी त्याची पूर्वावस्था म्हणजे जलत्व गुप्त होत नाहीं. त्यांतहि तें दिसत असतें.

(५) विनष्ट प्रागवस्थाः—जसा दुधाचा दहीपणा. दही झालें कीं, त्याची प्रागवस्था–दूधपणा नष्ट होतो.

या पांच प्रकारांच्या कार्योद्भवापैकीं शेवटच्यामध्यें म्हणजेच पांचव्या प्रकारामध्यें जन्मादिभाव, विकार व परिणाम आहेत. बाकीचे चार प्रकार हे विवर्तांचेच भेद आहेत.

दूध, व्रीहि (भात) इत्यादिकामध्यें दुधाचें दहीं होणें, वरील साल काढतांच तांदूळ होणें इत्यादि कार्य होतें. एकदां असें कार्य बनलें म्हणजे पुनः त्याला कारणावस्था प्राप्त होत नाहीं. अर्थात् त्या कार्यांत दूध वगैरे कारणांच्या स्वरूपाचाच बदल होऊन जातो. त्यालाच विकार, संस्कार, परिणाम इत्यादि म्हणतात. दही आपलें दधित्व सोडून पुनः दूध या भावास प्राप्त होत नाहीं. पण ब्रह्माच्या ठिकाणीं जगल्लक्षण कार्य तसें नाहीं. कारण जगाच्या आदि, अंतीं व मध्येंहि तें निर्मल ब्रह्मच रहातें. त्यामुळें त्याला दुधादिकाप्रमाणें विकारत्व नाहीं तर मग परमाणूपासून द्व्यणुकादि कार्यांचा आरंभ जसा होतो, तसा ब्रह्मापासून जगाचा आरंभ होतो, असें म्हणावें तर आदिअंतरूप, देशतः परिच्छेदानें (संकोचानें) व क्रिया संयोग इत्यादि विभागांनीं युक्त असलेल्या अवयवांमध्येंच अवयवीचा प्रारंभ होऊं शकतो. ब्रह्म आदिअंतरहित आहे, त्यामुळें त्याच्यामध्येंहि आरंभ संभवत नाहीं. म्हणून ब्रह्माच्या ठिकाणीं जगत् विवर्तरूपानें भासत आहे असें वसिष्ठ सांगतातः—

समस्यार्थतयोर्येयं दृश्यते विकृतिः क्षणात् ॥
संविदः संभ्रमं विद्धि नाविकारेऽस्ति विक्रिया ॥ नि. पू. ९९-५.

"कार्योत्पत्तीच्यापूर्वी व कार्याच्या नाशानंतर सम–एकरूप असलेल्या पदार्थाची जी क्षणांत विकृति–अन्यथाभाव–प्रतीत होतो तो संवेदिचा विवर्त आहे. कारण जें विकाररहित असतें, त्याच्या ठिकाणीं विकार संभवत नाहीं.

**यादृगाद्यंतयोर्वस्तु तादृगेव तदुच्यते ॥ ***
**मध्ये यस्य यदन्यत्वं तदबोधाद्विजृंभितम् ॥** नि. पू.४९-७.

" जी वस्तु उत्पत्तीपूर्वी व नाशानंतर जशी असते, तशीच ती सांगितली जाते; आणि त्या वस्तूचेमध्यें जें अन्यत्व ( विपरीत भाव ) भासतें, तें अज्ञानामुळेंच होय. " यावरून सृष्टीच्यापूर्वी व प्रलयानंतर एक ब्रह्मच असतें, म्हणून स्थितिकालींहि ब्रह्म आहे, जग वगैरे कांहीं नाहीं, असा वसिष्ठांनीं निश्चय केला आहे. असें जरी असलें तरी हें दृश्य जगत् जें भासत आहे, त्याला कारण '**संविदःसंभ्रमं विद्धि**' यावरील श्लोकपादांत सांगितल्याप्रमाणें भ्रम, अध्यास किंवा विवर्त आहे असें वसिष्ठांनीं स्पष्ट सांगितलें आहे. अध्यासाचें लक्षण रामगीतेंतहि × स्पष्ट केलें आहे.

## अध्यासाचें स्वरूप.

अध्यासामध्यें मुख्य दोन पदार्थ असतात. एक अधिष्ठान व दुसरें अध्यस्त. **अधिष्ठान** म्हणजे ज्या ठिकाणीं अज्ञानानें दुसऱ्या पदार्थाचा भास होतो अशी वस्तु; व **अध्यस्त** म्हणजे अधिष्ठान सदृश भासलेली दुसरी वस्तु. उदाहरण रज्जूसर्पाचें. याठिकाणीं रज्जू हें अधिष्ठान व त्यावर भासलेला साप हा अध्यस्त. हा जो सापाचा भ्रम होतो त्यास चार कारणें असावीं लागतात. १ **अधिष्ठान**, २ **दोष**, ३ **संप्रयोग**, व ४ **सादृश्य.**

( १ ) **अधिष्ठानः**—याचें व्याख्यान वर केलेंच आहे.

( २ ) **दोषः**—दोष तीन प्रकारचा आहे.

---

* मांड्युक्योपनिषदावरील, " आदावंते च यन्नास्ति वर्तमानेऽपितत्तथा " ( ४-३१ ) या गौडपादीय कारिकेंत अशाच अर्थाची व्याख्या केलेली आहे.

× **यदन्यदन्यत्र विभाव्यते भ्रमात् ।**
**अध्यासमित्याहुरमुं विपश्चितः ॥** रामगीता ३७.

" एका पदार्थाच्या ठिकाणीं दुसऱ्या पदार्थाचें जें भ्रमानें भान होतें, त्यास **अध्यास** असें विद्वान लोक म्हणतात."

एक प्रमाणदोषः—म्हणजे चक्षुरिंद्रियामध्यें असणारा दृष्टीचा मंदपणा, म्हणजेच समोर असलेले पदार्थ स्पष्ट न दिसणें.

दुसरा प्रमेयदोषः—म्हणजे पदार्थ स्पष्ट न दिसणाऱ्या स्थलीं पडलेलें असणें.

तिसरा प्रमातृदोषः—पहाणाऱ्याच्या ठिकाणीं लोभ, मोह, भय इत्यादि असणारे दोष.

( ३ ) संप्रयोग :—म्हणजे द्रष्ट्याला अधिष्ठानाचें सामान्यरूपानें ज्ञान व विशेषरूपानें अज्ञान असावें लागतें. कारण अधिष्ठान जी दोरी तिचें जर स्पष्ट दर्शन म्हणजे विशेषरूपानें ज्ञान होईल तर सापाची भ्रांति होणार नाहीं.

( ४ ) सादृश्यः—म्हणजे पूर्वी पाहिलेल्या अधिष्ठान वस्तूसारख्या दुसऱ्या पदार्थाची स्मृति. पूर्वी ज्यानें साप पाहिलेला असेल त्यालाच दोरीच्या ठिकाणीं सापाची भ्रांति होणें शक्य आहे. ज्यानें कधींहि साप पाहिलेला नाहीं त्याला सापाचा भ्रम कधींच होणार नाहीं. म्हणूनच आचार्यांनीं "स्मृतिरूपः परत्र पूर्वदृष्टावभासः" असें अध्यासाचें मोठें मार्मिक लक्षण केलें आहे. ( पण हें लक्षण कार्याध्यासाचें आहे. )

## दोन प्रकारचे अध्यास.

आचार्यांनीं एक निरुपाधिक व दुसरा सोपाधिक असे दोन प्रकारचे अध्यास मानले आहेत.

निरुपाधिक अध्यासाचें उदाहरण. 'शुक्तिका हि रजतवदवभासते.' म्हणजे शिंपेच्या ठिकाणीं कोणत्याहि उपाधीशिवाय जसें रजत ( रुपें ) भासतें. तसें निरुपाधिक आत्म्याच्या ठिकाणीं जगत् भासतें.

सोपाधिक अध्यासाचें उदाहरण. "एकश्चंद्रः सद्वितीयवत्" डोळ्यावर बोट धरून चंद्राकडे पाहिलें असतां दोन चंद्र दिसतात. या ठिकाणीं बोट ही उपाधि आहे. त्याप्रमाणें मायेच्या योगानें परमात्मा एक असून दोन ( ईश्वर व जीव ) किंवा अनेक भासतात. आचार्यांच्यासारखे वसिष्ठ पक्के मायावादी नसल्यामुळें वरील दोन अध्यास न मानतां त्यांनीं फक्त

एकत्व म्हणजे निरुपाधिक मानला आहे, आणि या निरुपाधिक अध्यासाला रज्जुसर्पाचा दृष्टांत दिला आहे.

### अध्यासाचें निरूपण करणाऱ्या ख्याती.

आचार्यांचे वेळीं अध्यासाचें निरूपण करणाऱ्या एकंदर पांच ख्याती होत्या, त्या अशाः—

आत्मख्यातिरसत्ख्यातिरख्यातिः ख्यातिरन्यथा ॥
तथाऽनिर्वचनख्यातिरित्येतत्ख्यातिपंचकम् ॥

( विज्ञानवादी योगाचार बौद्धांची ) आत्मख्याति, ( शून्यवादी ) माध्यामिक बौद्धांची ) असत्ख्याति, ( मीमांसकांची ) अख्याति, ( नैय्यायिकांची ) अन्यथाख्याति व ( अद्वैतवेदांत्यांची ) अनिर्वचनीयख्याति. आचार्यांनीं अनिर्वचनीय ख्याति मानली आहे व इतर वाद्यांनीं मानलेल्या वरील चारी ख्यातींचें युक्तीनें खंडन केलें आहे.

वसिष्ठांनीं आचार्यांच्या अनिर्वचनीय ख्यातीला आत्मख्याति असें नांव दिलें आहे व इतर वाद्यांच्या चार ख्याती ह्या अलौकिक आत्मख्यातीच्या विभूती मानल्या आहेतः—

आत्मख्यातिरसत्ख्यातिरख्यातिः ख्यातिरन्यथा ॥
इत्येताश्चिचमत्कृत्या आत्मख्यातेर्विभूतयः ॥ नि. उ. १६६-९

" आत्मख्याति, असत्ख्याति, अख्याति व अन्यथाख्याति या सर्व चिच्चमत्काररूप ख्याती, आत्मख्यातीच्या विभूती आहेत.

### वसिष्ठांच्या आत्मख्यातीचें स्वरूप.

वसिष्ठांनीं मानलेल्या आत्मख्यातीचा अर्थ आत्मा हीच ख्याति असा केला आहे. ख्याति म्हणजे प्रतीति किंवा ग्रहण, म्हणजेच आत्म्याला आपल्या स्वरूपाहूनहि भिन्न नसणाऱ्या जगाची येणारी प्रतीति हीच आत्मख्याति होय. ह्या आत्मख्यातीची व्याख्या वसिष्ठांनीं खालील श्लोकांत केली आहेः—

कथनोक्त्या तु रहितां समग्रेणास्तकल्पनाम् ॥
विनोत्तरपदार्थेन स्वात्मख्यातिमिमां विदुः ॥ नि. उ. १६६-४

स्फुरणवाचकख्यातिशब्दानें रहित पूर्णपणें कल्पनाशून्य व ख्याति या शब्दानें व त्याच्या अर्थानें विरहित असा स्वयंप्रकाश आत्मा हाच आत्मस्वरूपभूत अशा जगाची प्रतीति येत असल्यामुळें त्याला आत्मख्याति असें विद्वान लोक समजतात.

ह्या आत्मख्यातीचें स्वरूप समजावून देण्याकरितां वसिष्ठांनीं एक लहानसें शिलाख्यान नि. प्र. उत्तरार्धांत सांगितलें आहे [ह्या ग्रंथाचा भाग दुसरा–योगवासिष्ठांतील सुरस गोष्टी–गोष्ट ४७ वी पृष्ठ २८० ]

ही वसिष्ठांनीं मानलेली आत्मख्याति विज्ञानवादी योगाचार बौद्धांच्या आत्मख्यातीहून भिन्न आहे. सारांश, **आत्माच जग आहे, ही आत्मख्याति होय.** अशा ह्या आत्मख्यातीच्या इतर वाद्यांच्या ख्याती विभूती आहेत, असें ( वर दर्शविल्याप्रमाणें ) वसिष्ठांचें म्हणणें आहे. याचेंच स्पष्टीकरण असें कीं, आत्मख्यातीच्याच आधारानें इतर वाद्यांनीं आपआपल्या ख्यातींच्या कल्पना केल्या आहेत. अर्थात् वसिष्ठांच्या मतानें आत्माच सर्व जगत् आहे. ' आत्मैवेदंसर्वम् ' अशी श्रुतीहि याला प्रमाण आहे. आत्मा स्वयंप्रकाश असल्यामुळें तो वाद्यांना अभिमत असलेल्या आत्मख्यातिव्यतिरिक्त इतर ख्यातींनीं प्रख्यापित होतो, हें म्हणणें अयोग्य आहे. ख्याति, अख्याति इत्यादि शब्दरचना मिथ्या आहे; कारण स्वयंप्रकाश आत्म्यामध्यें दृश्याप्रमाणें कल्पनामात्ररूप अशा अख्याति, अन्यथाख्याति, आत्मख्याति व इतर ख्याती हे सर्व चिच्चमत्कार आहेत असेंच वसिष्ठांचें म्हणणें आहे; व हें तात्त्विकदृष्ट्या पाहिल्यास योग्यच दिसतें. आत्मज्ञानी हा अनिर्वचनीय आत्मस्वरूप झालेला असतो, म्हणून त्याच्या ठिकाणीं हा वरील ख्यातीरूप कल्पनाभ्रम मुळींच संभवत नाहीं.

या दृष्टीनेंच वसिष्ठांनीं ह्या सर्व दृश्य जगाच्या पूर्वी ब्रह्मच होतें, आतांहि म्हणजे त्याचा भास होत असतांहि ब्रह्मच आहे; व पुढेंहि म्हणजे ज्ञानानें जगताचा भास होण्याचें बंद झाल्यावर किंवा महाप्रलय झाल्यावर ब्रह्मच रहाणार. जग वगैरे कांहीं नाहीं, असें मोठ्या युक्तीनें सिद्ध केलें आहे.

# प्रकरण २७ वें.

## चारी वादांचा उपसंहार.

प्रकरण २२ मध्यें जगाचें स्वरूप समजावून देण्याकरितां चार वाद सांगितले व पुढें प्रकरण २३ ते २६ मध्यें त्या वादांचें सविस्तर वर्णन करण्यांत आलें. त्यावरून असें दिसून येतें कीं, सर्वब्रह्मवाद अजात वादामध्यें अंतर्भूत होऊं शकतो; कारण दृश्य जग मुळींच उत्पन्न झालें नसून केवल ब्रह्मच आहे, हें जें अजातवादाचें तत्त्व तेंच सर्व ब्रह्मवादाचें आहे. म्हणजेच ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' याचा वाक्यार्थ असा आहे कीं, ' सर्वं खलु इदं न किंतु ब्रह्मैव ' म्हणजे हें सर्व दृश्य जग नाहींच तर ब्रह्मच आहे. सारांश, ' कांहींच उत्पन्न झालें नाहीं ', किंवा ' सर्व ब्रह्म आहे, ' या दोन्ही वादांचा अर्थ एकच असल्यामुळें हे दोन्ही वाद तत्त्वतः एकच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून सर्वब्रह्मवाद अजातवादांत अंतर्भूत होऊन शेवटीं अजातवादच शिल्लक रहातो.

विवर्तवाद हा मायावादामध्यें अंतर्भूत होतो व मायावाद शिल्लक रहातो. आतां अजातवाद व मायावाद यांत काय फरक आहे त्याचा विचार करूं:—

| (१) अजातवाद. | (२) मायावाद. |
|---|---|
| (१) जगाची सत्ता मुळींच मानीत नाहीं. | (१) जगाची सत्ता मानतो पण ती व्यवहारापुरती. |
| (२) जगाची प्रतीति मुळींच मानीत नाहीं. | (२) जगाची प्रतीति मानतो पण ती भ्रामक आहे, असें मानतो. |
| (३) जग झालेंच नाहीं. | (३) भ्रामक जगाची उत्पत्ति अनिर्वचनीय. |
| (४) जग नाहींच. | (४) जग दिसत असून नाहीं. |

या दोन्ही वादांतील दर्शविलेला फरक जरी प्रत्यक्ष दिसत असला तरी

थोडासा तात्त्विकदृष्ट्या विचार केला असतां अजातवादांत मायावाद अंतर्भूत होतो, कारण माया म्हणजे ' या मा सा माया ' ( जी नाहीं ती माया ) असाहि अर्थ होतो. या दृष्टीनें मायावाद म्हणजे अजातवादच आहे. मायावाद ही नुसती अज्ञजीवांची फसवणूक आहे असें दिसतें. वस्तुतः माया म्हणून कांहीं पदार्थ नाहीं, व हें जग मायेनें निर्माण झालें आहे म्हणून तेंहि मुळींच नाहीं, अशाच होऊन शेवटीं अजातवाद शिल्लक रहातो. ' मी प्रपंचांत पडलो आहे,' हा जोंवर भ्रम आहे, तोंवर त्यांतून सुटण्याकरितां मोक्षोपायहि अवश्य पाहिजेत. पण तत्त्वतः हा दृश्य प्रपंचच नाहीं, असें समजल्यावर मोक्षाचें उपाय संपादन करण्याची आवश्यकता रहाते कोठें !



# प्रकरण २८ वें.

## जगत् कल्पनामात्र आहे.

वसिष्ठांनीं सर्व जगत् कल्पनामात्र आहे, असें मोठ्या युक्तीनें ठरवून त्याला पारमार्थिकदृष्ट्या मुळींच सत्यता नाहीं असा शेवटीं निष्कर्ष काढला आहे. या जगामध्यें जागेपणीं आपल्याला जे पदार्थ अनुभवाला येतात, ते सर्व खरे आहेत असें वाटतें; पण तात्त्विकदृष्टीनें विचार केल्यास ते सर्व कल्पनामात्र आहेत. म्हणूनच त्या सर्व पदार्थांना स्वप्नांतल्या पदार्थांइतकीच किंमत आहे, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे. आतां स्वप्नांतील अनुभवाला येणारे पदार्थ तरी कल्पनामात्र कसे आहेत? याचा विचार करूं. कोणतेंहि कार्य निर्माण होण्याला एक उपादान व दुसरें निमित्त अशीं कारणें मानण्यांत येत असतात. त्यांपैकीं या ठिकाणीं स्वप्नरूप कार्याला शबलब्रह्म (जीव) हें उपादान कारण व वासनायुक्त मन व सौषुप्त अज्ञान अशीं दोन निमित्त कारणें मानलेलीं आहेत. 'दृष्टश्रुताभ्यां स्वप्नः' या स्वप्नाच्या केलेल्या व्याख्येप्रमाणें जाग्रतीमध्यें पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टींचे मनावर झालेले संस्कारच स्वप्नाच्या रूपानें परिणाम पावतात, असें अनुभवास येतें. स्वप्नामध्यें एक मनच कार्यकारी असतें व तें स्वतःच आपल्या कल्पनेनें द्रष्टा व दृश्य बनून सर्व तऱ्हेचा व्यवहार करीत रहातें. त्याचप्रमाणें जागेपणीं देखील ज्या पदार्थांचा, आपण अनुभव घेतो, ते देखील आपल्या मनाच्याच कल्पनेनें बनलेले आहेत असें वसिष्ठांचें म्हणणें आहे. स्वप्नाप्रमाणें जाग्रत् ही अवस्थाच आहे व त्या अवस्थारूप कार्यालाहि स्वप्नावस्थेप्रमाणें शबलब्रह्म (जीव) हें उपादान कारण व वासनायुक्त मन व आत्मस्वरूपाचें अज्ञान अशीं दोन निमित्त कारणें मानलेलीं आहेत. म्हणून वसिष्ठ म्हणतात कीं, जाग्रत् व स्वप्न या दोन्ही अवस्थांमध्यें भेद नाहीं.

इदं जाग्रदयं स्वप्न इति नास्त्येव भिन्नता ।
सत्ये वस्तुनि निःशेषसमयोर्यानुभूतितः ॥ नि उ. १६१-२४
नैतदेवामितिस्वप्नप्रबोधात्प्रत्ययो यथा ॥
मृत्वामुत्र प्रबुद्धस्य जाग्रति प्रत्ययस्तथा ॥ नि. उ. १६१-२५

" हीं जाग्रत् व हें स्वप्न ही जी भिन्नता भासते, ती अनुभवदृष्ट्या सत्यब्रह्माचें ठिकाणीं समान असलेल्या ह्या दोन अवस्थांमध्यें मुळींच नाहीं. म्हणजेच दोन्ही अवस्थेमधील पदार्थ ब्रह्मदृष्ट्या किंवा परमार्थदृष्ट्या असत् आहेत. स्वप्नांतून जागें झाल्यावर स्वप्नांतील पदार्थ खरे नाहींत, हें जसें अनुभवास येतें, त्याप्रमाणें दुसऱ्या शरीरामध्यें जाग्रत झालेल्या व पूर्वजन्मांची स्मृति झाली आहे अशा गर्भस्थ पुरुषाला पूर्वजन्मांतील जाग्रतीचा प्रत्ययहि मिथ्या भासतो." यावरून जाग्रत् व स्वप्न अशा तात्त्विकदृष्ट्या मुळींच भेद करतां येत नाहीं. शिवाय वेदांतशास्त्रामध्यें मूलतः जी अविद्या मानली आहे, ती आवरण विक्षेपात्मक अशी फक्त दोन तऱ्हेचीच आहे. म्हणजे एक विक्षेप म्हणजे दृश्यपदार्थाचें भान होणें व दुसरें आवरण म्हणजे पदार्थाचें भान न होणें. याशिवाय अविद्येचा तिसरा प्रकार मानिलेला नाहीं. यावरून दृश्य पदार्थ स्वप्नामध्यें भासोत किंवा जाग्रतीमध्यें भासोत. त्यांचें भासणें हें एकाच स्वरूपाचें असल्यामुळें वसिष्ठांनीं या दोन्ही अवस्था वेदांतशास्त्राप्रमाणें एका विक्षेपाच्या मानून त्या दोहोंमध्यें भासणारें सर्व दृश्य जगत् कल्पनामात्र आहे असें ठरविलेलें आहे.

आतां स्वप्न व जाग्रत् या दोन्ही अवस्था जर तत्त्वतः एकच आहेत तर त्यांमध्यें जो भेद मानला जातो त्याचें कारण वसिष्ठ असें सांगतात कीं:—

**जाग्रत्स्वप्नस्वरूपभेदो न स्थिरास्थिरते विना ॥**
**समः सदैव सर्वत्र समस्तोऽनुभवोऽनयोः ॥ ४-१९-११**

" जाग्रतीचा अनुभव अगदीं स्वप्नांतल्या अनुभवासारखाच असतो. फक्त जर कोणता फरक असेल तर तो म्हणजे जाग्रतावस्थेंत स्थिरता असते. तशी स्वप्नामध्यें नसते." स्वप्नसुद्धां स्वप्नसमयीं कांहीं वेळ स्थिर असल्यामुळें, तें त्या वेळेपुरतें जाग्रत्च असतें. तसेंच जाग्रत् हें जाग्रतकाळीं अस्थिर असेल, तर तें स्वप्नच होय. आपल्याला देखील जागेपणीं एखादी गोष्ट थोडा वेळ अनुभवाला आली, तर आपण त्या वेळीं म्हणतो कीं "हें स्वप्न तर मीं पहात नाहीं ना ?" म्हणून वसिष्ठांचें म्हणणें असें आहे कीं, जाग्रत् व स्वप्न दोन अवस्था भिन्न नाहींत. याशिवाय आपण एका जन्मामध्यें मरेपर्यंत शेकडों अनियत स्वप्नें जशीं पहातों त्याप्रमाणें

अज्ञानदशेमध्यें निजलेल्या जीवाला कल्पांत होईपर्यंत शेंकडों अनियत जागृतींचा अनुभव येतो. एकाच जन्मांत उत्पन्न होऊन नाश पावणारीं अनेक स्वप्नें जशीं आठवतात, त्याप्रमाणें ज्ञानी सिद्ध पुरुषाला शेंकडों जन्मांचें स्मरण होतें. लीलेला अशा तऱ्हेचें आपल्या पूर्वीच्या अनेक जन्मांचें स्मरण झालें होतें. (या ग्रंथाचा भाग २ रा, गोष्ट ३ री, पृष्ठ २४). यावरून जाग्रत् व स्वप्न या दोन्ही अवस्थेंतील दृश्य जगत् कल्पनामात्र आहे असें दिसून येतें. हेंच तत्त्व मांडुक्योपनिषदावरील गौडपादांच्या कारिकेंत स्पष्ट दाखविलें आहेः—

> चित्तकालाहि येऽन्तस्तु द्वयकालाश्च ये बहिः ॥
> कल्पिता एव ते सर्वे विशेषो नान्यहेतुकः ॥ ( २-१४ )

" कल्पनाकालीं असणारे मनांतील ( स्वप्नांतील ) पदार्थ व कल्पना-कालाहून अन्य कालींहि असणारे जाग्रतावस्थेंतील पदार्थ कल्पितच आहेत. बाह्य पदार्थ प्रत्यभिज्ञेचे विषय होतात. हा जो बाह्य पदार्थांमध्यें विशेष आहे तो ते पदार्थ कल्पिलेले नाहींत या कारणानें नाहीं; कारण कल्पित पदार्थहि त्यावेळेपुरते प्रत्यभिज्ञेचे विषय होतात.

विवेक चूडामणींत १७०–१७१ या श्लोकामध्यें याच सिद्धांताचें समर्थन करून "अतो मनःकल्पित एव पुंसः संसार एतस्य न वस्तुतोऽस्ति" हा जीवाचा सर्व संसार मनःकल्पित आहे, खरा नाहीं, असें सिद्ध केलें आहे. जें मनुष्याच्या आंत असतें तेंच त्यांच्या दृष्टीला बाह्य जगांत दिसतें, असें वसिष्ठ सांगतातः—

> द्यौः क्षमावायुराकाशं पर्वताः सरितोदिशः ॥
> अंतकरणतत्त्वस्य भागावहिरिव स्थिताः ॥ ५-५६-३५

" अंतरिक्ष, पृथ्वी, वायु, आकाश, पर्वत, नद्या, दिशा वगैरे सर्व पदार्थ अंतःकरणतत्त्वाचे भाग असून ते जणुं बाहेर असल्याप्रमाणें दिसतात."

' पर्वताः ' या शब्दाच्या ऐवजी ' सागराः ' या एका शब्दभेदाशिवाय भर्तृहरीच्या वाक्यपदीय या ग्रंथांत ( ३–७–४१ ) वरील श्लोक जसाचा तसाच आला आहे.

जगांतील अंतर्बाह्य सर्व पदार्थ ( म्हणजे आंत भासणारे व बाहेर प्रत्यक्ष उपलब्ध होणारे ) एक मनच बनून गेलेलें आहे असें वसिष्ठांचें म्हणणें आहे:—

> अर्थ एव मनस्कारो मन एवार्थरंजनम् ॥नि. उ. ४३-३७
> सबाह्याभ्यंतराकारमर्थानर्थमयात्मकम् ॥ नि. उ. ४३-३९
> मन एवस्फुरत्यर्थनिर्भासं व्याततम् तथा ॥
> नास्त्यर्थमनसोर्द्वित्वं यथा जलतरंगयो : ॥ नि. उ. ४३-४०

" बाह्य पदार्थ हाच मनःसंकल्प व मन हाच विषयांचा आभास होय. आंतील व बाहेरील सर्व पदार्थांच्या आकारानें एक मनच स्फुरण पावतें. म्हणून दृश्य पदार्थ व द्रष्टा मन यांच्यामध्यें जलतरंग याप्रमाणें द्वित्व नाहीं. यास्तव दोहोंपैकीं एक नाहींसा झाला कीं, दोघांचा नाश होतो. असा शेवटीं वसिष्ठांनीं निष्कर्ष काढला आहे.

सर्व जग कल्पनामात्र आहे, एवढेंच सांगून वसिष्ठ स्वस्थ बसत नसून जगांतील देश, काल, द्रव्य, नियति, स्थिरता, आधिभौतिकता वगैरे सर्व कल्पनामात्र आहे, असेंहि वसिष्ठांनीं सांगितलें आहे. हें तत्त्व वसिष्ठांनीं दृष्टांतांच्या सहाय्यानें सिद्ध केलें आहे. जगांतील वस्तुमात्राला मनाच्या कल्पनेशिवाय निराळें असें सत्यस्वरूप मुळींच नाहीं. वरील देश द्रव्यादिकां-संबंधानें वसिष्ठांनीं केलेला विचार खालीं दिला आहे:—

देशः—

> चिदणुर्यत्रभातोऽसौ देशोमितिमुपागतः ॥ नि. उ. ७३-१९

" जेथें हा चिदणु ( जीव ) भासला तो देश या परिच्छेदास प्राप्त झाला व पुढें त्याचें लहानमोठेंपण मनाच्या कल्पनेवर सर्वस्वीं अवलंबून राहिलें आहे. मनोराज्यांतील आणि स्वप्नांतील कल्पनामध्यें, तसेंच चित्ताच्या नानाविध लीलांमध्यें पुष्कळ योजनांचा प्रदेश गाईच्या पावला-एवढा भरतो. जसा एखादा हुशार चित्रकार लहानशा कागदावर किंवा कागदावर अनेक मैल लांबी रुंदीचा प्रदेश काढून दाखवितो. त्यांत दाख-विलेलीं चित्रें लहान असलीं तरी अगदीं हुबेहूब खरीं असल्यासारखींच

दिसतात. अशा तऱ्हेची स्वप्नांतील जगाची स्थिति आहे, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. म्हणूनच देशाच्या लहानमोठ्या प्रमाणांना मनाच्या कल्पनाव्यतिरिक्त निराळा सत्यपणा नाहीं.

काल व क्रियाः—

(चिदणुः)यदाभातस्तदा कालो यद्भानं तत्क्रिया स्मृता ॥नि.उ. ७३-१९

" जेव्हां हा चिदणु ( जीव ) भासला तो काल या परिच्छेदास प्राप्त झाला जें भान तीच क्रिया. " हा कालसुद्धां कल्पनामात्र आहे. कारण सूर्याच्या काल्पनिक गतीवरून मास, ऋतु वगैरे कल्पना मनुष्यानें केलेल्या आहेत.

देशदैर्घ्यं यथा नास्ति कालदैर्घ्यं तथांगने ॥ ३-१०-२८

" प्रदेशामध्यें जसा खरा दीर्घपणा नाहीं, तसा कालामध्येंहि नाहीं. " कालाचा अनुभव सर्वांना केव्हांच सारखा येत नाहीं. तर तो प्रत्येकाच्या मनःस्थितीवर अवलंबून असतो. ज्याचा आपल्या स्त्रीपासून वियोग झाला आहे, अशा मनुष्याला एक दिवस लोटला तरी तो त्याला वर्षाप्रमाणें वाटतो व स्त्रीची भेट झाली असतां तिच्या सहवासांत वर्षेंच्या वर्षें क्षणाप्रमाणें गेलीं असें वाटतें.

द्रव्य ( दृश्य ):—

उपलब्धं विदुर्द्रव्यम् द्रष्टृताप्युपलब्धता ॥
आलोकनं दर्शनता दृगालोकनकारणम् ॥ नि. उ.७३-२०.

" जें उपलब्ध झालें म्हणजे ज्याचा अनुभव आला तें द्रव्य होय. अनुभव घेणें या भावास प्राप्त झाला तो द्रष्टा असें म्हटलें आहे. पहाणें हेंच दर्शन व पहाण्याचें जें निमित्त ती दृक् म्हणजे दृष्टि होय. "

नियतिः—

नियत्यनियती ब्रूहि कीदृशे स्वप्नसंविदि ॥ नि. पू. १४८-२०

"मिथ्या स्वप्नावस्थेंत नियति व अनियति कोणत्या प्रकारची असणार ?"

स्थिरताः—नियतीप्रमाणेंच स्थिरतेची स्थिति आहे. जगामध्यें अनुभवाला येणारें दृश्य जगत् सत्य आहे. मनाच्या कल्पनेचा त्याच्याशीं कांहीं एक संबंध नाहीं, असें कांहीं वेळ वाटतें. परंतु स्वप्नांतील जगाविषयीं विचार केल्यावर असें आढळून येतें कीं, स्वप्न असेंपर्यंतच तेथील जग असतें व स्वप्नद्रष्टा त्या अवस्थेला तीं असेपर्यंत स्थिर मानतो; पण आपणाला माहींत आहे कीं, स्वप्न अस्थिर आहे, म्हणून तेथील जगहि अस्थिरच आहे. स्वप्नांतील जगाच्या स्थिरतेप्रमाणेंच जाग्रतींतील जगाची स्थिरता आहे. असें वसिष्ठ सांगतातः—

स्वप्ने निमग्नधीर्जंतुः पश्यति स्थिरतां यथा ॥
सर्गस्वप्ने मग्नबुद्धिः पश्यति स्थिरतां तथा ॥ नि.पू.६१-२९.

" *स्वप्नांत ज्याची बुद्धि निमग्न झाली आहे असा जंतु जशी स्वप्नाची* स्थिरता पहातो, त्याप्रमाणें सर्गरूपस्वप्नांत म्हणजे जाग्रतींत ज्याची बुध्दि *निमग्न झाली आहे असा तो सृष्टींतहि* स्थिरता पहातो. "

आधिभौतिकताः—

आतिवाहिकमेतेषां भूतानां विद्यते वपुः ॥
अत्राधिभौतिकभ्रान्तिरसत्यैव पिशाचिका ॥ नि.उ.६८-३४.

" या सर्व भूतांचें एक आतिवाहिकच शरीर आहे. आधिभौतिक शरीराची कल्पना केवळ पिशाच कल्पनेप्रमाणेंच आहे."

वास्तविकपणें विचार केला तर आधिभौतिक म्हणून आत्म्याव्यतिरिक्त कांहीं वस्तु नाहींच. सशाच्या शिंगाला जितकी सत्यता आहे, तितकीच पंच महाभूतांना आहे. समष्टि आतिवाहिक देहानें म्हणजे ब्रह्मदेवानें ज्या दृश्याचें पूर्वी अवलोकन केलें त्यालाच भ्रांतीमुळें पृथ्वी वगैरे नांवें दिलेलीं आहेत. यालाच आधिभौतिक असें म्हणतात. सारांश, रज्जूच्या ठिकाणीं सर्पाची भ्रांति व्हावी, त्याप्रमाणें आतिवाहिक देहाच्या ठिकाणीं 'मी आधिभौतिक देह' आहे असा भ्रम झाला आहे. म्हणून वसिष्ठ म्हणतात कीं,

देहोविद्यानतोऽस्माकं स्वप्नवन्नतु तत्त्वतः ॥ नि. उ. ५२-११.

" ह्या स्थूल देहाची सिद्धि विज्ञानाच्या (मनाच्या) आधीन आहे. त्यामुळें स्वप्नदेहाप्रमाणें जाग्रदेह काल्पनिक आहे, सत्य नव्हे." देहाच्या सत्तेची सिद्धि मनाच्याच योगानें होते, दुसऱ्या कशानें होत नाहीं. यास्तव मन देहाच्या पूर्वींच सिद्ध असलें पाहिजे, तरच तें देहाला निर्माण करील.

अशा तऱ्हेनें निरनिराळ्या युक्तीप्रयुक्तींनीं, वसिष्ठांनीं सर्व जगत् मनाच्या कल्पनेचाच खेळ आहे असें सांगून त्याला तात्त्विकदृष्ट्या तिळमात्र सत्यता नाहीं हेंच शेवटीं सिद्ध केलें आहे.



# प्रकरण २९ वें.

## मनाचें स्वरूप.

वासिष्ठामध्यें मनाच्या संबंधानें फारच मोठा विचार केला आहे. मनाच्या उदयास्तावर सर्व जगाची सृष्टि, स्थिति व प्रलय अवलंबून आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मनाची शुद्धि व अशुद्धि यावर प्रत्येक जीवाचा मोक्ष व बंध अवलंबून आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सर्व कांहीं मनाच्याच स्थितीवर अवलंबून आहे. अशा मनाला वसिष्ठांनीं

चित्तं नाभिः किलास्येह मायाचक्रस्य सर्वतः ॥ ५-४९-४०.

" या माया चक्राला (जगाचा) नाभि असें म्हटलें आहे. " आतां वसिष्ठांनीं निश्चित केलेल्या मनाच्या स्वरूपाचा विचार करूं. तात्त्विकदृष्ट्या विचार केला असतां मनाचें स्वरूप असें कांहींच नाहीं. शून्य आणि जड आकाशाप्रमाणें केवळ नांवापलीकडे त्याला निराळें अस्तित्व नाहीं. परमार्थतः मन म्हणून जरी कांहीं नाहीं, तरी शास्त्रीयदृष्ट्या मनाच्या स्वरूपाचा विचार करावयाचा झाला, तर प्रत्यक्ष पुढें असणाऱ्या सत्य पदार्थांच्या स्मृतीमधील असत्य पदार्थांच्या आकाराचा जो भास उत्पन्न होत असतो, तेंच मन होय. याशिवाय मन म्हणून कांहीं निराळें नाहीं.

यदर्थप्रतिभानं तन्मनइत्यभिधीयते ॥
अन्यन्न किंचिदप्यस्ति मनोराम कदाचन ॥ ३-४-४२.

" निराकार चित्स्वरूपाच्या ठिकाणीं होणारा जो आकाराचा भास तेंच मन होय. " याप्रमाणें मनाचें सामान्य स्वरूप सांगून आतां त्याचें विशेष स्वरूप सांगतात:—

संकल्पनं मनो विद्धि संकल्पात्तन्नभिद्यते ॥ ३-४-४३.

" संकल्प करणें हेंच मन होय. संकल्पाहून मन निराळें नाहीं. "

अनंतस्यात्मतत्त्वस्य सर्वशक्तेर्महात्मनः ॥
संकल्पशक्तिरचितं यद्रूपं तन्मनः विदुः ॥ ३-९१-३.

" अनंत, सर्वशक्तिसंपन्न अशा महात्म्या आत्मतत्त्वापासून प्रथम निष्पन्न झालेल्या संकल्पशक्तिरूपालाच मन म्हणतात. " समुद्रापासून उत्पन्न होणाऱ्या तरंगाप्रमाणें परब्रह्मापासून मन उत्पन्न झालें आहे. तरंग हा जलाचा विकार आहे. त्याचप्रमाणें मन हा ब्रह्माचा अज्ञानामुळें होणारा विकार होय. जल लाटेच्या रूपानें भासत असतें, त्याचप्रमाणें ब्रह्म हें मनाच्या रूपानें भासतें. अर्थात् द्वैतदृष्टीनें तें ब्रह्ममय नाहीं, परंतु अद्वैतदृष्टीनें पहातां तें ब्रह्ममयच आहे. ब्रह्म हें वस्तुतः सर्वशक्तिसंपन्न असल्यामुळें जगाचें कारण म्हणून सांगण्यांत येतें. सर्व शरीरांमध्यें या ब्रह्माची चिच्छक्तिच व्यापून राहिली आहे. हीच चिच्छक्ति वायूमध्यें स्पंदरूपानें, पाषाणामध्यें जडरूपानें, पाण्यामध्यें द्रवरूपानें, अग्नीमध्यें तेजोरूपानें, आकाशामध्यें शून्यरूपानें आणि संसारामध्यें सर्व वस्तूंच्या भावरूपानें आविर्भूत होते. अशा तऱ्हेनें त्या ब्रह्माच्या अनंत शक्ती दशदिशांमध्यें प्रविष्ट झाल्याचें दिसून येतें. ब्रह्मच मनाच्या रूपानें भासत असल्यामुळें वरील सर्व शक्ती मनाच्याच आहेत, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. मन आंत बाहेर निरनिराळीं कर्में करीत असल्यामुळें त्याला निरनिराळीं नांवें प्राप्त झालीं आहेत असें वसिष्ठ सांगतातः—

> **यथा गच्छति शैलूषो रूपाण्यलं तथैव हि ॥**
> **मनो नामान्यनेकानि धत्ते कर्मांतरं व्रजत् ॥ ३-९६-४३.**
> **चित्राधिकारवशतो विचित्राविकृताभिदाः ॥**
> **यथा याति नरः कर्मवशाद्याति तथा मनः ॥ ३-९६-४४.**

" ज्याप्रमाणें निरनिराळीं रूपें धारण करणाऱ्या एखाद्या नटाला निरनिराळीं नांवें दिलीं जातात, त्याप्रमाणें मन हें निरनिराळीं कर्में करूं लागलें म्हणजे तें निरनिराळीं नांवें धारण करतें. निरनिराळ्या अधिकारामुळें आणि निरनिराळ्या कर्मांमुळें एकाच मनुष्याला कारकून, बाकनीस, दिवाण इत्यादि नांवें दिलीं जातात, त्याचप्रमाणें कार्यभिन्नतेमुळें मनाला भिन्न भिन्न नांवें प्राप्त होतात. " मनालाच बुद्धि, अहंकार, चित्त, इत्यादि नांवें प्राप्त झालीं आहेत.

(१) मनः—ब्रह्मचैतन्य कल्पनात्मक अविद्येमुळें कलंकित झाल्यासारखें होऊन म्हणजे विकास पावून 'हें असें असेल, कीं हें असें नसेल' असें जेव्हां संशयात्मक होतें तेव्हां त्याला 'मन' असें म्हणतात.

(२) बुद्धिः—ह्या वरील दोन वैकल्पिक कोटींपैकीं कोणत्या तरी एका कोटीवर जेव्हां मनाच्या वृत्तीचें निश्चित अनुसंधान होऊं लागतें, तेव्हां त्या वृत्तीला इयत्ताग्रहणक्षम (ही गोष्ट अशीच आहे असें समजण्यास समर्थ) 'बुद्धि' असें म्हणतात.

(३) अहंकारः—मिथ्या अभिमानानें मन स्वतः आपल्याच सत्तेची कल्पना करून 'अहम्' अशी भावना धारण करतें त्यावेळीं त्याला 'अहंकार' असें म्हटलें आहे.

(४) चित्तः—हेंच मन एकाद्या बालकाप्रमाणें कोमल बनून घटकेंत हा विषय टाकून द्यावा आणि घटकेंत त्या विषयाचें स्मरण करावें असें चाळे करूं लागतें तेव्हां त्याला चित्त हें नांव प्राप्त होतें.

(५) कल्पनाः—हें मन इच्छित विषयाची भावना करूं लागतें, तेव्हां त्याला 'कल्पना' असें म्हणतात.

(६) कर्मः—दर्शन, श्रवण, स्पर्श करणें, रसग्रहण करणें इत्यादिकाच्या योगानें जेव्हां हें मन शरीराच्या बाहेर व्यवहार करूं लागतें, तेव्हां त्याला 'कर्म' असें म्हणतात.

सारांश, स्नान, दान इत्यादि क्रिया करीत असतां मनुष्याकडे त्या त्या क्रियांचें कर्तृत्व येतें, त्याप्रमाणें निरनिराळ्या कार्यांमध्यें गुंतलेलें मन, बुद्धि, अहंकार, चित्त, कल्पना व कर्म इत्यादि भिन्न भिन्न नांवांनीं संबोधिलें जातें. वासिष्ठामध्यें कित्येक ठिकाणीं मनाच्या करितां हीं विविध नांवें योजलेलीं आहेत. पण हें न समजल्यामुळें वाचकांचा मोठा घोटाळा होतो. म्हणून हें ह्या ठिकाणीं मुद्दाम नमूद केलें आहे.

## मनाच्या स्वरूपाविषयीं वाद्यांचीं मतें.

मनाच्या स्वरूपासंबंधानें निरनिराळीं मतें प्रसिद्ध आहेत. त्यांतील कांहीं मतें पुढें दिलीं आहेत.

(१) नैय्यायिक आणि वैशेषिकः—मन हें अणूरूप असून तें साक्षात्कारांचें कारण म्हणजे साधन आहे.

( २ ) सांख्यः—मन हें अकरा इंद्रियांपैकीं एक अंतरिंद्रिय असून षोडश विकारांपैकींच तो एक विकार आहे

( ३ ) चार्वाकः—देहच आत्मा आहे असें अनुसंधान करणें म्हणजेच मन होय.

( ४ ) जैमिनी मताचे कांहीं मीमांसकः—मन हें विभु द्रव्य आहे आणि कांहीं म्हणतात तें अन्नमय आहे.

( ५ ) अर्हत ( जैन ):—शरीराएवढाच चिद्रूप जीव आहे, तोच अहंकार, त्याचा विषयाभिलाष म्हणजेच मन.

( ६ ) बौद्धः—अहंकारानें बुद्धीच्या योगानें ग्रहण केलेल्या बाह्य पदार्थांचा अनुभव म्हणजेच मन होय.

( ७ ) पंचरात्रानुयायीः—वासुदेव नामक परमात्म्यापासून संकर्षण नामक जीव उत्पन्न होतो व हा जीव म्हणजेच अहंकार. ह्या अहंकारापासून प्रद्युम्ननामक मन उत्पन्न होतें.

अशा तऱ्हेनें निरनिराळ्या तर्ककुशल वाद्यांनीं आपआपल्या दर्शनामधून मनासंबंधानें निरनिराळीं मतें प्रदर्शित केलीं आहेत. परंतु तीं प्रमाणशुद्ध नाहींत. त्यांचीं तीं मतें व्यासादि संप्रदायप्रवर्तकांनीं मान्य केलेलीं नाहींत. वाटेल तिकडे भटकणाऱ्या कुतर्कशक्ती त्यांना सत्यनिर्णयाविषयीं यथार्थ ज्ञान होऊं देत नाहींत. ह्यामुळें त्यांचे ते निर्णय सांप्रदायिकांना ( अनुभवप्रमाणवाद्यांना ) विशेष महत्त्वाचे वाटत नाहींत. ज्यांची इमारत केवळ तर्कावरच उभारली गेली आहे, अशा निर्णयकारांच्या मनांत आपल्या मताच्या आग्रहाची जडता उत्पन्न होते. तेव्हांच त्यांच्या मतामध्यें वैचित्र्य किंवा विरोध उत्पन्न होतो. ह्यामुळें एकाचें म्हणणें दुसऱ्याला पटत नाहीं आणि दुसऱ्याचें तिसऱ्याला पटत नाहीं. या तीव्र विरोधाचें कारण श्रद्धाजाड्य हेंच होय. प्रत्येक वादी आपला पक्ष तेवढाच खरा अशा अभिमानाला बळी पडतो; व मतामतांमधील तंटेबखेड्यांचें बीज हेंच होय.

परंतु वसिष्ठ म्हणतात, कीं, आमचा सिद्धांत स्वकपोलकल्पित नसून तो श्रुतींच्या * पायावर उभारलेला आहेः—

> उर्णनाभाद्यथा तंतुर्जायते चेतनाज्जडः ॥
> नित्यप्रबुद्धात्पुरुषाद्ब्रह्मणः प्रकृतिस्तथा ॥ ३-९६-७१

"चेतन अशा कोळ्यापासून जडतंतू उत्पन्न होतात, त्याप्रमाणें नित्य ज्ञानरूप पुरुषापासून ( ब्रह्मापासून ) प्रकृति ( मन ) उत्पन्न होते," असा श्रुतींचा ठाम सिद्धांत आहे. तस्मात् निरनिराळ्या वादांच्या अविद्यावश मनानें स्थापित केलेले मनाचे भेद वास्तविक खरे नसून ते सर्व चिद्रूप परब्रह्माचेच पर्यायशब्द आहेत. सारांश, चित्स्पंदरूप मनालाच बुद्धि, अहंकार, चित्त इत्यादि नांवें प्राप्त झालीं आहेत.

### मन जडच आहे कां नुसतें चेतन आहे ?

असें म्हणणें हा वाद नसून वितंडवाद आहे. शिवाय जड किंवा अज्ञ मनुष्याचें मन जड बनतें; याचें कारण तें वासनामलानें मलिन झालेलें असतें. परंतु ज्याचें मन वासनारहित झालेलें आहे, त्याला आपलें मन चेतन आहे असा अनुभव येतो. अज्ञ आणि तज्ज्ञ अशा दोघांच्याहि कल्पना खोट्या नाहींत, तर त्यांच्या ह्या कल्पना त्यांच्या स्वतःच्या अनुभवानुसार असल्यामुळें खऱ्याच आहेत; परंतु वसिष्ठांचें म्हणणें असें आहे कीं,

> न चेतनं न च जडं यदिदं प्रोत्थितं मनः ॥ ३-९६-६१
> अजडं हि मनोराम संसारस्य न कारणम् ॥
> जडं चोपलधर्मापि संसारस्य न कारणम् ॥ ३-९६-६३
> न चेतनं न च जडं तस्माज्जगति राघवं ॥
> मनः कारणमर्थानां रूपाणामिव भासनम् ॥ ३-९६-६४

---

* यथोर्णनाभिः सृजते गृण्हतेच यथा पृथिव्यामोषधयःसंभवंति ।
यथासतः पुरुषान्निशलोमात्के तथा क्षरात्संभवतीह विश्वम् ॥

( मुंडकोपनिषत् १–७ )

"वास्तविक हें निर्माण झालेलें मन चेतन नाहीं व जडहि नाहीं, कारण चेतन मन (ब्रह्मरूप असल्यामुळें) संसाराचें कारण केव्हांच होत नाहीं. तसेंच दगडासारखें जड मनहि संसाराचें कारण होत नाहीं. नील-पीतादि रूपांना पंचीकरण होण्यापूर्वींच शुद्ध तेज जसें प्रकाशित करीत नाहीं, पण तेंच पंचीकरणानंतर पृथ्वी वगैरे भूतांनीं मिश्रित होऊन मलिन झाल्यावरच जसें नीलपीतादि रूपांना प्रकाशित करितें, तसें नुसतें चेतन किंवा जड मन जगांतील विषयांना प्रकाशित करीत नसून तें जेव्हां जड चेतनात्मक बनतें तेव्हांच तें या संसाराचें कारण होतें." म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

जडाजडं मनोविद्धि संकल्पात्मवृहद्वपुः ॥
अजडं ब्रह्मरूपत्वाजडं दृश्यात्मतावशात् ॥ ३-९१-३१

"वास्तव मन जड चेतनात्मक आहे आणि संकल्प करीत रहाणें हा त्याचा स्वभाव आहे. ब्रह्मरूप असल्यामुळें तें चेतन आहे व दृश्य विषयाशीं तद्रूप होतें म्हणून तें जडहि आहे."

अशा तऱ्हेनें मनाच्या स्वरूपाचा विचार करून त्याच्या नाशासंबंधानें वसिष्ठांनीं विचार केला आहे. तो असा आहे.

## मनोनाश

चिच्छक्तेः स्पंदशक्तेश्च संबंधः कल्प्यते मनः ॥ ५-१३-८८

"आत्म्याची संवेदन (चेतन) शक्ति व प्राणाची (जड) स्पंदशक्ति यांचा संबंध झाला म्हणजेच त्या ठिकाणीं मनाची कल्पना उदित होते." परंतु चिद्रूप आत्मा आणि अचिद्रूप (जड) प्राण परस्परविरोधी असल्यामुळें त्यांचा संबंध होणें शक्य नाहीं. अशा स्थितींत मनाची तरी सिद्धि कशी होणार? आतां चिद्रूप आत्मा आणि प्राणस्पंद एकरूप आहेत असें मानलें तर मग एक चैतन्यसत्ताच आहे, असें ठरून मनाचें अस्तित्वच बाधित होतें. वास्तव या जगांत मन नाहींच व असा तत्त्वज्ञानानें अनुभव येणें यालाच मनोनाश असें म्हणतात. वास्तविक पाहिल्यास मन हें संकल्पा-मुळेंच उत्पन्न होतें. कारण संकल्प केला नाहीं, म्हणजे त्याचा कोठें ठाव-ठिकाणहि लागत नाहीं. मन हें जड व निःस्वरूप असल्यामुळें सर्वदा तत्त्वतः

मेलेलेंच आहे. परंतु या मृत मनाकडून अनेक अज्ञ जीव मारले जातात ! ही मूर्खपरंपरा विचित्र म्हणावयाची ! ज्याला आत्मा नाहीं, देह नाहीं, आधार नाहीं व आकारहि नाहीं, अशा तऱ्हेच्या मनोरूपी पाशांत अडकून मूर्खांना भक्षण करण्यांत येतें, तो पाश खरोखरच अजब होय ! आतां एखादा विवेकी शूर मनुष्य मनाला मारतो, असेंहि म्हणण्यांत येतें. परंतु वस्तुतः ही कल्पनाच व्यर्थ आहे. कारण ज्याचें अस्तित्वच नाहीं, त्याला कोणा आणि कसें मारणार ? केवळ संकल्पानें उत्पन्न झालेलें मन शोधूं लागलें तर सांपडत नाहीं, अशा स्थितींत त्याच्या ठिकाणीं दुसऱ्याचा पराभव करण्याची शक्ति कोठून असणार ? परंतु, अत्यंत चंचल अशा या मनाकडून सर्वांचा पराजय व्हावा, ही सामान्य माया नव्हे, तर महामायावी म्हणून प्रसिद्ध असलेल्या मयासुरालाहि निर्माण करणारी अशी ही अगाध माया आहे !

या वरील विवेचनावरून मनाचा वस्तुतः अभावच आहे, असें लक्षांत घेऊन मनाच्या अस्तित्वाची उगीच कल्पना करून आत्मघात करूं नये. 'हें सर्व ब्रह्म आहे' व 'मीहि ब्रह्म आहे' असा साक्षात्कार झाला म्हणजे मिथ्या मन आपोआपच नाहींसें होतें.

## मनोनाशाचे उपाय.

'हा देह मी व हें माझें व हें सर्व दृश्य सत्य आहे,' असें समजून जगांतील शब्दस्पर्शादि विषयांच्या उपभोगाविषयीं उत्पन्न होणारी आसक्ति या सर्वांस संकल्प असें म्हणतात. व 'हें सर्व ब्रह्म आहे' असें अनुसंधान करणें यालाच संकल्पत्याग असें म्हणतात. यावरून मन म्हणजे संकल्परूपच आहे. 'संकल्पविकल्पात्मकं मनः' ही जी वेदांतशास्त्रांत त्याची व्याख्या केली आहे, ती अक्षरशः खरी आहे. संकल्पांचा सर्वथा क्षय झाल्यावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें मुक्तस्थिति प्राप्त होणें शक्य नाहीं. याविषयीं वसिष्ठांनीं स्थिति प्र. सर्ग ५३ मध्यें मोठा कळकळीचा उपदेश केला आहे. त्याठिकाणीं वसिष्ठ म्हणतातः—रामा ! तूं हजारों वर्षें तपश्चर्या करीत बसलास, आपलें शरीर शिळेवर आपटून घेऊन त्याचे तुकडे तुकडे करून टाकलेस, अग्निकाष्ठें भक्षण केलीस, वडवानलांत प्रवेश केलास, एखाद्या

उंच पर्वतावरुन आपला कडेलोट करून घेतलास, अथवा तलवारीच्या तीक्ष्ण पात्यानें आपलें शरीर कापून टाकलेस, तरी देखील त्याचा यत्किंचित्हि उपयोग नाहीं; इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष ब्रह्मा, विष्णु, महेश यांचें शिष्यत्व पत्करलेंस, साक्षात् परमदयाळु श्रीदत्ताचा उपदेश घेतलास, अथवा स्वर्ग, मृत्यु, पाताल यांपैकीं कोणत्याहि ठिकाणीं जाऊन राहिलास, तरीहि संकल्प-क्षयाशिवाय मुक्तीची आशा व्यर्थ आहे!

असा मोठा कळकळीचा उपदेश करून नि. प्र. सर्ग १ मध्यें

ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति मे ॥
असंकल्पः परं श्रेयः स किमंतर्न भाव्यते ॥ ११.

" संकल्प न करणें हेंच परमश्रेय आहे. तो आपल्या ठिकाणीं तुम्हीं कां करीत नाहीं? मी असें माझे हात वर करकरून घसा फोडून सांगत असतां माझें कोणीच ऐकत नाहीं." अशा तऱ्हेनें वसिष्ठांना संकल्प-त्यागाविषयीं किती कळकळ वाटत आहे हें दिसून येतें.

## मनोनाशाचे प्रकार.

मनाचा नाश दोन प्रकारचा आहे. एक सरूप व दुसरा अरूप. जीवन्मुक्ताच्या चित्ताचा नाश सरूप असतो. याचा अर्थ असा कीं, त्याला मन असतें, पण तें भर्जित बीजाप्रमाणें ज्ञानानें निर्वासन स्थितीला प्राप्त झालेलें असतें, म्हणून तें पुनर्जन्माला कारणीभूत होत नाहीं. तें जरी भासत असलें तरी तत्त्वतः नसल्यासारखेंच असतें. अशा मनाला तत्त्ववेत्ते मन असें न म्हणतां 'सत्त्व' असें म्हणतात. म्हणूनच वसिष्ठ सांगतात कीं,

ज्ञस्य चित्तं न चिताख्यं ज्ञचित्तं सत्त्वमुच्यते ॥ नि. पू. ४४-३०

"ज्ञान्याच्या चित्ताला चित्त असें न म्हणतां 'सत्त्व' असें म्हणतात." म्हणूनच जीवन्मुक्ताचा मनोनाश हा सरूप मनोनाश असें वसिष्ठांनीं म्हटलें आहे. आतां दुसरा जो अरूप मनोनाश सांगितला तो केवल विदेह मुक्ता-मध्येंच रहातो. विदेहमुक्त म्हणजे परमपावन निर्मल ब्रह्मपदच होय. म्हणून सर्वश्रेष्ठ गुणांचा आधार असें 'सत्त्व' या नांवाला प्राप्त झालेलें मन देखील त्या स्थितींत विलीन होऊन जातें. यास्तव विदेहमुक्ताच्याच ठिकाणीं हा सत्त्वक्षयरूप अरूप मनोनाश संभवतो.

# प्रकरण ३० वें.

## मनाचें सामर्थ्य.

समुद्रापासून उत्पन्न झालेल्या लाटेप्रमाणें परब्रह्माच्या ठिकाणीं भासमान झालेलें मन ह्या अखिल विश्वाचा विस्तार करितें. वसिष्ठांनीं हें मन सर्व शक्तिसंपन्न आहे असें सांगितलें आहे:—

स्वरूपं सर्वकर्तृत्वं च शक्तत्वं मनसोमुने ॥३-९१-१६
प्रतिभासमुपायाति यद्यदस्य हि चेतसः ॥
तत्तत्प्रकटतामेति स्थैर्यं सफलतामपि ॥ ३-९१-१७
सामान्यब्राह्मणाभूत्वा प्रतिभासवशात् किल ॥
ऐंदवाब्रह्मतां याताः मनसः पश्य शक्तताम् ॥ ३-९१-१८

" मनाचें स्वरूप सर्वकर्तृत्व व सर्वशक्तिमत्व असें आहे. ज्या ज्या गोष्टींविषयीं मन भावना करतें, ती ती गोष्ट उत्पन्न होते, स्थिर होते आणि सफलहि होते. सामान्य ब्राह्मण असूनहि केवळ दृढ भावनेच्या जोरावर इंदुब्राह्मणाचे मुलगे ब्रह्मदेवाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचले ( या ग्रंथाचा भाग २ रा, गोष्ट ५ वी ) यावरून मनाचें सामर्थ्य केवढें मोठें आहे पहा ! "

मनाचें सामर्थ्य असें अचाट आहे कीं, तें अतिशय जवळ असलेल्या पदार्थाला कल्पनेच्या योगानें सूर्यमंडलापर्यंत दूर नेऊन ठेवतें; आणि सूर्यमंडलाइतक्या दूर अंतरावर असलेल्या पदार्थाला क्षणांत आपल्या शेजारीं आणून सोडतें. आपल्या कल्पनेमुळें मन स्वतःला परक्यासारखेंच लेखतें आणि परक्याला स्वकीय बनवितें. वीतभर लांबीच्या वस्तूला मनाची कल्पनाशक्ति प्रचंड पर्वताकार बनविते. मनाचें हें अचाट सामर्थ्य ब्रह्मापासून त्याला प्राप्त झालें असून त्याच्या सत्तेमुळें अत्यंत उल्लसित होऊन तें एका निमेषांत नानाविध संसाराची रचना करितें आणि क्षणांत त्यांचा संहारहि करितें, नानाविध प्रकारांनीं शोभायमान होणारें हें स्थिरचरात्मक

अखिल विश्व ह्या मनापासूनच उत्पन्न झालें आहे. देश, काल, क्रिया, द्रव्य आणि शक्ति यांच्या योगानें मर्यादित झालेलें, आपल्या स्वाभाविक चांचल्यामुळें एखाद्या नटाप्रमाणें एका क्षणांत हें एक आकार टाकून दुसरा आकार धारण करितें. तें सत् वस्तूला असत् बनवितें; आणि असत्‌ला सत् बनवितें. तें लहानाला मोठें करतें व मोठ्याला लहान करितें. तें खऱ्याला खोटें करितें आणि खोट्याला खरें करितें. गोड पदार्थाला कडू करून टाकतें आणि शत्रूला मित्र बनवतें. अशारीतीनें तें आपल्या स्वतःच्या भावनेमुळें ज्या ज्या वेळीं जो जो अनुकूल किंवा प्रतिकूल विषय ग्रहण करितें, त्या त्या वेळीं त्याप्रमाणें हस्तपादादि इंद्रियसमुदाय हालचाल करूं लागतो. ज्याप्रमाणें आपल्या घरांत खेळत असलेलें बालक मातीचीं निरनिराळीं चित्रें करून त्यांची नानातऱ्हेनीं मांडणी करून ठेवितें, त्याप्रमाणें हें मन नानाविध संकल्पांच्या योगानें नानाविध चमत्कारांनीं भरलेल्या ह्या जगाची रचना करितें. नरदेहादि मृत्तिकेच्या निरनिराळ्या चित्रांच्या ठिकाणीं मनानें आपल्या कल्पनेनें निरनिराळ्या भावना केलेल्या असल्यामुळें हीं त्या चित्रांचीं स्वरूपें मनाच्या भावनेमुळें खरीं वाटत असलीं तरी तीं मिथ्याच आहेत. सर्व ऋतूंना उत्पन्न करणारा काल एखाद्या वृक्षाला निरनिराळीं रूपें देतो; त्याप्रमाणें हें चित्त या जगांतील पदार्थांचीं रूपें अनेक प्रकारांनीं बदलीत असतें. मनोराज्यांतील आणि स्वप्नांतील कल्पनामध्यें, तसेंच चित्ताच्या नानाविध लीलांमध्यें समुद्रसुद्धां गाईच्या पावलाएवढा भरतो. हें मन आपल्या भावनेमुळें क्षणाला कल्प आणि कल्पाला क्षण करून टाकतें, अशी स्थिति असल्यामुळें देशकालादिकांचा क्रम सर्वस्वीं मनाच्या आधीन आहे, असें ज्ञाते समजतात. आतां मनाचा वेग रजोगुणाच्या उत्कर्षामुळें वाढतो आणि तमोगुणाच्या उत्कर्षामुळें मंद होतो; तसेंच आहारादिकांच्या कमीजास्तपणामुळें मनाच्या सामर्थ्यामध्यें फरक पडत असतो. परंतु सर्व सृष्टि निर्माण करण्याचें त्याचें सामर्थ्य ह्यामुळें लुप्तप्राय होतें, असें नाहीं. उपासनेच्या जोरावर दीर्घकालानें कां होईना, पण अपेक्षित वस्तु निर्माण करण्याचें सामर्थ्य मनाच्या ठिकाणीं निःसंशय आहे. इष्ट वस्तूच्या प्राप्तीला कमी किंवा जास्ती वेळ लागणें ही गोष्ट मनोभावनेच्या तीव्रतेवर किंवा मंदतेवर अवलंबून आहे, म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

यथैतद्भावये त्स्वांतं तथैव भवति क्षणात् ॥
दृष्टांतोऽत्रैंदवाहल्याकात्रिमेंद्रादिनिश्चयाः ॥३-९१-५२

" मन जशी भावना करतें, तसें तें तत्क्षणीं होत असतें; इंदुब्राह्मणाचे मुलगे, अहल्या आणि कृत्रिम इंद्र ह्यांनीं मनानें केलेले दृढ निश्चय हीं उदाहरणें या सिद्धांताच्या समर्थनार्थ पुरेशीं आहेत." ऐंदवाख्यान आणि इंद्र आणि अहल्या ह्यांचें कथानक ह्या दोन गोष्टी या ग्रंथाच्या दुसऱ्या भागामध्यें सविस्तर दिल्या आहेत (गोष्ट ५ वी ६ वी). मनुष्याच्या चित्तांत जो निश्चय एकदां दृढमूल झाला त्याचें निवारण करण्याचें काम त्याच्यावांचून दुसऱ्या कोणालाहि करतां येणें शक्य नाहीं. हेंच तत्त्व ' इंदुब्राह्मणाचे मुलगे ब्रह्मदेव कसे झाले, ' या गोष्टींत विशद केलें आहे. दीर्घकालपर्यंत अभ्यास करून जो मनाचा दृढ निश्चय झालेला असतो, त्याचा नाश शापानें किंवा शरीराचा क्षय झाल्यानेंहि होत नाहीं. हें तत्त्व 'इंद्र व अहल्या' या आख्यानानें स्पष्ट केलें आहे.

## मनाचा दृढनिश्चय अभंग आहे.

मन म्हणजेच खरा पुरुष आहे. हा पांचभौतिक देह मनाचा केवळ कल्पित विस्तार आहे. शासनांचा अंमल शरीरावर होऊं शकतो; परंतु कोणत्याहि विषयाच्या भावनेमध्यें स्थिर झालेल्या मनावर कोणतींहि शासनें आपला पगडा बसवूं शकत नाहींत. ह्या जगांत अशा कोणत्या शक्ती आहेत कीं, ज्या दृढनिश्चयी मनाचा भेद करूं शकतील ? देह पुष्ट होवो किंवा त्याच्या चिंधड्या होऊन जावोत; भावनाभावित मन नेहमीं जशाच्या तसेंच असतें. दृष्टार्थीं तद्रूप झालेलें मन आपला ध्यास केव्हांहि सोडीत नाहीं. शरीराला बाह्यतः प्राप्त होणारीं सुखदुःखें मनानें केलेल्या दृढ भावनेला नाहींशी करण्याला समर्थ नसतात. सारांश, मनानें एकदां जो दृढनिश्चय केला तो कसल्याहि वरांनीं, शापांनीं, औषधांनीं, मंत्रांनीं किंवा अन्य कसल्याहि साधनांनीं ढळणें शक्य नाहीं. वर शापादिकांचे परिणाम देहावर पाहिजे ते होवोत; परंतु दृढनिश्चयी मन केव्हांहि अजिंक्यच रहाणार. म्हणून वसिष्ठ म्हणतात कीं,

यद्यद्रूपीठमभितो मनसि प्ररूढं
तद्रूपमेव पुरुषो भवतीह नान्यत् ॥
तद्बोधनादितरमत्र किलाभ्युपायं
शैलौघसेकमिव निष्फलमेव मन्ये ॥ ३-८८-२१

" ज्या पुरुषाच्या मनांत जी गोष्ट चिरप्ररूढ झाली असते, तो पुरुष तद्रूप होत असतो. अशा पुरुषाला वळविण्याला तत्त्वबोध हा एकच उपाय आहे. बाकीचे सर्व उपाय पाषाणराशीवर पडणाऱ्या पर्जन्यवृष्टीप्रमाणें निःसंशय निष्फल होत. "

## मनाची शक्ति अमोघ आहे.

आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व प्राण्यांना दोन शरीरें असतात. एक मनोरूपी ( सूक्ष्म ) शरीर व दुसरें अस्थिमांसमय स्थूल शरीर. सर्व जीवांचें ह्या स्थूल देहाशीं पूर्ण तादात्म्य झालेलें असल्यामुळें मंत्र, शाप, चेटूक, जारण, मारण इत्यादिकांचा परिणाम त्या स्थूल देहावरच होतो. हा स्थूल देह परतंत्र आहे. पण जीवांचा मनोरूपी सूक्ष्मदेह बाह्यतः परतंत्र दिसतो खरा, पण वास्तविक तो कोणाच्याच तंत्रानें चालत नाहीं. हा मनोरूपी देह स्वतःच्या पौरुषप्रयत्नाचा आश्रय करून आणि शाश्वत धैर्य धरून राहील, तर शाप, मंत्र इत्यादिकांचा त्याच्यावर कोणत्याच तऱ्हेचा परिणाम होणार नाहीं. इतकेंच नव्हे तर हा मनोरूपी देह जे जे दृढनिश्चय करील, ते ते सर्व सफल होऊन तो पाहिजे तें सुख प्राप्त करून घेऊं शकेल. आपल्या दृढ निश्चयाच्या जोरावर आपलें चित्त अहल्यामय करणाऱ्या कृत्रिम इंद्रानें देह-पातासारख्या संकटालाहि भीक घातली नाहीं ( या ग्रंथाचा भाग २ रा, इंद्र व अहल्या यांची गोष्ट ६ वी ), पौरुषप्रयत्नाच्या सामर्थ्यानें आपलें मन विरक्त आणि वासनारहित करणाऱ्या मांडव्यऋषींनीं* प्रत्यक्ष सुळावर चढविलें जात असतांहि भयंकर क्लेश उद्विग्न न होतां सहन केले. अंध-कूपामध्यें पडलेल्या दीर्घतपा नांवाच्या ऋषीनें मनानें केलेल्या यज्ञाच्या

* मांडव्याची कथा महाभारतांत आदिपर्व अ. १०७–१०८ मध्यें आली आहे.

पुण्यामुळें देवलोकीची प्राप्ति करून घेतली. साधारण मनुष्य असलेल्या इंदु-पुत्रांनीं स्वप्रयत्नाच्या सामर्थ्यावर आणि ध्यानयोगाच्या बलावर ब्रह्मदेवाच्या पदाची प्राप्ति करून घेतली. ( या ग्रंथाचा भाग २ रा. इंदु-ब्राह्मणाच्या मुलांची गोष्ट ५ वी. )

## भावनेनुसार विषयप्रतीति.

जगांतील प्रत्येक मनुष्य भावनाप्रधान आहे. मनुष्य जशा तऱ्हेची भावना करीत असतो, तशा तऱ्हेचा अनुभव त्याला येत असतो, म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

> यच्चित्तं तन्मयो जंतुर्भवतीत्यनुभूतयः ॥
> सदेहेषु विदेहेषु न भवत्यन्यथा क्वचित् ॥ ३-४६-२८

" जशी चित्ताची भावना तशी जीवाची स्थिति, असा विद्वानांचा अनुभव आहे; व देह जिवंत असतां किंवा तो मृत झाल्यावरहि या अनुभवांत यत्किंचित्‌हि फरक होत नाहीं. " भावना नेहमीं देश, काल, क्रिया व द्रव्य यांच्या योगानें उत्पन्न होत असते व ज्या विषयासंबंधानें ही भावना उत्पन्न होत असते, त्याप्रमाणें कार्य घडून येतें. अर्थात् जीवांना जी पदार्थांची प्रतीति येते, ती पदार्थांच्या स्वरूपानुसार नसून भावनेनुसार येते, हाच सिद्धांत खरा आहे. आतां याविषयीं कोणी कदाचित् असा आक्षेप घेईल कीं, " जीवांना भावनेनुसार विषयप्रतीति होते हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण विषाला अमृत समजून तें एखाद्यानें प्राशन केलें, तरी विष आपलें ठार मारण्याचें कार्य केल्याशिवाय रहात नाहीं ! अशा स्थितींत भावनेनुसार विषयप्रतीति हा सिद्धांत खरा कसा होणार ? पण याचें समाधान वसिष्ठांनीं असें केलें आहे कीं:—

> अमृतत्वं विषं याति सदैवामृतभावनात् ॥३-६०-१७

" भावना तितक्या तऱ्हेनें दृढ झाली असतां विषसुद्धां अमृताप्रमाणेंच जीवनदायी होतें. " ठार मारणें हा जर विषाचा अचल धर्म असता तर विषामध्यें कृमि कीटक जिवंत राहूं शकले नसते ! अर्थात् आपल्या दृढ भावनेमुळें ते जिवंत रहातात, असेंच म्हणणें भाग आहे. मनुष्यसुद्धां

विषानें मरतो याचें कारण विष हें ठार मारणारें आहे, ही त्याची दृढ भावना होय. दृढ भावना केल्याचे वसिष्ठ म्हणतात कीं,

> शत्रुर्मित्रत्वमायाति मित्रसंविचिवेदनात् ॥ ३-६०-१७
> यथाभावितमेतेषां पदार्थानां निजं वपुः ॥
> तदेव हि चिराभ्यासान्नियतेर्वशमागतम् ॥ ३-६७-१८

" शत्रूसुद्धां आपला शत्रुस्वभाव टाकून मित्र बनतो. जीवांनीं ज्या पदार्थांची जशी जशी दृढ भावना केली असेल, त्या त्या प्रमाणें पदार्थ अर्थ-क्रिया करण्याला समर्थ व्हावे असें परमेश्वराच्या नियतीनें ठरविलें आहे. " म्हणूनच एखाद्यानें निमेष कल्पाएवढा दीर्घ असावा अशी दृढ भावना केली, तर त्याच्या दृढ भावनेप्रमाणें एक क्षण कल्पाप्रमाणें भासूं लागावा यांत मुळींच आश्चर्य नाहीं. याच्या उलट कल्प क्षणाप्रमाणें आहे, असा एखाद्यानें दृढ अभ्यास केल्यास त्याला त्याप्रमाणें भासूं लागतें. भावनेनुसार कालाचें मान बदलत असतें. असा आपल्याला नेहमीं अनुभव येतो. एखादा मनुष्य दुःखी, कष्टी आणि उद्विग्न झालेला असला, म्हणजे त्याला रात्र कल्पाप्रमाणें दीर्घ वाटते ! सुखाची स्थिति याच्या विरुद्ध असते; म्हणजे सुखाच्या स्थितींत कितीहि काळ लोटला, तरी तो क्षणाप्रमाणें वाटतो, जागृतीमध्यें आपला अनुभव अशा तऱ्हेचा असतो, तर स्वप्नाच्या स्थितींत हाच अनुभव कितीतरी पटीनें येत असतो. हरिश्चंद्र राजाला एका रात्रींत बारा वर्षांचा काळ लोटल्याचा अनुभव आला. तसेंच लवण नांवाच्या राजाला चार घटकांच्या अवधींत साठ वर्षांच्या आयुष्याचा उपभोग घेतल्याचा अनुभव आला (या ग्रंथाचा भाग २ रा, लवण राजाची गोष्ट ९ वी ) अशा तऱ्हेचीं उदाहरणें पुराणांतून आढळतात. मनूच्या सर्व आयुष्याचा काल म्हणजे सहनशील ब्रह्मदेवाचा एक मुहूर्त व ब्रह्मदेवाचें सर्व आयुष्य म्हणजे महाविष्णूचा एक दिवस होय. यावरून मनाचें सामर्थ्य अचाट आहे यांत शंका नाहीं.

## मनाच्याच सामर्थ्यानें ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति.

सारांश, मन जडचेतनात्मक असून संकल्प करीतें [illegible]

स्वभाव होय. तें जसें दृश्य विषयाच्या अनुसंधानानें जड बनतें, तसें तें सर्व चिद्रूप ब्रह्माचें अनुसंधान करण्यानें चेतनहि बनतें. अशा तऱ्हेनें सर्वत्र त्याला चैतन्याचा अनुभव येऊं लागला कीं, जड जगाचा अनुभव येईनासा होतो. यासाठीं मनुष्यानें मनाचें सामर्थ्य ध्यानांत घेऊन त्याच्या नुसत्या वृत्तींचा विरोध न करितां त्याला परमार्थाच्या पवित्र मार्गाला लावावें व सर्वत्र ब्रह्मदृष्टि धारण करावी. असें केलें असतां ज्याप्रमाणें कुंभाराच्या प्रत्येक क्रियेबरोबर त्याच्या चाकावरील मातीचा गोळा आपली पूर्व स्थिति टाकून घटाकार बनत जातो, त्याप्रमाणें पौरुषप्रयत्नानें केलेल्या दृढभावनेमुळें मन आपली पूर्वीची जडचेतनात्मक स्थिति टाकून देऊन परब्रह्मरूप बनून जातें.



# प्रकरण ३१ वें.

## 'मी' कोण ?

या जगांतील प्रत्येक प्राणीमात्राला अत्यंत आवडणारा व 'आपण कधींहि नसावें' असें ज्याविषयीं कोणालाहि कधींहि वाटत नसतें, पण 'आपण नेहमीं असावें' असेंच ज्याविषयीं सर्वांना वाटत असतें, असा जो 'मी' तो कोण आहे ? हा प्रश्न प्रत्येक मानवाचा मोठ्या जिव्हाळ्याचा आहे. हा प्रश्न वासिष्ठामध्यें कोणत्या पद्धतीनें सोडविला आहे, त्याचा विचार या प्रकरणांत केला आहे.

प्रत्येक प्राण्याच्या ठिकाणीं क्षणोक्षणीं निर्माण होणारा जो 'मी' तोच आत्मा आहे 'अहं ब्रह्मास्मि' म्हणजे 'मी ब्रह्म (म्हणजेच आत्मा) आहे,' असें वेदांतशास्त्रांत स्पष्ट सांगितलें आहे. असा हा आत्मा म्हणजेच 'मी' ह्या शरीरांत कोठें रहातो ? याचा विचार निरनिराळ्या वाद्यांनीं आपआपल्या मताप्रमाणें निरनिराळा केला आहे.

चार्वाकः—देहच आत्मा आहे.

जैनः—देहाएवढा आत्मा आहे.

वेदान्तीः—हा आत्मा देहांत रहातो.

वरील चार्वाक व जैन वाद्यांचें मत सदसद्विवेक बुद्धीला मुळींच पटण्यासारखें नाहीं, म्हणून तें सोडून देऊन वेदान्त्यांच्या दृष्टीनें आत्मा देहांत रहातो, असें मानून तो देहांत कोठें रहातो ? याचा विचार करूं.

### शरीरांतील आत्म्याचें स्थान.

वस्तुतः आत्मा सर्व शरीराला व्यापून राहिलेला आहे, इतकेंच नव्हे तर तो जसा शरीराच्या आंत आहे, तसा तो शरीराच्या बाहेरहि आहे. शरीरांत जो आहे, त्याचा त्या शरीरांतील कोणत्या भागाशीं निकट संबंध येतो, याचा विचार करणें आवश्यक आहे. आत्मा हृदयांत रहातो, असें

हृद्गुहावासि चित्तत्त्वं मुख्यं सानातनं वपुः ॥ ५-४३-२०.

वासिष्ठांत सांगितलें आहे व याविषयीं पुढील वचनेंहि प्रसिद्ध आहेतः—

( १ ) अंगुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा
सदा जनानां हृदये संनिविष्टः ॥

( २ ) सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टः ॥ भगवद्गीता ॥ १५-१५.

( ३ ) हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ॥ भगवद्गीता ॥ १८-६१.

ॲरिस्टॉटेलचेंहि हेंच मत असून त्यानें पुढील कारणें दिलीं आहेतः—

( १ ) हृदयांत रोग झाला असतां मनुष्य निश्चयानें मरतो.

( २ ) भय, शोक, आनंद इत्यादि मनोविकारांनीं हृदयांत तत्क्षणीं खळबळ उडते.

( ३ ) शरीराच्या कोणत्याहि इतर भागापेक्षां गर्भाशयांत प्रथम हृदय तयार होतें.

आत्मा हृदयांत रहात नसून मेंदूंत रहातो, असें योगशास्त्रांतून सांगण्यांत येतें, पण हें वेदान्तशास्त्राला मान्य नाहीं. आत्मा हृदयांतच रहातो, या सिद्धांताला प्रत्येकाचा अप्रत्यक्ष अनुभव हेंहि मोठें सबळ प्रमाण आहे.

## आत्मा हृदयांतच आहे याला प्रत्येक मानवांचा अप्रत्यक्ष अनुभव.

आपण जर एखाद्या माणसाला विचारलें कीं, तूं कोण आहेस ? तर तो लागलीच आपला उजवा हात आपल्या छातीवर ( हृदयावर ) ठेवून म्हणतो कीं, ' हा मी आहे. ' यावरून त्याला जरी ' हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ' ' हृदयांत परमात्मा ( मी ) रहातो ' असें जरी प्रत्यक्ष तत्त्वतः माहीत नसलें, तरी पण अप्रत्यक्ष रीतीनें त्याला आपल्या स्वरूपाचें ( म्हणजे मीपणाचें ) ज्ञान असतेंच असें म्हणण्यास हरकत नाहीं. फक्त शास्त्रीय ज्ञानाच्या अभावीं त्याला त्याची ओळख करून घेतां येत नाहीं. म्हणूनच त्याची ओळख कशी करून घ्यावी अर्थातच ' मी कोण ' हें कसें शोधून काढावें ह्या संबंधानें वसिष्ठांनीं प्रथम जाग्रदादि चार अवस्थांचा सविस्तर विचार केला आहे.

## जागृदादि अवस्थांचा विचार.

जाग्रत, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या-अशा चार अवस्था मानल्या आहेत. या चारी अवस्थांमध्यें 'अहम्' (मी) अवस्थित आहे, असा प्रत्येकाला अनुभव येतो. 'तुर्य' अवस्था ही सर्वांच्या अनुभवाची नसल्यामुळें तिचा विचार सध्यां सोडून दिला तरी बाकीच्या तीन अवस्थांमध्यें म्हणजे जाग्रत, स्वप्न व सुषुप्ति या तिन्ही अवस्थांमध्यें 'मी' हा एकच आहे, असें सिद्ध होतें. कारण जो मी इतका वेळ निजलों होतों व जो मी इतका वेळ स्वप्नांत होतों, तोच मी आतां जागा झालों आहे, असा अनुभव प्रत्येक मानवाला येत असतो व जर तो मनुष्य ज्ञानी असेल तर त्याला मी जो इतका वेळ 'तुर्य' अवस्थेंत (म्हणजे समाधींत) होतों, तोच मी आतां जाग्रत् अवस्थेंत आहे, असा अनुभव त्या ज्ञानी पुरुषाला येणें शक्य आहे. यावरून 'अहम्' (मी) जाग्रदादि चार अवस्थेंमध्यें आहे असें सहज दिसून येतें. या अवस्थांविषयीं वसिष्ठ सांगतातः—

जाग्रत्स्वप्नसुषुप्ताख्यं त्रयं रूपं हि चेतसः ॥
घोरं शांतं च मूढं च आत्मचित्तमिहास्थितम् ॥नि.पू.१२४-३६
घोरं जाग्रन्मयं चित्तं शांतं स्वप्नमयं स्थितम् ॥
मूढं सुषुप्तभावस्थं त्रिभिर्हीनं मृतं भवेत् ॥ नि.पू. १२४-३७.
यच्च चित्तं मृतं तत्र सत्त्वमेकं स्थितं समम् ॥
तदेव योगिनः सर्वे यत्नात्संपादयंति हि ॥ नि. पू. १२४-३८.

यांचा भावार्थ असाः—" या वरील चार अवस्थांपैकीं तीन अवस्था म्हणजे जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या चित्ताच्या आहेत. या तीन अवस्थेंत आपलें चित्त घोर, शांत, व मूढ असें (त्रिगुणांमुळें) तीन प्रकारचें होऊन राहिलें आहे. जाग्रन्मय चित्त घोर, स्वप्नमय चित्त शांत व सुषुप्त भावांत (झोपेंत) असलेलें चित्त मूढ होय. या तिन्ही अवस्थांनीं रहित असलेलें चित्त मृत होय. जें मृत चित्त असतें त्यांत केवळ एक शुद्ध अस्तित्व स्थित असतें. या सत्त्व नांवाच्या चित्तांत निर्मलतेचें आधिक्य असतें. यामुळें त्यांत आत्मसुखाचा सर्वदाच आविर्भाव होतो, म्हणून योगी मोठ्या यत्नानें त्याचेंच संपादन करितात."

यावरून चित्ताच्या तीनच अवस्था आहेत. चवथी अवस्था म्हणजे 'तुर्य' ही चित्ताची अवस्था म्हणतां येत नाहीं. कारण या अवस्थांमध्यें मन रहात नसून तें आत्म्यामध्यें विलीन झालेलें असतें.

या चारी अवस्थांचें वर्णन वासिष्ठांत स्थिति प्र. सर्ग १९ मध्यें करण्यांत आलें आहे. तें पुढें दिलें आहे.

( १ ) जाग्रत् अवस्थाः—ज्याच्या योगानें प्राणी जिवंत रहातो, असा जीव-धातु शरीरांत असतो. तेज, वीर्य हीं त्या जीव-धातूचीं पर्याय नांवें आहेत. हा जीवधातु प्राणवायूनें प्रेरित होऊन हृत्सरोवरापासून पाण्याच्या कालव्याप्रमाणें जेव्हां बाहेर पडून अंतर्नाड्यांमध्यें संचार करूं लागतो, तेव्हां त्यामध्यें ज्ञान उत्पन्न होतें. हें ज्ञान म्हणजेच चित्तरूप संवित् होय. यामध्यें जगत्-भ्रम लीन झालेला असतो. ही चित्तरूप संवित् जेव्हां नेत्रादि गोलकामध्यें पसरून नानाविध आकार आणि विकार यांनीं युक्त असलेले शब्दस्पर्शादि आपआपले विषय सर्व इंद्रियांना ग्रहण करण्याविषयीं प्रेरणा करिते व सर्व शरीर जेव्हां मन, कर्म व वाणी यांच्या योगानें व्यवहार करूं लागतें, तेव्हां त्या अवस्थेला 'जाग्रत् अवस्था' असें म्हणतात. सारांश, प्राणवायूनें क्षुब्ध होऊन जीव वृत्तिरूपानें इंद्रियद्वारां बाहेरचें जग पाहूं लागतो. त्या स्थितीला 'जाग्रत् अवस्था' असें म्हटलें आहे. या अवस्थेंत जीव पुरुषाच्या उजव्या व स्त्रीच्या डाव्या नेत्रांत रहातो, असें उपनिषदांत वर्णन करण्यांत आलें आहे.

( २ ) स्वप्न अवस्थाः—सुषुप्तकाळीं सौम्य झालेले प्राण जेव्हां चंचल होतात, तेव्हां जीवधातु चलित होतो आणि भोगानुकूल प्राक्तन संस्कारांचा उद्बोध झाल्यामुळें चित्तरूपानें उदय पावतो, पण तो इंद्रियछिद्रांतून वृत्तिरूपानें बाहेर न येतां आंतल्या आंतच असलेल्या सर्व वासनात्मक जगांतील विविध पदार्थांचा अनुभव घेत असतो. या स्थितीला स्वप्न अवस्था असें म्हणतात. या अवस्थेमध्यें कायिक व वाचिक विक्षेपांचा उपशम झालेला असतो.

### जाग्रत् व स्वप्न यांमधील फरक.

ज्यांतील अनुभव स्थिर असतात, तिला जाग्रदवस्था आणि ज्यांतील

अनुभव अस्थिर असतात तिला स्वप्नावस्था असें म्हणतात. जाग्रदवस्थेंत एकदां पाहिलेला पदार्थ पुनः पुनः दिसत असतो पण स्वप्नांत आज पाहिलेला पदार्थ उद्यां दिसत नाहीं, हाच या दोन अवस्थांतील फरक होय. जाग्रत् आणि स्वप्न या अवस्थांमध्यें स्थिरता आणि अस्थिरता यावांचून दुसरा कोणताहि फरक नाहीं. स्वप्नसुद्धां स्वप्नसमयीं कांहीं वेळ स्थिर असल्यामुळें तें त्यावेळेपुरतें जाग्रत्च असतें. तसेंच जाग्रत् हे जाग्रत्-काळीं अस्थिर असेल तर तें स्वप्नच होय. कारण एखादेवेळीं एखाद्या गोष्टीचा अनुभव जर अगदीं थोडा वेळच आला, तर आपणाला असें वाटतें कीं 'आपण स्वप्नांत तर नाहीं ना !" वेदांत शास्त्राप्रमाणें प्रकृतीच्या विक्षेपात्मक अवस्थेमध्यें या दोन्ही अवस्थांचा ( जाग्रत् व स्वप्न ) अंतर्भाव होतो.

( ३ ) सुषुप्त अवस्थाः—जेव्हां कायिक, वाचिक व मानसिक अशा तिन्ही विक्षेपांचा उपशम होतो, तेव्हां सुषुप्तीचा उदय होतो. या अवस्थेंत शरीरक्षोभ नष्ट होऊन जीवधातु शांत होऊन स्वस्थ रहातो, समतेस प्राप्त झालेले प्राणवायू हृदयाकाशांत खळबळ उत्पन्न करीत नाहींत व निर्वात गृहांमध्यें असलेल्या दीपाप्रमाणें जीवधातु निर्विक्षेप अवस्थेस प्रकाशित करीत असतो. यामुळें शरीरांतर्गत नाड्यांमध्यें संवित् उत्पन्न होत नाहीं व हृदयाकाशांत कोणत्याहि प्रकारची खळबळ उत्पन्न होत नाहीं; तसेंच चित्तवृत्ति नेत्रादि रंध्राकडे येत नाहीं आणि त्या रंध्रांतून बाहेर पडत नाहीं; अशा अवस्थेला सुषुप्त अवस्था म्हणतात. सुषुप्तकाळीं प्राणवायूची गति फार सूक्ष्म असते म्हणून विक्षेप उत्पन्न होत नाहीं.

आतां सुषुप्तकाळीं जीव ब्रह्माशीं मिळून जातो, असें 'सता सौम्य तदा संपन्नो भवति' या श्रुतींत सांगितलें आहे. मग सुषुप्तकाळीं जीव दीपवत् असतो हें कसें ? अशी शंका या ठिकाणीं उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. पण या शंकेचें समाधान असें आहे कीं, तो जीव या गाढ झोपेमध्यें 'अहं' या संस्कारासहितच ब्रह्माशीं मिळून गेलेला असतो; व अशा रीतीनें जीवाचा अहंकार अत्यंत सूक्ष्मरूपानें जाग्रत् असल्यामुळें तो ब्रह्माशीं मिळून गेला, तरी त्याला आत्मसाक्षात्कार होत नाहीं. यावर असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, 'तीर्णोहि तदा सर्वाञ्शोकान् हृदयस्य भवति' म्हणजे

त्याकाळीं हृदयांतील सर्व शोक नष्ट होऊन जीव मुक्त होतो. तसेंच " सलिल एको द्रष्टाऽद्वैतोभवति " पाण्यांत पाणी मिसळून जसें एकरूप होतें, तसा द्रष्टा ( जीव ) ब्रह्माशीं मिसळून एकरूप होतो. इत्यादि श्रुतिवाक्यांची वाट काय लावावयाची ! तर याचें उत्तर हेंच कीं, मनोरूपी उपाधि लीन झाल्यामुळें जीव स्वच्छ होतो आणि स्वाभाविकपणेंच ब्रह्माशीं एकरूप होतो. एवढाच एक अंश घेऊन श्रुतीनें जीवब्रह्माचें ऐक्य प्रतिपादिलें आहे. भेदवासना विलय पावून जीवब्रह्माचें आत्यंतिक ऐक्य होतें, असें सांगण्याचा श्रुतीचा अभिप्राय नाहीं.

( ४ ) तुर्यावस्थाः—

अहंभावानहंभावौ त्यक्त्वा सदसती तथा ॥
यदसक्तं समं स्वच्छं स्थितं तत्तुर्यमुच्यते ॥ नि. पू. १२४-२३
नैतज्जाग्रन्नच स्वप्नः संकल्पानामसंभवात् ॥
सुषुप्तभावो नाप्येतदभावाज्जडतास्थितेः ॥ नि. पू. १२४-२४

"ज्या अवस्थेंत अहंभाव (मीपणा) म्हणजे जाग्रत् व स्वप्न अवस्थेंतील विक्षेप व अनहंभाव ( मीपणाचा अभाव म्हणजे सुषुप्तींतील आवरण ) ह्या दोन्ही जीवाच्या उपाधी नाहींशा होतात, त्याचप्रमाणें सत्ता व असत्ता या दोन्ही कल्पनांचा त्याग करून जीव कोठेंहि सक्त न होतां, सम, स्वच्छ व शांत होतो, या अवस्थेला तुर्य असें म्हटलें आहे. या अवस्थेंत संकल्पाचा असंभव असल्यामुळें ती जाग्रत् नाहीं व स्वप्नहि नाहीं. अज्ञान नसल्यामुळें ती सुषुप्तिहि नाहीं. " अहंकाराचा परित्याग करून समतेचा उदय झाला असतां चित्ताला पाण्यांत टाकलेल्या मिठाच्या खड्याप्रमाणें आत्मस्वरूपांत विलीन करून टाकणें म्हणजे ही तुर्यावस्था आपोआप उदयाला येते. सारांश,

निर्विकल्पा हि चित्तुर्यं तदेवास्तीह नेतरत् ॥ नि.पू.१२४-३४

' विकल्पशून्य जी चित् हीच तुर्य अवस्था होय. '

जीवाचीं स्थूल सूक्ष्म व पर अशीं तीन रूपें आहेत. स्थूल देह जीवाचें स्थूल रूप आहे. जें संसाराचा उच्छेद होईपर्यंत असतें तें चित्तच जीवाचें

सूक्ष्मरूप आहे. सच्चिदानंद परब्रह्म हें जीवाचें शुद्ध तुर्यपद म्हणजेच परमरूप होय. ' हें तुर्यपदच मी आहे ' अशी भावना कर व त्या ठिकाणीं स्थिर हो असें वसिष्ठ सांगतात.

> एतत्तुर्यपदं शुद्धमत्र बद्धपदोभव ॥
> संपरित्यज्य पूर्वे द्वे मा तत्रात्ममतिर्भव ॥ नि. पू. १२४·२१

" हेंच शुद्ध तुर्यपद आहे, व हेंच तुझें स्वतःचें रूप असल्यामुळें त्या ठिकाणीं स्थिर होऊन रहा. बाकीच्या दोन रूपांचा त्याग कर. त्याच्यामध्यें आत्मबुद्धि ठेवूं नकोस. "

या तुर्यावस्थेचें स्वरूप स्पष्ट करून दाखविण्याकरितां व्याध व मुनि यांची गोष्ट सांगितली आहे. ( या ग्रंथाचा भाग २ रा–गोष्ट ३१ वी पृष्ठ २४४–२४५ )

## ' कोऽहम् ' मी कोण ? याचा विचार

आतां वर वर्णन केलेल्या चारी अवस्थांमध्यें अनुस्यूत असणारा व सर्वांच्या अनुभवास क्षणोक्षणीं येणारा ' मी ' कोण आहे ? याचा विचार उपशम प्र. सर्ग १७ मध्यें केला आहे. मीपणाच्या संबंधानें चार प्रकारचे निश्चय प्रसिद्ध आहेत, त्यांपैकीं:—

पहिला निश्चयः—म्हणजे आईबापापासून निर्माण झालेला, चालणारा, बोलणारा, जो आपादमस्तक स्थूल देह तोच मी आहे, हा होय. परंतु या मिथ्या देहाला सत्यत्व देणारा हा निश्चय जीवाच्या बंधाला व निरंतर दुःख देण्यालाच कारणीभूत होतो, म्हणून त्याचा दुष्ट शत्रूप्रमाणें नाश करणेंच योग्य होय.

दुसरा निश्चयः—देह, इंद्रियें वगैरे सर्व स्थूल सूक्ष्म तत्वाहून मी निराळा आहे व माझें स्वरूप केशाग्राहूनहि सूक्ष्म आहे, हा दुसऱ्या प्रकारचा निश्चय होय. हा ' तत्त्वमसि ' या वाक्यांतील ' त्वम् ' पदार्थाच्या शोधनाला उपयोगी असल्यामुळें शाण्या पुरुषांना मोक्षप्रद होतो.

तिसरा निश्चयः—या जगांतील अनंत पदार्थांचा आत्मा मी आहें. मी अक्षय आहें व हें सर्व जग मीच आहें. हा तिसरा निश्चय होय. या

निश्चयामुळें आत्म्याच्या परिछिन्न भ्रमाचा निरास आणि 'तत्' पदार्थाचें शोधन होत असल्यामुळें तो निःशय मोक्षोपयोगी आहे.

चवथा निश्चयः—मी व हें जग अशीं दोन्ही आकाशाप्रमाणें शून्यरूप आहेत, हा चवथा निश्चय असून तोहि मोक्षसिद्धि देणारा आहे.

सारांश, या चार निश्चयांतील पहिला मलिन भावनेपासून उत्पन्न झालेला असल्यामुळें बंधाला कारण होत असून बाकीचे तिन्ही शुद्ध भावनेपासून उत्पन्न झालेले असल्यामुळें मोक्षप्रद आहेत. हे तिन्ही निश्चय जरी चांगले असले, तरी

सर्वमात्माहमेवेति निश्चयो यो महामते ॥
तमादाय विपादाय न भूयो याति मे मतिः ॥ ५-१७-२०.

"त्यांतल्या त्यांत 'मी हें सर्व आहें' हा तिसरा निश्चय मला अत्यंत प्रिय आहे." असें श्रीवसिष्ठांनीं आपलें मत दिलें आहे. कारण खालीं वर, आजूबाजूला जिकडे तिकडे मीच आहें. उपशम प्रकरण सर्ग ७३ मध्ये वसिष्ठांनीं या निश्चयाचें सविस्तर वर्णन केलें आहे. त्याचा सारांश असा कीं, मी आकाश आहें, मी सूर्य आहें, मी दशदिशा आहें, मी पाताल आहें, दैत्य मी आहें, देवहि मीच आहें. स्वर्गादि लोक, चंद्रादिकांची प्रभा, दिवस, रात्र, अभ्रें, पृथ्वी, समुद्र, वायु, अग्नि व हें अखिल दृश्य मीच आहें. मी सर्व दिशांमध्यें व्यापून राहिलेला, संकुचितपणाचा सर्व भ्रम टाकून दिलेला, सर्वांतर्यामी व सर्वकर्ता असून व्यष्टिसमष्टिभावानें मीच सर्वत्र स्थित आहें.

## आनंदरूप आत्मा प्रत्येक प्राण्याचा स्वभाव आहे.

नित्य निरतिशय आनंदरूप आत्मा हाच प्रत्येक प्राणिमात्राचा स्वभाव किंवा स्वरूप आहे; आणि प्रत्येकाला आपला स्वभाव (किंवा स्वरूप) फारच आवडतो, कारण त्यापासूनच आनंद प्राप्त होत असतो, म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

स्वभावएव सर्वस्मै स्वदते किल सर्वदा ॥ नि.उ. ३९-१९.
अस्वभावे महद्दुःखं स्वभावे केवलं शमः ॥ नि. उ. ३९-२०.

"हा स्वभाव म्हणजेच प्रत्येकाचा आत्मा. हा प्रत्येकाला फारच आवडतो, कारण त्या स्वभावस्थितीतच मोठा आनंद होत असतो, व स्वभावाला सोडल्यावर मोठें दुःख प्राप्त होत असतें."

हीच वासिष्ठांतील कल्पना लक्षांत घेऊन विद्यारण्यांनीं पंचदशीमध्यें आत्मा हा परमप्रेमाला आस्पद आहे असें सांगून त्याविषयींचें प्रेम 'मा न भूवं हि भूयासमिति प्रेमात्मनीक्षते' ॥ १-८. मी कधीं नसावें असें नसून मी नेहमी असावें, अशा तऱ्हेचें परम प्रेम आपल्या स्वतःसंबंधानें प्रत्येकाच्या ठिकाणीं सतत वास करीत असतें. आपण नेहमीं असावें असें जें वाटतें तें आत्मा नित्य अविनाशी असा आहे म्हणूनच वाटत असलें पाहिजे, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. म्हणून आत्मा म्हणजे 'मी' आहे असें सहज दिसून येईल. आपणाव्यतिरिक्त इतर ठिकाणीं जें आपलें प्रेम असतें तें आपल्याकरितांच असतें. 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति' अशा तऱ्हेचें जें वर्णन उपनिषदामध्यें केलेलें आहे, तेंहि ह्या दृष्टीनेंच केलेलें आहे.

## 'मी कोण' या विचाराला वैराग्य व अभ्यास यांची आवश्यकता.

हा वरील 'मी कोण' ह्याविषयीं केलेला विचारहि जर वैराग्याभ्यास-पूर्वक होत असेल, तरच सफल होतो. अनुरागयुक्त विचार सर्वथा निष्फळ होय. या विचाराबरोबर इंद्रीयजयाचा अभ्यास करीत गेलें, तरच तो सफल होण्याची आशा आहे, म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

चित्रामृतं नामृतमेव विद्धि चित्रानलं नानलमेव विद्धि ॥
चित्रांगना नूनमनंगनेति वाचा विवेकस्त्वविवेक एव ॥ ४-१८-१९.

'तोंडाच्या बडबडींत मात्र विवेक पण अंतर्यामीं त्याचा गंधहि नाहीं, असें असेल तर चित्रांतील अग्निप्रमाणें असल्या वाचिक विवेकाचा काडी-मात्र उपयोग नाहीं ! असला विवेक अविवेकाचा नाश न करितां परिणामीं दुःखालाच कारणीभूत होतो.'

नुसता 'वारा' हा शब्द कानावर पडल्यानें त्याचें अस्तित्व कळत

नसतें, तर त्यासाठीं वायूचा अंगाला स्पर्श व्हावा लागतो, त्याचप्रमाणें 'मी विवेकी आहे', 'मी आत्मा आहे' किंवा 'मी ब्रह्म आहे' असें तोंडानें बडबडण्यानें विवेकाची किंवा आत्मसाक्षात्काराची पारख होत नाहीं, तर विषयतृष्णेच्या न्यूनतेवरूनच विवेकाची किंवा ज्ञानाची खरी पारख होत असते. वाचिक विवेक म्हणजे खरा विवेक नव्हे तर तो अविवेकच होय. हीच वसिष्ठांची दृष्टि लक्षांत घेऊनच कीं काय तुकाराम महाराजांनीं 'बोलाचाचि भात बोलाचाची कढी' हें जें वर्णन केलें आहे तें अगदीं योग्य दिसतें.



# प्रकरण ३२ वें.

## परब्रह्म.

मागील प्रकरणांत 'मी कोण आहे' याचा विचार करून 'मी ब्रह्म आहे' असा शेवटीं निर्णय केला आहे. आतां या प्रकरणांत या परब्रह्माचा विचार केला आहे. ब्रह्माची थोडक्यांत कल्पना यावी म्हणून वसिष्ठांनीं पुढील दोन श्लोकांत त्याच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहेः—

यस्मिन्सर्वं यतः सर्वं यत्सर्वं सर्वतश्चयत् ॥
सर्वं सर्वतया सर्वं यत्सर्वं सर्वदा स्थितम् ॥ नि. उ. १८४ ४६

यस्मिन्सर्वं यस्य सर्वं यतःसर्वं यस्मायिदम् ॥
येनसर्वं यद्धि सर्वं तत्सत्यं समुपास्महे ॥ ५-८-१२

या वरील दोन श्लोकांचा अर्थ जवळजवळ एकच आहे. त्यांचा तात्पर्यार्थ असाः—'जें जगांतील सर्व वस्तूंचा आधार आहे, सर्व ज्याच्या मालकीचें आहे, जें सर्वांचें उपादान व निमित्त कारण म्हणजे मायबाप आहे. शेवटीं हें सर्व विश्व ज्याच्या करितां आहे. ज्याच्यामुळें हें सर्व विश्व भासत आहे. शेवटीं हें सर्व (विश्व) ज्याप्रत जातें व जें सर्व चराचर जगताच्या रूपानें नटलेलें आहे, असें तें त्रिकालाबाधित परमसत्य-स्वरूप परब्रह्म आहे.' ग्रंथकर्त्यांनें अध्यात्मशास्त्रदृष्ट्या परब्रह्माचें स्वरूप समजावून देण्याकरितां मोठ्या कुशलतेनें वरील श्लोकांत व्याकरणांतील प्रथमादि सर्व विभक्तींचा उपयोग केला आहे. परब्रह्माचें वर्णन अमुक एका निश्चित कल्पनेनें करितां येईल, असें म्हणतां येत नाहीं. कारण तें कोणत्याहि एका विशिष्ट कल्पनेला विषय होत नाहीं.

### ब्रह्म अनिर्वचनीय आहे.

म्हणूनच वसिष्ठांनीं त्याला अनिर्वचनीय असें पुढील श्लोकांत म्हटलें आहेः—

तशीच हुबेहुब ब्रह्माच्या बाबतींत विचार करणाराची स्थिति होत असते, म्हणून वसिष्ठ सांगतात कीः—

नच नास्तीति तद्वक्तुं युज्यते चिद्वपुर्यदा ॥
वचैवास्तीति तद्वक्तुं युक्तं शांतमलं तदा ॥ नि. उ. ५३-९

"ब्रह्म चिद्रूप आहे असा विद्वानांचा अनुभव आहे व अज्ञ जीवानांहि आपण नेहमीं असावें असें वाटत असल्यामुळें व " जीवो ब्रह्मैव नापरः " या सिद्धांताप्रमाणें 'ब्रह्म नाहीं' असें म्हणतां येत नाहीं व तें अत्यंत शांत असल्यामुळें 'तें आहे' असेंहि म्हणतां येत नाहीं." असें जरी असलें तरी सत् व असत् यांचें तत्त्व सद्रूपांत पर्यवसान पावतें, शून्यामध्यें त्याचें पर्यवसान होत नाहीं. कारण अभावहि सद्रूपत्वानेंच प्रतीतीला येतो. भूतलावर घट नाहीं म्हणजेच त्याचा अभाव आहे असें आपण म्हणतों.

### ब्रह्म शून्य किंवा अशून्यहि नाहीं.

याप्रमाणें ब्रह्माला जसें असत् किंवा सत् असें म्हणतां येत नाहीं, त्याप्रमाणें त्याला 'शून्य' किंवा 'अशून्य' असेंहि म्हणतां येत नाहीं.

अनुत्कीर्णा यथा स्तंभे संस्थिता शालभंजिका ॥
तथा विश्वं स्थितं तत्र तेन शून्यं न तत्पदम् ॥ ३०-१०-७

'एखाद्या स्तंभावर चित्र खोदण्यापूर्वीं तें चित्र जसें त्या स्तंभांत असतें तसें विश्व उत्पन्न होण्यापूर्वीं ब्रह्मांत अव्यक्तरूपानें असतें. यासाठीं ब्रह्म शून्य आहे, असें म्हणतां येत नाहीं. 'शून्यमाकाशतोऽधिकम् ३–१०–३६' आकाशाहूनहि तें अधिक शून्य आहे. म्हणून त्या ब्रह्माला अशून्य म्हणतां येत नाहीं. शून्य आणि अशून्य हे शब्द सापेक्ष आहेत. अशून्य या शब्दाच्या अपेक्षेनें शून्य शब्दाची कल्पना व शून्याच्या अपेक्षेनें अशून्याची कल्पना उत्पन्न होते. परंतु या सापेक्ष कल्पनांपैकीं एक कल्पना नाहींशी झाली म्हणजे त्याबरोबर दुसरीहि कल्पना नाहींशी होते. अर्थात् शून्य व अशून्य या कल्पना नित्यसिद्ध ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं लागू पडत नाहींत.

## ब्रह्म प्रकाशरूप व अंधकाररूपहि नाहीं.

ब्रह्म हें प्रकाश व अंधार या दोहोंच्याहि पलीकडे आहे असें वसिष्ठ सांगतातः —

मुक्तं तमःप्रकाशाभ्यामित्येतदजरं पदम् ॥ ३-१०-१८.

" या निर्विकार ब्रह्माच्या ठिकाणीं सृष्टीच्या पूर्वी प्रकाश व अंधार हे दोन्हींहि नाहींत." आतां तें प्रकाशरूप कसें नाहीं तें सांगतात. तेजापासून उत्पन्न होणारा प्रकाश ब्रह्माच्या ठिकाणीं सदा सर्वकाल असणें संभवनीय नाहीं, कारण सृष्टीच्या पूर्वी आणि प्रलयानंतर तेजाचा अभाव होता. तसेंच सूर्य, अग्नि व तारे यांच्या प्रकाशानेंहि स्थितिकालीं तें परब्रह्म प्रकाशित होणें शक्य नाहीं. 'न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः॥' १५—६ असें भगवद्गीतेंतहि सांगितलें आहे. कारण सूर्यादिकांचें तेज ब्रह्मापासून उत्पन्न होतें व तें सूर्यादिक असेपर्यंतच रहात असतें. आतां त्याच्या ठिकाणीं तम (अंधार) कसें नाहीं तें पाहूं. प्रकाशाचा अभाव म्हणजेच तम (अंधार) असें म्हणतात. हा प्रकाश ब्रह्मापासून उत्पन्न होत असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं प्रकाशाचा अभाव म्हणजे तम (अंधार) असणें शक्य नाहीं. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

स्वानुभूतिः प्रकाशोऽस्य केवलं व्योमरूपिणः ॥
योऽन्तरस्ति सतेनैव नत्वन्येनानुभुयते ॥ ३-१०-१७

" आकाशाप्रमाणें निराकार असलेल्या ब्रह्माचा प्रकाश म्हणजेच आत्मस्वरूपाचा अनुभव होय. जो आत्मा आपल्या अंतःकरणांत असतो, त्यानेंच त्याच्या स्वरूपाचा अनुभव येतो. दुसऱ्या कशानेंहि येत नाहीं.

## ब्रह्माचीं अनेक नांवें.

ब्रह्माला आत्मा वगैरे संज्ञा दिलेल्या आहेत, त्या तत्त्वतः त्याच्याठिकाणीं नाहींत असें वसिष्ठ सांगतातः —

अवाच्यमनभिव्यक्तमतींद्रियमनामकम् ॥ नि. उ. ५२-२७
स्वरूपं नोपदेशस्य विषयो विदुषो हि तत् ॥ नि. उ. ३१-३७

"हें ब्रह्म वाणीनें वर्णन करून सांगण्यासारखें नाहीं, प्रत्यक्ष दाखवितां येण्याजोगें नाहीं, त्याला कोणतेंहि नांव ठेवतां येत नाहीं, तें कोणत्याहि इंद्रियाला विषय होत नाहीं, म्हणून तें कोणत्याहि विद्वान् पुरुषाच्या उपदेशाला विषय होत नाहीं"

आतां ब्रह्म हें अवाच्य कसें आहे, तें पुढील वर्णनावरून दिसून येतें:— "ब्रह्म स्थूल नाहीं, सूक्ष्म ( अणुरूप ) नाहीं, चेतन नाहीं, जड नाहीं; सद्रूप नाहीं, असद्रूप नाहीं, एक नाहीं, अनेक नाहीं, समीप नाहीं, दूरहि नाहीं, आहे असें नाहीं, नाहीं असें नाहीं, तें प्राप्य आहे असें नाहीं, अप्राप्य आहे असें नाहीं." अशा तऱ्हेचें वर्णन उपशम प्र. सर्ग ७२ मध्यें आलेलें आहे. यावरून ज्ञानेंद्रियें आणि मन यांच्या योगानें जें दृश्य अनुभवाला येतें त्याच्या पलीकडे-ब्रह्म असून त्याचें स्वरूप अमूक एका प्रकारचें आहे अशा तऱ्हेचें निश्चित वर्णन करितां येणें शक्य नाहीं. हें ब्रह्म प्रत्यक्षादि प्रमाणांना अगम्य जरी असलें तरी तें नाहीं असें म्हणतां येत नाहीं,कारण तें तत्त्वज्ञानी पुरुषांच्या अनुभवाला येत असतें असें वसिष्ठ सांगतात:—

तद्विदा तत्पदस्थेन तन्मुक्तेनानुभूयते ॥
अन्यैः केवलमाम्नातैरागमैरेव वर्ण्यते ॥ नि. उ. ५२-२९

"जो ज्ञानी आत्मस्वरूपीं स्थित असतो व त्यामुळेंच जो सर्व बंधनांतून मुक्त झालेला असतो, त्याला तें तत्त्व ( ब्रह्म ) अनुभवाला येतें. बाकीचे परोक्षज्ञानी केवळ शब्दप्रमाणाच्या आधारानेंच त्याचें वर्णन करितात."

### ब्रह्म एक आहे असेंहि म्हणतां येत नाहीं.

ब्रह्म एक आहे कां अनेक आहे, याचाहि बरोबर निर्णय करितां येत नाहीं. कारणः—

सति द्वित्वे किलैकं स्यात्सत्येकत्वे द्विरूपता ॥
कल्ले द्वे अपि चिद्रूपे चिद्रूपत्वात्तदप्यसत् ॥ नि.पू ३३-४
एकाभावादभावोत्र एकत्वाद्वित्वयोर्द्वयोः ॥
एकं विना न द्वितीयं न द्वितीयं विनैकता॥ नि.पू ३३-५

" जर द्वित्व असेल तर एकत्वाची कल्पना होते व एकत्व असेल तर द्वित्वाची कल्पना होते. या दोन्ही कल्पना चिद्रूप ब्रह्मामध्येंच होत असतात. म्हणूनच ब्रह्मदृष्ट्या या दोन्ही कल्पना असत् आहेत. कारण त्यांना सत्य मानल्यास ब्रह्माच्या चिदेकरसत्वाचा व्याघात होतो. एकत्वाचाच अभाव असल्यामुळें एकत्व व द्वित्व या दोघांचाहि अभाव होतो. कारण एकावांचून द्वितीय नाहीं, व द्वितीयावाचून एक नाहीं. " असें जरी असलें तरी त्या ब्रह्माला वेदामध्यें ' एकमेवाद्वितियम् ' म्हणजे एकच अद्वितीय असें म्हटलें आहे. परंतु ब्रह्म हें ' एकच आहे ' असें प्रतिपादन करण्याचा वेदाचा हेतु नसून, ब्रह्म हें निराकार व निरवयव असल्यामुळें स्वगत भेदशून्य आहे. कारण तो भेद सावयव पदार्थातच संभवतो. निरवयव ब्रह्मामध्यें संभवत नाहीं. एकम् एव आणि अद्वितीयम् या तीन पदांनीं ब्रह्माच्या ठिकाणीं क्रमानें स्वगत, सजातीय व बिजातीय भेद नाहींत असें सांगितलें आहे.

## ब्रह्म आहे किंवा नाहीं असेंहि म्हणतां येत नाहीं.

याच तऱ्हेनें ब्रह्माला ' आहे ' किंवा नाहीं, यांपैकीं कांहींच म्हणतां येत नाहीं. जशी एखादी नवीनच लग्न झालेली मुलगी सासरी गेल्यानंतर आपल्या सासूच्या ताब्यांत असतें व एखादे वेळीं शेजारची बाई सासूच्या पश्चात् घरीं येऊन त्या नवीन मुलीला ' ताक असल्यास मला थोडें देतां कां ? ' असें विचारतांच त्या मुलीच्या मनाची द्विधा स्थिति होते. कारण घरांत ताक आहे. हें तिला माहीत असतें. पण आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण तसें म्हटलें तर ती बाई म्हणणार कीं द्या तर आम्हांला. परंतु सासूच्या परवानगीशिवाय देतां येत नाहीं. बरें, नाहीं असें म्हणावें तर घडघडीत घरांत तें असतांना नाहीं असें तरी कसें म्हणावें ?

* ऋतमात्मा परं ब्रह्म सत्यमित्यादिका बुधैः ॥
कल्पिता व्यवहारार्थं तस्य संज्ञा महात्मनः ॥ ३-१-१२

' अशा या सत्तत्वालाच ज्ञात्या पुरुषांनीं ऋत, आत्मा पर, ब्रह्म, सत्य अशीं नानाविध नांवें स्वभावतः नसतांहि व्यवहाराकरितां कल्पिलेलीं आहेत. " त्याला सांख्य ' पुरुष ' म्हणतात. वेदांतीं त्याला ' ब्रह्म ' असें संबोधितात. विज्ञानवादी त्यास ' विज्ञानमात्र ' असें म्हणतात व शून्यवादी त्याला ' शून्य ' म्हणतात.

### ब्रह्माचा स्वभाव.

ब्रह्माला दिलेलीं हीं वरील नांवें जशीं कल्पित आहेत तसा ब्रह्माचा स्वभाव तरी काय आहे ? याविषयीं कांहीं नक्की सांगतां येत नाहीं, असें वसिष्ठ सांगतातः—

ब्रह्मणः कःस्वभावोऽसाविति वक्तुं न युज्यते ॥
अनंते परमे तत्त्वे स्वत्वास्वत्वात्यसंभवात् ॥ नि. उ. १०-१४

" ब्रह्माचा कोणता स्वभाव आहे हें कांहीं सांगतां येत नाहीं. अनंत अशा परमतत्त्वामध्यें स्वत्व ( आपलेपणा ) व अस्वत्व ( परकेपणा )

---

* **ऋतम्**:—उत्कृष्ट प्रमाण जे श्रुति त्यावरून याची प्राप्ति होते म्हणून त्याला ' **ऋत** ' असें म्हटलें आहे.

**आत्मा**:—अतति व्याप्नोति सः**आत्मा** । सर्वांला व्यापून टाकतो म्हणून **आत्मा.**

यच्चाप्नोति यदादत्ते यच्चात्ति विषयानिह ।
यच्चास्य संततोभावस्तस्मादात्मेति कथ्यते ॥ इति व्यासोक्तिः ॥

**परम्**:—सत्यतोत्कर्षावधित्वात् । सत्यपणाच्या उत्कर्षाची अवधि म्हणून **परम्.**

**ब्रह्म**:—बृंहकत्वात् । सर्वांत मोठें असल्यामुळें **ब्रह्म.**

**सत्य**:—यथाशास्त्रं विद्वद्भिरनुभूयमानम् । शास्त्राला अनुसरून विद्वानांना अनुभव येतो म्हणून **सत्य.**

याचा अत्यंत अभाव असल्यामुळें त्या ठिकाणीं स्वभाव हा अन्य आहे असें निरूपण करतां येत नाहीं."

सारांश, अभावाची अपेक्षा करणारा जो भाव त्याचाहि ब्रह्मामध्यें असंभव असल्यामुळें त्या अनंत तत्त्वांत स्वभावादिक दुरुक्तीना अवकाशच मिळत नाहीं. स्वत्व ( आपलेपणा ) व भाव ( अस्तित्व ) हें स्वतः सिद्ध असल्यामुळें 'स्वभाव' हा शब्दप्रयोगच होऊं शकत नाहीं. यावरून असें दिसून येतें कीं, ब्रह्माचा अमूक एक निश्चित स्वरूपाचा स्वभाव आहे, असें म्हणतां येत नाहीं, म्हणून उपनिषत्कारांनीं 'नेतिनेति' अशा तऱ्हेनें सर्वांचा निषेध करून शेवटीं ज्याचा निषेध करितां येत नाहीं, 'निषेधावधिभूतं ब्रह्म' सर्व पदार्थांचा निषेध केल्यावरच जें शिल्लक रहातें, तें ब्रह्म असें ठरविलें आहे.

## ब्रह्माचें वर्णन.

ब्रह्म कसें आहे याची थोडीशी कल्पना येण्याकरितां वसिष्ठांनीं भगवद्गीतेप्रमाणेंच* ब्रह्माचें वर्णन खालील श्लोकांत केलें आहे:—

> सर्वतः पाणिपादान्तं सर्वतोक्षिशिरोमुखम् ॥
> सर्वतःश्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ नि. उ. १४-९
> सर्वेंद्रियगुणैर्मुक्तं सर्वेंद्रियगुणान्वितम् ॥
> असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ नि. उ. १४-१०
> बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ॥
> सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ नि. उ. १४-११

"त्याला सर्व बाजूंनीं हात पाय आहेत; सर्व बाजूंनीं डोळे, मस्तकें व मुखें आहेत. सर्व बाजूंनीं कान आहेत; आणि तेंच या लोकीं सर्व व्यापून राहिलें आहे. तें सर्व इंद्रियांच्या गुणांनीं रहित पण सर्व इंद्रियांच्या गुण-ग्रहणशक्तींनीं युक्त आहे. तें ( सर्वांपासून ) असक्त म्हणजे अलग असूनहि

---

* अशाच तऱ्हेचे श्लोक थोड्याफार फरकानें भगवद्गीतेंत अ. १३ मध्यें १३, १४ व १५ असे आले आहेत.

सर्वांना धारण करणारें; आणि निर्गुण असूनहि गुणांचे उपभोग घेणारें आहे. तें सर्व भूतांच्या आंत व बाहेरहि आहे; अचर आहे आणि चरहि आहे; सूक्ष्म असल्यामुळें तें अविज्ञेय आहे; अज्ञदृष्टया तें दूर आहे व *विवेकदृष्टया अगदीं जवळ आहे.*"

**अणीयसामणीयासं स्थविष्ठं च स्थवीयसाम् ॥**
**गरीयसां गरिष्ठं च श्रेष्ठं च श्रेयसामपि ॥ नि. उ. ३५-१६**

" हें ब्रह्म सूक्ष्माहूनहि अति सूक्ष्म, स्थूलाहूनहि अती स्थूल, गुरु ( जड ) पदार्थांहूनहि अतीशय जड व श्रेष्ठांहूनहि श्रेष्ठ आहे. " अशाच तन्हेचें वर्णन ' अणोरपि *अणीयान् महतोऽपि महीयान्* ' असें श्रुतीमध्यें केलेलें आहे. त्याच्यापुढें हें जें आकाश आहे, तें अणूजवळ जसा महान् मेरुपर्वत स्थूल दिसावा तसें स्थूल दिसतें. अशा प्रकारचें तें सूक्ष्म आहे. तसेंच ज्याच्यासमोर हें जगत् परमाणूप्रमाणें दिसतें व कोठें तर मुळींच दिसत नाहीं, अशा प्रकारचें तें परम स्थूल आहे."

## ब्रह्माचें स्वरूप.

उत्पत्ति प्र. सर्ग १० श्लोक ३८ ते ५४ मध्यें वसिष्ठांनीं ब्रह्माच्या स्वरूपाचें वर्णन केलें आहे. त्याचा सारांश पुढें दिला आहे: —

समाधीच्या वेळीं दृश्य जग आणि द्रष्टा लीन झाल्यावर जें साक्षीभावानें उरतें तेंच ब्रह्माचें स्वरूप होय. वायु वगैरेंचा शरीराला स्पर्श झाला असतां स्पर्शादि विषयांचें ज्ञान न होतां नुसतें स्फुरण पावणारें जें चित्ताचें रूप तेंच *ब्रह्मस्वरूप होय. समाधीमध्यें निरोध केल्यावर विषयवृत्तींचा क्षय* झाला असतां मनाच्या स्वरूपाचा नाश होतो व नंतर जें स्वयंप्रकाश सद्रूप वस्तु शिल्लक रहातें तेंच त्या ब्रह्माचें स्वरूप होय. अन्नमयादि कोशांच्या आंत असलेली चैतन्याची आनंदस्थिति, ' भूतप्रपंचाचा सारभूत जो आदित्यात्मक प्रकाश व अमूर्त प्रपंचाचें सारभूत जें आकाश या दोहोंमध्यें असलेली चैतन्याची ' सत् ' स्थिति व चाक्षुषादि इंद्रियवृत्तींच्या पलीकडे असणारी अंतःकरणाची ' चित् ' स्थिति अर्थात् सच्चिदानंदरूपता हेंच ब्रह्माचें स्वरूप होय. योगाभ्यासाची माहिती नसणाऱ्या पुरुषांना ब्रह्माचें स्वरूप समजून देण्याकरितां वसिष्ठांनीं खालील श्लोकांत दृष्टांत दिले आहेत—

अस्वप्नाया अनंताया अजडाया मनस्थितेः ॥
यद्रूपं चिरनिद्रायांस्तत्तदानघ शिष्यते ॥ ३-१०-४३.
स्थावराणां हि यद्रूपं तच्चेद्बोधमयं भवेत् ॥
मनोबुद्ध्यादिनिर्मुक्तं तत्परेणोपमीयते ॥ ३-१०-५३.

" स्वप्नरहित व जाड्यरहित अशा अनंत निद्रेप्रमाणें मनाची जी समस्थिति तें ब्रह्माचें स्वरूप होय. स्थावर पदार्थांचें अचल स्वरूप तें मनबुद्ध्यादि रहित आणि बोधमय होईल, तर त्याची परब्रह्माच्या स्वरूपाशीं तुलना करतां येईल."

## ब्रह्माच्या अनुभवाचें स्थान.

देशाद्देशांतरं दूरं प्राप्तायाः संविदो वपुः ॥
निमेषेणैव यन्मध्ये तद्रूपं परमात्मनः ॥ ३-७-१९.

" भिन्न भिन्न स्थानीं असलेल्या वस्तूंची जाणीव होत असतां मध्यंतरीं जो अल्प काल जातो, त्या वेळची जी मोकळी म्हणजे वृत्तिशून्य स्थिति तेंच परमात्म्याचें स्वरूप होय. म्हणजेच तेथें ब्रह्माचा अनुभव येतो."

## ब्रह्माचें ठिकाणीं अशब्दाच्या भेदाची कल्पना.

ब्रह्म हें ' एकमेवाद्वितीय ' आहे म्हणजे त्याचें ठिकाणीं स्वगत, सजातीय व विजातीय भेद* नाहींत, असें तें एकजिनसी असलें, तरी त्याच्या संबंधानें उपदेश करण्याकरितां त्याच्या ठिकाणीं वाच्यवाचकादि भेद मानावा लागतो. म्हणून हा जो भेद ब्रह्माच्या ठिकाणीं अद्वैत ग्रंथां-

---

* ( १ ) **स्वगत भेदः**—स्वतःच्या ठिकाणीं होणारा भेद, जसें अवयवाहून म्हणजे आपल्या देहाहून हस्तपादादि अवयव निराळे.

( २ ) **सजातीय भेदः**—जातीच्या दृष्टीनें होणारा भेद, जसें एका देहाहून दुसरा देह निराळा.

( ३ ) **विजातीय भेदः**—भिन्न जातीमुळें होणारा भेद, जसें वृक्ष पाषाणादिकाहून देह निराळा.

तून मधून मधून आदळतो तो मूढ लोकांच्या दृष्टीनें स्वीकारलेला आहे, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे:—

> अप्रबुद्धदृशां पक्षे तत्प्रबोधाय केवलम् ॥
> वाच्यवाचकसंबंधकृतो भेदः प्रकल्प्यते ॥ ३-१००-४.
> काचिद्वा कलना यावन्न नीता राघव प्रथाम् ॥
> उपदेश्योपदेशश्रीस्तावल्लोके न शोभते ॥ ३-९५-५.
> अतो भेददृशादीनामंगीकृत्योपदिश्यते ॥
> ब्रह्मेदमेते जीवा वै वेति वाचामयंक्रमः ॥ ३-९५-६.

" अप्रबुद्ध लोकांच्या अज्ञानाचा पक्ष लक्षांत घेऊन त्यांना या अध्यात्म विषयाची समजूत व्हावी, अशा हेतूनेंच वाच्य वाचक, गुरु शिष्य इत्यादि शास्त्रीय भेद शिष्टांनीं कल्पिलेले आहेत. कांहींतरी दुसरी कल्पना ( द्वैताची कल्पना ) स्वीकारली नाहीं, तर उपदेश्य व उपदेशक या दोन शब्दांची जगांत कांहींच शोभा रहाणार नाहीं. यासाठीं लोकांच्या भेददृष्टीचा अवलंब करून हें ब्रह्म आणि हें त्यापासून उत्पन्न झालेले जीव अशी दीन किंवा शोचनीय कल्पना ग्रहण करून उपदेश करण्याची शास्त्राची पद्धत आहे."

आतां अशा तऱ्हेचा अभ्युपगम्यवाद* आपला सिद्धांत लोकांच्या मनावर ठसविण्यासाठीं शास्त्रानें अंगीकारलेला असला तरी शास्त्र या वादाचा अखेरीस निरासच करीत असतें. याच दृष्टीनें ' तन्न तन्न ' या श्रुतीनें ब्रह्म व्यतिरिक्त सर्व वस्तूंचा निरास किंवा निषेध करून शेवटीं ' ब्रह्म एकच आहे ' असा अद्वैताचा सिद्धांत केला आहे.



* **अभ्युपगम्यवादः**—लोकांची असलेली समजूत कांहीं वेळ गृहीत धरून चालणें.

# प्रकरण ३३ वें.

## ब्रह्मदृष्टि ( ब्रह्माची दृष्टि ).

आतांपर्यंत जो ब्रह्माचा विचार केला, तो आपल्या स्वतःच्या दृष्टीनें म्हणजे प्रत्येक व्यक्तीच्या दृष्टीनें केला. आतां याच्यापुढें जो या प्रकरणांत विचार केला आहे तो ब्रह्माच्या दृष्टीनें केला आहे. म्हणजेच ब्रह्माला दृष्टि आहे अशी कल्पना करून त्याच्या दृष्टीनें जगाचें स्वरूप कसें आहे याचा विचार केला आहे. ब्रह्माचें स्वरूप कसें आहे याचा विचार मागील प्रकरणांत सविस्तर करण्यांत आलाच आहे. ब्रह्म कसें आहे हें समजावून देणें जरी अशक्य नसलें तरी फारच कठीण आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण त्याचें असेंच कांहीं विलक्षण स्वरूप आहे कीं, प्रत्यक्ष वेद देखील त्याचें प्रत्यक्ष वर्णन करूं शकत नाहीं. म्हणूनच ' यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह ' म्हणजे मनासह वाणी ब्रह्मापर्यंत जाऊं शकतच नाहीं. कारण तें 'अनाख्यम्', 'अनभिव्यक्तम्,' अज्ञातन्हेचें आहे. म्हणून त्याच्या बाबतींत विद्वान लोक मौनच धारण करतात. " गुरोस्तु मौनं व्याख्यानम् ' गुरूचें ब्रह्माविषयीं मोठें व्याख्यान म्हणजे मौनच होय, असें म्हटलें आहे. असें जरी असलें तरी या ब्रह्माचें विधिमुखानें ( प्रत्यक्ष ) वर्णन करितां येत नाहीं. असें जरी असलें तरी अज्ञ पुरुषांना त्याची कांहींतरी कल्पना येण्याकरितां श्रुतीनें ' नेतिनेति ' असा सर्व दृश्य पदार्थांचा निषेध करून ' निषेधावधिभूतं ब्रह्म ' म्हणजे ज्याचा शेवटीं निषेध करितां येत नाहीं तेंच ब्रह्म, असा मोठा मार्मिक उपदेश केला आहे. उपदेशाचा विषय जें ब्रह्म तोंच आपला प्रत्येकाचा आत्मा असल्यामुळें त्याचा निषेध होऊं शकत नाहीं. सर्व मिथ्या पदार्थांच्या निषेधाची पराकाष्ठाच ब्रह्म आहे, त्यामुळें निषेधमुखानें सर्व पदार्थांचा बाध करून अवशिष्ट रहाणाऱ्या ब्रह्माचा लक्षणेनें उपदेश करितां येतो. सर्वांचा बाध झाल्यावर त्या बाधाला जाणणारें जें तत्त्व अवशिष्ट रहातें, तेंच ब्रह्म आहे, तोच आत्मा आहे ' असा उपदेश करितां येतो. तो ऐकून शिष्य सर्व

अनात्म वस्तूंचा ' हें मी नव्हे ' असें समजून घेऊन त्या सर्वांचा बाध करितों' आणि शेवटीं तो बाध करणाराच स्वतः स्वरूपानेंच अवशिष्ट रहातो अशातऱ्हेनें जोंपर्यंत या ब्रह्माचें स्वरूप साक्षात् अनुभवाला आलें नाहीं' तोंपर्यंत हें सर्व दृश्य जगत् भासल्याशिवाय रहाणार नाहीं. अशा अर्थाचें वर्णन निर्वाण प्र. पूर्वार्ध सर्ग २ मध्यें श्लोक ३०–३५ मध्यें केलें आहे, त्याचा सारांश पुढें दिला आहे:—

जोंपर्यंत अज्ञानाची कल्पना आहे, जोंपर्यंत ' मी ब्रह्म आहे ' अशी भावना उदयाला आली नाहीं, जोंपर्यंत या जगज्जालामध्यें आस्था आहे तोंवर चित्तादिकांचा विभ्रम असतो. जोंपर्यंत देहाला मी म्हटलें जातें व जोंपर्यंत या दृश्यजगांतील पदार्थांमध्यें ' हा माझा ' अशी आस्था वाळगिली जाते, तोंपर्यंत चित्तादिकांचा भ्रम असतो. जोंवर सज्जनसंगतीनें पूर्णता प्राप्त झालेली नसतें; व जोंवर मूर्खपणा क्षीण झालेला नसतो, तोंवर हें नीच चित्त असतें. जोंवर ही भुवनादिकांची भावना यथार्थज्ञानाच्या सामर्थ्यानें आंतून शिथिल झाली नाहीं, तोंवर चित्तादिक स्पष्टपणें भासणारच. जोंवर अज्ञरूपी अंधत्व असतें, विषयांच्या आशेनें परवशता असते, जोंपर्यंत हृदयरूपी वनांत आशारूपी विषाचा वास सर्वत्र पसरलेला असतो, तोंवर श्रेष्ठ विचाररूपी चकोर पक्षी त्यांत मुळींच प्रवेश करीत नाहीं.

सारांश, या दृश्य जगाचें भान अज्ञानामुळें होत असतें, पण हें अज्ञान सूर्याच्या ठिकाणीं जसा अंधार नाहीं त्याप्रमाणें ब्रह्माच्या ठिकाणीं नसल्यामुळें ब्रह्माच्या दृष्टीनें जगत् म्हणून कांहीं आहे, असें म्हणतां येत नाहीं. आतां ब्रह्माला दृष्टि आहे, अशी कल्पना करून ब्रह्म जगाकडे कोणत्या दृष्टीनें पहातें, असा प्रश्न केल्यास त्याचें उत्तर असें कीं, सूर्य ज्याप्रमाणें शून्य आकाशाला पहातो, त्याप्रमाणें ब्रह्म जगाकडे पहातें, अर्थात् आपल्या स्वरूपांत जग मुळींच नाहीं असें तें पहातें.

## ब्रह्म निर्विकारी.

याच तऱ्हेनें ब्रह्माच्या दृष्टीनें विकार म्हणून कांहीं नसल्यामुळें ब्रह्म निर्विकारी आहे. विकार म्हणजेच अन्यथाभाव किंवा रूपांतर होय. पाण्याचें

चर्म किंवा वायु यासारखें आकारांतर नव्हे, विकाराची व्याख्या वसिष्ठांनीं अशी केली आहे कीं,

> अपुनःप्रागवस्थानं यत्स्वरूपविपर्ययः ॥
> तद्विकारादिकं तात यत्क्षीरादिषु वर्तते ॥ नि. पू. ४९-२.

" दुधाचें एकदां दहीं बनलें म्हणजे पुनः त्याचें दूध बनत नाहीं, त्याप्रमाणें पदार्थाच्या स्वरूपामध्यें असा बदल होतो कीं परत त्याला मूळची अवस्था प्राप्त होत नाहीं, अशा स्थित्यंतराला विकार असें म्हणतात. " अशातऱ्हेचा विकार ब्रह्माच्या ठिकाणीं संभवत नाहीं. म्हणून ब्रह्माच्या दृष्टीनें विकार म्हणून कांहीं आहे असें म्हणतां येत नाहीं. एकंदर जायते, अस्ति, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते व नश्यति असे हे सहा विकार आहेत. ते सर्व ह्या दृश्य पदार्थांनाच प्राप्त होत असतात. ब्रह्माच्या ठिकाणीं ह्या विकारांचा मुळींच संबंध नाहीं; कारण तें निराकार, निरवयव, एक आणि नित्य आहे असें वसिष्ठ सांगतातः—

> आत्मात्वाद्यंतमध्येषु समः सर्वत्र सर्वदा ॥
> स्वमप्यन्यत्वमायाति नात्मतत्त्वं कदाचन ॥ नि. पू. ४९-८.
> अरूपत्वात्तथैकत्वान्नित्यत्वादयमीश्वरः ॥
> वशं भावविकाराणां न कदाचन गच्छति ॥नि. पू. ४९-९.

" आत्मा, आदि, अंत व मध्य या अवस्थांमध्यें सर्वत्र व सर्वदा सम म्हणजे एकसारखा आहे. त्यामुळें तो स्वभावतःहि अन्यत्वास प्राप्त होत नाहीं. हा ईश्वर निराकार, एक व नित्य असल्यामुळें केव्हांहि भावविकारांच्या आधीन होत नाहीं." म्हणूनच हें ब्रह्म सृष्टीच्या पूर्वी, मध्यें व शेवटीं अनादि, अनंत व निर्विकार असेंच असतें.

अशा रीतीनें ब्रह्माच्या दृष्टीनें विचार केल्यास एका ब्रह्माशिवाय दुसरें कांहींच नाहीं व तें ब्रह्म आपण आहों अशी दृष्टि धारण केली तर या प्रपंचांत सुख, दुःख, यातना, त्रास भोगण्याचा प्रसंग कधींहि येणार नाहीं. ही दृष्टि कोणत्या प्रकारची असते, त्याचें वर्णन वसिष्ठांनीं नि. प्र. पू. सर्ग ११ मध्यें विस्तृत केलें आहे. त्याचा थोडक्यांत सारांश असा

आहेः—ब्रह्माच्या दृष्टीनें विचार केल्यास शत्रु, मित्र, सुख, दुःख या सर्व कल्पनांच आहेत. कारण एका ब्रह्माशिवाय दुसरें कांहींच नाहीं. हें अद्वितीय ब्रह्मच आहे. आतां जर ब्रह्म मज ब्रह्माचें अप्रिय करणारें असेल तर तें ब्रह्म माझा शत्रु होईल. पण तसें नाहींच. म्हणूनच ह्या ब्रह्मदृष्टीनें माझ्या ठिकाणीं रागद्वेषाची प्रतीच नाहीं. कारण सर्व जर ब्रह्म आहे, तर रागद्वेष कोणामुळें होणार ? मरणहि ब्रह्मच आहे व या मरण ब्रह्मामध्यें देहब्रह्म यदृच्छेनें सुसंगत झालें असतां दुःख करण्याचें काय प्रयोजन ! तरंगाचा नाश झाला तरी पाण्यांतील एकहि बिंदु नाश पावत नाहीं. शरीराच्या नाशानें ब्रह्माच्या नाशाची कल्पना कशी होणार ? कारण पाण्याहून तरंग जसे भिन्न नसतात त्याप्रमाणें ब्रह्माहून शरीरादिक भिन्न नाहींत. जो जलाचा थेंब, जो तुषार, जी लाट, जो मोठा तरंग, जो फेस व जी ल्हानशी लहर, तें सर्व पाण्यांतील पाणीच आहे. त्याप्रमाणें जो देह, जो इंद्रियांचा व्यापार, जे भोग्य विषय, जी संपत्ति व विपत्ति, हर्षविकारादि भावना वगैरे सर्व ब्रह्मामध्यें ब्रह्मच आहे.

अशा तऱ्हेची ब्रह्मदृष्टि अज्ञानी माणसाच्या ठिकाणीं निर्माण न झाल्यामुळें त्याला सर्व जगत् दुःखमय भासतें असें वसिष्ठ सांगतातः—

अज्ञस्य दुःखौघमयं ज्ञस्यानंदमयं जगत् ॥
अंधं भुवनमंधस्य प्रकाशं तु सचक्षुषः ॥ नि. पू. ११-३३

" अज्ञ पुरुषाला जग दुःखमय व ज्ञानी पुरुषाला आनंदमय भासतें, अंधळ्याला सर्व जग अंधळें वाटतें व डोळस माणसाला प्रकाशमय वाटतें. "*

अशा तऱ्हेची ब्रह्मदृष्टि उत्पन्न न होण्याचें कारण वैराग्याचा अभाव असें वसिष्ठांनीं शेवटीं सांगितलें आहे.

या ब्रह्म दृष्टीसंबंधानें वसिष्ठांनीं निर्वाण प्र. उ. सर्ग ३९ मध्यें आपल्या स्वतःच्या संबंधानें वर्णन केलें आहे, तें पुढें थोडक्यांत दिलें आहेः—

* अशा तऱ्हेचें श्रीतुकाराममहाराजांनीं ' आंधळ्याला जग सारेंची आंधळें ' असें वर्णन केलें आहे.

" मी केवळ ब्रह्मरूप आहे, त्यामुळें या संसारांतील सर्व जीव माझ्यामध्यें वायूंतील स्पंदाप्रमाणें आपल्या सर्व व्यवहारासह राहतात. स्वप्न पहाणाऱ्या पुरुषांचें स्वप्न जसें त्याहून भिन्न नसतें त्याप्रमाणें त्यांचा सद्रूप आत्मा मी आहे. निद्रित पुरुषाच्या स्वप्नाप्रमाणें खरोखर ते संसारी जीव अविद्यमानच आहेत. त्यांच्याशीं माझा जो व्यवहार होतो, तो ब्रह्मामध्यें अवस्थित असलेलें ब्रह्मच आहे. तथापि त्यांच्या दृष्टीनें मी त्यांना उपदेश करीत आहे, असें दिसतें. ते जर मला अशा दृष्टीनें पहात असतील, तर खुशाल पाहोत. मला त्यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. आत्म्यामध्यें अगोदर मी म्हणून कोणी निराळा नाहीं, मग माझा उपदेशादि व्यवहार कोठचा ? ही सर्व ब्रह्मसत्ताच पसरलेली आहे. ही माझी वाणीसुद्धां ब्रह्मरूप असून तुमच्यासाठींच उदय पावते."



# प्रकरण ३४ वें.

## ब्रह्मच जगत्.

आतांपर्यंत जो विचार केला त्यावरून असें दिसून येतें कीं, अव्यक्त मनाचें व्यक्त स्वरूप म्हणजेच जग होय व मन म्हणजे आत्म्याच्या स्पंदशक्तीचें स्पष्ट स्वरूप असल्यामुळें ब्रह्मच जगत् आहे असें वसिष्ठ सांगतात :—

ब्रह्मबृंहैव हि जगज्जगच्च ब्रह्मबृंहणम् ॥ नि. पू. २-५१.

"जगत् ही ब्रह्माचीच मोहामुळें झालेली वृद्धि आहे व ज्ञान झाल्यावर जगत् ब्रह्मस्वभावानेंच व्यापलेलें आहे, असें कळून येतें." हीच गोष्ट वसिष्ठांनीं खालील श्लोकांत आणखी स्पष्ट करून सांगितली आहेः—

आत्मैव स्पंदते विश्वं वस्तुजातैरिवोदितम् ॥
तरंगकणकल्लोलैरनंताव्वंबुधाविव ॥ ५-७२-२३
यदिदं किंचिदाभोगि जगज्जालं प्रदृश्यते ॥
तत्सर्वममलं ब्रह्म भवत्येतद्व्यवस्थितम् ॥नि. पू ११-१६

"समुद्राच्या ठिकाणीं तरंग, बिंदु लाटा इत्यादि अनेक रूपानें समुद्राचें जलच जसें विलास पावत असतें, तसें विश्वांतील अनंत वस्तूंच्या रूपानें आत्माच विलसत असतो. हें जें कांहीं विस्तीर्ण जगज्जाल दिसत आहे, तें सर्व निर्मल ब्रह्मच आहे." जलाचा यंत्र व तुषार, लाट, मोठा तरंग, फेंस हें सर्व जसें पाण्यामध्यें पाणीच आहे त्याप्रमाणें देह, इंद्रियांचे व्यापार, भोग्यविषय, संपत्ति, विपत्ति ते सर्व ब्रह्मामध्यें ब्रह्मच आहे. सारांश

पाताले भूतले स्वर्गे तृणे प्राण्यंवरेऽपिच ॥
दृश्यते तत्परं ब्रह्म चिद्रूपं नान्यदस्ति हि ॥ नि. पू. २-२८

" पाताळांत, भूतळीं, स्वर्गांत, तृणामध्यें, प्राण्यामध्यें व दुसऱ्याहि सर्वठिकाणीं तें चिद्रुप परब्रह्मच सर्वरूपानें दिसतें. याहून अन्य कांहीं नाहीं." सृष्टीच्या पूर्वी हें जगत् ब्रह्मांत अव्यक्तरूपानें नेहमीं असतें म्हणूनच तें सृष्टीच्या वेळीं त्यामध्यें प्रकट होतें असें वसिष्ठ सांगतातः—

फलपुष्पलतापत्रशाखाविटपमूलवान् ॥
वृक्षबीजे यथावृक्षस्तथेदं ब्रह्मणि स्थितम् ॥ ३-१००-१०
सूर्यकान्ते यथा वन्हिर्यथा क्षीरे घृतं तथा ॥ नि. पू. ९-५२
चिदन्तरस्ति त्रिजगन्मरीचे तीक्ष्णता तथा ॥ नि. पू. २-५२
अनुत्कीर्णा यथा पङ्के पुत्रिकाचाथ दारुणि ॥
यथा वर्णा मषीकल्के तथा सर्गाः स्थिताः परे ॥ ३-६१-२४

" फल, पुष्प, लता, पत्र, शाखा, स्कंध आणि मुळें यांनीं युक्त असलेला वृक्ष जसा बीजामध्यें सूक्ष्मरूपानें असतो, त्याप्रमाणें हें जग ह्या ब्रह्मामध्यें सूक्ष्मरूपानें असतें. सूर्यकांतमण्यामध्यें जसा अग्नि दुधामध्यें जसें तूप, मिरचीमध्यें जसा तिखटपणा त्याप्रमाणें हें सर्व त्रैलोक्य ह्या चिदात्म्यामध्यें आहे. मातीच्या ठिकाणीं बाहुली व लाकडाच्या ठिकाणीं प्रतिमा कोरून काढण्यापूर्वी जशी अव्यक्तरूपानें असते, किंवा काळ्या रंगामध्यें त्याच्या योगानें पुढें रेखाटल्या जाणाऱ्या चित्रांतील निरनिराळ्या रंगाच्या जशा छटा असतात, त्याप्रमाणें या सर्व सर्गपरंपरा उत्पत्तीपूर्वी परब्रह्मामध्येंच स्थित असतात."

## ब्रह्म आणि जगत् परमार्थतः एकच आहेत.

पारमार्थिक सत्यतेमध्यें ब्रह्म व जगत् दोन्ही एकरूपच आहे. म्हणून ब्रह्माप्रमाणें जगहि सत्यच आहे पण तें जगाच्या स्वरूपानें मात्र सत्य नाहीं. ब्रह्म एक असून जगामध्यें जणूं अनेक बनलें आहे असें भासतें. पण विवेकदृष्ट्या ब्रह्माचें अद्वितीयत्वच सिद्ध होतें. ब्रह्म एक असूनहि त्याच्याविरुद्ध नानात्वाचे स्वभाव अथवा रूपें धारण करीत असतें, असें मोठें मार्मिक वर्णन वसिष्ठांनीं नि. प्र. उ. सर्ग ३५ (श्लोक ६-१३) मध्यें केलें आहे. त्याचा सारांश असा आहे :—

" हें एकच ब्रह्म जगाच्या रूपानें अनेकाकार होऊन राहिलें आहे. ब्रह्म परिपूर्ण आहे, तरी परिच्छिन्न ( संकुचित ) असल्यासारखें भासतें. तें शुद्ध आहे, तरी अशुद्ध असल्यासारखें दिसतें. तें शून्य नसतां प्रलयकालीं शून्यासारखें भासतें व सृष्टीच्या वेळीं शून्य असूनहि अशून्यासारखें भासतें. देशकालतः जरी तें व्यापक असलें तरी परिच्छिन्न असल्यासारखें भासतें. अशा जरी त्या ब्रह्माच्या ठिकाणीं परिच्छिन्नतेचा भास झाला, तरी तें स्वरूपतः अपरिच्छिन्नच आहे. तें मूळचें निर्विकार, पण उपाधीमुळें विकारपावणारेसें दिसतें. तें सम व शांत असूनहि विषम व अशांत असल्याचा अनुभव येतो. तें वस्तुतः सद्रूप असूनहि असत् असल्यासारखें भासतें. कारण तें दिसत नाहीं. तें तत्त्व आहे, पण अतत्त्वासारखें दिसतें. त्याच्यामध्यें विभाग नाहीं पण पदोपदीं विभागाचा अनुभव येतो. त्यांत जाड्य नाहीं तरी तें जडासारखें दिसतें. वस्तुतः तें निर्विषय आहे, तथापि विषयरूपानें प्रतीत होतें. त्याला अंश नाहींत तरी सांश असल्यासारखें दिसतें. भगवान् श्रीकृष्णानें गीतेमध्यें " ममैवांशोजीवलोके जीवभूतः सनातनः " जीव हा माझा अंश आहे, असें सांगितलें आहे. ह्यांत अहंकार नाहीं, तथापि हा मी असें प्रत्येक जीव म्हणतो. तें अविनाशी असून क्षणभंगुर आहे असें भासतें, त्याच्यामध्यें कलंक नाहीं, तरी ते कलंकित दिसतें. तें अज्ञेय आहे, तरी ज्ञेयासारखें प्रतीत होतें. स्वयंप्रकाश असूनहि गाढ अंधकाराप्रमाणें व पुरातन असूनहि नवीन असल्यासारखें भासतें. परमाणुहूनहि सूक्ष्म असलें तरी तें आपल्या स्वरूपांत हजारों ब्रह्मांडांना धारण करितें. बंधरहित असूनहि अनेक बंधनांनीं युक्त, अनेक प्रकारांनीं दिसत असलें तरी अद्वितीय, मायारहित असूनहि विविध मायारूपी किरण समुदायांनीं परिवेष्टित झालेला जणुं काय सूर्यच असें हें ब्रह्म आहे.

## ब्रह्माची सत्ता म्हणजेच जगाची सत्ता.

जगाच्या रूपानें भासणें हा जणुं ब्रह्माचा स्वभावच आहे, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे व तें त्यांनीं पुढील श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे:—

एपएव स्वभावोऽस्या यदेवं भाति भासुरा॥ नि. उ. १९१-१०
एतत्तु स्वप्नसंकल्पनगरेष्वनुभूयते ॥ नि. उ. १९१-११

" असें जगाच्या रूपानें भासणें हा या चितीचा ( ब्रह्माचा ) स्वभावच आहे व ही गोष्ट स्वप्न, मनोराज्य यांमध्यें अनुभवास येतें. " इतकेंच सांगून वसिष्ठ स्वस्थ बसले असें नसून त्यांचें पुढें असेंहि म्हणणें आहे कीं, ब्रह्मस्वरूपामध्यें नेहमीं ब्रह्मांडांची सत्ता आहेच. चिदाकाशामध्यें अगणित ब्रह्मांडें सतत उत्पन्न होत असतात, रहातात व विलीन होतात.

ब्रह्मांडाशिवाय चिदाकाश केव्हांहि असूं शकत नाहीं.

संनिवेशं विना सत्ता यथा हेम्नो न विद्यते ॥
तथा जगदहंभावं विना नेशस्य संस्थितिः ॥ नि. उ. ९६-४२
चित्सत्तैव जगत्सत्ता जगत्सत्तैव चिद्वपुः ॥ ३-१४-७५

कांहींतरी आकार प्राप्त झाल्यावांचून सोन्याची सत्ता जशी सिद्ध होत नाहीं, त्याप्रमाणें जगत्, अहंभाव, यावांचून ईश्वराची ( ब्रह्माची ) सत्ता सिद्ध होत नाहीं. चैतन्याची ( ब्रह्माची ) सत्ता म्हणजेच जगाची सत्ता व जगाची सत्ता म्हणजेच चैतन्याचें शरीर. "

यावरून ब्रह्माची सत्ता म्हणजेच जगाची सत्ता असें वसिष्ठांचें म्हणणें आहे. या सिद्धांताच्या पुष्टीकरितां त्यांनीं अनेक दृष्टांत दिले आहेत, त्यापैकीं थोडे पुढें दिले आहेतः—

ब्रह्म हें आकाश व जग हें त्याचें शून्यत्व, ब्रह्म हा वायु व जग हा त्याचा स्पंद, ब्रह्म हा सूर्य व जग ही त्याची उष्णता, इत्यादि अनेक दृष्टांतांची मोठी मालिका उत्पत्ति प्र. सर्ग ३ मध्यें पहावयास मिळते. या सर्व दृष्टांतांवरून असें दिसून येतें कीं, पदार्थांचे स्वभाव जसे पदार्थांहून निराळे नसतात, त्याप्रमाणें जगत् हा ब्रह्माचा स्वभाव आहे, असें मानल्यामुळें तें ब्रह्माहून मुळींच निराळें नाहीं. जग ह्या शब्दाचा अन्य लोकांच्या दृष्टीला भासणारा अर्थ सोडून दिला तर जग आणि ब्रह्म यांच्या वास्तविक स्वरूपांत मुळींच भिन्नता नाहीं. वास्तव, एकच सत् चित्

आनंदरूप ब्रह्मच जगाच्या रूपानें भासत आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## ब्रह्माचा अलिप्तपणा.

जगाची उत्पत्ति, स्थिति व प्रलय इत्यादिकांनीं परब्रह्मामध्यें यत्किंचित्‌हि फरक होत नाहीं. त्याच्या पूर्णतेमध्यें जग थोडीहि अधिक भर घालीत नाहीं व त्याच्या पूर्णतेंतून कांहीं काढूनहि घेत नाहीं; तर त्याचें स्वयंसिद्ध पूर्ण स्वरूप जसेंच्या तसेंच रहात असून जग त्याच्यांत व्यापार करीत असूनहि त्याचा ब्रह्माला थोडाहि स्पर्श होत नाहीं, असें वसिष्ठ सांगतात:—

> स्वाधारैरंबुदैः स्वस्थैर्न स्पृष्टं गगनं यथा ॥
> चित्स्थैः सर्गैश्चिदाधारैर्न स्पृष्टा चित्परा तथा ॥ ४-३६-५
> यथा पयसि वीचीनामुन्मज्जननिमज्जनैः ॥
> न जलान्यत्वमेवं हि भावाभावैः परे पदे ॥ नि. उ. १९७–२

" मेघांना आकाशाचा आधार आहे व ते आकाशांत रहात असूनहि जसा त्यांचा स्पर्श आकाशाला होत नाहीं; म्हणजेच मेघांतून पडणाऱ्या पर्जन्याच्या योगानें आकाश जसें ओलें होत नाहीं, त्याप्रमाणें जगाच्या घडामोडी ब्रह्माच्या आधारावर व ब्रह्मामध्येंच होत असूनहि त्यांचा ब्रह्मावर कांहींच परिणाम होत नाहीं. जलामध्यें तरंगाचा सारखा उद्भव व लय जरी होत असला तरी जलामध्यें जसा कांहींहि निराळेपणा उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें जगाच्या सारख्या घडामोडी चालू असल्या तरी त्याच्या स्वरूपांत यत्किंचित्‌हि फरक होत नाहीं.

## ब्रह्मच जडचेतनात्मक जगत्.

चिद्रूप ब्रह्मच जडचेतनात्मक जगाच्या रूपानें बनलेलें आहे. तेंच द्रष्टा व दृश्य झालें आहे असें वसिष्ठांनीं खालील श्लोकांत स्पष्ट केलें आहे:—

> चिभाग एव दृश्यत्वं द्रष्टृत्वं चैव गच्छति ॥
> एतच्च कल्पनं स्वप्नपुरादिष्वनुभूयते ॥ नि. उ. ५४-८

याचा भावार्थः "ब्रह्माचा जीवभावानें विभाग होतो, ही कल्पना जेव्हां गृहीत धरली गेली, तेव्हां तें एकच ब्रह्म चिदंशप्राधान्यानें द्रष्टा होतें व सदंश प्राधान्यानें चिद्रूपाला आच्छादित करून दृश्य बनतें. ज्याप्रमाणें स्वप्नांत व्यावहारिक जीवाहून प्रतिभासिक जीवाचा विभाग झाला असतां निद्रेनें आच्छादित झालेला व्यावहारिक जीवच स्वप्नांतील जीवाला दिसणाऱ्या पदार्थरूपास प्राप्त होतो; तसेंच ब्रह्म जड दृश्य बनतें."

यावरून एक चिद्रूप ब्रह्म जडचेतन रूप जगत् बनलें आहे, असें स्वप्न-दृष्टांतानें युक्तीनें सिद्ध केलें आहे. जसा एकच जड रंग चित्रांतील मनुष्यासारखे चेतन पदार्थ व पाषाण वृक्षासारखे जड पदार्थ बनलेला असतो; तसेंच एकच ब्रह्म जडचेतनाच्या म्हणजे दृश्यद्रष्ट्याच्या रूपानें बनलेलें आहे.



# प्रकरण ३५ वें.

## दृश्य जगाची सत्यता.

एकंदर सत्यतेचे तीन प्रकार करण्यांत आले आहेत. एक प्रातिभासिक सत्यता, दुसरी व्यावहारिक सत्यता व तिसरी पारमार्थिक सत्यता. प्रातिभासिक सत्यता व्यावहारिक सत्यतेवर आधारलेली आहे. जसें व्यवहारांतील सत्य दोरीवर प्रातिभासिक सर्प भासत असतो. म्हणून दोरीच्या दृष्टीनें सापाला सत्यत्व नाहीं. व्यावहारिक सत्यताहि पारमार्थिक सत्यतेवर आधारलेली आहे. व्यवहारांतील भासणारे सर्व पदार्थ पारमार्थिक सत्य ब्रह्मावर अधिष्ठित आहेत. म्हणूनच या जगांतील पदार्थ आपल्याला जसें दिसतात तसेंच ते खरोखर असतात असें वसिष्ठ मानीत नाहींत; कारण खऱ्या सत्यतेचें लक्षण म्हणजे 'शाश्वत टिकून राहणें' हा नुसत्या भासणाऱ्या पदार्थांच्या ठिकाणीं लागू पडत नाहीं. जगांतील सर्व पदार्थ आज ना उद्यां केव्हां तरी नाश पावणारेच असतात. सत्य हा शब्द सत् म्हणजे असणें ह्या मूळ धातूपासून झालेला आहे. म्हणून सत्याचा स्वभाव जो 'अस्ति' (आहे) त्याच्या विरुद्ध असणारा 'नास्ति' (नाहीं) हा स्वभाव कसा धारण करील ? म्हणूनच वसिष्ठ सांगतात कीं,

यदस्ति तस्य नाशोऽस्ति न कदाचन राघव ॥ ३-४-६२.

'जें आहे त्याचा केव्हांहि नाश होत नाहीं.' भगवद्गीता देखील हेंच तत्त्व प्रतिपादन करते.*

याच सिद्धांतावरून 'खऱ्याला मरण नाहीं' अशी म्हण पडली आहे.

### पारमार्थिक सत्य.

वसिष्ठांनीं खऱ्या सत्याचें (पारमार्थिक सत्याचें) स्वरूप समजावून देण्याकरितां पुढील लक्षणें सांगितलीं आहेतः—

---

* नाभावो विद्यते सतः ॥ (भ. गी. २-१६). सत्चा अभाव (नाश) केव्हांहि होत नाहीं.

आदावंते च यन्नित्यं तत्सत्यं नाम नेतरत् ॥ ५-५-९.
आदावंते च यत्सत्यं वर्तमाने सदैव तत् ॥ ४-४५-४५.
आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा ॥ ४-४५-४६.
आदावंते च यन्नास्ति कीदृशी तस्य सत्यता ॥ ५-५-९.

" जें आदि अंतीं नित्य असतें, तेंच वास्तविक सत्य होय. ह्याहून निराळें असें सत्य नाहीं. जें आदि अंतीं सत्य असतें, तें वर्तमान कालींहि सत्यच असतें, जें आदि अंतीं नसतें ते वर्तमान कालींहि नसतेंच. जें आदि अंतीं नसतें, त्याला कसली सत्यता ? "

मांडुक्योपनिषदावरील गौडपादांच्या " आदावंते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा " या कारिकेंतहि अशा तन्हेचीच व्याख्या केली आहे. म्हणून वसिष्ठ शेवटीं असा निर्णय करितात कीं,

याद्दगाद्यन्तयोर्वस्तु ताद्दगेव तदुच्यते ॥
मध्ये यस्य यदन्यत्वं तद्बोधाद्विजृंभितम् ॥ नि.पू. ४९-७.

" आदिअंतीं वस्तूचें जें स्वरूप तेंच त्याचें खरें स्वरूप होय. मध्यें जो निराळेपणा प्रतीतीला येतो त्याचें कारण अज्ञान होय."

हें जें वर सत्याचें लक्षण सांगितलें आहे, तें पारमार्थिक सत्याचेंच आहे; कारण हें लक्षण एका ब्रह्माच्या ठिकाणींच लागू पडतें, म्हणूनच ब्रह्माला 'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म' ह्या श्रुति वाक्यांत 'सत्य' असें म्हटलें आहे.

'ॐ तत् सत् इति निर्देशः ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ॥' भ. गी. १७-२३.

ह्या भगवद्गीतेंतील श्लोकार्धांत 'सत्' ह्या नांवानें ब्रह्माचा निर्देश केला आहे. जगांतील सर्व दृश्य पदार्थांना अशा वरील लक्षणानें सत्य म्हणतां येत नाहीं, कारण हे सर्व पदार्थ उत्पन्न होतात व नाश पावतात. असें जरी असलें तरी दररोज अनुभवाला येणाऱ्या या सर्व जगांतील पदार्थांना सर्वशः असत्य असें म्हणतां येणार नाहीं, म्हणूनच ह्या सर्व पदार्थांना 'मिथ्या' किंवा 'भ्रांतिमात्र' असें वसिष्ठांनीं म्हटलें आहे. भ्रमामध्यें भासलेल्या पदार्थांमध्यें सत्यपणा आहे व असत्यपणाहि आहे.

सत्यपणा अधिष्ठानाचा आहे व असत्यपणा मुळींच नसल्यामुळें त्याचा विचार करण्याचें कारणच नाहीं. उदाहरणार्थ, दोरीवर भासलेल्या सर्पामध्यें सत्यपणा आहे व असत्यपणाहि आहे. सत्यपणा सापाच्या अधिष्ठानाचा म्हणजे दोरीचा आहे. म्हणजेच ' साप आहे ' या वाक्यांतील ' आहे ' या शब्दानें दर्शविलेलें अस्तित्व ( सत्यपणा ) हें दोरीचें आहे व सापाचें नुसतें भासणें हा असत्यपणा सापाचा आहे. असत्यपणा खरा नसल्यामुळें साप नाहींसा झाल्यावरोवर तो नाहींसा होतो. यावरूनच वसिष्ठांनीं जगाला ' मिथ्या ' किंवा ' सदसन्मात्र ' म्हणजे धड खरेंहि नाहीं व खोटेंहि नाहीं, असें म्हटलें आहे; पण वास्तविक हें वसिष्ठांना मुळींच मान्य नाहीं. कारण हें सर्व जगत् ' असत् ' आहे असें ते मानणारे आहेत. म्हणूनच त्यांना जगाच्या मिथ्यावादापेक्षां ' असत् वाद ' किंवा ' अजातवाद ' हा अधिक मान्य आहे. अजातवादाचें स्वरूप तेवीसाव्या प्रकरणांत सविस्तर सांगितलें आहे. हा अजातवाद सर्वमान्य होणारा नसल्यामुळें वसिष्ठांनीं ह्या जगाचें स्वरूप सांगण्याकरितां मिथ्यावाद ( मायावाद ) जरी पत्करला असला तरी या वादानेंहि अजातवादानें मिळणारें फल प्राप्त होतें.

## जग सदसदात्मक आहे.

आतां वसिष्ठांनीं हा सदसदात्मक वाद कोठें आणि कसा मानला आहे याचा विचार करूं. प्रथम वसिष्ठ म्हणतात कीं जग खरेंहि नाहीं व खोटेंहि नाहीं:—

> एवं न सन्नासदिदं भ्रांतिमात्रं विभासते ॥ ३-४४-४७
> न तत्सत्यं नचासत्यं रज्जुसर्पभ्रमोयथा ॥ ३-४४-४१
> न सत्यं नच मिथ्यैव स्वप्नजालमिवोत्थितम् ॥ नि.पू.११४-२०

हें जग सत् नाहीं व असत्हि नाहीं तर केवळ भ्रांतिमात्र भासत आहे. रज्जूच्या ठिकाणीं झालेल्या सर्पाच्या भासाप्रमाणें हें जग सत्यहि नाहीं व असत्यहि नाहीं. स्वप्नांतील जगाप्रमाणें हें जग सत्यहि नाहीं व मिथ्याहि नाहीं.

आतां यापुढें वसिष्ठ म्हणतात कीं जग सत् व असत्‌हि आहे.

सती वाऽप्यसती तापनद्येव लहरी चला ॥
मनसेंद्रियजालश्रीर्जगती प्रवितन्यते ॥३-१-१९
असत्यमस्थैर्यवशात्सत्यं संप्रतिभासतः ॥
यथास्वप्नस्तथाचेत्तं जगत्सदसदात्मकम् ॥ ३-६५ ५
असत्यमेव सत्याभं प्रतिभानमिदं स्थितम् ॥ ३-५४-२१

" मनानें निर्माण केलेलें जग सूर्याच्या प्रखर उजेडांत भासणाऱ्या मृगजलाप्रमाणें सत् आहे व असत्‌हि आहे. जसें स्वप्न स्थिर नसल्यामुळें, असत्य आहे व भासतें यामुळें, सत्यहि आहे; तसें जग सदसदात्मक आहे. हें जग असत्य असूनहि सत्यासारखें भासतें. म्हणून त्याला प्रतिभान असें म्हणतात." या सर्व वर्णनावरून वासिष्ठांनीं जगाला सदसदात्मक म्हणजे भ्रांतिमात्र असेंच शेवटीं ठरविलें आहे.

एवं तावदिदं विद्धि दृश्यं जगदिति स्थितम् ॥
अहंचेत्याद्यनाकारं भ्रांतिमात्रमसन्मयम् ॥ ४-१-२

" जगद्रूपानें स्थित असणारें हें अखिल दृश्य आणि अहं म्हणजे ह्याला पहाणारा द्रष्टा हीं सर्व भ्रांतिमात्र, निराकार आणि असन्मय आहेत असें समज."

इदं दृश्यभरभ्रांतिर्नन्वविद्येति चोच्यते ॥
वस्तुतो विद्यतेनैषा तापनद्यां यथा पयः ॥ नि. उ. ५२-५

"ह्या दृश्य भ्रांतीलाच अविद्या असें म्हणतात. वस्तुतः मृगजलाच्या नदीमध्यें जसें जल नसतें, त्याप्रमाणें ही अविद्या मुळींच विद्यमान नाहीं." म्हणून हिला ' न विद्यते ' ( असत नाहीं ) ह्या व्युत्पत्तीनें अविद्या असें म्हटलें आहे. ह्या अविद्येला माया 'या मा सा माया' म्हणजे जी नाहीं ती माया असेंहि म्हटलें आहे. वस्तुतः ही माया मुळींच नाहीं, जोंपर्यंत हिच्या खरेपणाचा विचार केला नाहीं तोंपर्यंतच ती भासत रहाते. ही माया कोठून कशी उत्पन्न झाली ! या गोष्टीचा विचार करीत न बसतां ती नाहींशी कशी होईल याचाच अगोदर विचार केला पाहिजे, असें वासिष्ठांचें मत आहे.

जग हें भ्रांतिमात्र आहे असें जरी असलें तरी तें तसें आहे असें समजून घेऊन ज्यानें आत्मज्ञान संपादन केलें नाहीं त्याला हें जग खरेंच भासणार. अज्ञाच तऱ्हेचें वर्णन वसिष्ठांनीं उत्पत्ति. प्र. सर्ग ४२ मध्यें श्लोक १ ते ६ मध्यें केलें आहे. तत्त्ववेत्त्याच्या दृष्टीनें जगत् मिथ्या असतें, परंतु ज्याची वृत्ति परब्रह्मस्वरूपांत स्थिर झालेली नाहीं, अशा मूढ पुरुषांना हें जगत् वज्राप्रमाणें दृढ व परमार्थ सत्य वाटतें. लहान मुलाला वेताळाची ( बागुलबोवाची ) भीति मरणप्राय दुःख देते त्याप्रमाणें हें जग वस्तुतः मिथ्या असतांहि अज्ञानी मनुष्याला तें खरें भासतें. सूर्याचे किरण मृगजलाचा आभास उत्पन्न करून मृगांना भ्रमविण्यास कारणीभूत होतात, त्याप्रमाणें अज्ञानी मनुष्याला हें भ्रामक जग सत्य भासतें. स्वप्नांतील मरण खरें नसतांहि सत्य भासतें, त्याप्रमाणें मूढ मनुष्यांना हें जगत् सत्य वाटून सुखदुःखप्रद होतें. सुवर्णाचें स्वरूप ज्याला माहीत नाहीं, त्याला सुवर्णाचें कडें सुवर्णाच्या रूपानें न दिसतां कड्याच्या रूपानेंच दिसतें, अर्थात् कड्यामध्यें सुवर्णच आहे, दुसरें कांहीं नाहीं, हें त्याच्या लक्षांत येत नाहीं; त्याचप्रमाणें नगरें, मंदिरें, पर्वत, वृक्ष, हत्ती इत्यादि नानाविध वस्तूंच्या अस्तित्वामुळें रमणीय भासणारें हें जग अज्ञ मनुष्याच्या दृष्टीनें सत्य दिसतें. जग हें दृश्य व आपण त्याचे द्रष्टे ही भावना त्याच्या चित्तांत बद्धमूल झालेली असते. सर्व जग ब्रह्मरूप आहे हा विचारहि त्याच्या मनाला शिवत नाहीं. तत्त्वतः विचार केला असतां असें दिसून येतें कीं, जग हें मायेचें कार्य आहे. पण मायाच मुळीं मिथ्या असल्यामुळें तिचें कार्य जो प्रपंच तोहि मिथ्या आहे; याला प्रमाण वसिष्ठ सांगतात—

अयं प्रपंचो मिथ्यैव सत्यं ब्रह्माहमद्वयम् ॥
अत्र प्रमाणं वेदांतागुरवोऽनुभवस्तथा ॥ २-२१-३५

“ हा प्रपंच मिथ्या आहे, एक ब्रह्म मात्र सत्य आहे व तेंच आपण आहोंत, या सिद्धांताला मुख्य प्रमाण उपनिषदें. ‘अहं ब्रह्मास्मि’ अशा स्वरूपाचा आत्मा साक्षात्कार ज्यांच्या कृपेनें होतो ते गुरु दुसरें प्रमाण आणि अखेरीस आपला स्वतःचा अनुभव (आत्मप्रतीति) हें तिसरें प्रमाण होय. ”

# प्रकरण ३६ वें.

## आनंदाचें वसतिस्थान.

आनंदाचें वसतिस्थान शोधून काढण्याच्या अगोदर सुख दुःखाच्या स्वरूपाचा विचार करूं.

### सुखदुःखाचें स्वरूप.

महाभारतामध्यें सुखदुःखाचें लक्षण असें सांगितलें आहे कीः---

**यदिष्टं तत्सुखं प्राहुः द्वेष्यं दुःखमिहोच्यते ॥** शांतिपर्व २९५-२७.

" जें कांहीं आपणास इष्ट असतें, तें सुख आणि आपण ज्याचा द्वेष करतो म्हणजे जें आपणास नकोसें होतें, तें दुःख " असें सुखदुःखाचें लक्षण महाभारतांतील पराशर गीतेंत केलेलें आहे. पण तें विचारांतीं पूर्ण निर्दोष होत नाहीं. कारण, ह्याठिकाणीं इष्ट या शब्दाचा अर्थ इष्ट वस्तु असाहि होऊं शकेल. यामुळें इष्ट पदार्थांसहि सुख म्हणण्याचा प्रसंग येईल. पण सुख किंवा दुःख हे पदार्थाचे धर्म नाहींत. उदाहरणार्थ, तहान लागली असतां आपणास पाणी जरी इष्ट आहे तरी पाणी या पदार्थास ' सुख ' असें नांव देतां येत नाहीं. तसें होईल तर नदीच्या पाण्यांत बुडणारा मनुष्य सुखांत बुडाला असें म्हणावें लागेल. पाणी पिण्यानें जी इंद्रियतृप्ति होते तें सुख होय; म्हणून नैय्यायिकांनीं 'अनुकूल वेदनीयं सुखम्' जी वेदना आपल्याला अनुकूल असते तें सुख आणि 'प्रतिकूल वेदनीयं दुःखम्' जी वेदना आपल्याला प्रतिकूल असते तें दुःख अशा व्याख्या देऊन सुख व दुःख या एक प्रकारच्या वेदना ठरविल्या आहेत. या वेदना जन्मसिद्ध आहेत. वेदांत ग्रंथांतून या सुखदुःखाचे तीन प्रकार केले आहेत. ( १ ) आधिदैविक, ( २ ) आधिभौतिक व ( ३ ) आध्यात्मिक. या सुख-दुःखांपैकीं दुःख कोणासच नको व प्रत्येक प्राण्याला सुख किंवा आनंद हवा असतो व तें कसें मिळेल व दुःख कसें टळेल यासाठीं रात्रंदिवस त्याची धडपड चालू असते. परंतु हा आनंद खरा कोठून मिळतो हें न

समजल्यामुळें तो त्याला मलत्याच ठिकाणीं शोधीत सुटतो. पण त्याचा परिणाम असा होतो कीं, त्याला खरा आनंद मिळण्याऐवजीं दुःखच पदरीं पडतें. आपली सर्व बाजूंनीं चांगली भरभराट झाली म्हणजे आपण सुखी होऊं, पण हा सगळा निव्वळ भ्रम आहे. आपातरमणीय म्हणजे वरवर मनोहर दिसणारे, परंतु अखेरीस खात्रीनें क्षय पावणारे असे हे सर्व विषयभोग मनुष्य सतत भोगीत राहिला तरी त्यापासून त्याला असें कोणतें शाश्वत सुख मिळणार आहे? "ये हि संस्पर्शजा भोगाः दुःखयोनय एव ते" (भग० गीता ५-२२). विषय आणि इंद्रियें यांच्या संयोगापासून प्राप्त होणारे भोग दुःखालाच प्रसवणारे आहेत. हे शब्दादि विषय भोग विषाच्या परिणामासारखे परिणाम निर्माण करणारे आहेत. वर्तमान कालीं दिसणाऱ्या सर्व पदार्थांच्या डोक्यावर नाश बसलेला आहे. रम्य पदार्थांच्या बोकांडीं अरम्यता बसलेली आहे, आणि सुखाच्या मागें दुःखाचा ससेमिरा लागला आहे. रौरवादि नरकांत दुःख असतें हें खरें; पण एका दृष्टीनें तें संसारांतील दुःखापेक्षां बरें, कारण नरकांतील दुःख एकदां अंगवळणीं पडलें म्हणजे त्या दुःखाची तीव्रता तितकी भासत नाहीं. परंतु संसारांतील दुःखें सुखाभास मिश्रित असल्यामुळें अत्यंत दुःसह होतात. संसारांत कांहीं थोडेसें सुखहि अनुभवास येतें, पण त्याचा परिणाम दुःखांतच होत असल्यामुळें सर्व सुखेंहि दुःसह दुःखेंच आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

सुखान्येवातिदुःखानि वरं दुःखान्यतो मुने ।।
दृढदुःखयंदंतत्वाद्दुःखयंति सुखानि माम् ।। नि. उ.२४-५.

"संसारांतील दुःखमिश्रित सुखापेक्षां दुःखपरंपरा पत्करली, कारण हीं सुखें फार वेळ टिकत नाहींत व शेवटीं त्याचा परिणाम दुःखांतच होतो, म्हणून संसारांत सुख न मिळतां सारखीं दुःखेंच प्राप्त होत गेलीं तर चांगलें." परंतु तसें होणें शक्य नाहीं, कारण "सुखस्यानंतरं दुःख दुःखस्यानंतरं सुखम्" सुखामागून दुःख व दुःखामागून सुख अशा तऱ्हेनें हें चक्राकार भ्रमण या संसारांत सतत चालूं असतें. परंतु दुःखामधील सुख क्षणिक असतें. म्हणून वसिष्ठांनीं संसार हा दुःखमय आहे, असें

सांगितलें आहे. हीं प्रपंचांतील क्षणिक सुखें देखील वस्तुतः दुःखेंच आहेत, पण त्यांनीं सुखाचें पांघरूण घेतलें आहे, त्यामुळें मधूनमधून सुखाचा भास होत असतो. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

**सुखरूपाणि दुःखानि नाशनायैव पश्यथ ॥** नि. उ. ४३-१७

" अशा तऱ्हेच्या सुखापासून शेवटीं मनुष्याचा नाशच होणार असें तुम्हीं लक्षांत ठेवा. " वसिष्ठ आणखी सांगतात कीं:—

**संसारएव दुःखानां सीमांत इति कथ्यते ॥**
**तन्मध्ये पतिते देहे सुखमासाद्यते कथम् ॥** ५-९-४२.

" संसार म्हणजे दुःखाची पराकाष्ठा असें म्हणतात. तेव्हां अशा संसारामध्यें पडलेल्या देहामध्यें सुखप्राप्ति कोठून होणार ? "

## संसारांतील सुखाचा क्षणिकपणा.

आतां संसार हा असार आहे व त्यांत मुळींच सुख नाहीं, असें जर असेल तर सर्व लोक संसारामध्यें आसक्त कां होतात ? अशा प्रश्न उत्पन्न होतो. याचें उत्तर वसिष्ठ असें देतात कीं, संसारामध्यें सुख आहे, पण तें क्षणिक आहे व पुढील प्रत्येक क्षणीं तें कमी कमी होत जातें.

**यथा प्राप्तिक्षणे वस्तु प्रथमे तुष्टये तथा ॥**
**न प्राप्त्येकक्षणादूर्ध्वमिति कोनानुभूतवान् ॥** नि. पू. ४४-२

" वस्तूची जेव्हां प्राप्ति होते तेव्हां त्या प्रथमक्षणीं ती जशी संतोष देते तशी त्याच्या पुढच्या क्षणीं देत नाहीं. याचा अनुभव कोणाला आलेला नाहीं ? " यावरून संसारांतील सुख क्षणिक आहे व तें दुःखापासून उत्पन्न झालेलें व शेवटीं दुःखांत पर्यवसान पावणारें असल्यामुळें तें नसल्यासारखेंच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आतां हें क्षणिक सुख तरी कसें निर्माण होतें याचा विचार करूं.

इष्ट वस्तूची इच्छा झाली असतां जो आनंद प्राप्त होतो तो प्रिय, मोद

समजल्यामुळें तो त्याला मलत्याच ठिकाणीं शोधीत सुटतो. पण त्याचा परिणाम असा होतो कीं, त्याला खरा आनंद मिळण्याऐवजीं दुःखच पदरीं पडतें. आपली सर्व बाजूंनीं चांगली भरभराट झाली म्हणजे आपण सुखी होऊं, पण हा सगळा निव्वळ भ्रम आहे. आपातरमणीय म्हणजे वरवर मनोहर दिसणारे, परंतु अखेरीस खात्रीनें क्षय पावणारे असे हे सर्व विषयभोग मनुष्य सतत भोगीत राहिला तरी त्यापासून त्याला असें कोणतें शाश्वत सुख मिळणार आहे? "ये हि संस्पर्शजा भोगाः दुःखयोनय एव ते' (भग० गीता ५-२२). विषय आणि इंद्रियें यांच्या संयोगापासून प्राप्त होणारे भोग दुःखालाच प्रसवणारे आहेत. हे शब्दादि विषय भोग विषाच्या परिणामासारखे परिणाम निर्माण करणारे आहेत. वर्तमान कालीं दिसणाऱ्या सर्व पदार्थांच्या डोक्यावर नाश बसलेला आहे. रम्य पदार्थांच्या बोकांडीं अरम्यता बसलेली आहे, आणि सुखाच्या मागें दुःखाचा ससेमिरा लागला आहे. रौरवादि नरकांत दुःख असतें हें खरें; पण एका दृष्टीनें तें संसारांतील दुःखापेक्षां बरें, कारण नरकांतील दुःख एकदां अंगवळणीं पडलें म्हणजे त्या दुःखाची तीव्रता तितकी भासत नाहीं. परंतु संसारांतील दुःखें सुखाभास मिश्रित असल्यामुळें अत्यंत दुःसह होतात. संसारांत कांहीं थोडेसें सुखहि अनुभवास येतें, पण त्याचा परिणाम दुःखांतच होत असल्यामुळें सर्व सुखेंहि दुःसह दुःखेंच आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

सुखान्येवातिदुःखानि वरं दुःखान्यतो मुने ॥
दृढदुःखवदंतत्वाद्दुःखयंति सुखानि माम् ॥ नि. उ.२४-५.

"संसारांतील दुःखमिश्रित सुखापेक्षां दुःखपरंपरा पत्करली, कारण हीं सुखें फार वेळ टिकत नाहींत व शेवटीं त्याचा परिणाम दुःखांतच होतो, म्हणून संसारांत सुख न मिळतां सारखीं दुःखेंच प्राप्त होत गेलीं तर चांगलें." परंतु तसें होणें शक्य नाहीं, कारण "सुखस्यानंतरं दुःख दुःखस्यानंतरं सुखम्" सुखामागून दुःख व दुःखामागून सुख अशा तऱ्हेनें हें चक्राकार भ्रमण या संसारांत सतत चालू असतें. परंतु दुःखामधील सुख क्षणिक असतें. म्हणून वसिष्ठांनीं संसार हा दुःखमय आहे, असें

आनंदाचा लाभ झाल्यामुळें विषयसुखाच्या आशा किंवा इच्छा नाहींशा होणें, हेंच वैराग्य ह्या ठिकाणीं अभिप्रेत आहे.

विषय आणि इंद्रियें यांचा संबंध झाला असतां जें सुख प्राप्त होतें, तें त्याविषयापासून होत नसून मानवाची इच्छा शांत झाल्यामुळें त्याच्या आत्मस्वरूपापासूनच त्या सुखाचा प्रादुर्भाव होत असतो. कारण खरें सुख किंवा आनंद हा दुसरीकडे कोठें नसून त्याचें वसतिस्थान आत्माच म्हणजे आपणच आहोंत, असें उपनिषदांत 'एतस्यैवानंदस्य सर्वाणि भूतानि मात्रामुपजीवंति' असें स्पष्ट सांगितलें आहे व हेंच तत्त्व उपशम प्र. सर्ग ८ मध्यें जनकराजाला उद्देशून सिद्धांनीं जें भाषण केलें आहे, त्यामध्यें खालील श्लोकांत स्पष्ट केलें आहे. ही सिद्धगीता या ग्रंथाचा भाग २ रा जनक राजाची गोष्ट १६ वी पृष्ठें १०५ १०९ यांत आली आहे.

दृष्टृदृश्यसमायोगात्प्रत्ययानंदनिश्चयः॥
यस्तंस्वमात्मतत्त्वोत्थं निस्पंदं समुपास्महे॥ ५-७-९

याचा भावार्थः—द्रष्टा आणि दृश्य यांचा संयोग झाला असतां ( चित्तवृत्ति विषयाकार होऊन ) उत्पन्न होणारा आनंद विषयापासून मिळत असतो, असें सामान्य मनुष्यांना वाटतें. परंतु तसें नसून तो आनंद आत्मतत्वापासूनच निर्माण होत असतो, म्हणून वस्तुतः तो ब्रह्मानंद आहे. तथापि तो ब्रह्मानंद विषयाकार वृत्तीनें व्यापल्यामुळें विषयानंद आहे, असा भास होतो, परंतु आत्मतत्त्वाचा चांगला विचार केल्यावर तो विषयानंद नसून ब्रह्मानंद आहे असें समजून येतें. कारण विषयानंद पूर्णत्वाला जाऊन पोहोंचला कीं, इच्छा क्षणभर शांत होते व क्षणिक कां होईना त्यावेळीं मन वृत्तिशून्य होतें. अशा क्षणभर स्थितींत जो आनंद प्रकट होत असतो, तोच ब्रह्मानंद आहे, अशा निरतिशय आनंदरूप आत्म्याची आम्हीं शांत अंतःकरणानें उपासना करितों. असें सिद्धांनीं जनकराजाला उद्देशून वरील श्लोकांत सांगितलें आहे.

व प्रमोद* अशा पायरी पायरीनें वाढत जाऊन शेवटीं त्या इष्ट वस्तु विषयींची इच्छा शांत होते व त्यामुळें क्षणभर संतोष होतो, पण तो दुसरी इच्छा होईपर्यंतच टिकतो. अर्थात् इष्ट वस्तूच्या सेवनानें होणारा आनंद दुसऱ्या वस्तूच्या इच्छेकडून नाहींसा केला जातो. दुसऱ्या इच्छेचा उदय हाच पहिल्या आनंदाचा अंत आहे; म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

तस्मात्वांच्छां परित्यज ॥ नि. पू. ४४-४

" सर्व इच्छा सोड. " कारण एक क्षणभर वस्तूच्या सेवनानें इच्छा शांत झाली असतां क्षणिक इच्छानिरोध जर सुखाला कारण होतो, तर सर्व इच्छांचा सर्वथा त्याग करणें अत्यंत सुखाला कारण होईल, हें निराळें सांगावयास नको. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

इच्छोदयो यथा दुःखमिच्छाशांतिर्यथा सुखम् ॥
तथा न नरके नापि ब्रह्मलोकेऽनुभूयते ॥ नि. उ. ३६-२४

" इच्छेचा उदय हेंच दुःख आहे व इच्छेची शांति हेंच सुख आहे. तसलें दुःख नरकांतहि होत नाहीं व तसलें सुख ब्रह्मलोकांतहि मिळत नाहीं."

अपि राज्यादपि स्वर्गादपींदोरपि माधवात् ॥
अपि कांतासमासंगान्नैराश्य परमं सुखम् ॥ ५-७४-१४

" राज्य, स्वर्ग, किंवा चंद्रमंडल, तसेंच वैकुंठाधिपति विष्णु किंवा सुंदर कांता यांच्या समागमापासून जें सुख कालत्रयींहि प्राप्त होणार नाहीं, अशा तऱ्हेचें परमसुख नैराश्यापासून प्राप्त होतें. " अशा तऱ्हेचा सिद्धांत श्रीमत् भागवतांतहि+ आलेला आहे.

मनोरथाचा भंग झाल्यामुळें मनुष्य निराश होतो, पण असा निराश-पणा याठिकाणीं अभिप्रेत नाहीं; तर सर्वत्र समदृष्टि होऊन निरतिशय

---

* प्रियः—इष्ट पदार्थाची इच्छा झाली असतां होणारा आनंद.
मोदः—इष्ट वस्तूची प्राप्ति झाली असता होणारा आनंद.
प्रमोदः—इष्ट वस्तूचा प्रत्यक्ष उपभोग घडत असतांना होणारा आनंद.

\+ आशा हि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम् ॥ भागवत् ११-९-४४.
"आशा हेंच परम दुःख आहे व नैराश्य हेंच परम सुख आहे."

आनंदाचा लाभ झाल्यामुळें विषयसुखाच्या आशा किंवा इच्छा नाहींशा होणें, हेंच वैराग्य ह्या ठिकाणीं अभिप्रेत आहे.

विषय आणि इंद्रियें यांचा संबंध झाला असतां जें सुख प्राप्त होतें, तें त्याविषयापासून होत नसून मानवाची इच्छा शांत झाल्यामुळें त्याच्या आत्मस्वरूपापासूनच त्या सुखाचा प्रादुर्भाव होत असतो. कारण खरें सुख किंवा आनंद हा दुसरीकडे कोठें नसून त्याचें वसतिस्थान आत्माच म्हणजे आपणच आहोंत, असें उपनिषदांत 'एतस्यैवानंदस्य सर्वाणि भूतानि मात्रामुपजीवंति' असें स्पष्ट सांगितलें आहे व हेंच तत्त्व उपशम प्र. सर्ग ८ मध्यें जनकराजाला उद्देशून सिद्धांनीं जें भाषण केलें आहे, त्यामध्यें खालील श्लोकांत स्पष्ट केलें आहे. ही सिद्धगीता या ग्रंथाचा भाग २ रा जनक राजाची गोष्ट १६ वी पृष्ठें १०५ १०९ यांत आली आहे.

दृष्ट्दृश्यसमायोगात्प्रत्ययानंदनिश्चयः ॥
यस्तंस्वमात्मतत्त्वोत्थं निस्पंदं समुपास्महे ॥ ५-७-९

याचा भावार्थः—द्रष्टा आणि दृश्य यांचा संयोग झाला असतां ( चित्तवृत्ति विषयाकार होऊन ) उत्पन्न होणारा आनंद विषयापासून मिळत असतो, असें सामान्य मनुष्यांना वाटतें. परंतु तसें नसून तो आनंद आत्मतत्त्वा-पासूनच निर्माण होत असतो, म्हणून वस्तुतः तो ब्रह्मानंद आहे. तथापि तो ब्रह्मानंद विषयाकार वृत्तीनें व्यापल्यामुळें विषयानंद आहे, असा भास होतो. परंतु आत्मतत्त्वाचा चांगला विचार केल्यावर तो विषयानंद नसून ब्रह्मानंद आहे असें समजून येतें. कारण विषयानंद पूर्णत्वाला जाऊन पोहोंचला कीं, इच्छा क्षणभर शांत होते व क्षणिक कां होईना त्यावेळीं मन वृत्तिशून्य होतें. अशा क्षणभर स्थितींत जो आनंद प्रकट होत असतो, तोच ब्रह्मानंद आहे, अशा निरतिशय आनंदरूप आत्म्याची आम्ही शांत अंतःकरणानें उपासना करितों. असें सिद्धांनीं जनकराजाला उद्देशून वरील श्लोकांत सांगितलें आहे.

# प्रकरण ३७ वें.

## बंधमोक्षाचें स्वरूप.

वास्तविक पहातां 'जीवो ब्रह्मैव नापरः' जीव म्हणजे ब्रह्मच आहे. जीवांच्या संबंधानें प्रचलित असणाऱ्या उच्चनीच स्वरूपाच्या कल्पना तत्त्वतः खऱ्या नाहींत. हे सर्व जीव ब्रह्माचे आभास आहेत. मन किंवा चित्त त्याचेंच स्वरूप आहे. हें मन आपल्या पूर्व संस्कारानुरूप ज्या ज्या तऱ्हेच्या कल्पना करितें, त्या त्या तऱ्हेनें तें स्वतः बनतें. परब्रह्माच्या ठिकाणीं त्याच्याहून भिन्न असे जीव उत्पन्न होत असल्याची कल्पना मनानेंच केलेली आहे. जन्मादिविकाररहित ब्रह्म उत्पन्न होणें, नाश पावणें, बद्ध होणें, मुक्त होणें इत्यादि सर्व कल्पना मनानेंच केल्या आहेत. परंतु वस्तुतः आत्मा नित्य निर्विकार असा आहे; आणि आत्म्याशिवाय सर्व असत्य आहे. आत्मा 'एकमेवाद्वितीय' असल्यामुळें तो बद्ध तरी कसा होणार ? आणि त्याला मोक्ष तरी कसचा व्हावयाचा ? वस्तुतः जीवात्मा केव्हांहि परमार्थतः* बद्ध नसतां केवल कुकल्पनेमुळें 'मी बद्ध आहे' अशी ह्याची भावना होते; व बंधाची कल्पना खरी झाली म्हणजे मोक्षाची कल्पना खरी होत असते. कारण, ह्या दोन्ही कल्पना सापेक्ष आहेत. पण वास्तविक पहातां बंध आणि मोक्ष या अवस्था जीवाला मुळींच नाहींत. तर ह्या सर्व कल्पनांचा खेळ आहे, म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

> वस्तुतस्तु न बंधोऽस्ति न मोक्षोऽस्ति महामते ॥ ३-१००-४०.
> बंधमोक्षादिसंमोहो न प्राज्ञस्यास्ति कश्चन ॥
> संमोहबंधमोक्षादि ह्यज्ञस्यैवास्ति राघव ॥ ३-१००-४१.

---

* न निरोधो नचोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः ॥
न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥

" बंध व मोक्ष ह्या कल्पना वस्तुतः खोट्याच आहेत. बंधमोक्षादि कल्पनांचा मोह अज्ञ मनुष्याला होतो. प्राज्ञ पुरुषाला असला मोह उत्पन्न होण्याचा संभव नाहीं."

### बंधाची कल्पना.

असें जरी तत्त्वतः बंधमोक्ष असत् असलें, तरी अज्ञ जीवांच्या ठिकाणीं ज्या ज्या कल्पना प्रादुर्भूत झाल्या आहेत, त्याच्या संबंधानें वसिष्ठांनीं विचार केला आहे. ब्रह्म आनंदरूप आहे व सर्व जीव तत्त्वतः ब्रह्मरूप असल्यामुळें आनंदरूपच आहेत. परंतु आनंदाचें उगमस्थान आपणच आहोंत हें कळत नसल्यामुळें सर्व अज्ञ जीव तो आनंद मिळविण्याकरितां बाह्य विषयावर अवलंबून राहतात. सुखप्राप्तीकरितां जगांतील शब्द-स्पर्शादि विषयांची इच्छा करणें याला वसिष्ठ बंध असें म्हणतातः—

पदार्थवासनादार्ढ्यं बंध इत्याभिधीयते ॥ २-२-५.
उपादेयानुपतनं हेयैकान्तविवर्जनम् ॥
यदेतन्मनसो राम तद्बंधं विद्धि नेतरम् ॥ ५-१३-४०.
दुष्टुर्दृश्यस्य सत्तांग बंध इत्यभिधीयते ॥ ३-१-२२.

" जगांतील पदार्थांबद्दलची वासना दृढ होत जाणें हाच बंध असें म्हणतात. ग्राह्य वस्तूंविषयीं प्रेम आणि त्याज्य वस्तूंविषयीं द्वेष हेंच मनाचें बंधन आहे; ह्याशिवाय दुसरें कोणतेंहि बंधन नाहीं. द्रष्ट्याला दृश्याची सत्ता वाटणें हाच बंध होय." द्रष्टा हा दृश्यामुळेंच बांधला गेला आहे आणि दृश्याचा अभाव झाला म्हणजे तो मुक्त होतो. जगत्, तूं, मी इत्यादि मिथ्या भावनांनाच दृश्य असें म्हणतात, आणि दृश्य हें जोंपर्यंत द्वैतरूपानें कायम आहे, तोंपर्यंत मोक्षाची गोष्ट सुद्धां बोलावयास नको. आता या दृश्याला मुळींच अस्तित्व नाहीं, अशा तऱ्हेची व्यर्थ बडबड करण्यानें याचा निरास होणार नाहीं. जोंपर्यंत मनामध्यें संकल्प उत्पन्न होत आहेत, तोंपर्यंत दृश्य जगताची व्याधि कमी न होतां उलट वृद्धिंगत होते. कितीहि तर्कवितर्क केले, तीर्थयात्रा केल्या किंवा नाना तऱ्हेच्या नियमांचें अनुष्ठान केलें, तरी विचाराशिवाय दृश्य निरासाचा दुसरा

कोणताहि उपाय नाहीं. दृश्य जगत् जर खरोखरीच असेल तर कोणत्याहि ठिकाणीं व केव्हांहि त्याचा बाध होणें शक्य नाहीं, कारण

नासतो विद्यते भावो नाऽभावो विद्यते सतः ॥ ३-१-२६.

" जें असत् आहे, त्याला केव्हांहि सत्ता नसते व जें सत् असतें त्याचा केव्हांहि अभाव होऊं शकत नाहीं," असा सिद्धांत आहे. " द्रष्टयाला " आपण द्रष्टे आहोंत असें जोंपर्यंत ज्ञान आहे, तोंपर्यंत दृश्य जग भासमान होणारच. ज्ञानाशिवाय नुसत्या सविकल्प किंवा निर्विकल्प समाधीनें दृश्य जगाचा बाध होईल, असें म्हणावें तर तसेंहि नाहीं. कारण ज्या दृश्याचा निरास करावयाचा त्याचें स्मरण असल्याशिवाय त्याचा निरास होणें संभवनीय नाहीं. मी या दृश्य जगताचा निरास करून समाधींत स्थित आहे " असें स्मरण ठेवावयाचें " म्हणजे समाधीचा भंग होणार ! सारांश, जोंपर्यंत दृश्याची सत्ता वाटत आहे, तोंपर्यंत खरी समाधि प्राप्त होणें शक्य नाहीं; कारण हटयोगानें लावलेली समाधि उतरल्यावर गाढ निद्रेनंतर दुःखमय जगत् भासतें, त्याप्रमाणें जगाची प्रतीति जशीच्या तशीच येऊन अनर्थ परंपरा टाळणें शक्य नाहीं. आतां कित्येकांचें म्हणणें असें आहे कीं, ज्ञान नसताहि निर्विकल्प समाधीची स्थिति जर कायमची साध्य झाली, तर अक्षय्य झोंपेच्या सुखाप्रमाणें तीच परमपदाची प्राप्ति आहे, असें म्हणण्यास काय हरकत आहे ? परंतु हें म्हणणें निःसंशय भ्रामक आहे. द्रष्ट्यानें मोठया प्रयत्नानें जरी पाषाणाप्रमाणें हट्टानें निर्विकल्प समाधीची स्थिति प्राप्त करून घेतली, तरी ती कायमची प्राप्त होऊं शकत नाहीं, असा समाधिनिष्ठांचा अनुभव आहे. अर्थात् पाषाणाप्रमाणें करून घेतलेली स्थिरसमाधीची स्थिति म्हणजे कांहीं सर्व संसाराची शांति करणारी ब्रह्मानुभवरूपी मोक्षाची स्थिति नव्हे. सारांश, दृश्य जगाचा निरास झाल्याशिवाय, द्रष्टयाला प्राप्त झालेला संसारबंध नाहींसा होणें शक्य नाहीं. दृश्य वस्तुतः उत्पन्न झालें नाहीं असें ' अजातवाद ' या नांवाच्या २३ व्या प्रकरणांत सिद्ध केल्याप्रमाणें एकदां ध्यानांत आलें म्हणजे दृश्याचा निरास होणें शक्य आहे व दृश्य द्रष्टयाहून निराळें नसल्यामुळें दृश्य नाहींसें झाल्याबरोबर द्रष्टाहि नाहींसा होतो व अशी स्थिति झाली म्हणजे आत्म्याची केवल स्थिति प्रकट होते.

हा बंध निर्माण होण्याची सहा कारणें आहेत. ( १ ) आशा, ( २ ) संकोच ( इयत्ता ), ( ३ ) ब्रह्माहून जीव निराळा आहे असें मानणें, ( ४ ) आत्मविस्मृति, ( ५ ) मीपणाचा संकल्प आणि ( ६ ) आत्मस्वरूपाचें अज्ञान. अभ्यासानें आणि विचारानें हीं बंधाचीं कारणें नाहींशीं झालीं कीं बंध नाहींसा होतो व मोक्ष प्राप्त होतो.

## मोक्ष अथवा निर्वाण.

बंधाच्या कल्पनेप्रमाणें मोक्षाचीहि कल्पना खोटी आहे. तरी बंधाची कल्पना जोंपर्यंत अस्तित्वांत आहे तोंपर्यंत मोक्षाची कल्पना नाहींशी होणार नाहीं. जगांतील विषयाबद्दलची वासना दृढ होत जाणें हाच बंध आहे, असें जें वर सांगितलें आहे त्याला अनुसरूनच वसिष्ठांनीं मोक्षाची व्याख्या केली आहे.

**अशेषेण परित्यागोवासनानां य उत्तमः ॥**
**मोक्षइत्युच्यते ब्रह्मन्सएव विमलक्रमः ॥ १-३-८.**

' संपूर्ण वासनांचा परित्याग हाच उत्तम मोक्ष ' असें म्हटलें आहे. या मोक्षाला वसिष्ठांनीं जें उत्तम असें म्हटलें आहे त्याचें कारण असें आहे कीं, पुराणग्रंथांतून मानलेले सालोक्य, सामीप्य, सारूप्य व सायुज्य हे चार प्रकारचे मोक्ष* गौण आहेत, कारण त्या ठिकाणीं वासना असतात. वासनाच

---

* **पुराण ग्रंथांतून मानलेल्या चार प्रकारच्या मुक्ती.**

( १ ) **सालोक्य मुक्तिः**—वैकुंठ लोकांत जाऊन रहाणें ही **सालोक्य मुक्ति** होय.

( २ ) **सामीप्य मुक्तिः**—वैकुंठ लोकांत श्री भगवान् विष्णूच्या समीप जाऊन रहाणें ही **सामीप्य मुक्ति** होय.

( ३ ) **सारूप्य मुक्तिः**—वैकुंठ लोकांत श्री भगवान् विष्णूच्या सारखें चतुर्भुज रूप प्राप्त होणें ही **सारूप्य मुक्ति** होय. या मुक्तींत स्यमंतक मणि व लक्ष्मी मात्र मिळत नाहीं.

( ४ ) **सायुज्य मुक्तिः**—वैकुंठांत श्री भगवान् विष्णूच्याच रुपामध्यें मिळून जाणें म्हणजे विष्णुरूप होणें ही **सायुज्य मुक्ति** होय.

मुख्य बंधनकारक आहेत व वासना असेपर्यंत खरा मोक्ष मिळणें शक्य नाहीं. म्हणूनच सर्ववासनात्यागालाच मुख्य मोक्ष असें म्हटलें आहे. मोक्ष हा दुसरीकडे कोठें आहे असें नसून तो चित्ताच्या निर्मल स्थितींतच प्रकट होत असतो, असें वसिष्ठ सांगतातः—

न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले ॥
मोक्षोहि चेतो विमलं सम्यग्ज्ञानविबोधितम् ॥ ५-७३-३५.

" मोक्ष हा कोठें आकाशांत, पाताळांत किंवा पृथ्वीवर आहे असें नाहीं तर सम्यग्ज्ञानाच्या योगानें आत्मस्वरूपाप्रत जाऊन पोहोंचलेल्या मनाची निर्मल स्थिति म्हणजेच मोक्ष. "

अज्ञानी मनुष्य मोक्षाची इच्छा करीत असतो. परंतु उत्कृष्ट आत्मज्ञान प्राप्त होऊन ज्याचें चित्त चिद्रूप बनलें असा ज्ञानी पुरुष आत्म्याव्यतिरिक्त दहा मोक्ष त्याला प्राप्त झाले, तरीसुद्धां तो त्याची इच्छा करीत नाहीं मग त्याला मोक्षाची पर्वा काय वाटणार !

जो बद्ध झालेला आहे, त्याच्या बंधाची निवृत्ति म्हणजेच मोक्ष होय.

चित्तच बद्ध होतें, आत्मा बद्ध होत नाहीं, म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

मोक्षोऽपि चेतसोधर्मश्चेतस्येवस तिष्ठति ॥ नि. उ. १२५-३०

" मोक्ष हा चित्ताचा धर्म आहे म्हणजे कल्पना आहे, आत्म्याचा नव्हे म्हणून तो चित्तामध्येंच रहातो." एकदां चित्त मुक्त झालें कीं, पुनः तें बद्ध होत नाहीं. म्हणूनच वसिष्ठांनीं मोक्ष व बंध यांची पुढें दिल्याप्रमाणें मोठी मार्मिक व्याख्या केली आहे.

अंतःशीतलचित्तोहि मुक्त इत्यभिधीयते ॥ नि. उ. १२५-३५.
बंधःसंततचित्तेति.......................॥ नि. उ. १२५-३६.

" ज्याचें चित्त शीतल असतें त्याला मुक्त असें म्हणतात आणि ज्याचें चित्त संतप्त असतें त्याला बद्ध असें म्हणतात. (वरील श्लोकार्धांतील 'संततचित्तेति' हा संधि आर्ष आहे. )

मोक्षोहि न परोक्षेयो घारणादिप्रयोगवत् ॥ नि. उ. १२५-३३
आत्मसंवेद्य एवासौ मध्वाद्यास्वादसौख्यवत् ॥ नि. उ. १२५-३४.

" मोक्ष धारणादिकांच्या प्रयोगाप्रमाणें दुसऱ्याला कळण्यासारखा नाहीं, तर मधाच्या गोडीचें सौख्य जसें स्वतःलाच कळण्याजोगें असतें, तसाच मोक्षहि स्वतःलाच अनुभवास येण्याजोगा असतो."

## जीव मुक्त केव्हां होतो ?

आतां संसारांत बद्ध झालेला जीव मुक्त केव्हां होतो तें पुढील श्लोकामध्यें सांगितलें आहे:—

देहेंद्रियमनोबुद्धेः परस्तस्माच्च यः परः ॥ नि. पू. १२८-४६
सोऽहमस्मि यदा ध्यायेत्तदा जीवो विमुच्यते ॥ नि. पू. १२८-४७
सर्वभूतेषु चात्मानं सर्वभूतानि चात्मनि ॥ नि. पू. १२८-४८
यदा पश्यत्यभेदेन तदा जीवो विमुच्यते ॥ नि. पू. १२८-४९
कर्तृभोक्त्रादिनिर्मुक्तः सर्वोपाधिविवर्जितः ॥ नि. पू. १२८-४७
सुखःदुःखविनिर्मुक्तस्तदानीं विप्र मुच्यते ॥ नि.पू. १२८-४८
जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्यं हित्वा स्थानत्रयं यदा ॥ नि. पू. १२८-४९
विशेत्तुरीयमानंदं तदा जीवो विमुच्यते ॥ नि. पू. १२८-५०
यदि सर्वं परित्यज्य तिष्ठस्युत्क्रांतवासनः ॥
अमुनैव निमेषेण तन्मुक्तोऽसि न संशय ॥ ३-६६-१९

देह, इंद्रियें, मन व बुद्धि या चार कोशांच्या पलीकडे आनंदमय कोश आहे. त्याच्याहि पलीकडे असणारा जो अधिष्ठान आत्मा (ब्रह्म) तेंच मी आहे असें जेव्हां जीव ध्यान करतो तेव्हां तो मुक्त होतो. सर्व भूतांमध्यें आत्म्याला व आत्म्यामध्यें सर्व भूतांना जीव जेव्हां अभेदानें पहातो, तेव्हां तो मुक्त होतो. तो जीव कर्ता कर्म करण, भोक्ता भोग्य भोग, ज्ञाता ज्ञेय ज्ञान इत्यादि त्रिपुटीहून सर्वथा रहित, सर्व उपाधिरहित, सुखदुःखशून्य जेव्हां होतो तेव्हां तो सर्वथा मुक्त होतो. तो जेव्हां जाग्रत् स्वप्न व सुषुप्ति हें स्थानत्रय सोडून तुरीय आनंदांत प्रवेश करतो, तेव्हां तो

मुक्त होतो. तूं सर्वत्याग करून व वासना सोडून रहाशील तर ह्या एका क्षणांतच मुक्त होशील, यांत मुळींच संशय नाहीं."

## मुक्ति दोन प्रकारची.

मुक्ति दोन प्रकारची आहे. एक सदेह (जीवन्मुक्ति) व दुसरी विदेह. जीवन्मुक्ताच्या आंतर्बाह्य लक्षणांचें सविस्तर विवेचन 'जीवन्मुक्ताची वागणूक' या ४४ व्या प्रकरणांत करण्यांत आलें आहे. या ठिकाणीं जिवंत मनुष्यहि आत्मज्ञानानें मुक्त होतो, एवढेंच सांगितलें तरी पुरे आहे. त्या जीवन्मुक्ताची बुद्धि कोणत्याहि विषयामध्यें आसक्त होत नाहीं व त्याच्या ठिकाणीं इष्टानिष्ट विषयासंबंधाची इच्छा अजिबात नष्ट झालेली असते. ह्याच मुक्तीला देहाचा क्षय झाला असतां विदेहमुक्ति असें म्हटलें आहे. वास्तविक पहातां सदेह व विदेह मुक्तीमध्यें मुळींच भेद नाहीं असें वसिष्ठ सांगतात.

**न मनागपि भेदोऽस्ति सदेहादेहमुक्तयोः ॥**
**सस्पंदोऽप्यथ वाऽस्पंदो वायुरेव यथाऽनिलः ॥** २-४-५.

"ज्याप्रमाणें स्पंदयुक्त आणि स्पंदरहित वायु यामध्यें जसा भेद नाहीं, त्याप्रमाणें सदेह व विदेह मुक्तीमध्यें मुळींच भेद नाहीं," जीवन्मुक्ति म्हणजेच निर्वाणाची प्राप्ति होय असें वसिष्ठांचें सांगणें आहे.—

**महावाक्यार्थसंसिद्धा शांतिर्निर्वाणमुच्यते ॥** २-१९-२

"तत्त्वमस्यादि महावाक्यांचा बोध होऊन मनुष्याला एकदा त्याच्या आत्मस्वरूपाचा अपरोक्ष साक्षात्कार झाला म्हणजे त्याच्या ठिकाणीं जी शांति नांदूं लागते तिलाच निर्वाण ही संज्ञा दिली जाते."

सारांश, तत्त्वतः पहातां बंध व मोक्ष मुळींच नाहींत. हा अज्ञानी पुरुषाच्या चित्तांतील निव्वळ कल्पनांचाच खेळ आहे. जीवाच्या चित्ता-मुळेंच त्याच्या ठिकाणीं बंध व मोक्ष या अवस्था उत्पन्न होतात हेंच तत्त्व समजून सांगण्याकरितां वसिष्ठांनीं चित्ताची गोष्ट सांगितली आहे. (या ग्रंथाचा भाग दुसरा-चित्ताची किंवा मनाची गोष्ट ७ वी, पृष्ठ ५८ ते ६२) ही गोष्ट वाचली असतां बंधमोक्षाच्या कल्पनेचा उलगडा होतो.

# प्रकरण ३८ वें.

## मोक्षप्राप्तीचे मार्ग.

ज्ञानमेव परं श्रेयः कैवल्यं तेन वेत्यलम् ॥ नि. पु. ८७-१६

कर्म, उपासना ( भक्ति ) व ज्ञान या मोक्षप्राप्तीच्या साधनासंबंधानें मोठा वाद आहे. कोणी या तीन साधनापैकीं एकच मुख्य साधन असून बाकीचीं त्याचीं अंगें मानतात. भागवतकारांनीं भक्ति हें मोक्षाचें साधन मानलें आहे. कांहींनीं ज्ञान हें मोक्षाचें साधन मानलें आहे. लोकमान्यांनीं गीतारहस्यामध्यें कर्म हें मोक्षाचें साधन मानलें आहे, पण हें कर्म देखील ते ज्ञानयुक्त मानतात. कारण नुसतें कर्म जड आहे. त्याप्रमाणें नुसती भक्ति म्हणजे ज्ञानविरहित भक्तिहि फलद्रूप होत नाहीं. कर्म आणि उपासना याच्यायोगानें अंतःकरणाची शुद्धि होते आणि ही शुद्धि आत्मज्ञान सुकर करून देत असते, असा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे. वास्तव ज्ञान हें मोक्षाचें कारण आहे असें आद्य श्रीशंकराचार्यांचेंहि मत आहे. यासंबंधीं वसिष्ठांचें काय मत आहे त्याचा या प्रकरणांत विचार केला आहे.

ततो वच्मि महाबाहो यथा ज्ञानेतरा गतिः ॥
नास्ति संसारतरणे पाशबंधस्य चेतसः ॥ ५-६७-२.

या श्लोकांत " संसार पाशांत सांपडलेल्या चित्ताला संसारांतून सुटण्यास ज्ञानावांचून दुसरा मार्ग नाहीं. " असें सांगितलें आहे. यावरून वसिष्ठांच्या मतानें ज्ञान हाच मोक्षाचा मार्ग आहे; व हीच गोष्ट 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' या वेदांत शास्त्राच्या सिद्धांताप्रमाणें ठरवून वासिष्ठामध्यें इतर वादांनीं मानलेल्या मोक्ष साधनांचा निषेध केला आहे. " योगवासिष्ठाचा प्रतिपाद्य विषय " या मागील ८ व्या प्रकरणांत आत्मज्ञान हाच वासिष्ठाचा विषय आहे, कर्म नव्हे, हें तत्त्व वासिष्ठांतीलच वचनांचा आधार देऊन सिद्ध केलें आहे. पण त्यांत इतर साधनांचा निषेध सविस्तर रीतीनें केलेला नाहीं. निर्वाण प्र. उ. सर्ग १७४ ( २४-२६ ), सर्ग १९७ ( १८ ) व सर्ग १९९

( ३०–३१ ) यामध्यें संसारांतून मुटण्यास वनवास किंवा स्वगृहवास व कष्टतर तपश्चर्या यांचा कांहीं उपयोग होत नाहीं, असें स्पष्ट सांगितलें आहे. कर्मत्याग किंवा कर्माचरण यांचाहि कांहीं उपयोग होत नाहीं असेंहि स्पष्ट सांगितलें आहे. सत्कर्मांच्या आचरणानें मोठें ऐश्वर्य किंवा वरशापादि सामर्थ्य मिळूनहि कांहीं उपयोग नाहीं. तीर्थयात्रा, दानधर्म, पवित्रनद्यांतून स्नान, ध्यानधारणायोग, यज्ञकर्म या साधनांनींहि संसारभ्रांति नाहींशी होत नाहीं. या सर्व साधनांनीं स्वर्गादि लोकांची प्राप्ति होते, पण मोक्ष मात्र प्राप्त होत नाहीं. इतकेंच नव्हे तर वसिष्ठ सांगतात कीं:—

न शास्त्रैर्न गुरोर्वाक्यान्नदानान्नेश्वरार्चनात् ॥
एष सर्वपदातीतो बोधः संप्राप्यते नरः ॥ नि. उ १९७–१८
न शास्त्रैर्नापि गुरुणा दृश्यते परमेश्वरः ॥
दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्वस्थया धिया ॥ नि.पू १११–४
वेदवेदांतशास्त्रार्थतर्कदृष्टिभिरप्ययम् ॥
नात्मा प्रकटतामेति यावन्नस्वमवेक्षितम् ॥ ५–२९–६०

यावरील श्लोकांचा भावार्थ असा:—" नुसत्या शास्त्राभ्यासानें, गुरूच्या उपदेशानें व ईश्वराच्या पूजनार्चनानें सर्वांत श्रेष्ठ असें आत्मज्ञान प्राप्त होत नाहीं, तर तें आपल्या स्वतःच्याच सत्त्वस्थ बुद्धीच्या योगानें विचार केला असतां प्राप्त होतें. वेद, वेदान्त, शास्त्रार्थ, तर्कदृष्टि इत्यादिकांनीं युक्त असलेला मनुष्य जर बहिर्दृष्टि असेल तर त्यालाहि आत्मज्ञान होणार नाहीं." यासाठीं प्रत्यग्दृष्टीचीच आवश्यकता आहे, म्हणजे अंतर्मुख होऊन आत्मप्रसाद प्राप्त करून घेतला पाहिजे. आतां याठिकाणीं अशी शंका येईल कीं ' आत्मज्ञान जर प्रत्यग्दृष्टीनेंच होण्यासारखें आहे, तर शास्त्र आणि गुरूपदेश यांची काय जरूरी ? ' परंतु ही शंका बरोबर नाहीं. कारण गुरूपदेश व शास्त्रार्थ यांच्या वांचून आत्म्याचें परोक्ष ज्ञान होत नाहीं व परोक्ष ज्ञान झाल्याशिवाय अपरोक्ष ज्ञान होणें शक्य नाहीं. 'शब्दादेवापरोक्षधीः' असा वेदांतशास्त्राचा सिद्धांत आहे. शिवाय आपला अनुभव गुरू आणि शास्त्र यांच्याशीं जमला म्हणजेच प्राज्ञ पुरुषाला आपल्या ज्ञानाबद्दल पूर्ण विश्वास उत्पन्न होतो, एरवी होत नाहीं. म्हणून निभ्रांत ज्ञान होण्याला

शास्त्र पाहिजे आणि गुरूपदेशहि पाहिजे. याशिवाय आत्म्याचें अस्तित्व व स्वरूप समजून देण्यासाठीं शास्त्र व गुरुपदेश यांचा चांगलाच उपयोग होत असून त्याच्या योगानें चित्त अंतर्मुख होऊन योग्य विचार करण्याला समर्थ व निर्दोष होत असतें, असें वसिष्ठ सांगतात:—

शास्त्रादभ्यासयोगेन चित्तं याति विशुद्धताम् ॥
अनिच्छदेवमेवाशु पदं पश्यति पावनम् ॥ नि. उ. १९७-१९

' शास्त्रोक्त उपायांचा अभ्यास केल्यानें चित्त शुद्ध होत जातें व सर्व भोगेच्छांचा त्याग करून लवकरच आत्मस्वरूपाचें ज्ञान करून घेण्याविषयीं समर्थ होतें. या शास्त्राच्या अभ्यासामुळें अविद्येचा सात्विक भाग उत्कर्ष पावतो आणि या सात्विक भागाच्या उत्कर्षामुळें तिचा तामस भाग क्षीण होतो. याप्रमाणें मुमुक्षु पुरुषाला शास्त्राच्याच अभ्यासानें आत्मज्ञान संपादन करितां येतें. अशा आत्मस्वरूपाच्या साक्षात्कारभूत ज्ञानानेंच मोक्ष मिळतो.

यावरून वसिष्ठांच्या मतें ज्ञान हेंच एकमेव मोक्षाचें साधन आहे असें दिसतें व हीच गोष्ट वासिष्ठांत ठिकठिकाणीं दाखविली आहे. त्यांपैकीं कांहीं विधानें पुढें दिलीं आहेतः—

ज्ञानयुक्तिप्लवेनैव संसाराब्धिं सुदुस्तरम् ॥
महाधियः समुत्तीर्णा निमेषेण रघूद्वह ॥ २-११-३६
ज्ञानान्निर्दुःखतामेति ज्ञानादज्ञानसंक्षयः ॥
ज्ञानादेव परासिद्धिर्नान्यस्माद्राम वस्तुतः ॥ ५-८८-१२

" ज्या मोठ्या बुद्धिमान पुरुषांना ही ज्ञानाची नौका प्राप्त होते, ते दुस्तर अशा संसारांतून एका क्षणांत तरून जातात. आत्मसाक्षात्कारभूत ज्ञानानेंच मनुष्यास मोक्ष मिळतो. आत्मज्ञानानेंच मनुष्य सर्व दुःखांतून मोकळा होतो व आत्मज्ञानानेंच अज्ञानाचा सर्वथा क्षय होतो. ज्ञानाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि उपायानें मनुष्य मुक्त होत नाहीं. "

मोक्षाच्या बाबतींत भक्तीची म्हणजे ईश्वरोपासनेची साक्षात् मुळींच आवश्यकता नाहीं असें वसिष्ठांचें मत आहे. मोक्षप्राप्ति होण्याकरितां स्वतःच्या प्रयत्नानें केलेल्या आत्मविचाराचीच आवश्यकता आहे. पण

हा आत्मविचार सुचण्याकरितां सगुण परमेश्वराची भक्ति आवश्यक आहे. कारण परमेश्वर प्रसन्न झाला म्हणजेच तो आपल्या भक्ताला, 'आत्मविचार सुचो' असा वर देत असतो, असें वसिष्ठांनीं उपशम प्रकरणांत प्रन्हादाच्या गोष्टींत सांगितलें आहे (या ग्रंथाचा भाग दुसरा-प्रन्हादाची गोष्ट १९ वी पृष्ठ १३४). अशा तन्हेचें वर्णन म्हणजे 'भक्तीनें परमेश्वराच्या तात्त्विक स्वरूपाचें ज्ञान होतें' असें भगवद्गीतेंतहि* सांगितलें. आहे. खरा देव जर कोणता असेल तर तो आत्माच आहे आणि या आत्मदेवाचें साक्षात्कारभूत ज्ञान म्हणजेच त्याचें पूजन होय. या विषयींचें सविस्तर वर्णन "खरा देव कोण व त्याची पूजा कोणती" या पुढील ४७ व्या प्रकरणांत आलेलें आहे.

सारांश, आपल्या पौरुषप्रयत्नामुळें अंतःकरणांत विवेकाचा उदय झाला म्हणजे त्या आत्मदेवाचें ज्ञान प्राप्त होतें. यज्ञ, दान, तप वगैरे सत्कर्मांच्या अनुष्ठानानें तें ज्ञान प्राप्त होत नाहीं. यावरून कर्म, भक्ति आणि ज्ञान या तीन साधनांपैकीं मोक्षप्राप्तीचें मुख्य एकमेव साधन आत्मज्ञानच आहे, कर्म व भक्ति ही आत्मज्ञानाची प्राप्ति करून देण्यास मदत करणारीं साधनें आहेत असें दिसून येतें. ' स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ' ' भक्त्या मामभिजानाति यावान् यश्चास्मि तत्त्वतः ' इत्यादि भगवद्गीतेंतील वचनें वरील विधानाला परिपोषक आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## गुरूपदेश कीं शिष्यप्रज्ञा ?

साक्षात्कारभूत आत्मज्ञानाला गुरूपदेश कारण आहे ? कीं शिष्याची शुद्ध बुद्धि कारण आहे? या संबंधानें वसिष्ठांनीं असा निर्णय केला आहे कीं,

**ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव राघव ॥ नि. पू. ८३-१३**

" आत्मसाक्षात्काराच्या बाबतींत केवळ शिष्याची शुद्ध साधनचतुष्टयसंपन्न अशी प्रज्ञाच कारण आहे." गुरूपदेश हा साक्षात् कारण होत नाहीं.

---

* भक्त्यामामभिजानाति यावान् यश्चास्मि तत्त्वतः ॥.
भ. गी. १८-५५

मग तो कोणीहि केलेला असला तरी तो केवळ मार्गदर्शकच होत असतो. आत्मदर्शन हें प्रत्येकाला स्वतःच्याच प्रयत्नानेंच मनन निदिध्यासनानेंच प्राप्त होत असतें. दुसऱ्याचा उपदेश केवळ निमित्तमात्र आहे. याविषयीं वसिष्ठांनीं एका किराटाची गोष्ट सांगितली आहे ( या ग्रंथाचा भाग २ रा गोष्ट ३३ वी ). व्यवहारांत सुद्धां प्रज्ञाशून्य मनुष्याला केवढेंहि मोठें सहाय्य असलें तरी त्याच्या कार्याचा नाश होतो. यास्तव वसिष्ठ सांगतात कीं,

शास्त्रसज्जनसंपर्कैः प्रज्ञामादौ विवर्धयेत् ॥ नि. पू. १२०-१

" शास्त्र आणि सज्जन यांच्या मदतीनें प्रथम (मुमुक्षु पुरुषानें) आपली प्रज्ञा वाढवावी. " अशा शुद्ध झालेल्या प्रज्ञेनें आत्मज्ञान होईपर्यंत विचार करावा. गुरु, शास्त्र, पुण्यकर्म, ईश्वरार्चन यांच्यायोगानें त्या परमपदाची प्राप्ति होत नाहीं असें जें या ग्रंथांत सांगण्यांत आलें आहे, त्याचा अर्थ हीं साधनें अगदीं कुचकामाचीं आहेत असा नसून गळ्यांतच असलेल्या परंतु विस्मृत झालेल्या दागिन्याची आठवण करून देणाऱ्या मनुष्याचें वचन जसें त्या दागिन्याच्या प्राप्तीचें कारण होतें, त्याप्रमाणें आत्म्याचें स्मरण करून देणें, त्याचा परोक्ष बोध करून देणें व शिष्याच्या बुद्धीला आत्मविचार करण्याविषयीं उद्युक्त करणें या बाबतींत वरील साधनांचा उपयोग होत असतो. यावरून वरील साधनांनीं शुद्ध झालेल्या प्रज्ञेच्या योगानें आत्मविचार केल्यावर शिष्याला ज्ञान होतें; म्हणून आत्मज्ञानाचे बाबतींत शिष्याची शुद्ध प्रज्ञाच * कारणीभूत होते असा वसिष्ठांनीं निर्णय केला आहे. तथापि 'तद्विज्ञानार्थं सगुरुमेवाभिगच्छेत्' या शास्त्राज्ञेप्रमाणें साधनचतुष्टयसंपत्तीच्या प्राप्तीनें आत्मज्ञानाच्या उपदेशाचा अधिकार न मिळवितां जर एखादा शिष्य गुरूला शरण जाऊन त्याच्यापासून आत्मस्वरूपाचें केवळ शाब्दिक ज्ञान संपादन करील तर मोक्षाला प्राप्त होणार नाहीं. कारण ब्रह्म सर्व इंद्रियांच्या विषयांच्या पलीकडचें आहे.

---

* अशाच अर्थाचें वर्णन दासबोधांतहि आढळतेः—**येथें शिष्यप्रज्ञाच केवळ** । प्रज्ञावंतां न लगे वेळ । अनन्यास तत्काळ मोक्ष लाभे । दासबोध ८-६-४५.

शब्द, श्रवण, शाब्दबोध इत्यादि चित्तवृत्ती इंद्रियांच्या द्वारां उद्भवतात. गुरूपदेशामुळें शब्दवृत्तीच उत्पन्न होतात. त्यांतील अत्यंत स्वच्छ असलेली जी चरमवृत्ति तिच्यामध्यें नित्य अपरोक्ष ब्रह्माचें स्फुरण, शिष्याच्या बुद्धीची स्वच्छता व ब्रह्माचा स्वभाव यामुळें होतें. उपदेश हा त्या स्फुरणाचें कारण नव्हे. तथापि ' आचार्यवान्पुरुषोवेद ' म्हणजे ज्याला आचार्यापासून उपदेश मिळाला आहे तोच आत्म्याला जाणतो, अशा श्रुतिवचनावरून गुरूपदेशावांचून आत्मतत्त्वाचा साक्षात्कार होत नाहीं. यावरून प्रत्यक्ष गुरूपदेश आत्मज्ञानाचा कारण होत नसला तरी या गुरूपदेशाचें श्रवण अधिकारी शिष्यानें करून जर त्याचें अहर्निश चिंतन केलें तर त्याला आत्मसाक्षात्कार होतो असें वसिष्ठ सांगतातः—

> न श्रुतेन न पुण्येन ज्ञायते ज्ञेयमात्मनः ॥
> ज्ञानात्यात्मानमात्मैव सर्पः सर्पपदानिव ॥ नि. पू. ८३-१४
> शास्त्रार्थैर्बुध्यते नात्मा गुरोर्वचनतो न च ॥
> बुध्यते स्वयमेवैपस्वबोधवपतस्ततः ॥ नि. पू. ४१-१५

यांचा भावार्थः—" श्रवणानें प्राप्त झालेल्या नुसत्या परोक्ष ज्ञानानें आत्मज्ञान होत नाहीं. किंवा पुण्यकर्मानें स्वर्गाची प्राप्ति जशी आपोआपच होते, त्याप्रमाणें आत्मविचार केल्याशिवाय नुसत्या पुण्यकर्मानें आत्मज्ञान आपोआप होत नाहीं, म्हणून सर्पाची पावलें सर्प जशी जाणतो, त्याप्रमाणें पुण्यकर्म आणि श्रवण यांच्या योगानें शुद्ध व विचारप्रवण झालेल्या बुद्धीनेंच आत्मा जाणला जातो. वस्तुतः आत्मा शास्त्रार्थांनीं जाणला जात नाहीं व गुरूच्या वचनानेंहि जाणला जात नाहीं, तर तो स्वतः आपल्या बोधाच्या बळानेंच जाणला जातो. " सारांश, या सर्व विवेचनावरून ज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो, असें सिद्ध होतें. व हें *साक्षात्कारभूत ज्ञान* शिष्याच्या शुद्धबुद्धीवरच अवलंबून आहे.

## आत्मज्ञानसंपादनाचे तीन मार्ग.

वसिष्ठांनीं आत्मज्ञानप्राप्तीचे तीन मार्ग सांगितले आहेत.

( १ ) पहिला मार्ग अपूर्व बुद्धिमत्तेचा म्हणजे आपण आपल्या स्वतःच्या

बुद्धीनें आत्मतत्त्वाचा विचार करून ज्ञान संपादन करणें हा होय. हें वसिष्ठांनीं जनक राजाच्या आख्यानावरून सांगितलें आहे. ( या ग्रंथाचा भाग दुसरा, जनक राजाची गोष्ट १६ वी ).

( २ ) दुसरा मार्ग गुरूचा अनुग्रह होऊन त्याच्या उपदेशानुसार आत्मविचार करून ज्ञान संपादन करणें हा होय. हें वसिष्ठांनीं बलीच्या आख्यानावरून स्पष्ट केलें आहे (या ग्रंथाचा भाग दुसरा,बलीची गोष्ट १८ वी).

( ३ ) तिसरा मार्ग उपासनेच्या योगानें ईश्वरानुग्रह होऊन प्रथम आत्मविचार नंतर क्रमानें ज्ञानप्राप्ति होणें हा होय. याचें स्पष्टीकरण वसिष्ठांनीं प्रल्हादाचें आख्यान सांगून केलें आहे (या ग्रंथाचा भाग दुसरा, प्रल्हादाची गोष्ट १९ वी ).

हे वरील मार्ग जरी एकमेकांपासून भिन्न असले, तरी या सर्वांचें ध्येय जें ज्ञान तें एकच आहे. म्हणून प्रत्येकानें आपल्या स्वतःच्या बुद्धिमत्तेचा विचार करून आपल्याला जो मार्ग झेपेल, त्याच मार्गाचें अवलंबन करून ज्ञान संपादन करून घ्यावें व आपल्याला या भवसागरांतून सोडवावें, असा एकंदर वसिष्ठांच्या उपदेशाचा अभिप्राय आहे.

## आत्मज्ञानप्राप्तीचा क्रम व अभ्यास.

प्रथम मनुष्यानें दैवाला बाजूला सारून मोठ्या प्रयत्नानें वैराग्य संपादन करावें. प्रथम देशाचाराच्या विरुद्ध न वागतां सर्व साधूंना संमत होईल अशा सन्मार्गानें द्रव्यार्जन करावें व दानधर्मादिकांच्या योगानें त्याचा सद्व्यय करून साधुपुरुषांना संतुष्ट करावें. कारण साधुसंताचा सहवास घडला, म्हणजे विषयासंबंधाची विरक्ति चित्तांत उदयाला येते. त्यानंतर मनन निदिध्यासानें महावाक्याच्या अर्थाचें ज्ञान, त्या ज्ञानानें अद्वितीय ब्रह्मविषयीचा तात्पर्यनिर्णय आणि त्याच्या योगानें अखेर परमपदाची प्राप्ति अशा तऱ्हेचा हा आत्मज्ञानाचा क्रम आहे. आतां हा ज्ञानक्रम सिद्ध होण्याकरितां अभ्यास कसा करावा तें सांगितलें आहे.

अव्युत्पन्न चित्ताला शास्त्रीय मार्गात प्रवृत्त करावयाचें झाल्यास तें कार्य हळुहळु करावें लागतें. प्रथमारंभीं त्याला दिवसाचे दोन भाग विषयोप-

भोगाकरितां द्यावे व तिसऱ्या भागांत त्याच्याकडून शास्त्रावलोकन आणि चवथ्या भागांत गुरुशुश्रूषा करवावी. अशा रीतीनें कांहीं दिवसानंतर तें थोडें व्युत्पन्न झालें म्हणजे त्याला विषयसेवनाकरितां दिवसाचा फक्त एक भाग द्यावा, गुरुशुश्रूषेकरितां दोन भाग द्यावे आणि एक भाग शास्त्रार्थ चिंतनाकरितां द्यावा. अशा योजनेनें चित्त चांगलें व्युत्पन्न झालें आणि त्यावर उत्तम संस्कार घडले म्हणजे त्याला विषयोपभोगाकरितां दिलेला एक भाग तोहि कमी करून दोन भाग शास्त्र आणि वैराग्य यांच्याकरितां द्यावे आणि बाकीच्या दोन भागांत ध्यान आणि गुरुसेवा करावी. अशा रीतीनें त्याला क्रमाक्रमानें सन्मार्गाला लावावें हा जो आत्मज्ञान-प्राप्तीच्या साधनांचा क्रम सांगितला आहे त्याचा अधिकारी शुद्धांतःकरण झालेला पुरुष होय.



# प्रकरण ३९ वें.

## अज्ञानाच्या सात भूमिका.

स्वाभाविक प्रवृत्तिरूपी पुरुषप्रयत्न आणि रसाभिनिवेश ह्यांच्या योगानें अज्ञान भूमिका काय, अगर ज्ञान भूमिका काय आपआपलें उचित फल देतात. अज्ञानी मनुष्याचा प्रयत्न पूर्व संस्कारामुळें प्रवृत्ति मार्गाकडे वळलेला असून विषयभोगासंबंधाची दृढवासना ह्याच त्यांचा रसाभिनिवेश असतो; तर ज्ञानी मनुष्यांचा प्रयत्न शास्त्रीयसाधनचतुष्टयसंपन्नतेचा आणि श्रवणमननात्मक असून मोक्षविषयक दृढ इच्छा हा त्यांचा रसाभिनिवेश असतो. आपल्या इच्छेनुसार फलप्राप्ति हा दोघांचाहि साधारण हेतु आहे. स्वस्वरूपापासून भ्रष्ट झाल्यामुळें विषयामध्यें मग्न होऊन या अज्ञान भूमिकावर मूढ जीव आरोहण करीत असतात व शेवटीं अत्यंत जड व मूढ अशा स्थावर स्थितींत जाऊन पडतात. परब्रह्माच्या ठिकाणीं कल्पिलेल्या अज्ञानाच्या सात भूमिका आहेत. ह्या सात अज्ञान भूमिकांचें सविस्तर वर्णन उत्पत्ति प्रकरण सर्ग ११७ मध्यें आलेलें आहे. त्याचा सारांश ह्या प्रकरणांत दिला आहे. ह्या सात अज्ञान भूमिकांचीं नावें पुढीलप्रमाणें आहेतः—

(१) बीजजाग्रत्, (२) जाग्रत्, (३) महाजाग्रत्, (४) जाग्रत्-स्वप्न, (५) स्वप्न, (६) स्वप्नजाग्रत् आणि (७) सुषुप्त.

ह्या भूमिका म्हणजेच मोहाचे किंवा अज्ञानाचे सात प्रकार आहेत. ह्याशिवाय त्यांचें परस्पर मिश्रण होऊन आणखी कितीतरी प्रकार झाले आहेत. पण स्थूलमानानें वसिष्ठांनीं हे सातच प्रकार केले आहेत.

### (१) बीजजाग्रत्.

मायेच्या योगानें शबल झालेल्या ब्रह्मापासून निर्माण झालेलें जागृतीच्या आरंभी अज्ञानानें वेष्टिलेलें जें चिदाभासाचें स्वरूप अव्यक्त स्थितींत असतें. व ज्याला पुढें प्राणधारणादि क्रियेमुळें चित्त, जीव इत्यादि नावें प्राप्त

होत असतात, असें जें बीजरूप चैतन्य स्थित असतें, त्याला बीजजाग्रत् असें म्हणतात.

### ( २ ) जाग्रत्.

" हा स्थूल देह मी " व " हे सर्व भोग्य पदार्थ माझे " अशा प्रकारचा सामान्य प्रत्यय जेव्हां उत्पन्न होतो तेव्हां त्याला जाग्रत् ही संज्ञा दिलेली आहे.

### ( ३ ) महाजाग्रत्.

पूर्वजन्मांतील संस्कारानें ' मी ब्राह्मण आहे व मला त्या वर्णाला अनुसरून क्रियाकर्म केलें पाहिजे, ' अशा जो ब्राह्मण्यासंबंधानें अभिनिवेश उत्पन्न होतो व तो पुढें अभ्यासानें दृढ होतो, त्याला महाजाग्रत् असें म्हणतात. सर्व ब्राह्मणांच्या ठिकाणीं हा अभिनिवेश नसतो; कारण त्यांच्या ठिकाणीं पूर्वजन्मांतील अशा स्वरूपाचे संस्कार नसतात, असेंच म्हणावें लागेल. ब्राह्मण्याचा एक दृष्टांत दिलेला आहे, पण अशा तऱ्हेच्या इतर गोष्टी पूर्व जन्मींच्या संस्कारानें निर्माण झाल्या, तर त्यांनाहि महाजाग्रत् असें म्हणण्यास हरकत नाहीं.

### ( ४ ) जाग्रत्स्वप्न.

जाग्रदवस्थेतील स्वतः केलेल्या मनोराज्याला किंवा दुसऱ्या मांत्रिकाच्या योगानें झालेल्या मनोराज्याला जाग्रत्स्वप्न असें म्हटलें आहे. मांत्रिकाच्या प्रभावानें मनोराज्य होऊं शकतें हें वसिष्ठांनीं लवणराजाच्या आख्यानांत दर्शविलें आहे. ( या ग्रंथाचा भाग २ रा लवणराजाची गोष्ट ९ वी पृष्ठें ६५ ते ७६ ). आकाशांत दिसणारे दोन चंद्र, शिंपेच्या ठिकाणीं भासणारें रुपें आणि सूर्यकिरणामध्यें दिसणारें मृगजळ हीं देखील जाग्रत्स्वप्न स्थितीचीं उदाहरणें होत. अभ्यासाच्या योगानें जाग्रत्स्वप्नभूमिकेचे अनेक प्रकार झालेले आहेत.

### ( ५ ) स्वप्न.

निद्रेच्या आरंभीं, निद्रेच्या ऐनभरांत किंवा निद्रेच्या अखेरीस

" अमूक एक गोष्ट मी पाहिली ' असा जो प्रत्यय थोडा वेळच येतो त्याला स्वप्न असें म्हटलें आहे. स्थूल शरीरांत कंठापासून हृदयापर्यंत जाऊन पोहोंचणाऱ्या ' पुरीतत ' संज्ञक नाडीमध्यें हा स्वप्नाचा प्रत्यय येत असतो.

## ( ६ ) स्वप्नजाग्रत्

पुष्कळ कालपर्यंत दृग्गोचर होत नसल्यामुळें ज्याचें स्वरूप लवकर नाहींसें होतें, अशी स्वप्नस्थिति जागृती सारखी दीर्घकाल टिकल्यास तिलाच महाजाग्रत् ही संज्ञा दिली आहे. हरिश्चंद्राला स्वप्नाचा काळ बारा वर्षांचा भासला होता. ह्या स्थूल देहांत असतां किंवा ह्या देहाचा नाश झाल्यावर ह्या महाजाग्रत् स्थितीची जी अनुवृत्ति रहाते तिला स्वप्नजाग्रत् असें नांव दिलें आहे.

## ( ७ ) सुषुप्ति.

कर्मांपासून उत्पन्न होणाऱ्या या वरील सहा अवस्थांचा किंवा भूमिकांचा त्याग केल्यावर जी जीवाची जडस्थिति उत्पन्न होते, परंतु ज्या स्थितीमध्यें पुढें प्राप्त होणाऱ्या दुःखांचें बीज ( म्हणजेच वासना ) शिल्लक असते, त्या स्थितीला सुषुप्ति असें म्हटलें आहे. सुषुप्त अवस्थेमध्यें म्हणजे कारण शरीरामध्यें विलीन झालेल्या जगाचें संस्काररूपानें अस्तित्व असतें, असेंच म्हणणें योग्य आहे; कारण तसें जर न मानलें, तर सुषुप्तींतून जीव पुनः जागृत होणार नाहीं व काष्ठ, लोष्ठ किंवा दगड यासारखा जड होऊन जाईल.

ह्याप्रमाणें अज्ञानाच्या सात भूमिका आहेत. ह्यांतील प्रत्येक भूमिकेला अनेक शाखा असून त्यांचा विस्तार अतिशय वाढलेला आहे. या अज्ञान भूमिकांतून सुटण्याकरितां मनुष्याला आत्मज्ञानाशिवाय दुसरा उपाय नाहीं. हें आत्मज्ञान या पुढील प्रकरणांत वर्णन केलेल्या ज्ञानभूमिकांच्या अभ्यासानें प्राप्त करून घेतां येतें.

--- --- ---

# प्रकरण ४० वें.

## ज्ञानयोगाच्या सात भूमिका.

आत्मज्ञान संपादन करून प्रत्यक्ष मुक्ति मिळविणें म्हणजे कांहीं सोपी गोष्ट नाहीं. या गोष्टीला किती काळ लागेल, हें नक्की कांहींच सांगणें शक्य नाहीं; कारण हें ज्याच्या त्याच्या प्रयत्नावर अवलंबून आहे. आत्मज्ञान एका जन्मांतहि प्राप्त होईल किंवा अनेक जन्महि लागतील. एकापेक्षां अनेक जन्म जरी लागले तरी या बाबतींत केलेला अभ्यास मृत्यूमुळें वाया जात नाहीं, हा वसिष्ठांचा सिद्धान्त याच प्रकरणांत पुढें स्पष्ट करण्यांत आलेला आहे. आत्मज्ञान संपादन करणें हें जरी एकट्या जीवाचेंच कर्म असलें, तरी तो ज्या अज्ञानाच्या भूमिकेवर स्थित आहे, तेथपासून प्रत्यक्ष मोक्ष फारच अंतरावर आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. जसें एखादें स्थल फार दूर असलें, म्हणजे तें एकदम गांठतां येत नाहीं, तर टप्पाटप्प्यानेंच गाठावें लागतें, तसें आत्मज्ञान टप्पाटप्प्यानें संपादन करीत जावें, असें तत्त्वज्ञान्यांचें म्हणणें आहे. मोक्ष मिळेपर्यंत हे टप्पे किंवा भूमिका किती असाव्यात यासंबंधीं निरनिराळ्या वाद्यांचीं भिन्न भिन्न मतें आहेत. जैन तत्त्वज्ञान्यांनीं या भूमिका चवदा मानल्या आहेत, तर बौद्धांनीं त्या दहाच मानल्या आहेत. थिऑसफिस्टांनीं या पांचच मानिल्या आहेत. वसिष्ठांनीं या भूमिका सात मानिल्या आहेत.

वदंति बहुभेदेन वादिनोयोगभूमिकाः ॥
ममत्वभिमता नूनमिमा एव शुभप्रदाः ॥ ३-११८-२

" निरनिराळे वादी ज्ञानाच्या भूमिका निरनिराळ्या तऱ्हांनीं वर्णन करीत असतात. परन्तु मी तुला आतां सांगणार आहे त्या भूमिका मला पसंत असून त्या मोक्ष पुरुषार्थ प्राप्त करून देणाऱ्या आहेत. "

या सात भूमिका वासिष्ठामध्यें दोन ठिकाणीं थोडयाशा फरकानें सांगितल्या आहेत.

पहिला प्रकार :— उत्पत्ति प्र. सर्ग ११८, श्लोक २, ८, ते १६.

दुसरा प्रकार :— नि. प्र. पूर्वार्ध, सर्ग १२०, श्लोक १ ते ८ व सर्ग १२६ श्लोक ४ ते २२ व ५८ ते ७२.

याशिवाय नि. प्र. उ. सर्ग ४५ मध्येंहि मनाच्या ध्यानवृक्षावरील आरोहणाचा क्रम सांगतांना या भूमिकांचा उल्लेख आलेला आहे. उत्पत्ति प्रकरणांत सर्ग ११८ मध्यें वर्णन केलेल्या ज्ञानभूमिका पुढील श्लोकांत आलेल्या आहेत.

ज्ञानभूमिः शुभेच्छाख्या प्रथमा समुदाहृता ॥
विचारणा द्वितीया तु तृतीया तनुमानसा ॥ ५ ॥
सत्त्वापत्तिश्चतुर्थी स्यात्ततोऽसंसक्तिनामिका ॥
पदार्थाभावनी षष्ठी सप्तमी तुर्यगा स्मृता ॥ ६ ॥

" शुभेच्छा नांवाची ज्ञानाची पहिली भूमिका होय. विचारणा ही दुसरी; तनुमानसा ही तिसरी; सत्त्वापत्ति ही चवथी; असंसक्ति ही पांचवी; पदार्थाभावनी ही सहावी व तुर्यगा ही सातवी भूमिका होय. "

आतां निर्वाणप्रकरण पूर्वार्ध, सर्ग १२० मध्यें वर्णन केलेल्या भूमिका पुढील श्लोकांत आलेल्या आहेत.

शास्त्रसज्जनसंपर्कैः प्रज्ञामादौ विवर्धयेत् ॥
प्रथमा भूमिकैषोक्ता योगस्यैव च योगिनः ॥ १ ॥
विचारणा द्वितीयास्यात्तृतीया ऽ संगभावना ॥
विलापनी चतुर्थी स्याद्वासनाविलयात्मिका ॥ २ ॥
शुद्धसंविन्मयानंदरूपा भवति पंचमी ॥
अर्धसुप्तप्रबुद्धाभोजीवन्मुक्तो ऽ त्र तिष्ठति ॥ ३ ॥
स्वसंवेदनरूपा च षष्ठी भवति भूमिका ॥
तुर्यावस्थोपशांताथ सप्तमी भूमिका भवेत् ॥ ५ ॥

" प्रज्ञावृद्धि नांवाची पहिली भूमिका होय; विचारणा ही दुसरी; असंगभावना ही तिसरी; विलापनी ही चवथी; शुद्धसंविन्मय व आनंद-

रूपा ही पांचवी; स्वसंवेदनरूपा ही सहावी व तुर्यातीता नांवाची सांतवी भूमिका होय. ”

वरील दोन ठिकाणीं वर्णन केलेल्या भूमिकांच्या नांवामध्यें कांहीं ठिकाणीं फरक दिसत असला, तरी त्यांचा अर्थ ध्यानांत घेतल्यावर दोन्ही ठिकाणीं वर्णन केलेल्या भूमिका एकच आहेत, असें दिसून येतें. आतां वरील भूमिकांचें सविस्तर वर्णन वासिष्ठाच्या उत्पत्ति प्र. सर्ग ११८ व नि. प्र. पू. सर्ग १२० व १२६ मध्यें आलेलें आहे, त्याचा सारांश पुढें दिलेला आहे.

## प्रवृत्ति आणि निवृत्ति.

प्रवृत्ति आणि निवृत्ति असे दोन मार्ग प्रसिद्ध आहेत. बहुतेक लोक प्रवृत्तिमार्गामध्येंच पडलेले आढळतात, या जन्ममरणात्मक प्रपंचामध्येंच राहून विषयसेवन करावें, नानातऱ्हेची चैन करावी, फारच झालें तर पुण्यकर्मांचें आचरण करून स्वर्गांत जाण्याची इच्छा करावी; कारण त्या ठिकाणीं देखील उत्तमोत्तम विषयांचेच भोग घेण्यास सांपडतील. अशाच तऱ्हेची बहुतेकांची प्रवृत्ति असते. याला प्रवृत्तिमार्ग असें म्हणतात.

### प्रवृत्तपुरुषाची व्याख्या.

किंयत्तन्नामनिर्वाणं वरं संसृतिरेव मे ॥
इतिकर्तव्यकर्ता यः सप्रवृत्त इति स्मृतः ॥ नि. पू. १२६-३

“ मोक्ष, मोक्ष म्हणून म्हणतात त्याचें काय मोठें महत्त्व आहे ? कारण त्या ठिकाणीं विषयांचे भोग थोडेच मिळणार आहेत ? मला संसारच आवडतो. कारण त्यामध्यें नानातऱ्हेचे विषयभोग मिळतात. असें म्हणून जो आपलीं नित्यनैमित्तिक व काम्य कर्में करीतच राहतो तो प्रवृत्त होय. ”

पण प्रपंचांत खरें सुख मिळेनासें झालें व वारंवार दुःखें, त्रास, यातना भोगाव्या लागल्या म्हणजे मनुष्याच्या अंतःकरणांत प्रवृत्तिमार्गाकडून निवृत्ति मार्गाकडे वळण्याचे विचार उत्पन्न होऊं लागतात.

## निवृत्त पुरुषाची व्याख्या.

असारा यत संसारव्यवस्थाऽलं ममैतया ॥
किं कर्मभिः पर्युषितैर्दिनैरेव नीयते ॥ नि. पू. १२६-५
क्रियातिशयनिर्मुक्तं किं स्याद्विश्रमणं परम् ॥
इति निश्चयवान्योतः स निवृत्त इति स्मृतः नि. पू. १२६-६

" खरोखर संसारव्यवस्था असार आहे. मला ह्याच्याशीं काय करावयाचें आहे ! त्याच त्या शिळ्या कर्मांच्या आचरणानें मी आपले आयुष्याचे दिवस वृथा कां घालवीत आहे ? क्रियामुळें होणाऱ्या उत्पत्ति, आप्ति, विकृति व संस्कृति या अतिशयांनीं निर्मुक्त असलेलें म्हणजे कूटस्थ नित्य असें कायमचें विश्रांतिस्थान काय आहे ? याचा विचार करून त्याला संपादन करीन असा ज्याचा निश्चय असतो तो निवृत्त होय. "

जो चित्तशुद्धीला अनुकूल अशा कर्माचें निष्काम व कर्तेपणाचा अभिमान न बाळगतां आचरण करूं लागतो, ग्राम्य कर्मांमध्यें मुळींच आसक्त होत नाहीं, तो पुण्यकर्मांचेंच सेवन करितो, पापाला भितो, इत्यादि गुणांनीं युक्त होतो; तेव्हां त्याला निवृत्त असें म्हणतात. अशा पुरुषालाच या निवृत्तिमार्गातील ज्ञानभूमिकांचा म्हणजे मोक्षाचा मार्ग सांपडतो.

### ( १ ) प्रथम भूमिका—शुभेच्छा ( श्रवण ).

अशा तऱ्हेनें निवृत्ति मार्गाकडे वळलेला पुरुष मुळींच कर्में करीत नाहीं, असा अर्थ नसून, तो कर्में करीत रहातो. पण त्याचीं तीं कर्में त्याला संसारामध्यें पाडण्याला कारणीभूत न होतां तीं मोक्ष प्राप्तीला चित्तशुद्धीच्या द्वारां परिपोषक होत असतात. ' मी असा उगीच काय बसलो आहे ? मी खरोखर मूढ आहे ! मी कोण आहे ? हें मला समजून घेतलें पाहिजे. सच्छास्त्राच्या परिशीलनानें व सज्जनांच्या व साधूंच्या सहवासानें मी आत्मस्वरूपाचें म्हणजे माझ्याच स्वरूपाचें ज्ञान संपादन करून घेईन,' अशी शुभ इच्छा धारण करून तो पुरुष मनःपूर्वक शम–दम–ज्ञान–विज्ञान संपन्न असलेल्या सज्जनांचें सेवन करितो, नानातऱ्हेची खटपट करून पुष्कळ पैसा खर्च करून साधुसज्जनांची कृपा संपादन करितो, त्यांच्या मुखांतून

अध्यात्मशास्त्राचें श्रवण करितो. अशा तऱ्हेनें तो विवेकशाली पुरुष या जन्ममरणात्मक संसारांतून सुटण्याची तीव्र इच्छा धारण करितो. अशा पुरुषाच्या स्थितीला 'शुभेच्छा' नांवाची पहिली भूमिका म्हणतात. ही भूमिका पूर्वीच्या अनेक जन्मांतील संचित पुण्यकर्मांच्या परिपाकामुळें व ऐहिक पुण्य संचयानें सत्समागम घडून साधनचतुष्टयसंपत्तीच्या प्रातीनें उदयाला येत असते. या पहिल्या भूमिकेमध्यें मनुष्याला आत्मसाक्षात्काराची उत्कंठा लागलेली असते.

## ( २ ) दुसरी भूमिका – विचारणा ( मनन ).

पहिल्या भूमिकेंतील शुभेच्छेचें संरक्षण विवेकानें करावें व अशा तऱ्हेनें तिला वाढवावी. दुष्ट कर्मांमध्यें प्रवृत्ति न होईल अशी खबरदारी घ्यावी. आत्मसाक्षात्काराची उत्कंठा परिपूर्ण करण्याकरितां श्रवण केलेल्या अध्यात्मशास्त्राचा पूर्ण विचार करून त्यांतील तात्त्विक सिद्धांत, शास्त्र, गुरु व सज्जन यांच्या मदतीनें चांगलें समजून घ्यावें. 'मी कोण आहे व हें जग कसें उत्पन्न झालें आहे' याचा विचार सतत करीत जावा. ही विचारणा नांवाची दुसरी भूमिका होय.

## ( ३ ) तिसरी भूमिका – तनुमानसा ( निदिध्यासन ).

ह्या भूमिकेचें दुसरें नांव 'असंगभावना' असें निर्वाणपूर्वार्धात दिलें आहे. हीं दोन्ही नांवें जरी भिन्न असलीं तरी अर्थ एकच आहे. सर्व ऐहिक व पारलौकिक शब्दस्पर्शादि विषय अनित्य म्हणून असत् आहेत, असें प्रथम युक्तीनें ठरवून त्या विषयीं असलेली आसक्ति नाहींशी झाल्यावर आत्मा व अनात्मा यांच्या भेदयुक्त विवेकानें 'हा देह मी व हें माझें' हे संकल्प सोडून 'मी असंग, अद्वितीय, सत्, चित् व आनंदरूप असें ब्रह्म आहे!' असा पक्का निश्चय करून तशा ब्रह्मचिंतनांत सतत गढून रहाणें ही तनुमानसा ( म्हणजे मनाची एकाग्रता ) किंवा असंगभावना ( मी असंग म्हणजे माझा कोणाशींहि संबंध नाहीं अशी भावना ) या नांवाची तिसरी भूमिका होय.

वसिष्ठांनीं या भूमिकात्रयाला 'जाग्रत्' असें म्हटलें आहे. कारण ह्या

ठिकाणीं व्यावहारिक सत्तेनें जगाचें भान होत असतें. ह्या तीन अवस्थांमध्यें असणाऱ्या पुरुषांना 'आर्य '* ही संज्ञा देण्यांत आली आहे. योग्याचा आर्यपणा पहिल्या भूमिकेंत अंकुरित होऊन द्वितीय भूमिकेंत विकास पावतो व तृतीय भूमिकेंत तोच फलद्रूप होतो. या तीन भूमिका मुमुक्षूच्या आहेत.

## ( ४ ) चवथी भूमिका – सत्त्वापत्ति-स्वप्नसदृशी.

( मुक्त होणाऱ्याची भूमिका)

या भूमिकेचें दुसरें नांव 'विलापनी' असें निर्वाणपूर्वार्धांत दिलें आहे. हीं दोन्हीं नावें जरी भिन्न असलीं, तरी अर्थ एकच आहे. वरील तीन भूमिकांच्या दृढ अभ्यासानें चित्ताच्या ठिकाणीं विषयासंबंधानें पूर्ण वैराग्य बाणतें व अज्ञानाचा क्षय होऊन चित्तात ज्ञानाचा उदय होतो. ह्या भूमिकेमध्यें आत्मसाक्षात्कार होतो. त्यामुळें 'ज्ञचित्तं सत्त्वमुच्यते' ज्ञानी पुरुषाच्या चित्ताला चित्त असें न म्हणतां तें सद्रूप झालेलें असतें, म्हणून त्याला 'सत्त्व' असें म्हणतात, व अशा सत्त्वाची प्राप्ति त्यास झालेली असते, म्हणून ह्या भूमिकेला 'सत्त्वापत्ति' असें नांव दिलें आहे. या भूमिकेंत असणारा ज्ञानी अद्वैत भावनेंत स्थिर होऊं

---

* आर्य शब्दाची व्याख्या.

कर्तव्यमाचरन्कार्यमकर्तव्यमनाचरन् ॥
तिष्ठति प्राकृताचारोयः स आर्य इति स्मृतः ॥ नि. पू. १२६-५४
यथाचारं यथाशास्त्रं यथाचित्तं यथास्थितम् ॥
व्यवहामुपादत्ते यः स आर्य इति स्मृतः ॥ नि. पू. १२६-५५

" आपल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें प्राप्त झालेल्या कर्तव्यकर्माचें आचरण जो निष्कामपणानें व मोठ्या प्रेमानें करीत असतो व अकर्तव्याचें आचरण करावें असें मनांत सुद्धां आणीत नाहीं त्याला आर्य असें म्हणतात. सदाचाराला अनुसरून व शास्त्राला धरून चित्ताचें समाधान विघडून न देतां परिस्थितीला अनुसरून जो सर्व लौकिक व्यवहार करीत असतो त्याला आर्य म्हणतात.'

लागतो व जेव्हां तो जगाकडे पाहूं लागतो तेव्हां त्याला प्रातिभासिक सत्तेनें त्याचें भान होत असतें म्हणून या भूमिकेला 'स्वप्नसदृशी' असेंहि म्हटलें आहे. ह्या भूमिकेवर आरूढ झालेल्या योग्याला ब्रह्मवित् अशी पदवी देण्यांत येते. या भूमिकेच्या शेवटीं योग्याची निर्विकल्प समाधि सिद्ध होते. नि. प. पूर्वार्ध सर्ग १२७ मध्यें श्रीरामचंद्र वसिष्ठांचा उपदेश ऐकतां ऐकतांच आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होऊन निर्विकल्प समाधीमध्यें परमपदीं विश्रांत झाला असें वर्णन आहे. यापुढील भूमिकांवर कसें आरूढ व्हावें हें सांगण्याकरितांच वसिष्ठांनीं नि. प्र. उत्तरार्धांतील तत्त्वज्ञानाचा उपदेश केला आहे असें दिसून येतें.

## योगभ्रष्टाची स्थिति.

पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या व चवथ्या भूमिकेवर आरूढ झालेला ज्ञानयोगी जर आत्मसाक्षात्कार न होतां मध्येंच मरण पावला तर त्याला कोणती गति प्राप्त होते असा प्रश्न भगवद्गीतेंत अध्याय ६ मध्यें जसा अर्जुनानें विचारला आहे, तसाच वासिष्ठामध्येंहि रामानें प्रश्न विचारला आहे. त्याचें उत्तर वसिष्ठांनीं नि. पू. सर्ग १२६ मध्यें पुढील श्लोकांत दिलें आहे.

योगभूमिकयोत्क्रांतजीवितस्य शरीरिणः ॥ ४७ ॥
भूमिकांशानुसारेण क्षीयते पूर्वदुष्कृतम् ॥
ततः सुरविमानेषु लोकपालपुरेषु च ॥ ४८ ॥
मेरुपर्वतकुंजेषु रमते रमणीसुखः ॥
ततः सुकृतसंभारे दुष्कृते च पुराकृते ॥ ४९ ॥
भोगजाले परिक्षीणे जायंते योगिनो भुवि ॥
शुचीनां श्रीमतां गेहे गुप्ते गुणवतां सताम् ॥ ५० ॥
जनित्वा योगमेवैते सेवंते योगवासिताः ॥
तत्र प्राग्भावनाभ्यस्तयोगभूमिक्रमं बुधाः ॥
स्मृत्वा परिपतंत्युच्चैरुत्तरं भूमिकाक्रमम् ॥ ५१ ॥

यांचा भावार्थः—या चारी भूमिकांपैकीं कोणत्याहि भूमिकेवर आरूढ

झालेला ज्ञानयोगी जर मध्येंच मरण पावला तर त्याचें पातक पूर्वी केलेल्या निष्काम कर्मानुष्ठानानें क्षीण होतें व संचित पुण्यकर्मांचा भोग घेण्याकरितां तो स्वर्गादि लोकांना जातो. तेथील दिव्य विषयांचा उपभोग घेऊन पुण्य क्षीण झाल्यावर या भूलोकीं शुचिर्भूत व सदाचारसंपन्न अशा गुणी श्रीमान् लोकांच्या घरीं जन्माला येतो व त्या ठिकाणीं पूर्वजन्मीं प्राप्त झालेल्या योगभूमिक्रमास आठवून पुढील भूमिकेवर आरूढ होण्याकरितां अभ्यास करूं लागतो.*

पहिल्या तीन भूमिकांमध्यें असणाऱ्या योग्यांना व्यावहारिक सत्तेनें जगाचें भान होत असतें म्हणून त्यांना जाग्रत् असें म्हटलें आहे, व चवथ्या भूमिकेवर आरूढ झालेल्या योग्यांना प्रातिभासिक सत्तेनें जगाचें भान होत असतें, म्हणून त्या भूमिकेला स्वप्नसदृशी असें वर म्हटलें आहे.

## (५) पाचवी भूमिका-असंसक्ति.

(जीवन्मुक्ताची भूमिका)

चार भूमिकांचा दृढ अभ्यास झाल्यावर पांचव्या असंसक्ति नांवाच्या भूमिकेस प्राप्त झालेला योगी केवल सत्तारूपानें अवशिष्ट रहातो. शरीरांत रहात असूनहि 'हा देह मी आहे' किंवा 'हा माझा आहे' अशी देहाच्या ठिकाणीं कोणत्याहि तऱ्हेची आसक्ति नसते. या भूमिकेवर आरूढ झालेल्या योग्याला 'जीवन्मुक्त' व 'ब्रह्मविद्वर' ह्या पदव्या प्राप्त होतात. या ठिकाणीं जरी त्याला जग व्यवहारापुरतें भासत असलें, तरी त्याला तो असत् (भ्रम) आहे, असें समजत असल्यामुळें त्याचा व्यवहार अर्धवट जागा झालेल्या पुरुषाप्रमाणें होत असतो. या भूमिकेवरील ज्ञानी पुरुषच गुरु करण्यास पूर्ण योग्य असतो, कारण तो मोठा विद्वान् व ब्रह्मनिष्ठ असतो. म्हणून अशाच गुरूला आत्मज्ञानाकरितां शरण जावें असें, "तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्" (मुंडक. १-२ १२) असें मुंडकोपनिषदांत स्पष्ट सांगितलें आहे. शिष्याला उपदेश

* अशाच अर्थाचें वर्णन भगवद्गीतेंत अ. ६ मध्यें श्लोक ४० ते ४३ मध्यें आलेलें आहे.

करून त्याच्या ठिकाणच्या सर्व शंकांचें निरसन करण्यांत मोठा कुशल व आत्मसाक्षात्कारसंपन्न असाच गुरु असावयास पाहिजे. कारण जर तो नुसताच ब्रह्मनिष्ठ असल्यामुळें नेहमीं समाधींत असेल, तर तो शिष्याला उपदेश केव्हां व कसा करणार? म्हणून तो ब्रह्मनिष्ठ असून मोठा विद्वान्‌हि पाहिजे, असा पुरुषच गुरु करण्यास योग्य असतो व तो त्या ज्ञानाच्या पांचव्या भूमिकेवर आरूढ झालेलाच आढळतो.

## ( ६ ) सहावी भूमिका-पदार्थाभावनी ( तुर्या ) ( सुपुप्तसदृशी ).

वरील पांच भूमिकांच्या दृढ अभ्यासामुळें योगी आत्मस्वरूपामध्यें रममाण होऊं लागला आणि त्याच्या ठिकाणीं अंतर्बाह्य विषयांची भावनासुद्धां राहिली नाहीं म्हणजे मग त्याचे सर्व व्यवहार केवळ प्रकृतीच्या प्रेरणेनुसार होऊं लागतात. अशा भूमिकेला ' पदार्थाभावनी ' किंवा ' तुर्या ' असें म्हटलें आहे. या भूमिकेवर आरूढ झालेल्या योग्याला 'ब्रह्मविद्वरीय' ही पदवी प्राप्त होते. या भूमिकेंत योग्याचे ठिकाणीं ' मी ब्रह्म आहे ' हीहि वृत्ति स्वभावतःच क्षीण होत जात असते. याची स्थिति सुषुप्तपुरुषासारखी असते.

## ( ७ ) सातवी भूमिका-तुर्यगा.

सहा भूमिकांचा पुष्कळ काळ अभ्यास झाला कीं, अंतर्बाह्य भेदवृत्तीचा लवलेशहि रहात नाहीं व ' मी ब्रह्म आहे ' ही सहाव्या भूमिकेतील ब्रह्मरूप बनलेली वृत्ति देखील जेव्हां क्षीण होते व चित्तांत पूर्ण स्वयंप्रकाश ब्रह्मच अवशिष्ट रहाते, अशा अवस्थेला ' तुर्यगा ' नांवाची सातवी आणि शेवटची भूमिका असें म्हणतात. या भूमिकेवर आरूढ झालेल्या योग्याला ' ब्रह्मविद्वरिष्ठ ' ही पदवी प्राप्त होते. या अवस्थेंत त्याच्या सर्व हृदयग्रंथी छिन्नभिन्न होऊन जातात. सर्व संशय दूर होतात व तो जीवन्मुक्तदशेचा पूर्ण अनुभव घेत रहातो. चित्रांतील दीपाप्रमाणें स्थिर असलेला तो वस्तुतः प्रत्यक्ष मोक्षाला पावलेला नसूनहि मोक्षाला पावल्यासारखा दिसतो.

जे महाभाग्यवान् सातव्या भूमिकेप्रत जाऊन पोहोचले, ते महात्मे

खरोखरच धन्य होत ! ते महात्मे आत्माराम झाले, असेंच म्हणण्यास हरकत नाहीं. या स्थितीप्रत जाऊन पोहोंचलेल्या जीवन्मुक्तांना सांसारिक सुखःदुःखाची यत्किंचित्हि बाधा होत नाहीं. त्यांचें शरीर प्रारब्धानुसार कर्म करीत असलेलें दिसतें. कर्म करणें किंवा न करणें या दोन्हीपैकीं कोणत्याहि एका गोष्टीमध्यें त्यांचा आग्रह नसतो. मात्र शेजारी असलेल्या एखाद्या मनुष्यानें सुचविलें असतां क्रमप्राप्त असे व्यावहारिक व धार्मिक आचार ते एखाद्या व्यवहारदक्ष मनुष्याप्रमाणें चोख करीत असतात. परंतु त्यांचें सुख कोणत्याहि बाह्य क्रियेवर केव्हांहि अवलंबून नसतें. असो, ह्या सात भूमिकांचें उल्लंघन करून जे पलीकडे जाऊन ब्रह्मरूप झाले, ते तर खरोखरच मोठे धन्य होत. इंद्रियरूपी शत्रूंना जिंकून या सप्तभूमिकांवर विजय मिळविणारे आणि आनंदसाम्राज्यपदाच्या सिंहासनावर विराजमान झालेले महात्मे निःसंशय वंदनीय होत ! सर्व भूमंडळाचें अधिपत्य किंवा सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचें पदसुद्धां त्यांना कःपदार्थ वाटतें; व तेच महात्मे विदेह कैवल्यस्थितीला प्राप्त होतात.

याप्रमाणें ज्ञानाच्या सात भूमिका वासिष्ठामध्यें सांगितल्या आहेत, त्यांपैकीं

**मुमुक्षुभूमिकास्तिस्रो मुच्यमानस्यतूत्तरा ॥**
**मुक्तस्य परतस्तिस्रो भूमिका सप्त दर्शिताः ॥** नि. पू. सर्ग १२०

पहिल्या तीन भूमिका मुमुक्षूच्या आहेत, चवथी भूमिका मुक्त होणाऱ्याची व पांचवी, सहावी व सातवी या तीन भूमिका जीवन्मुक्ताच्या आहेत.

**आसामंते स्थिता मुक्तिस्तस्यां भूयो न शोच्यते ॥** नि. पू. ११८-७.

“ या सात भूमिकांच्या शेवटीं विदेह मुक्ति आहे. ती प्राप्त झाली असतां पुनः कधींहि शोक करण्याचा प्रसंग येत नाहीं.” प्रारब्ध संपल्यावर जेव्हां देहपात होतो तेव्हां तो जीवन्मुक्त पुरुष विदेहमुक्त होतो असें म्हणतात. ही विदेहमुक्ति म्हणजेच ब्रह्मरूपस्थिति असल्यामुळें या स्थितीची गणना वरील सात भूमिकामध्यें करितां येत नाहीं.

— — —

# प्रकरण ४१ वें.

## कर्मबंधांतून सुटका.

आपल्या हातून एकदां कर्म घडलें म्हणजे मग त्याचें फल वाईट असो कीं चांगलें असो, तें आपल्याला आवडो वा न आवडो, तें फल आपणास मिळाल्याशिवाय रहाणार नाहीं. जसें आपला पाय अग्नीवर पडला म्हणजे मग तो भाजूं नये असें जरी मनांत असलें, तरी तो भाजल्याशिवाय रहात नाहीं, तसें झालेल्या कर्माचें फल अवश्य मिळणारच. असा एक जगांतील अबाधित नियम आहे, असें वसिष्ठ सांगतातः—

न सशैलो न तद्व्योम न सोऽब्धिश्च न विष्टपम् ॥
अस्ति यत्र फलं नास्ति कृतानामात्मकर्मणाम् ॥ ३-९५-३३
ऐहिकं प्राक्तनं वापि कर्म यद्रचितं स्फुरत् ॥
पौरुषोऽसौ परो यत्नो न कदाचन निष्फलः ॥३-९५-३४

" असा एकहि पर्वत नाहीं, आकाश नाहीं, समुद्र नाहीं, स्वर्ग नाहीं, कीं ज्या ठिकाणीं आपण केलेल्या कर्माचें फळ मिळत नाहीं. कोणतेंहि कर्म, मग तें या जन्मांत केलेलें असो किंवा पूर्वीच्या जन्मांत केलेलें असो, तो पौरुष प्रयत्न आहे व तो कधींहि निष्फल होत नाहीं."

आतां या ठिकाणीं कर्म याचा अर्थ जर कोणी केवळ शरीरानें किंवा केवल इंद्रियानें केलेलें कर्म असा करीत असतील तर तो बरोबर नाहीं, कारण खरें कर्म मनापासून सुरू होत असतें, म्हणून कर्म हें वास्तविक मनाचें आहे, शरीराचें नाहीं असें वसिष्ठ सांगतातः—

मनसोऽयं समुन्मेषः फलाकलनरूपतः ॥
एतत्तत्कर्मणां बीजं फलमस्यैव विद्यते ॥ ३-९५-२९
कर्मबीजं मनःस्पंदः कथ्यतेऽथानुभूयते ॥
क्रियास्तु विविधास्तस्य शाखाश्चित्रफलास्ततेः॥ ३-९६-११

" क्रियाकौशल्यानुसंधानरूप जो मनाचा विकास तेंच कर्माचें बीज होय. या मननरूप बीजाचेंच क्रियानिष्पत्तिरूपी फल येत असतें. कर्माचें बीज मनःस्पंद आहे व विविध शारीरिक क्रिया या त्या मनाच्या शाखा आहेत, असें सांगतात व त्याचा तसा अनुभवहि येतो." शरीर मरेपर्यंत सारखें कर्म करीतच रहातें; व हीं सर्व कर्मे फल निर्माण करितात व या सर्व कर्मांनीं आवण बांधलें जातो, असें म्हणतां येत नाहीं; तर ज्या कर्मामध्यें वासना असते, तेंच कर्म बंधनकारक होत असतें. वासनारहित स्थितींत केलेलें कर्म बंधनकारक होत नाहीं, असें वसिष्ठ सांगतातः —

सर्वाहि वासनाभावे प्रयान्त्यफलतां क्रियाः ॥
अशुभाः फलवन्त्योऽपि सेकाभावे लताइव ॥ नि.पू. ८७-१९
वासनामात्रसारत्वादज्ञस्य सफलाः क्रियाः ॥
सर्वा एवाफलाज्ञस्य वासनामात्रसंक्षयात् ॥ नि.पू. ८७-१८

" पाणी न घातल्यामुळें वेलींना जशीं फळें येत नाहींत, तसें वासनांच्या अभावीं सर्व शुभाशुभ क्रिया निष्फळ होतात. अज्ञानी पुरुषांचें वासना हेंच सार ( बल ) असल्यामुळें त्याच्या सर्व क्रिया सफल होतात, पण ज्ञानी पुरुषाच्या सर्वच वासनांचा क्षय झाला असल्यामुळें त्यांच्या सर्व क्रिया निष्फल होतात." अशाच तऱ्हेचें वर्णन भगवद्गीतेंतहि* आलेलें आहे यावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं, मनांत कोणत्याहि विषयांची इच्छा नसतांना जर कर्मे केलीं तर तीं मुळींच बंधनकारक होत नाहींत. पण प्रत्यक्ष शरीरानें कर्म न करितां देखील जर त्याविषयींची नुसती इच्छा मनांत धारण केली, तरी देखील त्या इच्छामात्रानेंहि बंध होऊं शकतो आणि मनांत इच्छा नसतांना केवळ शरीरानें कर्म झालें, तर तें खरें कर्मच नव्हे असें वसिष्ठांचें म्हणणें आहेः—

समया स्वच्छया बुद्धया संततं निर्विकारया ॥
यथा यत् क्रियते राम तददोषाय सर्वदा ॥ नि. उ. १९९-७

---

* निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ॥
शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ भ.गीता ४-४१

शुभाशुभाः क्रिया नित्यं कुर्वन्परिहरन्नपि ॥
पुनरेति न संसारमसंसक्तमना मुनिः ॥ नि. उ. १९९-३३
शुभाशुभाः क्रिया नित्यमकुर्वन्नपि दुर्मतिः ॥
निमज्जत्येव संसारेऽपरित्यक्तमनाः शठः ॥नि.उ.१९९-३४.

“ सम, स्वच्छ व निर्विकार बुद्धीनें जें जसें सतत आचरण केलें जातें, तें सर्वदा निर्दोषच होय. ज्याचें चित्त असंसक्त आहे असा मुनि सतत शुभाशुभ क्रिया करीत असला किंवा करीत नसला तरी तो पुनः संसारास प्राप्त होत नाहीं. पण जो दुर्मति आपलें मन विषयांत आसक्त ठेवतो व जो शुभ कर्माचें आचरण व अशुभ कर्माचा त्याग जरी करीत असला किंवा शुभाशुभ क्रिया मुळींच करीत नसला तरीहि तो आत्मवंचक पुनः संसारांत निमग्न होतोच. ”

## कर्माचें कर्तृत्व.

आतां कर्तृत्व म्हणजे काय याचा थोडासा विचार करूं. शरीराच्या *ठिकाणीं कर्माचें कर्तृत्व येत नाहीं,* हें *प्रथम लक्षांत* ठेवलें पाहिजे. वासनारागादि मनोवृत्तीमुळें “ हें माझें कर्तव्य आहे ” असा बुद्धीचा निश्चय होऊन त्या निश्चयाचें शारीरिक क्रियेमध्यें पर्यवसान झाल्यावर ‘ या क्रियेचा मी कर्ता आहे ’ अशी अतःकरणांत वृत्ति उत्पन्न होणें यालाच कर्माचें ‘ कर्तृत्व ’ असें म्हणतात. फलभोक्तृत्वहि शारीरिक क्रियेप्रमाणें उत्पन्न होत असतें. मनुष्य वासनेनुसार इंद्रियांच्या योगानें कर्में करितो आणि त्या कर्मानुसार त्याला फल प्राप्त होतें अर्थात् **भोक्तृत्व हें कर्तृत्वापासूनच उत्पन्न होत असतें असा वेदांतशास्त्राचा सिद्धान्त आहे.** या सिद्धान्ताच्या अनुरोधानें वसिष्ठ म्हणतात कीं,

कुर्वतोऽकुर्वतोवाऽपि स्वर्गेऽपि नरकेऽपि वा ॥
यादृग्वासनमेतत्स्यान्मनस्तदनुभूयते ॥ ४-३८-८.

“ प्रत्यक्ष शारीरिक क्रिया घडो, वा न घडो ज्या प्रकारची वासना असेल त्या प्रकारचें फल स्वर्गामध्यें किंवा नरकामध्यें मन भोगल्याशिवाय रहात

नाहीं." वास्तव ज्याला तत्त्वज्ञान झालेलें नाहीं, अशा पुरुषाची शारीरिक क्रिया किंवा मानसिक क्रिया कर्तृत्वाभिमानामुळें होत असते. परंतु जो तत्त्वज्ञानी आहे, तो वासनारहित असल्यामुळें त्याच्या क्रिया कर्तृत्वाभिमानशून्य असतात. तत्त्ववेत्त्याच्या वासना शिथिल झालेल्या असल्यामुळें आणि त्यानें केलेलें कर्म फलाभिसंधिरहित असल्यामुळें त्याच्याकडे फलभोक्तृत्व येत नाहीं; कारण भोक्तृत्व हें कर्तृत्वाभिमानाचें अवश्य कार्य आहे. बरें त्याला प्रारब्धकर्मानें फल प्राप्त झालें तरी अनासक्तबुद्धीनें राहूनच तत्त्वज्ञान्याच्या अवयवांची हालचाल होत असल्यामुळें त्या शारीरिक व्यापारापासून झालेली फलप्राप्ति आत्मस्वरूपच आहे असें तो पहातो. परंतु अतत्त्वज्ञ प्रत्यक्ष क्रिया करीत नसला, तरी त्याचें चित्त विषयामध्यें मग्न झालेलें असल्यामुळें तो कर्तृत्व भोक्तृत्वाच्या बंधनांत पडतो. सारांश,

### मनच कर्माचें कर्ते आहे.

मनोयत्करोति तत्कृतं भवति यन्न करोति तन्नकृतं भवति।
अतः मन एव हि कर्तृ न देहः ॥ ४-३८-७
मनःकृतं कृतं लोके न शरीरकृतं कृतम् ॥ ३-८९-१

" मनानें केलेली क्रिया तीच खरी क्रिया; अबुद्धिपूर्वक जी शारीरिक क्रिया होत असते, ती खरी क्रिया नव्हे; आणि अशा क्रियेपासून बंधनहि उत्पन्न होत नाहीं. वास्तव कर्तृत्व हें देहाकडे नसून मनाकडे आहे. म्हणूनच मनानें केलेलें तेंच खरें केलेलें होय व शरीरानें करेलें तें केलेलें नव्हे."

हीच गोष्ट जास्त स्पष्ट करून दाखविण्याकरितां वसिष्ठांनीं एक दृष्टांत दिला आहे. एखादा मनुष्य आपल्या शय्येवर निजलेला असतां स्वप्नामध्यें त्याच्या ठिकाणीं 'मी मोठ्या खड्ड्यांत पडत आहे' अशी वासना उत्पन्न झाली असतां तो खड्ड्यांत पडण्याचें दुःख आणि तज्जन्य कंप अनुभवितो. परंतु दुसरा एखादा मनुष्य झोंप लागल्यावर खड्ड्यांत पडत असला तरी, आपण खड्ड्यांत पडत आहों ही भावना त्याच्या ठिकाणीं नसल्यामुळें तो अंथरुणावर असल्याप्रमाणें आनंदांतच असतो. ह्या दृष्टांतामध्यें पहिला पुरुष खड्ड्यांत पडण्याच्या क्रियेचा कर्ता नसूनहि कर्ता होतो आणि दुसरा

पुरुष कर्ता असूनहि अकर्ता होतो. कारण कर्तृत्व किंवा अकर्तृत्व संकल्पवशात् उत्पन्न होत असतें.

**तस्माद्यच्चितस्तन्मयो भवति पुरुष इति सिद्धान्तः॥४-३८-१३॰**

" म्हणून जशी ज्याच्या चित्ताची स्थिति तसा तो होत असतो असा सिद्धांत आहे."

अशा रीतीनें मन हेंच सर्व कर्मे, सर्व इच्छा, सर्व भाव, सर्व लोक इत्यादिकांचें बीज आहे. अर्थात् या मनाचा त्याग केला म्हणजे सर्व संसाराचा परिहार होतो, सर्व दुःखांचा क्षय होतो आणि सर्व पापपुण्यें लय पावतात. ज्ञानी मानसिक कर्मांनेंहि पराभूत होत नाहीं आणि त्याच्या फलामध्यें केव्हांहि अनुरक्त होत नाहीं. कारण तीं कर्में आत्म्याहून निराळीं नाहींत अशी त्याची भावना असते. एखादा मुलगा आपल्या मनांत नगर निर्माण करतो आणि घटकाभर मनानें त्याचें कौतुक करतो व नंतर त्याचा नाश करून टाकतो. परंतु त्या नाशामुळें त्याला दुःख होत नाहीं. कदाचित् लीलेनें " हाय ! हाय ! माझें कल्पित नगर नष्ट झालें ! " असे उद्गार त्यानें काढलेच, तरी त्याला खरोखर दुःख होत नाहीं. ज्ञानी मनुष्याची स्थिति हुबेहूब अशीच असते. ज्ञानी मनुष्य कर्में करीत असला, तरी त्याची बुद्धि अनासक्त असल्यामुळें तो त्या कर्मांनीं केव्हांच लिप्त होत नाहीं.

## कर्मत्याग.

वसिष्ठांनीं खरा कर्मत्याग खालील श्लोकांत स्पष्ट केला आहेः—

**अवेदनमसंवेद्यं यद्वासनमासितम् ॥**
**शांतं सममनुल्लेखं स कर्मत्याग उच्यते ॥** नि. पू. ३–२५.
**समूलकर्मसंत्यागेनैव ये शांतिमास्थिताः ॥**
**नैव तेषां कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥** नि. उ. ३–२७

" विषय आणि विषयांचें संवेदन यांनीं रहित व वासनारहित असें चित्ताचें शांत, सम, कृताकृतानुसंधानशून्य अवस्थान तोच कर्मत्याग होय. अशा तऱ्हेच्या समूल कर्मत्यागानें जे शांतीचा आश्रय करून राहिलेले

असतात, त्यांनीं कांहीं कर्म केलें तरी त्यांना त्याचें कांहीं फल नाहीं व नाहीं केलें तरी कांहीं प्रत्यवाय नाहीं."

ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं 'हा देह मी' असा अहंकार नाहीं म्हणून कर्तेपणाचा अभिमान नाहीं. यास्तव तो कर्म करीत असूनहि त्या कर्माचा तो कर्ता होत नाहीं व त्यानें तो बद्धहि होत नाहीं असें वसिष्ठ सांगतात:—

* यस्य नाहंकृतोभावोबुद्धिर्यस्य न लिप्यते ॥
हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ॥ नि. पू. ३-१९

"ज्याला अहंकार नाहीं व ज्याची बुद्धि कर्तृत्वादिकांनीं लिप्त होत नाहीं त्यानें या सर्व लोकांना जरी मारलें तरी तो त्या हनन क्रियेचा कर्ता होत नाहीं व त्यामुळें तो बद्धहि होत नाहीं."

यावरून असें दिसून येतें कीं, तत्त्वज्ञानी मनुष्य निर्वासन, निरिच्छ बनलेला असतो, त्यामुळें तो सर्व कर्मबंधनांतून मोकळा झालेला असतो, त्यामुळें त्याला कर्मांचीं फलें भोगण्याकरिता पुनर्जन्म घ्यावा लागत नाहीं. प्रारब्धकर्में उपभोगांनीं क्षीण झालीं म्हणजे तो विदेह स्थितीला प्राप्त होतो.



* असाच श्लोक भगवद्गीतेमध्यें अ. १८ (श्लोक १७) मध्यें आला आहे.

पुरुष कर्ता असूनहि अकर्ता होतो. कारण कर्तृत्व किंवा अकर्तृत्व संकल्पवशात् उत्पन्न होत असतें.

**तस्माद्यच्चितस्तन्मयो भवति पुरुष इति सिद्धान्तः॥४-३८-१३॥**

" म्हणून जशी ज्याच्या चित्ताची स्थिति तसा तो होत असतो असा सिद्धांत आहे."

अशा रीतीनें मन हेंच सर्व कर्मे, सर्व इच्छा, सर्व भाव, सर्व लोक इत्यादिकांचें बीज आहे. अर्थात् या मनाचा त्याग केला म्हणजे सर्व संसाराचा परिहार होतो, सर्व दुःखांचा क्षय होतो आणि सर्व पापपुण्यें लय पावतात. ज्ञानी मानसिक कर्मांनेंहि पराभूत होत नाहीं आणि त्याच्या फलामध्यें केव्हांहि अनुरक्त होत नाहीं. कारण तीं कर्मे आत्म्याहून निराळीं नाहींत अशी त्याची भावना असते. एखादा मुलगा आपल्या मनांत नगर निर्माण करतो आणि घटकाभर मनानें त्याचें कौतुक करतो व नंतर त्याचा नाश करून टाकतो. परंतु त्या नाशामुळें त्याला दुःख होत नाहीं. कदाचित् लीलेनें " हाय! हाय! माझें कल्पित नगर नष्ट झालें!" असे उद्गार त्यानें काढलेच, तरी त्याला खरोखर दुःख होत नाहीं. ज्ञानी मनुष्याची स्थिति हुबेहूब अशीच असते. ज्ञानी मनुष्य कर्मे करीत असला, तरी त्याची बुद्धि अनासक्त असल्यामुळें तो त्या कर्मांनीं केव्हांच लिप्त होत नाहीं.

## कर्मत्याग.

वसिष्ठांनीं खरा कर्मत्याग खालील श्लोकांत स्पष्ट केला आहे:—

**अवेदनमसंवेद्यं यदवासनमासितम् ॥**
**शांतं सममनुल्लेखं स कर्मत्याग उच्यते ॥** नि. पू. ३–२५.
**समूलकर्मसंत्यागेनैव ये शांतिमास्थिताः ॥**
**नैव तेषां कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥** नि. उ. ३–२७

" विषय आणि विषयांचें संवेदन यांनीं रहित व वासनारहित असें चित्ताचें शांत, सम, कृताकृतानुसंधानशून्य अवस्थान तोच कर्मत्याग होय. अशा तऱ्हेच्या समूल कर्मत्यागानें जे शांतीचा आश्रय करून राहिलेले

असतात, त्यांनीं कांहीं कर्म केलें तरी त्यांना त्याचें कांहीं फल नाहीं व नाहीं केलें तरी कांहीं प्रत्यवाय नाहीं."

ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं 'हा देह मी' असा अहंकार नाहीं म्हणून कर्तेपणाचा अभिमान नाहीं. यास्तव तो कर्म करीत असूनहि त्या कर्माचा तो कर्ता होत नाहीं व त्यानें तो बद्धहि होत नाहीं असें वसिष्ठ सांगतात:--

* यस्य नाहंकृतोभावोबुद्धिर्यस्य न लिप्यते ॥
हत्वाऽपि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ॥ नि. पू. ३-१९

"ज्याला अहंकार नाहीं व ज्याची बुद्धि कर्तृत्वादिकांनीं लिप्त होत नाहीं त्यानें या सर्व लोकांना जरी मारलें तरी तो त्या हनन क्रियेचा कर्ता होत नाहीं व त्यामुळें तो बद्धहि होत नाहीं."

यावरून असें दिसून येतें कीं, तत्त्वज्ञानी मनुष्य निर्वासन, निरिच्छ बनलेला असतो, त्यामुळें तो सर्व कर्मबंधनांतून मोकळा झालेला असतो, त्यामुळें त्याला कर्मांचीं फळें भोगण्याकरितां पुनर्जन्म घ्यावा लागत नाहीं. प्रारब्धकर्म उपभोगांनीं क्षीण झालीं म्हणजे तो विदेह स्थितीला प्राप्त होतो.

---

* असाच श्लोक भगवद्गीतेमध्यें अ. १८ (श्लोक १७) मध्यें आला आहे.

# प्रकरण ४२ वें.

## आत्मसाक्षात्कार.

' ज्ञानादेव तु कैवल्यम् ' ज्ञानानेंच मोक्ष प्राप्त होतो, या सिद्धांत वाक्यांत ज्ञान या शब्दाचा अर्थ नुसतें शाब्दिक किंवा परोक्ष असा न करितां अपरोक्ष ज्ञान असाच केला पाहिजे; कारण नुसत्या शाब्दिक ज्ञानानें मोक्ष मिळत नाहीं. आत्मज्ञान किंवा ब्रह्मज्ञान याचा खरा अर्थ आत्मरूप किंवा ब्रह्मरूप होणें हा होय. 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति ' ब्रह्माला जाणणारा तो ब्रह्मच होतो, असा वेदांत शास्त्राचा सिद्धांत आहे. आपल्या स्वतःला अंतर्बाह्य ब्रह्मरूप पाहून त्यांतच स्थिर होऊन रहाणें ह्यालाच गौडपाद ज्ञान असें म्हणतात.

तत्त्वमाध्यात्मिकं दृष्ट्वा तत्त्वं दृष्ट्वा तु बाह्यतः ॥
तत्त्वीभूतस्तदारामस्तत्त्वादप्रच्युतो भवेत् ॥ मांडुक्यकारिका २-३८.

" आपल्या आंत बाहेर सर्व ठिकाणीं आत्मतत्त्व भरून राहिलें आहे, असें पाहून त्याच तत्त्वामध्यें आपल्याला स्थिर करून त्याच ठिकाणीं रममाण व्हावें व त्यापासून आपल्याला कधींहि च्युत होऊं देऊं नये. "

अशा तऱ्हेचें अपरोक्ष साक्षात्कारभूत ज्ञान ज्यांनीं संपादन केलें आहे त्यालाच वसिष्ठ ज्ञानी असें म्हणतात. पण जे आपण संपादन केलेल्या ज्ञानाचा उपयोग अपरोक्ष साक्षात्कार करून घेण्याच्या ऐवजीं केवल आपला चरितार्थ चालविण्याच्या बाबतीत करितात त्यांना वसिष्ठांनीं

### ज्ञानबंधु

असें म्हटलें आहे. ज्ञानबंधु म्हणजे ( ज्ञानेन बध्नाति सः ज्ञानबंधुः) केवळ ज्ञानाच्या मिषानें सत्कर्मांच्या ठिकाणीं श्रद्धा नाहींशी करून भोगलंपट बनून जो आपल्या स्वतःला व दुसऱ्याला अनर्थांनीं बांधून टाकतो तो '-ज्ञानबंधु ' होय. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे जें ज्ञानानें आपल्या-स्वतःला प्रपंचांतून सोडविण्याच्या ऐवजीं आपल्याला त्यांत बांधून ठेवतात,

ते 'ज्ञानबंधु' होत. वसिष्ठांनीं निर्वाण प्र. उत्तरार्धामध्यें ज्ञानबंधूची व्याख्या केली आहे, ती अशी आहेः—

व्याचष्टे यः पठति च शास्त्रं भोगाय शिल्पिवत् ॥
यतते न त्वनुष्ठाने ज्ञानबंधुः स उच्यते ॥ नि. उ. २१-३
कर्मस्पंदेषु नो बोधः फलितो यस्य दृश्यते ॥
बोधशिल्पोपजीवित्वाज्ज्ञानबंधुः स उच्यते ॥ नि. उ. २१-४
वसनाशनमात्रेण तुष्टाः शास्त्रफलानि ये ॥
जानंति ज्ञानबंधूंस्तान्विद्याच्छास्त्रार्थशिल्पिनः नि. उ. २१-५.

## शुभज्ञानबंधुत्व.

प्रवृत्तिलक्षणे धर्मे वर्तते यः श्रुतार्चिते ॥
अदूरवर्तिज्ञानत्वाज्ज्ञानबंधुः स उच्यते ॥ नि. उ. २१-६

## अशुभज्ञानबंधुत्व.

आत्मज्ञानमनासाद्य ज्ञानांतरलवेन ये ॥
संतुष्टाकष्टचेष्टंते ते स्मृता ज्ञानबंधवः ॥ नि. उ. २१-८

"एखाद्या कारागीराप्रमाणें जो भोगासाठीं अध्यात्मशास्त्राचें पठण व व्याख्यान करतो, पण त्याप्रमाणें वागण्याचा मुळींच प्रयत्न करीत नाहीं तो ज्ञानबंधु होय. ज्याचें ज्ञान प्रत्यक्ष कृतींत उतरलें नाहीं व जो आपल्या ज्ञानाचा उपयोग आपल्या उपजीविकेकरितांच करीत असतो, तो ज्ञानबंधु होय. शास्त्रार्थाचा एखाद्या कलेप्रमाणें उपयोग करून अन्नवस्त्र मिळाल्यानेंच जे संतुष्ट होतात व हेंच शास्त्राचें फल आहे असें जे समजतात त्यांना ज्ञानबंधु समजावें.

## शुभज्ञानबंधुत्व.

जो केवळ श्रुतीनें सांगितलेल्या प्रवृत्तिलक्षण मार्गाचेंच अनुष्ठान करीत रहातो व मनांत असें समजतो कीं, 'विविदिषंति यज्ञेन दानेन तपसा' इत्यादि श्रुतींत सांगितल्याप्रमाणें सत्कर्माच्या अनुष्ठानानें आपणास लवकरच

आत्मज्ञान होणार त्यालाहि ज्ञानबंधु म्हटलें आहे. पण हें ज्ञानबंधुत्व शुभ आहे.

### अशुभज्ञानबंधुत्व.

जे आत्मज्ञान संपादन न करितां इतर ज्ञानाच्या लेशानें संतुष्ट होतात, त्यांचें जीवित व त्यांचा व्यवहार अतीशय कष्टतर होतो म्हणून तेहि अशुभ ज्ञानबंधु होत."

अशा तऱ्हेनें ज्ञानबंधूचें वर्णन करून वसिष्ठांनीं असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, शास्त्राध्ययनानें मोठा पंडित होऊन नुसता ज्ञानबंधु होण्यापेक्षां अज्ञानी राहिलेलें चांगलें:—

**ज्ञानिनैव सदा भाव्यं राम न ज्ञानबंधुना ॥**
**अज्ञातारं वरं मन्ये न पुनर्ज्ञानबंधुताम् ॥** नि. उ. २१-१.

" सदैव ज्ञानी व्हावें पण ज्ञानबंधु केव्हांहि होऊं नये; मी ज्ञानबंधूपेक्षां अज्ञानी पुरुष श्रेष्ठ मानतो. " 'सदैव ज्ञानीच व्हावें ' या वाक्यांतील ज्ञान वसिष्ठांना कोणतें अभिप्रेत आहे त्याचा आतां विचार करूं.

### ज्ञान म्हणजेच आत्मज्ञान.

**आत्मज्ञानं विदुर्ज्ञानं ज्ञानान्यन्यानि यानि तु ॥**
**तानि ज्ञानावभासानि सारस्यानवबोधनात् ॥** नि. उ. २१-७.
**अपुनर्जन्मने यःस्याद्बोधः सज्ञानशब्दभाक् ॥** नि. उ. २२-४

" आत्मज्ञानालाच ज्ञान असें म्हणतात. दुसरीं जीं भौतिक ज्ञानें आहेत, तीं केवल ज्ञानाचे अवभास आहेत; कारण त्यांपासून ब्रह्मानंदाचा लाभ होत नाहीं. जो बोध मोक्षाला कारण होतो म्हणजेच ज्यानें पुनर्जन्म टळतो त्याला ज्ञान हें नांव आहे. " वसिष्ठ आतां ज्ञानी कोण त्याचें व्याख्यान करतात:—

**ज्ञानेन ज्ञेयनिष्ठत्वाद्योऽचित्तं चित्तमेव च ॥**
**नबुध्यते कर्मफलं सज्ञानीत्यभिधीयते ॥** नि. उ. २२-१
**ज्ञात्वा सम्यगनुज्ञानं दृश्यते येन कर्मसु ॥**

निर्वासनात्मकं ज्ञस्य सज्ञानीत्यभिधीयते ॥ नि. उ. २२-२
अंतःशीतलतेहासु प्राज्ञैर्यस्यावलोक्यते ॥
अकृत्रिमैकशांतस्य सज्ञानीत्यभिधीयते ॥ नि. उ. २२-३
प्रवाहपतिते कार्ये कामसंकल्पवर्जितः ॥
तिष्ठत्याकाशहृदयो यः स पंडित उच्यते ॥ नि. उ. २२-५

" जो मनुष्य परिपक्व झालेल्या ज्ञानानें ज्ञेय ब्रह्मामध्यें अत्यंत स्थिर होतो व त्यामुळें जो प्रारब्ध कर्माचें फल भोगीत असतांहि जगांतील सर्व बाह्यविषय ज्ञानानें बाधित झाल्यामुळें जो त्यांना खरें समजत नाहीं तो ज्ञानी होय. त्याचप्रमाणें ज्या तत्त्वज्ञानानें चित्त निर्वासन होतें असें ज्ञान संपादन करून जो आपल्या सर्व कर्मांविषयीं निर्वासन रहातो तो ज्ञानी होय. ज्याच्या सर्व इच्छा शांत झालेल्या आहेत व व्यवहारामध्येंहि ज्याच्या चित्तशांतीचा पूर्णपणें अनुभव येतो व जो स्वभावतःच केवल आत्म-लाभानेंच नित्य तृप्त झालेला असतो, त्याला ज्ञानी असें म्हटलें आहे. प्रारब्धप्राप्त कर्तव्यामध्यें जो पुरुष काम व संकल्प सोडून शांतचित्तानें रहातो तो पंडित होय. "

## योगाभ्यासानें खरी शांति प्राप्त होत नाहीं.

आतां आत्मज्ञानानें मोक्ष प्राप्त होतो असें जरी असलें, तरी हें ज्ञान संपादन करणें म्हणजे कांहीं सोपी गोष्ट नाहीं. शास्त्रावरून जरी आपण कोण आहोत व हें जगत् काय आहे, हें जरी परोक्षदृष्टया समजलें व जीव, जगत् ब्रह्मरूपच आहे, असें जरी ज्ञान झालें तरी तें आपल्या प्रत्यक्ष अनुभवाला आल्याशिवाय मोक्ष मिळणार नाहीं. आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होण्याशिवाय जगरूपी भ्रमाचा निरास होण्याला दुसरा कोणताहि उपाय नाहीं. दोरीवर भासलेल्या सर्पाकडे नुसती डोळेझाक केल्यानें सर्प नाहींसा होतो असें नाहीं, कारण डोळे उघडतांच तो पुन्हा दिसूं लागतो. यासाठीं दोरीच्या ज्ञानानें सर्पभ्रमाचा बाध झाला पाहिजे म्हणजे सर्प उत्पन्नच झालेला नाहीं असें ज्ञान झालें पाहिजे. याशिवाय सर्पाची भीति अजिबात नाहींशी होणार नाहीं. जगद्रूपीभ्रमाची स्थिति हुबेहुब अशीच आहे. हें काम

नुसत्या योगाभ्यासानें साध्य होणार नाहीं. योगाभ्यासानें चित्तवृत्तींचा निरोध करून जगाचा भ्रम घालविणें हें, सर्पाची उपेक्षा करण्यासारखें आहे. समाधीमध्यें जगाचा भास नसतो हें खरें; परंतु समाधि उतरल्यावर जगद्रूपी सर्पाचा भ्रम पूर्ववत् उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. साराश, **ज्ञानविरहित नुसत्या योगाभ्यासानें येणारी शांति ही खरी आणि पूर्ण शांतीच न हे.** यासाठीं आत्मसाक्षात्कार करून घेऊन दृश्य जगताचा अत्यंत अभाव आहे, असा पूर्ण अनुभव आला पाहिजे. हा भासमान होणारा प्रपंच थोड्याशा उपायानें नाहींसा होणार नाहीं म्हणून या बाबतींत मुमुक्षूनें सतत चिकाटीनें अभ्यास केला पाहिजे असें वसिष्ठ सांगतातः—

**जन्मांतरशताभ्यस्ता राम संसारसंस्थितिः ॥**
**सा चिराभ्यासयोगेन विना न क्षीयते क्वचित् ॥** ५-९२-२३.
**अभ्यासेन विना साधो नाभ्युदेत्यात्मभावना ॥** नि. पू. ११-१

[. " संसार स्थितीचा अभ्यास मागील शेकडों जन्मांत झालेला आहे. त्यामुळें दीर्घकाळ अभ्यास केल्यावाचून संसारस्थिति, कधींहि क्षीण होणें शक्य नाहीं. अभ्यासावांचून आपल्या ठिकाणीं ' मी आत्मा आहे ' अशी दृढ भावना उत्पन्न होत नाहीं. " आतां अभ्यास कशाला म्हणतात तें वसिष्ठ सांगतात.

## अभ्यास.

**पौनः पुन्येन करणमभ्यास इति कथ्यते ॥** नि. उ. ६७-४३
**तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम् ॥**
**एतदेकपरत्वं च तदभ्यासं विदुर्बुधाः ॥** ३-२२-२४.

" कोणतीहि गोष्ट पुनः पुनः करणें याला अभ्यास असें म्हणतात. श्रवणाच्या योगानें समजलेलें तत्त्व आपल्या बुद्धींत आरूढ व्हावें अशा दृष्टीनें त्याचें निरंतर चिंतन करणें, ज्ञान्या पुरुषाशीं त्यासंबंधीं संवाद करणें, समान अधिकाऱ्यांनीं तें एकमेकांना सांगून त्यासंबंधानें परस्परांना बोध करून देणें; त्या परमतत्त्वासंबंधीं अखंड तदाकार वृत्ति राखण्याचा प्रयत्न

करणें, याला ज्ञाते पुरुष अभ्यास असें म्हणतात." एकाच गोष्टीचा सतत अभ्यास करण्याचा मनुष्याला कंटाळा येतो म्हणून या संबंधीं वसिष्ठांनीं एक युक्ति सांगितली आहे.

* श्रुतपाठजपांतेषु समाधिनिरतोभवेत् ॥
समाधिनिरतःश्रांतः श्रुतपाठजपाञ्छ्रयेत् ॥ नि. उ. ४६-२२.

वेदांत शास्त्राचें श्रवण व पठन करावें व त्याचा कंटाळा आला म्हणजे 'अहं ब्रह्मास्मि' ( मी ब्रह्म आहे ) ह्या मंत्राचा जप करावा. जपाचा कंटाळा आला म्हणजे ध्यानपूर्वक समाधीचा अभ्यास करावा. समाधीच्या अभ्यासाचा कंटाळा आला म्हणजे पुनः श्रवणादिकाचा अभ्यास करावा.

## ब्रह्माभ्यास.

ह्या ब्रह्माभ्याससंबंधानें वसिष्ठांनीं पुष्कळच विचार केला आहे. त्याचा सारांश असा आहे कीं, अध्यात्मशास्त्र श्रवण करून त्यांत सांगितलेल्या विविध युक्तींचा अवलंब करून ज्ञाता, ज्ञेय यांचा अत्यंताभाव आहे असें जें मनन करतात, त्यांना ब्रह्माभ्यासी असें म्हणतात. दृश्य जग कधींहि उत्पन्न झालेलें नाहीं, त्याला केव्हांहि पारमार्थिक सत्ता नाहीं. हें जग तसेंच मी यांना अस्तित्व नाहीं, अशा तऱ्हेची दृढभावना करणें यालाहि ब्रह्माभ्यास म्हटलें आहे. दृश्याचा सर्वथा असंभव आहे, अशा प्रयत्नानें बोध करून घेऊन रागद्वेषादि विकार क्षीण करण्याची जी दृढबुद्धि तिलाहि ब्रह्माभ्यास असें म्हटलें आहे. सारांश, जे विरक्त पुरुष अशा तऱ्हेनें अभ्यास करून चित्तांतील विषयाबद्दलचें वैराग्य दृढ करतात आणि संसारवासना क्षीण करण्यासाठीं अहोरात्र झटतात; ते पुरुष खरोखरच धन्य होत !

---

* अशाच अर्थाचा एक श्लोक स्कंद पुराणांत आला आहे.
जपश्रांतःपुनर्ध्यायेध्यानश्रांतःपुनर्जपेत् ॥
जपध्यानाभियुक्तस्य प्रसीदति परः शिवः ॥

## योगाभ्यास म्हणजेच ब्रह्माभ्यास.

आत्मज्ञान संपादन करण्याचा जो अभ्यास त्याला वसिष्ठ योग असें म्हणतात. "योगश्चित्तवृत्तिनिरोधः" चित्तवृत्तींचा निरोध करणें हाच योग, अशा पतंजलीच्या सूत्राप्रमाणें योग हा शब्द वसिष्ठ एका विशिष्ट पद्धतीलाच लावीत नाहींत तर संसारांतून सुटण्याकरितां जे जे उपाय सांगितले आहेत त्या सर्वांना वसिष्ठ ' योग ' असें म्हणतात.

संसारोत्तरणे युक्तिर्योगशब्देन कथ्यते ॥ नि. पू. १३-३.

' संसारांतून तरून जाण्याविषयीं जी युक्ति सांगितली जाते त्याला योग असें म्हणतात.' भगवद्गीतेंतहि अशाच तऱ्हेची योगाची व्याख्या केलेली आढळते. जसें सांख्ययोग, कर्मयोग, भक्तियोग इत्यादि. अश जीवाला कोणत्या ना कोणत्या उपायानें ब्रह्मरूप करून सोडणें हेंच योगाचें ध्येय आहे व हें *योगाभ्यासानें संपादन केलें गेलें म्हणजे योगाची परि*-समाप्ति झाली असें वसिष्ठांचें सांगणें आहे.

जीवस्य च तुरीयाख्या या स्थितिः परमात्मनि ॥
अवस्था बीजनिद्रादिनिर्मुक्ता चित्सुखात्मिका ॥
योगस्य सेयं वा निष्ठा सुखसंवेदनं महत् ॥ नि.पू. १२८-५१.

"जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थांच्या पलीकडे असणारी जीवानें आपल्या ज्ञानाभ्यासानें प्राप्त करून घेतलेली परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं जी तुरीय नांवाची स्थिति तीच योगाची निष्ठा म्हणजे परिसमाप्ति व हीच निरतिशय आनंदाची स्थिति होय."

## आत्मसाक्षात्काराचे तीन उपाय.

वसिष्ठांनीं आत्मसाक्षात्काराचे तीन उपाय सांगितले आहेत व या तीन उपायांपैकीं आपल्या अधिकारपरत्वें जो आपल्याला रुचेल व पचेल तो स्वीकारावा, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे; कारण या तिन्ही उपायांपैकीं कोणताहि एखादा उपाय सिद्ध झाला कीं बाकीचे आपोआपच प्राप्त होतात. हे तीन उपाय खालील श्लोकांत दाखविले आहेत.

एकतत्त्वघनाभ्यासः प्राणानां विलयस्तथा ॥
मनोविनिग्रहश्चेति मोक्षशद्बार्थसंग्रहः ॥ नि. पू. ६९-२७.
एकस्मिन्नेव संसिद्धे संसिध्यंति परस्परम् ॥ नि.पू.६९-४०.

" एका आत्मतत्त्वाचाच घन अभ्यास, प्राणांचा विलय व मनाचा निग्रह हे मोक्षप्राप्तीचें तीन उपाय योग शब्दानें सांगितलें आहेत. या तीन उपायांपैकीं कोणताहि एखादा उपाय सिद्ध झाला कीं, बाकीचे दोन्ही उपाय आपोआपच सिद्ध होतात."

सर्व अध्यात्म शास्त्रांचें तात्पर्य या तीन उपायांत आहे. एकतत्त्वघनाभ्यास हा उत्तम, मनोनिग्रह हा मध्यम व प्राणांचा विलय हा कनिष्ठ असे हे तीन उपाय अधिकारी भेदानें सांगितले आहेत व हें तिन्ही उपाय जरी मोक्षप्राप्तीचे असले तरी वसिष्ठांनीं

मनः प्रशमनं वरम् ॥नि. पू. ६९-२९.

' मनाची प्रशांति हाच उपाय पसंत केला आहे.' कारण, इतर उपायापेक्षां हा अभ्यासाला सोपा आहे आणि लवकर साध्य होणारा आहे. मनोनाशद्वारांच हे तीन उपाय मोक्षाची प्राप्ति करून देणारे आहेत.

एकतत्त्वघनाभ्यास.

सर्व ठिकाणीं एक ब्रह्मतत्त्व ओतप्रोत भरून राहिलें आहे व तेंच मी आहे, असें समजून घेऊन त्याचा सतत विचार करणें व याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि पदार्थांचा विचार न करणें यालाच एकतत्त्वघनाभ्यास असें म्हणतात. हा अभ्यास दृढ झाला म्हणजे मनामध्यें इतर पदार्थासंबंधीं वृत्ती उत्पन्न होण्याला अवकाशच न मिळाल्यामुळें मन अत्यंत शांत होतें व मन शांत झालें कीं, प्राणहि शांत होतात, असें वसिष्ठ सांगतातः—

एकतत्त्वघनाभ्यासाच्छांतं शाम्यत्यलं मनः ॥
तल्लीनत्वात्स्वभावस्य तेन प्राणोपि शाम्यति ॥ नि. पू ६९-४८

" एकाच आत्मतत्त्वाचा दृढ अभ्यास केल्यामुळें ज्यांतील द्वैत वासना चावित झाली आहे, असें मन शांत होतें व प्राणाचा स्वभाव मनांत लीन

झालेला असल्यामुळें प्राणहि शांत होतो." अशा तऱ्हेनें मन व प्राण यांचा नाश झाला असतां आत्मसाक्षात्काररूप मोक्ष सिद्ध होत असतो.

प्राणाचा विलय हेंच जर मोक्षाचें कारण असेल तर मनुष्य मरतांच मुक्त होईल. कारण मरणसमयीं सर्वांच्या प्राणाचा विलय होतो. पण हें म्हणणें बरोबर नाहीं, कारण मरणसमयीं प्राणाचा नाश होत नाहीं व मनाचाहि नाश होत नाहीं.तर मरणमूर्च्छासमयीं पाण्यांत विरघळून गेलेल्या मिठाप्रमाणें अविर्भूत वासना रूपानें त्याचें अवस्थान होतें व उत्क्रमण समयीं पुनः त्यांचा आविर्भाव होतो. नंतर ते प्राण मनानें कल्पिलेल्या दुसऱ्या शरीरांत प्रविष्ट होतात. अशाच तऱ्हेचे वर्णन बृहदारण्यकांत * आलेलें आहे. म्हणून वासनायुक्त मन मरणानें नाश पावत नाहीं व मनावांचून प्राण संभवत नाहीं म्हणून प्राणाचाहि नाश होत नाहीं, वास्तव प्राणाचा निरोध केला असतां मन शांत होतें व मनाचा निरोध केला असतां प्राणहि शांत होतात. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

> **अविनाभाविनी नित्यं जंतूनां प्राणचेतसी ॥** नि. पू. ६९-४५.
> **मनसः स्पंदनं प्राणः प्राणस्य स्पंदनं मनः ॥** नि. पू. ६९-४६.

" सर्व जंतूंचें प्राण व चित्त हीं दोन्ही कधींहि परस्परांना सोडून रहात नाहींत. म्हणून मनाचें स्पंदन हाच प्राण व प्राणाचें स्पंदन हेंच मन." असें आहे, म्हणूनच ह्या दोहोंपैकीं एकाचा अभाव झाला, कीं दोन्हीहि नाश पावतात आणि आपल्या नाशानें मोक्षरूप उत्तम कार्य संपादन करितात. म्हणून या तिन्ही उपायांपैकीं ज्याला जो आवडेल तो त्यानें करावा. याकरितां वसिष्ठांनीं मनः प्रशमन हाच उपाय श्रेष्ठ मानला आहे. एका ब्रह्मतत्त्वाचा दृढ अभ्यास करणें सर्वसामान्य लोकांना अवघड जातें कारण ब्रह्म हें अव्यक्त असल्यामुळें त्याची प्राप्ति सर्वांना सहज होण्यासारखी नाहीं असें भगवद्गीतेंतहि + सांगितलें आहे. ह्या

---

* सविज्ञानो भवति सविज्ञानमेवान्वक्रामति ॥ बृ. ४-४-२

\+ क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ॥
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ भ. गी. १२-५

अभ्यासांत फार कष्ट व दुःख आहे. दुसरा उपाय म्हणजे प्राणांचा विलय (हटयोग). याचा अभ्यास जर बरोबर झाला तर त्यामुळें मनाचा निग्रह होतो पण जर कदाचित् तो बरोबर झाला नाहीं तर शरीरांत अनेक व्याधी निर्माण होतात व मनोनिग्रह तर दूर रहातो. म्हणून वसिष्ठांना प्राणांचा निरोध मान्य नाहीं. मनाचा निग्रह हा राजयोग व प्राणांचा निग्रह हा हटयोग होय. आतां प्राणांचा निरोध कसा होतो त्याचा विचार करूं.

## ( २ ) प्राणांचा निरोध.

प्राणाचा निरोध केला असतां मनाचा विरोध होतो म्हणजेच हटयोगी प्राणायाम करून प्राणस्पंदाचा निरोध करीत असतात. " अंतःसंचारी वायुः प्राणः ' म्हणजे देहांतील सर्व नाड्यांतून सर्वत्र संचार पावणारा वायु हाच प्राण, अशी प्राणाची योगशास्त्रामध्यें व्याख्या केली आहे. या प्राणवायूच्या संचारामुळें शरीरामध्यें निरनिराळ्या क्रिया उत्पन्न होतात. ह्या क्रियावैचित्र्याच्या अनुरोधानें प्राणवायूलाच योगवेत्त्यांनीं अपानादि भिन्न भिन्न नांवें कल्पिलेलीं आहेत. अर्थात् अपानादि वायू हे प्राणवायूचेच वृत्तिभेद आहेत. ज्याप्रमाणें पाण्याच्या हालचालीमुळें लाटा उत्पन्न होतात व त्यामुळें पुढें भोंवरे उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें प्राणस्पंदापासून चित्त-स्पंद उत्पन्न होतो व चित्तस्पंदापासून पुढें विषयाकार वृत्ती उत्पन्न होतात. अतएव चित्त म्हणजेच प्राणाचा परिस्पंद आहे. म्हणून प्राणवायूचें चलन बंद पडलें म्हणजे त्याबरोबर मनहि आपोआप शांत होतें. मनाचा स्पंद शांत झाला म्हणजे संसार निश्चयानें विलीन होतो. म्हणून मनोनाशाचा उपाय प्राणाचा निरोध आहे, असें योगशास्त्रवेत्त्यांचें म्हणणें आहे. आतां प्राणस्पंदाचा निरोध कसा होतो याबद्दल उपशम प्र. सर्ग ७८ मध्यें निरनिराळे उपाय सांगितले आहेत, त्यापैकीं मुख्य उपाय असे आहेतः—

( १ ) पूरक, कुंभक व रेचक या प्राणायामाच्या योगानें व ध्याना-भ्यासाच्या योगानें ध्येयाच्या (परमात्म्याच्या) ठिकाणीं पूर्ण एकाग्रता बाणली असतां प्राणस्पंदाचा निरोध होतो.

( २ ) रेचकाचा दृढ अभ्यास करून प्राणवायु पुष्कळ वेळपर्यंत बाह्य

आकाशामध्यें ध्यानसहित स्थिर करतां येऊं लागला म्हणजे प्राणस्पंदाचा निरोध होतो.

( ३ ) पूरकाचा पूर्ण अभ्यास केल्यामुळें आंत खेचलेला प्राणवायु स्थिर होऊन त्याचा संचार बंद पडला म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो.

( ४ ) कुंभकावस्थेमध्येंहि अभ्यासाच्या योगानें प्राणवायु पाण्यानें भरलेल्या घटाप्रमाणें पुष्कळ वेळपर्यंत स्तंभित करतां येऊं लागला म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो.

( ५ ) टाळूच्या बुडाशीं असलेल्या स्तनाकार अशा " इंद्रयोनि " नामक घंटेचें जिव्हेनें मोठ्या प्रयत्नानें आकलन करून खेचरी मुद्रेमध्यें ऊर्ध्वगत अशा ब्रह्मरंध्राच्या ठिकाणीं प्राणवायु स्थित झाला म्हणजेहि प्राणस्पंदाचा निरोध होतो.

हे वरील उपाय हठयोगाचे आहेत. आतां राजयोगाचे उपाय याच सर्गांत सांगण्यांत आले आहेत. त्याचा सारांश असा आहे कीं, प्रणवाचा ॐकाराचा दीर्घ उच्चार किंवा ॐमधील अखेरच्या अर्धमात्रात्मक ध्वनीनें दर्शित केल्या जाणाऱ्या तुर्यावस्थेचा अनुभव यांच्या योगानें अखिल बाह्य विषयांची कल्पना गाढ झोपेच्या स्थितीप्रमाणें पूर्णपणें निमाली असतांहि प्राणस्पंदाचा निरोध होतो. या उपायाचें सविस्तर वर्णन उद्दालक मुनीच्या गोष्टींत आलें आहे. ( या ग्रंथाचा भाग दुसरा—उद्दालक मुनीची गोष्ट २१ वी, पृष्ठें १५५–१५८). उद्दालक मुनीनें हठयोगांतील प्राणायामाचा अभ्यास केला नव्हता, परंतु ॐमधील ' अ, उ, म ' या मात्रांचा इतक्या मोठ्यानें व आत्मविषयक ध्यानानें उच्चार केला कीं, त्याची पूरक, रेचक व कुंभक स्थिति नुसत्या भावनेनेंच होत होती. असो, ही उद्दालक मुनींची गोष्ट वाचली असतां वरील सर्व गोष्टींचा चांगलाच उलगडा होतो.

## ( ३ ) मनोनिग्रह.

या मनाचा निग्रह करतां यावा म्हणून या मनाचें थोडेंसें स्वरूप समजलें पाहिजे. मनाला वसिष्ठांनीं

चित्तं नाभिः किलास्येह मायाचक्रस्य सर्वतः ॥ ५-४९-४०.

" सर्वत्र भ्रमण करणाऱ्या ह्या मायाचक्राचा चित्त ( मन ) हा तुंबा आहे. " असें म्हटलें आहे. म्हणूनच त्याचें आक्रमण केल्यास या माया-चक्राची गति कुंठित झाल्याशिवाय रहात नाहीं. म्हणजेच एकदां चित्त स्वाधीन करून घेतलें कीं, मायेची बाधा होण्याचें कारणच उरत नाहीं.

हें मन किंवा चित्त कशानें पुष्ट होतें त्याचें वर्णन वसिष्ठांनीं उपशम प्र. सर्ग ५० श्लोक ५७–६३ मध्यें केलें आहे. त्याचा सारांश असा आहे कीं, देहाला आत्मा ( मी ) समजणें आणि स्त्री, पुत्र वगैरे नातेवाईकांच्या ठिकाणीं ममत्व भावनेनें आसक्त होणें, जरामरणादि दुःखें, आत्मोन्नती संबंधाची विपरीत भावना, संसाराची रम्यता, धनलोभ आणि सुंदर स्त्रियांची प्राप्ति वगैरे अस्थातरमणीय विषयांच्या योगानें चित्त पुष्ट बनत जातें. अशा तऱ्हेनें चित्त पुष्ट होत गेलें तर प्रपंचांतून सुटणें फारच कठीण होतें. म्हणून अध्यात्मशास्त्रांत मनोनिग्रहाचे अनेक उपाय सांगितलें आहेत. त्यांपैकीं कांहीं मुख्य उपाय पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

## मनोनिग्रहाचे उपाय.

( १ ) शास्त्रीयदृष्ट्या मनाच्या असत्यतेचा सतत विचार करणें, ( २ ) संकल्पत्याग, ( ३ ) वैराग्य, ( ४ ) वासनात्याग, ( ५ ) अहंकाराचा त्याग, ( ६ ) सर्वत्याग व ( ७ ) इच्छात्याग.

भगवद्गीतेमध्यें मनोनिग्रहाचे दोन मुख्य उपाय* सांगितले आहेत. एक वैराग्य व दुसरा अभ्यास. वरील सात उपायांपैकीं वैराग्याखेरीज सहा उपाय भगवद्गीतेंतील अभ्यासामध्यें अंतर्भूत झाले आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

### ( १ ) मनाच्या असत्यतेचा सतत विचार करणें.

शास्त्रीयदृष्ट्या विचार केला असतां मनाचें खरें असें स्वरूपच नाहीं, असा सतत विचार करीत राहिले असतां मनाचा निग्रह होऊं शकतो असें वसिष्ठांचें सांगणें आहे. मनाच्या स्वरूपासंबंधानें सविस्तर वर्णन ' मनाचें स्वरूप '

* अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ भ. गीता- ६–३५

या नावांच्या मागील २९व्या प्रकरणांत केला आहे. म्हणून या उपायाविषयीं या ठिकाणीं अधिक विचार करण्याचें प्रयोजन नाहीं.

## (२) संकल्पत्याग.

'संकल्पात्मकंमनः' म्हणजे संकल्प करणें हें मनाचें स्वरूप आहे. असें मनाच्या स्वरूपाचें सामान्य लक्षण जरी सांगितलें असलें तरी वसिष्ठांचे म्हणणे असें आहे कीं, संकुचित स्वरूपाची कल्पना करणें हेंच मन व व्यापक स्वरूपाची भावना करणें हाच मनाचा नाश, अशा अर्थाचें वर्णन निर्वाण प्र. उ. सर्ग १ मध्यें खालील श्लोकांतून आलेलें आहेः—

अहंभावनमेवाहुः कल्पनं कल्पनाविदः ॥
नभोर्थभावनं तस्य संकल्पत्याग उच्यते नि. उ. १-३
पदार्थरसमेवाहुः कल्पनं कल्पनाविदः ॥
नभोर्थभावनं तस्य संकल्पत्याग उच्यते ॥ नि. उ. १-४
इदंवस्त्वितिसंवेगमाहुः कल्पनमुत्तमाः ॥
नभोर्थभावनं तस्य संकल्पत्याग उच्यते ॥ नि. उ. १-५

"हा देह मी आहे असें समजणें या संकुचित भावनेला कल्पना असें म्हणतात. आणि 'आपण चिदाकाश–ब्रह्म–आहों' अशा आपल्या पारमार्थिक स्वरूपाचें अनुसंधान करणें यालाच संकल्पत्याग म्हणतात. त्याचप्रमाणें विषयाविषयीं आसक्ति हीच कल्पना आहे. पण ते विषय चिदाकाशरूप–ब्रह्मरूप–आहेत, असें अनुसंधान करणें याला संकल्पत्याग म्हणतात. त्याचप्रमाणें देहादि सर्व दृश्यपदार्थ सत्य आहेत, असें मोठ्या आग्रहानें मानणें यास कल्पना-संकल्प असें म्हणतात व तें सर्व ब्रह्म आहे असें चिंतन करणें याला संकल्पत्याग म्हणतात.

वसिष्ठ याच्याहि पुढें जाऊन असें सांगतात कीं,

यत्किंचिदपि संकल्प्य नरो दुःखे निमज्जति ॥
न किंचिदपि संकल्प्य सुखमव्ययमश्नुते ॥ नि. पू. ३३-३५

"कांहींतरी संकल्प करून मनुष्य दुःखांत निमग्न होतो आणि कशाचाच संकल्प न केल्यामुळें अक्षय सुख भोगतो." जसा संकल्प करण्यांत क्लेश आहे

तसा संकल्प सोडण्यांत क्लेश नाहीं; कारण केवल औदासीन्य स्वीकारल्यानें त्याचा नाश होतो.

## (३) वैराग्य.

विषयांतील दोषदर्शनानें व त्यांच्या अनित्यत्वासंबंधानें विचार केल्यानें अंतःकरणात त्याविषयीं वैराग्य उत्पन्न होत असतें. विषयासंबंधीं राग (म्हणजे प्रम) व द्वेष दोन्हीहि नाहींशीं होणें हेंच खरें वैराग्य आहे. यासंबंधीं सविस्तर वर्णन 'श्रीरामचंद्राचें वैराग्य' या मागील ११ व्या प्रकरणामध्यें करण्यांत आलें आहे. याशिवाय स्थिति प्र. सर्ग ५९ मध्येंहि विषयांची असारता दाखविली आहे.

## (४) वासनात्याग.

संकल्पाप्रमाणें वासनाहि मनाचें स्वरूप आहे असें वसिष्ठांनीं सांगितलें आहे.

> वासनैव महाराज स्वरूपं विद्धि चेतसः ॥
> चित्तशब्दस्तु पर्यायो वासया उदाहृतः नि पू ९४-५.

" वासना हेंच चित्ताचें स्वरूप आहे. चित्त शब्द हा वासनेचा पर्याय म्हणजे प्रतिशब्द आहे. " वासना म्हणजे पूर्वी उपभोगिलेल्या विषयांचा मनांत राहिलेला वास होय. अशा तऱ्हेच्या विषयवासनेनें पुनः त्या विषयांच्या उपभोगाविषयीं अंतःकरणांत तृष्णा उत्पन्न होत असते व ही तृष्णा क्षीण होणें फारच कठीण होऊन बसतें. यासंबंधीं वसिष्ठ सांगतात कीं:—

> जीर्यते जीर्यतः केशा दन्ता जीर्यंति जीर्यतः ॥
> क्षीयते जीर्यते सर्वं तृष्णैवैका न जीर्यते ॥ नि. उ. ९३-८६.

वृद्ध माणसाचे केस पिकतात, त्याचे दांतहि गळून पडतात. तात्पर्य त्याच्या शरीरांतील सर्व कांहीं जीर्ण व क्षीण होतें, पण एक तृष्णामात्र क्षीण होत नाहीं. " ही तृष्णा नाहींशी करण्याकरितां वासनेचा त्याग केला पाहिजे. हा वासनात्याग एकदम होणें शक्य नाहीं. कारण हा

वासना ह्या एका जन्मातल्याच आहेत, असें नसून त्या कित्येक पूर्वजन्मांत दृढ झालेल्या आहेत, म्हणून प्रथम सद्वासना निर्माण करून असद्वासनांचा त्याग करावा व शेवटीं त्या सद्वासनाहि सोडून द्याव्यात असें वसिष्ठ सांगतात.

वासनास्त्वं परित्यज्य मोक्षार्थित्वमपि त्यज ॥ ४-५७-१९
तामसीर्वासनाः पूर्वं त्यक्त्वा विषयवासिताः ॥
मैत्र्यादिभावनानाम्नीं गृहाणामलवासनाम् ॥ ४-५७-२०
तामप्यंतः परित्यज्य ताभिर्व्यवहरन्नपि ॥
अत शांतसमस्तेहो भव चिन्मात्रवासनः ॥ ४-५७-२१
तामप्यथ परित्यज्य मनोबुद्धिसमन्विताम् ॥
शेषे स्थिरसमाधाना येन त्यजसि तत्त्यज ॥ ४-५७-२२

" सर्व वासनांचा त्याग कर इतकेंच, नव्हे तर मोक्ष मिळावा ह्या वासनेचाहि त्याग कर. प्रथम तूं आपल्या चित्तांत वास करीत असलेल्या पशुपक्ष्यादि योनी प्राप्त करून देणाऱ्या तामसी आणि मनुष्यादि योनी प्राप्त करून देणाऱ्या राजसी वासनांचा सर्वथैव त्याग करून मैत्री, करुणा, मुदिता इत्यादि भावना निर्माण करणारी निर्मल वासना ग्रहण कर. नंतर ही वासना सुद्धां चिन्मात्राहून निराळी नाहीं असें चिंतन करून चिन्मात्राचा ( संप्रज्ञात समाधीचा ) दृढ अभ्यास कर. पुढें मन बुद्धि यांसह या चिन्मात्र वासनेचाहि त्याग करून प्रत्यगात्मस्वरूपाशीं ( असंप्रज्ञात समाधींत ) तद्रूप हो; आणि पूर्ण चिदात्म्यामध्यें अखंड विश्रांति घे. या स्थितींत राहून ज्या सर्वात्मभावनारूपी अहंकाराचा अभ्यासदशेंत असतांना तूं अवलंब केला होतास त्याचाहि खलेरीस त्याग कर. "

## वासनात्याग म्हणजे कर्मत्याग नव्हे.

वासनात्याग म्हणजे कर्मत्याग अशी कांहीं लोकांची समजूत आहे, पण ती चुकीची आहे. वसिष्ठांचा कर्मत्यागावर मुळींच भर नाहीं. निर्वासन झालेल्या मनुष्यानें कर्म करणें किंवा न करणें ह्याला कांहीं महत्त्व नाहीं; असें वसिष्ठांचें मत आहे.

समाधिमथ कर्माणि मा करोतु करोतु वा ॥
हृदयेनास्तसर्वास्थो मुक्त एवोत्तमाशयः ॥ ४-५७-२६.

" ज्याच्या हृदयांतील सर्व आस्था ( वासना ) सुटली, तो समाधिमध्यें स्थित असो, कर्म करो वा न करो, तो सदा सर्वदा मुक्तच आहे. " म्हणूनच वसिष्ठांनीं दोन प्रकारचे वासनात्याग मानले आहेत.

## ध्येय व ज्ञेय वासनात्याग.

'मी ब्रह्म आहे' या सतत ध्यानाच्या अभ्यासानें अहंकाररूपी वासनेचा त्याग करून जो प्रारब्धप्राप्त व्यवहार लीलेनें करीत असतो, त्याला ध्येय वासनात्याग करणारा जीवनन्मुक्त असें म्हणतात. सर्व जग ब्रह्मरूप आहे, असा अपरोक्ष साक्षात्कार झाल्यावर ज्ञेय ब्रह्मस्वरूपीं विलीन झाल्यामुळें जो वासनात्याग होतो, तो ज्ञेयवासनात्याग होय. अशा तऱ्हेनें परब्रह्म स्वरूपांत विलीन झाल्यामुळें त्यास विदेहमुक्त असें म्हणतात. म्हणून शेवटीं वसिष्ठांनीं असा निष्कर्ष काढला कीं,

विचारितमलं शास्त्रं चिरमुद्ग्राहितं मिथः ॥
संत्यक्तवासनान्मौनादृते नास्त्युत्तमं पदम् ॥ ४-५७-२८.

" सर्व शास्त्रांचें आलोडन करून आणि ब्रह्मनिष्ठांचा अभिप्राय घेऊन आम्हीं मोक्षशास्त्राचें रहस्य असें निश्चित केलें आहे कीं, अखिल वासनांचा त्याग करून जोपर्यंत मनुष्यानें मुनिवृत्ति म्हणजे ज्ञान संपादन केलें नाहीं, तोपर्यंत तो कृतकृत्य होण्याची गोष्ट सुद्धां बोलावयास नको. "

## ( ५ ) अहंकाराचा त्याग.

आपल्या व्यापक स्वरूपाला संकुचितपणा आणणारा हा अहंकार आहे. हा अहंकार शरीरादिकांना चिकटला कीं सुखदुःखात्मक संसार सुरू होतो. चित्ताचें चिंतन सुरू होण्यापूर्वी हा अहंभाव निर्माण होतो, म्हणून हा नाहींसा झाला कीं, चित्त किंवा मन नाहींसें होतें. यास्तव ज्याला संसारांतून सुटावयाचें असेल त्यानें प्रथम अहंकाराचा त्याग केला पाहिजे असें वसिष्ठ सांगतातः—

अहंबीजश्चित्तवृक्षः सशाखाफलपल्लवः ॥
उन्मूलय समूलं तमाकाशहृदयोभव ॥ नि. पू. ९४-१२.

"ह्या चित्तरूपी वृक्षाचें अहंकार हें बीज आहे. त्याचें तूं समूल उन्मूलन कर. वृक्षाला तोडावयाचें झाल्यास त्याच्या मुळाची माती काढून भोंवतालची जागा मोकळी करावी लागते, त्याप्रमाणें येथेंहि अवकाश असावा म्हणून तूं आपल्या हृदयाला आवरणविक्षेपशून्य कर." अशा प्रकारचा हा चित्तवृक्ष नाहींसा करण्याकरितां ह्या अहंकाराचा त्याग केला पाहिजे. पण ह्याचा त्याग कसा करावा याविषयीं वसिष्ठांनीं हा अहंकार तात्त्विकदृष्ट्या मुळींच नाहीं असें समजल्यावर नाहींसा होतो अशी युक्ति सांगितली आहे.

प्रेक्षमाणं च तन्नास्ति किलाहंत्वं कदाचन ॥
एतावदेव तज्ज्ञानमनेनैव प्रदह्यते ॥ नि. उ. ८-३.

"तत्त्वतः हा अहंकार आहे तरी काय?" असें त्यानें परीक्षण करूं लागलें असता 'अहंकार' ब्रह्ममात्र आहे, असा निश्चय होतो. त्यामुळें तो अहंकार स्वरूपतः मुळींच नाहीं असें कळतें. ज्ञान ज्ञान म्हणून म्हणतात तें एवढेंच. त्यानेंच चित्तरूपी संसाराचें बीज दग्ध होतें." अहंकाराचा त्याग करण्याविषयीं वसिष्ठांनीं असा उपाय सांगितला आहे कीं, हें सर्व दृश्य जगत् असत् म्हणजे मुळींच नाहीं असें तत्त्वतः सिद्ध होत असल्यामुळें त्याविषयीं रागद्वेषाच्या भावना धरून मला काय करावयाचें आहे? अशा प्रकारचें निरंतर अनुसंधान करीत गेलें म्हणजे अहंकार नाहींसा होतो.

## ( ६ ) सर्वत्याग.

वसिष्ठांनीं उपदेशिलेला सर्वत्याग मोठा अपूर्व आहे. कारण इतर लोक ज्याला सर्वत्याग समजतात, म्हणजे आपल्या जवळचें सर्व टाकून दूर अरण्यांत जाऊन रहाणें, अशा तऱ्हेचा सर्वत्याग वसिष्ठांना मान्य नाहीं. कारण आपण कोठेंहि गेलों तरी जोंपर्यंत आपण या जगांत आहोंत तोंपर्यंत आपल्याला सर्व गोष्टींचा त्याग करतां येणें शक्य नाहीं व आपल्या जीवनाकरितां कांहींना कांहीं तरी आपल्याजवळ ठेवावें लागतेंच. म्हणून

अशा तऱ्हेनें आपला खरा सर्वत्याग होत नाहीं. सर्वत्यागाचें स्वरूप वसिष्ठांनीं चूडालेच्या गोष्टींत ( अथवा शिखिध्वजराजाचें आख्यान ) फारच चांगल्या तऱ्हेनें सांगितलें आहे. (या ग्रंथाचा भाग २ रा, चूडालेची गोष्ट ३४ वी.) त्या आख्यानांत वसिष्ठ सांगतात कीं, देहाच्या त्यागानें, राज्य सोडल्यानें, पर्णशालादिकांच्या जाळण्यानें सर्वत्याग सिद्ध होत नाहीं. जें सर्व वासनांचें आश्रयस्थान असल्यामुळें सर्व आहे, जें सर्व विषयामध्यें पसरलेलें असल्यामुळें सर्वतः आहे, संकल्पानें सर्वांला उत्पन्न करणारें असल्यामुळें जें सर्वांचें एक कारण आहे, असें जें चित्त त्याचा त्याग केला असतांच सर्वत्याग होतो. म्हणून,

चित्तं सर्वमिति प्राहुस्तस्मिंस्त्यक्ते महीपते ॥
सर्वाधिव्याधिसीमांतः सर्वत्यागः कृतोभवेत् ॥ नि. पू. ९३-४२
चित्तत्यागं विदुः सर्वत्यागं त्यागविदां वर ॥ नि. पू. ९३-४३.
सर्वं त्यजति यस्तस्य सर्वमेवोपतिष्ठते ॥
यथैवांबु विपत्यग्नौ तथैवायाति वारिधौ ॥ नि. पू. ९३-५९.
न गृण्हाति हि यत्किंचित्सर्वं तस्मै प्रदीयते ॥ नि.पू. ९३-६२

" चित्ताला सर्व असें म्हटलें आहे. यास्तव त्याचा त्याग केला असतां सर्वत्याग होतो, म्हणून चित्तत्याग हाच सर्वत्याग होय. समुद्रांतील पाणी जसें जसें वडवाग्नींत शिरतें तसें तसें तें नद्यांच्या द्वारां समुद्रांत येतें, त्याप्रमाणें जो सर्व टाकतो त्याला प्रारब्धवशात् सर्व कांहीं अनायासानें प्राप्त होतें. जो कांहीं घेत नाहीं त्यालाच सर्व दिलें जातें. " अशा अर्थाची "न खात्या देवाला नैवेद्य" अशी म्हण आहे. अशा ह्या पुरुषाला वसिष्ठांनीं नि. पू. सर्ग ११५ मध्यें ' महात्यागी ' असें म्हटलें आहे.

( ७ ) इच्छात्याग.

इच्छामात्रं विदुश्चित्तं तच्छांतिर्मोक्ष उच्यते ॥ नि.उ. ३६-२५.
इच्छामात्रं हि संसारो निर्वाणं तदवेदनम् ॥ नि. उ. ३६-३३.

याचा भावार्थः—"इच्छामात्र हेंच चित्त आहे, म्हणजेच संसार आहे. म्हणून इच्छा नाहींशी झाली कीं चित्त नाहींसें होतें व मोक्ष प्राप्त होतो."

इच्छा म्हणजे मला अमूक हवें, तमूक हवें, असें वाटणें ही होय. अशा तन्हेच्या इच्छेचा उदय हेंच दुःख व इच्छाशांति हेंच सुख आहे. विद्वान् लोक निरिच्छत्व हेंच समाधान आहे असें म्हणतात. मनाला निरिच्छ केल्यानें जसें तें शांत होतें, तसें शेकडों वेळां उपदेश केल्यानेंहि होत नाहीं. तप, यम, नियम हे इच्छाशांतीचे उपाय आहेत. इच्छा उत्पन्न होणार नाहीं असाचें यत्न करावा व यदाकदाचित् झालीच तर वैराग्यादि उपायांनीं तिला मारून टाकावें. आत्म्याहून निराळी एखादी वस्तु असेल, तर *तिच्या प्राप्तीसाठीं इच्छा करणें योग्य ठरेल; पण आत्म्याहून पृथक् वस्तूच* नाहीं, तेव्हां आणखी कसली इच्छा करावयाची. या विचारानें इच्छा कशी संभवणार? बुद्धीनें विषयाचें ग्रहण केलें तरच त्याविषयीं इच्छा उत्पन्न होणार. पण विद्वानांची बुद्धि विषयांचें ग्रहण करीत नसल्यामुळें ग्राह्यग्राहक संबंधच उत्पन्न होत नाहीं. तेव्हां त्याला इच्छा तरी कशी होणार? या इच्छात्यागासंबंधानें वसिष्ठ म्हणतात—

> **इच्छानुत्पादने यत्नः क्रियतां किं वृथाश्रमैः ॥** नि. उ. ३६–३३
> **किमिच्छाननुसंधानसमाधिर्नाधिगम्यते ॥** नि. उ. ३६–३४
> **यस्येच्छाननुसंधानमात्रे दुःसाध्यता मतेः ॥**
> **गुरूपदेशशास्त्रादि तस्य नूनं निरर्थकम् ॥** नि. उ. ३६–३५

"खरें म्हटलें असतां इच्छा उत्पन्नच होणार नाहीं, ह्याविषयीं प्रयत्न करावा, पण तसें शक्य होत नसेल तर ती इच्छा उत्पन्न झाल्यावर तिच्याकडे दुर्लक्ष करावें म्हणजे ती आपोआप नाहींशी होते. (जसें आपणाकडे एखादा मनुष्य आला व आपण त्याच्याकडे दुर्लक्ष केलें, त्याच्याशीं कांहीं बोललोंच नाहीं, तर तो निघून जातो, त्याप्रमाणें) इच्छा उत्पन्न झाल्यावर आपण तिच्याकडे दुर्लक्ष केलें किंवा ती ब्रह्मरूपच आहे असें पाहिलें, तर ती नाहींशी होते. ज्याच्या बुद्धीला इच्छेच्याकडे दुर्लक्ष करणें ही अतिशय सुलभ गोष्ट देखील दुःसाध्य वाटते, त्याच्यापुढें गुरूचा उपदेश, शास्त्र इत्यादि सर्व उपाय व्यर्थच आहेत."

अशा तन्हेचे मनोनाशाचे अनेक उपाय आहेत. या वरील सर्व

उपायांच्या योगानें मनाचा सर्वस्वीं निग्रह म्हणजे नाश करणेंच वसिष्ठांना अभिप्रेत आहे.

असे हे आत्मसाक्षात्काराचे (१) एकतत्त्वाचा घन अभ्यास, (२) प्राणांचा निरोध व (३) मनाचा नाश; असे हे तीन उपाय आहेत. या तीन उपायांपैकीं कोणताहि एखादा उपाय सिद्ध झाला कीं, बाकीचे दोन्ही उपाय आपोआपच सिद्ध होतात. तरी वसिष्ठांनीं मनाची प्रशांति हाच उपाय पसंत केला आहे असें वर सांगण्यांत आलें आहे. आतां आत्म-साक्षात्कार कसा होतो याचा विचार करूं.

## आत्मसाक्षात्कार कसा सिद्ध होतो.

हे वरील आत्मसाक्षात्काराचे उपाय प्राप्त होण्याकरितां गुरूचा उपदेश व शास्त्राचा अभ्यास अत्यंत आवश्यक आहेत. पण तत्त्वतः विचार केल्यास हीं आत्मसाक्षात्काराचीं कारणें नाहींत.कारण आत्मसाक्षात्काराला कोणत्याही साधनाची अपेक्षा नसते. 'मी ब्रह्म आहे' अशा ब्रह्माकार वृत्तीनें आत्म-स्वरूपावर आलेलें अविद्येचें आवरण घालविलें असतां ब्रह्म स्वयंप्रकाशच असल्यामुळें आपोआप तत्त्वतः भासतें. हाच त्याचा साक्षात्कार होय. बुद्धिवृत्तींत अभिव्यक्त झालेल्या चिदाभासानें ब्रह्माला व्यापणें हा साक्षात्कार नव्हे. कारण तो चिदाभास जड पदार्थांनाच व्यापूं शकतो. चेतन ब्रह्माला तो व्यापूं शकणार नाहीं. यावरून असें दिसतें कीं, अविद्येचें आवरण नाहींसें झाल्याशिवाय म्हणजेच अविद्येचा क्षय झाल्याशिवाय आत्मसाक्षात्कार होणें शक्य नाहीं.

आत्मैवेहास्ति नाविद्या इत्यविद्याक्षयं विदुः ॥ नि. पू. ४१-१०

'आत्माच आहे, अविद्या नाहीं, अशा निश्चय होणें हाच अविद्येचा क्षय आहे असें विद्वान् समजतात.'

म्हणून आपल्याला ज्या अनेक वस्तु दिसतात, गुरुशास्त्रादि अनेक भेद प्रतीत होतात, ती सर्व अविद्या आहे. आत्मा नव्हे. असें जरी असलें तरी गुरुशास्त्रादि अविद्येच्या भागानें दुसऱ्या आत्मविस्मृतिरूप अविद्येच भागाचा नाश केला असतां दोन्ही अविद्येचे भाग नाश पावून लागलीच स्वयं-

प्रकाश आत्मा आपोआप स्वरूपानें अभिव्यक्त होतो. हाच आत्मसाक्षात्कार होय. गळ्यांत असून त्याचें विस्मरण झाल्यामुळें त्या दागिन्याची आठवण करून देणाऱ्या मनुष्याचे ' अरे ! हा दागिना तर तुझ्या गळ्यांतच आहे ' असें बोलणें जसें त्या दागिन्याच्या प्राप्तीचें कारण होतें; त्याप्रमाणें ' तत्त्वमसि ' इत्यादि गुरूपदेश आत्म्याचें स्मरण करून देण्यास कारण होत असतो. गुरूपदेश व शास्त्रार्थ यांच्यावांचून आत्म्याचा परोक्ष बोध होत नाहीं. कारण त्यांचा संयोगच आत्मज्ञानाला प्रकाशित करणारा आहे. म्हणून वसिष्ठ सांगतात :—

गुरुशास्त्रार्थशिष्याणां चिरसंयोगसत्तया ॥
अहनीव जनाचारः आत्मज्ञानं प्रवर्तते ॥ नि. पू. ४१-१७

"गुरु, शास्त्र व शिष्य यांचा चिरकाल संयोग झाला असतां दिवस उगवल्यावर जसा सर्व लोकांचा व्यवहार सुरू होतो तसें आत्मज्ञान प्रवृत्त होतें."

सारांश, हें सर्व दृश्य मुळींच नाहीं, ब्रह्मच आहे व तेंहि आपण आहोंत असें साक्षात जाणणें याचेंच नांव आत्मसाक्षात्कार होय. असा साक्षात्कारच निर्वाणाची ( मोक्षाची ) प्राप्ति करून देणारा आहे.



# प्रकरण ४२ वें.

## मुक्तावस्थेचा अनुभव.

आत्मज्ञानी पुरुषाच्या सर्व वासना व इच्छा शांत झालेल्या असतात, त्यामुळें तो सर्व दुःखांतून सुटलेला असतो. त्यांला जो परमानंद प्राप्त झालेला असतो, त्याची बरोबरी जगांतील कोणत्याहि आनंदाला करतां येणें शक्य नाहीं. म्हणूनच ह्या आनंदाला निरतिशय आनंद म्हटलें आहे. पण त्याला मिळालेला हा आनंद कोणत्या स्वरूपाचा असतो, हें मात्र त्याच्यासारखें ज्ञानी झाल्याशिवाय कळणार नाहीं. आपणास तशी स्थिति प्राप्त होईपर्यंत आपण त्या ज्ञानी पुरुषांनीं अनुभविलेल्या स्थितीचीं वर्णनें ऐकूनच समाधान मानलें पाहिजे. आतां वसिष्ठांनीं ह्या स्थितीच्या अनुभवाचें वर्णन कसें केलें आहे तें पाहूं. हें वर्णन त्यांच्या दृष्टीनें जरी खरें असलें, तरी आपणाला ती नुसती कल्पनाच भासल्याशिवाय राहणार नाहीं.

स्वरूपावस्थितिर्मुक्तिः ॥ ३-११७-५

" आपल्या स्वरूपाच्या ठिकाणीं स्थित असणें याचेंच नांव मुक्ति " अशी वसिष्ठांनीं मुक्तीची व्याख्या केली आहे. या आत्मानुभवाची चमक कोठें कोठें कशी भासते व ती किती वेळ टिकत असते याचें वसिष्ठांनीं मोठें मार्मिक वर्णन केलें आहे.

अर्थादर्थांतरं चित्ते याति मध्ये हि या स्थितिः ॥
निरस्तमनना याऽसौ स्वरूपस्थितिरुच्यते ॥ ३-११७-८
संशांतसर्वसंकल्पा या शिलांतरिवस्थितिः ॥
जाड्यनिद्राविनिर्मुक्ता सा स्वरूपास्थितिः स्मृता ॥ ३-११७-९
अहंतांशे क्षते शांते भेदे निःस्पंदतां गते ॥
अजडा या प्रकचति तत्स्वरूपमितिस्थितम् ॥ ३-११७-१०.

" एका विषयाला सोडल्यानंतर आणि दुसऱ्या विषयाचें चिंतन सुरू होण्यापूर्वी चित्ताची जी मननरहित स्थिति असते तिलाच स्वरूपस्थिति

म्हणतात. सर्व संकल्परहित, पाषाणाच्या अंतर्यामाप्रमाणें अत्यंत स्थिर पण निद्रा नव्हे, अशी जी चित्ताची स्थिति तीच स्वरूपस्थिति होय. अहंतेचा क्षय झाला, अंतर्बाह्य भेद नष्ट झाले व चित्त निश्चल झालें आणि सर्व जग चिद्रूप आहे असा अनुभव आला म्हणजे जी साम्यावस्था उदयाला येत असते तिला आत्मस्वरूपाचा अनुभव असें म्हणतात."

या वर्णनाशिवाय आत्मस्वरूपाच्या अनुभवाची स्थिति जास्त वर्णन करून सांगण्यासारखी नाहीं किंवा तिचें कोणत्याहि स्थितीशीं साम्य दाखवितां येण्याजोगें नाहीं. ज्या महात्म्यांनीं ह्या स्थितीचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला आहे, त्यांना देखील ही स्थिति कशी आहे हें सांगणें फारच कठीण जातें. म्हणून ही स्थिति अशी आहे कीं, तिचा फक्त अनुभव घ्यावयाचा पण तिचें वर्णन करितां यावयाचें नाहीं. ही स्थिति एखाद्या सागराप्रमाणें परिपूर्णतेची असून ती केव्हांहि इंद्रियगोचर होऊं शकत नाहीं व जगांतील दुसऱ्या कोणत्याहि विषयाशीं तिची तुलना करितां येत नाहीं. ती परमोच्च स्थिति प्राप्त झाली असतां मनुष्याच्या ठिकाणीं कोणत्याहि दृश्य विषयासंबंधानें आसक्ति उत्पन्न होण्याची शक्यताच उरत नाहीं. वसिष्ठांनीं या स्थितीचें वर्णन उपशम प्र. सर्ग ६४ मध्यें असें केलेलें आहे कीं,

केवलं चित्प्रकाशांशकलिका स्थिरतां गता ॥
तुर्या चेत्प्राप्यते दृष्टिस्तत्तया सोपमीयते ॥ ४९.
अदूरगतसादृश्यात्सुषुप्तस्योपलक्ष्यते ॥
सावस्था भरिताकारा गगनश्रीरिवातता ॥ ५०
न गम्या वचसां राम हृद्येवेहानुभूयते ॥ ५३

" चित्प्रकाशरूप आत्म्याचा अंश ( जीव ) आपल्या केवल स्वरूपाच्या ठिकाणीं स्थिर होऊन तो तुर्यावस्थेपर्यंत जाऊन पोहोंचला म्हणजे जी स्थिति प्राप्त होते, तिच्याशींच फक्त त्या स्वरूपस्थितीची तुलना करतां येईल. अर्थात् ती स्थिति अनुपमेय आहे. परंतु त्या स्थितीच्या जवळ जवळ म्हणून जर कोणती स्थिति असेल, तर ती सुषुप्तीची आहे. कारण तुर्यावस्थेप्रमाणेंच सुषुप्तीमध्येंहि विक्षेपराहित्य असतें व या दृष्टीनें तुर्या व

सुषुप्ति या दोन्ही अवस्थांमध्यें सादृश्याचा थोडा अंश आहे. परंतु तुर्या-वाकीच्या यावर्तीत या दोन्ही अवस्थांमध्यें महदंतर आहे. कारण तुर्यावस्था ही पूर्णानंदाची स्थिति असून ती गगनश्रीप्रमाणें विस्तीर्ण आहे. याच्यापेक्षां जास्त वर्णन करून देखील ही स्थिति समजण्यासारखी नाहीं, तर ती स्वसंवेद्य असल्याकारणानें अनुभवानेंच समजण्यासारखी आहे." या अवस्थेचा एकदां अनुभव आला म्हणजे मग पुनः त्यापासून त्याचें कोणीहि चालन करूं शकत नाहीं, असें वसिष्ठ सांगतात:—

परव्यसनिनी नारी व्यग्रापि गृहकर्मणि ॥
तदेवास्वादयत्यन्तः परसंगरसायनम् ॥ ५-७४-६२
एवं तत्त्वे परे शुद्धे धीरो विश्रांतिमागतः ॥
न शक्यते चालयितुं दैवैरपि सवासवैः ॥ ५-७४-८४

" ज्याप्रमाणें परपुरुषाशीं रममाण होण्याचें व्यसन लागलेली स्त्री गृहकृत्यामध्यें गढून गेलेली असली तरी त्यावेळींहि ती त्याच्या समागम-सुखाचा आस्वाद मनांतल्या मनात घेत असते. त्याचप्रमाणें अत्यंत श्रेष्ठ आणि शुद्ध अशा परमतत्त्वामध्यें अखंड विश्रांति घेत असलेल्या ज्ञानी पुरुषास स्वरूपापासून चाळविण्याला इंद्रादिदेव सुद्धां समर्थ होत नाहीत." उघडच आहे कीं व्यभिचार करण्याला सवकलेल्या आपल्या स्त्रीला मनांतल्या मनांत जारसमागमरूपी महोत्सवाचें सुख भोगण्यापासून परावृत्त करण्याला कोणता पती समर्थ आहे ? जगांतील सर्व विषयानंद ज्याच्यामध्यें समरस झाले आहेत, अशा चिदात्म्याच्या आनंदरसाची अविरत धारा सेवन करण्याचें ज्या महात्म्याला व्यसन जडलेलें आहे, त्याच्या बुद्धीला कोण विस्मरण पाडूं शकेल ? म्हणून वसिष्ठ असें सांगतात, कीं, मुक्ताला जो आनंद प्राप्त होतो, तशातऱ्हेचा आनंद या जगांत कोठेंहि मिळत नाहीं.

पाताले भूतले स्वर्गे सुखमैश्वर्यमेव वा ॥
न तत्पश्यामि यन्नाम पांडित्यादतिरिच्यते ॥ नि. उ.१४३-२

" आत्मज्ञानी पंडिताला जें सुख, ऐश्वर्य प्राप्त होत असतें, असें सुख किंवा ऐश्वर्य पाताल, भूतल किंवा स्वर्ग यामध्यें कोठेंहि मला दिसत नाहीं."

आत्मज्ञानी पुरुष आपली मुक्त स्थिति व त्यांना होत असलेला आनंद कसा व्यक्त करतात त्याचें वर्णन कच, बली, प्रल्हाद व शिखिध्वज यांच्या आख्यानांत आलेलें आहे. (या ग्रंथाचा भाग २ रा १५, १८, १९ व ३४ ह्या गोष्टी) त्यांत विशेषतः बलीनें व शिखिध्वजराजानें ज्ञानोत्तर प्रकट केलेले विचार मोठे मननीय आहेत. ते पुढें दिले आहेत.

## उपशम प्र. सर्ग २९ बलीचे समाधींतील अनुभवासंबंधीं विचार.

*(या ग्रंथाचा भाग २ रा. बलीची गोष्ट १८ वी, पृष्ठ १२८).*

"अहाहा! या समाधीचें सुख खरोखर अनिर्वचनीय आहे! मी या समाधिसुखाचा अनुभव क्षणभरच घेतला खरा, परंतु एवढयाशा अल्पकालांतहि माझ्या चित्ताला केवढी विश्रांति मिळाली आहे! यास्तव मी आतां या पारमार्थिक स्थितीचा अनुभव घेत रहाणार. कारण ह्या बाह्य ऐश्वर्यांचा आणि विषयांचा कितीहि उपभोग घेतला तरी त्यापासून असलें विश्रांति-सुख थोडेंच मिळणार आहे? समाधीस्थितीच्या परिपाकापासून जो निरतिशय आनंद प्राप्त होत असतो, तितका आनंद चंद्रबिंबामध्यें वास केल्यानेंहि प्राप्त होण्यासारखा नाहीं. माझें स्वरूप संकल्पशून्य आहे. मला या जगांत ग्राह्य असें काय आहे? अर्थात् कांहींच नाहीं. **मनालासुद्धां जी विषयांची आवड उत्पन्न होते ती विषयांच्या केवळ दर्शनानें होत नसून विषयाकडे ग्राह्य बुद्धीनें पाहिल्यामुळेंच उत्पन्न होत असते.** तेव्हां मी आतां समाधि लावून बसूं, कीं व्यवहार करूं? मोक्षाच्या इच्छेनें समाधि लावून बसावें असें म्हटलें, तर मला बद्ध कोणी केलें आहे म्हणून मी मोक्षाची इच्छा करावी? मला आतां बंध नाहीं आणि मोक्षहि नाहीं. माझें पूर्वीचें अज्ञान पार नाहींसें झालें आहे. मला आतां ध्यान कशाला पाहिजे आणि समाधि लावून तरी काय करावयाचें आहे? मला भोगांची गरज नाहीं, कीं भोगरहित राहण्याची आवश्यकता नाहीं. मी आतां सर्व अवस्थांमध्यें शांत चित्तानें सारखाच रहाणार. मला जर कांहींच कर्तव्य उरलेलें नाहीं किंवा कशाचीच अपेक्षा उरलेली नाहीं, तर माझ्याकडे येणारे हे राज्यादि विषय येईनात कां बापडे; मी त्यांचा प्रतिबंध तरी काय

म्हणून करावा ? माझें शरीर प्राप्त कार्यात व्यवहार करीत राहिलें तरी त्यांत काय बिघडलें ? त्यामध्यें माझें मन जोंपर्यंत आसक्त होत नाहीं, तोंपर्यंत या व्यवहारापासून माझें नफा नुकसान कांहींच नाहीं.

निर्वाण प्र. सर्ग १०७ मध्यें शिखिध्वजराजाचे विचार.

( या ग्रंथाचा भाग २ रा. चूडालेची गोष्ट ३४ वी, पृष्ठ २३१ ).

इंद्र शिखिध्वजराजाला स्वर्गात येण्याबद्दल बोलावण्यास आला असतां त्यानें इंद्राला सांगितलें आहे. कीं:—

सर्वं स्वर्गसमाचारं वेद्मि देवाधिनायक ॥
किंतु सर्वत्र मे स्वर्गो नियतो नतु कुत्रचित् ॥ नि. पू. १०७-२६
सर्वत्रैव हि तुष्यामि सर्वत्रैव रमे प्रभो ॥
अवांछनत्वान्मनसः सर्वत्रानंदवानहम् ॥ नि. पू. १०७-२७

" मी सर्व प्रदेशाला स्वर्गाप्रमाणेंच समजतों. स्वर्गात अनायासानें विहार होतो हें खरें पण मला सर्वत्र स्वर्गच आहे. कोठेंहि नियत देशालाच मी स्वर्ग समजत नाहीं. मी सर्व ठिकाणींच संतुष्ट होतों. सर्वत्र रममाण होतों. माझें मन वांछारहित असल्यामुळें मी सर्वत्र आनंदी आहे. "

— — —

# प्रकरण ४४ वें.

## जीवन्मुक्ताची वागणूक.

ज्ञानाच्या पांचव्या भूमिकेवर आरूढ झालेल्या पुरुषाला जीवन्मुक्त असें म्हणतात. त्याला या अवस्थेंत सर्व विश्व आत्मरूप आहे असा पूर्ण अनुभव आलेला असतो. त्यामुळें त्याच्या ठिकाणची अहंभावना नाहींशी झालेली असते. म्हणून त्याला स्वतःचें असें कोणतेंच कार्य राहिलेलें नसतें. ज्ञानी पुरुष जी क्रिया करतो, जें खातों पितों, जें देतों घेतों वगैरे सर्व मी करीत आहे, असा त्याचे ठिकाणीं कर्तेपणाचा अभिमान नसतो. तो जें कांहीं करीत असतो तें केवळ आपलें प्रारब्ध कर्म संपविण्याकरितांच करीत असतो. तसें करीत असताहि लोकसंग्रह एवढाच हेतु असतो. त्या शिवाय दुसरा तिसरा कोणताच हेतु त्याच्या मनांत नसतो. कारण " प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः " म्हणजे प्रारब्धकर्माचा उपभोगानेंच क्षय होत असतो. ज्ञानोत्तर त्याच्या सर्व वासना, इच्छा, ज्ञानाग्नीनें दग्ध झालेल्या असतात म्हणून त्याला कोणापासूनहि त्रास होत नाहीं व त्याच्या पासूनहि दुसऱ्याला त्रास पोहोंचत नाहीं. असा मनुष्य या जगांत कसा जिवंत रहातो ? या त्याच्या चरम ( शेवटल्या ) जन्मांत तो कसा वागतो ? भूतमात्राशीं त्याची वागणूक कशी असते ? तो कशीं कर्में करितो ? कसा विषयांचा उपभोग घेतो ? व त्याला त्यावेळीं त्याच्या मनात काय व कसें वाटत असतें ? अशा तऱ्हेचे अनेक प्रश्न प्रादुर्भूत होत असतात. त्यांचीं वसिष्ठांनीं मोठीं मार्मिक उत्तरें दिलीं आहेत. त्याचा या प्रकरणांत विचार केला आहे. पण अगोदर जीवन्मुक्ताची वागणूक साधारणतः कशी असते तें सांगून नंतर त्यासंबंधीं विशेष स्पष्टीकरण करू. वसिष्ठांनीं जीवन्मुक्तीची व्याख्या अशी केली आहेः—

### जीवन्मुक्तीची व्याख्या.

*असंसक्तमतेर्यस्य त्यागादानेषु कर्मणाम् ॥*
**नैषणा तत्स्थिति विद्धि त्वं जीवन्मुक्ततामिह ॥ ५-४२-१२.**

## जीवन्मुक्ताची वागणूक

" ज्याची बुद्धि कोणत्याहि विषयामध्यें आसक्त होत नाहीं व ज्यांच्या ठिकाणीं इष्टानिष्ट विषयासंबंधींची इच्छा अजीबात नष्ट झालेली असते, अशा पुरुषाच्या स्थितीला जीवन्मुक्ति असें म्हणतात." ज्यांच्या वासना शुध्द झाल्या व तत्त्वज्ञान झाल्यामुळें जन्ममृत्यूच्या अनर्थ परंपरेंतून जे कायमचे मुक्त झाले, अशा महात्म्यांनाच जीवन्मुक्त ही संज्ञा दिली आहे. प्रारब्धानुसार व्यवहार करीत असतांहि ज्याला विश्व मिथ्या भासतें म्हणून जो प्राप्तस्थितीमध्यें निर्विकार असतो त्यालाच जीवन्मुक्त असें म्हणतात.

## जीवन्मुक्तांची सामान्य लक्षणें.

लोकापासून ते स्वतः उद्विग्न होत नाहींत व दुसऱ्या कोणाला उद्विग्न करीत नाहींत. तसेंच शुष्क वैदिकाप्रमाणें हट्टानें अत्यंत शरीरक्लेशावह पारलौकिक कर्मामध्यें आसक्त होत नाहींत. ते नेहमीं अत्यंत प्रिय आणि सौम्य भाषण करितात. करण्यास अत्यंत उचित अशा लौकिक व वैदिक कर्मांचा परस्पर विरोध येऊन अनुष्ठानसंकट उद्भवले असतां त्यांतील कर्तव्य कोणतें व अकर्तव्य कोणतें याचा एका क्षणांत निर्णय करितात. बाह्यतः इतरांप्रमाणें त्यांचा आचार असतो; पण आंतून ते सर्व विषयाविषयीं शीतल-शांत असतात व सदाचारांत निमग्न असतात.

## जीवमुक्ताला सुखदुःखदशा प्राप्त होतात कां ?

या प्रश्नाचा विचार नि. प्र. पू. सर्ग १०४ मध्यें केला आहे. या स्थूल शरीराच्या परिग्रहामुळेंच जीवाला सुखदुःख प्राप्त होत असतें. शरीर प्राप्त होणें व त्यांत सुखदुःखाचा अनुभव येणें हें प्राक्तन कर्माचें फळ आहे. ज्ञान झाल्यावर प्रारब्ध व्यतिरिक्त कर्माचा निकाल लागतो, म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

यावद्देहं तथा दशाः ॥ नि. पू. १०४-४२

" जोंवर देह असतो, तोंवर हर्षविषादादि दशा असतात. "

" जोंवर देह असतो, तोंवर हर्षविषादादि दशा असतात. मग तो प्रारब्धप्राप्त नियतीचें उल्लंघन कोणालाहि करितां येत नाहीं, मग तो अज्ञानी असो कीं ज्ञानी असो. अमुक प्राण्यानें या जन्मांत सुखामध्यें असें

रहावें व दुःखामध्यें असें रहावें, असें अगोदरच ठरलेलें असतें. यास्तव प्रत्येक जीवानें आपल्या प्रारब्धानुसार जें सुखदुःख त्याला प्राप्त झालें असेल तेंच भोगीत राहिलें पाहिजे. हट्टानें कर्मेंद्रियांचा निग्रह करून दुःखांना सहन करणें हा त्याग नव्हे, तर चित्तसमाधानाच्या जोरावर त्याच्याकडे लक्ष न देणेंच चांगलें. तज्ज्ञ व अज्ञ ह्या सुखदुःखाच्या बाबतींत कसें वागत असतात तें वसिष्ठ सांगतातः—

तज्ज्ञा बुध्यादिसाम्येन पाण्यादिचलनेन च ॥
नियतिं यापयंतीमां यावद्देहमखंडितम् ॥ नि. पू. १०४-४७
अज्ञास्तु सर्वक्षोभेण सुखदुःखदशाहताः ॥
नियतिं यापयंत्यंग देहलक्षैर्विखंडिताम् ॥ नि. पू. १०४-४८

" तत्त्वज्ञ देह असेंपर्यंत बुद्धीमध्यें समता धारण करून शरीरानें कर्मे करून ही सुखदुःखरूपनियति अखंड चालवीत असतात. पण अज्ञ क्षुब्ध होऊन सुखदुःखदशांनीं व्याकुळ होत्साते लक्षावधि देह धारण करून ही नियति चालवीत असतात."

यावरून असें दिसतें कीं, ह्या सुखदुःखरूपी नियतीचें उल्लंघन या जगांतील कोणालाहि करितां येत नाहीं.

### जीवन्मुक्ताचा बाह्य व्यवहार.

ज्ञानी व अज्ञानी यांच्या बाह्य व्यवहारांत कांहींच फरक दृष्टीस पडत नाहीं. पण तो फरक मात्र दोघांच्या मनःस्थितींत आढळून येतो असें वसिष्ठ सांगतात.

व्यवहारे यथैवाज्ञस्तथैवाखिलपंडितः ॥
वासनामात्रभेदोऽत्र कारणं बंधमोक्षदम् ॥ ४-१५-३७.
यावच्छरीरं तावाद्धि दुःखे दुःखं सुखे सुखम् ॥
असंसक्तधियो धीरा दर्शयन्त्यप्रबुद्धवत् ॥ ४-१५-३८.

व्यवहारांत जसा अज्ञ तसाच पंडित. दोहोंमध्यें बाह्यदृष्ट्या मुळींच फरक नसतो. ज्ञानी आणि अज्ञानी यांच्यामध्यें जो भेद असतो तो वासनाभिन्नत्व

ह्याच होय. याच भेदामुळें अज्ञ बद्ध होतात व तत्त्वज्ञ मुक्त होतात. जोंवर शरीर आहे तोंवर ज्ञानीसुद्धां अप्रबुद्धाप्रमाणें सुखाचें कारण घडलें असतां सुखी दिसतात आणि दुःखाचें कारण घडलें असतां दुःखी दिसतात." सुखदुःखांच्या भोगांच्या बाबतींत ज्ञानी आणि अज्ञानी ह्यांची स्थिति बाह्यतः सारखीच दिसते. तरी ह्यांच्या मनःस्थितींत मात्र महदंतर असतें. सुखामध्यें सुखी व दुःखामध्यें दुःखी ही ज्ञान्यांची वृत्ति व्यवहारांत लोकांना दिसत असली, तरी परमार्थतः त्यांची बुद्धि आत्मसुखांत सुस्थिर असते. म्हणून ज्ञानी पुरुषानें जरी कर्में केलीं तरी अज्ञानी पुरुषाला जसा बंध होतो तसा त्याला होत नाहीं. कारण कर्मेंद्रियांकडून कर्में घडलीं तरी जर मनुष्याची बुद्धि आत्मनिष्ठ असेल तर तीं कर्में बंधनकारक होत नाहींत. परंतु उलट मात्र असें होवें कीं, कर्मेंद्रियें स्वस्थ असून जर बुद्धीनें व्यापार होत असतील तर बंध निःसंशय प्राप्त झाल्याशिवाय रहात नाहीं. अशा तऱ्हेचें वर्णन भगवद्गीतेंत* आलेलें आहे. म्हणूनच वसिष्ठांनीं रामाला असा उपदेश केला आहे कीं,

बहिर्लोकसमाचारस्त्वंतराचारवर्जितः ॥
समोह्यतीव तिष्ठ त्वं संशांतसकलैषणः ॥ ४-१५-४४.

" बाह्यतः तूं लोकाचारखाच वाग. पण अंतःकरणानें निष्क्रिय आत्मस्थितींत रहा. सर्व एषणांचा म्हणजे इच्छांचा बुद्धीनें निरास करून विषय भावनेचा त्याग कर." असें करून मग लोक व्यवहारांतील आपलीं कर्तव्यकर्में करीत रहा, कारण कर्म करणें हा देहाचाच स्वभाव आहे, असें वसिष्ठ सांगतातः —

त्यागोहि कर्मणां तस्मादादेहं कोपपद्यते ॥ नि. उ. २-४२

" देह जिवंत असेंपर्यंत कर्मांचा त्याग उपपन्न होत नाहीं." " न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः " ( १८-११ ) असें भगवद्गीतेंतहि स्पष्ट सांगितलें आहे.

---

* कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ॥
इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः सउच्यते ॥ भ. गी. ३-६.

## जीवन्मुक्ताचें आचरण.

जीवन्मुक्त कधींहि यथेष्टाचरण करीत नाहीं. तो विधिनिषेधांच्या अतीत असतो, म्हणून त्याला अनाचार करण्याला मुभा आहे, असें कांहीं अविचारी लोक समजतात. पण तें सर्वस्वीं चुकीचें आहे. कारण जीवन्मुक्ताच्या हातून दुराचरण घडणें शक्य नाहीं. सामान्य मनुष्याच्या हातून स्वार्थाच्या लोभानें व तात्पुरत्या सुखाच्या लालसेनें गैरवर्तन होत असतें. परंतु त्याचा स्वार्थ, लोभ वगैरे दोष पूर्णपणें लयास गेलेले असतात; व जगांतील सर्व सुखांचा उगम ज्याच्यापासून होतो, अशा आत्मसुखांत सतत निमग्न झाल्यामुळें जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं क्षुद्र विषयसुखाची लालसा उत्पन्न होत नाहीं. म्हणूनच त्याचें हातून कोणतेंहि दुर्वर्तन कधींहि घडणें शक्य नाहीं. याच कारणास्तव वसिष्ठ सांगतात कीं,

> कर्मणः सुकृतादन्यदस्मै किंचिन्न रोचते ॥
> स्वभावएव महतां ननु यन्नविचेष्टितम् ॥ नि. उ. १०२-११२

" पुण्यकर्माहून त्याला ( जीवन्मुक्ताला ) दुसरें कांहींहि आवडत नाहीं; कारण शास्त्रविरुद्ध आचरण न करणें हा महात्म्यांचा स्वभावच असतो." ज्ञान होण्याचें पूर्वी तो यथाशास्त्र कर्मांचें आचरण करीत असतो व त्यामुळें त्याचें चित्त शुद्ध होऊन त्याला ज्ञान प्राप्त झालेलें असतें. अशी जर वस्तुस्थिति आहे तर तो ज्ञान झाल्यावर दुराचरण कसा करील? याप्रमाणें जीवन्मुक्त बाहेरून सदाचार करीत असला तरी अंतःकरणात तो अतिशय शीतल असतो. त्याला कोणत्याहि फळाची इच्छा नसते. म्हणून त्याचीं सर्व कर्में निष्काम होत असतात. तो सर्व भूतावर दया करणें या श्रेष्ठ वृत्तीचा आश्रय करून आपल्या सर्वस्वाचा नाश करूनहि आर्तांचें रक्षण करितो. हा जीवन्मुक्त केवळ अज्ञजनांचा उद्धार करण्यासाठीं जीवित धारण करीत असतो.

## जीवन्मुक्ताचें शरीर म्हणजेच त्याची राजधानी.

जीवन्मुक्त आपल्या शरीराला मुळींच यातना देत नाहीं; कारण त्याला माहीत असतें कीं, हें शरीर प्राक्तन कर्मानें निर्माण झालेलें आहे

व प्रारब्ध संपलें कीं, तें आपोआप नाहींसें होणार आहे. जीवन्मुक्ताचें शरीर म्हणजे एक परमेश्वराचें जणुं मंदीर आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण त्यां शरीराचे सर्व व्यापार जीवन्मुक्ताच्या स्वाधीन असतात. त्याचें मन, प्राण व इंद्रियें त्याच्या ताब्यांत असतात. म्हणून शरीर ही त्याची राजधानी आहे व तो त्याच्यांत राज्य करीत आहे; असें वसिष्ठांनीं स्थिति प्र. सर्ग २३ मध्यें सविस्तर वर्णन केलें आहे. ही शरीररूपी महापुरी जीवन्मुक्ताच्या दुःखाला कारण न होतां उलट सुखालाच कारण होते. ही देहरूपी नगरी जीवन्मुक्ताला सर्वगुणसंपन्न, अनंत विलासांनीं ओतप्रोत भरलेली आणि आत्मज्योतीनें निरंतर प्रकाशित असल्यामुळें अत्यंत रम्य अशी भासते. ही शरीरनगरी अज्ञानी मनुष्यास अनंत दुःखाचें, परंतु ज्ञानी पुरुषाला अनंत सुखाचें भांडारच होत असतें. अशा तऱ्हेची नगरी नष्ट झाली तरी त्याला त्याचें कांहींच वाटत नाहीं. बरें, ही कायम राहिली तर भोग व मोक्ष हीं दोन्ही तऱ्हेचीं सुखें त्याला प्राप्त होतात. सारांश,

सुखावहैषा नगरी नित्यं वै विदितात्मनः ॥
भोगमोक्षप्रदा चैषा शक्रस्येवामरावती ॥ ४-२३-२९.

"ह्या शरीररूपी नगरींत राज्य करणारा ज्ञानी अमरावतींत सुखानें कालक्रमणा करणाऱ्या इंद्राप्रमाणें स्वस्थपणें रहात असतो व प्रारब्धानुसार भोग भोगून परम पुरुषार्थाची प्राप्ति करून घेतो."

## जीवन्मुक्तच महाकर्ता.

जीवन्मुक्त आळशी नसतो व मोठा कार्यकारीहि नसतो, तर तो महाकर्ता असतो. महाकर्त्याचें स्वरूप वसिष्ठांनीं नि. प्र. पू. सर्ग ११५ मध्यें सांगितलें आहे. (या ग्रंथाचा भाग दुसरा–भृंगीशाची गोष्ट ३९ वी) या गोष्टींत महाकर्ता, महाभोक्ता व महात्यागी यांच्या व्याख्या केल्या आहेत.

शुभाशुभेषु कार्येषु धर्माधर्मःकुशंकया ॥
मतिर्न लिप्यते यस्य महाकर्ता स उच्यते ॥ नि.पू.११५.१४.

"दैवानें प्राप्त झालेल्या अश्वमेधासारख्या धार्मिक व मांसभक्षणासारख्या अधार्मिक कर्मांमध्यें मी मोठा धार्मिक आहे किंवा पापी आहे, अशा

## जीवन्मुक्ताचें आचरण.

जीवन्मुक्त कधींहि यथेष्टाचरण करीत नाहीं. तो विधिनिषेधांच्या अतीत असतो, म्हणून त्याला अनाचार करण्याला मुभा आहे, असें कांहीं अविचारी लोक समजतात. पण तें सर्वस्वीं चुकीचें आहे. कारण जीवन्मुक्ताच्या हातून दुराचरण घडणें शक्य नाहीं. सामान्य मनुष्याच्या हातून स्वार्थाच्या लोभानें व तात्पुरत्या सुखाच्या लालसेनें गैरवर्तन होत असतें. परंतु त्याचा स्वार्थ, लोभ वगैरे दोष पूर्णपणें लयास गेलेले असतात; व जगांतील सर्व सुखांचा उगम ज्याच्यापासून होतो, अशा आत्मसुखांत सतत निमग्न झाल्यामुळें जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं क्षुद्र विषयसुखाची लालसा उत्पन्न होत नाहीं. म्हणूनच त्याचें हातून कोणतेंहि दुर्वर्तन कधींहि घडणें शक्य नाहीं. याच कारणास्तव वसिष्ठ सांगतात कीं,

> कर्मणः सुकृतादन्यदस्मै किंचिन्न रोचते ॥
> स्वभावएव महतां ननु यन्नविचेष्टितम् ॥ नि. उ. १०२-११२.

" पुण्यकर्माहून त्याला ( जीवन्मुक्ताला ) दुसरें कांहींहि आवडत नाहीं; कारण शास्त्रविरुद्ध आचरण न करणें हा महात्म्यांचा स्वभावच असतो." ज्ञान होण्याचें पूर्वी तो *यथाशास्त्र कर्मांचें आचरण* करीत असतो व त्यामुळें त्याचें चित्त शुद्ध होऊन त्याला ज्ञान प्राप्त झालेलें असतें. अशी जर वस्तुस्थिति आहे तर तो ज्ञान झाल्यावर दुराचरण कसा करील ? याप्रमाणें जीवन्मुक्त बाहेरून सदाचार करीत असला तरी अंतःकरणात तो अतिशय शीतल असतो. त्याला कोणत्याहि फळाची इच्छा नसते. म्हणून त्याचीं सर्व कर्मे निष्काम होत असतात. तो सर्व भूतावर दया करणें या श्रेष्ठ वृत्तीचा आश्रय करून आपल्या सर्वस्वाचा नाश करूनहि आर्तांचें रक्षण करितो. हा जीवन्मुक्त केवल अज्ञजनांचा उद्धार करण्यासाठीं जीवित धारण करीत असतो.

## जीवन्मुक्ताचें शरीर म्हणजेच त्याची राजधानी.

जीवन्मुक्त आपल्या शरीराला मुळींच यातना देत नाहीं; कारण त्याला माहीत असतें कीं, हें शरीर प्राक्तन कर्मानें निर्माण झालेलें आहे

## जीवन्मुक्ताची वागणूक

तोच जीव विषयासक्त आहे असें समजलें जातें. मुमुक्षु अथवा मुक्त या दोघांनींहि विषय सेवन कसें करावें तें वसिष्ठांनीं सांगितलें आहे.

**न वांछता न त्यजता दैवप्राप्ताः स्वभावतः ॥**
**सरितः सागरेणेव भोक्तव्या भोगभूमयः ॥** नि. पू. ३९-५१

" सागर जसा आलेल्या नद्यांना आपल्या निर्विकार स्वरूपांत साठवितो, त्याप्रमाणें दैववशात् स्वभावतः प्राप्त झालेल्या, सुखदुःख देणाऱ्या विषयांची वांछा न करितां व त्यांचा त्यागहि न करितां त्यांचा भोग घ्यावा. "

### जीवन्मुक्त कोठें रहातो ?

जीवन्मुक्ताला एकांतांत किंवा अरण्यांत राहिलें पाहिजे असें नसून तो कोठेंहि राहिला तरी तो निर्विकारच असतो. एखाद्या मोठ्या गजबजलेल्या शहरांत राहिला तरी त्याला त्या ठिकाणीं कोणाचाच त्रास पोहोंचत नाहीं; कारण तो नित्य समाधींतच असतो. जीवनमुक्त अमक्याच ठिकाणीं रहातो, याविषयीं कांहीं निश्चय करितां येत नाहीं. कारण तो कोठेंहि राहिला तरी आत्मस्वरूपामध्यें रममाण होत असतो. कांहीं जीवन्मुक्त पर्वताच्या गुहेंत रहातात, तर कोणी पुण्याश्रमाचा आश्रय करून रहातात. कोणी गृहस्थाश्रमांत रहातात, तर कोणी संन्यासाश्रमाचा स्वीकार करून रहातात. कोणी भिक्षा मागून आपला निर्वाह करतात, तर कोणी नारदासारखें नित्य पर्यटन करीत रहातात. कोणी एकांत प्रदेशीं तपश्चर्या करीत बसतात, तर कोणी मौन व्रत धारण करून ध्यानस्थ रहातात. कोणी प्रख्यात विद्वान् असतात, तर कोणी शुकासारखे पूर्ण विरक्त असतात. तर कोणी जनक, अश्वपतीसारखे राजे असतात. कोणी ब्राह्मण असतात तर कोणी सिद्धिसंपन्न असतात. सारांश, जीवन्मुक्त अमूक ठिकाणीं रहातो व अमुक एका स्थितींत असतो, असें कांहींच ठरवितां येत नाहीं.

### जीवन्मुक्ताच्या मनाला ' सत्त्व ' म्हणतात.

जीवन्मुक्ताला मन असतें, पण तें अज्ञ पुरुषाच्या मनासारखें मात्र

नसतें.तें निर्वासन झालेलें असल्यामुळें त्याला वसिष्ठांनीं 'सत्त्वं निर्वासनं मतः' 'सत्त्व' असें नांव ठेवलें आहे.

मूढं चित्तं चित्तमाहुः प्रबुद्धं सत्त्वमुच्यते ॥
भूयःप्रजायते चित्तं सत्त्वं भूयो न जायते ॥ नि. पू. १०१-३२
ज्ञस्य चित्तं न चित्ताख्यं ज्ञचित्तं सत्त्वमुच्यते ॥ नि. पू.४४-३०
अप्रबुद्धास्तुचित्तस्थाः सत्त्वस्थास्तु महाधियः॥ नि.पू.१०१-३१

या सर्व श्लोकांचा भावार्थ असा कीं, "ज्ञानी जीवन्मुक्ताच्या चित्ताला चित्त असें न म्हणतां 'सत्त्व' असें म्हणतात." अशा या सत्त्वाच्या अस्तित्वानें जीवन्मुक्त केवळ लीलेनें व्यवहार करीत असतात. भाजलेल्या बीजापासून जसा अंकुर उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें त्या सत्त्वापासून मोह उत्पन्न होत नाहीं. म्हणूनच जीवन्मुक्त नित्य सत्त्वस्थ असतात, असें त्यांचें वर्णन करीत असतात." या ठिकाणीं 'सत्त्वस्थ' या पदाचा अर्थ 'शुद्धसत्त्वगुणामध्यें स्थित असलेला' असा कित्येक लोक करीत असतात, पण तसा अर्थ करणें बरोबर नाहीं; कारण जीवन्मुक्त प्रकृतीच्या गुणांच्या पलीकडे गेलेले असतात. म्हणून वसिष्ठांनीं असें स्पष्ट सांगितलें आहे कीं,

जीवन्मुक्ताः महात्मानः सत्त्वस्था : संयतेंद्रियः ॥
विहरंति गतासंगं न चित्तस्थाः कदाचन ॥ नि. पू. १०१-३०

"जे महात्मे जीवन्मुक्त स्थितीला प्राप्त झालेले असतात, ते जितेंद्रिय व नित्य सत्त्वस्थ (म्हणजे निर्वासन सत्त्वसंज्ञक मनाच्या ठिकाणीं रहाणारे) बनून आसक्ति सोडून विहार करीत रहातात. ते केव्हांहि चित्तांत स्थित नसतात (म्हणजेच वासनायुक्त नसतात.)

## जीवन्मुक्ताची वासना 'सत्त्वच' होय.

वासना दोन प्रकारची आहे, एक शुद्ध व दुसरी मलिन. मलिन वासना पुनर्जन्माला कारण होत असते व शुद्ध वासना पुनर्जन्माला नाहींशी करीत असते. ही शुद्ध वासना जीवन्मुक्तांच्या ठिकाणीं रहात असून त्याच्या देहाचें धारण करण्यापुरताच तिचा उपयोग होत असतो. या वासनेला 'सत्त्व' असें म्हटलें आहे.

## जीवन्मुक्ताची वागणूक

भृष्टबीजोपमा भूयो जन्मांकुरविवर्जिता ॥
हृदि जीवद्विमुक्तानां शुद्धा भवति वासना ॥ ५-४२-१४.
पावनी परमोदारा शुद्धसत्त्वानुपातिनी ॥
आत्मध्यानमयी नित्यं सुषुप्तस्येव तिष्ठति ॥ ५-४२-१५.
जीवनमुक्तशरीरेषु वासना व्यवहारिणी ॥
न चित्तनाम्नी भवति सा हि सत्त्वपदं गता ॥ नि. पू. २-४२

" जीवन्मुक्ताच्या हृदयामध्यें जी वासना असते ती अत्यंत शुद्ध असते; अर्थात् ती आसक्ति, मालिन्य इत्यादि विकारांनीं दूषित झालेली नसते व त्यामुळें भर्जित बीजाप्रमाणें तिच्यापासून पुनर्जन्मरूपी अंकुर कधींहि उद्भवत नाहीं. जीवन्मुक्तांच्या ठिकाणची वासना पवित्र, अति उदार, शुद्धसत्त्वाबरोबर उदय पावणारी आणि आत्मध्यानमय असून ती त्यांच्या ठिकाणीं सुषुप्त पुरुषाच्या वासनेप्रमाणें रहाते. जीवनमुक्तांच्या शरीरामध्यें व्यवहार करीत रहाणारी जी वासना तिला चित्त असें म्हणत नाहींत, कारण ती ' सत्त्व ' या पदवीस पोहोंचलेली असते.

### सिद्धिसामर्थ्य हें जीवन्मुक्ताचें लक्षण नव्हे.

जीवन्मुक्त असला कीं त्याचे ठिकाणीं सिद्धि सामर्थ्य असलेंच पाहिजे. ही जी सामान्य लोकांची समजूत असते, ती साफ चुकीची आहे; कारण जीवनन्मुक्तालाच सिद्धीप्राप्त होत असतात असें नसून त्या अज्ञ पुरुषालाहि मिळवितां येतात. हें पूर्वी " सिद्धिसामर्थ्य " या विषाच्या प्रकरणांत स्पष्ट केलें आहे. म्हणून सिद्धिसामर्थ्य हें जीवन्मुक्ताचें लक्षण म्हणतां येत नाहीं, असें वसिष्ठ सांगतात:—

न तस्यार्थो नभोगत्या न सिध्द्या न च भोगकैः ॥
न प्रभावेण नो मानैर्नाशामरणजीवितैः ॥ ५-८९-१८

( जीवन्मुक्त आत्म्यामध्यें संतुष्ट असतो म्हणून तो कशाचीहि इच्छा करीत नाहीं ). " त्याला आकाशगमनाचा कांहीं उपयोग नाहीं. सिद्धींचें कांहीं प्रयोजन नाहीं व क्षुद्र भोगांचेंहि कांहीं काम नाहीं. त्याला सर्वांचें अधिपत्य, निग्रहानुग्रह सामर्थ्य या प्रभावाची इच्छा नसते. आपण सर्वांपेक्षां

आहे. सारांश, 'आपलीं ज्ञानचिन्हें लोकांना कळावींत व त्यामुळें आपल्याला लोकांनीं मोठे ज्ञानी म्हणावें' असें त्यांना मुळींच वाटत नाहीं. कारण आपली ख्याति झाल्यास लोक आपली पूजा करूं लागतील व आपल्याला धनादिकांची समृद्धि होईल. आपल्या सभोंवार मोठा जनसमूह जमेल, आपला अभिमान वाढेल व शेवटीं यामुळें आत्मसुखामध्यें विघ्न येईल, असें समजून ते त्यापासून अगदीं दूरच रहातात. तशाच एखादा अधिकारी मुमुक्षु भेटलाच तर मात्र ते त्याला मोठ्या प्रेमानें उपदेश करितात.

## जीवन्मुक्ताचा संकल्पत्याग.

जीवन्मुक्तांनीं 'हा देह मी व हें सर्व दृश्य माझें व परकेयाचें' हे सर्व संकल्प सोडलेले असतात. पूर्वी अनुभवलेल्या विषयांचें स्मरण व कधीं न अनुभवलेल्या विषयांचें व भावी विषयांचें अनुसंधान हे दोन्ही त्यानें सोडलेले असतात. अशा तऱ्हेचा संकल्पत्याग जिवंतपणींच करितां येणें शक्य आहे. मेल्यावर तो संभवत नाहीं. म्हणून जीवन व संकल्पत्याग यांचा विरोध नाहीं. कारण 'मी व सर्व जगत् ब्रह्म आहे' अशा भावनेनें इतर वृत्तींचा निरोध होतो. त्यामुळें त्या जीवन्मुक्ताला दीर्घ आयुष्य प्राप्त होतें. अर्थात् हा कल्पनात्याग जीवनाला क्षीण करणारा नसून उलट त्याची वृद्धि करणारा आहे. सर्वच स्मृतींचा त्याग केल्यावर व्यवहार तरी कसा होईल? असें कोणी विचारील तर त्याचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं, पूर्वाभ्यासानेंच प्राप्त झालेल्या अवश्य कर्तव्यामध्यें त्यांची प्रवृत्ति संकल्पा वांचूनहि होते. जसें कुंभाराचें चाक प्रयोजन नसतांहि केवल पूर्व संस्कारानें त्याला दिलेला वेग क्षीण होईपर्यंत भ्रमण करीत रहातें, त्याप्रमाणें पूर्व संस्कारवशात् कोणताहि संकल्प नसला तरी शरीरयंत्र आपली प्राप्तक्रिया प्रारब्धक्षय होईपर्यंत करीत राहीलच.

**संकल्पनं परोबंधः तदभावोविमुक्तता ॥ नि. उ. १-२७**
**असंकल्पः परं श्रेयः ॥ नि. उ. १-११**

सारांश, 'संकल्पत्याग हेंच परमश्रेय म्हणजेच मुक्ति' हा सिद्धांत जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं चांगलाच मुरलेला असतो. असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## जीवन्मुक्ताचे विचार.

जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं कोणत्याच तऱ्हेचा आग्रह नसतो, तर

**यद्यथा नाम संपन्नं तत्तथास्त्वितरेण किम्** ॥ नि.उ. १२५-४७

"जें जसें प्राप्त होईल तें तसें असो, त्यापेक्षां अधिक इच्छा करून काय करावयाचें आहे ?" असा विचार जीवन्मुक्त सतत करीत असतो. या विषयीं ब्रह्मदेवाचें उत्कृष्ट उदाहरण आहे.

ब्रह्मदेवाला प्रथम पांच मस्तकें होतीं. पण पुढें त्याचें पांचवें मस्तक सामगायन करीत असतां शंकरानें तोडलें. ब्रह्मदेव त्या जागीं दुसरें मस्तक उत्पन्न करण्यास समर्थ होता, पण सर्वच मस्तकें तत्त्वदृष्ट्या मिथ्या असल्यामुळें पांचवें तरी मिथ्या मस्तक घेऊन काय करावयाचें आहे ? तर मग त्याला चार मस्तकांचें तरी काय काम होतें ? असें म्हणणें व्यर्थ आहे. कारण प्राण्यांच्या कर्मवशात् चारी वेदांची उत्पत्ति करण्यासाठीं त्यांची गरज होती. ईश्वरांचादि प्राण्यांच्या कर्मानुसार व्यवहार होत असतो असें दिसून येतें.

## जीवन्मुक्ताची आपल्या मित्रासह क्रीडा.

नि. प्र. उ. सर्ग १७० मध्यें जीवन्मुक्त आपलें उर्वरित आयुष्य कसें घालवितो याचें वर्णन वसिष्ठांनीं मोठें गमतीदार केलें आहे, त्याचा थोडा सारांश असा आहे:—

जीवन्मुक्तांचा कर्म हा एक अकृत्रिम मित्र आहे. त्याच्या सहवर्तमान तो आपल्या आयुष्यांचे दिवस घालवितो. कर्म हें तीन प्रकारचें आहे. एक प्रवाहहित म्हणजे सहज किंवा स्वाभाविक कर्म. दुसरें प्रायेहित म्हणजे

उत्तम आहे, असा गर्व लोकामध्यें व्यक्त करण्याचें त्याला कांहींच कारण नसतें. आशा, मरण व जीवित यांच्या योगानेंहि त्याला कांहींहि साधावयाचें नसतें. ''

## जीवन्मुक्ताचें जीवितच खरें जीवित.

ज्याची बुद्धि आत्मचिंतनामध्यें सतत निमग्न झाली आहे, म्हणूनच जी प्रिय व अप्रिय या भावनांनीं लिप्त होत नाहीं आणि ज्याच्या ठिकाणीं 'हा मी' असा अभिमान नाहीं, त्याचें जीवित सतत शोभादायक होतें. ब्रह्मदृष्टीचा आश्रय करून जो वासनारहित बुद्धीनें आपले जगांतील व्यवहार करीत असतो व तसें करीत असतां जो इष्ट व अनिष्ट विपर्यांच्या प्राप्तीनें हर्षित व कष्टी होत नाहीं, त्याचें जीवित खरोखरच स्पृहणीय होय. सारांश, जीवन्मुक्त हा स्वतः करितां जगत नसून केवळ अज्ञजनांचा उद्धार करण्याकरितांच जीवित धारण करीत असतो. म्हणूनच जीवन्मुक्ताचेंच जीवित खरें जीवित होय. इतरांना म्हणजे अज्ञानी माणसांना जिवंत रहाण्यापेक्षां मरणच योग्य आहे, असें वसिष्ठांनीं उपशम प्र. सर्ग ३९ मध्यें सविस्तर वर्णन केलें आहे.

## जीवन्मुक्तच उपदेश करण्याला योग्य.

सुषुप्त मनुष्य स्वप्नाचा अनुभव घेत नाहीं व स्वप्न पहात असलेला मनुष्य सुषुप्तीचा अनुभव घेत नाहीं; पण जागा झालेला मनुष्य स्वप्न व जागृति या दोहोंचा अनुभव घेतो. त्याचप्रमाणें संसारांत असलेल्या मनुष्याला ब्रह्म भासत नाहीं व ब्रह्मरूप झालेल्याला विदेह स्थितींत संसार भासत नाहीं. पण जीवन्मुक्तींत पर्यायानें दोन्ही भासतात. म्हणजेच जीवन्मुक्त ब्रह्म व जगत् या दोहोंचाहि एकाचवेळीं अनुभव घेत असतो. कारण तो ज्यावेळीं जगाला पहातो त्याचवेळीं तो ब्रह्म प्रकाशमय आहे असेंहि समजतो. कारण जीवन्मुक्ताला प्रपंचाचें जर मुळींच भान नसतें तर अज्ञ जीवांना उपदेश करण्याचें महत्कार्य त्याच्या हातून घडलें नसतें. म्हणून जीवन्मुक्ताला वसिष्ठांनीं

अर्धसुप्तप्रबुद्धाभो जीवन्मुक्तोऽत्र तिष्ठति ॥ नि. पू. १२०-३.

पांचव्या ज्ञानाच्या भूमिमेवर आरूढ झालेल्या जीवन्मुक्ताला अर्धवट जागा झालेल्या पुरुषाची उपमा दिली आहे.' हाच जीवन्मुक्त गुरु करण्यास योग्य असतो. कारण तो विद्वान् व ब्रह्मनिष्ठ असतो. म्हणूनच

**तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिःश्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥**
मुंडक १–२–१२.

"शिष्याला उपदेश करून त्याच्या ठिकाणच्या सर्व शंकाचें निरसन करण्यांत मोठा कुशल व आत्मसाक्षात्कारसंपन्न अशा सद्गुरूला आत्मज्ञान संपादन करण्याकरितां शरण जावें." असें मुंडकोपनिषदांत मुद्दाम सांगितलें आहे.

### जीवन्मुक्त आपलें ज्ञान गुप्त ठेवतो.

खरे जीवन्मुक्त आपले गुण (ज्ञानचिन्हें) अनधिकारी माणसापासून गुप्त ठेवण्याचाच प्रयत्न करीत असतात. इतरांना ते दिसावें अशी त्यांची मनापासून इच्छा नसते. असें वसिष्ठ सांगतातः—

**भावं निगूहयंत्येते तमुत्तममनुत्तमाः ॥**
**ग्राम्यैर्धनैः किलानर्घ्यः कश्चिंतामणिरापणे ॥** नि. उ. १०२-२७

"श्रेष्ठ तत्त्वज्ञ आपला उत्तम स्वभाव गुप्त ठेवण्याचाच प्रयत्न करितात. दांभिकाप्रमाणें ते त्याला प्रकट करीत नाहींत. कारण गांवांतील किंवा नगरांतील धनानें ज्याचें मूल्य होऊं शकत नाहीं, अशा चिंतामणि बाजारांत विकावयास मांडला जात नाहीं." अर्थात् जर एखाद्या मूर्खानें चिंतामणीादि बाजारांत विकावयास मांडलें तर ग्राहक समजतील कीं 'हा खरा चिंतामणि नव्हे; तर चिंतामणिसारखा दिसणारा नुसता दगड आहे.' याच न्यायानें जो आपलीं ज्ञान लक्षणें प्रकट करूं लागतो तो तत्त्वज्ञ नसून दांभिक आहे असें निःसंशय समजावें. म्हणूनच "यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः", "अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम्" म्हणजे जो म्हणेल कीं मला आत्मज्ञान झालें आहे, त्याला मुळींच झालें नाहीं असें समजावें. असें उपनिषदांतून सांगितलें

आहे. सारांश, 'आपलीं ज्ञानचिन्हें लोकांना कळावींत व त्यामुळें आपल्याला लोकांनीं मोठे ज्ञानी म्हणावें' असें त्यांना मुळींच वाटत नाहीं. कारण आपली ख्याति झाल्यास लोक आपली पूजा करूं लागतील व आपल्याला धनादिकांची समृद्धि होईल. आपल्या सभोंवार मोठा जनसमूह जमेल, आपला अभिमान वाढेल व शेवटीं यामुळें आत्मसुखामध्यें विघ्न येईल, असें समजून ते त्यापासून अगदीं दूरच रहातात. तथाच एखादा अधिकारी मुमुक्षु भेटलाच तर मात्र ते त्याला मोठ्या प्रेमानें उपदेश करितात.

## जीवन्मुक्ताचा संकल्पत्याग.

जीवन्मुक्तानें 'हा देह मी व हें सर्व दृश्य माझें व परकेयाचें' हे सर्व संकल्प सोडलेले असतात. पूर्वी अनुभवलेल्या विषयांचें स्मरण व कधीं न अनुभवलेल्या विषयांचें व भावी विषयांचें अनुसंधान हे दोन्ही त्यानें सोडलेले असतात. अशा तऱ्हेचा संकल्पत्याग जिवंतपणींच करितां येणें शक्य आहे. मेल्यावर तो संभवत नाहीं. म्हणून जीवन व संकल्पत्याग यांचा विरोध नाहीं. कारण 'मी व सर्व जगत् ब्रह्म आहे' अशा भावनेनें इतर वृत्तींचा निरोध होतो. त्यामुळें त्या जीवन्मुक्ताला दीर्घ आयुष्य प्राप्त होतें. अर्थात् हा कल्पनात्याग जीवनाला क्षीण करणारा नसून उलट त्याची वृद्धि करणारा आहे. सर्वच स्मृतींचा त्याग केल्यावर व्यवहार तरी कसा होईल? असें कोणी विचारील तर त्याचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं, पूर्वाभ्यासानेंच प्राप्त झालेल्या अवश्य कर्तव्यामध्यें त्यांची प्रवृत्ति संकल्पा वाचूनहि होते. जसें कुंभाराचें चाक प्रयोजन नसतांहि केवळ पूर्व संस्कारानें त्याला दिलेला वेग क्षीण होईपर्यंत भ्रमण करीत रहातें, त्याप्रमाणें पूर्व संस्कारवशात् कोणताहि संकल्प नसला तरी शरीरयंत्र आपली प्राप्तक्रिया प्रारब्धक्षय होईपर्यंत करीत राहीलच.

संकल्पनं परोबंधः तदभावोविमुक्तता ॥ नि. उ. १-२७

असंकल्पः परं श्रेयः ॥ नि. उ. १-११

सारांश, 'संकल्पत्याग हेंच परमश्रेय म्हणजेच मुक्ति' हा सिद्धांत जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं चांगलाच मुरलेला असतो. असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## जीवन्मुक्ताचे विचार.

जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं कोणत्याच तऱ्हेचा आग्रह नसतो, तर

**यद्यथा नाम संपन्नं तत्तथास्त्वितरेण किम् ॥** नि.उ. १२५-४७

"जें जसें प्राप्त होईल तें तसें असो, त्यापेक्षां अधिक इच्छा करून काय करावयाचें आहे ?" असा विचार जीवन्मुक्त सतत करीत असतो. या विषयीं ब्रह्मदेवाचें उत्कृष्ट उदाहरण आहे.

ब्रह्मदेवाला प्रथम पांच मस्तकें होतीं. पण पुढें त्याचें पांचवें मस्तक सामगायन करीत असतां शंकरानें तोडलें. ब्रह्मदेव त्या जागीं दुसरें मस्तक उत्पन्न करण्यास समर्थ होता, पण सर्वच मस्तकें तत्त्वदृष्ट्या मिथ्या असल्यामुळें पांचवें तरी मिथ्या मस्तक घेऊन काय करावयाचें आहे ? तर मग त्याला चार मस्तकांचें तरी काय काम होतें ? असें म्हणणें व्यर्थ आहे. कारण प्राण्यांच्या कर्मवशात् चारी वेदांची उत्पत्ति करण्यासाठीं त्यांची गरज होती. ईश्वराचाहि प्राण्यांच्या कर्मानुसार व्यवहार होत असतो असें दिसून येतें.

## जीवन्मुक्ताची आपल्या मित्रासह क्रीडा.

नि. प्र. उ. सर्ग १७० मध्यें जीवन्मुक्त आपलें उर्वरित आयुष्य कसें घालवितो याचें वर्णन वसिष्ठांनीं मोठें गमतीदार केलें आहे, त्याचा थोडा सारांश असा आहे:—

जीवन्मुक्तांचा कर्म हा एक अकृत्रिम मित्र आहे. त्याच्या सहवर्तमान तो आपल्या आयुष्याचे दिवस घालवितो. कर्म हें तीन प्रकारचें आहे. एक प्रवाहहित म्हणजे सहज किंवा स्वाभाविक कर्म. दुसरें प्रायेहित म्हणजे

शास्त्रविहित कर्म. ह्या कर्माची त्याला जरूरी नसली तरी तो तें लोकसंग्रहाकरितां करीत असतो. तिसरें कर्म स्वकर्म म्हणजे सच्छास्त्राचा अभ्यास, विचार, शम, दम, उपरम, तितिक्षा वगैरे होय. तो ह्या कर्मरूप मित्राबरोबर नेहमीं क्रीडा करीत असतो. म्हणजे जीवन्मुक्त विदेह स्थितीला प्राप्त होईपर्यंत कर्माचें आचरण करीत रहातो. आतां वास्तविक पहातां त्याला ह्या कर्माच्या आचरणापासून कांहीं लाभ नसतो. तरी पण जिवंत असेपर्यंत शरीर कर्म करीत रहाणारच, हा सिद्धांत त्याच्या बुद्धींत चांगल्या प्रकारानें ठसलेला असतो. ह्या कर्मरूपी मित्राला स्नान, दान, तप व ध्यान या नांवाचे चार मुलगे आहेत, एक मुदिता (म्हणजे नित्य संतुष्टपणा). दुसरी समता व तिसरी मैत्री या नांवाच्या त्याला तीन भार्या आहेत. अशा परिवारानें युक्त असलेल्या स्वकर्मसंज्ञक मित्रासह क्रीडा करणारा जीवन्मुक्त आपले आयुष्याचे राहिलेले दिवस मोठ्या आनंदानें व समाधानानें घालवितो.

## जीवन्मुक्ति संपल्यावर विदेहमुक्ति.

जीवन्मुक्तिपदं त्यक्त्वा देहे कालवशीकृते ॥
विशत्यदेहमुक्तत्वं पवनोऽस्पंदतामिव ॥ ३-९-१४

" अशा तऱ्हेचा जीवन्मुक्ताचा देह प्रारब्ध संपल्यावर कालवश झाला म्हणजे चंचल वायु स्थिर व्हावा त्याप्रमाणें तो विदेहमुक्तींत प्रवेश करितो." मग त्या मुक्ताच्या स्थितीमध्यें वृद्धि आणि क्षय यांचा मागमूसहि असत नाहीं. मुक्त पुरुष सर्वात्मभावानें रहातो. तो सूर्य होऊन प्रकाश देतो. विष्णु होऊन त्रिभुवनाचें रक्षण करतो. रुद्ररूपानें सर्वांचा संहार करतो. आणि ब्रह्मदेव होऊन ब्रह्मांडें निर्माण करितो. सारांश, या जगांतील ज्या ज्या वस्तु आहेत, त्या त्या सर्व मुक्त पुरुष बनलेला आहे. विदेह मुक्त झाल्यावर तो ब्रह्मरूपच होऊन जातो त्यामुळें आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व चराचर सृष्टींत तो मिळून जातो. असें वसिष्ठांनीं उत्पत्ति प्र. स. ९ मध्यें सांगितलें आहे. अशा तऱ्हेची सर्वात्मभावना जीवन्मुक्तहि करीत असतो, म्हणून तोहि विदेहमुक्तच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याकरितां

केवळ देहाचें पतन झालेंच पाहिजे असें नाहीं; कारण जीवन्मुक्ति आणि विदेहमुक्ति यांत तत्त्वतः मुळींच फरक नाहीं असें सांगतात.

**न मनागपि भेदोऽस्ति सदेहादेहमुक्तयोः ॥ २-४-५**

आत्मबोधाच्या दृष्टीनें पाहिलें असतां पाण्याच्या स्थिर आणि चंचल स्वरूपामध्यें जसा वास्तविक भेद नसतो, त्याप्रमाणें सदेह मुक्ति (जीवनमुक्ति) आणि विदेहमुक्ति यांच्यांत वस्तुतः मुळींच भेद नाहीं. इतरांच्या दृष्टीनें पाहिल्यास जीवनन्मुक्त देहानें युक्त असलेला दिसतो, पण त्याच्या स्वतः-च्या अनुभवाच्या दृष्टीनें पाहिल्यास तो विदेहीच आहे. म्हणूनच तत्त्वतः जीवनमुक्त व विदेहमुक्त यांत मुळींच भेद नाहीं.



# प्रकरण ४५ वें.

## ज्ञानोत्तर कर्मयोग कां कर्मत्याग ?

आपल्या वर्णाश्रमाला अनुसरून असलेल्या शास्त्रविहित कर्मांचें निष्काम व निरभिमानीपणानें अनुष्ठान केल्यानें मनुष्याचें चित्त शुद्ध होतें व त्याला विवेक व वैराग्य यांच्या योगानें आत्मज्ञान प्राप्त झालें म्हणजे तो जीवन्मुक्त बनतो. या जीवन्मुक्त स्थितींत ज्ञानी मनुष्यानें कर्मच करीत रहावें किंवा ज्ञान प्राप्तीनें कृतकृत्य झाल्यामुळें जगांतील सर्व व्यवहार निरर्थक व त्याच्या सिद्धावस्थेला विरुद्ध समजून सोडून द्यावे, हा प्रश्न वासिष्ठामध्यें मोठ्या मार्मिक रीतीनें सोडविला आहे. जीवन्मुक्ताला कर्मांच्या आचरणानें या जगांत इहलोकीं किंवा परलोकीं कांहीं मिळवावयाचें आहे काय ? स्वकर्मांचें आचरण यथाशास्त्र न केल्यानें त्याला शास्त्रतः कांहीं प्रत्यवाय ( दोष ) लागतो काय ? त्याला कर्मत्याग सर्वस्वीं शक्य आहे काय ? खरा कर्मत्यागी कोण ? इत्यादि गोष्टींचा विचार केल्याशिवाय वरील प्रश्नांचें समाधानकारक उत्तर देतां येणें शक्य नाहीं.

### मुक्तीचे प्रकार.

जीवन्मुक्त कोणाला म्हणावें, हें समजण्याकरितां वासिष्ठांत प्रतिपादिलेल्या मुक्तीच्या प्रकारांचा प्रथम विचार करूं. मुक्तीचे दोन प्रकार आहेत. एक सदेहमुक्ती ( जीवन्मुक्ति ) व दुसरी विदेहमुक्ति. ज्याची बुद्धि कोणत्याहि विषयामध्यें आसक्त न होतां आत्मस्वरूपाचें अनुसंधान करण्यांत नेहमीं तत्पर असते व अशा तऱ्हेने ज्याला सहजसमाधीचा* लाभ होऊन ज्याच्या ठिकाणीं इष्ट व अनिष्ट विषयासंबंधीं राग व द्वेष अजीबात नष्ट झाले आहेत, अशा मनुष्याच्या स्थितीला जीवन्मुक्ति हें नांव दिलें

---

* सहज समाधीचें वर्णन 'समाधि' या नावांच्या यापुढील ४६ व्या प्रकरणांत केलें आहे. याशिवाय या ग्रंथाचा भाग दुसरा, मुख्यूची गोष्ट २२ वी, पृष्ठ १६५–१६६ यांत सहज समाधीचें वर्णन आलेलें आहे.

आहे. तीच जीवन्मुक्ति जेव्हां सर्व प्रारब्ध कर्मांचा आणि स्थूल, सूक्ष्म व कारण देहांचा क्षय होऊन पुनर्जन्मरहित स्थितीप्रत जाऊन पोहोंचते, तेव्हां त्या स्थितीला विदेहमुक्ति म्हणतात. ही स्थिति कोणाला प्रत्यक्ष दिसण्यासारखी नाहीं. ज्ञानाच्या पांचव्या भूमिकेवर आरूढ झालेल्या आत्मसाक्षात्कारसंपन्न ज्ञानी मनुष्याला जीवन्मुक्त असें नांव दिलेलें आहे. जीवन्मुक्ताच्या हृदयामध्यें जी वासना असते, ती अत्यंत शुद्ध सात्त्विक स्वरूपाची असते; अर्थात् ती वासना काम क्रोध वगैरे विकारांनीं दूषित झालेली नसते व त्यामुळें भाजलेल्या बीजाप्रमाणें तिच्यापासून पुनर्जन्मरूपी अंकुर कधींहि उद्भवत नाहीं.

## जीवन्मुक्तीचें स्वरूप.

देह व देही यांचे स्वभाव परस्परविरुद्ध आहेत. अर्थात् देह हा जड आहे व देही हा चेतन आहे. परंतु अशा तऱ्हेचें निश्चित ज्ञान नसल्यामुळें अन्योन्याध्यास होऊन देहाच्या ठिकाणीं आपलेपणाची भावना उत्पन्न होते, या स्थितीला संग असें म्हणतात.

हा संगच मनुष्याच्या नाशाला कारण होतो. परंतु याच्या उलट "मी देह नसून हें सर्व विश्व माझें स्वरूप आहे. म्हणून मी यापैकीं कशाचा त्याग करूं व कशाचें ग्रहण करूं ? 'मी' 'तूं' वगैरे कोणी नाहीं. परमार्थ दृष्टीनें मिथ्या असणाऱ्या देहाला विषयसुखें प्राप्त होवोत किंवा न होवोत. मला त्याच्याशीं काय कर्तव्य आहे" अशा तऱ्हेच्या विचारसरणीमुळें बनलेली जी मनाची असंग स्थिति तीच जीवन्मुक्ताची नेहमीची स्थिति असते. अशा तऱ्हेचा असंसक्त मनुष्य कधींहि कर्में सोडण्याची इच्छा करीत नाहीं. आणि कर्म-फलाच्या आशेनें कर्मामध्यें आसक्तहि होत नाहीं; तर कर्माची सिद्धि किंवा असिद्धि यासंबंधानें समता धारण करून कर्मांचा प्रत्यक्ष त्याग न करितां जो मनानें सर्व कर्मफलांचा त्याग करितो त्यालाच जीवन्मुक्त असें म्हणतात. आतां यावर कोणी असें म्हणेल कीं, जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं जर मुळींच आसक्ति नसेल तर तो कर्में तरी कसा करील ? या प्रश्नाचा आतां विचार करूं.

## आसक्तीचे प्रकार.

ही आसक्ति दोन प्रकारची आहे. त्यापैकीं एक वंध्या व दुसरी वंद्या.

( १ ) वंध्या आसक्ति–पुरुषार्थशून्य आसक्ति–मूढ पुरुषांच्या ठिकाणीं असते. या आसक्तीला वळी पडल्यामुळें गिधाडानें मांसाच्या तुकड्यावर झडप घालावी त्याप्रमाणें हें मन विचारांतीं नीरस ठरणाऱ्या विषयोपभोगांना रमणीय व सरस समजून त्यांच्यावर झडप घालतें व अशा तऱ्हेनें ती मनुष्याला जन्ममरणात्मक संसारामध्यें एकसारखी भ्रमण करवीत असते.

(२) वंद्या आसक्ति आत्मतत्त्वाचें ज्ञान व सदसद्वस्तूचा विवेक यांच्यापासून निर्माण झालेली असते. म्हणून ही पुनः पुनः संसारस्थितीला कारणीभूत होत नाहीं. वंद्य आसक्तीनें युक्त असल्यामुळें जीवन्मुक्तांच्या हातून सर्व तऱ्हेचीं कर्मे होणें शक्य आहे.

### जीवन्मुक्ताला शास्त्रीय विधिनिषेधांचे निर्बंध आहेत का ?

शास्त्राचे विधिनिषेध पाळण्याचें मुख्य कारण मनुष्याचें अंतःकरण शुद्ध होऊन तो आत्मज्ञानाचा अधिकारी व्हावा हें होय. पण जीवन्मुक्ताचें अंतःकरण अगोदरच शुद्ध झालेलें असल्यामुळें त्याला शास्त्राच्या विधिनिषेधांची आवश्यकता नाहीं.

न विधिर्न निषेधश्च न वर्ज्यावर्ज्यकल्पना ॥
आत्मविज्ञानिनामस्ति तथा नान्यज्जनार्दन ॥ ( सूतसंहिता )

' आत्मज्ञानी पुरुषांना ( शास्त्राचे ) विधि व निषेध तसेंच हें त्याज्य व हें ग्राह्य या कल्पना मुळींच नाहींत. '

निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः ॥

' जे पुरुष त्रिगुणातीत झाले त्यांस ( शास्त्राचा ) विधि कसला व निषेध तरी कसला ?

अशा श्रीशंकराचार्यांच्या मताप्रमाणें व सूतसंहितेंतील वरील वचनांत वर्णन केल्याप्रमाणें जीवन्मुक्ताला शास्त्राच्या विधिनिषेधांचे कोणतेंच निर्बंध नाहींत. अशा दृष्टीनें त्याचें स्वतःचें असें कोणतेंच कार्य

शिल्लक राहिलेलें नसतें. कारण त्याला शास्त्रविधीप्रमाणें कर्माचें आचरण करून कांहीं फल मिळवावयाचें नाहीं, किंवा तसें आचरण न केल्यामुळें त्याला कांहीं प्रत्यवाय (दोष) लागत नाहीं. 'तं विदित्वा न लिप्यते कर्मणा पापकेन' या श्रुतिवचनांत सांगितल्याप्रमाणें त्याला कांहीं पातकहि लागत नाहीं; कारण त्याची अहंकारबुद्धि सर्वस्वी सुटल्यामुळें त्याच्या हातून होणाऱ्या सर्व कर्मांपासून तो सर्वस्वीं अलिप्तच असतो. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वाऽपि स इमॉंल्लोकान्न हंति न निबध्यते ॥** नि. पू. ३-१८

'ज्याला 'मी करितो' ही भावना नाहीं व ज्याची बुद्धि अलिप्त असते त्यानें या लोकांना जरी मारलें तरी 'मारलें' असें होत नाहीं, आणि तें (कर्म) त्याला बंधकहि होत नाहीं.' *

**ब्रह्महत्याश्वमेधाभ्यामसंसक्तो न लिप्यते ॥** ५-६७-४१

'असंसक्त (जीवन्मुक्त) पुरुषाला ब्रह्महत्येचें घोर पातक किंवा अश्वमेधाचें असामान्य पुण्य लागत नाहीं.' ×

**जीवन्मुक्ताच्या हातून दुराचरण होत नाहीं.**

या वरील वर्णनाच्या आधारें जीवन्मुक्ताला अनाचार करण्याला मुभा आहे असें कांहीं अविचारी लोक मानतात, पण तें सर्वस्वीं चुकीचें आहे. कारण जीवन्मुक्तांच्या हातून दुराचरण घडणेंच शक्य नाहीं; कारण,

**विदितब्रह्मतत्त्वस्य यथेष्टाचरणं यदि ॥**
**शुनां तत्त्वविदां चैव को भेदोऽशुचिभक्षणे ॥**

---

* अगदी हुबेहूब असाच श्लोक भगवद्गीता अ. १८ मध्यें (श्लोक १७) आलेला आहे.

× पंचदशी प्रकरण १४ मध्यें अशाच अर्थाचा श्लोक (१७) आलेला आहे. व कौषीतकी श्रुतिमध्येंहि असेंच वर्णन करण्यांत आलेलें आहे.

'तत्त्ववेत्ता ( जीवन्मुक्त ) जर यथेष्टाचरण करील तर तो व कुत्रा यांच्यांत फरक तो काय ? कारण दोघेहि मनशोक्त आचरण करणारे ठरतील !'

या वरील वचनावरून यथेष्टाचरण करणारा मनुष्य तत्त्ववेत्ता किंवा जीवन्मुक्त आहे असें म्हणतां येत नाहीं. सामान्य मनुष्याच्या हातून स्वार्थाच्या लोभानें व तात्पुरत्या सुखाच्या लालसेनें गैरवर्तन होत असतें; परंतु ज्याचा स्वार्थ, लोभ वगैरे दोष पूर्ण लयास जाऊन सर्व जगांतील सुखांचा उगम ज्याच्यापासून होतो, अशा आत्मसुखांत सतत निमग्न झाल्यामुळें जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं क्षुद्र वैषयिक सुखाची लालसा उत्पन्न होत नाहीं व त्याला विषयोपभोग मनापासून आवडतहि नाहींत म्हणून त्याचे हातून कोणतेंहि दुर्वर्तन कधींहि घडणें शक्य नाहीं. याच कारणास्तव वसिष्ठ सांगतात कीं,

कर्मणः सुकृतादन्यदस्मै किंचिन्न रोचते ॥
स्वभाव एव महतां ननु यन्न विचेष्टितम् ॥ नि. उ. १०२-११२
अतश्चायैव विषयाः स्वदंतु नतु तद्विदः ॥
न हि पीतामृतायांतः स्वदते कटु कांजिकम् ॥ नि. उ. ४५-५६

'पुण्यकर्माहून त्याला ( जीवन्मुक्ताला ) दुसरें कांहीं आवडत नाहीं, कारण शास्त्रविरुद्ध आचरण न करणें हा महात्म्यांचा स्वभावच आहे. अज्ञानी पुरुषालाच विषय आवडतात, ज्ञानी पुरुषाला आवडत नाहींत. ज्यानें अमृत प्राशन केलें आहे, त्याला कडू कांजी आवडत नसते."
अशाच तऱ्हेचा उल्लेख श्रीमद्भागवतांतहि पुढील श्लोकांत आढळतोः—

दोषबुध्द्योभयातीतो निषेधान्न निवर्तते ॥
गुणबुध्द्या च विहितं न करोति यथार्भकः ॥

( भाग. ११-७-११ )

"आ त्मज्ञान झालेला पुरुष, सुख दुःख किंवा बरें वाईट हा भेदभाव जाण त नसल्यामुळें पाहिजे तें आचरण करतो असें मात्र समजूं नये. ज्ञान

होण्यापूर्वी त्याच्यावर जो संस्कार झालेला असतो; त्या संस्कारानें तो निषिद्ध कर्मापासून निवृत्त होतोच, पण ती निवृत्ति मात्र दोषबुद्धीनें नव्हे. तसेंच तो विहित कर्माचें आचरण करतो पण गुणबुद्धीनें नव्हे; तर त्याचें आचरण बालकाप्रमाणें केवळ स्वेच्छेनें होत असतें. ”

सारांश, जीवन्मुक्त शास्त्रविरुद्ध कर्मापासून निवृत्त झालेला असतो व सतत सदाचारांत निमग्न असतो. असें जरी असलें तरी शास्त्र-दृष्टया तो विधिनिषेधातीत असतो. कारण त्याचें स्वतःचें असें त्याला कांहींहि कर्तव्य उरलेलें नसतें व त्याला या जगांत कर्म करून कांहींहि मिळवावयाचें नसतें, असें वसिष्ठ सांगतातः—

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥** नि. उ. ३७-३६

“ इहलोकीं कर्म केल्यानें किंवा न केल्यानेंहि त्याचा कांहीं फायदा होत नसतो आणि सर्व भूतांचे ठायीं त्याचा ( स्वतःचा म्हणून ) कांहीं अर्थ गुंतून राहिलेला नसतो.” * तसेंच जीवन्मुक्तिविवेकांतहि अशातऱ्हेचें वर्णन खालील श्लोकांत केलेलें आहे:

**ज्ञानामृतेन तृप्तस्य कृतकृत्यस्य योगिनः ॥**
**न चास्ति किंचित्कर्तव्यमस्ति चेन्न स तत्त्ववित् ॥**

“ ज्ञानामृतानें तृप्त होऊन कृतकृत्य झालेल्या योग्याला (त्याचें स्वतःचें) शास्त्रीयदृष्टया कांहीं कर्तव्य उरलेलें नसतें व तसें असलें तर तो तत्त्वज्ञानी आहे, असें म्हणतां येत नाहीं. ”

या वरील सर्व वर्णनावरून जीवन्मुक्ताला स्वतःचें असें कांहीं कर्तव्य उरलेलें नसतें ही गोष्ट अगदीं स्पष्ट होत आहे.

## ज्ञानी मनुष्याला कर्मत्याग शक्य आहे कां ?

मनुष्य ज्ञानी असो कीं, अज्ञानी असो, जोंपर्यंत देह आहे तोंपर्यंत

* अशाच तऱ्हेचें वर्णन भगवद्गीता अ. ३ श्लोक १७ व १८ या श्लोकां-तून आलेलें आहे.

देहासंबंधींचा व्यवहार सतत चालावयाचाच. मग तो सक्तीनें होवो किंवा असक्तीनें होवो. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

त्यागोहि कर्मणां तस्मादादेहं नोपपद्यते ॥ नि. उ. २-४२

" म्हणून देह जिवंत असेंपर्यंत कर्मांचा त्याग होत नाहीं. " भगवद्गीतेंतहि,

'नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ॥ ( १८-११ )

ह्या श्लोकांत हेंच तत्त्व सांगितलें आहे. अर्थात् स्वस्थ बसल्यानें किंवा संन्यास घेतल्यानेंहि सर्व कर्मांचा त्याग होऊं शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर देहाच्या त्यागानेंहि कर्मांचा कायमचा त्याग होऊं शकत नाहीं, कारण एक देह नाहींसा झाला तरी अज्ञान असेंपर्यंत दुसरा देह प्राप्त होतोच व नव्या देहांत लागलीच कर्म सुरू होतें.

नि. प्र. उ. सर्ग २ मध्यें देह हा कर्मवृक्ष आहे, असें वसिष्ठांनीं रूपक केलें आहे, त्याचें बीज प्राक्तनकर्म आहे व हें असेंपर्यंत देह वृक्ष कायमचा नाहींसा होत नाहीं. या वृक्षाचें मूळ कर्मेंद्रियें, त्याचें मूळ ज्ञानेंद्रियें, त्याचें मूळ मन, त्याचें मूळ जीव आहे. चिदाभासरूपानें विषयोन्मुख झालेली व तेज-आप-अन्नरूप कार्यांत प्रविष्ट झालेली जी चित् तेंच त्या जीवाचें रूप आहे. त्यांतील विषयांशाचें अविद्येनें शबल झालेली चित् हें मूळ आहे. चिदाभासांशाचें बीजभूत ब्रह्म चैतन्य हें मूळ आहे. पण नामरूपरहित, अनंत, शुद्ध असलेल्या ब्रह्माचें मूळ कांहीं एक नाहीं. याप्रमाणें विषयोन्मुख चैतन्य अहंकारादिकांशीं तादात्म्य पावून मी कर्तृस्वरूप जीव आहे असें समजतें. सारांश, जीवाचें 'मी कर्ता आहे' असें समजणें हेंच कर्माचें आद्य बीज आहे; आणि हें बीज असेंपर्यंत म्हणजे कर्तृत्वाभिमान असेंपर्यंत कर्मांचा त्याग संभवत नाहीं. स्वस्थ बसणें किंवा देहाचा त्याग करणें या उपायांनीं कर्मत्याग होऊं शकत नाहीं. तर प्रारब्ध कर्माच्या योगानें प्राप्त झालेला व्यवहार करीत असतांनाहि 'मी असंग, अद्वितीय व कुटस्थचिन्मात्र आहे, मी कांहीं करीत नाहीं,' अशा निष्क्रिय आत्मभावनेनें जो रहातो, त्यालाच

कर्मत्याग करितां येतो. याचा अर्थ तो आपल्या शरीरानें मुळींच कर्म करीत नाहीं, असा नसून तें कर्म जरी होत असलें तरी 'कर्मण्य कर्म यः पश्येत्' 'कर्माच्या ठिकाणीं अकर्म पहातो' या गीतेंत सांगितल्याप्रमाणें त्या कर्माच्या ठिकाणीं 'मी ह्या कर्माचा कर्ता आहे,' असा तो अभिमान धारण करीत नाहीं. 'असा अभिमान सोडला तरी जोंपर्यंत हें शरीर आहे, तोंपर्यंत तें कर्म करीत रहाणारच; कारण शरीर हें कर्माचें बीज आहे, असें वर सांगितलें आहे. आतां जीवन्मुक्ताच्या शरीरानें जरी कर्में केलीं तरी त्याच्या ठिकाणीं प्रकट झालेल्या ज्ञानाग्नीच्या योगानें त्या सर्व कर्मांचें भस्म होत असतें म्हणून तीं कर्में त्याला बंधनकारक होत नाहींत. म्हणूनच हें शरीर जिवंत असेपर्यंत कर्मत्याग संभवत नाहीं. फार झालें तर जिवंतपणीं मनुष्य दुराग्रहानें फक्त शास्त्रीय कर्मांचाच त्याग करील. त्याला स्वाभाविक इंद्रियांच्या कर्मांचा त्याग करितां येणार नाहीं. हा सिद्धांत ज्ञानेश्वरींतहि* आलेला आहे.

शास्त्रविहित कर्माचें आचरण कर्त्याचे इच्छेवर अवलंबून असतें, म्हणून तो द्वेषानें किंवा त्रासानें त्याचा त्याग करील; परंतु त्यामुळें स्वाभाविक कर्म उत्पन्न करण्याचे इंद्रियादिकांचे धर्म नष्ट होतील काय ? इंद्रियादिकांचे व्यापार जर बंद रहात नाहींत तर मग सोडलें तरी काय ? कर्म हें मायेच्या आधीन असल्यामुळें मायेच्याच संबंधानें निर्माण झालेल्या शरीरांत राहून 'मी कार्य करीन अगर सोडीन' असें समजणें व्यर्थ आहे. आगगाडींत बसलेला मनुष्य जरी स्वस्थ बसून राहिला तरी तो सर्वस्वीं त्या गाडीच्या आधीन असल्यामुळें त्या गाडीच्या फिरण्यामुळें मनुष्य सतत फिरत रहातो. त्याप्रमाणें शरीर धारण करणारा मनुष्य नैष्कर्म्य स्थितीला (जीवन्मुक्त स्थितीला) पोहोंचलेला जरी असला तरी प्रारब्ध कर्म संपेपर्यंत तो शारीरिक कर्में करीत राहणारच. म्हणून तो जोंपर्यंत शरीरांत

* देखें विहित कर्म जेतुलें । तें सगळें जरी वोसंडिलें ।
तरी स्वभाव काय निमाले । इंद्रियांचे ॥
(ज्ञानेश्वरी अ. ३-५४)

रहात आहे, तोंपर्यंत कर्माचा त्याग केव्हांहि घडणार नाहीं. असें असूनहि जो सर्वस्वी कर्माचा त्याग करूं म्हणतो, त्याचा तो रिकामा आग्रह मात्र उरतो. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं देहधारी मनुष्याला कर्मत्याग मुळींच शक्य नाहीं, हा सिद्धांत सरस दृष्टांतांनीं श्रीमद्भगवद्गीतेच्या अ. १८ मध्यें खालील ओंव्यांतून सांगितला आहे:—

मृत्तिकेचा वीटु। घेऊनी काय करील घटु।
केउता तांथु पटु। सांडील तो॥ (२१९)
तैसा शरीराचेनि आभासें। नांदतु जव असें।
तव कर्म त्यागाचें पिसें। काईसें तरी॥ (२२२)

'मातीचा कंटाळा करून घट काय करील? वस्त्राला तंतूचा संबंध कसा तोडतां येईल? त्याप्रमाणें शरीराचे अवस्थेमध्यें जोंपर्यंत मनुष्य नांदत आहे, तोंपर्यंत कर्मत्याग म्हणजे निव्वळ वेडेपणाच होय!'

याप्रमाणें कर्माचा त्याग सर्वथा अशक्य असतांना जो आपल्या कर्तव्य-कर्माचा त्याग करतो, त्यानें वस्तुतः कशाचाहि त्याग केला नाहीं.

सारांश, सर्वस्वीं कर्म सोडणें हें या संसारांत असंभवनीय आहे, मग शास्त्रविरुद्ध आचरण कां करावें? मरेपर्यंत शरीर हालचाल करणारच! तर मग जीवन्मुक्त होण्याच्या पूर्वीपासून चालू असलेल्या शास्त्रविहित कर्मांचेंच आचरण पुढें चालविण्यात कोणते दोष आहेत? सम, स्वच्छ, व निर्विकार बुद्धीनें जें जसें सतत आचरण केलें जातें, तें सर्वदा निर्दोषच होय.

## खरा कर्मत्यागी कोण?

जीवन्मुक्ताचें वर्णन करितांना वसिष्ठांनीं कर्मफलाचा त्याग करणाराला असंसक्त (जीवन्मुक्त) म्हटलें आहे.

नाभिनंदति नैष्कर्म्यं न कर्मस्वनुषज्जते।
सुसमो यः फलत्यागी सोऽसंसक्त इति स्मृतः॥

" जो मनुष्य कधीं कर्मत्यागाची इच्छा करीत नाहीं, आणि कर्म-

फलाच्या आशेनें कर्मामध्यें आसक्त होत नाहीं, तर कर्माची सिद्धि किंवा असिद्ध यासंबंधीं मनानें समता धारण करून कर्मफलाचा त्याग करतो ( अर्थात् तीं ईश्वरार्पण करतो ) तोच असंसक्त ( जीवन्मुक्त ) आहे असें समजलें जातें." अशाच तऱ्हेचें वर्णन भगवद्गीतेंतहि खालील श्लोकांत आलें आहे.

" यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ भ. गी. १८-११

" देहधारी मनुष्याला कर्माचा निःशेष त्याग करणें शक्य नाहीं, म्हणून ज्यानें ( कर्में न सोडतां ) कर्मफलांचा त्याग केला त्यालाच खरा कर्मत्यागी म्हटलें आहे.'"

या वरील वचनावरून असें दिसून येतें कीं, जो कर्माचा प्रत्यक्ष त्याग न करितां मनानें सर्व कर्मांच्या फलांचा त्याग करितो तोच खरा कर्मत्यागी होय. याच गोष्टीचा थोडासा जास्त खुलासा असा करितां येईल कीं, सर्व कर्मांचा विस्तार देहच आहे व तोच मूलतः आत्मा व साक्षातः संसार आहे अंतर्मुख होऊन शरीरामध्यें अगदीं आंत " यो बुद्धेः परतस्तु सः ". बुद्धीच्याहि पलीकडे असणारा व " धियो यो नः प्रचोदयात् " या गायत्रीमंत्रात सांगितल्याप्रमाणें 'बुद्धीला प्रेरणा करणारा, स्वयंप्रकाश, कूटस्थ आत्माच मी आहे' असें ज्ञान झालें म्हणजे मनुष्य आत्मतृप्त होतो व त्यामुळें त्याला कर्मफलाची आसक्ति मुळींच रहात नाहीं. म्हणून तो प्रारब्धानुसार कर्म करीत असला तरी फलाची इच्छा धरीत नसल्यामुळें त्याच्या हातून झालेलें कर्म न केल्यासारखेंच होऊन, तो खरा कर्मत्यागी होतो, 'मी देह नव्हे' या अहंभावनेच्या त्यागानें तो शाश्वत संसार शांत होतो व मनुष्य मोक्षपदाला प्राप्त होतो. नुसत्या बाह्य कर्मत्यागानें मोक्ष मिळत नाहीं. आत्मज्ञानानें सर्व द्वैताचा बाध होतो व त्याबरोबरच कर्मांचाहि बाध होतो. अशा तऱ्हेनें झालेलें जें दृश्य जगाचें अत्यंत परिमार्जन तोच जगाचा त्याग व तोच असंग मोक्ष आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याप्रमाणें अहंभावनेच्या त्यागानें देहरूपी कर्मवृक्षाचें मूळ उपटून टाकल्यावर **निर्विकार स्थितींत प्रारब्धानुसार स्वकर्माचें अनुष्ठान करीत राहणें हाच खरा कर्मत्याग होय.** याप्रमाणें जे कर्मत्यागानें

शांत होऊन राहिलेले असतात, त्यांच्या कृतकर्माचें कांहीं फल नाहीं किंवा अकृतकर्मानेंहि कांहीं प्रत्यवाय ( दोष ) नाहीं. जीवन्मुक्ताची निरिच्छ क्रिया फार मोठी असली, तरी तिच्यांतील वासनारूपी बीज दग्ध झालेलें असल्यामुळें ती अक्रियाच आहे. ज्यांतील तंतू जळले आहेत असा वस्त्राचा आभास फार मोठा असला तरी तो कांहीं वस्त्र होऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें आसक्तीशून्य स्थितींत केवळ इंद्रियांच्या योगानें होणारें कर्म अकर्मच होय. असें वसिष्ठांचें म्हणणें आहे.

पश्यन्कर्मण्यकर्मत्वम् ॥ नि. उ. १-२९

अशाच तऱ्हेच्या 'कर्मण्य कर्म यः पश्येत्' या भगवद्गीतेंतील वचनाप्रमाणें ज्ञानी आपल्या हातून होणाऱ्या कर्माचें ठिकाणीं अकर्मच पहातो. सारांश, आत्मज्ञानी पुरुषाच्याच ठिकाणीं खरा कर्मत्याग सिद्ध होतो व तसा सिद्ध झाला असता वासनाशून्य झालेला जीवन्मुक्त गृहांत राहो किंवा अरण्यांत राहो, दोन्ही अवस्थेंत सम असतो.

## संकल्पत्याग हाच मोक्ष.

कल्पनात्याग हेंच परम श्रेय आहे व हा कल्पनात्याग जिवंतपणींच संभवतो. मेल्यावर संभवत नाहीं. जिवंत राहणें हें कल्पनेच्या आधीन नाहीं, तर प्रारब्धाच्या आधीन आहे. त्यामुळें कल्पनात्याग व जीवन यांचा कांहीं संबंध नाहीं. आतां कल्पना कशाला म्हणतात तें वसिष्ठ सांगतात.

अहंभावनमेवाहुः कल्पनं कल्पनाविदः ॥ नि. उ. १-३
इदं वस्त्विति संवेगमाहुः कल्पनमुत्तमाः ॥ नि. उ. १-५

"देहादिकांना मी असें म्हणणें ह्यालाच कल्पनावेत्ते विद्वान् कल्पना असें म्हणतात. हें देहादि सर्व दृश्य सत्य आहे असें मानणें यास कल्पना ( संकल्प ) असें म्हणतात.

स्मरणं विद्धि संकल्पं शिवमस्मरणं विदुः ॥
तच्च प्रागनुभूतं च नानुभूतं च नानुभूतं च भाव्यते ॥ नि.उ.१-६

"पूर्वी अनुभविलेल्या विषयांचें स्मरण करणें व पूर्वी कधींहि न अनुभवलेल्या विषयांचें व भविष्यकालीन विषयांचें अनुसंधान करणें हाच संकल्प आहे; आणि त्यांतील कशाचेंहि स्मरण न करणें हेंच शिव-कल्याण ब्रह्म आहे किंवा

**नभोर्थभावनं तस्य संकल्पत्यागउच्यते ॥** नि. उ. १-४

"सर्व पदार्थ ब्रह्माकारस्वरूप आहेत, असें अनुसंधान करणें त्यालाच संकल्पत्याग असें म्हणतात."

अशा तऱ्हेचा कल्पनात्याग वर सांगितल्याप्रमाणें जिवंतपणींच करितां येणें शक्य आहे. मेल्यावर तो संभवत नाहीं. म्हणून जीवन व कल्पनात्याग यांचा विरोध नाहीं. 'सर्व ब्रह्म आहे', अशा भावनेनें इतर चित्तवृत्तींचा निरोध होतो, त्यामुळें त्या योग्याला दीर्घ आयुष्य प्राप्त होतें. अर्थात् हा कल्पनात्याग जीवनाला क्षीण करणारा नसून उलट त्याची वृद्धि करणारा आहे. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

**संकल्पनं मनोबंधस्तदभावो विमुक्तता ॥** नि. उ. १-२७

'संकल्प करणें' हाच बंध आहे व त्याचा अभाव हीच मोक्ष अवस्था आहे. अशा संकल्पाचा त्याग करणें म्हणजेच योग होय असें वसिष्ठ सांगतातः—

**अवेदनं विदुर्योगं चित्तक्षयमकृत्रिमम् ॥** नि. उ. १-३०

"बाह्य विषयांचें ज्ञान टाकून आत्मस्वरूपाची ओळख करून घेऊन त्यामध्येंच स्थिर होणें ह्यालाच योग म्हणतात. या योगानेंच स्वतःच चित्ताचा क्षय होतो." म्हणून शेवटीं वसिष्ठ असा सिद्धांत करितात कीं,

**अहं ममेति संविदन्नदुःखतो विमुच्यसे ॥**
**असंविदन्विमुच्यसे यदीप्सितं तदाचर ॥** नि. उ. १-३५

"तूं जोंपर्यंत 'हा मी व हें माझें' असें जाणत राहशील, तोंपर्यंत तूं दुःखांतून मुक्त होणार नाहींस. पण जर हे विचार सोडशील, तर तूं मुक्त होशील. यास्तव तुला वाटेल तसें कर."

## जीवन्मुक्तानें प्रारब्ध संपेपर्यंत काय करावें ?

जीवन्मुक्तानें काय करावें ? हा प्रश्नच अप्रयोजक आहे. कारण जीवन्मुक्त हा शास्त्रविधीचा विषयच होऊं शकत नाहीं. जसा प्रारब्धाचा वेग असेल, त्याप्रमाणें त्याचा देवादिसंघात कर्म करीत राहील तो प्रवृत्तिपर अगर निवृत्तिपर असला पाहिजे, असा कांहींच नियम करितां येत नाहीं. जीवन्मुक्त होण्याचे पूर्वी त्याची जशी वृत्ति असते, तशीच ती जीवन्मुक्त स्थितींतहि असते, कारण—

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि** ॥ भ. गी. ३-३३

'ज्ञानी जरी झाला तरी तो आपल्या प्रकृतिप्रमाणेंच (पूर्वीपासून आलेल्या सवयीप्रमाणें) कर्म करीत राहतो.'

ज्ञानी पुरुषाला उद्वेग उत्पन्न करील, असें या जगांत कांहीं नसल्यामुळें त्याला येथें त्याज्यहि कांहीं नाहीं. तसेंच अवश्य अनुष्ठान करण्यासारखेंहि त्याला कांहीं नाहीं; त्यामुळें ग्राह्य असेंहि कांहीं नाहीं. त्याच्या ठिकाणीं कर्में करण्याचा किंवा कर्में सोडण्याचा मुळींच आग्रह नसतो, कारण त्याला कर्में करून कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें असतें असें नाहीं; तसेंच त्याला प्रत्यक्ष कर्माचा त्याग करून कांहीं मिळवावयाचें असतें, असेंहि नाहीं. कर्में हीं प्रारब्धानुसार चाललेलीं आहेत, असें जाणून तो निरंतर आत्मस्वरूपीं रत असतो. हेंच तत्त्व वसिष्ठांनीं पुढील श्लोकार्धांत स्पष्ट केलें आहे.

**तेन स्थितं यथा यद्यत्तत्तथैव करोत्यसौ** ॥ नि. उ. १९९-४

"जें जें वर्णाश्रमाला उचित असें प्राप्त होईल, तें तें तो तसेंच करीत रहातो."

आपला प्राप्त क्रम सोडून जर कर्माचा सर्वस्वीं त्याग होत असेल, तर तसें करणें योग्य होईल. परंतु हें शरीर आजन्म हालचाल करणारच ! तर मग आपला सत्क्रमच पुढें चालविण्यास कोणता दोष आहे. कर्में न करण्याचा तरी आग्रह कशाला ? अशाच तऱ्हेचे खालील उद्गार योगवासिष्ठाच्या उपसंहारांत कारुण्याच्या मुखांतून निघालेले आहेतः—

मम नास्ति कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ॥
यथाप्राप्तेन तिष्ठामि ह्यकर्मणि क आग्रहः ॥ नि. उ. २१६-१८

' " मला कोणतीहि गोष्ट केली काय आणि न केली काय सारखीच, तर कर्म न करण्याचा तरी आग्रह कशाला ? जें जें शास्त्रतः प्राप्त होईल तें तें यथाविधि करीत राहीन. "

जीवन्मुक्ताला आत्मलाभ झाल्यामुळें जगांतील सर्व कांहीं प्राप्त झाल्यासारखेंच असतें; कारण तत्त्वतः आत्माच सर्व आहे. म्हणून आतां त्याला कर्म करून कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें आहे, असें नाहीं. तसेंच प्रत्यक्ष कर्मांचा त्याग करून कांहीं मिळवावयाचें असतें, असेंहि नाहीं. कर्मेंहि प्रारब्धानुसार चाललीं आहेतच, असें जाणून तो निरंतर आत्मस्वरूपामध्यें रममाण होतो. ज्ञानी पुरुषाचें चित्त निर्वासन झालेलें असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कोणत्याहि इच्छा उत्पन्न होत नाहींत; व यदाकदाचित् ठिकाणी इच्छा उत्पन्न झाल्याच, तर त्या सर्व पूर्वसंस्कारामुळें त्याच्या ठिकाणी इच्छा उत्पन्न झाल्याच, तर त्या सर्व आत्मरूप आहेत असें तो समजत असतो. त्यामुळें त्या सर्व इच्छा नष्टप्राय होऊन जातात. अशा तऱ्हेनें तो निरिच्छ झाल्यामुळें त्याला अमुक करावें किंवा अमूक करूं नयें असें वाटत नाहीं. म्हणूनच ' तस्य कार्यं न विद्यते' भ. गी. ३-१७ त्याला स्वतःच्या दृष्टीनें कांहीं कार्य राहिलेलें नसतें. तरी पण त्याला प्रारब्धानें जें कांहीं करावें लागेल, तें तो करीत असतो. परंतु त्या कार्यापासून तो आपल्याला इतका अलिप्त ठेवीत असतो कीं, वाटेल तेव्हां तो त्याचा परित्याग करण्यास तयार होतो. अशा तऱ्हेचें वर्णन खालील श्लोकामध्यें आलेलें आहे.

हेयोपादेयदृष्टी द्वे यस्य क्षीणे हि तस्य वै ॥
क्रियात्यागेन कोऽर्थः स्यात्क्रियासंश्रयणेन वा ॥ नि.उ. १९९-२
न, तदस्ति हि यत्याज्यं ज्ञस्योद्वेगकरं भवेत् ॥
न चास्ति यदुपादेयं तज्ज्ञसंश्रेयतां गतम् ॥ नि. उ. १९९-३
ज्ञस्य नार्थः कर्मत्यागैर्नार्थः कर्मसमाश्रयैः ॥
तेन स्थितं यथा यद्यत्तत्तथैव करोत्यसौ ॥ नि. उ. १९९-४

नादानं न परित्यागः कर्मणो ज्ञाय रोचते ॥
तिष्ठंत्यवगतात्मानो यथाप्राप्तानुवर्तिनः ॥ ५-७०-१८.
राजन्यावदयं देहस्तावन्मुक्तधियामपि ॥
यथाप्राप्तक्रियात्यागो रोचते न स्वभावतः ॥ ५-२६-१६

यांचा भावार्थः—" ज्याची त्याज्य व ग्राह्य बुद्धि क्षीण झाली आहे, त्याला कर्मत्यागानें किंवा कर्माचरणानें तरी काय मिळणार आहे ? ज्ञानी पुरुषाला जें उद्वेग उत्पन्न करील असें कांहीं त्याज्यहि नाहीं. त्याला जें आनंद देईल असें कांहीं ग्राह्यहि नाहीं. त्याला प्रारब्धानें जें जें प्राप्त होतें तें तें तो तसेंच करीत रहातो. ज्ञानी मनुष्याला कर्माचें ग्रहण किंवा त्याग यांपैकीं कांहींच आवडत नसतें व अशी स्थिति असल्यामुळें तो प्रारब्धानुसार कर्म करीत रहातो. जोंपर्यंत हा देह आहे तोंपर्यंत जीवन्मुक्त पुरुषांनाहि आपल्या यथाप्राप्त क्रियांचा त्याग करणें स्वभावतःच आवडत नाहीं." भगवद्गीता अ. ३, श्लोक १७ ते १९ श्लोक वरील वासिष्ठांतील श्लोकांतील अर्थासारखेच आहेत.

सारांश, जीवन्मुक्ताच्या कर्मासंबंधानें कोणताहि नियम घालून देतां येत नाहीं, तर तो प्रारब्धानुसार जसें प्राप्त होईल तसेंच करीत रहातो, त्यापेक्षां अधिक इच्छा करून तरी त्याला काय करावयाचें आहे ? श्रीशंकर पार्वतीला वामांकावर धारण करितो म्हणून तो अत्यंत विषयासक्त असल्यासारखा दिसतो. पण मदनाला दग्ध करण्याचे वेळीं त्याची विरक्ति स्पष्ट अनुभवास आली आहे. अर्थात् त्यानें सहज स्थितींत तसें कांहीं केलें, तरी त्यांत दोष कांहीं नाहीं व न केलें तरी लाभहि नाहीं. श्रीभगवान् विष्णु निरनिराळे अवतार घेऊन सर्व तऱ्हेची कर्मे करितो, तथापि आपली स्वरूपभूत स्थिति सोडीत नाहीं. वास्तव येथें जें जसें प्राप्त होईल तें तसें असो, असें म्हणून सर्व वासना सोडून हरि शुद्ध चिन्मात्ररूप धारण करून निरिच्छ असतो. सूर्य, चंद्र, अग्नि, यम वगैरे अधिकारी जीवन्मुक्त, जीवहि निरिच्छ असतांनाच प्राणिकर्मानुसार आपापल्या अधिकारांचें परिपालन करीत असतात. शुक्र व बृहस्पति हे दोघेहि अनुक्रमें दैत्य व देव यांचे गुरु जीवन्मुक्त होते. तथापि प्रारब्धानुसार परस्पर विजयेच्छेनें व्यवहारांत

कृपणाप्रमाणें राहिले. याशिवाय शेंकडों यक्ष, असुर, देव आणि मानव संसारांत वागत असतांहि मुक्त झालेले आहेत. कित्येक ज्ञानी पुरुष सुख-दुःखानें भरलेल्या या संसारांतील अनेकविध व्यवहारांत गर्क झालेले असून अंतर्यामीं परम समाधान पावलेले असतात. तर कित्येक ज्ञानी पाषाणाप्रमाणें जडमूढ स्थितीमध्यें रहात असतात. उदाहरणार्थ, भृगु, भरद्वाज, विश्वामित्र, शुक, जडभरत इत्यादि ज्ञानी महर्षि सर्व संसाराचा त्याग करून अरण्यांत जाऊन जीवन्मुक्तिसुखाचा उपभोग घेत राहिले, तर जनक, नल, मांधाता, सगर, भगीरथ व शिखिध्वज इत्यादि जीवन्मुक्त आंत अनासक्त असून बाहेर आसक्त असल्याप्रमाणेंच दीर्घकाल राज्य करीत राहिले. तसेंच बलि, प्रऱ्हाद, नमुचि, वृत्रासुर इत्यादि असुरयोनींतील जीवन्मुक्त अनुरक्त असल्याप्रमाणें व्यवहारांत वागले.

सारांश, जीवन्मुक्त आयुष्य संपेपर्यंत परमेश्वरी संकेताप्रमाणें व प्रारब्धानुसार निरनिराळे व्यवहार करीत रहातात. कांहीं जीवन्मुक्त वर्णाश्रमधर्माप्रमाणें स्वकर्माचें आचरण यथाविधि करीत रहातात, तर कांहीं सर्वसंगपरित्याग करून अरण्यांत जाऊन ध्यानपरायण होऊन रहातात. कांहीं सिद्ध पुरुष तर काशी, प्रयाग, बदरीआश्रम, महेंद्र, सह्याद्रि, कैलास पर्वतावर तपश्चर्या करीत रहातात. ज्याप्रमाणें आकाशादि महाभूतांना अरण्य आणि गृह हीं दोन्हीं सारखींच असतात, त्याप्रमाणें आत्मज्ञानामुळें ज्याच्या ठिकाणीं समत्वबुद्धि बाणली आहे, अशा ज्ञान्याच्या दृष्टीनें अरण्य आणि गृह हीं दोन्हीं सारखींच असतात. म्हणून जीवन्मुक्त कोठेंहि राहिला तरी सारखाच. अशा अर्थाचें वर्णन उपशम प्रकरणांत खालील श्लोकांत आलेलें आहेः—

व्यवहारी प्रबुद्धो यः प्रबुद्धो यो वने स्थितः ॥
द्वावेतौ सुसमौ नूनमसंदेहपदं गतौ ॥ ५-५६-१२

" जो मनुष्य व्यवहार करीत असूनहि प्रबुद्ध असेल, तसेंच जो मनुष्य ज्ञानी असूनहि अरण्यांत असेल, असे दोघेहि सर्व संशयांचा ज्या ठिकाणीं उच्छेद होतो, अशा परमपदीं स्थित झाल्यामुळें निःसंशय सारख्याच योग्यतेचे आहेत "

सारांश, आपापल्या प्रारब्धानुसार जीवन्मुक्त निरनिराळ्या तऱ्हेचे व्यवहार करीत असतात. या सर्व गोष्टीवरून असें दिसून येतें कीं, जीवन्मुक्त कर्मयोगीच असला पाहिजे, किंवा संन्याशीच असला पाहिजे किंवा तो तपस्वीच असला पाहिजे, अशा तऱ्हेचा दुराग्रह धरणें म्हणजे जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं ज्ञानानें प्राप्त झालेल्या परब्रह्माच्या स्वरूपभूत स्वातंत्र्यावर आघात करण्याचा हास्यास्पद प्रयत्न करण्यासारखेंच होय !

## जीवन्मुक्ताचा लोकसंग्रह.

जीवन्मुक्ताला जर कोणतीच इच्छा नसते, तर तो विदेहमुक्त होईपर्यंत आपलें आयुष्य कसें काढतो ? हा एक मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. त्याला या जगांत कांहीं कर्तव्य उरलें आहे कां ? स्वतःचें असें कांहीं नसलें तरी त्याला जगाच्याकरितां कांहीं करावयास पाहिजे कां ! असा एक मोठा महत्त्वाचा प्रश्न आहे. बौद्धांच्या मतें असें आहे कीं, जे ज्ञानमार्गांत पडले आहेत, त्याना मदत करून त्यांचा उद्धार करणें हें ज्ञानी पुरुषाचें कर्तव्य आहे. आपल्या भारतकालीन अध्यात्मशास्त्रापैकीं वासिष्ठ व भगवद्गीता स्वतःकरितां नसलें तरी पुरुषानें लोकसंग्रहाकरितां कर्म करावें असें कंठरवानें सांगत आहेत.

मुमुक्षुव्यवहार प्रकरण सर्ग १० मध्यें 'मला जरी कांहीं कर्तव्य नसलें तरी मी लोककल्याणाकरितां या पृथ्वीवर संचार करीत आहे' असें वसिष्ठांनीं पुढील श्लोकांत सांगितलें आहेः—

> कर्तव्यमस्ति नममेह किंचिदेव
> स्थातव्यमित्यतिमना भुवि संस्थितोऽस्मि ॥ मु. व्य. १०-४४

'मला या जगांत कोणत्याच तऱ्हेचें कर्तव्य नाहीं, तरीहि मी उन्मन स्थितीमध्यें या भूतलावर संचार करीत आहे.' इतकेंच नव्हे तर जोंपर्यंत जगांतील प्राणिमात्रांची परंपरा कायम आहे तोंपर्यंत मी लोकांना उपदेश करीत या भूतलावर राहीन, असेंहि वसिष्ठांनीं सांगितलें आहे.

भगवान् श्रीकृष्णाला कोणत्याहि तऱ्हेचें कर्तव्यकर्म नसतांना देखील 'मी कर्म करीत आहे,' हा आपल्या स्वतःच्या उदाहरणानें ज्ञानी

पुरुषाला ज्ञानोत्तर जरी काहीं त्याचें स्वतःचें कर्तव्य उरलेलें नसलें तरीहि त्यानें स्वस्थ बसण्यापेक्षां सर्व कर्मे निष्कामबुद्धीनें अवश्य करावीं, असें भगवान् श्रीकृष्णानें भगवद्गीता अ. ३ श्लोक २२ मध्यें नमूद केलें आहे.

**न मे पार्थाऽस्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥**

" हे पार्था ! त्रिभुवनांत मला माझें कांहींहि कर्तव्य उरलेलें नाहीं, किंवा अप्राप्त अशी एखादी वस्तु मिळवावयाची राहिलेली नाहीं; तथापि मीं कर्मेंच करीत आहे."

परंतु भगवंतानें हें वरील म्हणणें जीवन्मुक्तासंबंधीं नसून स्वतःविषयीं म्हणजे परमेश्वराविषयीं आहे, म्हणूनच हें म्हणणें जीवन्मुक्ताला लागू करतां येत नाहीं, असें कोणी म्हणेल तर तें बरोबर ठरणार नाहीं. कारण 'ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तर लोकसंग्रहाकरतां अभिमान सोडून निष्कामपणानें कर्मे करावीत,' अशी आपली इच्छा भगवंतानें खालील श्लोकांत प्रकट केली आहेः—

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत ॥**
**कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥** भ. गी. ३-२५

कर्मफलाची इच्छा धरून ज्याप्रमाणें अज्ञानी लोक कर्म करीत असतात, त्याचप्रमाणें लोकसंग्रह करण्याच्या उद्देशानें ज्ञानी पुरुषानें फलाविषयीं आसक्ति न करितां कर्म करीत असावें." आतां वसिष्ठांचें या बाबतींत काय मत आहे, त्याचा विचार करूं. वसिष्ठ जीवन्मुक्ताला–तो पुरुष असो अगर स्त्री असो–प्रपंच सोडून संन्यास घेण्याविषयीं मुळींच सांगत नाहींत व तसें त्यांचें मतहि नाहीं. वासिष्ठांतील जनक, भगीरथ, प्रऱ्हाद आणि शिखिध्वज यांच्या आख्यानांतून ह्याच बोध निघतो कीं, ज्ञान झाल्यानंतर विदेहस्थितीला प्राप्त होईपर्यंत ह्या सर्व पुरुषांनीं प्रपंचांत राहून राज्यासारखीं मोठमोठीं कार्ये करून दाखविलीं. इतकेंच नव्हे तर उपदेश करणारे वसिष्ठ यांनीं देखील प्रपंच सोडला नव्हता व श्रीराम-

चंद्रानेंहि ज्ञानोत्तरच सर्व आयुष्यांतील मोठमोठीं रावणवधासारखीं कार्यें केलीं.

श्रीमत् शंकराचार्यांनींहि आपल्या भाष्यांत खालील वचनांतून हीच गोष्ट अगदीं स्पष्ट शब्दांत मांडली आहे.

( १ ) यदि पुनरहमिव त्वं कृतार्थबुद्धिः आत्मविदन्योवा तस्यापि आत्मनः कर्तव्याभावेऽपि परानुग्रह एव कर्तव्यः ।
( गीता भा. अ. ३-२५ )

'जरी तूं माझ्याप्रमाणें कृतार्थ असलास किंवा दुसरा कोणी असलास तरी त्याला स्वतःकरितां जरी कांहीं एक कर्तव्य नसलें तरी दुसऱ्यावर अनुग्रह हा त्यानें केलाच पाहिजे.'

( २ ) एवं लोकसंग्रहं चिकीर्षोर्न ममात्मविदः कर्तव्यमस्त्यन्यस्य वा लोकसंग्रहं मुक्त्वा ॥ ( गी भा अ. ३-२६ )

'याप्रमाणें लोकसंग्रह करण्याची इच्छा धरणाऱ्या मज आत्मज्ञानी पुरुषाला अथवा मजसारख्या दुसऱ्या कोणाला लोकसंग्रहाशिवाय दुसरें कोणतेंहि कर्तव्य उरलेलें नाहीं.'

( ३ ) यदि अनात्मज्ञस्त्वं तदा आत्मशुध्यर्थं तत्त्वविच्चेल्लोकसंग्रहार्थं कर्मैव कुरु ॥ ( गी. भा. अ. ४-१५ )

'जर आत्मज्ञानी नसशील तर चित्तशुद्धि होण्याकरितां कर्म कर आणि जर तत्त्वज्ञानी असशील तर लोकसंग्रहाकरितां तूं कर्म कर.'

( ४ ) एवंभूतेन विदुषा प्रयोजनाभावात्ससाधनं कर्म परित्यक्तव्यमेवेति प्राप्ते ततो निगमासंभवाल्लोकसंग्रहचिकीर्षया शिष्टविगर्हणापरिजिहीर्षया वा पूर्ववत्कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि निष्क्रियात्मदर्शनसंपन्नत्वान्नैव किंचित्करोति सः । ( गी.भा.अ.४-२० )

अशा प्रकारचा जो ज्ञानवान् पुरुष त्याला स्वतःला कर्मांची कांहीं जरूरी राहत नसल्यामुळें साधनासहवर्तमान कर्मांचा त्याग करणेंच जरी

प्राप्त झालें असलें, तरी (आपल्या वर्तनामुळें) लोकांची प्रवृत्ति उन्मार्गा-कडे होऊं नये, म्हणून किंवा आपण कर्मत्याग केला असतां शिष्ट लोक निंदा करतील ती होऊं नये, म्हणून जरी लोकदृष्टीनें पूर्वीप्रमाणें (अज्ञान अवस्थेंत असल्याप्रमाणें) कर्माचें ठिकाणीं प्रवृत्त झालेला असला तरी आत्मा निष्क्रिय आहे असें ज्ञान त्याला पूर्ण झालें असल्यामुळें तो स्वतः-च्या दृष्टीनें कांहींच करीत नाहीं.'

(५) स सम्यग्दर्शी लोकसंग्रहाय कर्म कुर्वन्नपि न लिप्यते
न कर्मभिर्वध्यते। (गी. भा. अ. ५-७)

'तो तत्त्वदर्शी लोकसंग्रहाकरितां कर्मानुष्ठान करीत असला तरी तो त्या कर्मांच्या योगानें बद्ध होत नाहीं.'

श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं खालील ओव्यांत हेंच लोकसंग्रहाचें तत्त्व अगदीं स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे.

देखें प्राप्तार्थ जाहले। जे निष्कामता पावले।
तयाहि कर्तव्य असें उरलें। लोकांलागीं ॥ १५५ ॥
हें ऐसें स्वभावें। म्हणूनि कर्म न संडावें।
विशेषें आचरावें। लागे संतीं ॥ १५९ ॥ (अ. ३)

या वरील ओव्यांवरून साधुसंतांनीं कर्मांचा त्याग न करितां त्यांचें आचरण मुख्यत्वेंकरून लोकसंग्रहाकरितां केलें पाहिजे असें श्रीज्ञानेश्वर महाराजांचें ठाम मत आहे हें सिद्ध होतें. श्रीमत् शंकराचार्यांना उत्तम सहजा पूजेचा* अधिकार प्राप्त झाला होता व त्यामुळें ते मूर्तिपूजा कमी दर्जाची मानीत होते, तरी ते सामान्य जनतेचा बुद्धिभेद होऊं नये म्हणून लोकसंग्रहाकरितां आपल्या मठांत बाह्यतः नित्य शारदेची पूजा करीत असत व ती पूर्वपरंपरा अद्याप हल्लींच्या आचा-

* सहजा पूजा म्हणजे निर्गुण ब्रह्माची पूजा म्हणजेच आत्मदेवाची पूजा होय, "खरा देव कोण व खरी पूजा कोणती" या पुढील ४७ व्या प्रकरणांत या पूजेसंबंधीं वर्णन आलेलें आहे.

यांच्या मठांतून चालू आहे. लोकसंग्रहाचें कार्य करण्यास अमूक एक आश्रमच आवश्यक आहे असें म्हणतां येत नाहीं; कारण, हें कार्य सर्व आश्रमांतून करितां येण्यासारखें आहे. श्रीसमर्थांनीं व श्रीज्ञानेश्वरांनीं विवाह न करितां लोकसंग्रह केला. श्रीमत् शंकराचार्यांनीं संन्यासाश्रम घेऊन लोकसंग्रह केला. श्रीमत् शुकाचार्यांनीं सर्वसंग परित्याग करूनहि परिक्षितीला श्रीमद्भागवताचा उपदेश करून लोकसंग्रहच केला. जनक, अश्वपति वगैरे पूर्वीच्या व श्री एकनाथमहाराज व श्री तुकाराममहाराज वगैरे अलीकडील साधुसंतांनीं गृहस्थाश्रमांत राहून लोकसंग्रह केला. यावरून असें स्पष्ट होतें कीं, वाटेल त्या वर्णांत जन्म पावून कोणत्याहि आश्रमांत ज्ञानी पुरुषाला लोकसंग्रहाचें कार्य करितां येतें. त्याकरितां ब्राह्मण वर्णच व गृहस्थाश्रमच पाहिजे असें म्हणतां येत नाहीं, तर उलट ब्रह्मचर्य व संन्यास हे आश्रमच लोकसंग्रह करण्यास फार सोईचे आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं; कारण ह्या आश्रमांत मनुष्यावर स्वतःच्या प्रपंचाची कोणतीच जबाबदारी नसते. या आश्रमांत राहून आत्मज्ञानानें सिद्ध झालेल्या पुरुषाची बुद्धि इतकी निःसंग व पवित्र झालेली असते कीं, निसर्गतःच विषयास लुब्ध होणाऱ्या दुर्धर मनोवृत्तींना आपल्या ताब्यांत आणण्याचें पराकाष्ठेचें मानवी सामर्थ्य तो लोकांच्या प्रत्यक्ष नजरेस आणून देतो. ही कामगिरी लोकसंग्रहदृष्ट्या कांहीं लहान सहान नव्हे, ही गोष्ट लोकमान्य टिळकांनींहि आपल्या गीतारहस्यांत कबूल केली आहे ( पृ. ४६५ ). सृष्टीच्या प्रारंभापासून आजपर्यंत होऊन गेलेल्या सनत्कुमार, शुक, याज्ञवल्क्य वगैरे पूर्वीच्या व श्रीमत् शंकराचार्य, श्रीसमर्थ रामदास, श्रीतुकाराममहाराज वगैरे आधुनिक सिद्ध पुरुषांच्या गोष्टी ऐकल्या कीं, आपणहि त्यांच्यासारखे नाहीं, तरी निदान अंशतः तरी मनोनिग्रही व विरक्त व्हावें, असें वाटल्यावांचून निःसंशय रहात नाहीं. सारांश, लोकसंग्रहाच्या कार्याची जबाबदारी सर्व थोर ज्ञानी पुरुषावर आहेच, पण जे गृहस्थाश्रमांत राहिलेले ज्ञानी जीवन्मुक्त आहेत, त्यांच्यावर ती विशेषतः आहे. कारण त्यांचा इतर सामान्य अज्ञ जनांशीं सतत निकट संबंध येत असतो. त्यामुळें त्यांना आपलें स्वतःचें आचरण अत्यंत शुद्ध व शास्त्रविधीला धरून ठेवावें लागतें. कारण तसें जर ते करणार नाहींत व उलट स्वैर आचरण

कदाचित् करूं लागतील तर सामान्य अज्ञ जन त्यांचें उदाहरण गिरवून सन्मार्गापासून च्युत होतील व सर्व जनतेच्या अनाचाराचें खापर याच मोठ्या ज्ञानी म्हणून मिरविणाऱ्या पुरुषांच्या डोक्यावर फुटल्याशिवाय राहणार नाहीं. ही गोष्ट भगवंतानें:—

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ॥
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ (भ. गी. ३-२१)

या श्लोकांत स्पष्ट सांगितली आहे. सारांश, साधुसंतांना स्वतःकरितां जरी कांहीं कराची जरुरी नसली, तरी लोकांनीं असन्मार्गाला लागूं नये म्हणून त्यांनीं सर्व कर्मांचें आचरण यथाशास्त्र करीत राहणें हाच त्यांचा जीवन्मुक्त-दशेंतील अध्यात्मशास्त्रदृष्ट्या लोकसंग्रह होय.

## लोकसंग्रह करीत असतां ज्ञानी पुरुषानें कसें वागावें ?

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ (भ. गी. ३-२६)

ज्ञानी पुरुषानें अज्ञ मूढ जनांच्या मुरलीत चाललेल्या कर्मांच्या आचरणामध्यें व्यत्यय येईल असा त्यांना उपदेश करूं नये, पण उलट लोकांना शहाणे व सदाचरणी करण्यासाठीं आपण स्वतः संसारांत राहून लोकांना निष्काम कर्मांचा म्हणजे सदाचरणाचा प्रत्यक्ष धडा घालून देऊन त्यांच्याकडून त्याप्रमाणें आचरण करवून घेणें ही त्याची जगांतील फार मोठी कामगिरी आहे. अशी इच्छा भगवंतानें वरील श्लोकांत प्रदर्शित केली आहे. त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरींतहि खालील ओवींत हीच गोष्ट स्पष्ट सांगितली आहे.

मार्गीं अंधासरिसा । पुढें देखणाहि चाले जैसा ।
अज्ञाना प्रकटवा धर्मु जैसा । आचरोनि ॥ अ. ३-१५६

अंधळ्याच्या माळेंतील पुढारी डोळस मनुष्य जसा त्यांच्याप्रमाणेंच हळूहळू मार्ग चालतो, त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषानें आपण स्वतः धर्माचें यथा-शास्त्र आचरण करून अडाणी लोकांना तसें धर्माचरण करावयास लावावें.

कारण ह्या लोकीं मोठे लोक जसें वागतात, त्याला धर्म असें समजून इतर लोक वागतात. सामान्य लोकांनीं असन्मार्गाला लागूं नये, म्हणून जीवन्मुक्तानें स्वतः विधिनिषेधातीत असूनहि विधिनिषेध पाळीत असावें; व त्यानें असें केलें तरी त्याला स्वतःला कर्तेपणाचा अभिमान नसल्यामुळें सर्व कर्मांचें आचरण यथाविधि करीत असूनहि त्यानें तो मुळींच लिप्त होत नाहीं. ज्ञानी पुरुषानें व्यवहारकालीं आंतून ब्रह्माप्रमाणें अद्वैतपर रहावें व बाहेरून द्वैतपर रहावें; कारण व्यवहारांत जर तो अद्वैतपर राहूं लागला तर जगाची व्यवस्था व धर्मशास्त्रादि आचारशास्त्रें यांना बाध येईल. सारांश, जीवन्मुक्तदशेंत ब्रह्माप्रमाणेंच द्वैताद्वैतमय राहणेंच श्रेयस्कर; एकाद्या नटाप्रमाणें बाहेरून आपणांस कामी, क्रोधी असें दाखवावें, परंतु आंत मीच परमात्मा आहे, अशा अनुसंधानानें कामक्रोधादि विकारांचा स्पर्शहि होऊं देऊं नये. अंतःकरणांतील सर्व आशापाश तोडून टाकावे आणि सर्व वृत्तींमध्यें समत्व राखून आपल्या धर्माला, वर्णाश्रमाला व स्वभावाला उचित अशीं कार्यें करीत रहावें.

## उपसंहार.

असें जरी असलें तरी ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तर कर्में केलींच पाहिजेत, असा त्याला आग्रह धरणें शास्त्रीयदृष्ट्या योग्य ठरणार नाहीं. कर्में करावयाचीं असतील तर ज्ञानी चांगलींच कर्में करीत राहील, कारण ज्ञानानें बुद्धि सम झाल्यावर त्याचे हातून कोणतेंच पाप घडणें शक्य नाहीं. परंतु त्यानें तीं केलींच पाहिजेत असें म्हणतां येत नाहीं. कारण तो विधिनिषेधाच्या अतीत गेलेला असतो. कर्मांचे कायदे ज्ञानी पुरुषाला मुळींच बंधनकारक नाहींत. वसिष्ठ कर्मांचे कायदे म्हणजेच शास्त्रांतील विधि व निषेध मानणारे आहेत, पण ते अज्ञ पुरुषांच्या बाबतींत, जीवन्मुक्तांच्या बाबतींत नव्हे. कारण जीवन्मुक्त सुखदुःख समान मानीत असतो; आणि त्यानें ब्रह्मदृष्टीनें सर्व भेद नाहींसे केलेले असतात, व त्याला आत्म्याशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. म्हणून त्याला कोणतें कर्तव्य उरलें आहे? कीं तें त्यानें केलेंच पाहिजे व कोणता शास्त्रविधि त्याच्यापुढें आहे? कीं जो त्यानें मानिलाच पाहिजे. वसिष्ठांच्या मतें मानवानें आत्मज्ञान हें स्वतःच

संपादन केलें पाहिजे आणि ज्ञानोत्तर जर कदाचित् या बाबतींत एकाद्या
पुरुषाला मदत लागली, तर ती ज्ञानी पुरुषानें त्याला देण्याविषयीं मात्र नेहमीं
तत्पर असावें. खुद्द परमेश्वर लोकसंग्रहाकरितां मी कर्म करीत आहे व प्रत्यक्ष वसि-
ष्ठांनीं देखील " जोंपर्यंत प्राणिमात्रांची परंपरा कायम आहे तोंपर्यंत मी या
भूतलावर उपदेश करीत राहीन." असें वर सांगितलें आहे. म्हणूनच
जीवन्मुक्तानेंहि ज्ञानोत्तर जगाच्या कल्याणाकरितां प्रारब्धानुसार जें कर्म
प्राप्त होईल तें यथाशास्त्र करीत रहाणेंच श्रेयस्कर होय.



# प्रकरण ४६ वें.

## समाधि.

अष्टांग योगमार्गाची शेवटची अवस्था म्हणजेच समाधि होय. पतंजलीनें समाधीची व्याख्या खालील सूत्रांत केलेली आहे.

**तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः ॥** पातंजलसूत्र ३-३

' जेव्हां ध्येयाचें बाह्यस्वरूप सोडून मन त्याच्या अंतःस्वरूपांत तदाकार होऊन रहातें तेव्हां त्या स्थितीला समाधि असें म्हणतात. '

पंचदशीमध्यें अशाच अर्थाची समाधीची व्याख्या

**ध्यातृध्याने परित्यज्य क्रमाध्येयैकगोचरम् ॥**
**निवातदीपवच्चित्तं समाधिरभिधीयते ॥** पंचदशी १-५५

या श्लोकांत केलेली आहे. ' ज्या अवस्थेंत त्रिपुटीचें म्हणजे ध्याता, ध्यान व ध्येय या वृत्तींचें भान असतें तें ध्यान होय. जेव्हां ध्याता व ध्यान या वृत्ती नाहींशा होऊन मन केवल ध्येयाच्याच आकाराचें बनून गेलेलें असतें, म्हणजेच 'मी ध्यान करणारा व हें ध्यान' या वृत्तीचें भान मुळींच रहात नसतें, त्या स्थितीला समाधि असें म्हणतात.

### समाधीचे दोन प्रकार.

अशा ह्या समाधीचे दोन प्रकार आहेत. (१) संप्रज्ञात अथवा सविकल्प समाधि व (२) असंप्रज्ञात अथवा निर्विकल्प समाधि.

**सविकल्प समाधिः**—ज्यावेळीं मन एकाच ध्येयावर स्थिर होऊन रहातें व दुसऱ्या कोणत्याहि वस्तूचें चिंतन करीत नाहीं त्या स्थितीला सविकल्प समाधि असें म्हणतात. ही स्थिति म्हणजेच ध्यानाची परिपक्व स्थिति होय. वरील पंचदशींतील व्याख्या सविकल्प समाधीची आहे. ह्या स्थितींत ' मी आहे, ' पण तो ध्येयाकार झालेला आहे, हा सात्विक अहंकार फक्त शिल्लक असतो.

(२) निर्विकल्प समाधिः—पुढें 'मी आहे' हा सात्त्विक अहंकारहि ज्यावेळीं नाहींसा होतो व चित्त पूर्णपणें वृत्तिशून्य होऊन कोणताहि विकल्प त्या ठिकाणीं उत्पन्न होत नाहीं, अशा स्थितीला निर्विकल्प समाधि असें म्हणतात.

या दोन प्रकारच्या समाधींमध्यें सविकल्प समाधि ही मुक्त स्थिति नव्हे, कारण त्या ठिकाणीं अहंकाराची अगदी शेवटची छटा शिल्लक असते. यामुळें तेथपर्यंत पोहोंचलेला योगीहि भ्रष्ट होण्याचा संभव असतो. तेथें त्याला सर्व सिद्धींची प्राप्ति झालेली असते व अहंकारहि बीजरूपानें शिल्लक असतो. त्यामुळें त्याला सुखलालसेच्यामुळें पतन पावण्याची भीति असते. पण निर्विकल्प समाधीला प्राप्त झालेला योगी पूर्णपणें मुक्त झालेला असतो.

## समाधि प्राप्त करून घेण्याचे मार्ग.

ही समाधि प्राप्त करून घेण्याचे दोन मार्ग आहेत. एक योगयोग व दुसरा ज्ञानयोग.

**(१) योगयोग** :—या मार्गांत फिरून दोन प्रकार आहेत, एक **हठयोग** व दुसरा **राजयोग**. हठयोग म्हणजे प्राणायामाच्या सहाय्यानें चित्ताच्या वृत्तींचा निरोध करणें हा होय व राजयोग म्हणजे धारणा, ध्यान व समाधि यांच्या योगानें चित्ताच्या वृत्तींचा निरोध करून प्राणाला विलीन करून टाकणें हा होय.

(२) ज्ञानयोगः—म्हणजे 'आत्मसंस्थं मनःकृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥' भ. गी. ६-२५ हा भगवंतानें गीतेंत सांगितलेला म्हणजे आपण व सर्व जग ब्रह्मरूप आहों असें समजून मन आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर करून कोणताहि विचार मनांत न आणणें हा होय.

ह्या दोन मार्गांपैकीं वसिष्ठांना ज्ञानयोगच मान्य आहे, कारण तो सुखानें साध्य होणारा आहे असें त्यांनीं

**मम त्वभिमतः साधो सुसाध्यो ज्ञाननिश्चयः ॥** नि. पू. १३-८

या श्लोकांत सांगितलें आहे. वसिष्ठांना प्राणायामानें संपादन केलेला

म्हणजे हटयोग्याची समाधि तर मुळींच मान्य नाहीं; कारण अशी समाधि उतरल्यावर त्या योग्याला हा दृश्य प्रपंच जसाच्या तसाच भासत असतो. त्यामुळें जरी समाधि प्राप्त झाली, तरी त्या योग्याला जीवन्मुक्ति–सुखाचा लाभ होत नाहीं. म्हणून वसिष्ठांना ही ज्ञानविरहित सविकल्प समाधि मान्य नाहीं. अशा या ज्ञानविरहित समाधीनें दृश्य जगाचा बाध होईल म्हणावें, तर तसेंहि होत नाहीं; कारण ज्या दृश्य जगाचा निरास व्हावयाचा, त्याचें स्मरण असल्याशिवाय त्याचा निरास होणें संभवनीय नाहीं व त्याचें स्मरण ठेवावयाचें म्हणजे समाधीचा भंग होणार! अशा स्थितींत संसाराचें बीज नाहींसें होऊं शकत नाहीं. तसेंच निर्विकल्प समाधीमध्येंहि संसाराचें बीज नाहींसें होऊं शकत नाहीं. या समाधीमध्यें चित्त विलीन स्थितींत कायम असेल तर त्या ठिकाणीं विषयज्ञान आहे, असें ठरून तत्त्वतः ती निर्विकल्प स्थिति होऊं शकत नाहीं व विषयज्ञानच नसेल तर ती तुर्यावस्था होईल. सारांश, जोंपर्यंत दृश्य कायम आहे म्हणजे त्याचा ज्ञानानें बाध केला नाहीं, तोंपर्यंत ती खरी समाधि होणें शक्य नाहीं; कारण समाधि उतरल्यावर गाढ निद्रेनंतर जग भासतें, त्याप्रमाणें हें दृश्य जग जसेंच्या तसें भासणारच. अर्थात् आत्मज्ञान झालें नसतां क्षणिक सुखाची समाधि साधली, तरी त्यामुळें जगांतील अनर्थ-परंपरा टळत नाहीं ती नाहींच. आतां ज्ञान नसतां ही निर्विकल्प स्थिति जर कायमची साध्य झाली, तर अक्षय्य झोपेंच्या सुखाप्रमाणें तीच परम-पदाची प्राप्ति आहे, असें म्हणण्यास काय हरकत आहे? परंतु हें म्हणणें निःसंशय भ्रामक आहे. जोंपर्यंत चित्ताचा विचारानें नाश झाला नाहीं, तोंपर्यंत समाधीचा कितीहि प्रयत्न केला, तरी जगाचा प्रत्यय आल्या-शिवाय रहाणार नाहीं. शिवाय ही निर्विकल्प समाधीची स्थिति कोणालाहि कायमची प्राप्त होऊं शकत नाहीं, असा समाधिनिष्ठांचा अनुभव आहे. पाषाणाप्रमाणें करून घेतलेली स्थिर समाधीची स्थिति म्हणजे कांहीं संसाराची शांति करणारी अज्ञानुभवरूप मोक्षस्थिति नव्हे. म्हणून वसिष्ठांना ज्ञानानें प्राप्त होणारी व जीवन्मुक्ताचे ठिकाणीं वास्तव्य करणारी सहजसमाधीची स्थिति अभिमत आहे व त्यांना राजयोगानेंहि म्हणजे चित्तवृत्तिनिरोध-

रूप योगाभ्यासानेंहि प्राप्त होणारी समाधीची स्थिति मान्य नाहीं; कारण तीहि पाषाणाप्रमाणेंच जडस्वरूपाचीच आहे.

## सहज समाधि.

वसिष्ठांच्या मतें एखादा मनुष्य पद्मासन घालून बसलेला असला व त्यानें ब्रह्मांजलि × केलेली असून बाह्यात्कारी समाधि लावून बसल्यासारखा दिसत असला; पण त्याचें चित्त शांत व स्थिर झालेलें नसेल, तर त्याची ती समाधि आहे, असें म्हणतां येणार नाहीं. 'आपल्याला समाधि लावतां येते कां?' असा एकाद्यानें प्रश्न केला तर तो प्रश्नच तत्त्वतः चुकीचा ठरतो; कारण समाधि ही लावावयाची नसते, तर ती लागायची असते. पहिल्या प्रकारांत कृत्रिमता आहे व दुसऱ्यांत सहजता आहे. यावरून असें दिसून येतें कीं, समाधि हा स्वभावच बनला पाहिजे. अशी ही समाधि तत्त्ववेत्याच्या ठिकाणीं सहज असते; म्हणून तो व्यवहार करीत असला, तरी तो समाधिस्थितीमध्येंच असतो. अशा पुरुषाला समाधीचें निराळें अनुष्ठान तें काय करावयाचें आहे? वासिष्ठामध्यें समाधीची व्याख्या अशी केली आहेः—

तत्त्वावबोधो भगवन्सर्वाशातृणपावकः ॥ ५-६२-८
प्रोक्तः समाधिशब्देन न तु तूष्णीमवस्थितिः ॥
समाहिता नित्यतृप्ता यथाभूतार्थदर्शिनी ॥
साधो समाधिशब्देन परा प्रज्ञोच्यते बुधैः ॥ ५-६२-९
अक्षुब्धा निरहंकारा द्वंद्वेष्वननुपातिनी ॥
प्रोक्ता समाधिशब्देन मेरोः स्थिरतराकृतिः ॥ ५-६२-१०
निश्चिन्ताऽधिगताभीष्टा हेयोपादेयवर्जिता ॥
प्रोक्ता समाधिशब्देन परिपूर्णा मनोगतिः ॥ ५-६२-११

या श्लोकांचा भावार्थः—आत्मतत्त्वाचा बोध हा सर्व आशारूपी

---

× ब्रह्मांजलिः—ब्रह्मादिदेवांना प्रणाम करण्याकरितां हात जोडून बसणें याला ब्रह्मांजलि असें म्हटलें आहे.

तृणाला दग्ध करून टाकणारा अग्नि असून समाधि शब्दाचा अर्थहि असाच आहे. नुसतें स्वस्थ बसणें म्हणजे समाधि असा अर्थ तत्त्ववेत्ते करीत नाहींत.*

समाधि ( सम+आ+धा ) म्हणजे परमात्मस्वरूपीं स्थिर असणें, असाच अर्थ ज्ञाते पुरुष करीत असतात. जी बुद्धि नित्य तृप्त असून जी आत्मस्वरूपाचें अखंड अनुसंधान करीत असते, तिला म्हणजेच त्या पराप्रज्ञेलाच समाधि असें विद्वान् लोक म्हणतात. जिच्या ठिकाणीं अहंकार नसतो, जी केव्हांहि क्षुब्ध होत नाहीं, तसेंच जी जगांतील सुखदुःखादि द्वंद्वापासून अलिप्त असते अशा मेरुपेक्षाहि स्थिर स्थितीला समाधि ही संज्ञा दिली जाते. जिच्या सकल कामना परिपूर्ण झालेल्या असतात व जिच्या ठिकाणीं *हें ग्राह्य व हें त्याज्य ही भावना मुळींच शिल्लक राहिलेली नसते*, अशा पूर्ण स्थितीलाच समाधि हें नांव देण्यांत येतें.

सारांश, ज्याला सुख मिळवावयाचें असतें, त्याच्या ठिकाणीं समाधि लावण्याचा प्रश्न उत्पन्न होतो. पण आत्मज्ञानानें परिपूर्ण अवस्था प्राप्त झाल्यानें ज्याला तें अखंड समाधीचें अत्युच्च सुख आपोआपच लाभलेलें असतें, त्या पुरुषाला सुखप्राप्तीची इच्छा न राहिल्यामुळें समाधीचा निराळा अभ्यास करण्याचें प्रयोजनच उरत नाहीं. जीवन्मुक्ताच्या सहज समाधीचा भंग केव्हांच होत नाहीं व तो कोणालाहि करितां येत नाहीं. अशा या ज्ञानी पुरुषाची ब्रह्मरूप झालेली प्रज्ञा देह पडल्यानंतर विदेह कैवल्याची प्राप्ति होईपर्यंत आत्मतत्त्वाच्या अनुसंधानापासून केव्हांहि विराम+ पावत नाहीं. अशा तऱ्हेची ही जीवन्मुक्ताची सहज समाधि म्हणजेच चालती बोलती समाधि असें म्हणण्यास हरकत नाहीं. सतत

---

* अशाच तऱ्हेची समाधीची व्याख्या श्री एकनाथमहाराजांनीं केली आहे-
सर्वत्र जे समसाम्यता । या नांव समाधि तत्त्वता ।
परि तटस्थादि काष्ठावस्था । समाधि सर्वथा नव्हे ॥
एकनाथी भागवत ६६७

\+ आप्रयाणात्तत्रापि हि दृष्टम् । बादरायण सूत्र ४-१-१२

आत्मरूप असणें हा ज्ञानी पुरुषाचा स्वभावच बनून गेलेला असतो. म्हणून त्याच्या ह्या अखंड सहजसमाधीचा विच्छेद कोण आणि कसा करणार? कारण 'आत्मस्वरूपाव्यतिरिक्त या जगांत दुसरी कोणतीच वस्तु नाहीं' असा ज्ञानी पुरुषाचा निश्चय असल्यामुळें त्याच्या ह्या सहजसमाधीचें व्युत्थान केव्हांहि होऊं शकत नाहीं व व्यवहारांतील सर्व तऱ्हेच्या आचरणाला या समाधीचा व्यत्ययहि येत नाहीं. म्हणूनच ही चालती बोलती समाधि आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्री एकनाथ महाराजांनीहि या समाधीला चालती बोलती समाधि* असेंच नांव दिलें आहे.

आतां ह्यासंबंधीं थोडा तात्त्विक दृष्टीनें विचार करूं. तत्त्वतः एकटा आत्माच काय तो आहे व तो सर्वव्यापी आत्माच सर्वथा सर्व कांहीं आहे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें समाधि कशाला म्हणावयाचे व असमाधि तरी काय? ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें विचार केल्यास समाधि आणि असमाधि ह्या कल्पनांना कांहींच आधार नाहीं. ज्ञानी पुरुषाची नित्य समाधिच असते. म्हणून त्याच्या ठिकाणीं समाधि लावण्याचा प्रश्नच निर्माण होत नाहीं. सारांश, समाधि व असमाधि हा अज्ञानी पुरुषाचा विषय आहे, ज्ञानी पुरुषाचा नाहीं, असेंच तत्त्वतः म्हणावें लागतें.

**ज्ञान्याची निर्विकल्प समाधि म्हणजे जिवंतपणींच विदेहस्थिति.**

अशा सहज समाधींत ज्ञानी पुरुष नित्य स्थित असतो. असें जरी असलें तरी ज्यावेळीं त्याला व्यवहारामध्यें कांहीं करण्याचें उरलें नसेल, त्यावेळीं तो निर्विकल्प समाधींत कित्येक वेळां स्थिर होऊन रहात असतो. अशी ही ज्ञानी पुरुषाची निर्विकल्प समाधि म्हणजेच त्याची जिवंतपणींच विदेह स्थिति असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्ञानयोगी शेकडों वर्षें जरी समाधि

---

* सर्वभूतीं निजात्मता । पावोनि आली सर्व समता ।
ते चालतीचालती समाधि अवस्था । मजहि सर्वथा मानली ॥
ऐसी सर्वत्र समताबुद्धि । या नांव परम समाधि ॥
एकनाथी भागवत १६६६.

लावून बसला तरी त्याच्या शरीराचा स्वतः व परतः नाश होत नाहीं. अशा तऱ्हेचें वर्णन उपशम प्रकरण सर्ग ८९ मध्यें करण्यांत आलें आहे व त्यामध्यें जो हा सिद्धांत मांडला आहे, त्याच्या पुष्टीकरितां वसिष्ठांनीं तात्त्विक दृष्टीनें विवेचन केलें आहे, तें असें आहेः—

## निर्विकल्प समाधींत स्थिर असलेल्या ज्ञानयोग्याचें शरीर स्वतः किंवा परतः नाश पावत नाहीं.

अज्ञ पुरुषाच्या ठिकाणीं 'हा देह सत्य आहे व तोच मी आहे' अशा स्वरूपाचा अहंकार सतत जागृत असतो, त्यामुळें त्याच्या देहाचा छेद, भेद होऊं शकतो व त्यामुळें त्याला सुखदुःख दशांचा अनुभव येत असतो. पण तत्त्वज्ञान्याचें शरीर ज्ञानानें बाधित झालेलें असतें, त्यामुळें त्याचें शरीर शुद्ध संविन्मात्र म्हणजे ब्रह्मरूप बनलेलें असतें. म्हणून त्या शुद्ध संविन्मात्र शरीरास समाधि असेंपर्यंत तोडण्यास किंवा मारून खाण्यास कोणीहि समर्थ होत नाहीं, किंवा तें स्वतः कालाच्या तावडींत सांपडूनहि नष्ट होत नाहीं. याच सिद्धांताचें स्पष्टीकरण असें करण्यांत आलें आहे कीं, चित्त जेव्हां जेव्हां ज्या पदार्थाकडे जातें, तेव्हां तेव्हां त्याच्यासारखें तत्काल बनतें, मनानें शत्रूला पाहिलें कीं त्याच्यामध्यें द्वेषाचे विचार उत्पन्न होतात व मित्राला पाहिलें कीं तें प्रसन्न होतें. ज्याच्याविषयीं मनांत राग, द्वेष नसतो, अशा एखाद्या वाटसरूला, वृक्षाला किंवा पर्वताला पाहून तें रागद्वेषयुक्त होत नाहीं. म्हणूनच सुंदर ( स्त्रीसारखा ) पदार्थ पाहिला कीं, तें चंचल होतें. निरस पदार्थ पाहून निरिच्छ बनतें, असा प्रत्येकाला अनुभव येत असतो. याचप्रमाणें रागद्वेषरहित योग्याच्या शरीराकडे जेव्हां हिंस्र पशूंचें चित्त जातें, तेव्हां तें तत्काल त्यासारखें बनतें. त्यामुळें ते हिंस्रपशू सुद्धां आपला जन्मजात वैरभाव * विसरतात आणि शांत होतात. इतकेंच नव्हे तर वाघासारखे हिंस्र प्राणीहि या ज्ञानयोगाच्या

---

* अहिंसा प्रतिष्ठायां तत्संनिधौ वैरत्यागः । पातंजल योग सूत्र २-३५ ज्याच्या अंतःकरणांत अहिंसेचें तत्त्व पक्कें बाणलें आहे, त्याच्यासमोर हिंस्र पशुसुद्धां आपला जन्मजात वैरभाव विसरतात.

कालानें त्याचें आयुष्य वाढत असतें. जसें आठ दिवसाच्या किल्लीचें घड्याळ आज किल्ली देऊन ठेवली, एक दिवस चालू ठेवल्यावर तें एक महिनाभर बंद ठेवलें व पुनः चालू केलें, तर तें एक महिन्याच्या वर चालू राहिलें असा भास होतो. कारण त्याला आठव्या दिवशीं किल्ली द्यावी लागत नाहीं. त्याचप्रमाणें समाधीमध्यें खरी निस्पंद किंवा निष्क्रिय स्थिति प्राप्त होत असल्यामुळें प्रारब्ध कर्माचा भोग होत नाहीं. त्यामुळें त्याचें आयुष्य वाढलें आहे असें वाटतें. पण वस्तुतः विचार केल्यास मात्र तसें होत नसतें असें समजून येतें.



# प्रकरण ४७ वें.

## खरा देव कोण ? व त्याची पूजा कोणती ?

देवाच्या बाबतींत सर्वसामान्य लोकांची जी समजूत आहे, ती अशी आहे कीं, देव हा साकार व सावयव आहे, म्हणजेच त्याला आपल्या सारखा आकार आहे व हस्तपादादि अवयव आहेत. फक्त त्याच्यामध्यें व आपल्यामध्यें थोडासा फरक मानून आपल्या नेहमींच्या अवयवांपेक्षां त्याला जास्त अवयव व त्याच्या ठिकाणीं थोडासा विचित्रपणा कल्पिलेला आहे. जसें आपल्याला दोन हात आहेत व एक मुख आहे, तर त्या देवाला चार हात व तीन चार किंवा पांच मुखें आहेत अशी कल्पना केली आहे. विराट्रूपाला तर अनेक हात, अनेक पाय, अनेक मुखें वगैरे आहेत. अशा या साकार व सावयव देवांच्या मूर्ती तयार करून आपण त्यांची पूजाअर्चा वगैरे करितों. पण वसिष्ठ सांगतात कीं, हा जो सर्वांनीं मानलेला देव तो खरा देव नव्हे.

न देवः पुंडरीकाक्षो न च देवस्त्रिलोचनः ॥ नि. पू २९-११८
न देवः कमलोद्भूतो न देवस्त्रिदशेश्वरः ॥ नि. पू. २९-११९

' पुंडरीकाक्ष विष्णु हा देव नव्हे, त्रिलोचन शंकर हा देव नव्हे, ब्रह्मदेव हा देव नव्हे, इंद्र हाहि देव नव्हे. ' तर

अकृत्रिममनाद्यंतं देवनं देव उच्यते ॥ नि. पू २९-१२१.

" जो कोणत्या कृतीनें तयार झालेला नाहीं, जो आदिअंतरहित आहे, जो आनंदप्रकाशरूप व चिद्रूप आहे, असा आत्माच खरा देव आहे."

' दीपनात् देवः ' म्हणजे स्वतः प्रकाशमान् असून दुसऱ्याला प्रकाश देणारा, अशी ' देव ' या शब्दाची व्याख्या निरुक्तकारांनींहि केली आहे. हा देव कोठें दूर रहात नाहीं. तो निरंतर आपल्या प्रत्येकाच्या शरी-

राहून आत्मरूपानें रहातो. तो चिन्मात्र, सन्मात्र व आनंदमात्र आहे. वसिष्ठ सांगतात कीं,

हृद्गुहावासि चित्तत्वं मुख्यं सानातनं वपुः ॥
शंखचक्रगदाहस्तो गौण आकार आत्मनः ॥ ५-४३-२७.

" हृदयरूपी गुहेमध्यें वास करणारें चित्तत्त्व ( ब्रह्म ) हेंच आत्म्याचें मुख्य आणि सनातन शरीर आहे. शंख, चक्र, गदा धारण करणारा चतुर्भुज आकार हें त्याचें गौण शरीर आहे."

असें आहे म्हणून जो मनुष्य मुख्य गोष्ट सोडून गौण गोष्टीच्या नादीं लागतो, तो सिद्धरसाचा त्याग करून रस सिद्ध करण्याची व्यर्थ उठाठेव करितो. असें करणें म्हणजे हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागण्यासारखेंच आहे. म्हणून वसिष्ठ सांगतात कीं,

संत्यज्य हृद्गुहेशानं देवमन्यं प्रयांति ये ॥
ते रत्नमभिवांछंति त्यक्तहस्तस्थकौस्तुभः ॥५-८-१४.

" आपल्या हृदयामध्यें रहाणाऱ्या देवाला सोडून जे इतर देवाकडे धाव घेतात, ते आपल्या हातांतील कौस्तुभ मणि फेकून देऊन अन्य रत्नाची इच्छा करितात." श्रीतुकाराममहाराजांनीं अशाच तऱ्हेचें वर्णन* केलें आहे.

यास्तव असें स्पष्ट दिसतें कीं, साकार व सावयव असा देव हा खरा देव नव्हे व त्याचें अर्घ्यपाद्यादि उपचारांनीं पूजन करणें हें खरें पूजन नव्हे. जे आत्मज्ञानी झाले आहेत, असेहि कांहीं विद्वान् लोक केव्हां केव्हां साकार देवाची पूजा करीत असलेले दिसतात, ते ती पूजा लहान मुलांच्या क्रीडेसारखी लोकसंग्रहाकरितां लीलेनें करितात. त्या देवापासून कांहीं मिळावें ह्या इच्छेनें करीत नाहींत. श्रीशंकराचार्य या आत्मदेवाचीच पूजा करीत

---

* देही असोनि देव । वृथा फिरतो निर्दैव ॥
देव आहे अंतर्यामी । व्यर्थ हिंडे तीर्थ ग्रामीं ॥
नाभीं मृगाचे कस्तुरी । व्यर्थ हिंडे वनांतरीं ॥
तुका सांगे मूढ जना । देहीं देव कां पहाना ॥

असत, तरी देखील सामान्य लोकांचा बुद्धिभेद होऊं नये म्हणून लोकसंग्रहाकरितां आपल्या मठांत नित्य शारदेची पूजा करीत असत, असें 'ज्ञानोत्तर कर्मयोग की कर्मत्याग ?' या मागील ४५ व्या प्रकरणांत सांगितलें आहे.

हा चिन्मात्र देव सर्व ठिकाणीं अभिव्यक्त होत असतोच. पण हरिहरादिकांच्या ठिकाणीं त्याच्या अभिव्यक्तीचा उत्कर्ष झालेला असतो. त्यामुळेंच त्यांना श्रेष्ठ देव म्हणतात. आत्मदेवाच्या दृष्टीनें विचार केल्यास हे तीन देव त्याचे अंशभूत आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं; कारण आत्मदेवाच्या गुणाच्या एकेक देशावर अभिमान ठेवणारे व सृष्ट्यादि कार्यासाठीं उत्पन्न झालेले हे ब्रह्मा, विष्णु, महेश अग्नीपासून उडणाऱ्या ठिणग्यांप्रमाणें किंवा समुद्रापासून उडणाऱ्या तुषाराप्रमाणें भासतात. म्हणून हा आत्मदेव हरिहरादिकांचा परम पिता आहे.

## आत्मदेवाचें पूजन.

असा हा आत्मदेव सर्वत्र स्थित आहे व सर्वत्र प्रकाशमान आहे. त्यामुळें इतर देवांचें संनिधानासाठीं जसें आवाहन केलें जातें व प्रकाशनासाठीं जसा मंत्रांचा उपयोग केला जातो, त्याप्रमाणें त्याच्या ठिकाणीं आवाहन, मंत्र इत्यादिकांचा कांहीं उपयोग नाहीं. कारण सर्वत्र स्थित असलेला तो नित्य आहूत म्हणजे आव्हान केलेलाच आहे. म्हणूनच तो सर्वत्र प्राप्त आहे. शम, संतोष, बोध इत्यादि पुष्पांनीं आत्मदेवाची पूजा करणें हेंच खरें पूजन होय. आकाराचें पूजन करणें, हें खरें पूजन नव्हे. जे लोक आत्मज्ञानरूप देवार्चन सोडून कृत्रिम पूजार्चनामध्यें आसक्त होतात, ते दीर्घकाल क्लेश भोगतात. यावरून आत्माच खरा देव आहे व त्याचीच सर्वदा पूजा करावी असें वसिष्ठ सांगतातः—

आत्मैव देवो भगवाञ्छिवः परमकारणम् ॥
ज्ञानार्चनेनाविरतं पूजनीयः स सर्वदा ॥ नि. पू. २९-१३१

"आत्मा हाच देव, भगवान् शिव व (जगाचें) परम कारण आहे. त्याचीच ज्ञानरूपी पूजासामग्रीनें पूजा करावी."

हा आत्मदेव या देहामध्येंच रहातो असें सर्व पुराणांतून सांगण्यांत येतें.

देहो देवालयः प्रोक्तः जीवो देहे सदाशिवः ।
त्यजेदज्ञाननिर्माल्यं सोऽहंभावेन पूजयेत् ॥

'हा देह देवालय* आहे. त्यांत रहाणारा जीव सदाशिव (आत्मा) आहे. त्याच्यावर असलेला अज्ञानरूपी निर्माल्य काढून टाकून "तो परमात्मा मी आहे" या भावनेनें त्याची पूजा करावी.' म्हणून शेवटीं वसिष्ठ सांगतात कीं, "तूं आत्म्याचीच आराधना कर, आत्म्याचीच पूजा कर, आत्म्याचेंच दर्शन करून घे आणि आत्म्याच्याच ठिकाणीं स्थिर होऊन रहा." अशा रीतीनें आपण आपली पूजा केली असतां आपण आपले बंधु होतो असें वसिष्ठांचें सांगणें आहे:—

आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैवरिपुरात्मनः ॥
आत्माऽऽत्मना न चेत् त्राता तदुपायोऽस्ति नेतरः ॥

नि. उ. १६२-१८

"आपणच आपले बंधु आहोंत व आपणच आपले शत्रु आहोंत; जर आपणच आपलें रक्षण केलें नाहीं तर त्याच्या रक्षणाचा दुसरा उपाय नाहीं."ऽ

## साकार देवाची पूजा कोणाकरितां?

असा हा आत्मदेव जर खरा देव आहे आणि त्याचेंच पूजन जर खरें पूजन आहे, तर साकार देवाचें पूजन करण्याचा विधि कां निर्माण झाला? असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. वसिष्ठांनीं त्याचें उत्तर असें दिलें आहे कीं, हें आत्मतत्त्व ज्यांना ज्ञात झालेलें नसतें व जे अध्यात्मशास्त्राचा अभ्यास व इंद्रियांचा जय करण्याविषयीं यत्न आणि विचार यांच्यापासून दूर पळणाऱ्या मूर्खांना कांहींतरी सन्मार्ग लावून देण्याकरितां साकार

---

* अशा तऱ्हेचें वर्णन 'बायबल'मध्येंहि आढळतें.
' Your body is the temple of god, who is in you '

ऽ अशा अर्थाचें वर्णन भगवद्गीतेंतहि आलें आहे. (भगवद्गीता ६-५ व ६)

देवाची पूजाअर्चा विहित आहे. म्हणून या देवाचीच त्यांनी भक्ति करावी. शास्त्राभ्यास आणि पौरुषप्रयत्न हेंच आत्मज्ञानाचे मुख्य उपाय असून तें ज्यांना साधत नसतील, अशा लोकांच्याकरितां साकार देवाच्या पूजार्चनादिकांचा गौण क्रम लावून दिला आहे, म्हणून वसिष्ठ सांगतात कीं:—

अस्ति चेदिंद्रियाक्रांतिः किं प्राप्यं पूजनैः फलम् ॥
नास्ति चेदिंद्रियाक्रांतिः किं प्राप्यं पूजनैः फलम् ॥ ५-४३-२२.

" इंद्रियांना जिंकलें असेल, तर पूजनाचें निराळें कोणतें फळ मिळवावयाचें राहिलें ? बरें इंद्रियांना जिंकण्याचें काम होत नसेल तर पूजन करून तरी काय उपयोग ?"

सारांश, विचार आणि उपशम यांच्यावांचून श्रीहरीची प्राप्ति केव्हांहि होणें शक्य नाहीं; व विचार आणि उपशम यांनीं युक्त असलेल्या ज्ञानी पुरुषाला ईश्वराच्या मूर्तिपूजनानें दुसरें कोणतें फल प्राप्त करून घ्यावयाचें असतें ? आपल्या स्वतःच्या हृदयांत असणाऱ्या परमेश्वराची आराधना करण्याचें सोडून बाहेरच्या देवाची पूजा करणाऱ्याला काय म्हणावें ? हेंच कळत नाहीं. वसिष्ठ म्हणतात कीं, त्याला ' नराधम ' हें नांव देऊं नये, तर दुसरें कोणतें नांव द्यावें ? ज्याला आत्मानात्मविवेक म्हणजे काय, हें माहीत नाहीं, ज्याला या आत्मदेवाचें स्वरूप समजत नाहीं, अशा अज्ञानानें मोहित झालेल्या मनुष्यानें साकार परमेश्वराची पूजाअर्चा करावी हें युक्तच आहे. पण अशीच पूजाअर्चा जन्मभर करीत बसण्यांत त्यानें आपणांस धन्य समजूं नये. तर अध्यात्मशास्त्राचा नित्य विचार करून यांतील तात्त्विक सिद्धांत अभ्यासानें आपल्या ठिकाणीं आत्मसात करून आत्मदेवाचें ज्ञान संपादन करून त्याची पूजा करणें, यांतच आपली खरी आत्मिक उन्नति आहे. शास्त्रामध्यें सुद्धां परमेश्वराच्या पूजार्चनादि भक्तीच्या निमित्तानें जें फळ मिळत असल्याचें वर्णन करण्यांत येत असतें, तेंहि आत्मा स्वसंकल्पानेंच प्राप्त करून घेतो. तसेंच परमेश्वराचा वर मिळणें हें सुद्धां स्वतःच्या अभ्यासवृक्षाचेंच फल आहे. कारण वरप्राप्ति सुद्धां आकस्मिक किंवा अकारण होते, असें मुळींच नाहीं. जोंपर्यंत मनोरूपी

खवळलेला महासागर शांत झाला नाहीं, तोंपर्यंत मनुष्यांना हजारों जन्ममरण परंपरेच्या फेऱ्यांत सांपडून भ्रमण करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. ब्रह्मा, विष्णु, महेश या देवांची दीर्घकाल आराधना केली व ते प्रसन्नहि झाले, तरी जर मनुष्याला मनोनिग्रह करितां आला नाहीं, तर त्या दयाळु देवांनासुद्धां त्याला मनोव्याधीपासून मुक्त करितां येणार नाहीं. वास्तव या भवसागरांतून तरून जाण्याकरितां आत्मदेवाचें ज्ञान संपादन करून त्याचीच आराधना करणें योग्य व श्रेयस्कर आहे, असेंच शेवटीं सिद्ध होतें.

## आत्मदेवाची पूजा करणारा आत्मरूप होतो.

जोंवर आत्मानात्मविवेक करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें नाहीं, तोंवर परमेश्वराची उपासना करावी पण ती करीत असतां विवेक, वैराग्य इत्यादि साधनें संपादन करण्याचा अभ्यास करावा. आत्मसाक्षात्कार होण्यासाठीं आत्मरूप परमेश्वराची प्राप्त पदार्थांनीं पूजा करावी. भोग्यरूपानें जो जो पदार्थ प्राप्त होईल तो तो विवेकबुद्धीनें परमेश्वराला समर्पण करावा. विवेकानें पूजिलेला स्वात्मा निरतिशय आनंदरूप वर सत्वर देतो. यथार्थ ज्ञान याच एका उपचारानें पूजिलेला तो परमात्मा मोक्षासारखें फल देतो. जेथें आत्मा हाच ईश्वर आहे, तेथें इतर देवांचा आश्रय कोण करणार ? 'अहो ! पण इतर देव पूजेनें, भक्तीनें प्रसन्न करून घेतले असतां शस्त्र, सर्प, विष, अग्नि इत्यादि घातुक पदार्थांपासून रक्षण करितात. कूटस्थ आत्मदेव काय करणार ? ' या प्रश्नाचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं, आत्मदेवाची पूजा करणारा आत्मरूप होतो. त्यामुळें त्याला शस्त्रादि घातुक पदार्थांचा कांहींहि उपसर्ग होत नाहींच पण तें शस्त्रादिकाचे आघात पुष्पासारखे कोमल वाटतात. म्हणून, वसिष्ठ सांगतात कीं,

अच्छेद्योऽहमदाह्योऽहमक्लेद्योऽशोष्यएव च ॥ ३-१४-६०

" आत्मरूप जो मी तो कधींहि न तुटणारा, न जळणारा, न भिजणारा व सुकणारा असा आहे. " अशा तऱ्हेचें वर्णन भगवद्गीतेंतहि अ. २ श्लोक २४ मध्यें आलेलें आहे.

## इतर देवतांची आत्मभावनेनें पूजा केली असतां आत्मदेवाचीच पूजा होत असते.

अशा हा ईश्वर कोठें दूर नाहीं व तो अतिशय दुर्लभहि नाहीं. तोच हें सर्व आहे; सर्वतः आहे, सर्वमय आहे. भाविक लोक सतत या स्थावर-जंगमापैकींच कांहीं पदार्थांना ईश्वर समजून त्यांची पूजा करितात व आपल्याला इष्ट असलेले पदार्थ त्यांना अर्पण करितात. म्हणजे कोणी कोणत्याही रीतीनें कोणाचीहि पूजा केली, तरी ती आत्मदेवाचीच पूजा होत असते. म्हणूनच कोणत्याहि देवाच्या स्तुतिस्तोत्रामध्यें त्या देवाला उद्देशून ' त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ' म्हणजे ' तूं प्रत्यक्ष ब्रह्मच आहेस ' अशा तऱ्हेचीं वर्णनें आढळतात. यास्तव सर्व देवतांमधून आत्माच भरलेला आहे असें मानून मग कोणत्याहि देवाची पूजा केली तरी तो आत्मदेव प्रसन्न होतो व तो त्या भक्ताला तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्याकरितां आपल्या एका विवेक नांवाच्या दूताला त्याच्याकडे पाठवितो. तो दूत भक्ताच्या हृदयांत येऊन रहातो. अशा हा दूत सत्संग, सच्छास्त्र व परमार्थाचा बोध यांच्या योगानें जीवाला अतिशुद्ध अशा परमपदाला नेऊन पोंचवितो. यावरून असें सिद्ध होतें कीं, आत्माच खरा देव आहे व त्याचें पूजन हेंच खरें पूजन होय. अशा ह्या आत्मदेवाची बाह्य व आंतर अशी दोन प्रकारची पूजा सांगितली आहे. त्यापैकीं प्रथम बाह्य पूजनाचा विचार करूं.

## आत्मदेवाची बाह्यपूजा.

आत्मा सर्वव्यापी असल्यामुळें तो जसा आपल्या हृदयांत आहे, तसा तो बाहेरहि आहे. आपल्या बाहेर असणारा आत्मा म्हणजेच विराट् रूप होय. याचें वर्णन निर्वाण प्रकरण पूर्वार्ध सर्ग ३८ मध्यें आलेलें आहे. ह्या विराट् रूपाचें तेज एक लाख सूर्यांच्या* तेजाइतकें आहे. बाह्यतः सूर्यादि सर्व प्रकाशमान पदार्थ व आंतून बुद्धीच्या सर्व वृत्ती ह्यांना तें प्रकाशित करितें. त्याची कंधरा ( गळ्यापासून वरचा भाग )

* भगवद्गीतेंत विश्वरूपाचें वर्णन करितांना त्याचें तेज एक हजार सूर्यांच्या तेजाइतकें आहे असें सांगितलें आहे. ( भ. गी. ११-१२ )

महाकाशाहूनहि विस्तीर्ण आहे. तसाच अनंत असलेला जो त्याच्या आकाशाचा कोश तींच त्याचीं पदक्रमलें आहेत. अपार असलेले सर्व दिशांचे तट हेच त्याचे विस्तीर्ण हात. ब्रह्मांडांत जे सत्यादि महालोक आहेत तींच त्याच्या हातांनीं ग्रहण केलेलीं आयुधें. त्याच्या हृदय-कोशांतहि अनेक ब्रह्मांडांचे घोस विश्रांति घेत आहेत. त्याचें शरीर ब्रह्मा, विष्णु, रुद्र, इंद्र वगैरे देवांनीं मंडित झालेलें आहे. ही जी चतुर्विध भूतांची शोभा ती त्याची रोमपंक्ति आहे. सर्व प्राण्यांचे श्रोत्रनेत्रादि अवयव ते सर्व त्याचेच असल्यामुळें त्याला असंख्य नेत्र व श्रोत्र ( कान ) आहेत व त्याला असंख्य मस्तकें आहेत.* या विराट् रूपी आत्मदेवाची पूजा गंध, पुष्प, धूप, दीप वगैरे उपचारांनीं करितां येणें शक्य नाहीं; म्हणून ह्याची पूजा ध्यानानेंच करावी. वास्तव पहातांना, ऐकतांना, बोलतांना, चालतांना, खातांना, पितांना वगैरे सर्व कर्में करितांना, ह्या ईश्वराचें सतत ध्यान करावें, हेंच त्याचें पूजन होय. ध्यानावांचून दुसऱ्या कोणत्याहि उपायानें ह्या आत्मदेव प्राप्त होत नाहीं. हाच परमयोग होय: हेंच आत्मदेवाचें उत्तम बाह्यपूजन होय.

## आत्मदेवाच्या बाह्यपूजेचें फल.

ह्या ईश्वराची ध्यानरूप पूजा तेरा निमेष जरी केली, तरी त्याला गोप्रदानाचें ( सव्वा रुपायाचें नव्हे ) फळ मिळतें. शंभर निमेष करणाऱ्याला अश्वमेध यज्ञाचें फळ मिळतें. अर्धी घटिका करणाऱ्याला हजार अश्वमेध यज्ञांचें फळ मिळतें. एक घटिका पूजन करणाऱ्याला राजसूय यज्ञाचें फळ मिळतें. सकाळपासून मध्यान्हापर्यंत पूजन केलें तर त्याला एक लाख राजसूय यज्ञांचें फळ मिळतें. तसेंच सर्व दिवसभर पूजन करणारा दीर्घकाल चित्ताचें ऐकाग्र्य झाल्यामुळें अवश्य ज्ञानी होऊन रहातो.

## आत्मदेवाचें अंतःपूजन.

आपल्या देहांत असणारा प्रत्यगात्माच खरा देव आहे व तोच आपण आहोंत, असें समजून आपल्याला जे पदार्थ प्राप्त होतील ते सर्व त्याला

---

* अशाच तऱ्हेचें विश्वरूपाचें वर्णन भगवद्गीता अ. ११ मध्यें आलें आहे.

अर्पण करून त्याची पूजा करावी. ब्राह्मणादि जो देह प्राप्त झाला असेल त्याला उचित अशा शास्त्रीय स्वकर्माचरणानें व केवळ शरीर धारणार्थ अवश्य अशा अन्नपानादिकांच्या सेवनानें आत्मदेवाला तत्त्वतः जाणून 'हें जें सर्व मी करीत आहे, तें त्याच्याकरितांच आहे' अशी भावना ठेवून त्याची पूजा करावी. "स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः" असें भगवद्गीता अ. १८ श्लोक ४६ मध्यें व 'यत्करोषि यदश्नासि.... तत्कुरुष्व मदर्पणम्' अ. ९ श्लोक २७ मध्यें स्वकर्मांच्या आचरणानें परमेश्वराचें पूजन कर व तूं जें कांहीं करशील तें मला अर्पण कर, असें भगवान् श्रीकृष्णानें जें सांगितलें आहे, तेंच तत्त्व ह्या आत्मदेवाच्या अंतःपूजेमध्यें वासिष्ठांत प्रकट केलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. साराश, अंतकरणांत समता धारण करून यदृच्छेनें प्राप्त झालेल्या विषयभोगरूप उपहारांनीं व सुखदुःख, शुभअशुभ वगैरे द्वंद्वांनीं खिन्न न होतां आत्म्याची पूजा करावी. कारण समता हा साक्षात् आत्माच आहे, यास्तव समतेनें ज्याची भावना केली जाते, तें सर्व विपयज्ञान एका क्षणांत अमृतरूप होतें. भगवद्गीतेंतहि 'समत्वं योग उच्यते (२-४८) समतेलाच योग असें म्हटलें आहे व 'पंडिताः समदर्शिनः' (५-१८) समदर्शी मनुष्यांनाच पंडित असें म्हटलें आहे.

## पूजनाचेवेळीं करावयाचें चिंतन.

या आत्मदेवाचें पूजन करतेवेळीं असें चिंतन करावें:—

"मींच तो आत्मदेव आहे. मन माझा द्वारपाल आहे. तो मला त्रिभुवनाचें निवेदन करितो. ही चिंता माझी प्रतिहारी आहे. ती द्वारामध्यें स्थित आहे. सन्मान हाच तिचा विषय असल्यामुळें ती शुद्धरूपिणी आहे. आत्म्यामध्यें अत्यंत प्रेमाचा विषय झालेली जी माझी ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति याच माझ्या श्रेष्ठ पत्नी आहेत. शास्त्रीय व लौकिक विचित्र ज्ञानें हींच माझ्या अंगावरील भूषणें आहेत. ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें हीं माझीं द्वारें आहेत. अशा प्रकारचा मी अनंतात्मा आहे. मी सर्व मर्यादित आकार टाकून दिला आहे. मी सर्व ठिकाणीं भरून राहिलों आहें."

अशा तऱ्हेची सतत भावना करीत रहाणें हीच त्या आत्मदेवाची अंतःपूजा होय.

## वसिष्ठांची आत्मदेवाची पूजा.

अशा तऱ्हेचें आत्मदेवाचें पूजन श्रीशंकरांनीं वसिष्ठांना सांगितलें व वसिष्ठ म्हणतात कीं, " तेव्हांपासून मी याच क्रमानें आत्मदेवाचें पूजन करीत राहिलों आहे. सर्व व्यवहार करीत असूनहि हे दिवस मी या पूजाविधीनें अखिन्नमनानें घालवितो. जशा क्रिया व आचार प्राप्त होतील त्याप्रमाणें त्याच पुष्पांनीं मी आत्मदेवाचें पूजन करीत असतो. झोपेंत माझें पूजन बंद पडत असेल, असें जर कोणी म्हणेल तर तसें नाहीं. कारण त्या वेळींहि मी अविद्यापुष्पानें आत्म्याचें पूजन करीत असतों. सर्व प्राण्यांचीं इंद्रियें त्यांच्या विषयाशीं एकसारखींच संबंध पावत असतात; पण योगी सावध राहून प्रत्येक संबंधाचे वेळीं आत्मपूजन करीत असतात व इतर सामान्य जन ते करीत नाहींत. "

सारांश, प्रत्येकाचे ठिकाणीं असणारा आत्मा हाच खरा देव व त्याचें ज्ञान करून घेऊन त्याचें सतत ध्यान करीत रहाणें हीच त्याची पूजा होय.



# प्रकरण ४८ वें.

## वसिष्ठांचा सर्व जीवांना आत्मोद्धाराविषयीं कळकळीचा उपदेश.

लोक हो! जोंपर्यंत तुम्ही तरुण आहांत, तोंपर्यंत शुद्धबुद्धीरूप नौकेच्या योगानें या संसारमहासागरांतून आजच तरून जाण्याचा प्रयत्न करा, कारण वृद्ध झाल्यावर काय करणार? वृद्धापकाळीं आपलीं गात्रेंहि आपल्याला भारी होतात, बालपण व म्हातारपण या दोन्ही अवस्था म्हणजे पशुसमानच आहेत; म्हणजे पशुपक्षादिकांना जसें ज्ञान संपादन करितां येत नाहीं, तसेंच बालपण व म्हातारपण यांत ज्ञानसाधनें संपादन करितां येत नाहींत म्हणून तें एकप्रकारचें मरणच आहे. जीवाचें तारुण्य जर विवेकी असेल तर तें त्याचें खरें जीवित होय. म्हणूनच तरुणपणीं सच्छास्त्र व साधुसमागम यांच्या योगानें या संसारसागरांतून तुम्ही आपल्या आत्म्याचा उद्धार करा. या जगांत जिकडे पहावें तिकडे तरुण लोकच नव्हे तर **म्हातारे लोकसुद्धा विषयोपभोगाच्या नादीं लागलेले दिसतात.** इष्टप्राप्ति व अनिष्टपरिहार, या दोन गोष्टींच्या विचारांत निरंतर गढून गेलेले दिसतात. असल्या लोकांमध्यें आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठीं खरा प्रयत्न करणारा मनुष्य कोणीच दिसत नाहीं. प्रापंचिक विचारात निमग्न झाल्याकारणानें त्यांना आत्मविचार करण्यास फुरसत आहे कोठें? फारच झालें तर ते लौकिक अगर वैदिक कर्में मोठ्या आदरानें करीत असतात; पण तीं कशाकरितां? देहाच्या सुखासाठीं, इहपरलोकांतील विषयभोग मिळविण्याकरितां! आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठीं कोणी प्रयत्न करीत असेल तर शपथ! आता कदाचित् तुम्हीं असें म्हणाल कीं, मोठें राजासारखें ऐश्वर्य प्राप्त झालें असतां मनुष्याला आनंद प्राप्त होतो तर मग आत्मज्ञानाची प्राप्ति होऊन काय करावयाचें! परंतु बाबानो! तो आनंद खरा नव्हे तर तो दुःखमिश्रित असल्यामुळें केवळ आनंदाचा भास होय. तो निरतिशय आनंद नव्हे. एकाद्या भुवनावर राज्य करण्याचा अधिकार प्राप्त होवो,

इंद्रपदाचा लाभ होऊन पर्जन्यवृष्टि करण्यासाठीं मेघामध्यें प्रवेश करितां येवो किंवा योगसामर्थ्यानें पाहिजे तिकडे संचार करितां येवो, जोंपर्यंत मनुष्याला आत्मलाभ झालेला नाहीं, तोंपर्यंत त्याला शाश्वत शांति, सुख व समाधान यांची प्राप्ति होणें शक्य नाहीं.

वास्तविक पहातां तुम्ही आतांपर्यंत पूर्वीच्या हजारों जन्मांमध्यें व ह्याहि जन्मांमध्यें सर्व भोग भोगले आहेत. अशा स्थितींत वास्तविक तुम्हाला भोगाचा वीट येऊं नये काय? विषयभोगांचा लोभ धरून पुनः पुनः उत्तर जन्माची तयारी करणें आणि दुःखपरंपरेंत पडण्याचें साधन तयार करून ठेवणें, हें तुम्हांला उचित आहे कां? दुर्गंधियुक्त चिखलाच्या डबक्या-प्रमाणें असलेल्या या संसाररूपी डबक्यांत बेडकाप्रमाणें जिवंत राहण्याची इच्छा करूं नका. संसारासंबंधीं परिणामी दुःख देणारी विचारणा हीच महानिद्रा आहे. यास्तव ह्या महानिद्रेचा त्याग करून उठा! जागे व्हा! जरामरणादि दुःखांचा नायनाट करण्यासाठीं आपली कंबर बांधून पौरुष प्रयत्न करा.

अनर्थायार्थसंपत्तिर्भोगौघो भवरोगदः ॥
आपदः संपदः सर्वाः सर्वत्रानादरोजयः ॥ ४-३२-५८.

"संपत्तिरूप अर्थ हे अनर्थच आहेत. नानाविध भोग हे भवरोगच आहेत आणि सर्व प्रकारच्या संपत्ती ह्या आपत्तीच आहेत! यास्तव या सर्वांचा अनादर करणें हाच खरा जय आहे."

याकरितां तुमच्या कल्याणासाठीं इतर सर्व गोष्टी बाजूला सारून या मोक्षशास्त्राचा सतत अभ्यास करा व चित्तशुद्धिकारक आचार ठेवून पूर्वाचार्यांनीं आखून दिलेल्या मार्गानें एकेका ज्ञानभूमिकेचा अभ्यास करून त्या सर्व साती भूमिका हस्तगत झाल्या म्हणजे तुम्ही सिद्ध दशेला प्राप्त व्हाल; कारण पौरुषप्रयत्न आणि अविरत उद्योग यांचा आश्रय करून यथाशास्त्र आचरण करणाऱ्या कोणत्या पुरुषाला सिद्धि प्राप्त होणार नाहीं? यास्तव आतांपासूनच यथाशास्त्र अभ्यास चालू ठेवा.

लोकहो! मी तुम्हाला अहोरात्र तत्त्वज्ञानाचा उपदेश करीत आहे. कंठ-

शोष होईपर्यंत ओरडून सांगत आहे. त्यामुळें मला श्रम होत आहेत, असें पाहून तरी तुमच्या मनांत मजविषयीं दया उत्पन्न होऊं दे; आणि माझा उपदेश लक्षपूर्वक ऐकून ज्ञानी व्हा. तुमच्या भाग्योदयानें माझी करुणा जागृत होऊन मी तुम्हाला उपदेश करण्यास प्रवृत्त झालों आहे. माझा स्वभावच असा आहे, मला दीनांची दया येते. तुमचें हित व्हावें अशीच माझी इच्छा आहे. मी तुमचा आत्मा आहे. तुम्हीहि माझा आत्मा आहांत; त्यामुळें माझ्या परम प्रेमाला आस्पद आहां; म्हणूनच मी तुमचा मित्र झालों आहे. तुम्हीं सर्व चिन्मात्ररूप आहांत ! मीहि त्या चिन्मात्राचाच अति निर्मळ भाग आहे; म्हणून मी तुमचा परम आप्त आहे. तुमचें कल्याण व्हावें म्हणून मी तुम्हास तत्त्वज्ञान सांगत आहे. बाबांनो ! जोंवर मरणाचे ते काळेकुट्ट दिवस आले नाहींत, तोंवर मी सांगितलेलें तत्त्वज्ञान अंगीं बाणवून घ्या. जो जिवंतपणींच नरकरूपी व्याधीची चिकित्सा करीत नाहीं, तो औषधरहित स्थानीं गेल्यावर नरकयातना भोगीत असतां काय करणार ?

## संसारांतून सुटण्याचा उपाय.

संसारांतून सुटण्यास वनवास, कष्टतर तपश्चर्या, कर्मत्यागरूपी संन्यास किंवा कर्मांचें आचरण इत्यादिकांचा कांहीं उपयोग नाहीं. ज्याचें मन अत्यंत आसक्तिरहित आहे तोच भवसागरांतून तरून जातो. आसक्तिरहित मनुष्य शुभाशुभ क्रिया करीत असला किंवा त्यांचा परित्याग करीत असला तरी तो पुनः संसारास प्राप्त होत नाहीं. पण जो दुर्मति आपलें मन विषयांत आसक्त ठेवितो, तो शुभकर्मांचें आचरण व अशुभ कर्मांचा त्याग जरी करीत असला तरीहि तो आपली फसवणूक करून घेणारा मनुष्य पुनः पुनः संसारांत निमग्न होत असतो. म्हणून संसारांतून सुटण्याकरितां, लोकहो ! तुम्हीं आपल्या मनाचें विषयापासून प्रथम निवारण करा आणि हलकें, हलकें तत्त्वविचारानें शेवटीं त्याचा नाश करून टाका म्हणजे पुनः या दुष्ट मनाचा कधींहि उदय होणार नाहीं. असें केलेंत तर सर्वप्रकारें जिवंतपणीं तुमचा अभ्युदय होईल व शेवटीं भवसागरांतून तरून जाल.

मनाचा नाश संकल्पत्यागानेंच होऊं शकतो. कारण संकल्प करणें हें मनाचें स्वरूप आहे. म्हणून मी तुम्हां सर्वांना,

> ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति माम् ॥
> असंकल्पः परं श्रेयः सकिमंतर्न भाव्यते ॥ नि. पू. १२६-९४.

" हात वरवर करून मोठमोठ्यानें ओरडून सांगत आहे, पण माझ्या ओरडण्याकडे कोणीच लक्ष देत नाहीं. संकल्पांचा त्याग केल्यानेंच मन शांत होऊन मोक्ष प्राप्ति होत असते. पण ही गोष्ट तुम्हीं आपल्या अंतःकरणांत कां ठसवून घेत नाहीं. " तरी बाबांनो ! असें करूं नका ! तर मी जें तुम्हाला मोठ्या कळकळीनें सांगत आहे त्याचा नीट विचार करा व त्याप्रमाणें वागून आपली स्वतःची आत्मिक उन्नति करून घ्या.



# प्रकरण ४९ वें.

## व्यवहारांत कसें वागावें ? ह्याविषयीं वसिष्ठांचा रामाला उपदेश.

व्यवहारांत कसें वागावें व त्याच वेळीं आत्मस्वरूपामध्यें स्थिर कसें रहावें यांविषयीं वसिष्ठांनीं रामाला या वासिष्ठांत ठिकठिकाणीं जो मोठा मार्मिक उपदेश केला आहे त्याचा सारांश या प्रकरणांत दिला आहे.

वसिष्ठः—कोणत्याहि तऱ्हेचीं बरीं वाईट कार्यें प्राप्त झालीं असतां तीं तूं आपल्या मनांत खिन्न न होतां यथाक्रम व त्या त्या देशांतील धर्माला व आचाराला अनुसरून कर. अगदीं रडण्यापर्यंत जरी दुःख झालें किंवा निरनिराळ्या प्रकारें सुख जरी प्राप्त झालें, तरी तूं त्या सर्व अवस्थांमध्यें मनाचा समतोलपणा राखून नित्य समाधानी रहा. मूढा-प्रमाणें वासनांनीं व्याकुळ होऊं नकोस.

बाह्य व्यवहार करितांना तूं सामान्य मनुष्याप्रमाणें रहा; पण आपलें मन मात्र आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर ठेव. बाह्य व्यवहाराचा परिणाम आतील मनावर होऊं देऊं नकोस; म्हणजेच बाह्य व्यवहारांत जागणारें, पण अंतर्व्यवहारांत निजलेलें अशा चित्तानें तूं व्यवहार कर. तूं शत्रूबरोबर युद्ध कर पण त्या युद्धांत आपल्याला मरण येईल म्हणून भिऊं नकोस. कारण, आत्मभावनेनें ज्याला सतत अंतर्मुखता प्राप्त होऊन जो ब्रह्मरूप झाला, त्याच्या शरीरावर वज्रप्रहार जरी झाला तरी तें वज्रच कुंठित होतें. त्याला शस्त्रें तोडीत नाहींत, पाणी भिजवीत नाहीं, अग्नि जाळीत नाहीं व वायु सुकवीत नाहीं म्हणून तूं स्वस्वरूपामध्यें स्थिर हो व मग खुशाल युद्धादि कर्में कर व शत्रूचा निःपात कर. तुला त्यांपासून मुळींच पीडा होणार नाहीं, कारण त्यावेळीं तूं परब्रह्मासारखा अविनाशी होऊन रहाशील. अशा तऱ्हेनें तूं आपल्या मनाला आत्मानंदांत निजीव कीं, तें पुनः कधींहि या प्रपंचांत क्षुब्ध होणार नाहीं.

माता, पिता, बंधु इत्यादि तुझ्या जवळच्या नातेवाइकांवर तूं अत्यंत आसक्त होऊं नकोस. फार काय पण तूं आसक्त आहेस कां विरक्त, आहेस, दयाळु आहेस, निष्ठुर आहेस कां, ज्ञानी आहेस कां अज्ञानी आहेस, हेंहि कोणाला कळूं देऊं नकोस. तूं केव्हांहि धर्म व नीति यांना अनुसरूनच वाग व त्याच दृष्टीनें द्रव्य संपादन कर. दयेला पात्र असलेल्या लोकांवर दया कर.

जोंवर देह आहे तोंवर अवश्य तो व्यवहार केलाच पाहिजे, म्हणून तो शास्त्रानुसार होईल व त्यामुळें चित्तांतील दोष शांत होऊन त्याची शांति बिघडणार नाहीं अशाच तऱ्हेनें व्यवहार कर. पण ' मला असें करितां येतें ' असा अभिनिवेशहि धरूं नकोस; तूं आतां ज्ञानी झाला आहेस, म्हणून ' मी शास्त्रानुसारच वर्तन करीन, सज्जनांचीच संगति धरीन,' असाहि आग्रह तूं धरूं नकोस. कारण कोणत्याहि प्रकारचा आग्रह न धरितां आपआपल्या वर्णाश्रमाला उचित अशा कर्मांचें आचरण करीत रहाणें व त्या वेळीं शमदमादि गुण आपल्या ठिकाणीं धारण करणें हेंच ज्ञानी पुरुषाचें लक्षण आहे. यथेष्टाचरण हें ज्ञानी पुरुषाचें लक्षण नव्हे. हा उपदेश ध्यानांत ठेवून जिवंत असेपर्यंत योग्य कर्मांचें आचरण अनासक्त बुद्धीनें करीत रहा.

जो जो अतिशय ज्ञानसंपन्न असेल, त्या एकट्याचीच एकाच वेळीं तूं उपासना कर; कारण एकाच वेळीं अनेक विद्वानांचा सहवास केल्यास त्यांच्या संभाषणातून वादरूपी पिशाच्च उत्पन्न होतें आणि विद्वानहि एकदा अभिमानानें वाद करूं लागले कीं, त्यांची बुद्धि कलुषित होते. ते स्वतःच्या मताविषयींच आग्रह धरतात. वास्तव शहाण्या पुरुषानें निरनिराळ्या विद्वानांचा निरनिराळ्या वेळीं एकांतात सहवास करावा आणि त्यांनीं सांगितलेल्या सर्व गोष्टींचा स्वतःच्या बुद्धीनें विचार करावा व आपल्या सदसद्विवेक बुद्धीला जें पटेल तेंच करावें. याच अर्थी ' ऐकावें जनाचें व करावें मनाचें ' अशी म्हण व्यवहारांत पडली आहे. विचार वाढविण्यासाठीं विद्वानांच्या उक्तींचें मनन कर व त्यायोगें आपली बुद्धि तीक्ष्ण बनवून तिच्या योगानें तूं आपल्या आत्मस्वरूपाची ओळख करून घे.

## आंत शांत रहा पण बाहेर सर्व तऱ्हेचा व्यवहार कर.

अंतः संत्यक्तसर्वाशो वीतरागो विवासनः ॥
बहिः सर्वसमाचारो लोके विहर राघव ॥ ५-१८-१८.

" अंतःकरणांतील सर्व भावी सुखाच्या आशा, वर्तमानकालीं प्राप्त झालेल्या विषयावरील प्रेम आणि पूर्वी उपभोगिलेल्या विषयासंबंधींच्या वासना झुगारून दे आणि बाह्यतः सर्व प्रकारचा लोकव्यवहार कर." अज्ञ-जनांचा बुद्धि भेद करूं नकोस. आंतून नैराश्याचा अवलंब कर; पण बाहेरून आशावान् असल्यासारखा वाग. तसेंच तुझ्या धनादिकांचा नाश झाला असतां आंतून शांत रहा, परंतु बाहेरून संतप्त असल्याप्रमाणें आपलें वर्तन ठेव. बाह्यतः कोणत्याहि कार्यासंबंधानें एखाद्या नटाप्रमाणें कृत्रिम उल्हास धारण कर, पण आंतून कर्माचें मिथ्यात्व ओळखून त्यापासून सर्वथा अलिप्त रहा. आपल्या बाह्य व्यवहारांत कृत्रिम उल्हास, कृत्रिम हर्ष, कृत्रिम उद्वेग, कृत्रिम स्तुति, कृत्रिम निंदा सर्व कांहीं कृत्रिम दाखवीत जा, परंतु तूं आपली वृत्ति नेहमीं आत्मानुसंधानपर राखून या सर्व विकारांचा आंत स्पर्शहि होऊं देऊं नकोस. अंतःकरणांतील सर्व आशा-पाश तोडून टाक आणि सर्व वृत्तीमध्यें समत्व राखून आपल्या वर्णाश्रमाला, आणि स्वभावाला आणि राजधर्माला उचित अशीं कार्यें करीत रहा.

## ब्रह्मासारखा द्वैताद्वैतमयं हो.

सारांश, थोडक्यांत असें सांगतो कीं, तूं ब्रह्मासारखा द्वैताद्वैतमय होऊन रहाः—

भावाद्वैतमुपाश्रित्य सत्ताद्वैतमयात्मकः ॥
कर्माद्वैतमनादृत्य द्वैताद्वैतमयो भव ॥ ५-१७-२९.

याचा भावार्थः—"आंतून ब्रह्माप्रमाणें अद्वैतपर रहा व बाह्यतः द्वैतपर रहा; कारण व्यवहार कालीं सुद्धां जर तूं अद्वैतपर राहूं लागलास, म्हणजे 'सर्व एक आहे' असें पाहूं लागलास, तर जगद्व्यवस्था व धर्म-शास्त्रादि आचार शास्त्रें यांना बाध येईल. यास्तव व्यवहारात कर्म करीत असतां तुझ्या ठिकाणीं द्वैत असणेंच युक्त आहे. अशा तऱ्हेनें अंतरंग

अद्वैत ब्रह्ममय आणि बाह्यांग द्वैतमय राखून तूं ब्रह्माप्रमाणें द्वैताऽद्वैतमय होऊन रहा."

## कर्मसंन्यास योग्य नाहीं.

यावर कदाचित् तुझ्या मनांत असें येईल ' कीं, तत्त्वतः एकच परब्रह्म आहे, दुसरें कांहींहि नाहीं, म्हणून तत्त्वज्ञानी मनुष्य संसाररूपी मृग-जलाच्या मार्गे धांवत जात नाहीं, तर मग मला तरी राज्य घेऊन काय करावयाचें आहे ? मीहि संन्यासच घेईन म्हणजे झालें ! ' परंतु ही तुझी विचारसरणी बरोबर नाहीं. कारण कर्मफलाची आसक्ति सोडून ज्ञानी पुरुषानें केलेलें कर्म त्याला बंधनकारक होत नाहीं, असा सिद्धांत आहे. * यास्तव —

एकातपत्रमवनौ गुरुणोपदिष्टं
सम्यक्सुपालय चिरं समयेह दृष्ट्या ॥
राज्यं समस्तगुणरंजितराजलोक—
स्त्यागो न युक्त इह कर्मसु नापि रागः ॥५-५-५४.

" तुझा पिता जेव्हां तुला एकछत्री राज्य देईल, तेव्हां त्याचा अवश्य स्वीकार कर आणि आपल्या अंगीं असलेल्या गुणाच्या योगानें सर्व मांडलिक राजे व प्रजाजन तुझ्यावर अनुरक्त होतील, अशा रीतीनें तें राज्य समदृष्टीनें कर. कारण, अवश्य प्राप्त कर्मांचा त्याग किंवा त्यांच्या संबंधाचा अनुराग हीं दोन्हींहि युक्त नव्हेत. "



---

* हाच सिद्धांत भगवद्गीतेमध्यें खालील श्लोकांत आलेला आहे.
त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ॥
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ ४-२०.

# प्रकरण ५० वें.

## महर्षि वसिष्ठ.

ब्रह्मदेवानें वसिष्ठाला आपल्या मनापासून उत्पन्न केलें व त्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश करून पूर्ण ज्ञानी बनविलें. नंतर ब्रह्मदेव वसिष्ठाला म्हणाले कीं, "परमबोधाचा तुझ्या ठिकाणीं उदय झालेला असल्यामुळें तूं आतां पृथ्वीवर संचार करीत रहा; व जंबुद्वीपामधील भरतखंडांत रहाणाऱ्या लोकांवर अनुग्रह कर. भरतखंडांत जे लोक कर्माचे अधिकारी असतील त्यांना कर्मकांडाचा उपदेश करून क्रमाक्रमानें ज्ञानाचाहि उपदेश कर व जे बुद्धिमान विचारी आणि विरक्त असतील, अशा लोकांना आत्मस्वरूपाच्या आनंदाची प्राप्ति करून देणाऱ्या ज्ञानाचा उपदेश कर." अशा तऱ्हेची ही ब्रह्मदेवाची आज्ञा परिपालन करण्याकरितां वसिष्ठ या भरतखंडांत येऊन त्यांनीं अनेक अधिकारी लोकांना उपदेश केला आहे. मुमुक्षु व्यवहार प्रकरण सर्ग १० मध्यें वसिष्ठांनीं असें सांगितलें आहे कीं, "मला या जगांत कोणत्याच तऱ्हेचें कर्तव्य नाहीं.* तरीहि जोंपर्यंत जगांतील प्राणिमात्रांची परंपरा कायम आहे, तोंपर्यंत मी या भूतलावर अधिकारी लोकांना आत्मज्ञानाचा उपदेश करीत राहीन. माझा सर्व अभिमान गलित झाला असून चित्त शांत झालें आहे. अशी स्थिति असल्यामुळें लोकांच्या दृष्टीला मी कर्म करीत आहे असें दिसलें, तरी वस्तुतः मी कांहींच करीत नाहीं.*" या वसिष्ठांच्या उक्तीवरून 'जीवन्मुक्त ज्ञानी पुरुष कसे वागतात' हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

### वसिष्ठ त्रिकालज्ञानी होते.

मुमुक्षु व्यवहार प्रकरण सर्ग २ मध्यें वसिष्ठांनीं असें सांगितलें आहे

---

*असासारखेंच भगवान् श्रीकृष्णानीं गीतेंत सांगितलें आहे.

न मे पार्थाऽस्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ॥ ३-२२.

कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित् करोति सः ॥ ४-२०.

कीं, 'सध्याचे महर्षि व्यास हे बत्तीसावे आहेत असें ज्ञानदृष्टीनें मला आठवत आहे. व्यास यापुढें आठ वेळां उत्पन्न होतील आणि भारत नांवाचा इतिहास पुनः पुनः रचतील व पुनः पुनः वेदाचे भाग करतील.' यावरून दशरथाच्या वेळीं कोणते तरी एक व्यास अस्तित्वांत होते असें दिसून येतें.

वसिष्ठांनीं दाम, व्याल व कट या तीन दैत्यांचें भावी चरित्र अगोदरच सांगितलें आहे. (या ग्रंथाचा भाग २ रा, दाम, व्याल व कट यांची गोष्ट ११ वी). तसेंच अर्जुनाची भावी गोष्ट अगोदरच सांगितली आहे (या ग्रंथाचा भाग २ रा अर्जुनाची गोष्ट २९ वी)

## वसिष्ठांचा उपदेश अनुभवप्रमाणावरच आधारलेला होता.

वसिष्ठांनीं रामाला केलेला सर्व उपदेश, सांगितलेल्या सर्व गोष्टी, सृष्टीचीं, ब्रह्मांडाचीं वर्णनें व त्यांतील पृथ्वी ज्योतिश्चक्रादिकांचें प्रमाण इत्यादि सर्व वर्णनें प्रत्यक्ष स्वतः त्यांनीं अनुभवलेलीं होतीं, काल्पनिक किंवा आनुमानिक नव्हतीं असें वसिष्ठांनीं खालील श्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे.

अस्मदादेर्जनस्यैतत्प्रत्यक्षं नानुमानिकम् ॥
शुद्धबोधशरीरेण नाधिभौतिकरूपिणा ॥ नि. उ. १२८-१.

'आमच्यासारख्या ज्ञानयोग्यांनीं त्यांना ज्ञानाच्या सामर्थ्यानें प्राप्त झालेल्या शुद्ध बोधरूप अतिवाहिक शरीरानें हें ज्योतिश्चक्रादिकाचें प्रमाण प्रत्यक्ष जाणलें आहे. अनुमानानें किंवा आधिभौतिक स्थूल शरीरानें (चर्मचक्षूनें) जाणलेलें नाहीं."

आत्मज्ञानाचा उपदेश करीत असतां वसिष्ठांनीं जे सिद्धांत मांडले आहेत, त्या वेळीं देखील वसिष्ठ असें सांगतात कीं, 'आम्हीं त्याचा अनुभव घेऊनच सांगत आहों:—

एषोऽर्थः संभवत्येव तेनेदं कथयाम्यहम् ॥
स्वानुभूतं वयं बाला नासमंजसवादिनः ॥ नि. उ. ३२-२५.

"मी हें जें सांगत आहे, तें सर्वथा संभवनीय आहे आणि म्हणूनच

मी आग्रहानें सर्वांना सांगत आहे. आम्ही त्याचा अनुभव घेतलेला आहे. व्यर्थ कांहीं तरी बोलत नाहीं."

याशिवाय उपशम प्र. ८८ मध्यें वीतहव्याची गोष्ट सांगितल्यानंतर वसिष्ठांनीं असें सांगितलें कीं, " मी हें जें तुला वर्णन करून सांगितलें, आतां जें सांगत आहे व या पुढेंहि जें सांगेन तें सर्व

त्रिकालदर्शिना नित्यं चिरं च किल जीवता ॥
विचारितं च दृष्टं च मया तदखिलं स्वयम् ॥ ५-८८-१०.

"त्रिकालदर्शी व चिरकाल जिवंत राहणाऱ्या मी स्वतः पाहिलें आहे, त्याचा विचार केला आहे व अनुभवहि घेतला आहे."

सारांश, वसिष्ठांनीं केलेला सर्व ज्ञानोपदेश स्वतः त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊनच केलेला आहे.* म्हणून उपदेश करीत असतां मांडलेल्या तात्त्विक सिद्धांताच्या परिपोषणाकरितां वसिष्ठांनीं श्रुतिस्मृति प्रमाणांचे आधार दिले नसून केवळ स्वतःच्या बुद्धीनें विचार करून प्रत्यक्ष प्रमाणानें जें अनुभविलें तेंच त्यांनीं सांगितलें आहे. वसिष्ठांचें प्रत्यक्ष प्रमाण म्हणजेच 'आत्म प्रत्यक्ष' 'किंवा' 'आत्मानुभव' होय. या आत्मप्रत्यक्षाचें खुलासेवार वर्णन 'आत्मज्ञानाच्या बाबतींत स्वीकारलेलीं प्रत्यक्षादि प्रमाणें' या नांवाच्या ५ व्या प्रकरणांत केलेलें आहे.

## वसिष्ठांचें इतर वाद्यांविषयीं मत.

निर्वाण-प्रकरण-उत्तरार्ध सर्ग ९७ मध्यें वसिष्ठांनीं निरनिराळ्या वाद्यांचे सिद्धान्त सांगितल्यावर ते असें म्हणतात कीं, " सर्व वादी आपापल्या अनुभवानें सिद्ध झालेल्या सिद्धान्ताचेंच प्रतिपादन करीत असल्यामुळें त्यांतील प्रत्येकाचें म्हणणें त्याच्या त्याच्या दृष्टीनें खरेंच आहे. म्हणून जो ज्या आपल्या निश्चयामध्यें असतो, त्याला त्या निश्चयाचें फळ अवश्य प्राप्त होतें. पण जर तो अविश्वासानें त्याच्या निश्चयापासून न ढळेल, तरच त्याला

---

* श्रीसमर्थ रामदासस्वामींनींहि अशाच तऱ्हेचा उल्लेख दासबोधांत केला आहे :
हें प्रचीतीचें बोलिलें । आधी केलें । मग सांगितलें ॥ ११-१०-२४

त्याचें फळ मिळणें शक्य आहे, एरवीं नव्हे. अर्थात् जोंपर्यंत आत्मज्ञान झालें नाहीं तोंवरच त्या वाद्यांचे सिद्धांत सत्य आहेत असें मनुष्याला वाटतें. त्यामुळें या निरनिराळ्या वाद्यांचे सिद्धांत आपण स्वीकारावेत असा त्याला मोह होतो. पण आत्मज्ञान झालें म्हणजे एक आत्माच सत्य ठरून बाकी सर्व मिथ्या ठरतें. यास्तव अविचारानें वाटेल त्याचा सिद्धांत स्वीकारूं नये. म्हणून

**विचार्य पंडितैःसार्धं श्रेष्ठवस्तुनि धीमता ॥**
**सरूढो निश्चयो ग्राह्यो नेतरत्र यथा तथा ॥** नि. उ. १७-१९

" पंडितांबरोबर श्रेष्ठ ब्रह्म वस्तूविषयीं चांगला विचार करून बुद्धिमान् पुरुषानें विचारानें रूढ झालेलाच निश्चय स्थिर करावा व बाकीचे सर्व वाद्यांचे सिद्धांत सोडून द्यावे. " असा मोठा मार्मिक उपदेश केला आहे.

ह्या मोक्षशास्त्राचें जें रहस्य निश्चित केलेलें आहे तें अशाच पद्धतीनें तयार केलेलें आहे असें वसिष्ठांनीं सांगितलें आहे.

**विचारितमलं शास्त्रं चिरमुद्ग्राहितं मिथः**
**सत्यंक्तवासनान्मौनादृते नास्त्युत्तमं पदम् ॥** ४-५७-२८

" सर्व शास्त्राचें अवलोकन करून आणि सर्व ब्रह्मनिष्ठांचा अभिप्राय घेउन आम्हीं हें मोक्षशास्त्राचें रहस्य निश्चित केलें आहे. तें असें कीं, अखिल वासनांचा त्याग करून जोंपर्यंत मनुष्यानें मुनिवृत्ति धारण केली नाहीं तोंपर्यंत तो कृतकृत्य होण्याची गोष्टसुद्धां बोलावयास नको. "

## साधुसमागम व सच्छास्त्र.

या दोन साधनांवर वसिष्ठांचा फार जोर आहे. आत्मज्ञानाचा बोध होऊन तें ज्ञान सिद्ध होण्याकरितां जे उपाय सांगितलें आहेत त्यांपैकीं एक साधुसमागम व दुसरा सच्छास्त्राचा अभ्यास होय. म्हणूनच यांचें नित्य सेवन करावें असें वसिष्ठांचें सांगणें आहे.

**अनंतं समतानंदं परमार्थं-विदुर्बुधाः ॥**
**स येभ्यः प्राप्यते नित्यं ते सेव्या शास्त्रसाधवः ॥** २-६ ३४

"समत्वापासून होणाऱ्या शाश्वत आनंदाला ज्ञाते लोक परमार्थ असें

म्हणतात. या परमार्थाची प्राप्ति शास्त्र व सत्पुरुष यांच्या योगानें होते, म्हणून निरंतर त्यांची सेवा करावी." रामानें विचारलें कीं, मला मोक्ष केव्हां मिळेल? या प्रश्नाचें उत्तर वसिष्ठांनीं असें दिलें आहे कीं,

साधुसंगमसच्छास्त्रपरो भवसि राम चेत् ॥
तद्दिनैरेव नो मासैः प्राप्नोषि परमं पदम् ॥ ३-८-६.

"सत्पुरुष आणि सच्छास्त्र यांची कास धरशील तर कांहीं महिन्यांत नव्हे, तर कांहीं दिवसांतच तूं परमपदाप्रत (मोक्षाप्रत) जाऊन पोहोंचशील." सत्पुरुषाच्या संगतीचा परिणाम केवढा आहे हें सांगण्याकरितां वसिष्ठांनीं आपण मंकी नावाच्या ब्राह्मणाला भेटल्याबरोबर त्याच्या मनोवृत्ती एकदम कशा बदलल्या हें मंकी ब्राह्मणाच्या गोष्टींत सांगितलें आहे. (या ग्रंथाचा भाग २रा, गोष्ट ४२ वी). अशाच तऱ्हेचें वर्णन श्रीमद्भागवतांतहि* आलेलें आहे. यावरून सत्समागमाची योग्यता किती मोठी आहे, हें दिसून येतें. सत्संगाचें वर्णन 'मोक्षाचे चार द्वारपाल' या नांवाच्या मागील १४ व्या प्रकरणांत आलेलें आहे.

अशा तऱ्हेनें थोडक्यांत महर्षि वसिष्ठांची भूमिका या प्रकरणांत दाखविली आहे.

---

*संसारेऽस्मिन्क्षणार्धोऽपि सत्संगः शेवधिर्नृणाम् ॥ भा. ११-२-३०
"ह्या संसारामध्यें मनुष्याला जर क्षणभर सत्संग प्राप्त झाला, तर त्यास केवळ निधिच सापडला असें मानणें इष्ट होय."

# प्रकरण ५१ वें.

## उपदेश समाप्त झाल्यावर वसिष्ठांचा सत्कारसमारंभ.

महर्षि वसिष्ठमुनींनीं रामाला केलेला उपदेश संपल्यावर विश्वामित्रादिकांनीं वसिष्ठांची मोठी प्रशंसा केली. सिद्धांच्या साधुवादाबरोबरच देवांचे दुंदुभि वाजूं लागले. आकाशांतून देवांनीं पुष्पवृष्टि केली, तेव्हां सर्व लोक अंतरिक्षाकडे पाहूं लागले. सिद्धांनीं सांगितलें कीं, "कल्पाच्या आरंभापासून आतांपर्यंत आम्हीं हजारों मोक्षोपाय ऐकले, पण अशा तऱ्हेचें मात्र आमच्या कानांना आजच प्रथम ऐकायला मिळालें. ह्या वसिष्ठ मुनीनें दृष्टांत, हेतु व युक्ति ह्यांच्या योगानें रामाला जसा बोध केला, तसा साक्षात् अरुंधतीला केला असेल कीं नाहीं ? याची शंकाच आहे." दशरथ राजानें उत्तम प्रकारें भक्तियुक्त अंतःकरणानें वसिष्ठांची पूजा केली व हात जोडून तो म्हणालाः—

दशरथः—हे प्रभो ! मी माझें अवश्य कर्तव्य असें हें गुरुपूजन सफल करण्यासाठीं मी आपल्या पत्नीसह हें शरीर, हें माझें राज्य व सर्व वैभव आपल्या चरणीं अर्पण करून आपलें पूजन करितों. हे मुने ! आपण परम-पुरुषार्थरूप मोक्षाची प्राप्ति करून देणारें ज्ञान देऊन आम्हावर जे अनंत उपकार केले आहेत, त्यापुढें या राज्याची काय किंमत आहे ? हें सर्व आतां आपलें झालें आहे.

वसिष्ठः—हे राजन् !

प्रणाममात्रसंतुष्टा ब्राह्मणा भूपते वयम् ॥ नि. उ. २००-३५.

आम्हीं ब्राह्मण* केवळ प्रणामानेंच संतुष्ट होणारे आहोंत व तो तर तूं केलाच आहेस. राज्याचें रक्षण कसें करावें तें तूंच जाणतोस व तें तुलाच शोभतें; यास्तव तें तुझें तुलाच असूं दे. अरे बाबा !

---

* ब्राह्मण म्हणविणाऱ्यांनीं भगवान् वसिष्ठांचें हें वचन अवश्य लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

## वसिष्ठांचा सत्कारसमारंभ

ब्राह्मणाः क्ष महीभृतः ॥ नि. उ. २००-३६.

ब्राह्मण कधीं राजे झाले आहांत कां ?

असें वसिष्ठांचें बोलणें ऐकल्यावर 'केवळ प्रणामच ज्याच्यापाशीं सर्वो-स्कृष्ट वस्तु आहे, असा हा राम आपल्या चरणावर मस्तक ठेवीत आहे,' असें बोलून रामानें आपलें मस्तक वसिष्ठांच्या पायावर ठेवलें. त्यानंतर लक्ष्मण, शत्रुघ्न वगैरे सर्व लोकांनीं वसिष्ठ मुनींना प्रणाम केले. त्यानंतर सर्वांनीं वसिष्ठांच्या अंगावर इतकी पुष्पवृष्टि केली कीं, वसिष्ठ त्या फुला-मध्यें झाकून गेले. थोडा वेळानें ही पुष्पवृष्टि शांत झाली असतां वसिष्ठांनीं आपल्या दोन्ही हातांनीं पुष्पांचा ढीग दूर केला व शुभ्र अभ्रांतून चंद्र जसा दिसावा त्याप्रमाणें त्यांनीं आपलें मुख सर्वांना दाखविलें व सर्वत्र शांतता प्रस्थापित झाली आहे, असें पाहून वसिष्ठांनीं सर्वांना मोठ्या विनयानें बोलण्याला सुरवात केली.

वसिष्ठः—हे विश्वामित्र मुने ! हे वामदेवा ! हे अत्रे ! हे नारदमुने ! इतर मुनी हो ! तुम्ही सर्व अतिशय मान्य, पूज्य, व तत्त्वज्ञानी असूनहि हें माझें बोलणें ऐकलेत ! यांत मी जें कांहीं सांगितलें नसेल किंवा जें अर्थशून्य असेल किंवा निरर्थक असेल, तें मजवर अनुग्रह करून आपण आतां सांगा. ( ही वसिष्ठांची विनयोक्ति लोकांना शिक्षण देण्याकरितां आहे. )

विश्वामित्रादिमुनीः—हे ब्रह्मन् ! हा आपला विनय आहे. आपलें भाषण सदोष असेल, हें स्वप्नांत देखील कुणाला वाटणार नाहीं. सर्व जीवांना महाबोध करून देणाऱ्या तुज मुनिनायकास—नित्य गुरूस—आम्ही सर्व प्रणाम करितों.

वसिष्ठः—रा रामचंद्रा ! तूं आतां पूर्ण ज्ञानी जीवन्मुक्त झाला आहेस. तूं या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या यज्ञांत विघ्न करणाऱ्यांचें निवारण करून ह्या परंपरागत प्राप्त झालेल्या राज्यलक्ष्मीचा उपभोग घेत आनंदानें रहा. आतां तुला कांहीं सांगावयाचें राहिलें नाहीं.

असें वसिष्ठ बोलून थांबत आहेत, तोंच देवांचे दुंदुभी वाजूं लागले व देवांनीं आकाशांतून त्या दशरथ राजाच्या सभेवर पुष्पवृष्टि केली. त्या

सभेंत वसिष्ठ सर्वांत उच्चस्थानीं बसले होते. त्यांच्या एका बाजूला दशरथ राजा, रामलक्ष्मणादि राजपुत्र बसले होते, दुसऱ्या बाजूला विश्वामित्रादि सर्व मुनी, त्याच्या पलीकडे मंत्री, सामंत राजे व इतर प्रसिद्ध नागरिकजन अशा क्रमानें सर्व सभासद बसले होते. त्यांनीं ती दिव्य पुष्पें घेऊन वसिष्ठांच्या चरणीं वाहिलीं व वंदन केलें.

श्रीराम म्हणालेः—गुरुमहाराज ! माझा मोह नष्ट झाला. मी आपल्या प्रसादानें ब्रह्मरूप झालों. मी आतां आपल्या उपदेशाप्रमाणें वागेन.

विश्वामित्रः—अहाहा ! केवढी आनंदाची गोष्ट आहे. आम्हीं या वसिष्ठ मुनींच्या मुखानें ज्ञान ऐकलें व त्यामुळें सहस्र गंगास्नानें केल्याप्रमाणें अतिशय आल्हादयुक्त पवित्र होऊन राहिलों आहों.

नारदः—हे मुने ! खरोखर हृदयांतील व बाहेरील अज्ञानांधकार घालविणारे आपण परम भास्कर आहां, असें आमच्या निदर्शनाला आणून दिलेत !

वसिष्ठः—हे राजन् ! ह्या मोक्षोपाय संहितेची श्रवणसमाप्ति झाल्यावर एकाद्या दरिद्री माणसानेंहि यथाशक्ति ब्राह्मणपूजन करावें असें आहे. मग तुझ्यासारख्या सार्वभौम राजानें तर तें अवश्य केलें पाहिजे.

असें वसिष्ठांचें भाषण ऐकून दशरथ राजानें आपल्या दूतांकडून मथुरा, सौराष्ट्र, गौड, इत्यादि देशांतून वेदशास्त्रपारंगत असे दहाहजार ब्राह्मण बोलावून आणून त्यांचें यथाविधि पूजन केलें व दहा सहस्र भोजनें घातलीं. इतर गोरगरीबांनाहि अन्नवस्त्रादि देऊन सर्वांना राजानें संतुष्ट केलें. अशा ह्या महोत्सव अयोध्या नगरींत सात दिवस उत्तम तऱ्हेनें साजरा झाला.

अशा या मोक्षोपायसंहितेची समाप्ति झाल्यावर वाल्मीकि ऋषींनीं ब्रह्मभावानें अवशिष्ट राहिलेल्या सच्चिदानंद अशा आत्मस्वरूपाला नमस्कार करून वसिष्ठांचें पुढील श्लोकांत वर्णन करून त्यांना वंदन केलें आहेः—

ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् ।
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ॥
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतम् ।
भावातीतं त्रिगुणरहितं श्रीवसिष्ठं नताः स्मः॥ नि. उ. २४२-२६

( हाच श्लोक गुरुगीतेंत 'श्रीवसिष्ठं नताः स्मः' या शब्दाऐवजीं 'सद्गुरुं तं नमामि' असा पाठ बदलून घेतलेला आढळतो. )

"साक्षात् ब्रह्मानंद, परमसुख देणारे, केवल ज्ञानाची जणु मूर्तिच, सुख-दुःखादि द्वंद्वांच्या पलीकडे पोहोंचलेले, आकाशासारखे निर्लेप, तत्त्वमस्यादि महावाक्यांच्या विचारानेंच ज्याचें स्वरूप लक्ष्यांत येतें असे, एकरूप, नित्य, निर्मल, स्थिर, सर्वबुद्धिवृत्तींचे साक्षी, सर्व अस्तित्वांत असणाऱ्या पदार्थांच्या पलीकडे असणारे ( म्हणजे त्या सर्वांचा अत्यंत अभाव आहे असें समजून त्यांचा निरास झाल्यावरच प्रकट होणारे ) व सत्त्व, रज व तम या प्रकृतीच्या गुणांच्या पलीकडे जाऊन पोहोंचलेले, अशा श्री महर्षि वसिष्ठांना आम्हीं नमस्कार करितों."

'ॐ तत् सत् ब्रह्मार्पणमस्तु'

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ६ | २२ | नारायणांकित | नारायणांकित, |
| ९ | १ | अस | असें |
| २५ | २ | करात | करीत |
| २७ | २ | वसिष्ठांना | वसिष्ठांनीं |
| २७ | २५ | मांड्युक्य | माण्डुक्य |
| ३१ | १८ | साम्यानें | सह्याय्यानें |
| ४५ | १९ | ज्ञानाग्निदुःख | ज्ञानाग्निर्दुःख |
| ७६ | १९ | यथाशास्त्र | यथाशास्त्रं |
| ७९ | २५ | हालचलो | हालचाल |
| ७९ | २६ | ता | तो |
| ११० | ८ | स्वरूपचि | स्वरूपाची |
| ११२ | ८ | चानुभूवते | चानुभूयते |
| ११६ | ९ | जसे | जसा |
| १२१ | १७ | असल | असेल |
| १२३ | ८ | जावाच्या | जीवाच्या |
| १३३ | ६ | गज | जग |
| १३७ | २६ | री | ली |
| १४८ | १ | सुषुप्ना | सुषुम्ना |
| १५२ | २० | पाणापानाचे | प्राणापानांचें |
| १५९ | २० | सर्द | सर्व |
| १६३ | २५ | घेण्याचा | घेण्याकरितां |
| १७७ | ५ | काय | कार्य |
| १८५ | ८ | येद्यक | यद्येक |
| १९६ | ९ | वासनः— | वासनाः— |
| २०१ | २० (टीप) | मांड्युक्य | मांडुक्य |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| २१८ | ४ | व्रह्मणः | ब्राह्मणः |
| २१८ | २१ | राघवं | राघव |
| २१८ | २४ (टीप) | पुरुषानिशलोमात्के | पुरुषात्केशलोमानि |
| २३७ | १९ | इंद्रीय | इंद्रिय |
| ३०० | १२ | कतृत्व | कर्तृत्व |
| ३०४ | १९ | ज्ञानवंधु | ज्ञानबंधु |
| ३०५ | ९ | शुभज्ञानवधुत्व | शुभज्ञानबंधुत्व |
| ३०८ | २२ | निदुर्बुधा, | विदुर्बुधाः |
| ३११ | २ | मनोविनिग्राह | मनोविनिग्रह |
| ३१५ | १० | अस्पातरमणीय | आपातरमणीय |
| ३१७ | १४ | वासया | वासनाया |
| ३१९ | १४ | चिरमुद्राहितं | चिरमुग्द्राहितं |
| ३२० च्या पुढील पृष्ठ | | २३१ | ३३१ |
| ३३२ | २३ | तावाद्ध | तावद्धि |
| ३३१ | २३ | दुःख | दुःखे |
| ३३३ | २२ | कोपपद्यते | नोपपद्यते |
| ३३३ | १ (टीप) | आंस्त | आस्ते |
| ३३७ | १३ | जीवनमुक्त | जीवन्मुक्त |
| ३३९ | ५ | जीवनमुक्त | जीवन्मुक्त |
| ३३९ | १८ | जीवनन्मुक्ताला | जीवन्मुक्ताला |
| ३४० | १७ | सुषत्प | सुषुप्त |
| ३४५ | ५ | जीवनमुक्ति | जीवन्मुक्ति |
| ३४५ | ७ | जीवनन्मुक्त | जीवन्मुक्त |
| ३४५ | ९ | जीवनमुक्त | जीवन्मुक्त |
| ३७५ | २ (टीप) | वालती चालती | बोलती चालती |
| ३८७ | ११ | अंतकरणांव | अंतःकरणांत |



महर्षि श्रीवाल्मीकिप्रणीत

# योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान, सुरस गोष्टी व सुभाषितें.



भाग दुसरा.

## योगवासिष्ठांतील सुरस गोष्टी.



# प्रस्तावना.

महर्षि श्रीवाल्मीकिप्रणीत योगवासिष्ठांत एकंदर लहान मोठ्या मिळून ५१ सुरस व रसाळ गोष्टी सांगितल्या आहेत. त्यांतील कांहीं गोष्टी (उदाहरणार्थः—लीलेची गोष्ट, चूडालेची गोष्ट, पाषाणाची गोष्ट व विपश्चित् राजाची गोष्ट) फारच विस्तृत असल्यामुळें वाचकांना त्या वाचीत असतां त्यांतील मागचा पुढचा संदर्भ ध्यानांत ठेवतां येत नाहीं; कारण, ह्या गोष्टींतून कादंबरीसारखीं काव्यमय वर्णनें व कांहीं कांहीं ठिकाणीं अध्यात्मशास्त्रांतील सिद्धांत समजावून देण्याकरितां आलेलीं पुष्कळशीं विवरणें वाचकांना कंटाळवाणीं वाटतात; म्हणून हा सर्व वर्णनात्मक भाग काढून टाकून व त्यांतील विस्तार शक्य तितका कमी करून अगदीं सोप्या भाषेत त्यांतील तात्त्विक सिद्धांतांना धक्का न लावता सारांशरूपानें या सर्व गोष्टी या ग्रंथांत ग्रथित केल्या आहेत. प्रत्येक गोष्टीच्या आरंभीं योगवासिष्ठांतील त्या गोष्टीचें स्वरूप दाखविणारा एक संस्कृत श्लोक त्याच्या अर्थासह देण्यांत आला आहे व त्या गोष्टीच्या शेवटीं अध्यात्मशास्त्राचें कोणतें तत्त्व विशद केलें आहे, तें तात्पर्याच्या रूपानें दर्शविलें आहे. वाल्मीकींनीं मूळ योगवासिष्ठांत या सर्व गोष्टी कादंबरीसारख्या रसाळ व चटकदार काव्यमय भाषेत लिहिलेल्या असल्यामुळें वाचतांना फारच रम्य वाटतात. तितक्याच स्वारस्यानें या सर्व गोष्टी या ग्रंथांत लिहिण्याचा प्रयत्न केला आहे.

या सर्व गोष्टीपैकीं कांहीं काल्पनिक व कांहीं सत्यकथा आहेत. त्यापैकीं (२) आकाशज ब्राह्मण, (७) चित्त, (८) तीन राजपुत्र, (१४) खोटयराजा, (२७) बिल्वफळ, (२८) महाशिला, (३३) किराट, (३४) चूडालेच्या गोष्टींत आलेल्या चिंतामणि व हत्ती या दोन गोष्टी, (३६) मिथ्या पुरुष, (४७) शिला व (४८) ब्रह्मांड, या गोष्टी सत्यकथा नसून महर्षि वसिष्ठांनीं तत्त्वज्ञानाचे सिद्धांत समजावून देण्याकरितां कल्पिलेल्या आहेत. बाकीच्या गोष्टी सत्यकथा आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. कांहीं कांहीं गोष्टींत तर वसिष्ठांनीं ‘ आपला ह्यामध्यें संबंध आलेला आहे ’ असें सांगितलें आहे. उदाहरणार्थः—

( १ ) लवण राजाची गोष्ट ९ वी, पृष्ठ ७३ मध्यें वसिष्ठांनीं असें सांगितलें आहे कीं ' ही गोष्ट मी प्रत्यक्ष पाहिल्यामुळें तिच्याविषयीं मला मुळींच संशय वाटत नाहीं, कारण त्या वेळीं मी लवण राजाच्या सभेंत हजर होतो. '

( २ ) इंदु ब्राह्मणाच्या मुलांची गोष्ट ५ वी. ही गोष्ट प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें वसिष्ठांना सांगितली आहे ( उत्पत्ति प्रकरण सर्ग ८५ ).

( ३ ) दाशूराची गोष्ट १३वी. यांत सांगितलेली खोत्थराची गोष्ट१४ वी पृष्ठ १०२ मध्यें वसिष्ठांनीं सांगितलें आहे कीं ' दाशूराच्या पुत्राला अनेक रम्य कथा सांगून परमात्मज्ञानाचा चांगला बोध करून दिला.'

( ४ ) भुशुंडाची गोष्ट २५ वी. पृष्ठें १७५–१८२ मध्यें भुशुंडानें आपली सर्व हकीगत वसिष्ठांना निवेदन केली आहे.

( ५ ) शिवपूजेची गोष्ट २६ वी. पृष्ठें १८३–१८७ मध्यें प्रत्यक्ष श्रीशंकरांनीं वसिष्ठांना ' खरा देव कोणता व त्याची पूजा कोणती ' याचा उपदेश केलेला आहे.

( ६ ) विद्याधराची गोष्ट ४० वी. पृष्ठें २४६–२४८. ही गोष्ट भुशुंडानें वसिष्ठांना सांगितली आहे.

( ७ ) मंकी ब्राह्मणाची गोष्ट ४२ वी. पृष्ठ २५२ व २५३ मध्यें वसिष्ठांनीं मंकी नांवाच्या ब्राह्मणास स्वतः उपदेश केला आहे.

( ८ ) पाषाणाची गोष्ट ४३ वी. पृष्ठें २६१–२६४ मध्यें वसिष्ठांनीं स्वतः जगाचा महाप्रलय व त्यावेळीं झालेला रुद्राचा भयानक अवतार पाहिल्याचें वर्णन केलेलें आहे.

अध्यात्मशास्त्राचा एक एक सिद्धांत समजावून देण्याकरितां वसिष्ठांनीं एक एकच गोष्ट सांगितली नसून अनेक गोष्टी सांगितल्या आहेत. उदाहरणार्थः—

( १ ) मृतात्म्याच्या मनामध्येंच पुढील जन्मांतील जग अनुभवास येतें व त्या मृतात्म्याला बाहेर कोठें जावें लागत नाहीं, हें तत्त्व सांगण्याकरितां दोन गोष्टी सांगितल्या आहेत. एक लीलेची गोष्ट ३ री व दुसरी तापसाची गोष्ट ५० वी.

( २ ) इंदु ब्राह्मणाच्या मुलांच्या गोष्टीमध्यें त्या मुलांचीं शरीरें नष्ट झालीं, तरी त्यांच्या मनानें ' मी ब्रह्मदेव आहें ' अशा तऱ्हेची दृढ भावना केल्यामुळें ते सर्वजण ब्रह्मदेव बनले. ( गोष्ट ५ वी ).

लवण राजा एका गारुड्याच्या जादुमुळें केवल मनानेंच चांडाल कन्येशीं रत झाला. ( गोष्ट ९ वी ).

शुक्र सतत केलेल्या स्वर्गभोगाच्या चिंतनामुळें मनानेंच स्वर्गीय अप्सरे-बरोबर स्वर्गामध्यें गेला व पुढें त्यानें अनेक जन्मांचा अनुभव घेतला. ( गोष्ट १० वी ).

यावरून मनामध्यें ज्या ज्या विषयांचें एकसारखें चिंतन करावें, ते ते विषय मनामध्यें प्रत्यक्ष अनुभवास येतात. सारांश, बाहेरील संसार मना-मध्येंच विस्तारला जातो व त्याचा अनुभव बाहेरच्या सारखाच आंत प्रत्यक्ष येत असतो, हाच सिद्धांत यावरील तिन्ही गोष्टींत स्पष्ट करण्यांत आला आहे.

( ३ ) त्रसरेणूच्या ( कवडाशांतील उडणारे रजःकण ) उदरामध्येंहि त्रैलोक्य निर्माण करितां येतें, हें दाखविण्याकरितां इंद्राची गोष्ट ४१ वी सांगितली आहे.

( ४ ) इंदु ब्राह्मणाच्या मुलांची गोष्ट दोनदां आली आहे, एक उत्पत्ति प्रकरणांत ( गोष्ट ५ वी ) व दुसरी निर्वाण प्रकरण--उत्तरार्धांत ( गोष्ट ४९ वी ). ही एकच गोष्ट दोनदां सांगण्याचें कारण असें आहे कीं, पहिल्या गोष्टींत हें जगत् मनोमात्र म्हणजे खोटें आहे असें दर्शविलें आहे व दुसऱ्या गोष्टींत हें जगत् चिन्मात्र म्हणजे खरें आहे असें दाखविलें आहे.

( ५ ) आत्मज्ञानाचे तीन मार्ग आहेतः—( १ ) स्वतःचा आत्म-विचाररूप प्रयत्न, ( २ ) सद्गुरूच्या उपदेशाप्रमाणें केलेला आत्मविचार व ( ३ ) ईश्वराच्या प्रसादानें सुचलेला आत्मविचार. ह्या तीन मार्गांचें स्वरूप विशद करण्याकरितां ( १ ) जनकाची गोष्ट १६ वी, ( २ ) बलीची गोष्ट १८ वी व ( ३ ) प्रल्हादाची गोष्ट १९ वी, अशा तीन गोष्टी उपशम प्रकरणांत सांगितल्या आहेत.

(६) सर्वत्यागाचें खरें स्वरूप समजावून देण्याकरितां (१) भगीरथाची गोष्ट ३२ वी, (२) चूडालेची गोष्ट ३४ वी व (३) कचाची गोष्ट ३५ वी, अशा तीन गोष्टी सांगितल्या आहेत.

(७) ह्या दृश्यजगरूपी अविद्या भ्रांतीचा अंत कोठें होतो, ह्याचा शोध करण्याकरितां दीर्घ काल प्रयत्न केला तरी तिचा अंत लागत नाहीं, हें तत्त्व सिद्ध करण्याकरितां (१) विपश्चित् राजाची गोष्ट ४४ वी, (२) वटधाना राजपुत्रांची गोष्ट ४५ वी व शवाची गोष्ट ४६ वी, अशा तीन गोष्टी सांगितल्या आहेत. ही दृश्यरूप अविद्या मुळींच नाहीं अशा निश्चयानेंच तिचा अंत होत असतो, असें शेवटीं सिद्ध केलें आहे.

भावी गोष्टी.

(१) दाम, व्याल व कट या तीन दैत्यांची गोष्ट ११ वी. ह्यांतील तीन दैत्यांचें भावी चरित्र वसिष्ठांनीं अगोदरच सांगितलें आहे.

(२) अर्जुनाची गोष्ट २९ वी. ही भविष्यकाळांत घडणारी गोष्ट वसिष्ठांनीं भूतकालांत घडल्याप्रमाणेंच सांगितली आहे.

यावरून वसिष्ठ त्रिकालज्ञानी होते असें दिसून येतें.

ह्या सर्व गोष्टींपैकीं शुकाची गोष्ट १ ली व वटधाना राजपुत्रांची गोष्ट ४५ वी ह्या गोष्टी विश्वामित्र मुनीनें व तापसाची गोष्ट ५० वी श्रीरामचंद्रानें सांगितल्या आहेत. बाकीच्या सर्व गोष्टी वसिष्ठांनीं सांगितल्या आहेत.

अशा तऱ्हेच्या मोठ्या गमतीदार व आश्चर्यकारक गोष्टी वाचतांना किंवा ऐकतांना भगवद्गीतेंत वर्णन केल्याप्रमाणें

'आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति.....................॥ २–२९

वक्ता व श्रोता अतिशय आश्चर्यचकित होऊन जावात, इतकें सांगितलें म्हणजे सर्व गोष्टींचें स्वरूप सहज लक्षांत येईल. असो, मूळ योगवासिष्ठांत अशा तऱ्हेच्या एकंदर ५१ गोष्टी अध्यात्मशास्त्रांतील कोणतें ना कोणतें तरी तत्त्व समजावून देण्याकरितां सांगितलेल्या आहेत. ह्या सर्व गोष्टी ह्या भागांत अगदीं सोप्या भाषेंत दिलेल्या आहेत.

—रघुनाथ भास्कर पावगीशास्त्री.

# अनुक्रमणिका.



# योगवासिष्ठांतील सुरस गोष्टी.

## मुमुक्षु व्यवहार प्रकरण.

### (१) शुकाची गोष्ट.

अविद्योपशमस्त्वेपजातोऽपि भवतामिह ॥
अभ्यासेन विना साधो न सिद्धिमुपगच्छति ॥
नि. उ. १०३-१९.

**भावार्थ**—अविद्येचा उपशम म्हणजेच आत्मज्ञान जरी झालें तरी तें अभ्यासावांचून सिद्धीला प्राप्त होत नाहीं.

व्यास महर्षींना एक महाबुद्धिवान् आणि सर्व शास्त्रांत निपुण असा शुक नांवाचा मुलगा होता. तो इतका पवित्र होता कीं, त्याला पहातांच हा प्रत्यक्ष यज्ञच आहे कीं काय असा भास होई. संसारांतील दोषासंबंधानें विचार करितां करितां त्याच्या अंतःकरणांत विवेकाचा उदय झाला. त्या विवेकाच्या योगानें त्या महात्म्या शुकानें स्वतःच दृढचिंतन केलें व त्या योगें त्याला परमार्थतः सत्य असा आत्मस्वरूपाचा अनुभव आला. परंतु हीच ती आत्मवस्तु आहे, असें न जाणल्यामुळें त्याच्या मनाला विश्रांति म्हणून

मिळेना. चित्ताची चंचलता नाहींशी झाल्यामुळें नश्वर अशा विषयोपभोगांबद्दल त्याच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें होतें. अशा स्थितींत आपल्या वडिलांच्याकडे येऊन शुकानें मोठ्या विनयानें विचारलें कीं, " बाबा ! संसाराचें हें फसविणारें अवडंबर कसें उत्पन्न झालें आहे ? हा संसार आहे तरी कोणाला ? तसेंच तो केव्हां व कोणत्या उपायानें कायमचा नाहींसा होईल ? या प्रश्नांचें उत्तर व्यासांनीं आपल्याकडून समर्पक व अगदीं स्पष्ट दिलें. परंतु हें सर्व आपल्याला पूर्वीच माहीत होतें, असें वाटून आपल्या पित्याच्या भाषणाचें शुकाला विशेष महत्त्व वाटलें नाहीं. शुकाचा हा अभिप्राय जाणून व्यास त्याला म्हणाले, " बा शुका ! हें जरी तुला सांगितलें आहे, तरी मला खरें ज्ञान झालेलें नाहीं. यासाठीं तूं जनक राजाकडे जा. खरें तत्त्वज्ञान त्याला झालेलें आहे व त्याच्यापासून तुला तें प्राप्त होईल." पित्याचें हें भाषण ऐकल्यावर शुक मेरुपर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या जनकराजाच्या मिथिला नामक राजधानींतील राजवाड्यांत येऊन पोहोंचला. जनक राजांच्या द्वारपाळांनीं शुक आल्याची बातमी महात्मा जनकाला जाऊन कळविली. परंतु व्यासांच्याप्रमाणें आपल्या उपदेशाची अवहेलना होऊन शुक अकृतार्थ होऊन परत जाऊं नये, यासाठीं, तसेंच वैराग्य, श्रद्धा वगैरे साधनसंपत्तीचा लाभ त्याच्या ठिकाणीं कितपत झाला आहे, याची परीक्षा पहाण्यासाठीं सेवकांनीं आणलेल्या बातमीवर " बरें आहे " असें उपेक्षेचें उत्तर देऊन राजा जनक स्वस्थ बसला. अशा रीतीनें सात दिवस गेल्यावर त्यानें शुकाला राजवाड्याच्या चौकांत आणविलें. त्या ठिकाणींहि शुक सात दिवस स्वस्थ राहिला. तत्त्वजिज्ञासेनें उत्कंठित झाल्यामुळें जनकाच्या अनादराबद्दल त्याला कांहींच वाईट वाटलें नाहीं. पुढें त्याला जनकानें आपल्या अंतःपुरांत आणवून त्या ठिकाणीं सात दिवस ठेविलें. पण जनकाचें दर्शन नाहीं. त्या ठिकाणीं रहात असतां शुकाला जनकानें सुंदर सुंदर तरुण स्त्रिया, उत्तमोत्तम खाद्यपेयें व नानातऱ्हेचे भोग त्यांच्या योगानें रंजविण्याचा प्रयत्न केला. परंतु शुकाच्या मनावर त्याचा यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं. अशा रीतीनें जनक राजानें शुकाची परीक्षा घेतली आणि त्याच्या ठिकाणीं विवेकवैराग्यादिकांचा पूर्णपणें परिपाक झालेला आहे, असें दिसून आल्यावर, त्याला आपल्यापुढें आणविलें. त्याचें यथोचित स्वागत

केल्यानंतर जनक म्हणाला, "या शुका ! मोक्षपुरुषार्थाला लागणारी सर्व साधनसामग्री मिळविल्यामुळें तूं खरोखर कृतकृत्य झाला आहेस. आतां तुला कांहीं विचारावयाचें असेल तर मला विचार."

शुकः—महाराज ! संसाराचें हें अवडंबर कसें उत्पन्न झालें? व कोणत्या उपायांचा अवलंब केला असतां त्याचा उपशम होईल? याचें रहस्य मला सांगा.

अशा प्रकारचा शुकानें केलेला प्रश्न ऐकून पूर्वी व्यासांनीं ज्या तऱ्हेचें विवेचन केलें होतें, तशाच तऱ्हेचें विवेचन जनकानें केलें. जणु काय जनकानें व्यासांच्या विवेचनाची फोनोची प्लेटच वाजवून दाखविली असें म्हटलें तरी चालेल.

शुकः—विवेकाच्या योगानें या सर्व गोष्टींचें ज्ञान मला पूर्वीच झालेलें आहे. पूर्वी असाच प्रश्न मी आपल्या वडिलांना केला होता व त्यावर त्यांनींहि अशाच तऱ्हेनें उदाहरणांसहित प्रतिपादन केलें होतें. महाराज ! आपल्या विवेचनाचा अर्थहि असाच आहे. उपनिषदादि शास्त्रांमध्यें अशाच आशयाचें विवेचन करण्यांत आलेलें आहे.

यथाऽयं स्वविवेकोत्थः स्वविकल्पपरिक्षयात्॥
क्षीयते दग्धसंसारो निःसार इति निश्चयः॥ २-१-३३.

"केवळ आपल्या कल्पनेनें हा निःसार संसार आपण निर्माण केला आहे आणि कल्पनेचा खेळ संपला म्हणजे हा संसार नष्ट होतो, असा निश्चय आहे." तरी हा माझा निश्चय बरोबर आहे की नाहीं, या संबंधाचा निर्णय काय तो आपण मला सांगावा; म्हणजे भ्रमण करणारें माझें चित्त स्थिर होईल.

जनकः—बा शुका ! तुला जें समजलें आहे व गुरुपासून तूं जें ऐकलें आहेस, त्याहून निराळा कांहीं एक निश्चय करावयाचा नाहीं, तर त्या निश्चयाचें फक्त दृढीकरण करावयाचें आहे. या जगांत एकमेवाद्वितीय आणि परिपूर्ण असा आत्माच काय तो आहे. त्याच्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं.

स्वसंकल्पवशाद्बद्धो निःसंकल्पश्च मुच्यते ॥ २-१-३६.

" आपल्या स्वतःच्या संकल्पानेंच जीव बद्ध होतो व संकल्परहित झाला म्हणजे मुक्त होतो " हें तत्त्व तुला स्पष्ट रीतीनें समजलें आहे. आतां वास्तविक श्रवण करावयाचें तुला काय राहिलें आहे ? सर्व ज्ञानाचा महानिधि असा जो तुझा पिता व्यास त्याची ज्ञानाच्या बाबतींत जितकी पूर्णता झालेली आहे, त्याच्यापेक्षांहि तुझी जास्त पूर्णता झालेली आहे. एवढेंच नव्हें, तर तुझ्या चित्तांतून विषयोपभोगाची इच्छा पूर्णपणें नाहींशी झालेली असल्यामुळें माझ्यापेक्षांहि तूं श्रेष्ठ आहेस. या जगांत जें ज्ञान प्राप्त करून घेण्यासारखें आहे, तें सर्व तुला प्राप्त झालेलें आहे. तुझ्या चित्तांतून दृश्य जगाचा निरास झालेला आहे; अर्थात त्याच्याशिवाय दुसरें कांहीं जाणावयाचें आहे, ही भ्रांति सोड, म्हणजे तूं मुक्तच आहेस.

अशा रीतीनें महात्मा जनकाचा उपदेश श्रवण केल्यानंतर निर्मळ अशा परब्रह्माचें ठिकाणीं शुकाचें मन स्थिर झाल्यामुळें तो स्तब्ध राहिला. तो निरिच्छ आणि सर्व संशयरहित झाला व मेरु पर्वताच्या शिखरावर जाऊन त्या ठिकाणीं निर्विकल्प समाधीचा पुष्कळ कालपर्यंत अनुभव घेतल्यानंतर तो जीवन्मुक्त झाला व पुढें प्रारब्ध संपल्यावर, तेल नाहींसें झालें म्हणजे दिवा विझून जातो, त्याप्रमाणें चित्त निर्विषय झाल्यामुळें तो आत्मस्वरूपाशीं मिळून गेला.

तात्पर्य—

( १ ) स्वतःच्या बुद्धीनें किती जरी ज्ञान मिळविलें तरी " तें बरोबर आहे " असें अधिकारी विद्वान् मनुष्यानें सांगितलें तरच समाधान होत असतें, म्हणून आपण मिळविलेलें ज्ञान ज्ञानी माणसाच्या अनुभवाशीं तंतोतंत जुळतें कां नाहीं तें पहाण्याचा प्रयत्न करावा.

( २ ) " श्रद्धावान् लभते ज्ञानम् " गुरूच्या वचनावर श्रद्धा ठेवली तरच ज्ञान होतें, म्हणून शास्त्रांच्या वचनावर श्रद्धा न ठेवल्यामुळें

शुकाला प्रथम ज्ञान झालें नाहीं. पण पुढें जनकाच्या वचनावर विश्वास ठेवल्यामुळें तो ज्ञानी झाला.

( ३ ) अभ्यासानें त्या ज्ञानाचें दृढीकरण करून त्याला पूर्ण विश्रांति मिळाली. यावरून असें स्पष्ट होतें कीं, विचारानें मनुष्याला आत्मज्ञान होईल पण त्याचा सतत व दृढ अभ्यास केला तरच आत्म्याचा साक्षात्कार होईल. यास्तव अभ्यासानें आत्मज्ञानाचें दृढीकरण करणें अत्यंत आवश्यक आहे.

( ४ ) खऱ्या शिष्याची वागणूक कशी असते हेंहि जनकाच्या घरीं आल्यावर शुकाच्या वागणुकीवरून स्पष्ट होत आहे.



# उत्पत्ति प्रकरण.

## ( १ ) आकाशज ब्राह्मणाची गोष्ट.

इदमाकाशजाख्यानं श्रुणु श्रवणभूषणम् ॥
उत्पत्त्याख्यं प्रकरणं येन राघव बुध्यते ॥ ३-२-१.

भावार्थः—"ह्या आकाशज ब्राह्मणाच्या गोष्टीवरून सर्व उत्पत्ति प्रकरणाचें रहस्य ध्यानांत येतें."

आकाशज नांवाचा एक परमधार्मिक ब्राह्मण होता. तो निरंतर आत्मचिंतनांत गढून गेलेला आणि लोकहिताविषयीं नेहमीं तत्पर असे. अशा रीतीनें पुष्कळ दिवस निघून गेले, तरी त्याला मरण येईना. हें पाहून मृत्यु चिंतन करूं लागला कीं "मी सर्व प्राणिमात्रांना मारून टाकतो, तर मग या ब्राह्मणालाहि कां मारू नये? माझी शक्ति याला मारण्याच्या बाबतींत कां बरें अगदीं कुंठित झाली आहे?" अशा तऱ्हेनें थोडा विचार करून आकाशज ब्राह्मण ज्या ठिकाणीं राहात होता, त्या ठिकाणीं मृत्यु येऊन पोहोंचला. इतक्यांत प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें पेटलेल्या अग्नींत मृत्यूचें शरीर होरपळूं लागलें. अग्नीच्या सर्वत्र पसरलेल्या ज्वाळा बाजूला सारून तो पुढें जाऊं लागला, तों आकाशज ब्राह्मण त्याच्या दृष्टीस पडला. मृत्यूनें आपल्याकडून आकाशजाला हातांनीं पकडण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या ब्राह्मणाला स्पर्श करणें मृत्यूला अशक्य झालें. नंतर मृत्यु वैतागून निघाला तो यमाकडे येऊन त्याला म्हणाला, "हे प्रभो! आकाशज ब्राह्मणाला मारून टाकणें मला शक्य कां होत नाहीं? तें मला समजावून सांगा."

यमः—वा मृत्यो ! आपल्याकडून कितीहि प्रयत्न केलास तरी मनुष्याला मारण्याला तूं एकटाच समर्थ नाहींस. मनुष्याला मरण्याला त्याचीं स्वतःचींच कर्में मुख्यतः कारणीभूत होतात; दुसरें कोणींहि होत नाहीं. यासाठीं ज्या ब्राह्मणाला मारण्याची तूं इच्छा करीत आहेस, त्याचीं कर्में काय आहेत, याबद्दल शोध कर, म्हणजे त्या कर्मांच्या सहाय्यानें तूं त्याला मारूं शकशील.

तदनंतर तो मृत्यु ब्राह्मणाच्या कर्मांबद्दल शोध करण्यासाठीं निघाला. नानाविध वनें, जंगलें, पर्वत, समुद्रकिनारे, द्वीपें, नगरें वगैरे सर्व ठिकाणीं आणि सर्व राष्ट्रांतून तो हिंडला. परंतु सर्व भू-मंडळांत शोध केला तरी त्या ब्राह्मणाच्या कर्मासंबंधानें त्याला कांहींच शोध लागला नाहीं. नंतर मृत्यु सर्वेश यमाकडे परत आला व म्हणाला, " महाराज ! आकाशज ब्राह्मणाचीं कर्में कोणत्या ठिकाणीं आहेत; तें मला कृपा करून सांगा. "

यमः—वा मृत्यो ! आकाशज ब्राह्मणाची कोणत्याच तऱ्हेचीं कर्में नाहींत; कारण, हा आकाशज ब्राह्मण नांवाप्रमाणें केवळ आकाशापासून उत्पन्न झाला आहे म्हणून तो निव्वळ आकाशच असणार, हें उघड आहे. तुला सहाय्यकारक होतील अशा तऱ्हेचीं कोणतींच कर्में यानें केलेलीं नाहींत. वंध्येच्या मुलाचें किंवा जो कधींहि आकारालाच आलेला नाहीं, अशा मनुष्याचें प्राक्तन कर्म असणें शक्य नाहीं. त्याप्रमाणेंच ह्याची स्थिति आहे. तसेंच कर्में उत्पन्न करणारीं अविद्यादि कारणें ह्याच्या ठिकाणीं नसल्यामुळें हा आकाशाप्रमाणें निर्विकार आहे. ह्याच्या ठिकाणीं पूर्व कर्में नाहींत आणि पूर्व कर्मांच्या अभावीं ह्याचें चित्त वासनावश होऊं शकत नाहीं. हा मृत्युवश होऊं शकेल अशातऱ्हेचें कोणतेंहि संचित कर्म ह्याच्या ठिकाणीं नाहीं. अशातऱ्हेनें हा केवळ चैतन्यस्वरूप आहे. तो नित्य आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं राहातो. आतां आमच्या सारख्यांना याच्या प्राणाच्या हालचालीच्या रूपानें जें कर्म दिसतें, तें फक्त आमच्या दृष्टीला दिसतें; त्याच्या स्वतःच्या दृष्टीला तें दिसत नाहीं. " मी कर्म करीत आहें " ही बुद्धि त्याच्या ठिकाणीं नाहीं. तो स्वतः ब्रह्मरूप आहे. त्याचा कोणीहि कर्ता नसल्यानें तो मृत्यूच्या हातीं कसा लागेल ? तो आपल्या बुद्धीनें मृत्यूची कल्पना करील, तेव्हांच तो मृत्यूच्या तावडींत सापडेल. कारण पंचमहा-

भूतांच्या योगानें बनलेला जो देह तो आपण आहों, अशी ज्याची भावना असेल, तोच मृत्यूच्या भक्ष्यस्थानीं पडणार ! परंतु आपण पार्थिव द्रव्याचे बनलेले नाहीं अशी ह्या विप्राची दृढभावना असल्यानें तुझ्या तावडींत हा सापडणें केव्हांहि शक्य नाहीं.

हा ब्राह्मण केव्हांच उत्पन्न झालेला नाहीं, परंतु यावरून त्याला अस्तित्व नाहीं असें मात्र नाहीं; तर तो केवळ ब्रह्मस्थितींतच राहिला आहे. महाप्रलयांचा काल संपल्यानंतर जेव्हां सृष्टीचा काल येतो, तेव्हां त्या परब्रह्माचें ठिकाणीं "मी देह आहे" अशी वृत्ति उत्पन्न होते व त्यामुळें परब्रह्माचें ठिकाणीं अकस्मात् भ्रामक आकार दिसूं लागतो. हा आकार म्हणजेच ब्रह्मदेव व ही वृत्तीची बहिर्मुखता नाहींशी झाली म्हणजे ह्याचें सध्याचें प्रातिभासिक स्वरूपहि दिसेनासें होतें. चैतन्य हेंच ह्याचें स्वरूप आहे. त्याप्रमाणें याच्या सर्व वृत्ती चैतन्यरूपच आहेत. यामुळें याचा देह इतर मनुष्याच्या देहासारखा पांचभौतिक कसा असणार ? यासाठीं बा मृत्यो ! याला पादाक्रांत करण्याविषयीं व्यर्थ प्रयत्न करूं नकोस कारण आकाशाला गवसणी घालणें कोणालाहि आणि केव्हांहि शक्य नाहीं.

यमाचें हें भाषण ऐकून मृत्यु आश्चर्यचकित झाला व आपल्या घरीं निघून गेला.

तात्पर्य—

सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचें स्वरूप प्रातिभासिक आहे व ब्रह्मदेवाच्या ठिकाणीं कर्मांचा अभाव असल्यामुळें त्याला मृत्यु नाहीं हें वरील गोष्टींत सांगून,

कर्मणा जायते जंतुः कर्मणैव विलीयते ॥

जीवाच्या कर्मानेंच त्याला मृत्यु येत असतो, हें तत्त्व सिद्ध केलें आहे.

## (३) लीलेची गोष्ट.

(अथवा मंडपाख्यान)

जगदाकाशमेवेदं यथा हि व्योम्नि मौक्तिकम् ॥
विमले भाति स्वात्मैव जगच्चिद्गगनं यथा ॥ ३-१५-१.

अत्रेदं मंडपाख्यानं शृणु श्रवणभूषणम् ॥
निःसंदेहो यथैषोऽर्थश्चित्ते विश्रांतिमेष्यति ॥ ३-१५-१७

**भावार्थ**—जग ब्रह्मच आहे हा सिद्धांत होय. आकाशांत मोत्यांच्या सराचा भास व्हावा, त्याप्रमाणें निर्मळ ब्रह्मामध्यें या जगाचें भान होत आहे. हें समजावून देण्याकरितां हें **मंडपाख्यान** सांगण्यांत आलेलें आहे.

या भूतलावर प्राचीनकाळीं पद्म या नांवाचा एक राजा होऊन गेला. तो राजा अत्यंत श्रीमान्, विवेकशील, आपल्या कुलाचें यश वृद्धिंगत करणारा असून त्याला अनेक पुत्र होते. वर्णाश्रमधर्माची आणि शास्त्राची मर्यादा पालन करण्यांत तो समुद्राप्रमाणें होता. शत्रुरूपी अंधकार नाहींसा करणारा तो सूर्यच होता. त्याला लीला नांवाची अत्यंत सुंदर व विलासी भार्या होती. सर्व सौंदर्याची मूर्तिमान् पुतळी अशा त्या लीलेला पाहून पृथ्वीवर अवतीर्ण झालेली ती प्रत्यक्ष लक्ष्मीच आहे कीं काय, असा पहाणाराला भास होई. लीलेचें भाषण अत्यंत मधुर असून ती पतीची सेवा एकनिष्ठपणानें करीत होती आणि त्याच्या वृत्तीशीं तिचें इतकें तादात्म्य झालेलें होतें कीं, तो उद्विग्न आहे असें दिसतांच ती अतिशय उद्विग्न होई. तो आनंदी दिसतांच तिला हर्ष होई; तो चिंताकुल आहे असें पाहतांच ती व्याकुल होऊन जाई; त्याला क्रोध आला म्हणजे मात्र ती अगदीं गडबडून जाई. परंतु हा फरक सोडून दिला असतां ती आपल्या पतीचें प्रतिबिंबच आहे कीं काय, असें प्रत्येकास वाटल्याशिवाय रहात नसे. त्या राजाचें आपल्या पत्नीवर अनन्य आणि अकृत्रिम प्रेम असून भूतलावरील अप्सरेप्रमाणें शोभणाऱ्या त्या लीलेबरोबर त्यानें अनेक विलास भोगले. अशा रीतीनें त्या दोघांचा काल परमोच्च सुखांत जात असतां लीलेच्या मनांत असा विचार आलाः—

"माझा भर्ता माझ्या प्राणाहूनहि मला प्रिय आहे. हा सर्व जगाचा स्वामी आहे, संपत्तिमान् आहे, तरुण आहे, या सर्व गोष्टी खऱ्या, परंतु हा अजरामर होऊन याच्याबरोबर शेंकडो युगें मला नानाविध विलास भोगावयास कसे सांपडतील ? माझा प्रिय पति अजरामर व्हावा यासाठीं जप, तप वगैरे साधनें करण्याला मी तयार आहे. पाहिजे त्या नियमांचें अनुष्ठान करण्यास मी मागें पुढें पाहणार नाहीं. तरी ज्ञानवृद्ध, तपोवृद्ध आणि विद्यावृद्ध अशा ब्राह्मणांना बोलावून आणून 'मनुष्य अमर कसा होईल ?' हा प्रश्न त्यांना विचारतें म्हणजे झालें !" अशा रीतीनें विचार करून तिनें ब्राह्मणांना बोलावून आणलें आणि त्यांची यथाविधि पूजा केल्यानंतर लीला नम्रपणानें म्हणाली:—'विप्र हो ! मृत्यूच्या तडाक्यांतून सुटण्याला मनुष्यानें कोणता उपाय योजावा ? हें मला सांगा.' राणीच्या त्या प्रश्नावर काय उत्तर द्यावें अशा विचारांत ब्राह्मण चूर झाले; तेव्हां तोच प्रश्न तिनें पुनः पुन्हां विचारला. अखेरीस ब्राह्मण म्हणाले, "असें होणें शक्य नाहीं. तपाचरण केल्यानें, मंत्र जपल्यानें किंवा नियमांचें अनुष्ठान केल्यानें सर्व तऱ्हेच्या सिद्धी प्राप्त होऊं शकतात हें खरें; पण असल्या साधनांचा अवलंब करण्यानें अमरत्व प्राप्त होणें सर्वथा अशक्य आहे." ब्राह्मणांचें हें भाषण ऐकून आपल्या प्रिय पतीचा वियोग सहन करावा लागेल या भीतीनें ती स्वतःशीं येणेंप्रमाणें विचार करूं लागली:—'माझ्या सुदैवानें भर्त्याच्या पूर्वी मला मृत्यु आला तर मग काय, सोन्याहून पिवळेंच झालें म्हणावयाचें ! कारण हा लोक सोडून परलोकीं गेल्यावर इकडची स्मृति नष्ट झाल्यामुळें मी पूर्णपणें सुखी होईन. परंतु असें न होतां हजारो वर्षांनीं कां होईना, पण माझा पति माझ्या अगोदर मरण पावला तर त्याचा जीव अंतःपुरांतून बाहेर पडणार नाहीं, अशी कांहीं तरी युक्ति मी योजीन. अशा रीतीनें माझ्या या अंतःपुरांत माझ्या भर्त्याचा जीव भ्रमण करीत राहिला म्हणजे मी केव्हांहि त्याच्या दृष्टिआड होणार नाहीं. अशा स्थितींत मी आपला काळ समाधानानें घालवीन; म्हणून आजपासूनच हो गोष्ट साध्य करून घेण्यासाठीं देवी सरस्वतीची जप, तप, उपवास, नियम वगैरे साधनांच्या योगानें आराधना करून तिला प्रसन्न करून घेतें म्हणजे झालें !' अशा रीतीनें बुद्धीचा निश्चय करून

त्याप्रमाणें होईल " असा आशिर्वाद देऊन समुद्रातील लाटेप्रमाणें अंतर्धान पावली. अशा रीतीनें त्या देवतेकडून इष्ट वर प्राप्त झाल्यामुळें मधुर गायन ऐकल्यानंतर हरिणी तृप्त होते, त्याप्रमाणें लीलाराणीला परम आनंद झाला. पुढें क्षण, दिवस, पक्ष, ऋतु वर्ष याप्रमाणें कालचक्र फिरतां फिरतां बराच काल उलटून गेल्यानंतर एखाद्या झाडाच्या पानांतील रस शुष्क होऊन जावा, त्याप्रमाणें तिच्या पतीच्या स्थूल देहांतील चैतन्यशक्ति लिंगदेहामध्यें क्षणांत अंतर्धान पावली.

अंतःपुरामध्यें त्याचा देह मृत होऊन पडलेला पहातांच कमलिनी जलाच्या अभावी कोमेजून जाते, त्याप्रमाणें लीलेचें शरीर अत्यंत म्लान झालें. ज्याप्रमाणें चक्रवाक पक्षाच्या वियोगामुळें चक्रवाकी आक्रोश करतां करतां अखेर मुकी होते, त्याप्रमाणें लीला पतिवियोगाच्या दुःखामुळें स्तब्ध आणि मरणोन्मुख झाली अशा रीतीनें शोकानें अति विव्हल झालेल्या लीलेवर कृपा करण्याच्या हेतूनें देवी सरस्वतीनें आकाशांत अदृश्य स्थितींत राहून, शुष्क सरोवरांत तळमळणाऱ्या मत्स्यीला वर्षाकाळाच्या आरंभीं पडणारी पाहिलीच वृष्टि समाधान देते, त्याप्रमाणें सदय अंतःकरणानें तिला धीर देण्यास सुरवात केली.

श्रीसरस्वति—वत्से ! आपल्या पतीचें शव या फुलांच्या राशीमध्यें आच्छादित करून ठेव. यांतील फुलें सुकून जाणार नाहींत व तुझ्या पतीचा देहहि नष्ट होणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर तुझा पति तुला लवकरच प्राप्त होईल. तुझ्या पतीचा जीव या अंतःपुरांतून केव्हांहि बाहेर जाणार नाहीं.

लीलेनें ही आकाशवाणी ऐकल्यानंतर अंतःपुरामध्यें आपल्या पतीचें प्रेत फुलांच्या राशीमध्यें आच्छादित करून ठेवलें. एखाद्या दरिद्री स्त्रीला जमिनींत पुरून ठेवलेल्या द्रव्याकडे पाहून समाधान वाटतें, त्याप्रमाणें तिला किंचित् बरें वाटलें. त्याच दिवशीं मध्यरात्रीं आपले सर्व नोकर चाकर गाढ निजलेले आहेत असें पाहून, आपल्या अंतःपुरांत बसून तिनें भगवती देवीचें एकाग्र चित्तानें ध्यान करण्यास सुरवात केली. ध्यानस्थ स्थितींत तिनें शोकानें देवीला हांक मारली. सरस्वति देवी. तिच्याजवळ येऊन म्हणाली,

श्रीसरस्वति---वत्से ! अशा मध्यरात्रीं तूं माझें स्मरण कशाकरितां केलेंस ? आणि तुझ्या शोकाचें कारण काय ? या संसाराची भ्रांति मृगजलाप्रमाणें जीवांना केवळ फसविण्याकरितांच भासमान होत असते.

लीला---देवि ! माझा भर्ता कोठें आहे ? त्याची स्थिति सध्यां काय आहे ? तो काय करीत आहे ? हें मला सांग, तसेंच मला त्याच्याजवळ घेऊन चल; कारण पतीशिवाय जिवंत राहण्याला मी असमर्थ आहे.

श्रीसरस्वति---चित्ताकाश, चिदाकाश आणि आपल्या डोक्यावरील आकाश असे आकाशाचे तीन भेद आहेत. चिदाकाश हें दुसऱ्या दोन आकाशांशिवाय राहूं शकतें व त्यालाहि त्याच्या स्वतःचाच आधार आहे. या चिदाकाशामध्यें अविद्येमुळें जशा जशा तऱ्हेनें भावना करावी, तशा तशा तऱ्हेचा प्रत्यक्ष अनुभव येतो व तोच आपल्या दुःखाला कारण होतो. आपली वृत्ति एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्याच्या दरम्यान जी मधली स्थिति क्षणभर अनुभवास येते, तेंच चिदाकाशाचें स्वरूप होय. मनांतील सर्व तऱ्हेचे संकल्प अस्तंगत झाल्यानंतर जी स्थिति रहाते, तेंच चिदाकाशरूपी परमपद असून तें पद तूं प्राप्त करून घेशील तर तुला शोक करण्याचें कारणच उरणार नाहीं. मात्र जगताचा अत्यंत अभाव आहे असा साक्षात् अनुभव आल्याशिवाय त्या परमपदाची प्राप्ति होऊं शकत नाहीं. परंतु हे सुंदरी ! मी दिलेल्या वराच्या प्रभावामुळें तें स्थान तुला निश्चयेंकरून प्राप्त होईल.

अशा रीतीनें लीलेशीं भाषण केल्यानंतर सरस्वतिदेवी* आपल्या दिव्य-स्थानीं जाऊन पोहोंचली. इकडे देवीचें भाषण ऐकल्यानंतर लीलेची वृत्ति तिच्या कृपेनें आपोआप एकाग्र होऊन निर्विकल्प समाधीमध्यें स्थिर झाली. एखादी पक्षीण आपल्या घरट्याच्या बाहेर पडून आकाशांत स्वैर संचार करूं लागते, त्याप्रमाणें एका क्षणांत स्थूल देहाचा त्याग करून तिनें चिदाकाशांतील दुसऱ्या एका ब्रह्मांडामध्यें प्रवेश केला, तो त्या ठिकाणीं तिला आपला पति सिंहासनावर बसलेला असून त्याच्या सभोंवतीं बसलेले मांडलिक राजे आपल्या सम्राटानें सांगितलेलें कार्य करण्यासाठीं उद्युक्त झालेले आहेत. नंतर आकाशरूपी अरण्यामध्यें पसरणाऱ्या धुक्याप्रमाणें तिनें वासनारूप सूक्ष्म देहानें त्या राजाच्या सभागृहामध्यें प्रवेश केला. परंतु केवळ

संकल्पामुळें भासणारी स्त्री पुरुषांच्या दृष्टीस पडत नाहीं, त्याप्रमाणें राजसभेमध्यें संचार करणारी लीला कोणाच्याहि दृष्टीस पडली नाहीं. एका नगरांतील मनुष्य दुसऱ्या नगरांत दिसावें, त्याप्रमाणें पूर्वी पाहिलेले राजासहवर्तमान सभागृहांतील लोक तिला या वेळीं आपल्या चिदाकाशरूपी आरशांत दिसून आले. त्या ठिकाणीं तेच देश, त्या देशांचे आचार, त्याच देशांमधील मुलें, त्याच तरुणी, तेच मंत्री, तेच राजे, तेच पंडित, तेच विदूषक, तेच सेवकजन, याशिवाय पूर्वी न पाहिलेले पंडित, मित्र, पौरजन तिला आढळून आले. आपला पति पूर्वीप्रमाणें वृद्ध नसून सोळा वर्षांचा तरुण आहे असें तिला दिसलें; तसेंच पूर्वी पाहिलेले ग्रामवासी आणि नगरवासी लोक तिला त्या ठिकाणीं दिसत होते. या सर्व लोकांना पाहून लीलेच्या मनांत असा विचार उत्पन्न झाला कीं, आपल्या पूर्वीच्या नगरांतील लोक मरण पावून या वासनामय नगरांत आले आहेत कीं काय? असा विचार तिच्या मनांत येत आहे तोंच सरस्वति देवीच्या वरामुळें ती पुन्हां आपल्या अंतःपुरांत गेली; व त्या ठिकाणीं मध्यरात्रीं पहातें तों आपले लोक खुशाल गाढ झोंप घेत पडले आहेत असें तिला दिसून आलें. नंतर आपल्या झोंपी गेलेल्या सख्यांना हांका मारून लीलेनें जागें केल्यानंतर ती त्यांना म्हणाली " मी अतिशय व्याकुळ झालें असून मला सभागृहांत घेऊन चला. नगरांतील सर्व लोकांनां सभागृहांत बोलावून आणून भर्त्याच्या सिंहासनाशेजारीं उभें राहून मी सर्व लोकांना डोळे भरून पाहीन, तरच माझें समाधान होईल व इतःपर जगूं शकेन." लीलेचें भाषण ऐकल्यानंतर तिचे नोकर चाकर जागे झाले आणि आपआपलीं कामें करूं लागले. नागरिकांनीं सभास्थान गच्च भरून गेल्यानंतर ती सुंदर लीलाराणी सभास्थानीं येऊन दाखल झाली, आणि सिंहासनाच्या नजीक मांडलेल्या एका सुवर्णासनावर जाऊन बसली. नंतर तिनें चोहोंकडे नजर फेकली, तों तिला आपले राजे, महाराजे, गुरुजन, सर्वमान्य सभासद, स्नेही, इष्टमित्र, बंधु, सखीजन वगैरे सर्व पूर्वीप्रमाणेंच दिसून आले. त्या सर्वांना पाहून तिला परम हर्ष झाला व चंद्र आपल्या शीतल किरणांनीं शोभूं लागतो, त्याप्रमाणें आपल्या राष्ट्रांतील प्रजाजन साध जिवंत आहेत असें पाहतांच तिच्या मुखावर आनंद झळकूं लागला.

" पतीच्या विरहानें दुःखित झालेल्या चित्ताचें मी अशा तऱ्हेनें कसें तरी सांत्वन करण्याचा प्रयत्न करतें, " अशा तऱ्हेचा आपला अभिप्राय लीलाराणीनें सभागृहांत जमलेल्या राजांना आपल्या एकंदर हालचालीनें सुचविल्यानंतर सभास्थानांतून उठून ती आपल्या अंतःपुरांत निघून गेली; आणि अंतःपुरांतील फुलांच्या राशीमध्यें झांकून ठेवलेल्या आपल्या प्रिय पतीजवळ जाऊन उभी राहिली. यावेळीं तिच्या मनांत अशा तऱ्हेचे विचार येऊं लागले:—' अहाहा ! ही किती विचित्र माया आहे, समाधीमध्यें असतां माझ्या राजधानींमधील सर्व लोक मला दिसत होते व आतां या ठिकाणींहि ते तसेच माझ्या दृष्टीस पडले. इतकेंच नव्हे, तर ज्या स्थितींत त्यावेळीं ते सर्व मला दिसले त्या स्थितींत या ठिकाणींहि दिसून आले. ताल, तमाल, हिंताल वगैरे वृक्षांनीं युक्त असलेले पर्वत मला समाधीमध्यें जसे दिसले, तसेच हुबेहूब सध्या या ठिकाणींहि दिसत आहेत. मायेचा हा केवढा विचित्र विलास आहे ! एखाद्या आरशाच्या बाहेर असलेला पर्वत आंत दिसतो, त्याप्रमाणें माझ्या चिदाकाशरूपी आरशामध्यें अखिल सृष्टि माझ्या अनुभवास आली. आतां या दोन सृष्टींमधील कोणती तरी एक सृष्टि खरी आणि एक खोटी असलीच पाहिजे. तरी या संबंधाचा निर्णय आताच्या आतां सरस्वतीदेवीकडूनच करून घेते म्हणजे झालें.' अशा रीतीनें चिंतन केल्यानंतर तिनें देवीचें ध्यान केलें. तत्क्षणीं कुमारीचें रूप धारण करून सरस्वतीदेवी तिच्या पुढें येऊन उभी राहिली. देवीला पाहतांच तिला बसण्यासाठीं लीलेनें आसन दिलें व देवी आसनस्थ झाल्यावर तिच्यापुढें आपण स्वतः जमिनीवरच बसली व म्हणाली,

लीलाः—हे देवी ! बाहेरच्या या आकाशांत आणि चिदाकाशांत अशा दोन्ही ठिकाणीं जी त्रिभुवनाची स्थिति दिसून आली, त्यापैकीं कृत्रिम सृष्टि कोणती ? आणि अकृत्रिम कोणती ? याचा उलगडा करून मला सांग.

*श्रीसरस्वतीः—लीले ! तुझ्या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वी कृत्रिम आणि* अकृत्रिम सृष्टि यांच्यासंबंधानें तुझी काय कल्पना झाली आहे ती मला अगोदर सांग.

लीलाः—याचें उत्तर अगदीं सोपें आहे. या ठिकाणीं तूं बसली आहेस

व मीहि वसलें आहे, हें आपल्याला प्रत्यक्ष दिसत आहे, म्हणून ही सृष्टि अकृत्रिम म्हणजे सत्य आहे असें मला वाटतें. आतां ज्या ठिकाणीं सध्या माझा पती राहिला आहे ती सृष्टि स्वप्नांत जगत् दिसतें त्याप्रमाणें मला भासली, म्हणून ती कृत्रिम म्हणजे काल्पनिक अर्थात् मिथ्या आहे, असें मला वाटतें व तो माझ्या पतीचा कृत्रिम सर्ग ह्या आपल्या अकृत्रिम म्हणजे खऱ्या सर्गापासून उत्पन्न झाला आहे असेंहि मला वाटतें.

श्रीसरस्वतीः—लीले! अकृत्रिम सर्गापासून कृत्रिम सर्ग उत्पन्न होणें केव्हांच शक्य नाहीं, कारण, कारणाहून कार्य विलक्षण म्हणजे भिन्न क्वचित्‌च उत्पन्न होतें असा सिद्धांत आहे.

लीलाः—माते! असें कां म्हणतेस? कारणाहून कार्य भिन्न असल्याचीं उदाहरणें प्रत्यक्ष दिसून येतात; याकरितां तूं म्हणतेस तो सिद्धांत बरोबर दिसत नाहीं. पाणी धारण करण्याचें सामर्थ्य मातीमध्यें नसतें हें खरें, परंतु मातीपासून बनलेल्या घटामध्यें पाणी रहात असल्याचें आपल्याला प्रत्यक्ष दिसत नाहीं कां?

श्रीसरस्वतीः—लीले! सहकारी कारणांच्या योगानें जें कार्य उत्पन्न होतें तें आपल्या मुख्य कारणाहून किंचित् भिन्न असल्याचा अनुभव येतो, हें तुझें म्हणणें मला कबूल आहे. परंतु तूं आपला भर्ता आतांच ज्या सर्गांत पाहिलास, तो सर्ग या सर्गांतील पृथ्व्यादिकांपासून उत्पन्न झाला आहे असें म्हणतां येत नाहीं. जर कदाचित् असें मानलें तर येथील पृथ्वी उडून त्या सर्गांत गेली असेल असें मानावें लागेल; मग ह्या सृष्टींत पृथ्वीचा अभाव आहे असें ठरूं लागेल. परंतु तसें असल्याचा अनुभव नाहीं. आतां ही सृष्टि स्वरूपतः कशी आहे याचा विचार करूं. ही सृष्टि उत्पन्न होण्याला कोणतींहि सहकारी कारणें नाहींत; आणि सहकारी कारणांच्या अभावीं म्हणजे कोणत्याहि तऱ्हेची सामग्री नसतांना कार्य उत्पन्न होऊं शकत नाहीं. परंतु हें सृष्टिरूप कार्य सहकारी कारणांच्या अभावीं उत्पन्न झालेलें दिसत आहे. म्हणून ह्या सृष्टींतील सहकारी कारणें नसलीं तरी पूर्व सृष्टींतील काम, कर्म, वासना वगैरे सहकारी कारणें मानणें भाग पडतें; असा सर्वांचा अनुभव आहे; व अशा तऱ्हेनें खऱ्या सहकारी कारणांच्या अभावीं उत्पन्न झालेले सर्ग कृत्रिम आहेत असेंच म्हणावें लागतें. म्हणून ह्या तुझ्या

पतीचा सर्ग व सध्याचा सर्ग दोन्हीहि कृत्रिम म्हणजे मिथ्या आहेत असेंच ठरतें.

लीलाः—देवि ! असें म्हणूं नकोस. आपल्यापुढें असलेली सृष्टि सत्य आहे व चिदाकाशांत दिसलेली माझ्या पतीची सृष्टि असत्य आहे असें मला वाटतें. या सृष्टीपासून ती असत्य म्हणजे कृत्रिम सृष्टि उत्पन्न झाली असें माझें मत होतें, हें खरें. परंतु त्यांत थोडा बदल करून मी आतां असें म्हणतें कीं, ह्या सत्य सृष्टीच्या संस्कारापासून माझ्या भर्त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली स्मृति त्या असत्य सृष्टीचें कारण आहे. स्वप्नस्थिति असत्य असते खरी, परंतु तिची उत्पत्ति जागृतींतील सत्य अनुभवाच्या स्मरणामुळें होते, त्याच प्रमाणें ही स्थिति आहे, असें म्हणण्याला काय हरकत आहे ?

सरस्वतिः—बाळे ! सृष्टीच्या संस्कारामुळें तुझ्या भर्त्यानें स्मरणरूपानें ती काल्पनिक सृष्टि उत्पन्न केली हें तुला कबूल आहे व यावरूनच ती सृष्टि असत्य आहे असें तुझें म्हणणें; परंतु हाच न्याय ह्या सर्गाला लावला असतां ह्याहि सर्ग मिथ्या ठरतो. अनुभवापासून संस्कार आणि संस्कारापासून स्मरण अशी परंपरा आहे व या परंपरेनें तो सर्ग ज्याप्रमाणें मिथ्या आहे, हें तूं कबूल करतेस, त्याप्रमाणें हा सर्गहि पूर्वी अनुभविलेल्या संस्कारांचें स्मरणरूपानें कार्य आहे; म्हणूनच हा सर्गहि असत्य आहे, असें कबूल करणें तुला भाग आहे.

लीलाः—देवि ! तूं म्हणतेस तें मला बरोबर पटलें. भर्त्यानें उत्पन्न केलेल्या ज्या सृष्टीमध्यें मी त्याला पाहिलें, ती स्मृतिरूप म्हणूनच मिथ्या आहे; त्याचप्रमाणें हा सर्गहि मिथ्या असला पाहिजे.

श्रीसरस्वतिः—लीले ! माझें म्हणणें तुला बरोबर समजलें. तुझ्या भर्त्याच्या आत्म्यामध्यें तो सर्ग असद्रूप असूनहि भासमान झाला; त्याचप्रमाणें चिदाकाशामध्यें तूं पाहिलेल्या सर्गाप्रमाणें सध्यांचा हा सर्गहि मिथ्या असून भासत असल्याचा माझा अनुभव आहे.

लीलाः—देवि ! तुझें म्हणणें मला पटलें. परंतु या असत् सर्गापासून माझ्या पतीचा तो भ्रामक सर्ग कसा उत्पन्न झाला तें मला सांग; म्हणजे

या जगद्भ्रमाची माझ्या ठिकाणीं निवृत्ति होऊन साक्षादि अनुभव तुझ्या-प्रमाणेंच होईल.

श्रीसरस्वतिः—बाळे! स्वप्नांतील भ्रामक सृष्टीप्रमाणें या जगताचा भ्रम पूर्वसंस्कारामुळें कसा भासमान होतो, हें मी तुला आतां सांगत आहे तें ऐक.

## मंडपाख्यान

चिदाकाशाच्या एका अत्यंत सूक्ष्म भागामध्यें 'संसार' या नांवाचा एक मंडप आहे. त्यावर कांचेप्रमाणें स्वच्छ असें आकाशरूपी छत आहे. मेरु हा त्यांतील मुख्य खांब असून त्यावर इंद्रादि लोकपाल आणि त्यांच्या स्त्रिया यांच्या प्रतिमा खोदलेल्या आहेत. चवदा भुवनें हे त्यांतील कोनाडे असून स्वर्ग, मृत्यु व पाताळ हे तीन मजले त्या मंडपांत आहेत. ब्रह्मदेव हा एक वृद्ध ब्राह्मण असून त्या मंडपरूपी घरांत त्याच्या संततीचा विस्तार वाढलेला आहे. अशा तऱ्हेच्या त्या मंडपाच्या एका कोपऱ्यांत मातीच्या ढेंकळाप्रमाणें भासणाऱ्या एका पर्वतावर वसलेल्या एका गांवांत एक ब्राह्मण रहात होता. तो स्वतः निरोगी असून त्याचें कुटुंब म्हणजे त्याची पत्नी व मुलें होय. वेष, वय, व क्रिया; तसेंच त्याच्या अंगची विद्या आणि वैभव वगैरे अनेक बाबतींत तो वसिष्ठमुनीसारखा होता. त्याचें नांवहि वसिष्ठच होतें. परंतु रामाला ज्ञानोपदेश करणारा सर्वमान्य वसिष्ठमुनि तो नव्हता. त्याची अरुंवती या नांवाची पत्नी होती. वसिष्ठ–अरुंवतीचें तें जोडपें वसिष्ठमहामुनि व त्याची पत्नी अरुंधती यांच्याप्रमाणेंच अगदीं हुबेहुब होतें. परंतु त्यांच्या ठिकाणची जीवन्मुक्तस्थिति मात्र या जोडप्याच्या ठिकाणीं नव्हती, एवढाच काय तो फरक. या जोडप्याचें एकमेकांवर फार प्रेम होतें. एक दिवस तो ब्राह्मण त्या पर्वताच्या शिखरावर बसला असतां त्याला त्या पर्वताखालीं मृगयेकरितां आलेला एक राजा दिसला. त्याच्या भोंवतालीं नोकरचाकरांचा फार मोठा परिवार, व पुष्कळसें सैन्य होतें. सोन्याचें व हिरेमाणकाचे अलंकार त्यानें अंगावर धारण केले होते. अशा तऱ्हेचें त्या राजाचें ऐश्वर्य पाहून वसिष्ठ ब्राम्हणाच्या मनांत, आपल्याला हें राजाचें ऐश्वर्य मिळेल कां? अशा तऱ्हेचे विचार त्या दिवसापासून घोळूं

लागले. पुढें कालमानानें तो वृद्ध होऊन आसन्नमरण झाला असें पाहून त्याची भार्या अत्यंत खिन्न झाली व नंतर तुझ्याप्रमाणेंच तिनें माझी आराधना केली. मी प्रसन्न झाल्यावर तिनें तुझ्याप्रमाणेंच असा वर मागितला कीं, 'देवि ! माझा भर्ता जरी मरण पावला तरी त्याचा जीव या घरांतून बाहेर जाऊं नये.' तिची ती प्रार्थना मान्य करून 'तुझ्या म्हणण्याप्रमाणें होईल' असा मी तिला वर दिला. पुढें कांहीं काळ लोटल्यानंतर तो ब्राम्हण मृत झाला. परंतु मी दिलेल्या वरामुळें त्याचा जीव त्याच्या घरांतून बाहेर न जातां त्याच ठिकाणच्या सूक्ष्म आकाशांतच पूर्वी केलेल्या दृढ संस्कारामुळें एका राजाच्या जन्माला गेला. पतीच्या शोकामुळें अखेरीस तीहि मरण पावली आणि स्थूल देहाचा त्याग करून सूक्ष्म देहानें आपल्या पतीच्या मागोमाग गेली व पतिसन्निध गेल्यामुळें तिला मोठा आनंद झाला. त्या ब्राह्मणाचा देह मरण पावल्याला आजचा आठवा दिवस असून त्याचा जीव अजून त्या मंडपांतच आहे ! हा वसिष्ठ ब्राम्हणच सध्या मृत झालेला तुझा पति होय व त्याची पत्नी जी अरुंधती तीच तूं आहेस ! याप्रमाणें मी तुमच्या पूर्व जन्माचा जो वृत्तांत सांगितला आहे, त्यावरून जीव ही चिदाकाशांत उत्पन्न झालेली केवळ भ्रांति आहे; तसेंच एक भ्रम खरा वाटूं लागला म्हणजे त्यापासून दुसरा भ्रम उत्पन्न होतो, हें तत्त्व तुझ्या लक्षांत आलेंच असेल. भ्रम हा स्वतःच्या दृष्टीनें असत्य असतो, पण अधिष्ठानाच्या दृष्टीनें पाहिलें वर तो सत्य असतो. यासाठीं 'कोणता सर्ग कृत्रिम–भ्रांतिमय आणि कोणता अकृत्रिम–सत्य' असा जो प्रश्न तूं मला विचारला होतास तो आतां निरर्थक ठरतो. कारण, सर्वच सर्ग एकजात मिथ्या होत.

लीला—वसिष्ठ ब्राह्मण आणि त्याची पत्नी म्हणजेच माझा पति व मी, असें तूं म्हणतेस. परंतु हें संभवेल तरी कसें ? कारण त्या वसिष्ठ ब्राह्मणाच्या लहानशा घरांतील आकाशामध्यें आमचें हें राज्य, समुद्र, पर्वत अरण्यें वगैरे विस्तीर्ण वस्तूंचा समावेश होणें शक्य दिसत नाहीं !

श्रीसरस्वती—लीले ! मृत्यूची स्थिति म्हणजे एक प्रकारचें स्वप्न,-स्थितिच आहे. खेडेगांवांत राहणारा तो वसिष्ठ ब्राह्मण मृत झाल्यानंतर

त्याच्या जीवात्म्याला त्या घरांतील आकाशरूपी आत्म्यामध्ये हें तुमचें विशाल राष्ट्र, पर्वत, अरण्यें वगैरे विस्तीर्ण भूमि दिसली, तरी स्वप्नाप्रमाणें तो केवळ त्याच्या कल्पनेचाच खेळ होय. स्वप्न, भ्रम, मनोराज्य यांच्यामधील आपला अनुभव वस्तुतः मिथ्या असून त्याच्या सत्यत्वाबद्दल आपल्याला भ्रम होतो. त्याप्रमाणें या सृष्टींतील स्थिति आहे. तो केवळ आपल्या कल्पनेचा विलास आहे. चिदात्म्याच्या प्रत्येक परमाणूमध्यें हजारों जगें भरलेलीं आहेत. मग त्या ब्राह्मणाच्या घरांतील आकाशामध्यें त्याचा जीवात्मा, तसेंच समुद्रवलयांकित पृथ्वीचें हें तुमचें विस्तीर्ण राज्य आहे, यांत शंका नाहीं. तुझें हें राजमंदिर त्या ब्राह्मणाच्या घरांतील आकाशामध्येंच वास्तविक आहे, हें लक्षांत ठेव. परंतु तूं पूर्वीच्या जन्माची स्थिति आतां विसरली आहेस आणि सध्याची स्थितीच तुला खरी वाटूं लागली आहे, म्हणून वरील वस्तुस्थिति तुझ्या ध्यानांत येत नाहीं.

लीला—देवि ! तूं म्हणतेस तें बरोबर आहे. पण तो वसिष्ठ ब्राह्मण मृत झाल्याला आज आठ दिवस झाले आहेत, असें तूं म्हणालीस; आणि आम्ही तर या ठिकाणीं जन्माला येऊन किती तरी काळ लोटून गेला आहे. तेव्हां तो वसिष्ठ ब्राह्मण आणि त्याची पत्नी अरुंधती म्हणजेच आम्ही, ही गोष्ट संभवेल तरी कशी ?

सरस्वति—बाळे ! या मायिक सृष्टींत देशाचा विस्तार जसा एखाद्या परमाणूमध्यें दिसतो, त्याचप्रमाणें काळाचा विस्तारहि थोड्याच काळांत भासमान होतो. कारण जगाच्या कल्पनेप्रमाणें देश, काल हीहि केवळ कल्पनाच आहे. मी, तूं ह्या कल्पनांच्या जाळ्यांत गुरफटून गेल्यामुळें ज्यांना जन्म प्राप्त झाला आहे, त्यांनांच क्षणकल्पादि कालभेदाचा भ्रम कोणत्या क्रमानें होतो तें ऐक; म्हणजे तुझ्या शंकेचें निरसन होईल. मरण मूर्छेचा क्षणमात्र अनुभव घेतल्यानंतर जीवाला आपल्या पूर्व जन्माचा व कर्माचा विसर पडतो; व त्याला दुसरा देह भावनेमुळें दिसूं लागतो. तो नवा देह आपला आधार आहे व आपण आधेय आहों म्हणजे त्यामध्यें राहिलेलें आहों, अशी कल्पना जीवाच्या ठिकाणीं उत्पन्न होते. नंतर हात, पाय वगैरे अवयवांनीं युक्त असलेला देह माझा आहे, अशी तो दृढ भावना

करतो. सारांश, जीव ज्या ज्या तऱ्हेची भावना करतो, त्या त्या. तऱ्हेचा आपला देह बनलेला आहे, असें त्याच्या प्रत्यक्ष अनुभवाला येतें. मी अमुक गृहस्थाचा मुलगा, मला जन्माला येऊन इतकीं वर्षे झालीं, हे माझे आप्त-बांधव, हें माझें रमणीय गृह, अशा तऱ्हेचे लक्षावधि संकल्प जीव करूं लागतो. परंतु अशा तऱ्हेनें चित्तामध्यें संसाराची उत्पत्ति होत असली तरी वास्तविक कांहींच उत्पन्न होत नाहीं; तर केवळ निर्मल असें चिदाकाशच असतें; व तेंच, चित्त व चित्ताचा विषय जो संसार यांच्या रूपानें भासमान होतें. स्वप्नांतील चैतन्य, स्वप्नांतील दृश्य आणि स्वप्नांतील द्रष्टा बनतें, त्याचप्रमाणें जाग्रतींतील स्थिति आहे. आतां कालाचा अनुभव सर्वांना केव्हांच सारखा येत नसतो. कारण कालाचा अनुभव मनाच्या परिस्थितीवर अवलंबून आहे. हरिश्चंद्र राजाला एका रात्रींत बारा वर्षे लोटून गेलीं, असा अनुभव आल्याचें पुराणांतरीं वर्णन केलेलें आहे. ज्याचा आपल्या स्त्री-पासून वियोग झाला आहे अशा मनुष्याला एक दिवस लोटला तरी तो त्याला वर्षाप्रमाणें वाटतो व स्त्रीचा संयोग झाला म्हणजे तिच्या सहवासांत वर्षेच्या वर्षे क्षणाप्रमाणें गेलीं असें वाटतें. सारांश, या जगांतील आपला सर्व व्यवहार स्वप्नस्थितींतील व्यवहाराप्रमाणें मायिक आहे हें पक्कें लक्षांत ठेव.

लीला—देवि ! खरोखर ही अद्‌भुत दृष्टि तूं मला दिलीस व या दृष्टीमुळें माझ्या अंतःकरणांत जागृति उत्पन्न झाली आहे. ही दृष्टि मी आपल्या ठिकाणीं अभ्यासानें बाणवून घेणार आहे. पण तसें करापर्यंत तो वसिष्ठ ब्राह्मण व त्याची पत्नी ज्या सर्गामध्यें आणि ज्या पर्वतावरील गांवामध्यें रहात असत, त्या ठिकाणीं मला घेऊन चल.

सरस्वति—तूं अगोदर पूर्वीप्रमाणें निर्विकल्प समाधीचा आश्रय करून ह्या आपल्या देहावरील ममता काढून टाक. म्हणजे तुझा देह दिव्य बनून तुला मायाकाशांत पाहिजे तिकडे संचार करतां येईल व त्या ठिकाणीं तुला त्या ब्राह्मणाचा सर्ग निःसंशय दृष्टीस पडेल.

अशा रीतीनें सरस्वती देवीचें भाषण ऐकून लीलेनें निर्विकल्प समाधि लावली व सरस्वती देवी आपल्या नेहमींच्या आतिवाहिक देहानें चिदाकाशांत संचार करूं लागली. लीलेचा देह मात्र ध्यानानें या वेळेपुरतां सूक्ष्म-

झालेला होता व त्या देहानें तीहि चिदाकाशांत फिरूं लागली. . परंतु हें त्याचें आकाशांतील गमन सुद्धा वास्तविक खरें नव्हतें. त्या आपल्या राजमंदिरांतील अंतःपुरांतच होत्या. चिदाकाशांत उंच गेल्यावर आपल्या भावनेमुळें त्यांना परस्पराचे सूक्ष्म देह दिसले व त्यांची चिदाकाशांत पुनः भेट झाली. हातांत हात घालून त्या दोघीजणी आकाशांत फार उंच गेल्या. तें आकाश इतकें विशाल होतें कीं कोट्यवधि जगें, त्यांत भरलीं होतीं तरीहि तें रिकामेंच आहे, असें वाटत होतें. अशा रीतीनें त्या दोघी सुंदर स्त्रिया चिदाकाशांतील निरनिराळी शोभा पाहून वसिष्ठ ब्राह्मण ज्या ब्रह्मांडांत रहात होता त्या ब्रह्मांडांत येऊन पोहोंचल्या. पुढें आकाशांतून खालीं उतरून गिरिग्रामांतील वसिष्ठ ब्राह्मणाच्या घराचें निरीक्षण त्यांनीं स्वतः अदृश्य राहूनच केलें. त्या घरांतील सर्व माणसें दुःखी कष्टी पाहून लीलेला फार वाईट वाटलें. 'आम्ही दोघींनीं या बांधवांना प्रत्यक्ष दिसावें' असा विचार लीलेच्या मनांत येतांच त्या दोघी स्त्रिया त्यांच्या ठिकाणीं असलेल्या दिव्य शक्तीमुळें त्या घरांतील मनुष्यांना दृश्यरूपानें दिसूं लागल्या. कारण ज्ञानाच्या दृढ अभ्यासामुळें एखाद्या देवाप्रमाणें लीला सत्यसंकल्प झाली होती. त्या दोघी जणींना पहातांच वसिष्ठ ब्राह्मणाचा ज्येष्ठ मुलगा ज्येष्ठशर्मा आणि घरांतील इतर मंडळी यांनीं " वनदेवींनो! तुम्हाला नमस्कार असो " अशा शब्दांनीं त्यांचा सत्कार केला व ज्येष्ठशर्मा म्हणाला:—

ज्येष्ठ शर्मा—दैवतांनो! या घरांत राहणारे आमचे आईबाप थोडे दिवसांपूर्वी आपले घरदार सोडून स्वर्गवासी झाले, यामुळें आम्हांला हें त्रिभुवन अगदीं शून्य दिसूं लागलें आहे. यासाठीं आमचें दुःख नाहींसें होण्याकरितां कांहीं तरी उपाय सांगा. कारण, महात्म्यांचें पुण्यकारक दर्शन केव्हांहि निष्फल होत नाहीं.

ज्येष्ठशर्म्याचें अशा तऱ्हेचें भाषण ऐकल्यानंतर लीलेनें पुत्रप्रेमानें त्याच्या मस्तकाला स्पर्श केला. त्याबरोबर त्याचें सर्व दुःख नाहींसें झालें. अशा रीतीनें त्या भुवनांतील पर्वतावरील वसिष्ठ ब्राह्मणाच्या गांवामध्यें ज्येष्ठशर्म्यादिकांच्यापुढें उभ्या असतां त्या दोघी जणी क्षणांत अंतर्धान पावल्या.

पुनः आपल्या संकल्पानुसार चिदाकाशांत एकमेकींना भेटल्यावर सरस्वती देवीनें लीलेला विचारलें कीं, ' आतां तुला कांहीं विचारावयाचें आहे का ? '.

लीलाः—देवी ! माझा मृत पति ज्या ठिकाणीं राज्य करीत आहे त्या ठिकाणीं मी पूर्वी गेले होतें, पण त्या ठिकाणच्या लोकांना मी दिसलें नाहीं, आणि आतां या ठिकाणीं तेवढी मी आपल्या पुत्राच्या दृष्टीस पडलें, ह्या असा फरक पडण्याचें कारण काय ?

श्रीसरस्वतीः—वत्से लीले ! त्या वेळीं तुझा स्वरूपाचा अभ्यास दृढ झालेला नसल्यामुळें तुझ्या ठिकाणची द्वैतबुद्धि व देहाभिमान नाहींसा झाला नव्हता. परंतु आतां समाधीच्या अभ्यासामुळें तो नाहींसा होऊन तुझ्या ठिकाणीं सत्यसंकल्पत्व आलें आहे. त्याचमुळें तूं आपल्या पुत्राला दिसलीस. इतकेंच नव्हे तर लीले ! या वेळीं आपल्या पतीच्या सन्निध जाऊन त्याला दिसावें अशी इच्छा करशील, तर तूं त्याला दिसून त्याच्याशीं संभाषणहि करूं शकशील.

लीलाः—देवि ! तुझ्या भाषणामुळें माझ्या शंकेचें निरसन झालें. ह्याच गृहाकाशांत माझा पति-वसिष्ठ ब्राह्मण-मृत झाला. नंतर याच ठिकाणीं तो भूमंडलाचा अधिपति झाला. याच आकाशांतील संसारामधील त्याच्या राजधानीमध्यें मी राणी झाले. यामधील अतःपुरांतच माझा पति-पद्मराजा मरण पावला; व या अंतःपुरांतील आकाशांतच तो पुनः भूपति झाला. अशा रीतीनें अखिल वस्तूंना अधिष्ठानभूत असलेल्या कूटस्थ चैतन्यामध्येंच हे सर्व विकार मायेमुळें भासत आहेत. एखाद्या करंड्यांतील मोहरीच्या दाण्याप्रमाणें सर्व ब्रह्मांडमंडलें मला या गृहाकाशामध्येंच दिसलीं. देवि ! माझ्या भर्त्याचें ब्रह्मांड या ठिकाणीं आहे, त्याबद्दल मला आतां मुळींच शंका राहिली नाहीं. परंतु माझा पति या ठिकाणीं मला प्रत्यक्ष दिसेल असा कांहीं तरी उपाय कर.

श्रीसरस्वतीः—लीले ! या मंडपाकाशामधील आपल्या तीन पतींचा तूं उल्लेख केलास, पण त्यावरून तुझे पति तीनच झाले आहेत असें मात्र

समजूं नकोस. तुझे आजपर्यंत कितीतरी पति झाले आहेत ! अलीकडच्या तीन पतींपैकीं एकाचें म्हणजे वसिष्ठ ब्राह्मणाचें शरीर जळून गेलें आहे. तुझ्या दुसऱ्या पतीचें म्हणजे पद्मराजाचें शव तुझ्या अंतःपुरांत पुष्पांच्या राशीमध्यें आहे. आतां तुझा तिसरा पति ह्याच संसारमंडपांतील आकाशांत राजा झाला आहे. तो घोर संसारांत पडला आहे. या तुझ्या तीन भर्त्यांपैकीं कोणत्या भर्त्याजवळ मी तुला घेऊन जाऊं तें सांग.

लीलाः—देवी ! तूं म्हणतेस तें अगदीं बरोबर आहे. मला आतां मागचें सगळें आठवलें ! माझा हा जन्म मनुष्यकोटींतील असल्यामुळें तमोगुणी नाहीं किंवा सत्त्वगुणीहि नाहीं; तर रजोगुणी आहे. या कल्पाच्या आरंभीं हिरण्यगर्भापासून अवतीर्ण झाल्यानंतर आजपर्यंत निरनिराळ्या योनींमध्यें माझे जे आठशें जन्म झाले, ते सर्व माझ्या दृष्टीपुढें या वेळीं प्रत्यक्ष दिसत आहेत. तुझ्या कृपाप्रसादामुळें मला मागल्या जन्मांतील तसेंच त्यापूर्वींच्या अनेक जन्मांतील सर्व गोष्टी इत्थंभूत आठवूं लागल्या आहेत.

अशा रीतीनें भाषण केल्यानंतर लीलेनें सरस्वतीसह आकाशांत उड्डाण करून स्वर्गादिलोकांचें व सूर्यमंडलादिकांचें उल्लंघन करून त्या ब्रह्मांडाच्या वरच्या शकलांवर त्या दोघी अनायासानें जाऊन पोहोचल्या. ब्रह्मांडकोशांतून बाहेर आल्यावर लीलेला एकापेक्षां एक दसपट आकाराचीं पृथ्वी, उदक, तेज, वायु व आकाश यांचीं अफाट आवरणें दिसलीं व तीं एका क्षणांत ओलांडून लीला परमाकाशांत जाऊन पोहोचली. त्या ठिकाणीं पूर्वींसारखीं पंचमहाभूतांच्या आवरणासहित कोट्यवधि ब्रह्मांडें सूर्यप्रकाशांत भासणाऱ्या त्रसरेणूप्रमाणें ( म्हणजे सूर्याच्या कवडशांत उडणारे रजःकण ) लीलेला आढळून आलीं. त्या ब्रह्मांडांपैकीं एका ब्रह्मांडांत लीला व सरस्वती देवी यांनीं क्षणांत प्रवेश केला व आपल्या राजमंदिरांतील अंतःपुरांत जाऊन लीलेनें पाहिलें तों आपल्या पतीचें ( पद्मराजाचें ) शव जसेंच्या तसें फुलांच्या राशींत आहे, त्या शवाच्या बाजूला आपलें शरीर समाधींत स्थिर झालेलें आहे; असें तिला आढळून आलें. नंतर आपल्या पतीच्या पुढच्या सर्गाला पाहण्याच्या इच्छेनें त्या संकल्पदेहानें लीला पुनः



सरस्वती देवीसह ब्रह्मांडाच्या बाहेर आल्यावर लीलेला परमाकाशांत कोट्यवधि ब्रह्मांडें आढळून आलीं. ( पृष्ठ २४ ).

आकाशांत उडून गेली; आणि भूतलांचीं आवरणें व ब्रह्मांड संपुटाचें कवच यांचें उल्लंघन करून आपल्या नव्या पतीच्या काल्पनिक संसार मंडलांत जाऊन उतरली आणि त्या ठिकाणीं लीलेच्या नव्या पतीचें राज्य त्या दोघींच्या दृष्टीस पडलें.

या वेळीं सिंधु देशाच्या उन्मत्त राजानें आपल्या मांडलिक राजांच्या मदतीनें लीलेचा पति, ज्या देशांत राज्य करीत होता, त्यावर आपल्या सैन्यानिशीं चाल केली. यामुळें लीलेच्या पतीला स्वसंरक्षणासाठीं लढाई करणें भाग पडलें. अशा तऱ्हेनें दोन्ही राजांचें भयंकर युद्ध जुंपलें. भूतलावरील युद्धाचा देखावा पहावा म्हणून लीला व सरस्वती देवी यांनीं या वेळीं एका रमणीय परंतु काल्पनिक विमानांत बसून रणभूमीचें निरीक्षण करण्यास सुरवात केली. तों लढाईला प्रत्यक्ष तोंड लागलेलें त्यांना दृष्टीस पडलें. अशा तऱ्हेनें सर्व दिवसभर युद्ध होऊन सूर्यास्ताच्या वेळीं दोन्ही सैन्यांतील योद्धे लढाई बंद करून रणभूमीवरून परत फिरले. विदूरथ राजाहि आपल्या मंदिरांत येऊन निजला असतां लीला आणि सरस्वतिदेवी यांनीं आपल्या अतिवाहिक ( सूक्ष्म ) शरीरानें विदूरथ राजाच्या शयनगृहांत एका लहानशा फटींतून प्रवेश केला. ती मध्यरात्रीची वेळ असून सर्व लोक स्वस्थ निजले होते. त्या देवींची दिव्य प्रभा त्या मंदिरांत सर्वत्र फांकल्यामुळें अमृताचा वर्षाव झाल्यामुळें मनुष्य जागा होतो, त्याप्रमाणें विदूरथ राजा एकदम जागा झाला व त्या देवींना पाहून त्या राजानें आपल्या हातांतील फुलें त्या देवींच्या चरणकमलांवर वाहिलीं. नंतर लीलेच्या पतीचा वृत्तांत समजावा या हेतूनें सरस्वतिदेवीनें त्या राजाच्या शेजारीं निजलेल्या त्याच्या मंत्र्याला आपल्या संकल्पानें जागृत केलें व सरस्वतीदेवी राजाला म्हणाली:—' हे राजा, तूं कोण ? कोणाचा मुलगा ? या ठिकाणीं तूं केव्हां जन्माला आलास ?' या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास मंत्र्यानें प्रारंभ केला, " देवींनो ! इक्ष्वाकु वंशांत उत्पन्न झालेल्या नभोरथ महाराजांचे चिरंजीव विदूरथ महाराज हे आमचे विख्यात महाराज आहेत. महाराणी सुमित्रा नांवाच्या मातेच्या उदरीं यांचा जन्म झालेला असून हे दुसरे कार्तिकेयस्वामीच आहेत कीं काय असें वाटतें. हे दहा वर्षांचे होतात न होतात तोंच यांच्यावर सर्व राज्यकारभार सोपवून यांचे

वडील नभोरथ महाराज तपश्चर्या करण्याकरितां अरण्यांत निघून गेले. त्या वेळेपासून स्वधर्माला अनुसरून हे आपल्या पुत्राप्रमाणें प्रजेचें पालन करीत आहेत." असें मंत्र्याचें भाषण ऐकल्यानंतर 'राजा! तूं आपल्या पूर्व-जन्माचें विचारपूर्वक स्मरण कर.' असें बोलत सरस्वतीदेवीनें विदूरथ राजाच्या मस्तकाला आपल्या हाताचा स्पर्श केला. त्याबरोबर आपल्या पूर्व जन्माचा वृत्तांत त्याच्या अंतःकरणांत स्फुरण पावूं लागला व 'हा संसार मायेच्या विलासानें कसा ओतप्रोत भरलेला आहे! परंतु या देवीच्या प्रसादानुळें मला त्याचें वास्तविक स्वरूप आज समजलें आहे' असें आपल्याशीं उद्गार काढल्यानंतर तो म्हणालाः—'हे देवतांनो! माझा पूर्वीचा (पद्मराजाचा) देह मरून पडल्याला अवघा एकच दिवस झालेला आहे व या ठिकाणीं या देहांत सत्तर वर्षांचा काळ गेल्याचा मला अनुभव येत आहे! तरी हें कसें याचा कांहींच उलगडा होत नाहीं.

श्रीसरस्वतिः—राजा, मरणरूपी दीर्घ मूर्च्छा संपल्यावर मायेच्या आवरणानें आच्छादित झालेल्या चिदाकाशांतील गिरिग्रामामध्यें राहणाऱ्या ब्राह्मणाच्या घरांतच पद्मराजाचा लोक असून त्यांतील राजगृहामधील आकाशांत हा तुझा ब्रह्मांड मंडप आहे व त्यांतच तुझा सध्याचा जन्म भासत आहे. आतां त्या वसिष्ठ ब्राह्मणाचें जगच तुझ्या प्रतीतीला येत आहे असें नसून प्रत्येकाचें जग भिन्न आहे. परंतु हा तीन प्रपंचांचा देखावा तुझ्या हृदयांतील निर्मळ चिदाकाशांत केवळ चित्ताच्या विकारा-मुळें भासला. परंतु ही सर्व निव्वळ भ्रांति आहे. ज्याप्रमाणें स्वप्नांतील एका क्षणांत शंभर वर्षे उलटून गेल्याचा भास होतो, मनोराज्यामध्यें मनुष्याला जीवनाची तऱ्हतऱ्हेची स्थिति व मरणाचा प्रसंग यांचा प्रत्यय येतो, त्याचप्रमाणें तुझ्या दृढ वासनेमुळें ही मिथ्या भ्रांति तुझ्या चित्तांत दृढमूल झाली परंतु राजा! वस्तुतः तूं जन्माला आला नाहींस तसा मरणाहि पावणार नाहींस! कारण तूं शुद्धविज्ञानरूप, निश्चल आणि निर्विकार परब्रह्मरूप आहेस. तुझ्या भोंवतालचे लोक जरी तुला सध्या भासत असले तरी ते वास्तविक मिथ्याच आहेत. स्वस्वरूपावरील अज्ञानरूपी मेघ गलित होऊन आत्मबोधानें ज्याचें अंतःकरण निर्मळ व परिपूर्ण बनलेलें आहे, त्याच्या दृष्टीनें हे राजा! 'मी' व 'जगत' हे शब्द निरर्थक आहेत!

अशा रीतीनें सरस्वति देवीनें विदूरथ राजावर बोधामृताचें सिंचन केलें व त्यामुळें त्याच्या हृदयांत विवेकाचा सुंदर अंकुर उदय पावला. शेवटीं ती विदूरथ राजाला म्हणाली,

श्रीसरस्वतीः—राजा! तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. जगताचा हा भ्रम कसा उत्पन्न होतो हें लीलेला दाखविण्यासाठींच आम्ही याठिकाणीं आलों होतों. आमचें तें काम झालें असून आम्ही आतां परत जातों.

सरस्वती देवीनें केलेलें हें भाषण ऐकल्यानंतर विदूरथराजा मोठ्या आनंदानें म्हणालाः-

विदूरथराजाः—देवि! एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत जावें त्याप्रमाणें लवकरच या देहाचा त्याग करून आपल्या पूर्व देहांत—पद्मराजाच्या शरीरांत—प्रवेश करावा, अशी माझी इच्छा आहे. तरी माझ्याकडे कृपादृष्टीनें पहा व माझी इच्छा पूर्ण कर. मी ज्याठिकाणीं जाईन त्या त्या ठिकाणीं हा माझा मंत्री आणि ही कुमारी माझ्याबरोबर येतील असाहि मला आणखी एक वर दे.

श्रीसरस्वतीः—राजा! तुझी कामना पूर्ण होईल. या रणसंग्रामांत तूं आज मरण पावशील आणि नंतर तुला आपलें पूर्वजन्मांतील राज्य प्राप्त होईल. तसेंच तूं हा मंत्री व ही कुमारी यांच्यासह आपल्या राजधानींत जाऊन तेथील अंतःपुरामध्यें पुष्पांच्या राशींत असलेल्या पूर्वीच्या म्हणजे पद्मराजाच्या शरीरांत प्रवेश करशील. आम्ही जशा आलों तशा परत जातों.

अशा तऱ्हेनें सरस्वतिदेवी व विदूरथराजा यांचा संवाद चालला असतां शत्रूनें विदूरथराजाच्या राजधानीला वेढा दिला व नगरीला आग लावल्यामुळें जिकडे तिकडे लोक त्या आगींत दग्ध होऊं लागले. इतक्यांत विदूरथ राजाची राणी त्या राजमहालांत शिरली. तिच्या मागोमाग तिच्या मैत्रिणी व दासी आल्या. त्यांनीं विदूरथ राजाला अंतःपुरांत घडून आलेल्या अत्याचाराची हकीगत सांगितली. ती ऐकून लीला व सरस्वतिदेवी यांना उद्देशून-" देवतांनो! हा पहा मी युद्धाकरितां चाललों! मला क्षमा करा. ही माझी भार्या तुमच्या चरणकमलांची दासी आहे. तरी आपण तिचें

रक्षण करालच " असे उद्गार काढून मोठ्या क्रोधानें आपल्या महालांतून शत्रूशीं युद्ध करण्याकरितां तो एकाएकीं निघून गेला. आरशांत आपलें प्रतिबिंब पडावें त्याप्रमाणें ती लीला राणीची रमणीय आकृति हुबेहुब आपल्यासारखीच आहे असें प्रबुद्धलीलेला आढळून आलें. हा चमत्कार आपल्या पतीच्या मरणसमयीं झालेल्या वासनांचा व आपल्या स्वतःच्या तत्सदृश भावनांचाच आहे, अशी सरस्वतीदेवीनें लीलेची समजूत करून दिली. नंतर विदूरथाच्या लीलेला म्हणाली की, " लीले ! तुझा पति विदूरथ राजा आज रणांगणामध्यें देहत्याग करील आणि आपल्या पूर्व जन्मांतील पद्मराजाच्या देहांत प्रवेश करील. " हें ऐकून विदूरथलीला म्हणालीः— "रणांगणांत देह पडल्यानंतर माझा पति ज्या ठिकाणीं जाईल त्या ठिकाणीं मी त्याची पत्नी व्हावें, हा वर मला कृपाकरून दे. " सरस्वती देवीनेंहि तिच्यावर प्रसन्न होऊन तिला तो वर दिला.

विदूरथ राजाच्या मंदिरांत त्या देवीचा अशा रीतीनें संवाद चालला असतां विदूरथराजा आपल्या सैन्यासह रणभूमीवर जाऊन आपल्या शत्रूवरोबर युद्ध करूं लागला. दोन्हीहि राजे धनुर्विद्या व अस्त्रविद्या यांमध्यें मोठे प्रवीण होते, त्यामुळें दोघांनीं निरनिराळ्या अस्त्रांचा प्रयोग केल्यामुळें तें युद्ध फारच भयंकर झालें. अशा तऱ्हेनें युद्ध चालू असतां सिंधूराजानें शस्त्रप्रहार केल्यामुळें विदूरथराजा घायाळ होऊन पडला व शेवटीं त्याला आपल्या राजमंदिरांत परत आणल्यावर तो मृत्यु पावला. तें पाहातांच त्याची लीलाराणी मूर्च्छित पडली. लागलीच त्या लीलेच्या जीवात्म्यानें पूर्व शरीराचा त्याग करून सूक्ष्म देहाचा स्वीकार करून प्राणरूपानें दुसऱ्या देहांत प्रविष्ट होण्याची तयारी केली; व मरणकालच्या मूर्च्छेमध्यें त्या गृहांतील आकाशांतच तशी भावना केल्यामुळें त्याला नवा देह लगेच दिसूं लागला. अशा तऱ्हेनें ती लीला पद्मराजाच्या ब्रह्मांडांत आपल्या स्वमदेहानें प्रविष्ट होऊन आपल्या भर्त्याशीं समागम पावली.

इकडे मरणाच्या मूर्च्छेचा पगडा नाहींसा झाल्यावर विदूरथराजाचा जीवात्मा आपला पुढील व्यवहार पाहूं लागला. यमाच्या दूतांनीं आपल्याला आकाशांत ओढून नेलें आहे व अखेरीस आपण यमलोकांत येऊन पोहोंचलों आहोंत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. नंतर विदूरथाच्या

कर्मांची चौकशी करून यम आपल्या दूतांना म्हणालाः–' या विदूरथानें पातकें केव्हांच केली नाहींत व भगवती सरस्वतीदेवीच्या कृपाछत्राखालीं हा लहानाचा मोठा झाला आहे.. याचा पूर्वीचा देह (पद्मराजाचा) त्याच्या अंतःपुरांतील पुष्पांच्या राशीमध्यें शवरूपानें राहिला आहे. यासाठीं या विदूरथाला सोडा आणि त्याला आपल्या अतिवाहिक देहानें अंतःपुरांतील शवामध्यें प्रवेश करूं द्या. ' आपल्या स्वामीची ही आज्ञा ऐकतांच यमदूतांनीं आपल्याला सोडून दिले आहे असें विदूरथराजाच्या जीवात्म्याला दिसलें. त्या दोघी देवी विदूरथाच्या जीवसंविदेमागून आपल्या संकल्पित देहानें चालल्या होत्या. पण त्या दोघी त्याला दिसल्या नाहींत. चिदाकाशांतून जातां जातां अनेक लोकांचें उल्लंघन करीत करीत त्या ब्रह्मांड मंडलाच्या बाहेर पडून दुसऱ्या एका ब्रह्मांडमंडलांत प्रविष्ट झाल्या. त्यांतील भूमंडलावर आल्यानंतर पद्मराजाच्या नगरांतील लीलेच्या अंतःपुरांत विदूरथाचा जीवात्मा येऊन पोहोंचला. त्याच्या मागोमाग लीला व सरस्वतिदेवी एका क्षणांत अनायासें पद्मराजाच्या अंतःपुरांत शिरल्या, तोंच त्या ठिकाणीं त्याच्यापूर्वी पद्मराजाच्या शवाच्या बाजूला येऊन उभी राहिलेली विदूरथाची लीला त्यांच्या दृष्टीस पडली. लागलीच सरस्वती देवीनें आपल्या संकल्पमात्रानें विदूरथराजाच्या जीवाला पद्मराजाच्या शवांत शिरतांना निरोध केला.

प्रबुद्धलीलाः—देवि ! पद्मराजाचा देह शव होऊन या पुष्पराशींत ठेवला गेला आणि मी समाधिस्थितींत लीन झाले या गोष्टीला पद्मसृष्टींतील किती काळ लोटून गेला, तें मला सांग.

श्रीसरस्वतिः–बाळे ! पद्मसृष्टींतील या अंतःपुरांत तुझा देह समाधींत लीन झाल्याला बरोबर एक महिना झाला आहे. समाधिस्थितींत प्रवेश केल्यानंतर पंधरा दिवसांनीं तुझा देह निर्जीव होऊन जमिनीवर पडला. तूं मृत झाली आहेस असें मंत्रिमंडळानें ठरवून त्यांनीं तुझें प्रेत राजमंदिरांतून बाहेर काढलें व चंदनाच्या काष्ठांनीं बनविलेल्या चितेवर तुझें प्रेत ठेवून तें दग्ध केलें. आतां तूं या ठिकाणीं सशरीर आली आहेस असें पाहातांच आमची लीलाराणी परलोकांतून आली आहे असें वाटून सर्व लोक आश्चर्यचकित होऊन जातील. बाळे ! तुझें शरीर आतां अतिवाहिक अर्थात् अत्यंत पवित्र

झालें आहे; व आपल्या सत्य संकल्पामुळें तूं जेव्हां त्यांना दर्शन देशील, तेव्हां तुझ्या दिव्य शरीराकडे पाहून त्यांना विशेषच कौतुक वाटेल. पूर्वीच्या वासनेनुसार तुझें हें अतिवाहिक शरीर पूर्वीच्या स्थूल देहाप्रमाणें दिसेल. कारण जो तो आपापल्या वासनेप्रमाणें सर्व कांहीं पहात असतो. लीले ! येथून निघाल्यापासून आज एकतीसाव्या दिवशीं प्रातःकाळीं आपण पुनः येथें आलों आहोंत. तर चल आपल्या सत्य-संकल्पानें आपण लीलेला दर्शन देऊं आणि तिच्यासह आपण या राजाला सजीव करून त्याला पुष्पशय्येवरून उठवूं.

अशा तऱ्हेनें संभाषण करून " आम्ही दोघीजणी विदूरथ लीलेच्या दृष्टीस पडावें, " असा सरस्वतिदेवीनें संकल्प करतांक्षणीं त्या दोघी देवी अंतःपुरांत साकार दिसूं लागल्या. नंतर कमलिनी आपल्या जवळचा सुगंध सोडून देते, त्याप्रमाणें सरस्वतिदेवीनें त्या राजाचा निरोध केलेला जीव सोडून दिला. लगेच तो जीव त्या राजाच्या नाकापाशीं पोहोंचला व वेळूच्या रंध्रांत वायु प्रवेश करतो, त्याप्रमाणें तो प्राणवायुरूपी जीव राजाच्या नाकपुड्यांतून आंत शिरला. लागलीच त्याचें मुख सतेज दिसूं लागलें व पूर्ण जिवंत होऊन तो आपल्या पुष्पशय्येवर उठून बसला व गंभीर आवाजानें " कोण आहे रे तिकडे ?" असे शब्द त्यानें उच्चारले. लगेच त्या दोघी लीला त्याच्यापुढें जाऊन हात जोडून विनयानें म्हणाल्या ' महाराज ! आपली काय आज्ञा आहे ?' राजानें विचारलें ' तूं कोण ?' आणि ही स्त्री कोण ? या प्रश्नाचें उत्तर प्रबुद्धलीलेनें दिलें.

प्रबुद्धलीलाः—महाराज ! माझें नांव लीला असून मी आपली पत्नी आहें. ही जी दुसरी लीला आपल्यापुढें दिसत आहे, ती माझी प्रतिबिंबभूत लीला असून ती आपल्या उपभोगाकरितां मी लीलेनें उत्पन्न केली आहे. आपल्या उशाशीं सुवर्णासनावर ही त्रैलोक्याची जननी सरस्वतिदेवी बसली आहे. महाराज ! या देवीचे आमच्यावर किती उपकार झाले आहेत म्हणून सांगू ! हिनेंच आम्हां दोघींना परलोकांतून या ठिकाणीं आणलें आहे.

आपल्या पत्नीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच त्या राजाला परम हर्ष-

झाला. लागलीच आपल्या पुष्पशय्येवरून उठून सरस्वति देवीला त्यानें साष्टांग नमस्कार घातला व म्हणालाः—

राजाः—देवि ! तूं सर्व लोकांचें कल्याण करणारी आहेस. यासाठीं तुला नमस्कार असो. मला पारमार्थिक बुद्धि, दीर्घायुष्य आणि अपार संपत्ति दे.

राजाच्या मुखांतून हे शब्द निघतांक्षणींच सरस्वति देवीनें त्याच्या मस्तकाला आपल्या हाताचा स्पर्श केला. नंतर ती म्हणाली, 'पुत्रा ! तूं मागतोस त्याप्रमाणें सर्व तऱ्हेची ऐहिक आणि पारमार्थिक संपत्ति तुला प्राप्त होईल.'

असा वर दिल्यानंतर सरस्वति देवी त्या ठिकाणींच एकदम अंतर्धान पावली. इतक्यांत प्रभातकाळ झाल्याबरोबर पद्मराजाच्या नगरांतील सर्व लोक जागे झाले. राजा जिवंत झाल्याची बातमी शहरांत पसरतांच जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला. राजा व राणी यांना प्रबुद्धलीलेनें परलोकांतून परत आणलें, अशी बातमी राज्यांत जिकडे तिकडे पसरली व लोक त्यांची स्तुतिस्तोत्रें गाऊं लागली ! नंतर चारी समुद्रांचें पाणी आणून त्याच्या योगानें राजधानींमधील ब्राह्मण, प्रधान व त्याचे मांडलिक राजे यांनीं पद्मराजाला पुनः राज्यावर अभिषेक केला. त्या दोघी लीला आणि पद्मराजा अशीं तिघें जीवन्मुक्ति-सुखाचा अनुभव घेत आणि आपल्या पूर्व वृत्तांतासंबंधाच्या गोष्टी सांगत आनंदानें कालक्रमणा करूं लागलीं. सरस्वतीच्या प्रसादानें आणि पद्मराजाच्या पौरुषप्रयत्नामुळें नवजीवन, राज्य आणि आत्मज्ञान या त्रिभुवनांतील सर्वोत्कृष्ट वस्तूंचा त्याला लाभ झाला. पुढें दोघी लीलासह त्या ज्ञानसंपन्न पद्मराजानें ऐशींहजार वर्षे राज्यसुखाचा निर्विघ्नपणें उपभोग घेतला. त्याच्या राज्यांतील प्रजाजनांची एकसारखी भरभराट होत असल्यामुळें त्याची राज्यपद्धति निर्दोष होती. त्याच्या राज्यांतील विद्वज्जन शास्त्रानुसार वर्तन करीत असल्यामुळें त्याच्या राज्याला अपूर्व शोभा प्राप्त झाली होती. त्याची कारकीर्द सर्व जनांना हितकर आणि संतोषदायक झाली होती. अशारीतीनें सर्वांना आनंद देत त्यानें आपल्या स्वराज्याचा उपभोग घेतला व अखेरीस लीला आणि पद्मराजा अशीं दोघें विदेहमुक्त स्थितीप्रत जाऊन पोहोंचली !

तात्पर्यः— ह्या दृश्य जगाला वास्तविक सत्ता नाहींच, जें जग म्हणून भासत आहे तें ब्रह्मच आहे. हें दृश्य नसतांना आहे असें जें वाटतें तो स्वप्नाप्रमाणें निष्फळ भ्रम आहे. एका स्वप्नांत दुसरें स्वप्न भासतें, त्याप्रमाणें एका जगांत दुसरें जग कसें असतें हें दाखवून ह्या दृश्य जगाच्या अस्तित्वासंबंधानें जीवाला झालेला भ्रम नाहींसा व्हावा या हेतूनें ही लीलेची गोष्ट सांगितली आहे. सारांश, ब्रह्मरूपी ताजव्याच्या एका पारड्यांत जागृतींतील जगत् आणि दुसऱ्यांत स्वप्नांतील जगत् घालून विवेकरूपी काट्याकडे पाहिलें असतां तीं दोन्ही सारखीच शून्य आहेत असा अनुभव येतो. इतकें सांगितलें म्हणजे वरील गोष्टीचें तात्पर्य सहज लक्षांत येईल.



## ( ४ ) कर्कटी राक्षसीची गोष्ट.

अत्रैवोदाहरंतीममितिहासं पुरातनम् ॥
राक्षस्योक्तं महाप्रश्नजालमावलिताखिलम् ॥ ३-६८-१.

**भावार्थ**—जगताचें वास्तविक स्वरूप काय आहे, या संबंधानें पुरातन अशी एका राक्षसीची गोष्ट सांगत असतात. या गोष्टींत त्या राक्षसीनें तत्वार्थपूर्ण अशा अनेक महाप्रश्नांचें एक विस्तीर्ण जाळेंच पसरलें आहे. या सर्व प्रश्नांचा व त्याच्या उत्तरांचा विचार केला म्हणजे जगाचें तात्त्विक स्वरूप मनावर चांगलें ठसतें.

हिमालयाच्या उत्तर बाजूला मोठें पोट आणि लांब हात अशा कन्हेच्या कर्कटाच्या म्हणजे खेकड्याच्या आकाराचा एक राक्षस रहात होता. त्याच्या आकृतीवरून त्याला कर्कट असें नांव देण्यांत आलें होतें. त्या राक्षसाची मुलगी शरीरानें आपल्या बापाच्या वळणावर हुबेहूब असल्यानें तिलाहि कर्कटी असें नांव प्राप्त झालें होतें. तिलाच विषूचिका आणि अन्यायबाधिका अशीं दोन नांवें होतीं. ती राक्षसी अतिशय उंच आणि अतिशय उग्र असून काजळाच्या पर्वताची जणूं विस्तीर्ण प्रतिमाच आहे कीं काय, असा तिच्याकडे पाहाणाऱ्याला भास होई. तिचे डोळे लाल-

भडक होते आणि उदर आकाशाप्रमाणें विस्तीर्ण होतें. तिचे केस अंधकाराप्रमाणें काळेभोर आणि ताठ उभे राहिलेले असत. तिचे पाय तमाल वृक्षाप्रमाणें उंच दिसत होते. तिच्या हातापायाचीं नखें वैडूर्य मण्याच्या रंगाचीं असून तीं सुपाप्रमाणें पसरलेलीं होतीं. त्या राक्षसीचे हात अतिशय लांबलचक दिसत असून ती त्या हातांनीं आकाशांतील सूर्यचंद्रहि लीलेनें ग्रहण करील कीं काय असें वाटे. तिचें शरीर प्रचंड असल्यानें तिला पुरेसा आहार मिळण्याला मोठी पंचाईत पडत असे. त्यामुळें समुद्राच्या पोटांतील वडवानलाप्रमाणें तिचा जठराग्नि नेहमीं भडकलेला असे. अशा स्थितींत तिच्या मनांत एकदा असा विचार आला. " ज्याप्रमाणें निरनिराळ्या नद्यांच्या मुखानें आलेलें पाणी समुद्र गट्ट करून टाकतो, त्याप्रमाणें या जंबुद्वीपांतील सर्व मनुष्यांना मी एकदम खाऊन टाकते व असें केलें तरच मेघाच्या वृष्टीमुळें मृगजल शांत होतें, त्याप्रमाणें माझी क्षुधा शांत होईल. क्षुधा शांत करणें हाच मुख्य धर्म आहे. आपत्तिमध्यें ' येन केन प्रकारेण ' देहाचें रक्षण करणें ही गोष्ट शास्त्राला केव्हांहि संमतच आहे. आतां एवढी गोष्ट मात्र खरी कीं, मंत्र, औषधि, तप, दान, देवपूजा वगैरे उपायामुळें ज्यांच्या देहांना अपाय होणें शक्य नाहीं; अशा प्राण्यांना उपद्रव देण्याला कोणीहि समर्थ होत नसल्यानें सर्व लोकांचें एकदम भक्षण करणें मला सांप्रत शक्य नाहीं. पण यालाहि एक उपाय आहे. तो म्हणजे तपश्चर्या होय. " तपसैव महोग्रेण यद्दुरापं तदाप्यते " " कारण कोणतीहि दुष्कर वाटणारी गोष्ट उग्र तपश्चर्येनें निःसंशय साध्य झालीच पाहिजे. " अशा रीतीनें विचार करून जगांतील सर्व प्राण्यांना खाण्याच्या इरायानें प्राण्यांना अत्यंत दुर्गम अशा हिमालय पर्वतावर तपश्चर्या करण्याचें ठरवून ती राक्षसी त्या पर्वताच्या उंच शिखरावर गेली व नंतर तेथें प्रथमतः स्नान करून तपश्चर्या करण्याकरितां एका पायावर उभी राहिली. ध्यानस्थितीमध्यें तिचे नेत्र इतके स्थिर झालेले होते कीं, ते नेत्र नसून स्पंदरहित झालेले चंद्रसूर्यच आहेत कीं काय, असा भास होऊं लागला. अशा तऱ्हेनें तपश्चर्या करण्यांत तिचे कित्येक दिवस, पंधरवडे, महिने, आणि ऋतू उलटून गेले. थंडी आणि ऊन यांचा सारखा मारा चालला असतांहि

एखाद्या पर्वतावरील शिळे प्रमाणें ती निश्चल आणि निःस्तब्ध राहिली होती. अशा तऱ्हेनें त्या राक्षसीनें हजार वर्षे तप केल्यावर पितामह ब्रह्मदेव प्रसन्न होऊन तिला दर्शन देण्याकरितां तिच्या सन्निध आला. आतां या ठिकाणीं अशी कदाचित् शंका येईल कीं ती राक्षसी दुष्ट बुद्धीची असतां तिच्यावर ब्रह्मदेव कसा प्रसन्न झाला ? याचें समाधान असें कीं, हा सर्व तिच्या दारुण तपश्चर्येचाच परिणाम होता व तपश्चर्येनें कोणतीहि असाध्य वाटणारी गोष्ट साध्य होत असते. त्यामुळें त्या राक्षसीवर ब्रह्मदेव प्रसन्न झाला, यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. ब्रह्मदेवाला पहातांच त्या राक्षसीनें त्याला मनानें नमस्कार केला व आपली क्षुधा शमन होण्याजोगा कोणता वर त्याच्यापासून मागून घ्यावा ह्या संबंधानें विचार करीत कांहीं वेळ स्वस्थ बसली.

थोड्या वेळानें आपण काय मागावें याविषयीं विचार करून ती आपल्या मनात म्हणालीः—" हां ! आतां माझ्या बरोबर लक्षांत आलें ! मी लोखंडी सुई व रोगरूपी जीवसूचिका ( सजीव सुई ) होईन. अशा तऱ्हेचा वर मी ब्रह्मदेवापासून मागून घेते. म्हणजे मग माझ्या इच्छेला येईल त्याप्रमाणें मी सर्व जगाला ग्रासून टाकीन ! अशा रीतीनें मी आपली क्षुधा शांत करीन. कारण ' क्षुद्विनाशः परं सुखम् ' ( क्षुधाशमन हेंच परम सुख होय ). अशा रीतीनें विचार करणाऱ्या त्या राक्षसीचा आशय जाणणाऱ्या ब्रह्मदेवानें तिच्याशीं बोलण्यास सुरवात केली.

ब्रह्मदेवः—बाळे कर्कटिके ! पर्वतावरील मेघमालेप्रमाणें तूं खरोखरच राक्षस कुलाला ललामभूत आहेस. तूं आपली तपश्चर्या आतां पुरी कर. मी आतां तुझ्यावर प्रसन्न झालों आहे. तुला इष्ट असेल तो वर माझ्यापासून मागून घे.

कर्कटीः—भगवन् ! आपण भूत आणि भविष्य कालाचे नियामक आहां. आपण माझ्यावर प्रसन्न झालां आहां, तरी मी लोखंडी सुई आणि जीवसूचिका ( सजीव सुई ) होईन असा आपण मला वर द्यावा.

त्या राक्षसीनें असा वर मागितल्यानंतर ब्रह्मदेव तिला 'तथास्तु' असें म्हणून पुन्हा म्हणाले, ' तूं विषूचिका नांवाची उपसर्गयुक्त सूचिका होशील. तूं मागत आहेस त्याप्रमाणें आपल्या सूक्ष्ममायेच्या योगानें तूं सर्व लोकांची

हिंसा करण्याला समर्थ होशील. शास्त्रनिषिद्ध अन्न सेवन करणारे, दुष्कर्माचें आचरण करणारे, मूर्ख, अशास्त्र वर्तन करणारे, निंद्य प्रदेशांत वस्ती करणारे आणि स्वभावतः दुष्ट असे जे जे लोक असतील, त्यांची त्यांची हिंसा करण्याला तूं समर्थ होशील. अशा दुष्ट लोकांच्या हृदयांत प्राणवायूबरोबर संचार करून प्लीहा, बस्ती वगैरे ठिकाणीं अनेक प्रकारें पीडा उत्पन्न करून तूं विषूचिका ( पटकी, महामारी ) नामक व्याधि होऊन शास्त्रसदाचार-निष्ठ आणि शास्त्रविरुद्ध वर्तन करणाऱ्या अशा दोन्ही प्रकारच्या लोकांना अगदीं भंडावून सोडशील. परंतु शास्त्रानुसार वर्तन करणाऱ्या लोकांना चिकित्सेच्या योगानें तुझा प्रतिकार करतां यावा म्हणून मी हा मंत्र उत्पन्न केला आहे. तो मी म्हणून दाखवितो.

**"ॐ ह्रीं ह्रां रीं रां विष्णुशक्तये नमः ॥ ॐ नमो भगवति विष्णु शक्तिमेनां ॐ हर हर नय नय पच पच मथ मथ उत्सादय दूरे कुरु स्वाहा ॥ हिमवंतं गच्छ जीव सः सः सः चंद्रमंडलगतोऽसि स्वाहा ॥ "**

मंत्राचा अर्थः—हे भगवति ! पराविष्णुशक्ते ! तुला नमस्कार असो. रोगरूपी अशा या तुझ्या अंशभूत अपराशक्तीचें तूं निवारण कर. तिला दूर घेऊन जा. तिला आपल्या स्वस्थानीं ने. शिजलेल्या अन्नाप्रमाणें तिला अगदीं मऊ करून टाक. तिला चांगली घुसळ. हकलून लाव. कोणत्यातरी उपायानें तिला नाहींशी कर. या अपराशक्तीचा तुझ्यामध्यें मी बळी देतो. कारण तूं आम्हांला पूज्य आहेस ! हे रोगरूपी विषूचिके ! विष्णूच्या अपरशक्ते ! तूं येथून हिमालयपर्वतावर निघून जा. प्राक्तन दुष्कर्मांनें पछाडलेल्या प्राण्या ! रोगानें ग्रस्त झालेल्या प्राण्या ! मृत्यूनें खेचला गेलेल्या प्राण्या ! माझ्या मंत्रसामर्थ्यानें तूं आतां अमृतपूर्ण अशा चंद्रमंडलावर गेला आहेस. प्रदीप्त झालेल्या अग्नींत हवि प्रक्षिप्त करतात, त्याप्रमाणें अमृतमय चंद्रमंडलाच्या ठिकाणीं मी तुला नेऊन ठेवीत आहे !

अशा रीतीनें हा मंत्र भुर्जपत्रादिकांवर (कागदावर) लिहून रोग्याच्या डाव्या हाताच्या तळव्यावर टाकावा; व हा मंत्र म्हणून मंत्र्यानें रोग्यावर उदकाचें मार्जन करावें. तसेंच मंत्र म्हणत असतांना या मंत्ररूपी मुद्गराच्या प्रहारानें

कर्कटी राक्षसी उंचली गेली आहे, आणि मोठमोठ्यानें ओरडत ती हिमालयाकडे पळत सुटली आहे, अशी मंत्र्यानें आपल्या मनांत दृढ भावना करावी. त्याचप्रमाणें पटकीच्या रोगानें ग्रस्त झालेला प्राणी आपल्या भावनेमुळें अमृतानें युक्त असलेल्या चंद्रमंडलामध्यें गेला असून तो आतां अजरामर, शांत आणि सर्व व्याधींपासून मुक्त झाला आहे, असें चिंतन करावें. हा मंत्र साध्य करणाऱ्या मंत्र्यानें शुचिर्भूत होऊन स्वस्थ चित्तानें आचमन करून वर सांगितल्याप्रमाणें सर्व विधि करावा, म्हणजे तो मंत्र संपूर्ण विषूचिकेला नष्ट करील.

अशा रीतीनें ब्रह्मदेवानें हा मंत्र उच्चारल्यानंतर आकाशांत संचार करणाऱ्या सिद्धांनीं लगेच तो ग्रहण केला व ब्रह्मदेव आपल्या सत्यलोकाला निघून गेले.

ब्रह्मदेवापासून वर मिळाल्यानंतर ती राक्षसी सूक्ष्म शरीर धारण करण्याच्या उद्योगाला लागली. प्रथमतः ती मेघाच्या आकाराची झाली; नंतर ती वृक्षाच्या डहाळीएवढी झाली. पुढें ती मनुष्याएवढी व नंतर हाताएवढी, बोटाच्या आकाराची, उडदाच्या शेंगेएवढी, अशा रीतीनें लहान होतां होतां शेवटीं ती अत्यंत लहान आकाराची सुई झाली. त्या लोखंडाच्या सुईचें जें दुसरें रूप होतें त्यालाच ‘ जीवसूचि ’ हें नांव होतें. ह्या अदृश्य जीवसूचीच्या आश्रयानेंच ती लोखंडाची सुई नेहमी राहत असे. पहा! या राक्षसीनें तृष्णेच्या नादानें आपल्या पर्वताकार देहाचा तृणाप्रमाणें त्याग केला! अशा तऱ्हेनें अत्यंत सूक्ष्मरूप धारण करणारी ती राक्षसी दशदिशांमध्यें भ्रमण करूं लागली व प्राण्यांच्या शरीरांत प्राणवायूबरोबर प्रवेश करून त्यांना क्रूरपणानें ग्रासून टाकूं लागली. अशा रीतीनें ज्यांच्या शरीरांत ती प्रवेश करी, ते प्राणी पटकी रोगानें पछाडले जाऊन दुःखानें तळमळूं लागले म्हणजे तिला मोठा आनंद होत असे. पूर्वोक्त मंत्र, औषधें, तप, पुण्याचरण इत्यादि उपायांनीं जेव्हां कोणी तिचा प्रतिकार करी, तेव्हां मात्र तिला माघार घ्यावी लागत असे. परंतु असल्या थोड्या प्राण्यांना वगळलें असतां बाकी सर्वांना ती जीवसूचि अगदीं घेरून टाकीत असे. अशा तऱ्हेनें अंतरिक्ष व भूमि

ह्यांच्यामध्यें प्राण्यांचा घात करणारी ती राक्षसी, भ्रमण करीत असतां कित्येक वर्षे लोटलीं. अखेरीस ती म्हातारी झाली; तरी देखील तिनें दश-दिशांना आक्रमण करण्याचें आपलें व्रत अव्याहत चालविलें होतें. अशा रीतीनें कित्येक दिवसपर्यंत सर्व प्रकारच्या नरमांसाचें भक्षण करण्याचा त्या राक्षसीनें एकसारखा सपाटा चालविला होता. परन्तु तेवढयानें तिची तृप्ति होईना ! शेवटीं पुष्कळ काळानंतर ती राक्षसी अत्यंत खिन्न झाली व आपल्या मनांत विचार करूं लागली:—

" हाय हाय ! काय माझी ही दुर्दशा ! मी सुईचें रूप कां बरें धारण केलें ! मी अत्यंत सूक्ष्म झालें आणि त्याबरोबर माझ्या सर्व शक्ती क्षीण झाल्या. माझ्या पोटांत अन्नाचा एक घांस देखील मावत नाहीं. माझें तें पूर्वीचें पर्वतप्राय विशाल शरीर सुकलेल्या पानाप्रमाणें कोठें गळून गेलें ? आपल्या त्या प्रचंड शरीराचा नाश करून घेण्याची ही दुर्बुद्धि मला कोठून झाली ? "

अशा रीतीनें पश्चात्ताप करणारी ती राक्षसी पुन्हां पूर्व देह मिळवि-ण्याच्या इच्छेनें तपश्चर्या करण्याकरितां हिमालयावर गेली. निश्चल अंतः-करणानें तिनें आपल्या सुईच्या देहानेंच घोर तपश्चर्या करण्यास प्रारंभ केला. सर्व तऱ्हेचा आहार वर्ज्य करून सर्व संकल्पांचा त्याग करून आपल्या अंतःकरणांत सत्य आत्म्यासंबंधीं दीर्घ कालपर्यंत चिंतन केल्यामुळें आणि तपाच्या योगानें सर्व पापें क्षीण झाल्यामुळें अखेरीस ती आत्मज्ञानसंपन्न झाली. चित्ताची एकाग्रता व दृढ निश्चय ह्यांच्या बळावर ती राक्षसी ब्रह्माच्या साक्षात्कारानें संपन्न होऊन कृतार्थ झाली. एका पायावर उभें राहून ऊर्ध्व मुखानें तिनें दृढ निश्चयानें एकसारखें सात हजार वर्षे तप केल्यामुळें तिच्या तपस्तेजानें चतुर्दश भुवनांत राहणाऱ्या सर्व लोकांना संताप होऊं लागला. शेवटीं इंद्रानें देवगणांसह ब्रह्मदेवाकडे जाऊन त्या राक्षसीचें तप थांबविण्याविषयीं प्रार्थना केली. नंतर कर्कटी राक्षसी आत्मज्ञान संपन्न झाली आहे, असें जाणून ब्रह्मदेव तिच्याकडे येऊन म्हणाला:-

ब्रह्मदेवः--बाळे ! तुझ्या या दिव्य तपाच्या योगानें तुझे सर्व मनोरथ सफळ होतील. तूं पूर्वी सारखी राक्षसी होशील. तूं आत्मज्ञान संपन्न अस-

त्यानें तूं आतां अन्यायावाचून कोणालाही पीडा करणार नाहींस. अशारीतीनें न्यायानें वागून अन्यायी लोकांना बाधा करणारी झाल्यामुळें तूं 'अन्यायबाधिका' या नांवानें लोकांत प्रसिद्ध होशील. विवेकाचें पालन करून तूं देहामध्यें असतांना जीवनमुक्त स्थितीमध्यें राहशील."

अशारीतीनें भाषण करून ब्रह्मदेव अंतर्धान पावले. नंतर ती राक्षसी मनांत विचार करूं लागली:—"ब्रह्मदेवानें आतां सांगितल्याप्रमाणें वागण्याला काय हरकत आहे? त्यामुळें माझी ध्यानस्थिति थोडीच विघडणार आहे? मग अशा स्थितींत ब्रह्मदेवाचें वचन मोडण्यांत तरी काय पुरुषार्थ आहे!" अशारीतीनें ती विचार करीत आहे तोंच ती पूर्वीसारखी विशाल देह धारण करणारी राक्षसी झाली व लगेच त्या हिमालयावर जाऊन निर्विकल्प समाधि लावून स्वस्थ झाली. पुढें सहा महिन्यांनीं समाधि उतरल्यावर तिला अतिशय भूक लागली. असें झालें यांत कांहींच आश्चर्य नाहीं; कारण जोपर्यंत देह आहे तोंपर्यंत त्याचे धर्म अजीबात नाहींसे होणें शक्य नाहीं. असो, नंतर तिच्या मनांत पुढीलप्रमाणें विचार घोळूं लागले:—"मी आतां खावें तरी काय? पोट भरण्यासाठीं अन्यायानें कोणाचाही जीव घेणें मला उचित नाहीं. न्यायाला विरुध्द किंवा आर्यजनांनीं निंद्य ठरविलेलें एखादें कृत्य करून आपलें पोट भरण्यापेक्षां प्राण्यांनीं देहत्याग करून मरणें, हेंच श्रेयस्कर होय! *अन्यायानें मिळविलेला असल्यानें परिणामी विषासारखा ठरणारा आहार भक्षण करण्यापेक्षां न्यायोपार्जित आहार न मिळाल्यामुळें माझा देह पडला तरी बेहेत्तर. कारण मला जगणें व मरणें हीं दोन्हीं सारखींच आहेत. पूर्वी माझें मनाशीं तादात्म्य झालेलें असल्यामुळें देहादिकांच्या भ्रमांत मी गुरफटून गेलें. मला त्यांतच आनंद वाटत होता. परंतु आत्मबोधामुळें तो भ्रम आतां नाहींसा झाल्यानें, जगणें आणि मरणें या भ्रामक कल्पना माझ्या ठिकाणीं संभवणार तरी कशा?"

अशा रीतीनें त्या ब्रह्मज्ञानी राक्षसीनें आपल्या राक्षसी स्वभावाचा त्याग केला आहे, असें पाहून आकाशस्थ वायूनें पुढील शब्द उच्चारले. "हे राक्षसी!

---

* हा या राक्षसीचा विचार लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

तूं येथून जा आणि मूढ लोकांना आपल्या ज्ञानाच्या योगानें बोध कर, कारण मूढ आणि अज्ञानी लोकांचा उद्धार करणें, हाच महात्म्यांचा स्वभाव असतो. आतां अशारीतीनें लोकांना बोध करीत असतां जो प्राणि तुझ्या बोधाचा धिक्कार करील तो आपला नाश करून घेण्याकरितांच उत्पन्न झाला आहे असें समजून त्याला वेलाशक खाऊन टाकीत जा. अशा प्राण्याला खाण्यांत बिलकूल अन्याय नसून न्यायच आहे." वायूनें उच्चारलेले हे शब्द ऐकतांच 'तुझ्या भाषणाच्या योगानें माझ्यावर मोठा अनुग्रह झाला आहे!' असें म्हणून ती राक्षसी उठली आणि त्या पर्वत शिखरावरून खालीं उतरून हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या किराताच्या राज्यांत येऊन पोहोंचली. पुढें किराताच्या नगराजवळ येऊन पोहोंचते आहे, तोंच रात्र पडली. त्या भयंकर अंधाराच्या रात्रीं ती राक्षसी सर्व किराताच्या गांवाची टेहेळणी करून गांवाच्या बाहेर पडत आहे, तोंच ऐन मध्यरात्रीच्या वेळीं त्या किरात देशाचा राजा आपल्या मंत्र्यांसह समोरून येत असल्याचें तिनें पाहिलें. ते दोघेजण गांवाबाहेरील वेताळाच्या दर्शनासाठीं अरण्यांतील झाडीमधून चालत येत आहेत, असें पाहून ती राक्षसी मनांत म्हणाली: —

## राक्षसीचा विचार.

" अहाहा ! माझें भाग्य बलवत्तर आहे, असेंच म्हटलें पाहिजे. माझ्यापुढें चालत येणारे हे दोघे प्राणी मूर्ख आणि आत्मज्ञानी नसल्यानें पृथ्वीला निःसंशय भारभूत झालेले आहेत. तरी मला हे आयतेच खायला मिळतील. इहपरलोकीं आपला नाश करून घेऊन केवळ दुःख भोगण्या-साठींच मूढ माणसें जगत असतात. याकरितां अशा मूर्खांचा प्रयत्नानें नाशच केला पाहिजे. कारण जिवंतपणीं सुरू झालेल्या पातकांचा प्रभाव मरणानें बंद पडत असल्यानें, मरणानें त्या प्राण्यांचा अभ्युदयच होत असतो. मूढ आणि अनात्मज्ञ प्राणी माझ्यासारख्या हिंसकाच्या भक्षस्थानीं पडावे, असा ब्रह्मदेवानें आदिसर्गांत नियम करून ठेविला आहे. तस्मात् आपल्यापुढें आयत्याच वाढून आलेल्या ह्या ताटावर यथेच्छ ताव मारावा हेंच योग्य आहे. कारण निर्दोष असून अनायासानें प्राप्त झालेला असला लाभ एखादा अभागीच सोडून देईल. पण अगोदर ह्यांना मारून

खाण्यापूर्वी हे दोघे आत्मज्ञानसंपन्न आहेत कीं काय, ह्याचा छडा काढणें जरूर आहे. कारण तसल्या आत्मज्ञानी मनुष्याला मारून खाणें मला स्वभावतः आवडत नाहीं. तरी अगोदर ह्यांची चांगली परीक्षाच करते व त्या परीक्षेमध्यें हे दोघेजण माझ्या कसोटीला उतरले तर त्यांना खाऊन टाकण्याचा आपला विचार अजिबात सोडून देईन. कारण गुणी मनुष्याची हिंसा मी कधींहि करणार नाहीं. अकृत्रिम सुख, कीर्ति व आयुष्य यांची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें गुणी जनांना हवें असेल तें सर्व त्यांना अर्पण करून त्यांचा सत्कार करणेंच उचित आहे. तीव्र क्षुधेमुळें माझा देह नष्ट होण्याचा प्रसंग आला तरी चालेल; पण गुणी माणसांना मी केव्हांही भक्षण करणार नाहीं. स्वतःच्या जीविताचा त्याग करूनहि गुणवान् मनुष्याच्या चित्ताला समाधान देणें हेंच सज्जनांचें कर्तव्य आहे. ह्यासाठीं कांहीं तत्त्वज्ञान्विषयक प्रश्न विचारून हे दोघेजण कितपत ज्ञानी आहेत, त्याची अगोदर परीक्षा करते. "

अशा रीतीनें विचार करून त्या राक्षसीनें त्या निबिड अंधःकारांतून एखाद्या मेघमालेप्रमाणें मोठी गर्जना केली. नंतर मोठा हुंकार करून ती कठोर भाषण करूं लागली.

कर्कटीः— अहो ! अहो ! ह्या घोर अरण्यरूपी आकाशांत चंद्र सूर्याप्रमाणें प्रकाशमान् होणारे किंवा सर्व भूतांना आधारभूत अशा महामायेच्या कोशांतील किड्याप्रमाणें दिसणारे तुम्ही आहां तरी कोण ? तुम्ही आत्मज्ञानसंपन्न असा किंवा मूढ बुद्धीचे असा. ज्या अर्थी तुम्ही या अरण्यांत प्रविष्ट झालां आहां, त्याअर्थी तुम्ही माझ्या मुखांत जाऊन पडणारे माझे ग्रास आहांत, हें खूप समजा कीं, मी एका क्षणांतच तुम्हांला नष्ट करून टाकीन !

विक्रमराजाः—अरे ए क्षुद्र भूता ! तूं कोण आहेस ? कोठें उभा राहिला आहेस ? अरे ! आम्हांला तुझें एकदां तोंड तरी दाखीव. तुझी ही आरडाओरड भुंग्याच्या गुणगुणण्याप्रमाणें आम्हांला भासत असल्यानें असल्या तुझ्या क्षुद्र गोंगाटाला कोण भीक घालतो ?

राजाचें हें भाषण ऐकल्यानंतर " अहाहा ! ह्या राजाचें भाषण किती

रमणीय आहे ! " असें मनांत आणून आपण प्रगट व्हावें या हेतूनें ती राक्षसी मोठ्यानें ओरडली आणि त्या उभयतांचें धैर्य खचून जावें या हेतूनें ती मोठ्यानें हांसली. थोड्याच वेळांत आपल्या ओरडण्यानें दशदिशांना दणाणून सोडणारी आणि आपल्या विचकलेल्या दातांच्या प्रभेमुळें प्रकट होणारी ती राक्षसी त्या उभयतांच्या दृष्टीस पडली. ती राक्षसी जरी मोठी भयंकर दिसत होती, तरी विक्रमराजा आणि त्याचा मंत्री हे तिला न डगमगतां तिच्याकडे पहात उभे राहिले.

मंत्रीः—हे महाराक्षसी ! तूं जर खरोखर मोठी पराक्रमी आहेस तर आम्हांला खाऊन टाकण्यासारख्या यत्किंचित कामांत तुला एवढामोठा तडफडाट वरी कां करावयास पाहिजे ? हें तुझें दरडावणें आणि व्यर्थ बडबडणें बंद कर. कारण तुझ्या मोठेपणाला हें शोभत नाहीं. हे राक्षसी ! तुला तुझ्या सामर्थ्यासंबंधानें कदाचित् मोठी घमेंड वाटत असेल; पण आमच्यापुढें तुझ्यासारख्या हजारो राक्षसी मशकाप्रमाणें क्षुद्र आहेत ! तरी आपल्या क्रोधाचा आविर्भाव टाकून देऊन सरळ मार्गानें तुला काय पाहिजे तें आम्हांला सांग. कारण शांत लोक आपला स्वार्थ युक्तीनेंच साधीत असतात. हे याचकी ! तुला आमच्यापासून कांहीं पाहिजे असेल तर तसें सांग, म्हणजे तुझे मनोरथ पूर्ण केल्याशिवाय आम्हीं रहाणार नाहीं. कारण आमच्याकडे आलेला याचक कार्यसिध्दि न होतां परत गेला, असें आजपर्यंत स्वप्नांतहि घडून आलेलें नाहीं. "

अशातऱ्हेचें तें मंत्र्याचें चतुर भाषण ऐकून कर्कटी राक्षसी आपल्या मनांत विचार करूं लागली. "ह्या दोघा पराक्रमी पुरुषांचा निर्मळ आचार, धैर्य आणि बुद्धिमत्ता खरोखरच आश्चर्यकारक आहेत. हे कोणी सामान्य पुरुष दिसत नाहींत. ह्यांचें भाषण, ह्यांच्या मुखावरील तेज, ह्यांच्या नेत्रांची प्रसन्नता वगैरे चिन्हें ह्यांना झालेल्या आत्मज्ञानाचें स्वरूप व्यक्त करीत आहेत. नद्यांचीं उदकें संगमांच्या योगानें परस्परांत मिसळतात, त्याप्रमाणें ज्ञात्यांचीं चित्तें, त्यांचें भाषण, चेहऱ्यावरील तेज आणि दृष्टि यांच्या योगानें एकत्र होत असतात. माझा आशय ह्यांनीं ओळखला आहे. आणि ह्यांचा अभिप्राय मला समजला आहे. हे दोघे आत्मज्ञानी असल्यानं

ब्रह्मरूप झाले आहेत व ब्रह्म हे अविनाशी असल्यामुळें हेहि स्वतः अविनाशीच झाले आहेत. अशा ह्या पुरुषांचा नाश करणें योग्य नाहीं. तत्त्वज्ञानासंबंधानें माझ्या मनांत कांहीं शंका उत्पन्न झाल्या आहेत. त्या मी आतां ह्यांनाच विचारतें म्हणजे झालें ! कारण प्राज्ञ पुरुषांचा समागम झाला असतांहि जे आपल्या संशयांची निवृत्ति करून घेत नाहींत, ते केवळ नराधम होत !

अशारीतीनें आपल्या मनांत विचार केल्यानंतर आपले तत्त्वज्ञान विषयक प्रश्न करण्यास अवसर मिळावा म्हणून, अकालीं उत्पन्न झालेल्या कल्पकालच्या मेघगर्जनेप्रमाणें भासणारें आपलें हास्य आवरून ती राक्षसी त्यांच्याशीं मधूर भाषण करूं लागली.

कर्कटी:—हे निष्पाप व धैर्यशाली पुरुषहो ! आपण उभयतां कोण आहां, तें मला सांगा !

मंत्री:—हे राक्षसी ! हे आमचे किरात देशाचे महाराज असून मी त्यांचा मंत्री आहे. गुप्त वेष धारण करून अशा मध्यरात्रीं हिंडून तुझ्या सारख्या राक्षसांचा आणि हिंस्र भूतांचा निग्रह करणें हें आमचें कर्तव्य आहे. रात्रंदिवस दुष्ट प्राण्यांचा निग्रह करणें हाच राजाचा धर्म आहे.

कर्कटी:—राजा ! तुझा मंत्री फार चांगला आहे. कारण दुष्ट मंत्री जवळ ठेवणारा राजा खरा राजाच नव्हे ! मंत्री होणारानें चांगला राजा पाहून त्याचेंच मंत्री व्हावें आणि राजानें सुद्धां प्रथमतः चांगला विचार करून योग्य मंत्र्याची निवड करावी. म्हणजे तो श्रेष्ठतेला पोहोंचत असतो. कारण ' जसा राजा तशी प्रजा ' असा नियम आहे. राजा !

**सर्व ज्ञानामध्यें अध्यात्मज्ञान श्रेष्ठ होय व हें ज्ञान ज्या राजाचें ठिकाणीं असेल तो राजा योग्य होय आणि तो मंत्रीच खरा मंत्री होय.**

**प्रभुत्वं समदृष्टित्वं तच्चस्याद्राजविद्यया ।**
**तामेव यो न जानाति नासो मंत्री न चाऽधिपः ॥ ३-७८-४१.**

" प्रभुत्व हें समदृष्टीपासून उत्पन्न होत असतें आणि समदृष्टि राजविद्येच्या ( आत्मविद्या ) योगानें प्राप्त होत असते. अर्थात् ही राज-

विद्या जो जाणीत नाहीं, तो खरा राजाहि नव्हे आणि तो खरा मंत्रीहि नव्हे."

"तुम्ही दोघेजण आत्मज्ञानी असाल तर तुमचें कल्याण होईल. परंतु तसे तुम्ही नसाल, तर प्रजापालन करण्याला तुम्ही नालायक ठरल्यानें मी तुम्हां दोघांनाहि आतांच खाऊन टाकीन. माझ्यापासून जिवंत सुटून जाण्याला एकच उपाय आहे, तो म्हणजे, मी जे प्रश्न आतां विचारीत आहे, त्याचीं तुम्हीं उभयतांनीं विचारपूर्वक उत्तरें दिलीं पाहिजेत."

'तुला जे प्रश्न विचारावयाचे असतील ते खुशाल विचार' असें राजानें सांगितल्यानंतर त्या राक्षसीनें आपले तत्त्वज्ञानविषयक प्रश्न विचारण्याला सुरवात केली.

## कर्कटीचे प्रश्न.

(कर्कटीनें एकंदर ७२ प्रश्न केलेले आहेत. मूलयोगवासिष्ठांत ते समान अर्थाचे असल्यामुळें त्यांतील फक्त १० महत्त्वाचे प्रश्न या ठिकाणीं देण्यांत आले आहेत.)

(१) समुद्रापासून अनेक बुडबुडे उत्पन्न होतात आणि पुन्हां त्यांतच लीन होतात, त्याप्रमाणें वस्तुतः एक अशा कोणत्या अणूपासून कोट्यवधि ब्रह्मांडें उत्पन्न होतात व पुन्हां त्यांत विलीन होतात?

(२) आकाश असून अनाकाश काय आहे?

(३) कांहीं नसून कांहीं असणारें काय आहे?

(४) जात नसतांना कोण जात नाहीं?

(५) स्थिर नसतांना कोण स्थिर आहे?

(६) चेतन असूनहि पाषाणासारखा कोण आहे?

(७) आकाशांत विचित्र चमत्कार कोण करतो?

(८) बीजामधील वृक्षाप्रमाणें कोणत्या अणूमध्यें हें जगज्जाल आहे?

(९) समुद्रावरील लाटांप्रमाणें कोणापासून जग पृथक् नाहीं?

(१०) हें द्वैत (भेद) कुणाहून भिन्न नाहींत?

राजा ! हे सर्व प्रश्न मी तुमच्यापुढें मांडले आहेत व तुम्हांला त्यांची उत्तरें बरोबर देतां येत नसतील तर एका क्षणांत मी आपल्या जठराग्नींत तुम्हां दोघांची आहुती देईन.

अगावन्हेचें त्या राक्षसीचें भाषण ऐकल्यावर राजाच्या मंत्र्यानें त्या प्रश्नांचीं उत्तरें देण्यास प्रारंभ केला.

मंत्रीः—हे राक्षसी ! तूं जे निरनिराळे प्रश्न विचारले आहेस, ते परमात्म्यासंबंधानें असून तुझ्या ठिकाणचा मार्मिकपणाच व्यक्त करीत आहेत. तो परमात्मा चिन्मात्र आणि आकाशापेक्षांहि सूक्ष्म आहे. त्याचें स्वरूप अनिर्वचनीय आहे आणि इंद्रियादिकांनीं जाणतां येण्यासारखा नाहीं. ह्यामुळेंच तो अणु ह्या संज्ञेस प्राप्त झालेला आहे,

( १ ) ह्या परमचिदणूमध्यें हीं असंख्य ब्रह्मांडें समुद्रांतील बुडबुड्याप्रमाणें उत्पन्न होतात. त्यांतच कांहीं काल राहून नंतर त्यामध्येंच लीन होतात.

( २ ) बाह्यविषयांनीं शून्य असल्यामुळें तो आकाश आहे, परंतु चिद्रूप असल्यानें तो अनाकाश आहे.

( ३ ) अतींद्रिय असल्यानें तो आत्मा नसल्यासारखें वाटतें, परंतु अनंत असल्यानें तो आहे असेंच म्हणावें लागतें.

याप्रमाणें तीन प्रश्नांचीं उत्तरें क्रमानें देऊन त्या राक्षसीच्या बुद्धीची परीक्षा पाहाण्याकरितां चवथ्या प्रश्नाचें उत्तर देण्याऐवजी त्या मन्त्र्यानें एकदम सहाव्या प्रश्नाचें उत्तर दिलें.

( ६ ) हा आत्मा चैतन्यप्रकाशरूप असल्यामुळें चेतन आहे व वेद्य पदार्थ संनिध असून देखील ते कल्पनिक आहेत, या दृष्टीनें हा आत्मा निर्विकार असल्यामुळें पाषाणासारखा अचेतन आहे.

( ७ ) स्वच्छ आत्मरूपी आकाशामध्यें ( चिदाकाशामध्यें ) आत्माच हा जगद्रूपी विचित्र चमत्कार निर्माण करतो.

( ८ ) बीजांमधील वृक्षाप्रमाणें चिदणूमध्यें हें जगज्जाल उत्पत्तीपूर्वीच सूक्ष्मरूपानें असतें.

( ९ ) हें सर्व जग ब्रह्मरूप असल्यामुळें ब्रह्मचैतन्याहून निराळें नाहीं.

(१०) ह्या जगाचा ब्रह्माहून मानलेला भेद (द्वैत) ब्रह्मरूपच आहे. म्हणून तो भेदहि ब्रह्माहून निराळा नाहीं.

आतां बाकी राहिलेल्या चवथ्या व पांचव्या प्रश्नांचीं उत्तरें मंत्र्यानें दिलीं.

(४) हा अणुरूप आत्मा शेकडों योजनें जात असतांहि वास्तविक मुळींच जात नाहीं, कारण शेकडों योजनें अंतर ही केवळ त्याची कल्पना असून ती अणूच्या उदरांतच आहे. त्याच्या स्वसत्तारूपी आकाशकोशामध्यें देश आणि काल स्थिर असल्यामुळें हा गेलेला असला तरी वास्तविक तो जात नाहीं व आलेला असला तरी तो कधीं येतहि नाहीं.

(५) स्थिर नसतांहि तो अणु स्थिर आहे. जेथें जावयाचें आहे, तें स्थल जर आपल्याच शरीरामध्यें असेल, तर कोण आणि कोठें जाणार? आपल्या स्तनाला चिकटलेलें बालक दूर कोठें आहे असें समजून त्याची आई त्याचा शोध करावयास जाईल काय? ज्याला ज्या देशाला जावयाचें आहे, तो देश व त्यामधील अंतर हें जर आपल्यामध्येंच असेल, तर कोण कोठें आणि कसा जाणार? ज्याप्रमाणें कुंभाचें स्थलांतर झालें तरी त्यामधील आकाश कोठें जात नाहीं व येत नाहीं, त्याप्रमाणेंच सर्वगत आत्म्याची स्थिति आहे. हे राक्षसी! या जगांत जीवांना जें जें कांहीं दिसत आहे, तें तें सर्व शांत, निर्विकार, अनादि, अनंत असें ब्रह्मच स्थित असून तेंच जगद्रूपानें भासमान होत आहे.

राक्षसीः—हे मंत्रिन्! तुझें हें पारमार्थिक भाषण कानाला गोड लागणारें व मनाला निःसंशय पवित्र करणारें आहे. आतां राजानें या संबंधीं थोडेंसें भाषण करावें.

राजाः—ज्याचा परमप्रत्यय म्हणजे जगताचा विषयरूपानें अभाव होणें, ज्याचें ग्रहण म्हणजे चित्तानें सर्व संकल्पाचा त्याग करणें, ज्याच्या संकोच्यामुळें व विकासामुळें जगताचे प्रलय व उद्भव होत असतात, सर्व वेदांत वाक्यांचें पर्यवसान ज्याच्यामध्यें होत असतें, परन्तु जो वाणीला अगोचर आहे, सृष्टीच्या आदीं अंतीं जो सत् आणि असत्, भान आणि अभान यापैकीं हें अमक्या कोटींत आहे, असें सांगतां येत नाहीं, अर्थात् जो

अनिवर्चनीय आहे; परंतु स्थितिकालीं जो या दोन कोटींच्या रूपांनीं भासत असतो, ज्याची चित्तरूपी लीला म्हणजेच हें चराचर जगत् आणि विश्वरूपानें दिसत असूनहि ज्याची अखंड एकरसता खंडित होत नाहीं, अशा शाश्वत सद्रूप ब्रह्माविषयींच, हे कल्याणी ! तुझे सर्व प्रश्न आहेत.

अशा तऱ्हेचें राजाच्या तोंडचें तत्त्वार्थपूर्ण भाषण ऐकल्यानंतर ती राक्षसी आपल्या ठिकाणच्या मत्सराचा त्याग करून मनांत समाधान पावली; व त्या दोघांच्याशीं बोलूं लागली.

राक्षसी:—अहाहा ! नित्य उदित अशा ज्ञानसूर्यानें प्रकाशित झालेली तुम्हां उभयतांची बुद्धि कितीतरी पवित्र आहे ! तुमच्यासारख्या विवेकी व जगत्पूज्य पुरुषांची सेवा करावी असें मला वाटतें. दिवटी हातांत असली म्हणजे अंधारांत चाचपडण्याचा प्रसंग कोणाला कधींहि येत नाहीं, त्याप्रमाणें महात्म्यांचा सहवास झाल्यावर पुनः दुःख होण्याचें कारण उरत नाहीं ! ह्या अरण्यांत भेटलेले तुम्ही दोघे भूलोकावरील प्रत्यक्ष सूर्यच आहां, असें मला वाटतें. ह्यासाठीं तुमची इच्छा पूर्ण करून तुमच्याबद्दल पूज्यबुद्धि व्यक्त करणें हें माझें कर्तव्य आहे. तरी आपली कोणती शुभेच्छा मी पूर्ण करूं, तें मला सांगा.

राजा:—हे राक्षसी ! आजपासून तूं कोणत्याही प्राण्याची हिंसा करूं नयेस असें माझें तुझ्याजवळ मागणें आहे.

कर्कटी:—राजा ! तुझें म्हणणें मला एकदम कबूल आहे. मी आजपासून कोणत्याही प्राण्याची हिंसा करणार नाहीं, अशी शपथ घेते.

राजा:—हे राक्षसी ! माझ्या इच्छेप्रमाणें हिंसेपासून परावृत्त होण्याचें कबूल केलेस, तर तुझें शरीर रक्षण कसें होईल ?

कर्कटी:—राजा ! मी हिमालयावर सहा महिने समाधि लावून बसले होतें. समाधीचा काल संपून देहभानावर आल्यानंतर प्रकृतिधर्मामुळें मला भूक लागली. आणि काहींतरी खायला मिळेल अशा इच्छेनें मी ह्या ठिकाणीं आलें. परंतु आतां त्या हिमालय पर्वताच्या शिखरावर जाऊन पाहिजे तितके दिवस ध्यानयोगामध्यें एखाद्या सजीव पुतळीप्रमाणें मी निश्चल होऊन राहीन. अमृत स्वरूपाची धारणा करून मी आपलें हें

क्षुद्र शरीर धारण करीन व मृत्युकाल समीप येतांच स्वेच्छेनें मी माझ्या शरीराचा त्याग करीन. राजा ! आजपासून जिवंत आहे तोंपर्यंत मी कोणत्याही प्राण्याचा घात करणार नाहीं.

तदनंतर कर्कटीनें आपली पूर्वीची सर्व हकीगत राजाला सांगितली व लोकांची पोटशूळाची व्यथा दूर होऊन त्यांना पटकीची बाधा कधींहि होऊं नये म्हणून राजा व मंत्री दोघांनाहि ब्रह्मदेवानें सांगितलेल्या विषूचिका मंत्राचा विधिपूर्वक उपदेश केला. नंतर अत्यंत स्नेहार्द्र झालेल्या त्या उभयतांचा निरोप घेऊन ती राक्षसी हिमालयावर जाण्याला सिद्ध झाली. तेव्हां राजा म्हणालाः—

राजाः—हे कर्कटी ! तूं आतां आमची मैत्रीण झाली आहेस ! तूं कांहींतरी भक्षण करावेंस या हेतूनें आम्हीं तुला निमंत्रण करीत आहोंत. तरी, हे कल्याणी ! अलंकारांनीं युक्त असें सामान्य मनुष्य स्त्रीचें सुंदर रूप धारण करून आमच्या घरीं चल आणि त्या ठिकाणीं आनंदानें रहा.

कर्कटीः—राजा ! सुंदर स्त्रीचें रूप धारण केलेल्या मला तूं भोजन देण्यास समर्थ आहेस, हें खरें. पण बाह्यतः जरी मी मनुष्य झालें तरी माझें मनोरूपी शरीर स्वभावतः राक्षसी असल्यामुळें तूं मला खावयाला काय देणार? एखाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें सामान्य अन्न खाऊन माझी तृप्ति होणार नाहीं. माझ्या राक्षसी स्वभावाला उचित असें रक्त मांसादिकांचें सेवनानें माझी खरीखुरी तृप्ति होणें शक्य आहे. कारण जोंपर्यंत देह आहे तोंपर्यंत त्याचा पूर्वसिद्ध स्वभाव पालटणें शक्य नाहीं.

राजाः—हे कर्कटी ! सुंदर स्त्रीरूपानें तूं वाटेल तितके दिवस आमचे घरीं रहा. माझ्या राष्ट्रांत मरणाच्या (फाशीच्या) शिक्षेस योग्य असे हजारों अपराधी ज्या ज्या ठिकाणीं सांपडतील तेथून धरून आणून मी त्यांना तुझ्या स्वाधीन करीन. नंतर आपलें मानवी रूप टाकून देऊन तूं पुन्हा राक्षसी रूप धारण कर आणि तुझ्या स्वाधीन केलेल्या सर्व वध्यांना हिमालयावर नेऊन तूं खुशाल खाऊन टाक. पुष्कळ आहार करणारांना एकांतातच भोजन सुखावह होत असतें. अशा रीतीनें यथेष्ट भोजन करून तृप्त झाल्यानंतर किंचित् वाम–कुक्षी करून तूं समाधि लावून बसत

जा; आणि समाधि विसर्जन करून देह भानावर आल्यानंतर पुन्हां माझ्या येथें निघून ये. ह्या ठिकाणीं आल्यानंतर पूर्वीप्रमाणें दुसरे शेंकडों वधार्ह प्राणी तुझ्या ताब्यांत देईन आणि त्यांना तूं खुशाल मारून खा. अशा रीतीनें **वध्य जनांचा वध करणें ही धर्मशास्त्रदृष्ट्या हिंसा होत नाहीं; कारण धर्मानुरूप केलेल्या हिंसेची योग्यता दयेइतकीच श्रेष्ठ आहे.** तरी, हे राक्षसी ! समाधि विषयींचा आपला नाद सोडून माझ्यावरोवर येणें तुला उचित आहे. कारण दुष्टांच्याहि अन्तःकरणांत एकदा प्रेम दृढ झालें म्हणजे तें नाहींसें होणें शक्य नसतें.

कर्कटीः—राजा ! तूं म्हणतोस तें अगदीं खरें आहे. तुझ्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास मी तयार आहे. कारण प्रेमानें केलेल्या भाषणाचें कोण बरें अभिनंदन करणार नाहीं !

अशा तऱ्हेनें भाषण केल्यानंतर त्या राक्षसीनें राजाच्या म्हणण्याप्रमाणें एका सुंदर स्त्रीचें रूप धारण केलें व ती म्हणाली 'राजा ! चल, आपण तुझ्या घराकडेच जाऊं ' त्यावरोवर ते तिघेजण चालूं लागले. ते उजाडण्यापूर्वीच राजमंदिरांत जाऊन पोहोंचले. त्या ठिकाणीं गेल्यानंतर त्या तिघांनीं ती सर्व रात्र एका रमणीयगृहांत अध्यात्मविषयक गोष्टी करण्यांत घालविली. सकाळीं सुंदर स्त्रीरूप धारण केलेल्या त्या राक्षसीला अंतःपुरांत नेऊन तिला ममतेनें वागविण्याबद्दल राजस्त्रियांना सूचना देऊन तो राजा आणि त्याचा मंत्री आपापल्या उद्योगाला लागले. सहा दिवसानंतर राजानें आपल्या राष्ट्रांतील निरनिराळ्या प्रांतांतून आणलेले तीन हजार गुन्हेगार लोक तिला अर्पण केले. रात्र झाल्यावर त्या राक्षसीनें आपलें उग्र राक्षसी रूप धारण करून त्या तीन हजार वध्यांना खाकेंत मारून हिमालयावर निघून गेली व त्या सर्वांना मारून त्यांच्या रक्तमांसावर येथेच्छ ताव मारल्यानंतर त्या राक्षसीनें तीन दिवसपर्यंत वामकुक्षी केली. अशा रीतीनें कांहीं दिवसपर्यंत समाधि लावावी व नंतर पुनः राजाच्या घरीं कांहीं दिवस आनंदांत काढावेत व पुन्हां ह्या अवधींत राजानें आणून दिलेल्या वध्य अपराधी लोकांना बरोबर घेऊन निघून जावें, अशा तऱ्हेचा तिचा क्रम अव्याहत चाललेला होता. पुढें कालमानानें राजा विदेह मुक्त झाला. परंतु त्याच्या

मागून त्याच्या गादीवर जे जे राजे बसले ते सर्व राजे पूर्वपरंपरेप्रमाणें राज्यांतील वध्य लोकांना त्या राक्षसीच्या स्वाधीन करीत असत. अशा रीतीनें आपल्याला इष्ट असलेल्या प्राण्यांचें मांस भक्षण करीत ती राक्षसी चिरकाल सुखानें राहिली होती. योगसंसिद्ध झालेली ती राक्षसी किरातांच्या राज्यांतील प्रजेला होणाऱ्या उत्पातांपासून आणि राक्षसपिशाचादिकांच्या भयापासून रक्षण करीत असे. इतकेंच नव्हे तर ती अनेक प्रकारच्या रोगांच्या साथींचें निवारण करी. पुढें पुढें समाधीमध्यें निमग्न झाल्यामुळें ती पूर्वी प्रमाणेंच किरातांच्या राज्यांत येईनाशी झाली व ह्यामुळें त्या राज्यांत उत्पातादि अनर्थपरंपरा उत्पन्न होऊं लागल्या. अखेरीस त्या राष्ट्रांतील लोकांनीं रोगादिकांची पीडा निवारण होण्याकरितां त्या राक्षसीची देवीच्या रूपानें एका भव्य देवळांत स्थापना केली. त्या देवीसमोर वध्य प्राण्यांचा नेहमीं वध होत असे. वध्य लोकांच्या मस्तकांचें विदारण करीत असल्यामुळें त्या देवीचें ' कंदरा ' असें नांव पडलें. अशा रीतीनें भावनेप्रमाणें फल देणारी ती राक्षसी अद्यापि मूर्तिरूपानें किरात राष्ट्रांत विद्यमान आहे. परमबोधानें संपन्न अशा त्या देवतेचा जयजयकार असो.

तात्पर्यः--हिंसेवर उपजीविका करणाऱ्या प्राण्यांना केव्हां केव्हां हिंसा करण्याची जास्त हाव सुटते. ती परिपूर्ण झाली नाहीं म्हणजे ते पश्चात्ताप पावून मोक्षमार्गाकडे वळतात. हें सांगण्याकरितां वरील कर्कटी राक्षसीची गोष्ट सांगितली आहे आणि आत्मज्ञानी मनुष्य निर्भय होतो हेंहि तत्त्व या गोष्टींत विशद करून सांगितलें आहे.

---

## (५) इंदु ब्राह्मणाच्या मुलांची गोष्ट.

**सामान्यब्राह्मणा भूत्वा मनोभावनया किल ॥**
**ऐंद्वा ब्रह्मतां याता मनसः पश्य शक्तताम् ॥ ३-८९-२.**

**भावार्थ**—केवळ मनोभावनेच्या सामर्थ्यावर प्रथमतः सामान्य ब्राह्मण असलेले इंदुपुत्र अखेरीस ब्रह्मदेवाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचले.

कैलास पर्वताच्या पायथ्याशीं असणाऱ्या जंबुद्वीपामधील एका कोपऱ्यांत सुवर्णजट नांवाचा एक प्रांत होता. त्या प्रांतांत कश्यपाचे कुळांत धर्मात्मा, ब्रह्मवेत्ता व शांतवृत्तीचा इंदु नांवाचा एक ब्राह्मण रहात होता. त्याला प्राणापेक्षां प्रिय अशी एक भार्या होती. पण उदक नसणाऱ्या प्रदेशांत जसें झाड उगवत नाहीं, त्याप्रमाणें तिच्या ठिकाणीं इंदु ब्राह्मणाला एकहि पुत्र झाला नाहीं. त्यायोगानें ते दोघेहि फार खिन्न होऊन कैलास पर्वतावर पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें तपश्चर्या करण्याकरितां गेले. तेथें एकांतात असलेल्या एका लताकुंजांत, संध्याकाळीं एकेक चुळकाभर पाणी पिऊन त्यांनीं घोर तपश्चर्या चालविली. अशी तपश्चर्या करतां करतां पुष्कळ काळ लोटला. मस्तकावर चंद्रकला धारण करणारे भगवान् शंकर त्याच्या तीव्र तपश्चर्येमुळें प्रसन्न झाले व त्या दांपत्यासमोर प्रगट होऊन म्हणाले, "हे विप्रा! तुझ्या तपश्चर्येनें मी संतुष्ट झालों आहें. तरी तुला इच्छित असेल तो वर मागून घे."

ब्राह्मणः—भगवन्! ज्यामुळें मला शोक करण्याचा प्रसंग येणार नाहीं असा वर द्यावा. महाबुद्धिमान् व सदाचारसंपन्न असे दहा पुत्र मला व्हावें अशी माझी इच्छा आहे.

अशा तऱ्हेनें इंदुब्राह्मणानें वर मागितल्यानंतर 'तथास्तु' असें म्हणून भगवान् शंकर अंतर्धान पावले. आपल्या इच्छेप्रमाणें वर मिळाल्यानंतर तीं उभयतांही स्वगृहीं निघून गेलीं. त्या ब्राह्मणापासून त्याच्या भार्येच्या ठिकाणीं सुकुमार व सर्वगुणसंपन्न असे दहा पुत्र एकदम झाले. त्या ब्राह्मणाच्या भार्येनें त्या दहा मुलांचें संगोपन करून त्यांस वाढविलें. पुढें बराच काळ गेल्यानंतर ब्रह्मज्ञानी झालेला तो ब्राह्मण व त्याची भार्या हे दोघे आपल्या शरीरांचा त्याग करून विदेह कैवल्याला प्राप्त झालें. नंतर ते दहा ब्राह्मणपुत्र मातापितरांच्या वियोगानें खिन्न होऊन घर सोडून कैलास पर्वताच्या शिखरावर गेले. तेथें ते उद्विग्न झालेले ब्राह्मणपुत्र आपणाशीं विचार करूं लागले.

### ब्राह्मण पुत्रांचा विचार

ह्या जगांत उत्कृष्ट असें सुख कोणतें बरें आहे? इहलोकीं आपल्याला वैभव

कसें प्राप्त होईल ! बंधूंनो ! सुखाची गोष्ट बाजूला ठेवली तर जें परिणामीं दुःखाला कारणीभूत होणार नाहीं, असें उभयलोकांमध्यें उचित काय आहे ? खरें महत्व कशांत आहे ? खरें ऐश्वर्य कोणतें ? शुभ वैभव कोणतें ? ज्याच्या योगानें ' महेश्वर ' ही पदवी प्राप्त होते, असें लोकाधिपतित्व कोणतें ? अथवा लोकाधिपतित्व किंवा साम्राज्य ऐश्वर्य ह्यांत तरी वास्तविक महत्व काय आहे ? साम्राज्याचें ऐश्वर्य प्राप्त होण्यापेक्षा इंद्रपद हें जास्त महत्वाचें नाहीं काय ? पण इंद्रपद जरी प्राप्त झालें, तरी तें कल्पपर्यंत थोडेंच टिकणार आहे ? प्रजापतीच्या दोन घटकांत इंद्राच्या ऐश्वर्याचा सर्व बाजार खलास होऊन जातो ! सारांश ग्रामाधिपतित्व, लोकाधिपतित्व, सम्राटाचें ऐश्वर्य किंवा इंद्रपद ह्यांत कांहींच अर्थ दिसत नाहीं. तर मग ह्या जगांत दीर्घकालपर्यंत टिकणारें आणि श्रेष्ठ असें ऐश्वर्य तरी कोणतें आहे ?

अशा तऱ्हेनें ते दहा बंधु आपापसांत भाषण करीत असतां त्या दहा बंधूंमधील ज्येष्ठ बंधु गंभीरवाणीनें बाकीच्यांना उद्देशून म्हणाला, " बंधूंनों ! सर्व तऱ्हेच्या ऐश्वर्यांमध्यें ब्रह्मदेवाचें ऐश्वर्य श्रेष्ठ असून तेंच काय तें कल्पपर्यंत टिकणारें आहे. अर्थात्, असलें ऐश्वर्य संपादन करणें हेंच मला इष्ट वाटतें. " वडील बंधूचे हे शब्द ऐकतांच बाकीच्यांनीं " फार उत्तम ! फार उत्तम ! " असें म्हणून ज्येष्ठ भ्रात्याच्या भाषणाचा गौरव केला. नंतर ते म्हणाले, " तात ! तुम्ही म्हणतां तें निःसंशय खरें आहे. परंतु सर्व दुःखांचें परिमार्जन करणारें असें तें जगत्पूज्य पद्मासन, अर्थात् ब्रह्मदेवाचें पद आपल्याला कसें प्राप्त होईल ?" ह्यावर वडील बंधू बोलूं लागला, "बंधूंनों ! मी सांगेन त्याप्रमाणें वागण्याला तुम्ही तयार असाल, तर तें विरिंचिपद तुम्हाला खात्रीनें प्राप्त होईल. कारण, तुम्ही सर्वजण अत्यंत तेजस्वी आहां. ह्यासाठीं पद्मासन घालून " मीच दैदीप्यमान ब्रह्मदेव आहे; अखिल ब्रह्मांडाची उत्पत्ति आणि संहार मीच करीत असतों," अशा तऱ्हेचें ध्यान निरंतर करीत जा, म्हणजे तुम्ही सर्व ब्रह्मदेवाच्या सामर्थ्यानें युक्त व्हाल. ज्येष्ठ बंधूचें तें भाषण श्रवण केल्यानंतर सर्वांनीं त्याप्रमाणें करण्याचें कबूल केलें व इच्छित फलाविषयीं अत्यंत आसक्त झालेले ते नऊ बंधु आपल्या ज्येष्ठ भ्रात्यासह ध्यानामध्यें निमग्न झाले. अत्यंत एकाग्रबुद्धीनें ध्यान करणारे ते दहा बंधु एखाद्या चित्रकारानें काढलेल्या चित्रांतील मूर्तिप्रमाणें स्तब्ध

आणि निश्चल दिसत होते. त्या दहा बंधूंमधील प्रत्येकजण विचार करूं लागला कीं "जगाचा उत्पत्तिकर्ता, पालनकर्ता व भोक्ता महेश्वर ब्रह्मा मीच आहे. लोकपालांचीं नगरें व चवदा भुवनें मीच उत्पन्न करून त्यांच्यामध्यें मी वसलों आहे." अशी ब्रह्मदेवाची भावना दृढ करून वसलेल्या त्या ब्राह्मणांना आपल्या देशाची देखील स्मृति राहिली नाहीं. त्या भावनेच्या ठिकाणीं त्यांनीं आपलें सर्वस्वच अर्पण केलें होतें.

पुढें पुष्कळ काल गेल्यानंतर उन्हानें व वाऱ्यानें जशीं झाडांचीं पानें वाळून गळून पडतात, त्याप्रमाणें त्या दहाजणांचे देह शुष्क होऊन गळून पडले. पण इतकें झालें तरी त्यांचीं मनें 'मी ब्रह्मदेव आहे' या भावनेमध्यें पूर्ववत् गर्क होऊन गेलेलीं होतीं. अशा दृढ भावनेनें त्या इंदु ब्राह्मणाच्या दहा मुलांनीं आपण स्वतः ब्रह्मदेव बनून दहा ब्रह्मांडें निर्माण केलीं होतीं. हीं सर्व ब्रह्मांडें, या जगांतील ब्रह्मदेवानें आपण स्वतः चिदाकाशांत पाहिलीं आहेत, असें वसिष्ठांनीं सांगितलें.

तात्पर्यः—केवळ मनोभावनेच्या सामर्थ्यावर सामान्य ब्राह्मण असलेले इंदुपुत्र हिरण्यगर्भाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोचले. यावरून मनाची शक्ति किती अद्भुत् आहे हें सिद्ध होतें. यावरून जग मनोमात्र आहे असेंहि सिद्ध होतें.

---

## ( ६ ) इंद्र व अहल्या यांची गोष्ट.

**बहुकालं यदभ्यस्तं मनसा दृढनिश्चयम् ।**
**शापेनापि न तस्याऽस्ति क्षयो नष्टेऽपि देहके ॥ ३-८८-२०.**

भावार्थः—दीर्घकालपर्यंत अभ्यास करून जो मनाचा दृढ निश्चय झालेला असतो, त्याचा नाश शापानें किंवा शरीराचा क्षय झाल्यानेंहि होत नाहीं.

पूर्वी मगध देशांत इंद्रद्युम्न या नांवाचा एक प्रख्यात राजा होऊन

गेला. पुराणांतरीं प्रसिद्ध असलेला तो दुसरा इंद्रद्युम्नचं* आहे कीं काय असें लोकांना वाटे. त्याची अहल्या नांवाची भार्या होती. तिचे नेत्र कमलाप्रमाणें, मुख चंद्रबिंबाप्रमाणें अत्यंत सुंदर होते. ती दोघे चंद्र व रोहिणी ह्यांच्याप्रमाणें शोभिवंत दिसत असत. इंद्रद्युम्नाच्या राजधानींत विद्वान्, चतुर, परन्तु व्यसनी आणि जारकर्मांत अत्यंत निपुण असा इंद्र नांवाचा एक ब्राह्मण रहात होता. एके दिवशीं अहल्याराणीनें " इंद्राला अहल्या अतिशय प्रिय होती " अशातऱ्हेचें पुराणांतील वर्णन कोणाच्या-तरी तोंडून ऐकलें. त्यावेळेपासून मीच ती गौतमपत्नी अहल्या आहे, असें तिच्या मनानें वेड घेतलें. ह्याचा परिणाम स्वाभाविकपणेंच असा झाला कीं, प्राणापेक्षांहि प्रिय असलेल्या आपल्या पतीवरून तिचें मन उडून गेलें व ती इंद्रावर प्रेम करूं लागली. " मी जर इंद्रावर इतकी अनुरक्त झालेली आहे, तर माझ्यावर प्रेम करणारा तो इंद्र ह्या ठिकाणीं कां येत नाहीं ? " अशा आशयाचे विचार त्या राणीच्या मनांत एकसारखे घोळूं लागले. इंद्राच्या दर्शनाविषयीं अतिशय उत्सुक झाल्यामुळें समोरून कोणीहि पुरुष जाऊं लागला म्हणजे "तो इंद्र तर नसेल ना ?" असा तिला भास होऊं लागला. इंद्राच्या ध्यासामुळें अखेरीस तिला कामज्वर उत्पन्न झाला; त्यामुळें कमलतंतूंची किंवा कर्दलीदलांची कोमल शय्याहि तिच्या अंगाला संताप उत्पन्न करूं लागली. त्यामुळें ती अहिल्याराणी दिवसानुदिवस निस्तेज होऊं लागली. आपला पती व त्याचे आप्तजन ह्यांचा तिला तिटकारा आला. सूर्याच्या प्रखर किरणांमुळें संतप्त झालेल्या वाळवंटावर तडफ-णाऱ्या मत्स्यींप्रमाणें ती इंद्रासाठीं अहोरात्र तळमळूं लागली. अशारीतीनें प्रेमानें विव्हळ झालेली ती अहल्या सर्व लाजलज्जा सोडून " हा पहा इंद्र आला, हो इंद्रच आला ! " असें बेहोष होऊन बडबडूं लागली ! आपल्या प्रियसखीची ती दुर्दशा पाहून अहल्याराणीच्या जीवाची एक मैत्रिण तिला एकदां एकांतीं म्हणाली, " गडे अहल्ये ! तूं कांहीं काळजी

---

* इंद्रद्युम्न या नांवाच्या राजानें यज्ञांत ज्या दक्षिणा दिल्या त्यावेळीं त्यानें जीं उदकें सोडलीं होतीं, त्यांचें एक मोठें सरोवर बनलें होतें. ( इंद्रद्युम्नाची कथा-महाभारत, वनपर्व, अध्याय १९९ मध्यें आहे. ).

करूं नकोस. तुझ्या मनांत आहे, त्याप्रमाणें तुझ्या प्रियकर इंद्राला मी ह्या ठिकाणीं आणून उभा करते; म्हणजे मग तर तुझ्या मनासारखें झालें कीं नाहीं ?" "तुझ्या प्रियकराला समोर आणून उभा करते" हे तिच्या तोंडचे शब्द अहल्येच्या कानीं पडतांक्षणीं तिचें मुख सतेज दिसूं लागलें; व कृतज्ञतेनें ती आपल्या मैत्रिणीच्या पाया पडली. तो दिवस संपून रात्र पडतांक्षणीं अहल्येची ती चतुर सखी त्या इंद्र नांवाच्या ब्राह्मणाकडे गेली. अहल्येची झालेली कामुकस्थिति त्या ब्राह्मणाला निवेदन करून आणि आपल्या चातुर्यानें त्याला वश करून घेऊन ती लागलीच त्याला अहल्येकडे घेऊन आली. नंतर एकान्तस्थानीं असलेल्या एका विलासगृहांत त्या इंद्र ब्राह्मणाला घेऊन जाऊन त्या अहल्याराणीनें आपल्या त्या जाराबरोबर यथेच्छ रतिक्रीडा करण्यांत सारी रात्र घालविली. त्या इंद्रानें आपल्या विविध रतिविलासांनें त्या अहल्येला वश करून घेतलें. ह्याप्रमाणें त्या उभयतांचा विलास रोजच्यारोज सुरू झाला. अहल्या राणी त्या इंद्रावर इतकी अनुरक्त झाली कीं, तिला सर्व जग इंद्रमय दिसूं लागलें. ह्याचा परिणाम स्वाभाविकच असा झाला कीं, सर्व गुणांनीं संपन्न असलेल्या आपल्या पतीची तिला यत्किंचितहि पर्वा वाटेनाशी झाली. अहल्येचें ज्याप्रमाणें इंद्रावर प्रेम जडलें होतें, त्याप्रमाणें इंद्राचेंहि अहल्येवर प्रेम जडलें होतें. पुढें पुढें तर त्या दोघांचें प्रेम इतकें उत्कट झालें कीं, तें त्यांच्या इंद्रियचेष्टांवरून स्पष्टपणें उघडकीला येऊं लागलें; व त्या दोघांच्या शृंगारचेष्टांचें कर्णकटु वर्तमान त्या राजाच्या कानावर गेलें. परस्परावर अनुरक्त होऊन त्या दोघांच्या शृंगारचेष्टा चाललेल्या पाहून राजानें त्या दोघांना अनेक प्रकारें कडक शासन केलें. प्रथम राजानें त्या दोघांना एका मोठ्या सरोवरांतील बर्फाप्रमाणें थंड झालेल्या पाण्यामध्यें फेकून दिलें. परंतु त्या जार जारिणींच्या मनावर त्याचा यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं. त्या थंडगार पाण्यानें काकडून दुःखीकष्टी होण्याऐवजी परस्परांचें समागमसुख लाभल्यामुळें ती दोघें एकसारखीं हसतच राहिली. हा प्रकार पाहून राजाला मोठें आश्चर्य वाटलें. त्यानें त्या दोघांना पाण्यांतून बाहेर काढलें आणि विचारलें.

राजाः—मी तुम्हांला शासन केलें, तरीसुद्धां तुम्हां दोघांच्या मुखावर यत्किंचितहि खिन्नता दिसत नाहीं. याचा अर्थ काय ?

असा त्या दोघांना प्रश्न केला. त्यावर त्या दोघांनीं निर्लज्जपणानें असें उत्तर दिलें.

इंद्र व अहल्याः—हे राजन् ! एकमेकांच्या सुंदर मुखाचें ध्यान करीत असल्यामुळें आम्ही इतकें तन्मय झालों आहोंत कीं, आम्ही आपल्या व्यक्तित्वाला अजिबात विसरून गेलों आहोंत. राजा ! आमचें प्रेम आतां इतकें दृढ झालें आहे कीं, आमचीं शरीरें तूं करवतीनें कापून काढलीस, तरी देखील त्याबद्दल आतां आम्हांला कांहींच वाटणार नाहीं.

त्या दोघांचें हें उत्तर ऐकतांच संतापून गेलेल्या त्या राजानें त्या दोघांना तापलेल्या तव्यावर उभें केलें. परंतु त्यामुळें त्यांना यत्किंचितहि दुःख झालें नाहीं. पुढें त्या दोघांना हत्तीच्या पायाशीं बांधण्यांत आलें. चाबकाचे फटके मारण्यांत आले. परंतु ह्यापैकीं कोणत्याही शिक्षेनें त्यांच्या मनाचें तादात्म्य तिळमरहि ढळलें नाहीं. प्रत्येक वेळीं शिक्षा झाल्यावर " आतां तरी तुम्ही आपला नाद सोडाल कीं नाहीं ? " असा प्रश्न राजा त्यांना प्रत्येकवेळीं करी व " तूं कांहींहि केलेस तरी आम्हां उभयतांच्या प्रेमांत थोडेंहि अंतर पडणार नाहीं. " असें त्या दोघांकडून निःशंकपणें उत्तर येत असें. अखेरीस इंद्र म्हणाला.

इंद्रः—राजा ! अहल्येशिवाय या जगांत मला दुसरें कांहींहि दिसत नाहीं. माझ्या अहल्येलाहि माझ्याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं. ह्यामुळें तुझ्या कडक शिक्षांचा आमच्या मनावर मुळींच परिणाम घडून येणार नाहीं. शासनांचा अंमल शरीरावर होऊं शकतो. पण कोणत्याही विषयाच्या भावनेमध्यें स्थिर झालेल्या मनावर कोणतींहि शासनें आपला पगडा बसवूं शकत नाहींत. हे राजा ! ह्या जगांत अशा कोणत्या शक्ति आहेत कीं, ज्या दृढनिश्चयी मनाचा भेद करूं शकतील ? देह पुष्ट होवो किंवा त्याच्या चिंधड्या होऊन जावोत, इष्टार्थाशीं तद्रूप झालेलें मन आपला ध्यास केव्हांही सोडत नाहीं. अहल्यानामक मनाशीं इंद्रनामक मन आतां अगदीं एकजीव होऊन गेलें आहे. आतां कदाचित् तूं आम्हांला एखाद्या

मुनींच्याकडून शाप जरी दिलास व ह्याचा परिणाम आमच्या देहावर झाला तरी आमची एकमेकावर अनुरक्त झालेलीं मनें मेरुपर्वताप्रमाणें अचलच राहणार. हे राजा ! शरीर हें मनाचें कारण नव्हे, तर उलट मन नानाविध शरीरांचें कारण होय. मन हेंच पुरुषाचें आद्य शरीर असून अहंकाराच्या अभ्यासामुळें तें मन शरीराच्या आकारानें व्यक्त दशेला येतें. म्हणून देह जरी नाहींसा झाला, तरी मन जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत तें स्वप्नांतील सृष्टीप्रमाणें नवे नवे देह उत्पन्न करूं शकतें. पण एकदां मनच नष्ट झालें म्हणजे देह कांहींहि करूं शकत नाहीं. कारण देह ही एक केवळ कल्पना आहे. ह्यासाठीं, राजा ! क्रोधादिकासारख्या तुच्छ विकारांना वश होऊन आम्हाला विविध शिक्षा देण्याचे श्रम कशाला घेतोस ? राजा ! ज्या ज्या दिशेकडे मी आपली दृष्टि फेकतों, त्या त्या दिशेला मी आपल्या प्रिय हरिणाक्षीला अर्थात् अहल्येलाच पहात असतों. माझें मन ह्या माझ्या प्रिय युवतीशीं तन्मय झालेलें असल्यामुळें माझ्या नित्य आनन्दाचा केव्हांच भंग होत नाहीं. तूं आपल्या इच्छेप्रमाणें मला पाहिजे तेवढें शासन केलेस आणि इतरांच्या दृष्टीनें तें शासन मला दुःखकारकहि झालें, तरी माझ्या स्वतःच्या दृष्टीनें तुझ्या शिक्षेचा माझ्या मनावर एक क्षणभरहि परिणाम झालेला नाहीं, हें चांगलें लक्षांत ठेव.

इन्द्रानें अशा रीतीनें उत्तर दिल्यानंतर तो राजा क्रोधानें संतप्त झाला व आपल्या शेजारीं बसलेल्या भरतमुनीला म्हणाला.

राजाः—भगवन् ! आपण सर्व धर्म जाणणारे आहां. माझ्या स्त्रीचे हरण करून हा दुरात्मा अत्यंत निर्लज्जपणानें वाटेल तसें बोलत आहे, तरी ह्याच्या पापानुरूप ह्याला शाप देऊन आपण ह्याचा त्वरित निग्रह करावा. कारण

यदवध्यवधात्पापं वध्यत्यागात्तदेव हि ॥ ( ३-९०-३ )

" वध करण्याला अयोग्य अशा पुरुषाचा वध केल्यानें जितकें पातक लागतें, तितकें पातक वध करण्याला योग्य अशा पुरुषाचा वध न केल्यानें लागत असतें. "

राजाचें हें भाषण ऐकून त्या मुनिश्रेष्ठ भरतांनीं त्या दुरात्म्याच्या पापाचा यथार्थ विचार करून " दुष्टा ! आपल्या पतीचा द्रोह करणाऱ्या ह्या दुराचरणी अहल्येसह तुझा नाश होवो " असा त्याला शाप दिला. भरतमुनींचा हा शाप ऐकल्यानंतर इंद्र आणि अहल्या हीं राजा आणि भरतमुनी यांना उद्देशून म्हणालीं,

इंद्र व अहल्याः—तुम्हीं उभयतां खरोखरच विचारशून्य आहां ! आम्हांला शाप देऊन तुम्हीं आपल्या तपाची मात्र निष्कारण हानि करून घेतली आहे. तुमच्या शापानें आमचें यत्किंचितहि वांकडें होणार नाहीं. आमचे स्थूलदेह नष्ट करण्याचें तुमच्या शापामध्यें सामर्थ्य असलें, तरी आमच्या सूक्ष्म देहाचा नाश तुम्हांला थोडाच करतां येणार आहे ! लिंग-देहाचा–मनाचा नाश ह्या जगांत कोणालाही करतां येणें शक्य नाहीं.

अशारीतीनें त्यांचें भाषण होत आहे तोंच परस्परांशीं मनानें प्रेमबद्ध झालेल्या त्या दोघांचे देह भरतमुनींच्या शापानें वृक्षावरून तुटून पडलेल्या पानाप्रमाणें भूमीवर गळून पडले. पुढें तीं दोघेंजण हरणाच्या जन्माला गेलीं. नंतर त्यांना पक्षाचा जन्म प्राप्त झाला. अशारीतीनें तीं दोघेंजण पुनः पुनः देहधारण करीत आणि ज्या ज्या ठिकाणीं तीं जन्माला जात त्या त्या ठिकाणीं त्यांच्या पतिपत्नी या नात्यांत केव्हांहि अंतर पडलें नाहीं.

तात्पर्यः—मनाचा निग्रह करण्याचें सामर्थ्य दारुणशापामध्येंहि नाहीं, यावरून असा सिद्धान्त निघतो कीं, दीर्घकाल अभ्यास करून जो मनाचा दृढ निश्चय झालेला असतो, त्याचा नाश शापानें किंवा शरीराचा क्षय झाल्यानेंहि होत नाहीं. ज्या पुरुषाच्या मनांत जी गोष्ट चिरकाल दृढ झालेली असते, तो पुरुष तद्रूप होतो. अशा पुरुषाला वळविण्याला तत्त्व-बोध हा एकच उपाय आहे. बाकीचे सर्व उपाय पाषाणराशीवर पडणाऱ्या पर्जन्य वृष्टीप्रमाणें निःसंशय निष्फल होतात.

## (७) चित्ताची किंवा मनाची गोष्ट.

चित्तायत्तमिदं सर्वं जगत्स्थिरचरात्मकम् ॥
चित्ताधीनावतो राम बंधमोक्षावपि स्फुटम् ॥ ३-९८-३३.
अत्रार्थे कथ्यमानं मे चित्ताख्यानमनुत्तमम् ।
ब्रह्मणा यत्पुरा प्रोक्तं शृणु रामातियत्नतः ॥ ३-९८-३४.

**भावार्थ**—जडचेतनात्मक असें हें अखिल विश्व चित्तानें उत्पन्न केलेलें आणि चित्ताधीन असल्यामुळें, चित्तामुळेंच जीवाला बंध आणि मोक्ष ह्या अवस्था प्राप्त होत असतात. ह्यासंबंधानें पूर्वी मला ब्रह्मदेवानें सांगितलेलें चित्ताख्यान मी तुला सांगत आहे, तें ऐक.

वसिष्ठः—अत्यंत विस्तीर्ण, शून्य, शांत आणि अतिशय भयंकर असें एक अरण्य होतें. तें इतकें विस्तीर्ण होतें कीं, शेंकडों योजनें लांबरुंद असलेला प्रदेश त्या अरण्यामध्यें एखाद्या लहानशा कणाप्रमाणें दिसत असे. त्या अरण्यांत हजार हात आणि हजार डोळे ह्यांनीं युक्त असलेला एक पुरुष रहात होता. त्याचा आकार अतिशय विशाल आणि भयंकर असून त्याची बुद्धि अतिशय व्याकुल झालेली होती. तो आपल्या हजार हातांमध्यें मोठमोठाले परिघ (अडसर) घेऊन आपल्या पाठीवर प्रहार करीत उगीचच्या उगीच इकडून तिकडे धांवत होता. अशा रीतीनें बऱ्याच दूर अंतरावर पळत गेल्यानंतर तो अगदीं थकून गेला. शेवटीं धावतां धावतां तो एका खोल अंधाऱ्या विहिरींत पडला. पुष्कळ काळ गेल्यानंतर तो पुरुष मोठ्या कष्टानें त्या विहिरींतून बाहेर आला व पूर्वीप्रमाणें आपल्या शरीरावर त्या परिघाचे प्रहार करीत तो पुनः धांवत सुटला.

अशारीतीनें धावतां धावतां बऱ्याच दूर अंतरावर गेल्यानंतर एखादा पतंग अग्नीवर उडी घालतो, त्याप्रमाणें ज्यामध्यें शेंकडों काटेरी लता, अल्प छाया देणारे वृक्ष आणि मोठमोठे दगड सर्वत्र पसरले आहेत, अशा करंज वृक्षांच्या एका निबिड अरण्यांत तो शिरला. पुढें क्षणभरानें त्या वनांतून बाहेर पडून पूर्वीप्रमाणें आपल्या अंगावर प्रहार करीत धांवत धांवत पुष्कळ अंतर चालून गेल्यानंतर तो चंद्रकिरणांप्रमाणें शीतल अशा एका सुंदर कदली

बनामध्यें शिरला. त्या ठिकाणीं त्याला जरा आनंद वाटतो, तों एका क्षणांत तेथून बाहेर पडून पूर्वीप्रमाणें आपल्या हातानें आपल्या अंगावर प्रहार करून घेऊं लागला आणि इकडे तिकडे धांवत सुटण्याचा त्याचा क्रम पुनरपि सुरू झाला. धावतां धावतां बरेंच दूर गेल्यानंतर ज्या अंध कूपांत तो पूर्वी पडला होता, त्यांतच पुनः जाऊन पडला. ह्या वेळीं त्याचे सर्व अवयव छिन्नभिन्न होऊन गेले होते. पुढें त्या अंध कूपांतून बाहेर पडून त्यानें पुनः कदलीवनांत प्रवेश केला. अशा रीतीनें कदलीवनांतून करंजवनांत; करंजवनांतून पुन्हा अंधकूपांत आणि अंधकूपांतून पुन्हा कदलीवनांत ह्या क्रमानें तो सारखा संचार करीत होता. आपल्याच हातांनीं आपल्या अंगावर प्रहार करून घेण्याचें त्याचें कामहि अव्याहत चालूच होतें. विवेकशून्य झालेल्या त्या पुरुषाचा तो उपद्याप बरेच दिवसपर्यंत अवलोकन केल्यानंतर, एकदां योगबलानें त्याला मार्गांत क्षणभर अडवून मी त्याला उभा करून म्हणालों, ' बाबारे ! तू कोण आहेस ? तसेंच हें साहसकर्म कशासाठीं करीत आहेस ? तुझें नांव काय ? आणि असले वेडे वेडेचाळे करण्यांत तुझा हेतु तरी काय आहे ? ' हे माझे प्रश्न ऐकतांच तो मला म्हणालाः—' मी कोणी नाहीं आणि मी कांहीं एक करीत नाहीं. माझ्या कार्यांत अडथळा करणारा तूं माझा कट्टा शत्रू आहेस ! तूं मला पाहिलेंस ह्यामुळें माझ्या सुखदुःखांचा नाश झाला. किंबहुना मी स्वतःच नष्ट झालों आहे, असें मला वाटतें." अशा रीतीनें भाषण करून असंतुष्ट झालेला तो पुरुष आपल्या विकल अंगाकडे पाहून दीनवदन होत्साता मोठ्यानें गळा काढून रडूं लागला, त्याच्या डोळ्यांतून चाललेल्या अश्रुप्रवाहामुळें तो त्या अरण्यांत पर्जन्यवृष्टीच करीत आहे कीं काय असा भास होत होता ! नंतर एका क्षणांत त्यानें आपलें रडणें आवरलें आणि आपल्या अंगाकडे पाहून तो प्रथम मोठ्यानें हंसला आणि नंतर मोठ्यानें ओरडला. पुढें त्यानें आपलीं अंगें टाकून देण्याला क्रमाक्रमानें सुरवात केली. प्रथमतः त्याचें अत्यंत भयंकर शिर खालीं पडलें. नंतर बाहू, नंतर वक्षःस्थल आणि त्याच्या मागून उदर खालीं पडलें. अशा रीतीनें आपलीं सर्व अंगें टाकून दिल्यानंतर तो पुरुष कोठें तरी निघून गेला.

ह्या गोष्टीनंतर कांहीं दिवसांनीं एका एकांत स्थलीं असाच दुसरा एक

पुरुष मी पाहिला. तोहि आपल्या सर्व अंगावर प्रहार करून घेऊन पळतां पळतां अंधकूपामध्यें पडला. कूपांतून बाहेर पडून पुन्हां धावतां धावतां एखाद्या खड्यांत पडे व एका क्षणांत कदलीवनांत निघून जाई. क्षणांत दुःखी तर क्षणांत सुखी असावें, पुनः पुन्हा स्वतःला मारून घ्यावें, असा त्याचा वेडेपणा पुष्कळ दिवस पाहिल्यानंतर आश्चर्यचकित होऊन मी त्याला मार्गांत अडवून पूर्वीप्रमाणें प्रश्न केला. पूर्वीच्या पुरुषाप्रमाणें माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन तो हसला, ओरडला, आणि अखेरीस आपलीं अंगें टाकून देऊन तोहि एकाएकी अदृश्य झाला. त्यानंतर कांहीं दिवसांनीं मी आणखी एक पुरुष पाहिला. तोहि आपल्या हातांनीं आपल्या शरीरावर प्रहार करून घेऊन स्वच्छंद धांवत होता. धावतां धावतां पूर्वीच्या दोन पुरुषांप्रमाणें तो एका मोठ्या अंधकूपामध्यें पडला त्या कूपांतून तो बाहेर केव्हां येतो याची वाट पहात मी त्या ठिकाणीं पुष्कळ वेळ बसलों परंतु तो लवाड त्या कूपांतून बाहेर आलाच नाहीं! नंतर मी तेथून उठून दुसरीकडे जाऊं लागलों. इतक्यांत पूर्वीसारखाच दुसरा एक पुरुष त्या अंधकूपांत पडण्याकरितांच येत होता. त्याला मध्येंच अडवून पूर्वीसारखेच प्रश्न विचारले. पण त्यानें माझें बोलणें ऐकलें न ऐकल्यासारखें केलें. इतकेंच नव्हे तर तो मला उलट धिक्कारपूर्वक म्हणालाः—'अरे पाप्या! दुष्ट ब्राह्मणा! तुझी अक्कल गेली कोठें?' इतके शब्द बोलून तो आपल्या उद्योगाला लागला.

त्यानंतर त्याच अरण्यांत हिंडत असतां तसलीं दुष्कृत्यें करणारे आणखी कित्येक पुरुष मी पाहिले. तें अत्यंत विस्तृत अरण्य अद्यापि विद्यमान आहे.

## चित्ताख्यानाचें प्रयोजन.

श्रीरामः—हें अरण्य कोठें आहे? तसेंच त्या अरण्यांतील आत्मघातकी कृत्यें करण्याला उद्युक्त झालेले ते पुरुष कोण? हें मला सांगा.

श्रीवसिष्ठः—तुला सर्व सांगतों तें आतां नीट श्रवण कर. तें अरण्य आणि त्यांमधील ते पुरुष वास्तविक कोठें दूर नाहींत. परमार्थदृष्ट्या असत् असणारा परंतु भ्रांतिदृष्ट्या सत् असणारा हा संसार म्हणजेच तें महारण्य होय. या संसाररूपी अरण्यांत फिरणारे विशाल देहधारी पुरुष म्हणजे हीं सर्व जीवांचीं मनें होत. अरण्यांतील त्या पुरुषांना भेटणारा जो "मीं" तोच

विवेक. या विवेकानेंच त्या मनोरूपी पुरुषांना बोध केला. कांहीं मनोरूपी पुरुष माझा ( विवेकाचा ) उपदेश ऐकून माझ्या प्रसादानें शांत होत्साते परम पदाला पोहोचले. कांहीं मनोरूपी पुरुषांनीं अज्ञानमोहानें ग्रस्त झाल्यामुळें माझें ( विवेकाचें ) अभिनंदन करण्याऐवजीं तिरस्कार केला व त्यामुळें ते अंधकूपांत पडले. तें अंधकूप म्हणजेच गहन नरक होत. कदलीवनें म्हणजे स्वर्गलोक होय व करंजवृक्ष म्हणजे हा मृत्युलोक होय. अंधकूपांतून बाहेर न निघणारे पुरुष हीं महापातकी निरंतर नरकांत रहाणारीं मनें आणि कदलीवनांतून बाहेर न पडणारे पुरुष म्हणजे पुण्यवान् मनें होत. करंजवनांत जाऊन तेथून बाहेर न पडणारे पुरुष हे मानवयोनीला प्राप्त झालेलीं मनें होत. ज्या पुरुषांनीं माझा तिरस्कार केला, त्या अज्ञानी मनांनीं आपल्या स्वतःच्या विवेकाचाच तिरस्कार केला, असें समज. ‘ तूं मला पाहिलेस त्यामुळें मी नष्ट झालों; तूं माझा शत्रू आहेस ’ असें शब्द एक पुरुष बोलला म्हणून मी तुला पूर्वीं सांगितलें. त्या पुरुषाचे ते शब्द म्हणजे तत्त्वबोधामुळें क्षीण होणाऱ्या चित्ताचे उद्गार होत. एक पुरुष माझ्यासमोर मोठ्यानें रडला म्हणून मी तुला सांगितलें. तें त्याचें रडणें म्हणजे भोगजालाचा त्याग करतांना अत्यंत क्लेश होत असतात म्हणून त्यावेळीं मनानें केलेलें रुदन होय. माझा उपदेश ऐकून आनंदी झालेला एक पुरुष हंसल्याचें मी तुला सांगितलें. त्याचें कारण मनास विवेकानें ज्ञान झाल्यामुळें त्यास आनंद झाला. एका पुरुषाला बलात्कारानें अडवून मी प्रश्न केला, असें तुला सांगितलें. त्याचा अर्थ विवेक आपल्या सामर्थ्यानें चित्ताला आकलन करतो असा आहे. त्या पुरुषाचीं विस्तीर्ण झालेलीं अंगें नष्ट झालीं. ह्यावरून मनोनाश झाला म्हणजे विषय आणि विषयांच्या इच्छा नष्ट होतात, हा बोध घ्यावयाचा आहे. पुरुषाचे जे सहस्र हस्त, सहस्र नेत्र मी वर्णन केले, ते चित्ताच्या अनंत आकृती आहेत असें दर्शवितात. तो पुरुष आपल्या हातांनीं आपल्या अंगावर प्रहार करीत होता. याचा अर्थ मन कुकल्पनांच्या आघातानें आपल्या स्वतःवर प्रहार करून घेत असतें.

अशा रीतीनें अज्ञानानें वेडावून गेलेल्या मनाचे चाळे किती विलक्षण आहेत पहा ! हें वेडें मन स्वतः केलेल्या संकल्परूपी जाळ्यांनीं आपण

आपल्यालाच बद्ध करून घेतें. आपले कृपण सुतारांनीं चिरलेल्या लाकडांमध्यें अडकेल ह्याचा विचार न करितां एखादा मूर्ख वानर अर्धवट कापलेल्या लाकडांमध्यें ठोकलेला पाचर उपटून आपणाला संकटांत घालतो, त्याचप्रमाणें नेहमीं उपद्व्याप करण्यांत दंग झालेलें चंचल मन आपल्या दुःखालाच कारण होतें. परंतु हेंच मन सतत अभ्यासाच्या योगानें स्वस्वरूपाच्या अखंड अनुसंधानामुळें आणि निरंतर परमात्मभावनेमध्यें स्थिर होऊं लागल्यामुळें बाधित होतें आणि नंतर संसारदुःखामुळें शोक करण्याचा त्याच्यावर प्रसंग येत नाहीं.

तात्पर्यः—जडचेतनात्मक विश्व चित्तानें उत्पन्न केलें आहे म्हणून तें चित्ताच्या आधीन आहे. त्यामुळें नित्य मुक्त अशा आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञानामुळें निर्माण झालेल्या चित्ताच्या भ्रांतीनेंच बंध आणि मोक्ष या कल्पना उत्पन्न झालेल्या आहेत. ही भ्रांति नाहींशी झाली कीं ह्या कल्पनाहि नाहींशा होतात.



## ( ८ ) तीन राजपुत्रांची गोष्ट.

इयं संसाररचना स्थितिमेवमुपागता ॥
बालकाख्यायिकेवोग्रैः संकल्पैर्दृढकल्पितैः ॥ ३-१०१-३२.

भावार्थः—दाईनें बालकाला सांगितलेल्या गोष्टीप्रमाणेंच ह्या मनानें आपल्या दृढ संकल्पानेंच ह्या संसाराची रचना केली आहे.

विवेकशून्य असा कोणी एक मुलगा आपल्या दाईला म्हणाला, "दाई ! मला एखादी मौजेची आणि चटकदार गोष्ट सांग " ' बरं आहे, ' असें म्हणून ती, त्या मुलाची करमणूक करण्यासाठीं, एक सुंदर गोष्ट सांगूं लागली, ती म्हणालीः—

" विस्तीर्ण आणि शून्य आकाशांत नक्षत्रें राहतात, त्याप्रमाणें अत्यंत असत् नांवाच्या एका शून्य आणि विस्तीर्ण नगरांत आपल्या

धार्मिकतेमुळें आणि शौर्यामुळें प्रसिद्ध पावलेले तीन राजपुत्र रहात असत. त्या तिघांपैकीं दोघे जन्मालाच आलेले नव्हते. आणि एक तर गर्भांत सुद्धां राहिला नव्हता. कांहीं दिवसांनीं त्यांचे बांधव मृत झाल्यामुळें अत्यंत दुःखी आणि खिन्नवदन झालेले ते तिघे, आकाशांत बुध, शुक्र आणि शनि एकदम संचाराला निघावेत, त्याप्रमाणें कांहीं द्रव्य संपादन करावें ह्या हेतूनें त्या शून्य नगरांतून बाहेर पडले. शिरसाच्या फुलाप्रमाणें ज्यांचीं शरीरें अतिशय कोमल आहेत, असे ते तिघे राजपुत्र दिवसा मार्गानें चालत असतां पाठीमागून प्रखर उन्हाचा मारा सुरू झाल्यानें ग्रीष्म ऋतूमधील कोमल पल्लवांप्रमाणें अगदीं सुकून गेले. तापलेल्या वाळूवरून चालल्यामुळें त्यांचे पाय होरपळून गेले; आणि " हाय हाय ! " " अहो बाबा ! " असे दुःखविलाप करीत कळपांतून चुकलेल्या हरिणाप्रमाणें ते राजपुत्र भटकत राहिले. वाटेनें त्यांच्या पायांतून कित्येक ठिकाणीं कांटे मोडले. जागोजागीं ठेंचा लागत असल्यानें पायांचीं बोटें रक्तबंबाळ झालीं. धुरळ्यामुळें ज्यांचें सर्वांग वैराग्याप्रमाणें मलिन झालें आहे, असे ते तिघे राजपुत्र अनेक संकटें सोशीत पुष्कळ दूरपर्यंत गेले. पुढें ज्या ठिकाणीं वृक्षांवरून लतांचीं जाळीं पसरलीं आहेत, जेथील वृक्ष पुष्पें व फळें ह्यानीं ओथंबले आहेत आणि जें पशुपक्ष्यांनीं आपलें विश्रांतिस्थान केलें आहे अशा एका स्थलीं ते जाऊन पोहोंचले. त्या ठिकाणीं त्यांना तीन वृक्ष दिसले. परतु त्यांपैकीं दोन उत्पन्नच झालेले नव्हते, आणि सुखानें चढतां येण्यास शक्य अशा तिसऱ्या वृक्षाचें बीजच मुळीं रुजलें गेलें नव्हतें ! नंदनवनांतील पारिजातक वृक्षाखालीं इंद्र, यम आणि अग्नि हे तिघे देव बसावे, त्याप्रमाणें अतिशय दमलेले ते राजपुत्र विश्रांतिसाठीं त्या वृक्षांपैकीं एका वृक्षाखालीं बसले. नंतर त्यानीं त्या वृक्षावरील अमृतासारखीं मधुर फळें खाल्लीं आणि त्या वृक्षावरील लतागुच्छांच्या माळा आपल्या गळ्यांतून घातल्या. अशारीतीनें बराच वेळ विश्रांति घेतल्यानंतर ते राजपुत्र तेथून पुढें जाण्यास निघाले. ऐन दुपारच्या वेळीं बरीच मजल चालून गेल्यानंतर तरंग आणि लाटा ह्यांच्या योगानें शोभणाऱ्या आणि मोठ्यानें शब्द करणाऱ्या अशा तीन नद्या त्यांना दिसल्या. त्यांपैकीं एक तर कोरडी ठणठणीत होती; आणि आंधळ्याच्या डोळ्यांत बाहुली नसते, त्याप्रमाणें दुसऱ्या

द्रोहोंत डोळ्यांना लावण्यास एक यवभरहि पाणी नव्हतें. ग्रीष्मऋतूमधील तापामुळें ब्रह्मा, विष्णु आणि महेश हे तीन देव भागीरथीमध्यें स्नान करतात, त्याप्रमाणें ऊन्हाच्या तापानें संतप्त झालेल्या आणि घामानें भिजून गेलेल्या त्या तिघा राजपुत्रांनीं त्या शुष्क नदीमध्यें आदरपूर्वक स्नान केलें. त्या नदीमध्यें त्यांनीं यथेच्छ जलक्रीडा केली आणि अमृताप्रमाणें मधुर असें त्या नदीचें उदक त्यांनीं प्राशन केलें. नंतर आनंदित झालेले ते राजपुत्र तेथून पुढें जाऊं लागले. पुढें जातां जातां संध्याकाळची वेळ झाली; आणि सूर्य पश्चिम क्षितिजाखालीं जात आहे, अशा वेळीं नवीन वसलेलें आणि पर्वतप्राय तटांनीं वेष्टिलेलें असें 'भविष्य' नांवाचें नगर त्यांच्या दृष्टीस पडलें. त्या नगरावरील आकाश ध्वजपताकांनीं भरून गेलेलें होतें व आसपासची भूमि सुंदर जलाशयांनीं व्यापलेली होती. त्या नगरांत शिरल्याबरोबर नागरिक लोकांच्या गायनाचा मधुर ध्वनि त्यांच्या कानीं दुरूनच पडला. हिंडतां हिंडतां मेरुपर्वताच्या शिखराप्रमाणें अतिशय उंच, रत्नखचित आणि अत्यंत रमणीय अशीं तीन मंदिरें त्यांच्या दृष्टीस पडलीं. त्यांपैकीं दोन मुळींच बांधलेलीं नव्हती व एक बांधलेलें होतें पण त्याला भिंतीच नव्हत्या. शेवटीं भिंती नसलेल्या मंदिरांत ते तिघे शिरले; आणि त्या ठिकाणीं क्षणभर विश्रांति घेऊन ते पुन्हां इकडे तिकडे हिंडूं लागले. इतक्यांत तापलेल्या सुवर्णाप्रमाणें तेजस्वी अशा तीन तपेल्या त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्यांतल्या दोन तपेल्या तापून करपून गेल्या होत्या व एकीचा तर अगदीं चुरा झाला होता. चूर्ण झालेल्या तपेलीमध्यें त्या दीर्घ शहाण्या व खादाड राजपुत्रांनीं नव्याण्णव द्रोण तांदूळ मोजून घेतले व भात शिजवला. त्यानंतर त्यांनीं भोजनाकरितां तीन ब्राह्मणांना निमंत्रणें दिलीं. त्यांतल्या दोघांना शरीरेंच नव्हतीं व तिसऱ्याला शरीर होतें पण तोंडच नव्हतें !' तोंड नसलेल्या त्या ब्राह्मणानें शंभर द्रोण भात एकट्यानेंच खाऊन टाकला. नंतर त्या ब्राह्मणानें खाऊन शिल्लक राहिलेला भात त्या तिघांनीं खाल्ला व ते तृप्त झाले. पुढें ते तिघे राजपुत्र त्या "भविष्य" नगरींतच कायमचा मुक्काम करून राहिले. नेहमीं मृगयेचा व्यवसाय करून राहणारे ते तिघेजण अजूनहि त्या नगरींत सुखानें वास्तव्य करीत आहेत."

तात्पर्यः—

राजपुत्रास्त्रयो नद्यो भविष्यनगरे यथा ॥
यथा संकल्परचना तथेयं हि जगत्स्थितिः ॥३-१०१-३६.

वरील गोष्टींतील तीन राजपुत्र, त्यांना दिसलेल्या तीन नद्या वगैरे कल्पनांमध्यें जितकी सत्यता आहे. तितकीच सत्यता मनानें कल्पिलेल्या जगत्स्थितीमध्यें आहे. आपल्या दृढ संकल्पामुळें मन ह्या सर्व संसाराची रचना करतें. संसार म्हणजे नुसतें संकल्पांचें जाळें असून बंधमोक्षादि कल्पना हा मनाचा केवळ विलास आहे ! हें ह्या गोष्टीवरून ध्यानांत येतें.

---

## ( ९ ) लवण–राजाची गोष्ट

लवणस्य यथा राज्ञश्चेंद्रजालकुलाकृतेः ॥
चंडालत्वमनुप्राप्तं तथेदं मनसि स्थितम् ॥ ४-५-८.

भावार्थः—लवण राजानें एका गारुड्याच्या जादूमुळें केवल मनानेंच जसा चांडाल स्थितीचा अनुभव घेतला, तसें हें सर्व जग मनाच्याच ठिकाणीं आहे.

या पृथ्वीतलावर उत्तर पाडव नांवाचा एक विस्तीर्ण व समृद्ध देश होता. त्या देशांत अनेक अरण्यें होतीं. त्या ठिकाणीं हरिश्चंद्राचें कुलांत उत्पन्न झालेला लवण नांवाचा परम धार्मिक राजा होऊन गेला. तो पृथ्वीवर तेजःपुंज प्रतिसूर्यच होता. त्या राजाच्या यशोरूपी फुलांतून जे पराग उडत असत, त्यांनीं सर्व पर्वतांचीं शिखरें शुभ्र होत असत व त्या पर्वतांवर पांढरे शुभ्र हार घालून ते शोभिवंत केले आहेत कीं काय असें वाटत असे. त्या राजास कपट कसें तें माहीतच नव्हतें व हव्यास तर त्यास कधीं दिसलाच नाहीं; व ज्याप्रमाणें वक्ता आपल्या ठिकाणीं वक्तृत्व धारण करतो; त्याप्रमाणें त्यानें निरंतर औदार्य धारण केलें होतें. एकदां तो राजा सभेंत जाऊन आपल्या सिंहासनावर बसला. राजनीतिनिपुण असा तो राजा सुखानें बसला असतां एक गारुडी सभेंत आला व मोठ्या नम्रपणानें राजास नमस्कार करून म्हणाला, "महाराज ! आकाशांत बसून

चंद्र जसा पृथ्वीला अवलोकन करतो, त्याप्रमाणें मी एक जादूचा खेळ करून दाखवितो, तो आपण आपल्या सिंहासनावर बसूनच पहावा. " राजानें खेळ करण्यास परवानगी दिली. नंतर गारुड्यानें आपली पिच्छिका ( मोराच्या पिसांची कुंचली ) नजर बंद करण्याकरितां इवेंत फिरविली. परमात्म्याची माया जशी वेगवेगळी सृष्टि उत्पन्न करते, त्याप्रमाणें नाना· प्रकाराचे खेळ करून दाखविणारी ती कुंचली होती. निरनिराळ्या रंगाची झांक मारणारी ती कुंचली राजानें पाहिली, तोंच त्या सभास्थानीं एक अश्वपालक येऊन पोहोंचला. त्याच्या मागोमाग एक अतिशय देखणा व चपल घोडा त्या ठिकाणीं आला. त्या अश्वपालकानें तो घोडा राजा-जवळ नेला व तो राजाला म्हणालाः—" महाराज ! हा घोडा म्हणजे एक रत्न आहे. हा इंद्राच्या उच्चैःश्रव नांवाच्या घोड्याच्या तोडीचा आहे. माझ्या धन्यानें हा घोडा आपणांस देण्याकरितां पाठविला आहे. मौल्यवान् वस्तु थोर मनुष्यास अर्पण केल्यानें जास्त शोभते. प्रभो ! या घोड्यावर बसून आपण थोडेसें फिरून यावें. ह्या घोड्याची करामत एकदां आपण पहा तर खरी. " असें त्या अश्वपालकाचें भाषण ऐकल्यावर राजानें त्या घोड्याकडे क्षणभर पाहिलें. तोंच राजा चित्राप्रमाणें स्तब्ध झाला. परमेश्वराच्या ध्यानांत निमग्न झालेल्या मनुष्याप्रमाणें तो राजा दोन मुहूर्त-पर्यंत निश्चेष्ट होऊन गेला. तेव्हां राजसभेंतील सभासदांस आश्चर्य वाटून चिंता उत्पन्न झाली. राजाचे मंत्री संशयसागरांत बुडून गेले. त्या सभेंतील गोंगाट अगदीं नाहींसा झाला; त्या जादूच्या खेळाच्या कुटीलपणानें सर्व सभासद विस्मित होऊन भयभीत झाले; राजा डोळे मिटून स्तब्ध राहिल्यानें त्या सभेस मिटलेल्या कमलांच्या वनाची शोभा प्राप्त झाली.

चार घटकांनीं राजा शुद्धीवर आला, परंतु तो आपल्या सिंहासनावर थरथर कांपूं लागला. नंतर सेवकजन पुढें होऊन त्यांनीं त्या घाबरलेल्या राजास सावरून धरिलें. नंतर मोठ्या आदरांनीं व विनयांनीं सभासदांनीं व मंत्र्यांनीं राजास विचारलें.

राजमंत्रीः—महाराज ! आपलें मन निर्मल असतां हें असें भयाकुल कां झालें ? आपल्या मनास मोह उत्पन्न झाल्यास आपल्या मोठेपणास कमीपणा येईल.

नंतर राजानें डोळे उघडले व आश्चर्यानें तो म्हणाला.

लवणराजाः---सभासदहो! माझी आश्चर्यकारक गोष्ट ऐका. ही कुंचली पाहिल्या बरोबर मी जादूनें मारला गेलों. नंतर मी भ्रांतचित्त होऊन त्या घोड्यावर बसून मृगया करण्यास निघालों. सुखोपभोगामुळें जड झालेलें मन अज्ञजनास जसें वाटेल तिकडे नेतें, त्याप्रमाणें त्या घोड्यानें मला अत्यंत दूर नेलें. तेव्हां मी एका अत्यंत भयंकर, प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें दाह उत्पन्न करणाऱ्या, जल, पक्षी व वृक्षहीन अशा अरण्यांत पोहोंचलों. घोड्याच्या प्रवासानें मी अगदीं थकून गेलों. या अरण्यांत मी आल्यानंतर मला अत्यंत खेद झाला. तेथून तो घोडा दुसऱ्या अरण्यांत आला. तेथें जांभूळ कदंबाची वगैरे अनेक जातींचीं झाडें होतीं. हीं झाडें म्हणजे केवळ प्रवाशास बांधवाप्रमाणें भासत. धांवतां धांवतां माझा घोडा एका जंबीर वृक्षाच्या खालीं आला, घोडा धांवतां धांवतां थांबेना, म्हणून मी त्या झाडाच्या एका खालीं आलेल्या फांदीस लोंबकळलों. मनुष्यानें भागीरथीचा आश्रय केल्याबरोबर त्याच्या दुष्कृत्यांचा संचय त्याला सोडून जातो. त्याप्रमाणें मी त्या झाडाच्या फांदीला धरतांच माझ्या खालून तो घोडा निसटून दूर पळून गेला. फार लांबचा व पुष्कळ वेळ प्रवास केल्यामुळें मी खिन्न झालों, अन् तेथेंच विश्रांति घेत राहिलों. नंतर मी सर्व रात्र तेथेंच घालविली. ती रात्र मला कल्पाप्रमाणें मोठी भासली. त्या दिवशीं माझें स्नान नाहीं, देवतार्चन नाहीं, भोजनहि नाहीं. ती रात्र मी केवळ संकटांत बसून घालविली. थंडी तर इतकी पडली होती कीं, माझी दातखिळीच वाजूं लागली. अशा त्या थंडींत व अंधकारांत ती रात्र मी घालविली. रात्र संपल्यावर मी झाडावरून खालीं उतरलो, परंतु त्या भयंकर अरण्यांत मला एकहि माणूस दिसेना. फक्त निर्भयपणें 'ची ची' शब्द करीत फिरणारे पक्षी मात्र दिसत होते. नंतर सूर्य मध्यान्हीं आला, तेव्हां मला एक मुलगी दिसली. डोळे अत्यंत चंचल असून, तिचें वस्त्र फार मळीन होतें व तिच्या जवळ अन्नहि होतें. नंतर रात्रीजवळ चंद्रानें जावें, त्याप्रमाणें मी तिच्या जवळ गेलों, व तिला म्हणालों;---

लवणराजाः—बाळे ! मी अत्यंत उपाशी आहे, मला हें तुझ्या जव-ळचें अन्न देशील तर बरें होईल. आपल्या संपत्तीचा उपयोग दुःखितांचें दुःख निवारणार्थ केला तर ती संपत्ति वृद्धिंगत होते. माझी भूक क्षणो-क्षणीं वाढत आहे, तर तूं हें अन्न मला दे.

अशी तिची याचना केली. तरीहि तिनें मला अन्न दिलें नाहीं. दुर्दैवी लोकांनीं लक्ष्मीची कितीहि प्रार्थना केली, तरी जशी ती त्यांना प्रसन्न होत नाहीं, त्याप्रमाणें ती मुलगी अन्न देण्यास कबूल होईना. मग मी तिच्या मागोमाग जाऊं लागलों आणि या वनांतून त्या वनांत मी मागें व ती पुढें याप्रमाणें माझ्या सावलीप्रमाणें ती मजपुढें होती. शेवटीं ती मला म्हणाली;—

चांडालकन्याः—हार आणि मुकुट धारण करणाऱ्या पुरुषा ! मी चांडाळकन्या आहें. आपलें स्वतःचें कांहींतरी कार्य साधल्या-शिवाय नुसती भीक मागून माझ्यापासून तुला अन्न मिळणार नाहीं.

असें म्हणून ती लाजत मुरकत गेली व मागें वळून पुनः म्हणाली.

चांडलकन्याः—" तूं माझा नवरा होशील तर हें अन्न मी तुला देईन. माझा बाप ह्या जवळच्या शेतांत दोन बैलांचा नागर चालवीत आहे. त्याच्यासाठीं मी हें अन्न नेत आहे. पण असें असलें तरी, तूं माझा नवरा होत असलास तरच हें अन्न तुला देतां येईल. कारण प्रिय पुरुष हा स्त्रीला आपल्या प्राणापेक्षां केव्हांहि प्रिय असतो. "

लवणराजाः—बरें आहे. मी तुझा नवरा होतों. कारण आपत्तिमध्यें जातीचा व कुलाचा विचार कोण करतो !

असें मी कबूल केल्यानंतर तिनें त्या अन्नांतील अर्धें अन्न मला दिलें. मग मी तें चांडाळाच्या घरचें अन्न खाल्लें, व त्याबरोबर तिनें आणलेला जांभळाचा रसहि मी प्यायलों. नंतर तेथेंच मी थोडीशी विश्रांति घेतली. नंतर मी केवळ तिचा शरीराबाहेर असलेला प्राण बनलों. पुढें तिनें माझा हात धरून मला आपल्या बापाकडे नेलें. तो तिचा बाप दिसण्यांत अत्यंत कुरूप, लठ्ठ व भेसूर मूर्तिमंत " अवीचि " नांवाचा नरकच आहे असें मला वाटलें. नंतर माझ्यापुढें चालणाऱ्या त्या मुलीनें त्यास सांगितलें,

चांडालकन्याः—बाबा ! हा मी नवरा पसंत केला आहे, तर यास तुमचें अनुमोदन असावें.

तो " बरें आहे. " असें म्हणाला. नंतर संध्याकाळ झाल्यावर त्यानें आपले बैल सोडले. ते बैल म्हणजे जणूं काय यमाचे नोकरच होते. संध्याकाळीं अभ्रें व धुकें यांच्या योगानें दिशा किंचित् धुंद झाल्या असतांना जणूं काय त्या वेताळाच्या जाळ्यांतून आम्ही घरीं जावयास निघालों. नंतर कांहीं वेळानें आम्ही त्या लांबच्यालांब अरण्यांतून त्या चांडाळाच्या घरीं येऊन पोहोंचलों. त्या घरांत डुकरें, घोडीं, माकडें, कोंबडें व कावळे असून त्यांचीं कातडीं व आतडीं वाळविण्याकरितां टांगलेलीं व पसरलेलीं होतीं. त्यांतून पक्षी उडत होते. आम्ही घरांत जातांच हातांत मांसाचे गोळे घेतलेलीं मुलें दिसलीं. त्या मांसावर माशा घों घों करीतच होत्या. आम्ही आंत जातांच आम्हाला बसावयास एक केळीचें मोठें सोपट पसरलें. मी तेथें आमच्या श्वशुरगृहांत आसनावर बसलों. नंतर रक्ताप्रमाणें लाल डोळे असणाऱ्या आमच्या सासऱ्यानें आमच्या विरळशा सासूस हाक मारली व माझ्याकडे बोट दाखवून तिला सांगितलें, "हे आपले जावई आहेत बरें" हें भाषण तिनें ऐकिल्यानंतर तिला मोठा आनंद झाला. पुढें त्यांनीं त्या मुलीशीं माझा विवाह करून दिला. दुष्कर्में करणाऱ्या पुरुषाचें यातनेबरोबर (संकटाबरोबर) जसें लग्न लागलेलें असतें, त्याप्रमाणें त्या काळ्याकुट्ट चांडालीबरोबर माझें लग्न झालें. त्या लग्नसमारंभांत मोठमोठे ढोल धडाधड वाजत होते. दारूचीं व कुत्र्याच्या मांसाचीं पक्वान्नें तयार केलीं होतीं. जे वऱ्हाडी जमले होते ते जणूं काय दुष्कृत्यांचे राशीच दिसत होते. त्यांनीं तीं पक्वान्नें खाऊन व दारू पिऊन खूप चैन केली.

तो लग्नसोहळा सात दिवस चालू होता. मी तेथेंच राहिलों व पुढें चांगला धष्टपुष्ट बनलों. असे माझे आठ महिने त्या घरीं गेले. पुढें ती मुलगी गरोदर झाली आणि आपत्तींत जशीं दुःखें उत्पन्न होतात त्याप्रमाणें तिला दुःखदा नांवाची मुलगी झाली. पुढें तीन वर्षांनीं त्या माझ्या स्त्रीला आणखी एक अकल्याणी नांवाचा मुलगा झाला. दुर्बुद्धीपासून जसे आशापाशाचे अनर्थ उत्पन्न होतात, तसा तो मुलगा होता. त्या

चांडाळणीला पुढें पुन्हां एक मुलगी झाली आणि तिच्या पाठीवर एक मुलगा झाला. अशीं मला चार मुलें झालीं. त्या मुलाबाळांसह मी कित्येक वर्षे त्या महारवाड्यांत घालविलीं. तेथें थंडी ऊन व वारा यांचे क्लेश सहन करावे लागले. कुटुंबपोषणाच्या चिंतेनें माझी बुद्धि अगदीं होरपळून गेली. कुटुंबपोषणास जे कष्ट करावे लागत, त्यांनें सर्व दिशा पेटल्याप्रमाणें भयंकर दिसत असत. पुष्कळ वर्षे गेल्यानंतर म्हातारपणानें माझा देह जर्जर झाला. माझे केस पांढरे फटफटीत झाले. पुढें तेथें मोठा दुष्काळ पडला. सर्व गवत वाळून गेलें. भयंकर दुष्काळामुळें आमच्या महारवाड्यांतील महार मंडळी पटापट मरूं लागलीं व आम्ही विंध्याद्रीच्या ज्या भागांत रहात होतों. तेथें अन्न नाहीं, पाणी नाहीं, झाडाला पानें नाहींत व गवतहि राहिलें नाहीं. मेघ इकडून तिकडे हिंडतांना दिसत पण पाण्याचा वर्षाव मुळींच करीत नसत. आतां पाहिलेला मनुष्य क्षणानें नाहींसा होऊं लागला. वारा जोरानें वहात होता व तापलेले धुळीचे कण आकाशांत उडत होते. त्या भयंकर दुष्काळांतच एकदां दावाग्नि पेटला. त्या दावाग्नीनें गवतासारखे पदार्थ सांपडले ते सर्व जाळून फस्त केले. अशारीतीनें दैव फिरल्यामुळें व अत्यंत कष्ट होऊं लागल्यामुळें लोक तो मुलूख सोडून पर ठिकाणीं जाऊं लागले, कांहीं अग्नि प्रवेश करून मेले, काहींनीं विवरांत उड्या घेऊन जीव दिला व राहिलेले मरणोन्मुख झाले. मी आपलें कुटुंब घेऊन तो देश सोडून निघालों. चारी मुलें बरोबर घेऊन हळूं हळूं दूर प्रदेशांत मी गेलों. तेथें एका ताडवृक्षाखालीं आम्हीं येऊन उतरलों. मी आपल्या खांद्यावर आपलीं मुलें घेतलीं होतीं, त्यास मी खालीं उतरवलें. तीं मुलें म्हणजे प्रत्यक्ष अनर्थच मी खांद्यावर घेतलेले होते असें वाटलें. तेथें थोडीशी विश्रांति घेतल्यामुळें आम्हांला थोडें बरें वाटलें व "रौरव" नामक नरकांतूनच जणुं काय आम्ही बाहेर पडलों; असा आम्हांला भास झाला. ती माझी स्त्री त्या झाडाखालीं विश्रांति घेतां घेतां झोपी गेली. तिच्या-बरोबर थोरलीं तीन मुलेंही त्या थंडगार हवेंत झोपीं गेलीं. परन्तु धाकटा मुलगा माझ्याजवळ येऊन बसला. तो सर्वांत लहान असून आमचा फार आवडता होता. तो गोड व बोबडें बोलत असे. तो डोळ्यांत आसवें

आणून दीनवाणीनें म्हणाला, "बाबा ! मला मांस खावयास लवकर द्या, व रक्त प्यावयास द्या. माझे प्राण कासावीस होत आहेत" असें म्हणून तो रडूं लागला. त्यास त्या झालेल्या भुकेच्या तीव्र वेदना व दुःख माझ्याच्यानें पहावेना. नंतर मी आपल्या स्वतःचें मांस देण्याकरितां मरण्याचा निश्चय केला. मग मी काष्ठें जमा केलीं, व चिता रचली. त्या चितेचीं लाकडें पेटविलीं, व त्याचा चट् चट् आवाज निघूं लागला. तो आवाज म्हणजे ती चिता मला बोलावीत आहे, असा मला भास झाला. नंतर मी त्या चितेंत आपला देह समर्पण करण्याकरितां उडी टाकली तोंच तुम्ही मला या सिंहासनावर धरलें व "महाराज ! तुमचा जयजयकार असो" असा जो जयजयकाराचा शब्द नोकरांनीं उच्चारला, त्यानें मी जागा झालों. हा सर्व खेळ ह्या गारुड्यानें उत्पन्न केला होता. अज्ञानानें जीवावर अशींच अनेक संकटें येत असतात."

असें तो तेजस्वी लवणराजा बोलत आहे तोंच तो गारुडी एका क्षणांत जागच्याजागींच गुप्त झाला. नंतर ते सभासद म्हणाले, "महाराज ! हें मोठेंच आश्चर्य होय. तो गृहस्थ गारुडी नसून प्रत्यक्ष देवच असला पाहिजे. कारण त्यास धनाशा मुळींच नव्हती. संसाराच्या स्थितीचा बोध करणारी ही दैवी माया त्यानें दाखविली. या मायेनें त्यानें असें दाखविलें कीं, संसार म्हणजे केवळ मनाचा खेळ आहे.

### लवण राजास आपत्ति कां प्राप्त झाली ?

रामः—एवढा महाभाग्यवान् लवणराजा आणि त्यास अशी आपत्ति कां यावी ?

वसिष्ठः—सर्वेषु सुखदुःखेषु सर्वासु कलनासु च ।
मनः कर्तृ मनो भोक्तृ मानसं विद्धि मानवम् ॥३-११५-२४.

"सर्व सुखदुःखांचे आणि सर्व कल्पनांचें कर्तृत्व आणि भोक्तृत्व मनाकडेच आहे. वास्तव मन म्हणजेच मनुष्य आहे." म्हणूनच मनानें केलेल्या कर्मांचें फळ जीवाला मनानेंच भोगावें लागतें; शरीरानें भोगावें लागत नाहीं. हें कसें तें पुढील लवणराजाच्या वृत्तांतावरून समजून येईल.

हरिश्चंद्राच्या कुलांत उत्पन्न झालेला तो लवणराजा एकदां एकान्तांत बसून आपल्या मनांत अशारीतीनें विचार करूं लागला–" माझ्या आजानें हरिश्चंद्रानें राजसूययज्ञ केला होता. मी त्याच्या कुलांत उत्पन्न झालेला असल्यामुळें केवळ मनानें कां होईना पण मी राजसूय यज्ञ करणार. अशा रीतीनें चिंतन करून त्यानें आपल्या मनानें यज्ञाचें सर्व साहित्य जमविलें व राजसूययज्ञाची दीक्षा घेतली. कर्मकुशल मुनींना ऋत्विज म्हणून बोलावून आणून त्यानें मधुपर्कविधीनें त्यांची यथासांग पूजा केली. अग्नि प्रज्वलित केला व यज्ञांतील आविर्भाग घेणाऱ्या देवांना मनानें निमंत्रण केलें अशा-रीतीनें मनानें कल्पिलेल्या एका उपवनांत यज्ञदीक्षा धारण करणारा तो यजमान लवणराजा यज्ञाचें अनुष्ठान करीत असतां, तसेंच देव, ऋषी, आणि ब्राह्मण ह्यांची यथाविधि पूजा करीत असतां एक वर्ष उलटून गेलें. अखेरीस ब्राह्मणादिकांना सर्वस्व दाक्षिणा दिल्यानंतर राजा मनःकल्पित उपवनांत एक दिवसानंतर देहभानावर आला. त्याप्रमाणें त्या लवणराजानें राजसूय यज्ञाचें फल प्राप्त करून घेतलें. परन्तु " मी राजसूय यज्ञ केला आहे. " ह्या दृढ भावनेमुळें तो राजसूय यज्ञाच्या फलानें बद्ध झाला, आणि ह्यामुळेंच त्याला दुःख भोगण्याची पाळी आली. ह्यावरून सुखदुःखाचा उपयोग घेणारें मन म्हणजेच खरा पुरुष होय; हें वरील गोष्टीवरून सिद्ध होतें.

## राजसूययज्ञाचें अनिष्ट फळ

राजसूयस्य कर्तारो ये हि ते द्वादशाब्दिकम् ॥
आपद्दुःखं प्रान्पुवंति नानाकारव्यथामयम् ॥ ३-११६-५

जे राजे राजसूययज्ञ करतात त्यांना बारा वर्षें भयंकर आपत्ती भोगाव्या लागतात. लवणराजानेंहि हा यज्ञ मनानें केलेला असल्यामुळें त्याला दुःख देण्याकरितां इंद्रानें गारुड्याचा वेष धारण करणाऱ्या एका देवदूताला पाठविलें व लवणराजाच्या सभेंतील गारुडी तो हाच होय. आपल्या मनानेंच राजसूय यज्ञाच्या सर्व क्रिया करणाऱ्या त्या लवणराजाला शारी-रिक क्रियेच्या पांचपट म्हणजे साठवर्षेपर्यंत भयंकर आपत्तींत ढकलून तो देवदूत देव आणि सिद्ध ह्यांच्या संचाराला योग्य अशा आकाशमार्गानें

चालता झाला. वसिष्ठ सांगतात कीं, ही गोष्ट मी प्रत्यक्ष पाहिल्यामुळें तिच्याविषयीं मला मुळींच संशय वाटत नाहीं. कारण त्यावेळीं मी त्या लवणराजाच्या सभेंत हजर होतों. ह्यावरून मनानें केलेल्या कर्मांचें फळ शारिरीक कर्मांच्यापेक्षां पांचपट मिळत असतें.

## लवणराजानें मनांत पाहिलेली गोष्ट खरी झाली !

त्या लवणराजानें साठ वर्षेपर्यंत ज्यांत अनेक दुःखांचा अनुभव घेतला होता तें विंध्यपर्वतावरील अरण्य आजहि आपण तेथें गेलों असतां, कदाचित् आपल्याला दिसूं शकेल, असा आपल्या मनाशीं विचार करून तो लवणराजा आपल्या सचिवासह दक्षिणमार्गानें जाण्यास निघाला. त्यानें आपल्याबरोबर सर्व सैन्य घेतलें असल्यामुळें तो पुनः दिग्विजयाकरितांच निघाला आहे कीं काय, असें लोकांना वाटूं लागलें. अशा रीतीनें सैन्यासहवर्तमान तो राजा प्रवास करीत असतांना विंध्य पर्वतावर जाऊन पोहोंचला. ज्याप्रमाणें सूर्य आकाशमार्गानें संचार करतो त्याप्रमाणें त्या विंध्यपर्वतावर तो मोठ्या कौतुकानें हिंडत असतां त्याला एक भयंकर अरण्य लागलें. त्या अरण्यांत प्रवेश करून त्या ठिकाणचीं निरनिराळीं स्थळें त्यानें अवलोकन केलीं. तेथील लोकांना त्या संबंधीची माहिती विचारली आणि पूर्वी पाहिलेल्या त्या स्थानाची ओळख पटून त्याला मोठें आश्चर्य वाटलें; अरण्यांतील प्रदेश पहात असतां पूर्वी पाहिलेले चांडाल, व्याध त्यानें ओळखले व त्यामुळें त्याला मोठा विस्मय वाटला. पुढें त्या अरण्यांत कौतुकानें संचार करीत असतां त्या अरण्याच्या टोंकाला धुरानें काळवंडलेलें एक गांव त्याच्या दृष्टीस पडलें. त्या गांवामध्येंच त्यानें आपलें पूर्वीचें आयुष्य कंठलें असून त्या ठिकाणींच तो धष्टपुष्ट चांडाळ बनला होता; त्या गांवांतून फिरत असतां त्याचें पूर्वीचें परिचयाचें लोक, त्या स्त्रिया, त्या झोपड्या, तीं स्थळें, ते पूर्वीचें वृक्ष, ते आपले अनुयायी व ज्यांचें सर्व बंधू मरून गेलेले आहेत, असें ते व्याध त्याच्या दृष्टीस पडले. त्याठिकाणीं त्याची वृद्ध सासू आपल्या बरोबरीच्या वृद्ध स्त्रियांना एकत्र जमवून आपल्या अनंत दुःखाची कहाणी सांगत आणि डोळ्यांतून अश्रू गाळीत बसलेली त्यानें पाहिली. त्या समदुःखी वृद्ध स्त्रिया आपआपल्या

दुःखांची एकमेकींना वर्णनें करून सांगत होत्या. त्यांची सासू अगदीं कृश झालेली असून तिचे नेत्र पाण्यानें भरून आलेले होते. अवर्षणामुळें त्या देशाची झालेली दुर्दशा ती दीर्घ स्वरानें सांगत होती. असें त्याच्या दृष्टीस पडलें. दुःखाचा उमाळा येऊन पुढील आशयाचे उद्गार तिच्या मुखांतून निघत होते—

वृद्धचांडालीः—"हाय हाय ! माझ्या लाडके पोरी ! तुझ्या भोंवतीं नेहमीं मुलांचा गराडा पडलेला असे. परंतु एकसारखें तीन दिवसपर्यंत भोजन न मिळाल्यामुळें तुझें शरीर किती कृश होऊन गेलें. ज्याप्रमाणें तरवारीनें म्यानांत प्रवेश करावा, त्याप्रमाणें हे राजपुत्रा ! दुष्काळानें पिडलेले आपले प्राण सोडून देऊन तूं कोठें आणि कसा निघून गेलास ! बाळे ! तुझ्या पतीच्या गळ्यांतील गुंजांची माळ माझ्या डोळ्यापुढें मूर्तिमंत दिसत आहे. तुझा पति कुटुंबपोषणाकरितां केवढीं साहस कर्में करीत असे. माझा जांवई मदनापेक्षांहि सुंदर दिसत असे. जिचा वर्ण यमुनेच्या पाण्याप्रमाणें काळामोर आहे, अशी माझी मुलगी माझ्या जांवयासह, सोसाट्याच्या वाऱ्यानें पुष्पगुच्छासह तमालवृक्ष आणि त्यावरील वेल अन्य वनांत उडवून लावावी, त्याप्रमाणें यमानें माझ्या जवळून हिसकावून नेली. बाळे ! तुझ्या गळ्यांत गुंजांचा हार रुळत असे; तुझे स्तन अतिशय पुष्ट असत, व तुझा वर्ण वायूनें उडविलेल्या काजळाच्या ढिगाप्रमाणें रमणीय दिसत असे. झाडांचीं पानें हीं तुझीं वस्त्रें असत आणि तुझे सुंदर दांत बोराप्रमाणें किंवा जांभळाप्रमाणें सुशोभित दिसत. पण तें तुझें सुंदर मुख आतां मला दिसेल. कां ? हे राजपुत्रा ! तुझी मुखकांति चंद्रालाहि लाजवील असे, आपल्या अन्तःपुरांतील सुंदर विलासिनींचा त्याग करून माझ्या कन्येवर तुझें प्रेम जडलें होतें परंतु तें प्रेम स्थिर होण्यापूर्वींच तूं एकाएकीच निघून गेलास. दैवाचा विलास किती विचित्र आहे पहा ! माझ्यावर एकाच वेळीं दुःखाचे डोंगर कसे कोसळले. माझा पती गेला, माझी लाडकी मुलगीहि एकाएकी मृत्युमुखीं पडली व मी स्वतः या कुग्रामांत दारिद्र्यानें दुःख भोगीत आहे. माझा जन्म हीन जातींत झाला आहे आणि माझी स्थिति सर्वतोपरी भयंकर झाली आहे !"

अशा रीतीनें त्या वृद्ध चांडाळीचा चाललेला शोक पाहून लवण राजानें आपल्या दासी तिच्याकडे पाठवून तिचें सांत्वन केलें. नंतर तो तिला म्हणाला.

लवणराजाः—बाई ! तुला काय झालें आहे ? तुझी मुलगी कोण ! तसेंच तुझा जावई कोण ? हें सर्व मला सांग.

राजाचे हे शब्द ऐकतांच डोळ्यांतून अश्रू ढाळीत ती म्हणाली.

वृद्ध चांडालीः—ह्या गांवाला 'पुष्कसघोष' असें म्हणतात. माझा पति या ठिकाणीं राहात होता आणि माझ्यापासून चंद्रासारखी एक सुंदर मुलगी झाली व तिच्या सुदैवानें या ठिकाणीं एका राजानें येऊन तिला वरिलें. अर्थात् ज्याप्रमाणें एखाद्या गर्धभाला अरण्यांत फुटलेल्या अमृताचा कुंभ सांपडावा, त्याप्रमाणें माझ्या मुलीला असला सुंदर पति लाभला होता. त्या दोघांनीं बहुत दिवसपर्यंत सुखानें कालक्रमणा केली आणि एखाद्या वृक्षाच्या आश्रयानें भोपळीचा वेल फोफावत जातो त्याप्रमाणें माझ्या मुलीला ह्या अरण्यांत पुष्कळ मुलेंबाळें झालीं. अशा रीतीनें कांहीं काळ लोटल्यानंतर हे राजा ! या गांवांत दुष्काळानें कहर केला. शेकडों माणसांनीं अन्नान्न करून प्राण सोडले. अवर्षण आणि दुष्काळ यांच्या योगानें सर्व लोकांची स्थिति भयंकर झाली आणि शेकडों लोक गांव सोडून रानोमाळ भटकूं लागले. परंतु भयंकर आपत्तिमुळें अखेर ते मृत्युमुखीं पडले. आम्हां सर्व वृद्ध स्त्रियांची स्थिति या दुर्भिक्षामुळें भयंकर झाली असून आम्हांला दुःखामुळें सर्व दिशा शून्य दिसत आहेत. म्हणून आम्हीं येथें शोक करीत आहोंत.

त्या चांडाळ स्त्रीचें तें करुणरसमय भाषण ऐकून लवणराजाला मोठा विस्मय वाटला. तो आपल्या मंत्र्यांच्या मुखाकडे विस्मयपूर्वक पाहूं लागला. त्याची स्थिति एखाद्या चित्राप्रमाणें निश्चल झाली. त्या आश्चर्यकारक वृत्तांतासंबंधाने तो विचार करूं लागला. त्यानें पुनः पुनः त्या चांडाळ स्त्रीला अनेक प्रश्न केले व तो सर्व वृत्तांत खरा आहे असें पाहून तो अत्यंत आश्चर्यचकित झाला. चांडाल स्त्रियांना द्रव्यदान करून त्यांच्या दुःखाचें परिमार्जन करण्याचा त्यानें प्रयत्न केला व त्या ठिकाणीं बराच

काल राहून दैवाच्या विलक्षण कृत्याबद्दल मनांत चिंतन करीत आपल्या राजधानींत येऊन पोंचला. राज्यांत प्रवेश करते वेळीं त्याच्या पौर-जनांनीं त्याचा सत्कार केला. दुसरे दिवशीं सभागृहांत आल्यानंतर त्या राजानें मला विचारलें.

लवणराजाः—महाराज! माझ्या स्वप्नामध्यें जो वृत्तान्त दिसला तोच पुन्हा जागृतीमध्यें कसा अनुभवास आला?

वसिष्ठः—अविद्येमध्यें सर्व कांहीं संभवतें. पूर्वी घडलेला वृत्तान्त स्वप्नांत पुन्हां दिसावा, त्याप्रमाणें विंध्यपर्वतावरील चांडाळाच्या गांवांत घडलेला सर्व व्यवहार तुझ्या चित्तांत अनुभूत झाला किंवा असेंहि असण्याचा संभव आहे कीं, तूं जो भ्रम पाहिलास तोच चांडालग्रामांतील स्त्रीपुरुषांच्या चित्तावर आरूढ झाला. राजा! अविद्या केवढाले भ्रम उत्पन्न करते पहा! ही अविद्या सद्वस्तूला असद्रूप बनविते आणि असद्वस्तूला सद्रूप बनविते.

तात्पर्यः—

या लवणराजाच्या गोष्टीवरून हा संसार म्हणजे केवळ मनोविलास आहे हा सिद्धान्त स्पष्ट होत आहे.



# स्थिति प्रकरण

---

## ( १० ) शुक्राचार्यांची गोष्ट.

भार्गवस्य चिरं कालं स्वर्गभोगबुभुक्षया ।
यथा भोगाधिनात्थवं संसारित्वं बभूव च ॥ ४-५-५

**भावार्थ**—पुष्कळ काळ स्वर्ग भोगाच्या चिंतनामुळें शुक्राला अप्सरेबरोबर भोग भोगण्याची इच्छा उत्पन्न झाली व तो मनानेंच स्वर्गामध्यें गेला व नंतर अनेक प्रकारच्या संसारदशेला प्राप्त झाला.

पूर्वी एकदां भगवान् भृगुऋषि मंदर पर्वताच्या शिखरावर एका रम्य ठिकाणीं उग्र तपश्चर्या करीत असतां त्यांचा महाबुद्धिमान्, तेजस्वी आणि वयानें लहान असा मुलगा शुक्र त्यांची सेवा करीत होता. त्या घोर अरण्यामध्यें भृगु सर्व काल समाधि लावून निश्चल बसलेले असत. परंतु, शुक्र मात्र त्या मंदपर्वतावरील पुष्प शय्येवर नानाविध क्रीडा करीत आपला कालक्षेप करीत असे. विद्या व अविद्या अशा दोन अवस्थांच्या मध्यभागीं असणारा, म्हणजे धड ज्ञानीहि नाहीं व अज्ञानीहि नाहीं अशा स्थितींत असलेला तो शुक्र एकदां मोठ्या विपत्तींत पडला आणि धड इहलोक नाहीं, धड परलोकहि नाहीं अशी त्रिशंकु राजर्षिसारखी त्याची स्थिति झाली. एकदां त्याचा पिता निर्विकल्प समाधीमध्यें मग्न झाला असतां आकाशमार्गानें चाललेल्या एका अप्सरेकडे शुक्राची सहज नजर गेली. तिनें आपल्या गळ्यांत मंदार पुष्पांच्या माळा धारण केल्या असून तिचे केस मंदवायुमुळें एकसारखे हालत होते. तिच्या गळ्यांतील हार वायूच्या योगानें हलत असल्यामुळें त्यांतून निघणारा सुगंध आकाशांतील सर्व वातप्रदेश सुगंधित करीत होता. लवणरूपी वृक्षाची ती जणूं शाखाच होती. तारुण्यमदाच्या

योगानें तिचे आरक्त नेत्र चंचल दिसत होते. तिच्या मुखचंद्राच्या प्रकाशानें तो सर्व प्रदेश अमृतमय करून सोडला होता. अशा त्या दिव्य अप्सरेला पहातांच शुक्राचें मन एकदम चंचल झालें. मदनाच्या बाणांनीं पराभव पावलेला तो शुक्र जरी देहानें तिच्या मागून गेला नाहीं तरी त्याचें मन तिच्या ठिकाणीं इतकें वेधून गेलें होतें कीं, तिच्यावांचून त्याला दुसरें कांहीं दिसेनासें झालें. सारांश ज्याचें मनानें दृढ चिंतन करावें, त्याचें स्वरूप मनुष्याला प्राप्त होतें; या नियमाप्रमाणें तो शुक्र निव्वळ अप्सरामय बनला. तदनंतर शुक्रानें डोळे मिटून त्या अप्सरेचें ध्यान करण्यास सुरवात केली. त्या मनोराज्यांत असतांना त्यानें असें पाहिलें कीं:—

## शुक्राचें मनोराज्य.

ती अप्सरा स्वर्गलोकांत जाऊन पोहोंचली आहे आणि आपणहि तिच्या मागोमाग स्वर्गलोकांत जाऊन पोहोंचलों आहोंत. तो स्वर्गलोक देवांनीं गजबजलेला असल्यामुळें अत्यंत सुंदर दिसत होता. तेथील स्त्रियाहि मदनानें व्याप्त झालेल्या दिसत होत्या. तेथें त्यानें सिंहासनाधिष्ठित इंद्र पाहिला. त्यास शुक्रानें वंदन केलें. इंद्रानें शुक्रास नमस्कार केला व स्वर्गलोकीं हा दुसरा भृगुऋषीच आहे असें समजून त्याचा सन्मान केला व उठून त्याचें आदरातिथ्य केलें. नंतर शुक्र स्वर्ग पाहण्यास व क्रीडा करण्यास बाहेर पडला. स्वर्गांतील देवांनीं त्याचा ठिकठिकाणीं सन्मान केला. त्यामुळें शुक्रास फार आनंद झाला. पुढें फिरतां फिरतां त्यानें पूर्वी पाहिलेली ती हरिणाक्षी अप्सरा पुष्कळ स्त्रियांमध्यें बसलेली त्याच्या दृष्टीस पडली. त्या अप्सरेनेंहि त्यांस पाहिलें व तीहि त्याच्यावर लुब्ध झाली. नंतर त्या दोघांच्या ठिकाणीं परस्पराबद्दल प्रेम उत्पन्न झाल्यामुळें तीं दोघेंहि अत्यंत सुशोभित दिसूं लागलीं. तेव्हां शुक्रास असें वाटलें कीं, आतां अंधार होईल, तर बरें. असें शुक्रानें मनांत आणतांच रुद्रानें संकल्प केलेल्या संहार कालाप्रमाणें दाट अंधकार पडला. तेव्हां सर्व देव व अप्सरा रात्र सुरू झाली असें समजून आपआपल्या निवासस्थानीं निघून गेल्या. नंतर कामव्यथेनें पीडित झालेली ती अप्सरा मोठ्या उत्कंठेनें शुक्राजवळ येऊन पोहोंचली. शुक्रानें संकल्प करून रतिसुखाला योग्य असे स्फटिक मण्याचें

सुंदर गृह आणि सुंदर पलंग तयार केला. नंतर तिचा हात धरून तो तिच्यासह त्या मंचकावर जाऊन बसला. त्या सुंदरीनें शुक्राला आलिंगन दिलें. तेव्हां गजेंद्राच्या कंठांत कमलिनी दिसावी त्याप्रमाणें ती दिसूं लागली. त्या दोघांनीं एकमेकास आपल्या विविध विलासांनीं व भाषणांनीं संतुष्ट केलें.

या प्रमाणें चित्ताच्या विलासानें कल्पिलेला प्रिय विषयांचा समागम शुक्राला पुष्कळ काळ-पर्यंत सुखदायक वाटला. त्या अप्सरेच्या समागमांत शुक्राला फारच संतोष वाटला. अशा तऱ्हेनें त्या अप्सरेबरोबर शुक्रानें त्या स्वर्गात निरनिराळ्या रम्य स्थळीं नानातऱ्हेचे दिव्य भोग भोगले. याप्रमाणें त्या अप्सरेसह इंद्राच्या राजधानींत येऊन त्यानें दीर्घ कालपर्यंत त्या ठिकाणीं सुखानें कालक्रमणा केली.

इतक्या दीर्घ कालानंतर शुक्राला आपलें पुण्य क्षीण झालें, असें वाटूं लागलें. इतक्यांत देवांनीं त्याचें दिव्य विमान व अलंकारादि वस्तू बलात्कारानें हरण केल्या. अखेरीस तो त्या दिव्य अप्सरेसह एकाएकीं पृथ्वीवर येऊन पडला. त्यामुळें त्याच्याः शरीराचें चूर्ण झालें, त्याच्या प्रियतमेची स्थितीहि तशीच झाली. अशारीतीनें स्थूलदेह नष्ट झालेल्या त्या उभयतांचीं लिंगशरीरें आकाशांत जाऊन चंद्रकिरणांत शिरलीं; चंद्रकिरणांतून देवांत गेलीं; तेथून भाताच्या रोपांत शिरलीं आणि नंतर त्यांनीं तांदुळांत प्रवेश केला. ते तांदूळ शिजवून दशार्ण देशांतील एका ब्राह्मणानें खाल्ले. त्याबरोबर शुक्र त्याच्या पोटांत जाऊन त्याचें वीर्य बनला. पुढें त्या वीर्यापासून त्याच्या स्त्रीस गर्भधारणा होऊन एक मुलगा झाला. पुढें तो मोठा झाल्यावर मुनींच्या सहवासांत राहिल्यानें " आपण तप करावें " अशी त्याला इच्छा झाली. त्यानें मेरुपर्वतावरील गहन अरण्यांत एक मन्वंतर पर्यंत तपश्चर्या केली. तेथें ती अप्सरा हरिणीच्या जन्मास आलेली होती. पुढें ती हरिणी प्रसूत होऊन तिला मनुष्याच्या आकाराचा मुलगा झाला; त्या हरिण बालकाला पहातांच त्या ऋषीला त्याच्याविषयीं मोह उत्पन्न झाला. त्या मुलाला धन, विद्या, सद्गुण, आयुष्य वगैरे असावें, या चिंतनांत तो निमग्न झाल्यानें तो आपल्या

नेहर्मीच्या ध्यानस्थितीपासून च्युत झाला. आपल्या पुत्राला उत्तमोत्तम भोग्य वस्तु प्राप्त व्हाव्या असें निरंतर चिंतन करीत असतां त्याला अखेरीस मृत्यु आला व तो मद्रदेशाच्या राजाचा पुत्र झाला आणि बापाच्या पश्चात् शत्रूंचें निर्दलन करून त्यानें पुष्कळ काळपर्यंत मद्रदेशाच्या राज्याचा उपभोग घेतला. पुढें वृद्ध झाला असतां वानप्रस्थाश्रम स्वीकारावा अशी त्याला इच्छा झाली; परंतु ती पूर्ण होण्यापूर्वीच त्याला मृत्यूनें गांठलें, ह्यामुळें पुढच्या जन्मीं तो एका तपस्व्याचा पुत्र झाला. पुढें वयांत येतांच त्यानें समंगा नांवाच्या नदीच्या कांठीं घोर तपश्चर्या करण्यास सुरवात केली.

अशा रीतीनें आपल्या पित्याच्या ( भृगूच्या ) संनिध बसून मनोराज्य करीत असतां त्या शुक्राचीं अनेक वर्षे निघून गेलीं. पुष्कळ काळपर्यंत त्याचा देह तशास्थितींत राहिल्यामुळें वारा आणि ऊन यांनीं जर्जर झाला व भूमीवर वाळून पडला. आतां पशुपक्ष्यांनीं त्याचें शरीर फाडून कसें खाल्लें नाहीं, याचें कारण तो पुण्याश्रम रागद्वेषरहित होता. आणि भृगूच्या तपःसामर्थ्यामुळें शुक्राच्या शरीराला स्पर्श करण्याचें धैर्य व्याघ्रादिकांच्या ठिकाणीं नव्हतें हेंच होय. नंतर देवांचीं हजार वर्षे लोटल्यावर भृगुऋषि समाधींतून जागे झाले. पहातात तो आपल्या समोर विनयानें नम्र झालेला आपला पुत्र नेहमीं प्रमाणें त्यांस दिसेना. इकडे तिकडे पाहतां आपल्या मुलाच्या देहाच्या हाडांचा सापळा समोर पडला आहे असें त्यांनीं पाहिलें. हा हाडांचा सापळा म्हणजे साक्षात् अभाग्य किंवा मूर्तिमंत दारिद्र्यच आहे असें भृगुऋषींना वाटलें, नंतर मागचा पुढचा विचार न करतां भृगुऋषि एकदम उठले. अकाली आपला मुलगा मृत झालेला आहे, असें त्यास वाटलें. अवश्य घडणाऱ्या गोष्टी कधींहि टळत नसतात; ह्या नियमाचें स्मरण न राहिल्यानें प्रत्यक्ष कालालाच शाप देण्यास ते प्रवृत्त झाले.

### काल प्रगट झाला.

हें कालानें ओळखलें व आधिभौतिक शरीर धारण करून तो भृगु ऋषी समोर येऊन उभा राहिला. त्याला सहा* मुखें व बारा हात होते.

* सहा ऋतु हीं मुखें व बारा महिने हे हात अशी कल्पना केली आहे.

यानें आपल्या हातांत खड्गपाशादि आयुधें धारण केलीं होतीं, त्याच्या अंगांत चिलखत होतें; कानांत कुंडलें होतीं. तसेंच त्याच्यावरोबर पुष्कळ सेवक होते. अशा रीतीनें तो शरीरधारी काल कल्पांतकालाच्या सागराप्रमाणें खवळलेल्या महर्षीजवळ येऊन सांत्वनपूर्वक भाषण करूं लागला.

कालः——ऋषिवर्या ! लोकस्थिति माहीत असलेले आपल्यासारखे थोर पुरुष दुसऱ्याचा अपराध दृष्टीस पडला तरीहि क्षुब्ध होत नाहींत; मग ते अकारण क्षुब्ध होतील ही गोष्ट संभवनीयच नाहीं. तूं महातपस्वी ब्राह्मण आहेस आणि आम्ही नियतीचें पालन करणारे आहोंत. तूं आम्हांला पूज्य असल्यामुळें आम्हीं तुझी पूजा करतों. परंतु तुझ्या शापाच्या किंवा क्रोधाच्या भीतीमुळें आम्हीं तुझी पूजा करतों, असें मात्र तूं समजूं नकोस. जो प्रलयकालच्या अग्नीनें दग्ध होऊन जात नाहीं, तो तुझ्या शापाग्नीनें दग्ध होणार काय ? मला शाप देण्याच्या भरीस पडून तूं मात्र आपल्या तपाचा विनाकारण नाश करून घेऊं नकोस. आजपर्यंत हजारों ब्रह्मांडें अन् कोट्यवधि रुद्र ह्यांना मी गट्ट करून टाकलें आहे. विष्णूचे किती तरी समुदाय माझे पोटांत गडप होऊन गेले आहेत. एवढ्या अद्भुत सामर्थ्यानें संपन्न असलेला मी कोणती गोष्ट करण्यास असमर्थ आहे ! बा भृगो ! आम्हीं भोक्ते आहोंत; आणि तुमच्यासारखे सर्व जीव आमचे भक्ष्य आहेत. ह्यांत आमच्या आवडीनावडीचा प्रश्नच नाहीं. हा आमचा स्वभावधर्म आहे. हाच सृष्टीनें ठरविलेला नियम आहे. वृक्षावर निसर्गाच्या नियमाप्रमाणें फुलें येतात आणि गळून पडतात, तसेंच प्राणी या पृथ्वीवर आपल्या कर्माप्रमाणें जन्माला येतात व मरून जातात. आपली ती ज्ञानमय दृष्टि, तो मोठेपणा व तें धैर्य कोणीकडे गेलें ? हा ज्ञानमार्ग सर्वप्रसिद्ध असून असें आंधळ्यासारखें कां मोह पावतां ? आपल्या कर्मविपाकामुळें उद्‌भवलेल्या या दशा आहेत, हा विचार न करतां तूं सर्वज्ञ असूनहि मूर्खासारखा मला शाप देण्यास प्रवृत्त कसा झालास ? बा भृगो ! प्राणिमात्राला दोन शरीरें आहेत. एक स्थूल शरीर व दुसरें सूक्ष्म; यांपैकीं स्थूल अत्यंत जड असून नाश पावणारें आहे व सूक्ष्म म्हणजेच मन हें प्रातिभासिक असूनहि मोक्षापर्यंत टिकणारें आहे. तेंच तुला क्रोधादिकांनीं पीडा करीत आहे. लहान मुलमा मातीची बाहुली

तयार करतो, त्याप्रमाणें हें मन अनेक मिथ्या देहांची कल्पना करून पूर्वीचे देह नष्ट करून टाकतें. वास्तव

चित्तमेवेहपुरुषस्तत्कृतं कृतमुच्यते ॥ ४-१०-४६.

" चित्त हाच पुरुष होय आणि चित्तानें जें केलें, तेंच खरोखर केलें असें म्हटलें जातें. " हें मनच निरनिराळे जीव बनतें. त्याचा जो निश्चय त्यासच बुध्दि म्हणतात. त्यानें अभिमान धरला म्हणजे त्यास अहंकार म्हणतात. देहाच्या वासनेच्या योगानें तें आपलीं आणि दुसऱ्याचीं अनेक मिथ्या पार्थिव शरीरें पहातें. मनाचा हा खेळ आत्मज्ञान होईपर्यंत सारखा चालू असतो.

भृगो ! तूं समाधींत असतांना तुझ्या पुत्राचें मन मनोराज्यांत आपलें शरीर सोडून स्वर्गास गेलें. तेथें त्यानें विश्वाची नांवाच्या अप्सरेबरोबर पुष्कळ कालपर्यंत आनंदानें कालक्रमणा केली. नंतर पुढें तो दशार्ण देशांत ब्राह्मण झाला. पुढें तो कोशल देशांत राजा झाला. पुढें तो एका मोठ्या अरण्यांत कोळ्याच्या जन्मास गेला. नंतर गंगेच्या काठीं तो हंस झाला. सूर्यवंशांत चोंडराजा झाला. शालव वंशांत शौर नांवाचा आचार्य झाला. पुढें विद्याधर झाला. पुढें एका मुनीचा मुलगा व पुढें एका सौवार देशांत सामंत राजा झाला. पुढें हरीण, साप, रानकोंबडा असे त्याचे वासनेप्रमाणें अनेक जन्म झाले. आतां तो वासुदेव नांवाचा ब्राह्मण होऊन समंगा नदीचे कांठीं तप करीत आहे. त्यानें जटा धारण केल्या आहेत. त्याच्या हातांत रुद्राक्षाची माळ आहे. त्यानें सर्व इंद्रियांना जिंकलेलें आहे. आणि आज आठवें वर्षे तो तेथें तप करीत आहे. भृगो ! तुझ्या पुत्राचा तो स्वप्नतुल्य भ्रम पहाण्याची इच्छा असेल तर विज्ञानदृष्टीनें अवलोकन कर.

त्या समदृष्टि कालानें अशा तऱ्हेचें भाषण केल्यानंतर भृगूनें बसलेल्या ठिकाणीच योगदृष्टीनें दोन घटकांत आपल्या पुत्राच्या चरित्राचें अवलोकन केलें आणि मग मोठ्या आश्चर्यकारक मुद्रेनें कालाकडे पाहून भृगूनें बोलण्यास सुरवात केली.

भृगुः—भगवन् ! आपण त्रिकालज्ञ आहांत व आम्ही खरोखरच अज्ञ आहोंत !

हें भृगूचें भाषण ऐकून काल किंचित् हसला व " जगाची रहाटी अशीच असावयाची " असें म्हणाला. नंतर एकमेकांच्या हातांत हात घालून ते दोघेजण मंदरपर्वताच्या शिखरावरून खालीं उतरले व समंगानदीच्या तीरावर जाण्यास निघाले. थोडक्याच वेळांत मंदरपर्वताचें विलक्षण वैभव पहात पहात समंगा नदीच्या तीरावर ज्या ठिकाणीं शुक्र होता, त्याठिकाणीं ते दोघेजण आले. त्या ठिकाणीं शुक्र भृगूच्या दृष्टीस पडला. परंतु त्याचें देहांतर झालेलें असल्यानें हाच तो आपला शुक्र असें भृगूला ओळखतां येईना. त्याचीं इंद्रियें शांत झालीं होतीं. त्यानें आपल्या चंचल मनोमृगाला बांधून टाकलें होतें आणि तो निर्विकल्प समाधि लावून बसला होता. नंतर भृगूच्या मुलाला पाहून कालानें आपल्या संकल्पानें त्यास समाधींतून जागें केलें. समाधि उतरल्याबरोबर आपल्यासमोर भृगु व काल हे दोघे उभे आहेत असें त्यानें पाहिलें व आपल्या आसनावरून उठून त्यानें त्या दोघांना नमस्कार केला. नंतर एकमेकांनीं परस्परांचा गौरव करून ते तिघेजण एका मोठ्या शिळेवर बसले. नंतर तो ब्राह्मणाचा मुलगा त्यांना म्हणाला—

ब्राह्मणपुत्रः—आपल्या दर्शनानें मी खरोखर आज धन्य झालों आहे. जो माझा मनोमोह, शास्त्रावलोकन, तप, उपासना आणि ब्रह्मविद्या यांच्या योगानेंहि नाहींसा झाला नव्हता, तो आपल्या केवळ दर्शनानें नष्ट झाला आहे! महात्म्यांच्या दृष्टी जें अनिर्वचनीय सुख देतात, तसलें सुख निर्मळ अमृतवृष्टीहि देऊं शकत नाहींत. तरी या देशाला आपल्या चरण स्पर्शानें पुनीत करणारे आणि आकाशांतील चंद्रसूर्याप्रमाणें तेजस्वी दिसणारे असे आपण आहांत तरी कोण? हें मला कृपा करून सांगा.

हें त्या मुलाचें भाषण ऐकून भृगु म्हणाले ',अगोदर तूं कोण आहेस ' याचा नीट विचार कर. तुला आपलें स्वरूप ओळखतां येईल. तूं अज्ञान निद्रेंतून जागा झाला आहेस. तूं आतां ज्ञानी आहेस. भृगूनें अशा रीतीनें प्रेरणा करतांच त्या ब्राह्मण पुत्रानें दोन घटका डोळे मिटून ध्यान केलें. त्या ध्यानस्थस्थितींत त्यानें आपल्या जन्मांतरींचा वृत्तान्त पाहिला आणि आश्चर्यचकित होऊन तो म्हणाला—

ब्राह्मणपुत्रः—परमेश्वराच्या अचिंत्य नियतीचा–मायाशक्तीचा जयजयकार असो! या मायाशक्तीच्या प्रभावामुळेंच हें विश्वाचें चक्र अव्याहत फिरत राहिलें आहे. या वेळेपर्यंत मला नकळत माझे कितीतरी जन्म होऊन गेले आहेत. जें जाणावयाचें तें मी जाणलें आहे. माझा सर्व भ्रम निरास पावला आहे. फार दिवसांच्या श्रमाचा परिहार करण्यासाठीं मी आतां खुशाल विश्रांति घेत राहिलों आहे. बाबा! उठा, चला, आपण त्या मंदर पर्वतावर जाऊन शुष्क झालेली ती माझी पूर्वीची (शुक्राची) तनु पाहूं या. आतां वास्तविक पाहूं गेलें तर माझें तें पूर्वीचें शरीर पाहून मला कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें आहे असें मुळींच नाहीं तर केवळ नियतीची अगाध लीला कौतुकानें पाहण्यासाठींच मी त्या ठिकाणीं येणार आहे.

अशा रीतीनें ते तिघे तत्त्वज्ञानी पुरुष "जगाची गति किती विचित्र आहे" असें म्हणत त्या समंगानदीच्या तीरावरून एका क्षणांत मंदर पर्वताच्या गुहेजवळ आले. तेथें पडलेल्या आपल्या जीर्ण झालेल्या तनूकडे पहात तो आपल्या बापाला म्हणाला, "बाबा! तुम्ही मोठ्या प्रेमानें वाढविलेली माझी ही तनु अगदीं शुष्क होऊन गेली आहे! खरोखर मी मोठा भाग्यवान् आहे. कारण सर्व सुखदुःखांपासून मुक्त झालेली, आशाज्वर नष्ट झालेली अशी माझी ही तनु मला या अरण्यांत पहावयास सांपडली!" असा तो वासुदेव (शुक्र) बोलत असतां भगवान् काल गंभीरवाणीनें त्याला मध्येंच म्हणाला,

कालः—हे भार्गवा! तूं ह्या तनुमध्यें प्रवेश कर. या देहानें अद्याप तुला दैत्यांचें गुरुत्व करावयाचें आहे. या तनूमध्यें जीवन्मुक्त पदाला प्राप्त होऊन महाकल्पांतापर्यंत या जन्मांत राहून शेवटीं ही भार्गवी तनु पुन्हां ग्रहण न करण्याचें इच्छेनें तूं निर्माल्यवत् कायमची सोड. तुम्हां दोघांचें कल्याण असो! मी आपल्या स्थानीं जातो.

असें म्हणून काल अंतर्धान पावले. भगवान् कालाच्या वियोगानें त्या पितापुत्रांच्या डोळ्यांस पाणी आलें. नंतर नियतीच्या इच्छेप्रमाणें शुक्रानें आपल्या पूर्वीच्या शरीरांत प्रवेश केला. त्याबरोबर त्याची 'वासुदेव' नावाची ब्राह्मण तनु निस्तेज झाली व धाडकन् जमिनीवर पडली. आपल्या

पुत्राच्या शरीरांत चेतना आलेली दिसतांच भृगूनें आप्यायन मंत्रानें कमंड-लूंतील उदक घेऊन त्याच्या शरीरावर प्रोक्षण केलें, त्याबरोबर त्याच्या देहांतील सर्व नाड्या रक्तानें भरून गेल्या. नंतर त्याच्या देहांत श्वासोच्छ-वास क्रिया सुरू झाली व तो ताडकन् उठून बसला. नंतर त्या शुक्रानें आपल्या समोर उभे असलेल्या पुण्यवान् भृगुऋषीस साष्टांग नमस्कार घातला. भृगूनेंहि आपल्या पुत्रास मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें व आनंदा-श्रूंनीं त्याला न्हाऊ घातलें. तो शुक्राकडे टक लावून पाहूं लागला. वास्त-विक ' हा माझा मुलगा ' अशी आशा बाळगणें हें सर्वथा अनुचित आहे. असें जरी तो सर्वथा जाणीत होता तरी ' हा माझा मुलगा ' या ममतेनें त्याला अगदीं वेडावून सोडलें; परंतु यांत कांहींच आश्चर्य नाहीं, कारण प्रारब्ध प्राबल्यामुळें क्षणमात्र देहाच्या ठिकाणीं आत्मीय भावना उत्पन्न होणें हें अगदीं अपरिहार्य आहे. परस्परांच्या भेटीमुळें त्या उभयतांना प्रेमाचे पाझर फुटले. फार दिवसांच्या वियोगामुळें त्या समागमाचें आनंद-सुख अनुभवीत ते दोन घटका स्वस्थ बसले. नंतर तेथून उठून त्या महा-ज्ञानी पितापुत्रांनीं समंगा नदीवर तपश्चर्या करणाऱ्या व आतां मरून पड-लेल्या विप्राला अग्निसंस्कार केला. कारण सदाचाराचें उल्लङ्घन कोणता ज्ञाता पुरुष करील ! ज्यांना सर्व विज्ञेय ज्ञात झालें आहे असे ते जीवनमुक्त जगद्गुरू शुभाशुभादि दशांमध्यें हर्षविषाद न मानतां आत्मस्वरूपामध्यें सुस्थिर होऊन राहिले. शुक्राला पुढें कालांतरानें दैत्यांचें गुरुत्व मिळालें आणि भृगुहि आपल्या ज्ञानस्थितीला योग्य अशा निर्विकार ब्रह्मस्थितीमध्यें स्थिर झाले.

तात्पर्यः—हें सर्व जग मनोमात्र आहे. वरील भृगुपुत्राच्या गोष्टीवरून ह्याच सिद्धांत दृढ होतो. पुष्कळ कालपर्यंत स्वर्गभोगाच्या चिंतनामुळें त्याला अप्सरेबरोबर उपभोग घेण्याची इच्छा उत्पन्न झाली व तो स्वर्गा-मध्यें गेला. यावरून मनामध्यें ज्या ज्या विषयोपभोगाचें एकसारखें चिंतन करावें ते ते विषय मनामध्यें प्रत्यक्ष अनुभवास येतात. हेंच तत्त्व इंदु ब्राह्मणाच्या मुलाच्या गोष्टींत व लवण राजाच्या गोष्टींत अगोदर स्पष्ट करण्यांत आलें आहे. यावरून बाहेरील संसार मनामध्येंच कसा विस्तारला

जातो व त्याचा अनुभव बाहेरच्या सारखाच आंत प्रत्यक्ष कसा येतो हाच सिद्धांत वरील तिन्ही गोष्टींत स्पष्ट करण्यांत आला आहे.



## ( ११ ) दाम, व्याल आणि कट या तीन दैत्यांची गोष्ट.

दामव्यालकटन्यायो मा ते भवतु राघव ॥
भीमभासदृढस्थित्या त्वं यास्यसि विशोकताम् ॥ ४-२३-२७

**भावार्थः**—दाम व्याल कट न्यायानें तूं आपल्यावर दुःख परंपरा ओढवून घेऊं नकोस. विवेकाचा आश्रय करून त्याची चांगली चिकित्सा कर, म्हणजे भीम भास दृढ न्यायानें तूं शोक रहित अशा स्थितीप्रत जाऊन पोहोंचशील.

प्राचीनकाळीं सर्व प्रकारच्या आश्चर्यांनीं मनोरम असलेल्या पाताळांत मायावी शंवर नांवाचा दैत्याधिपती राज्य करीत होता. तो मायारूपी रत्नांचा जणूं सागरच होता. त्याचें सामर्थ्य जरी अफाट होतें, तरी तो निजला किंवा देशांतराला गेला, म्हणजे देव संधि साधून त्याच्या सैन्यावर छापा घालीत; आणि त्याच्या सैन्याचा फडशा पाडीत. यास्तव देवांचा बंदोबस्त करण्यासाठीं शंवरानें मुंडि, क्रोध, द्रुम इत्यादि सेनापती सैन्याच्या रक्षणार्थ नेमले. परंतु देवांनीं संधि साधून त्यांनाहि ठार केलें, देवांच्या या कृत्यामुळें शंबरासुर खवळून गेला आणि देवांनीं गजबजलेल्या स्वर्गावर त्यानें स्वतः चाल केली. त्याला पाहून देव धावरून गेले व मेरुपर्वताच्या अरण्यांत दडून बसले ! शंवरासुर स्वर्गांत येऊन पहातो तों, तेथें त्याला म्हातारे कोतारे क्षुद्र देव व देवस्त्रिया रडत बसलेल्या दिसल्या. सारांश कल्पांतीं सर्व जग शून्य होऊन जातें, तद्वत् स्वर्गाची अवस्था झालेली त्याच्या नजरेस पडली. तो देवांचा शोध करीत पुष्कळ हिंडला. परंतु त्याला एकहि देव दिसेना. तेव्हां क्रोधानें संतप्त होऊन तेथील सर्व सुंदर वस्तु घेऊन त्यानें इंद्राच्या राजधानीला आग लावली. नंतर तो पाताळांत निघून गेला. इतकें झालें तरी शंबरासुर जे जे म्हणून सेनापती नेमी, ते ते हरतऱ्हेचे प्रयत्न करून देवांनीं मारावे आणि पळून जावें. यामुळें

शंबरासुराचा क्रोधाग्नि अधिकच भडकला व त्यानें आपल्या मायेच्या योगानें तीन भयंकर दैत्य निर्माण केले. ते दैत्य म्हणजे मूर्तिमंत काळच होते. ते उत्पन्न झाले तेव्हां त्यांच्या ठिकाणीं वासना व अहंकार नव्हता. त्यापैकीं एक शत्रूचें दमन करणारा, दुसरा सर्पाप्रमाणें शत्रुसेनेला गराडा घालणारा आणि तिसरा आपल्या सेनेवर कढईप्रमाणें अच्छादन घालून शत्रूंच्या अस्त्रापासून त्याचें रक्षण करणारा होता. ह्या त्यांच्या गुणावरून त्यांना अनुक्रमें दाम, व्याल व कट अशीं नांवें ठेवण्यांत आलीं होतीं. युद्ध करतांना "शत्रू आपणावर छापा घालीत आहे, ही पलायनाची वेळ आहे." इत्यादि विकल्प त्यांच्या चित्ताला स्पर्श करीत नसत. फार काय पण जगणें, मरणें, संग्राम, यश, अपयश इत्यादि सुखदुःखात्मक कल्पनाहि त्यांच्या ठिकाणीं नव्हत्या; तर जे आपल्यासमोर येतील, त्यांच्यावर तुटून पडून त्यांना ठार करावें, एवढी एकच गोष्ट ते जाणीत होते. अशा या मायावी राक्षसांना पाहून शंबरासुराला मोठा आनंद झाला, यांच्यावर आतां देवांनीं जरी हल्ला केला तरी हे वासनारहित असल्यानें खास पळून जाणार नाहींत, अशी शंबराला खात्री वाटून त्यानें दाम व्याल व कट यांना आपली सेना बरोबर देऊन देवांचा नाश करण्याकरितां पाठविलें. पुढें देव दैत्यांचे भयंकर युद्ध सुरू झालें, तेव्हां शेंकडो योद्ध्यांचे हातपाय तुटून पृथ्वीवर पडले व रक्ताचे पाट वाहूं लागले. या युद्धांत देवांचा पराभव झाल्यामुळें वाट सापडेल तिकडे देव पळत सुटले. दाम, व्याल व कट यांनीं देवांचा पुष्कळ पाठलाग केला पण देव आपल्या हातीं लागत नाहींत, असें पाहून हे तिन्ही दैत्य पातालांत शंबरासुराकडे गेले. इकडे पराजयामुळें खिन्न झालेले देव क्षणभर विश्रांति घेऊन व एकमेकास धीर देऊन आपल्या जयाचा उपाय विचारण्याकरितां अत्यंत तेजस्वी अशा ब्रह्मदेवाकडे गेले व त्याला वंदन करून शंबरानें आपणावर आणलेला प्रसंग, तसेंच दाम, व्याल आणि कट यांची उत्पत्ति व त्यांचा अद्‌भुत पराक्रम यासंबंधाचा सविस्तर वृत्तांत ब्रह्मदेवाला निवेदन केला. देवांची हकीगत ऐकून घेतल्यानंतर ब्रह्मदेवानें थोडा वेळ विचार केला आणि देवांना धीर देणारें भाषण करण्यास सुरवात केली:—

ब्रह्मदेवः--देवांनो ! शंबराचें आयुष्य अद्याप बरेंच शिल्लक राहिलें आहे. एक लक्ष वर्षे लोटल्यानंतर तो श्रीविष्णूच्या हातून निःसंशय मरेल, याकरितां तोंपर्यंत तुम्हांस वाट पाहिली पाहिजे. देवांनो ! तुम्हीं तोंपर्यंत या दाम, व्याल आणि कट या दानवांच्या बरोबर थोडा वेळ युद्ध करून पळून जात जा; आणि अशा रीतीनें त्यांना युद्धाचा अभ्यास होत गेला, म्हणजे आरशांत पडणाऱ्या प्रतिबिंबाप्रमाणें त्यांच्या ठिकाणीं अभिमान निर्माण होईल; व त्यांच्या वृत्तींत एकदा अभिमान प्रबल झाला आणि ते वासनांच्या तडाक्यांत सापडले म्हणजे जाळ्यांत अडकलेल्या पक्ष्यांप्रमाणें त्यांना जिंकणें तुम्हाला सुलभ होईल.

असें बोलून भगवान् ब्रह्मदेव त्याच ठिकाणीं अंतर्धान पावले. देवहि आपल्यास्थानीं निघून गेले. देवांनीं कांहीं दिवस विश्रांति घेऊन रण-दुंदुभींचा भयंकर आवाज करून युद्धाची घोषणा केली. लागलीच पाताळांतून वर आलेल्या दैत्यांचें आणि देवांचें घनघोर युद्ध सुंपलें आणि ते पुष्कळ कालपर्यंत टिकलें. शेवटीं देव पळून गेले आणि पुन्हां युद्धास आले, पुन्हां कांहीं वेळ युद्ध करून पळून गेले. याप्रमाणें नानाप्रकारच्या उपायांनीं युद्ध सुरू करून व पळून जाऊन कालक्षेप करण्यास देवांनीं सुरवात केली. अशा रीतीनें युद्धांत प्रत्येक वेळीं जय मिळत गेल्यानें दामादि दैत्यांच्या ठिकाणीं अहंकार उत्पन्न झाला, तसेंच त्यांच्या ठिकाणीं देहाबद्दल प्रेम उत्पन्न झालें व आपला देह निरंतर निरोगी, सुदृढ आणि भोगक्षम असावा इत्यादि मोहानें ग्रस्त झाले. अशारीतीनें आशापाशांत अडकले जाऊन ते अगदीं मूढ आणि हतवीर्य झाले. आपण चिरकाल जिवंत असावें व सुखप्राप्तीसाठीं आपल्याजवळ पुष्कळ द्रव्यहि असावें अशी बुद्धि उत्पन्न होतांच त्यांचें पूर्वीचें धैर्य खचत चाललें. ते बलहीन झाल्यामुळें " आपण युद्धांत मरून जाऊं कीं काय ? " अशी त्यांना मरणाची भीति वाटूं लागली. काष्टें संपलीं म्हणजे अग्नीला हविर्द्रव्यें जाळण्याचें सामर्थ्य रहात नाहीं, त्याप्रमाणें त्यांचें सत्त्व कमी झाल्यामुळें आपल्या समोर उभे असणाऱ्या योद्ध्यांना जिंकण्यास ते दैत्य समर्थ राहिले नाहींत. फार काय सांगावें मरणाचे भीतीमुळें ते दैत्य युद्धांतून पळून गेले. देवांनीं ही संधि

साधून दैत्यसेनेचा नायनाट केला. याप्रमाणें देव शेवटीं विजयी झाले; दाम व्याल व कट हे अत्यंत भयभीत झाले. आपल्या पक्षाच्या पराभवाची ती वार्ता अखेर शंबरासुराला कळली. तेव्हां त्याचा क्रोधाग्नि कल्पांतीच्या अग्नी-प्रमाणें भडकला. आपण शंबरासुराच्या हातीं लागल्यावर तो आपल्याला जिवंतहि ठेवणार नाहीं अशी दामादि दानवांना भीति वाटून ते सातव्या पाताळांत पळून गेले. त्या ठिकाणीं यम किंकराची सत्ता असल्यानें शंबराचा पराक्रम तेथें चालण्यासारखा नव्हता. कारण शंबरासारख्या जीवांना क्षणांत नष्ट करण्याचें सामर्थ्य यमाप्रमाणेंच यमकिंकरांच्या ठिकाणीं होतें. यासाठीं दाम व्याल, आणि कट असे ते तीन दैत्य त्या नरकपालाच्या आश्रयाला जाऊन राहिले. पुढें तेथें त्यांनीं आपलीं लग्नें केलीं व आपल्या स्त्रियांसह विषयसुखाचा आस्वाद घेण्यांत त्यांनीं त्या ठिकाणीं दहा हजार वर्षें घालविलीं. पुढें एकेवेळीं नरकाची तपासणी करण्याकरितां यमधर्मराज त्या-ठिकाणीं आला. पण यमधर्माला ओळखतां न आल्यामुळें तो कोणीतरी यमकिंकर असावा, असें वाटून त्यांनीं त्याला वंदन केलें नाहीं. यामुळें यमाला क्रोध आला व त्यानें आपल्या नेत्रकटाक्षानें शंभर योजनें निखारे पसरलेल्या रौरव नरकांत त्यांना लोटून दिलें ! त्या ठिकाणीं तें जळून खाक झाले. तरी त्यांचा वासनाक्षय न झाल्यामुळें आपल्या क्रूर वासनानुसार ते दानव अनेकयोनीं फिरत फिरत सांप्रत ( वसिष्ठांनीं उपदेश केला त्यावेळीं ) काश्मीर देशांतील एका अरण्यांत मत्स्य होऊन राहिले होते. त्याठिकाणीं प्रखर उन्हामुळें पाणी आटून जाऊन शिल्लक राहिलेल्या चिखलांत ते कसेबसे दिवस कंठीत राहिले. धड जगणें ना मरणें अशी त्यांची अत्यंत शोचनीय स्थिति होऊन गेली.

तात्पर्यः—यावरून वासनेचें स्वरूप किती भयंकर असतें, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

## दाम व्याल व कट या तीन दानवांची मुक्ति.

यमानें क्रुद्ध होऊन जेव्हां दामादि दानवांना रौरव नरकांत लोटून दिलें, तेव्हां त्यांचें बांधव बनलेल्या यमकिंकरांनीं यमधर्माची प्रार्थना केली तेव्हां तो यमधर्म म्हणाला कीं, " जेव्हां ते दानव आपलें पूर्व वृत्त श्रवण

करतील, तेव्हां ते खात्रीनें संसारदुःखांतून मुक्त होतील." ते आपलें पूर्ववृत्त कोठें कसें ऐकणार याविषयीं वसिष्ठांनीं सांगितलेली त्याची भविष्यकाळांत होणारी हकीगत पुढीलप्रमाणें आहे.

काश्मीर देशांतील महापद्मसरोवरच्या कांठीं असलेल्या डबक्यांत मत्स्ययोनींत वारंवार जन्म घेऊन ते चिखलांत लोळत रहातील. पुढें कालांतरानें तें त्याच पद्मसरोवरांत सारस पक्षी होतील व त्याठिकाणीं ते आपल्या स्त्रियांसह अनेक वर्षें सुखोपभोग घेत रहातील. नंतर कालांतरानें त्यांच्या दुर्वासनांचा क्षय होऊन त्यांना सुविचार सुचतील. ते एकमेकांची संगति सोडून, एकमेकांपासून दूर रहातील. काश्मीर देशांतील "अधिष्ठान" नामक नगराच्या आंत मध्यभागीं असलेल्या 'प्रद्युम्न' नांवाच्या टेकडीवरील उंच माथ्यावर एका सुंदर मंदिराच्या ईशान्येकडील कोपऱ्यांत गच्चीचे भिंतीस असलेल्या भोकांत त्या तिघांपैकीं व्याल नांवाचा दैत्य चिमणी होऊन, गवताच्या घरट्यांत राहील. त्यावेळीं त्याच नगरांत 'श्रीयशस्कर' नांवाचा विख्यात राजा असेल, त्याच्या मंदिरांतील एका खांबांत दाम नांवाचा दैत्य मशक होऊन राहील. त्याच 'अधिष्ठान' नांवाच्या नगरांत 'रत्नावली' नांवाच्या विहारस्थळीं 'नरसिंह' नांवाचा महाज्ञानी त्या राजाचा प्रधान रहात असेल, त्याच्या वाड्यांत 'कट' नांवाचा दैत्य साळुंकीचें रूप धारण करून त्या प्रधानाचें खेळणें होऊन रुप्याच्या पिंजऱ्यांत राहील. तो 'नरसिंह' प्रधान दाम, व्याल व कट यांचें आख्यान श्लोकबद्ध रचून तें वाचून दाखवील. पिंजऱ्यांतील साळुकीच्या कानावर ती सत्यकथा पडतांच आपल्या पूर्वस्थितीचें स्मरण होऊन त्या साळुंकीला सर्व सृष्टींत आत्माच भरलेला आहे, असें ज्ञान होईल. नंतर ती शांत अशा निर्वाण पदास प्राप्त होईल. 'प्रद्युम्न' शिखरावरील घरट्यांत राहणाऱ्या चिमणीला तसेच राजमंदिरांतील खांबामध्यें रहाणाऱ्या मशकाला ती कथा परंपरेनें ऐकूं जाईल. तेहि आत्मज्ञान प्राप्त होऊन मुक्त होतील. अशा रीतीनें ते दाम, व्याल, व कट हे तिघेही दैत्य मुक्त होऊन जातील.

( वसिष्ठांनीं ही वरील गोष्ट भविष्यकाळांत होणारी सांगितली, यावरून वसिष्ठ त्रिकालज्ञानी होते हें सहजच दिसून येतें. )

## ( १२ ) भीम, भास व दृढ या तीन दैत्यांची गोष्ट.

दामादि दैत्य पळून गेल्यावर देवांनीं दानव सेनेचा नाश केलेला पाहून शंवरासुराला फार वाईट वाटलें. पुढें कांहीं दिवस स्वस्थ बसून पुन्हां देवांच्या वधाविषयीं उत्सुक होऊन त्याच्या मनांत पुढीलप्रमाणें विचार घोळूं लागले. तो म्हणाला:—"मी आपल्या मायेनें दामादि दैत्य निर्माण केले खरे, पण त्यांच्याठिकाणीं मूर्खपणानें अहंकार उत्पन्न झाला, त्यामुळें त्यांचा नाश झाला. तरी आतां मायेनें मी दुसरे पराक्रमी दैत्य निर्माण करतो. मात्र त्यांना अध्यात्मज्ञानसंपन्न आणि विवेकी केलें म्हणजे झालें, त्यांना तत्वज्ञान झालेलें असलें म्हणजे त्यांच्याठिकाणीं अहंकार उत्पन्न होणार नाहीं व असें झालें म्हणजे ते देवांनाहि अजिंक्य होतील!" असा विचार करून शंवरासुरानें आपल्या मायेच्या योगानें तीन दैत्य निर्माण केले, ते सर्वज्ञ, वेदवेत्ते, आसक्तीरहित आणि निष्पाप असून केवळ प्राप्त-कर्म करणारे असल्यामुळें सर्वप्रकारें उत्तम होते. आत्मज्ञानानें त्यांच्या ठिकाणचा अहंकार नाहींसा झालेला होता. भीम, भास आणि दृढ अशीं शंवरानें त्यांचीं नांवें ठेवलीं होतीं. त्यांचीं अंतःकरणें पवित्र असल्यानें ते सर्व जगाला तृणवत् मानीत होते! शंवरासुराच्या आज्ञेवरून त्यांनीं देवांच्याबरोबर अनेक वर्षे युद्ध केलें; पण ते विवेकी असल्यामुळें त्यांना युद्धाच्या अभ्यासानें दाम व्याल व कट या पूर्वीच्या तीन दैत्यांप्रमाणें त्यांच्या अंगीं अहंकार कधींच उत्पन्न झाला नाहीं, एकादेवेळीं "हें आमचें हें आम्ही केलें" असा अहंभाव उत्पन्न होत असे, पण 'मी कोण?' हा सुविचार उत्पन्न होऊन ती वासना मिथ्या आहे असा त्यांचा दृढ निश्चय होई. ज्या शरीरासाठीं भ्यावयाचें तें असत् आहे, मग ज्याच्यापासून भ्याव-याचें तें देवहि असत् आहे, मग कोणी, कोणास आणि कां भ्यावें? असा विचार उत्पन्न होत असल्यामुळें ते सर्वदा निर्भय असत. पडेल तें काम करावयाचें व सांगतील तसें वागावयाचें एवढेंच त्यांना माहीत होतें. राग व द्वेष नसल्यामुळें ते समदृष्टी बनले व त्यांनीं देवसेनेची दाणादाण करून सोडल्यामुळें हिमालयांतून निघालेली गंगानदी वेगानें उड्या टाकीत जाते, त्याप्रमाणें देवसेना वाट सांपडेल तिकडे पळत सुटली! अशा रीतीनें

त्या तीन दैत्यांनीं जर्जर केलेली देवसेना अखेरीस क्षीरसमुद्रांत वास करणाऱ्या श्रीविष्णूला शरण गेली. श्रीविष्णूंनींहि देवाना आश्वासन देऊन निर्भय केलें व त्यांना सांगितलें कीं, दाम, व्याल कटाप्रमाणें यांच्याठिकाणीं अभिमान व वासना उत्पन्न होणार नाहीं; कारण यांना आत्मज्ञान झालेलें आहे. तरी शंबरासुराचा नाश होईपर्यंत तुम्हांस स्वस्थच बसलें पाहिजे. अशा तऱ्हेनें विष्णूनें देवांची समजूत घातली. पुढें शंबरासुराच्या आयुष्याचा क्षय होण्याचा काळ जवळ येतांच भगवान् विष्णूनें त्याच्याबरोबर युद्ध करून आपल्याच चक्रानें त्याचा वध केला. त्यामुळें तो वैकुंठाला प्राप्त झाला. तसेंच भीम, भास व दढ हे दानवसुद्धां विदेहमुक्त झाले.

तात्पर्यः—अशा या दोन्ही दैत्यांच्या गोष्टी सांगून नंतर ह्या दोन्ही गोष्टींपैकीं कोणत्या गोष्टीप्रमाणें वागावें, त्याविषयीं वसिष्ठांनीं रामाला असें सांगितलें कीं,

वसिष्ठः—

दामव्यालकटन्यायो मा ते भवतु राघव ॥
भीमभासदढन्यायो नित्यमस्तु तवानघ ॥ ४-३४-३६

" तुझी स्थिति दाम, व्याल व कट या दैत्याप्रमाणें होऊं नये, वर भीम, भास व दढ या दैत्याप्रमाणें व्हावी. अशा रीतीनें एकदां तुझ्याठिकाणीं तत्त्वबोध पूर्णपणें बाणला म्हणजे सर्व व्यवहारामध्यें तूं अनासक्त बुद्धीनें वागूं लागशील. अनेक सुखदुःखांनीं आणि विविधतापांनीं भरलेला जन्ममरणात्मक संसार निःसंशय नष्ट होईल.



## ( १३ ) दाशूराची गोष्ट.

दाशूराख्यायिकेवेयं राम संसारचक्रिका ॥
कल्पनारचिताकारा वस्तुशून्या न वस्तुतः ॥ ४-४७-८९

हें संसारचक्र दाशूराच्या आख्यायिकेप्रमाणें केवळ शून्यरूप असून कल्पनेनें रचलेलें आहे.

या पृथ्वीवर मगध देशांत एका सुंदर पर्वतावर दाशूर या नांवाचा एक मोठा तपस्वी रहात होता. दाशूराच्या बापाचें नांव शरलोमा होतें. दाशूर हा शरलोमाचा एकुलता एक मुलगा होता. शरलोमा हा आपल्या पुत्रासह त्या पर्वतावर सुखानें कालक्रमणा करीत होता. पुढें पुष्कळ काल लोटल्यावर शरलोमा स्वर्गवासी झाला. आपल्या पित्याचा वियोग झाल्यामुळें तो त्या अरण्यांत एकटाच आक्रोश करूं लागला. पुढें एका वनदेवतेनें अदृश्य राहूनच त्याचें सांत्वन केलें. ती म्हणाली:–'वा ऋषिपुत्रा ! तूं मोठा ज्ञानी असूनहि एखाद्या अज्ञ मनुष्याप्रमाणें रडत बसला आहेस, याला म्हणावें तरी काय ? अरे ! या संसाराचें अशाश्वत स्वरूप तूं विसरलास कसा ? उत्पन्न होऊन जगणें हें जसें सृष्टींतील एक कार्य आहे, तसेंच शेवटीं मरणें हेंहि एक अवश्य कार्य होय. तुझाच बाप मेला असें नाहीं; तर या जगांत जें जें म्हणून आकाराला येतें, तें तें सर्व असेंच नाश पावतें. जेथें ब्रह्मदेवादिकांना सुद्धां अखेरीस मुकाट्यानें कालवश व्हावें लागतें, तेथें इतरांचा काय पाड ? यास्तव पित्याच्या मरणाविषयीं व्यर्थ शोक करूं नकोस. सूर्याचा उदय झाला म्हणजे त्याचा अस्त व्हावयाचा, हा नियम जसा ठरलेला आहे, तसा जो जन्माला आला तो केव्हांतरी मृत्युवश हा व्हावयाचाच ! कारण अवश्य होणाऱ्या गोष्टी केव्हांहि टळूं शकत नाहींत. यास्तव आपला शोक आवर" याप्रमाणें वनदेवतेची ती आकाशवाणी कानीं पडतांच दाशूराला धीर आला, आणि रडून रडून लाल झालेले डोळे पुसून तो उठून बसला. नंतर त्यानें आपल्या पित्याचें और्ध्वदेहिक कृत्य मोठ्या आदरानें केलें; आणि ब्रह्मज्ञानाच्या सिद्धिसाठीं उत्तम तपश्चर्या करण्याचा त्यानें आपल्या मनांत दृढनिश्चय करून लगेच त्या अरण्यांत तप करण्याला सुरवात केली. तपश्चर्येनें त्याला श्रोत्रियत्व प्राप्त झालें व वेदाचें अध्ययन करण्यांत आणि त्याच्या रहस्याचा विचार करण्यांत तो गढून गेला खरा; परंतु अमुक शुद्ध आणि अमुक अशुद्ध अशा तऱ्हेच्या संकल्पांच्या जाळ्यांतून त्याला बाहेर पडतां येईना ! तपश्चर्येमुळें दाशूर श्रोत्रिय-वेदनिष्ठ (विद्वान्) झाला होता, परंतु अद्यापि तो ब्रह्मनिष्ठ झाला नव्हता. यामुळें परम पवित्र अशा या धरणी तलावर त्याला कोठेंच समाधान वाटेना आणि त्याचें चित्त कोठेंच रमेना.

वास्तविक हें सर्व भूतल शुद्ध असतां दाशूराच्या मनानें तें सर्व अशुद्ध आहे असें घेतलें! या संशयानें घेरल्या गेलेल्या त्या दाशुरानें आपल्या कल्पनेनें वृक्षाचें अग्र शुद्ध आहे असें ठरविलें. तो आपल्या मनाशीं म्हणालाः—"वृक्षाचें अग्र अत्यंत पवित्र असून त्याच ठिकाणीं बसून तपश्चर्या करणें युक्त आहे. आतां त्या वृक्षाग्रावर एका पानावरहि पक्ष्याप्रमाणें स्थिर बसता यावें, यासाठीं प्रथम घोर तपश्चर्या सुरू करावी!" अशा रीतीनें मनाचा दृढनिश्चय करून त्यानें अग्निकुंड प्रज्वलित केलें आणि त्यांत त्यानें आपल्या खांद्यांचें मांस काढून त्याची आहुती दिली. इतक्यांत अग्निनारायणाला त्याचें तें कृत्य पाहून मोठी चिंता उत्पन्न झाली. तो मनांत म्हणालाः—"मी देवांचें मुख आहे. यास्तव हें ब्राम्हणाचें मांस माझ्याद्वारां देवांच्या कंठांत जाऊन त्यांचें कंठनाल जळून खाक होईल. त्यामुळें मोठीच आपत्ति ओढवेल! यासाठीं आपणच या संकटाचें निवारण केलें पाहिजे." असा विचार करून दाशूरापुढें अग्निनारायण प्रत्यक्ष येऊन उभा राहिला व म्हणाला—

अग्निनारायणः—"बाळा! मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें, तरी तुला इष्ट असेल तो वर माझ्यापासून मागून घे."

अग्नीचें हें मधुर भाषण ऐकतांच दाशूरानें त्याची अर्घ्यपुष्पादि साहित्यानें पूजा केली व स्तुति करून म्हणालाः—

दाशूरः—भगवन्! प्राण्यांनीं गजबजलेल्या ह्या पृथ्वीवर मला पवित्र असें स्थान दिसत नाहीं. यास्तव मला वृक्षाग्रावर आसन घालून स्थिर रहातां येईल, असा वर द्या.

दाशूराचें असें भाषण ऐकून अग्निनारायण "तथास्तु" असें म्हणून अंतर्धान पावला. आपला मनोरथ पूर्ण झाल्यामुळें दाशूराला परम आनंद झाला. पुढें दाशूराला एक गगनचुंबी कदंबवृक्ष दृष्टीस पडला. त्याला पहातांच दाशूराला मोठा आनंद झाला. पृथ्वी आणि अंतरिक्ष यांचा जणुं आधारस्तंभ असलेल्या त्या वृक्षावर दाशूरानें आरोहण केलें व नूतनपल्लवांच्या मृदु आसनावर बसल्यावर त्यानें कौतुकानें क्षणभर दिशांकडे पाहिलें. तों दशदिशा त्याला सुंदर स्त्रियांप्रमाणें दिसूं लागल्या. वेल्हां-

पासून दारुण तपश्चर्या करण्यांत शूर असलेला तो दाशूर तापसाश्रमामध्यें 'कदंब दाशूर' या नांवानें विख्यात झाला. त्या कदंब वृक्षाच्या शाखाग्रावरील एका दलावर बसून क्षणमात्र दिशांचें अवलोकन केल्यानंतर आपलें मन तिकडून परावृत्त करून तो दृढपद्मासन घालून बसला. त्यावेळीं त्याला परमार्थाचें ज्ञान झालेलें नसून तो केवळ कर्मठ होता. यामुळें फलाची आशा धरून त्यानें मानसिक यज्ञ करण्यास सुरवात केली. उंच आकाशांत एका फांदीवरील पानावर बसून त्यानें मनानें अग्न्याधानापासून अश्वमेधापर्यंत सर्व यज्ञक्रिया केल्या. अशा रीतीनें मानसिक यज्ञयाग करण्यांत त्याची दहा वर्षे निघून गेलीं. इतक्या अवधींत त्यानें गवालंभ, अश्वमेध, नरमेध इत्यादि अनेक विपुल दक्षिणायुक्त यज्ञांनीं देवांचें यजन केलें. इतका काळ एकसारखें तप करीत राहिल्यानें त्याचें चित्त रागद्वेषादिमलरहित झालें; आणि त्याच्या अंतःकरणांत पूर्वजन्मींच्या श्रवणादि संस्कारामुळें चित्तशुद्धि द्वारा आत्मज्ञान आपोआप प्रतिबिंबित झालें, अशा रीतीनें आत्मज्ञान परिपक्व होऊन चित्त निर्वासन झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं आपल्या समोरील एका लतेच्या शाखाग्रावर बसलेल्या एका वनदेवतेला त्यानें पाहिलें. ती फारच सुंदर होती. कोकिला आणि पुष्पभर यांच्या योगानें वांकलेल्या एखाद्या वनलतेप्रमाणें भक्ति, प्रणाम आणि लज्जा यांमुळें खालीं मान घातलेल्या ह्या सर्वांग मनोहर वनदेवीला दाशूर म्हणाला,

दाशूरः—सुंदरी ! तूं आहेस तरी कोण ? हे कमलपत्राक्षी ! तूं आपल्या दिव्य सौंदर्यानें पुरुषांचा कामविकार मात्र क्षोभवीत आहेस !

अशा रीतीचें त्या मुनीचें भाषण ऐकून गौरवर्ण, पुष्टस्तनी आणि हरणाप्रमाणें जिचे नेत्र चंचल आहेत अशा त्या वनदेवीनें मधुर भाषण करण्याला सुरवात केली.

वनदेवीः—महाराज ! या जगांत ज्या ज्या म्हणून दुष्प्राप्य वस्तू आहेत, त्या त्या सर्व महात्म्यांची प्रार्थना केल्यानें सहज प्राप्त होऊं शकतात. मी या वनाची देवता आहे. ब्रह्मन् ! 'मी येथें कां आलें आहें' या प्रश्नाचें उत्तर ऐका. गेल्या चैत्र शुद्ध त्रयोदशीचें दिवशीं मदनोत्सवानिमित्त मी नंदनवनांत गेलें असतां त्या ठिकाणीं वनदेवतांचा मोठा समाज जमला

होता. त्या ठिकाणीं त्रैलोक्यांतील माझ्या सर्व मैत्रिणी दिसल्या. परंतु प्राणनाथ ! काय सांगूं ? त्या सर्व पुत्रवती होत्या व मीच काय ती निपुत्रिक होतें. त्यामुळें मला मेल्यापेक्षां मेलें झालें ! परंतु नाथ ! कल्पतरूप्रमाणें सर्व पुरुषार्थ साध्य करून देणारे आपण या ठिकाणीं स्थित असतां एखाद्या अनाथ अबलेप्रमाणें पुत्रप्राप्ति नाहीं म्हणून शोक करावा हा खरोखर माझा वेडेपणाच नव्हे काय ? म्हणून म्हणतें भगवन् ! मला जेणेंकरून पुत्रप्राप्ति होईल असें करा. नाहीं तर पुत्राच्या अभावीं होणारें दुःख नाहींसें करण्यासाठीं मी येथल्या येथें आपल्या समक्ष अग्निकुंडांत आपल्या देहाची आहुति देईन !

वनदेवीचें हें भाषण ऐकल्यानंतर दाशूराला तिची कींव आली. आपल्या हातांतील पुष्प तिला देऊन तो हंसत हंसत म्हणालाः—

दाशूरः—हें सुंदरी ! एक महिन्यानें सर्व जगाला पूज्य असा तुला एक सुंदर पुत्र होईल. हा तुझा पुत्र इतर वनदेवींच्या पुत्रांप्रमाणें विषयलंपट न होतां मोठा तत्त्वज्ञ होईल.

दाशूराच्या मुखांतून निघालेले हे मधुर शब्द ऐकून तिचें मुख प्रसन्न झालें आणि ' मी आपली सेवा करीत येथेंच रहातें ' असें म्हणतां क्षणींच त्या महात्म्यानें तिला एकदम जाण्याची आज्ञा केली. पुढें वनदेवी स्वस्थानीं गेली आणि दाशूर तेथें एकटाच राहिला. पुढें बराच काळ लोटल्यानंतर ती सुंदरी आपल्या बारावर्षांच्या मुलाला बरोबर घेऊन त्या मुनीकडे आली आणि त्याला नमस्कार करून म्हणालीः—" भगवन् ! हा पहा आपणा उभयतांचा भव्य कुमार ! मी त्याला वेदादि सर्व विद्येमध्यें निष्णात केला आहे. याला फक्त संसारचक्रांतून सोडविणारें अध्यात्मज्ञान प्राप्त व्हावयाचें राहिलें आहे. तरी महाराज ! कृपा करून याला त्या ज्ञानाचा उपदेश करा.

याप्रमाणें भाषण करणाऱ्या त्या सुंदरीला तो मुनि म्हणालाः—' हे स्त्रिये ! हा आपल्या पुत्राला—ह्या माझ्या सच्छिष्याला तूं येथेंच ठेव ' असें म्हणून दाशूरानें तिला जा म्हणून सांगितलें आणि ती वनदेवता निघून गेली. वनदेवी निघून गेल्यावर तो पुत्र आपल्या पित्याचें शिष्यत्व पत्करून त्या ठिकाणीं राहिला. गुरुशुश्रूषा, ब्रह्मचर्य इत्यादि नियमांचें यथाशास्त्र

पालन करून त्या बुद्धिमान् पुत्रानें आपल्या पित्याच्या चित्ताकर्षक आणि विचित्र भाषणानें ब्रह्माचें परोक्ष ज्ञान संपादन केलें. पुढें आपल्या पुत्राला ब्रह्माचें अपरोक्षज्ञान व्हावें. त्याबद्दल त्याला आपल्याप्रमाणें अत्यंत कष्ट पडूं नयेत, अशा हेतूनें त्या मुनीनें पुष्कळ काळपर्यंत आपला उपदेशक्रम चालू ठेवला. त्यानें त्याला निरनिराळ्या गोष्टी, दृष्टांत, इतिहास, वेदवेदांतांचे सिद्धांत इत्यादि अनेक युक्तींनीं पुष्कळ दिवसपर्यंत उपदेश केला. वसिष्ठ एकदां मंदाकिनीमध्यें स्नान करण्याकरितां आकाशमार्गानें जात असतां वाटेंत रात्रीच्या वेळीं दाशूराच्या त्या उंच कदंब वृक्षाजवळ येऊन पोहोंचले. इतक्यांत दाशूराचा आपल्या मुलाला चाललेला उपदेश त्यांच्या कानावर आला. तो पुढें दिल्याप्रमाणें होताः—' हे महाबुद्धिमान् पुत्रा ! या संसारासारखीच हुबेहूब असणारी एक आश्चर्यकारक गोष्ट मी तुला सांगत आहे ती ऐक.



## ( १४ ) खोत्थ राजाची गोष्ट.

दाशूरः—बाळा ! या त्रिभुवनामध्यें सर्व जगाचें आक्रमण करण्याला समर्थ असलेला असा मोठा पराक्रमी खोत्थ या नांवाचा एक राजा आहे. ब्रह्मादि देव त्याच्या आज्ञा शिरसामान्य करतात. तो मोठा साहसी असून नाना प्रकारचे आश्चर्यकारक विलास करणारा आहे. त्या महात्म्यावर ज्याचा पगडा बसला, असा या त्रिभुवनांत एकहि मनुष्य नाहीं. एखाद्या लहानशा कार्यासाठीं हजारों कल्पना लढविणाऱ्या आणि स्वप्नमनोरथादिकांना निर्माण करणारी शक्ति धारण केल्यामुळें मेरूर दिसणाऱ्या त्या राजाच्या लीलांचें अनुकरण करण्याला इंद्र, उपेंद्र आणि शंकर हे देवसुद्धां समर्थ नाहींत. त्या राजाचें उत्तम मध्यम आणि कनिष्ठ असे तीन देह असून ते जगताचें आक्रमण करून रहातात. अशा तऱ्हेचीं तीन शरीरें धारण करणारा तो खोत्थ राजा अति विस्तीर्ण अशा आकाशांत उत्पन्न झाला आहे. त्या अफाट गगनांतच त्या खोत्थ राजानें एक नगर निर्माण केलें आहे. त्यांत

चौदा राजमार्ग असून तीन मोठीं भुवनें तयार केलीं आहेत. तें नगर सुंदर सुंदर अरण्यें आणि उद्यानें यांनीं भूषित झालें आहे. शीतल आणि उष्ण प्रकाश देणाऱ्या अक्षय्य दीपांनीं तें प्रकाशित झालें आहे. अशा त्या अत्यंत विस्तीर्ण नगरामध्यें त्या राजानें खोल्या निर्माण केल्या. त्या खोल्यांपैकीं कांहीं वर आहेत, कांहीं खालीं आहेत आणि कांहीं मध्यमार्गी आहेत. त्या खोल्यांची जमीन काळ्या तृणानें आच्छादित केली असून प्रत्येक खोलीला नऊ दरवाजे आहेत. ज्यांतून विपुल वारा वहात आहे अशा तऱ्हेच्या अनेक खिडक्यांनीं त्या खोल्या विभूषित झाल्या आहेत. पांच दीपांनीं त्या प्रकाशित झाल्या आहेत. त्या राजानें त्या खोल्यांचा अभिमान धारण करून त्यांचें संरक्षण करण्याकरितां मोठमोठे यक्ष मायेनें निर्माण केले असून आत्मविवेकपूर्ण प्रकाशांत आपला क्षय होईल या भीतीनें ते प्रकाशाला नेहमीं भीत असतात. अशा ह्या खोल्या निर्माण केल्यानंतर त्या आपल्या मनाप्रमाणें कार्यक्षम झाल्या आहेत, असें दिसतांच एखादा पक्षी घरट्यांत प्रवेश करतो त्याप्रमाणें, तो राजा त्या खोल्यांतून नानाप्रकारच्या क्रीडा करूं लागतो. याप्रमाणें शेकडों विविध शरीरांमध्यें संचार करणाऱ्या यक्षांसह लीलेनें क्रीडा करून त्या यक्षांच्या अधीन न होतां तो तेथून पुन्हां निघून जातो. त्या चंचल मनाच्या राजाला एखादे वेळीं भविष्यकाळीं निर्माण होणाऱ्या नगरांत शिरण्याची इच्छा होते व अंगांत पिशाच्चानें संचार केल्याप्रमाणें तो खोरथ राजा तेथून उठून धावत सुटतो आणि गंधर्व नगराप्रमाणें संकल्पानें निर्माण केलेल्या त्या नगरांत प्रवेश करतो. केव्हां केव्हां त्या चंचलचित्त पुरुषाला आपला विनाश व्हावा अशी इच्छा उत्पन्न होते, त्या वेळीं त्याच्या देहाचा नाश होतो. परंतु अशा रीतीनें नाश झाला तरी शांत असलेल्या समुद्राच्या पृष्ठभागावर लाटा उत्पन्न होतात, त्याप्रमाणें तो आपल्या पूर्वस्वभावामुळें पुनः लगेच उत्पन्न होऊन मोठमोठीं कार्यें करण्यांत दंग होऊन जातो. पुढें अशा तऱ्हेचे व्यवहार करीत असतां कित्येक वेळां दुःखित होऊन "हाय हाय! काय करावें! खरोखरच मी मूढ आहे! माझ्यासारखा दुःखी कोणी नाहीं." असें म्हणून तो शोक करूं लागतो. कित्येकदां तो आनंदी दिसतो, परंतु लगेच आनंदाची

वृत्ति मावळून तो विषण्ण आणि दीन होऊन जातो. सारांश अशा तऱ्हेनें तो महासमर्थ राजा वायूनें क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें शत्रूवर चाल करून जातो. त्याचा पराभव करून त्याची संपत्ति हिरावून घेतो आणि 'मी मोठा ऐश्वर्यवान् आहे' असा गर्व वहातो. तो कांहीं वेळ भासमान होतो तर कांहीं वेळां त्याचा मागमूसहि लागत नाहीं.

## खोत्थ राजाच्या गोष्टीचें तात्पर्य.

इतकें दाशूरांचें बोलणें ऐकून दाशूराचा मुलगा म्हणालाः—

दाशूराचा मुलगाः—बाबा! हा खोत्थ राजा कोण? आपण आतांच सांगितलें कीं, तो खोत्थ राजा भविष्यनगरांत प्रवेश करतो. पण मी यावर असें विचारतों कीं, एखाद्याला भविष्यनगरांत भविष्यकाळीं जातां येणें शक्य होईल, पण वर्तमानकाळीं जातां येणें कसें संभवेल? तरी आपलें म्हणणें मला अधिक स्पष्ट करून सांगा.

दाशूरः—बाळा! या खोत्थ राजाच्या गोष्टीचें रहस्य मी आतां सांगत आहे तें ऐक; म्हणजे या संसारचक्राचें वास्तविक स्वरूप तुझ्या चांगलें ध्यानांत येईल. ही संसाररचना वस्तुतः असत् असून सत्य असल्यासारखी भासतें हें तुला कळावें आणि तिचें मायामयत्व तुझ्या बुद्धीला पटावें, अशा दृष्टीनें ही खोत्थ राजाची काल्पनिक गोष्ट मी तुला सांगितली. हा खोत्थ राजा म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून संकल्पप्रधान मन हाच तो राजा होय. हें संकल्पप्रधान मन समष्टिव्यष्टिरूप असून तें परमाकाशापासून उत्पन्न होतें. यामुळेंच त्याला खोत्थ ( ख=अव्यक्त आकाश आणि त्या-पासून उत्थ=उत्पन्न झालेला ) हें अन्वर्थक नांव देण्यांत आलें आहे. हा खोत्थ स्वसंकल्पजन्य प्रवृत्तिवासनेमुळें आपोआप उत्पन्न होतो आणि निवृत्तिवासनेमुळें आपोआप लय पावतो. अशा रीतीनें विस्तार पावलेलें जग हें त्याचेंच स्वरूप आहे. कारण त्याचा उद्भव झाला असतां जग उत्पन्न होतें आणि त्याचा नाश झाला असतां जगाचाहि नाश होतो. ब्रह्मा, विष्णु, रुद्र, इंद्र, आदिकरून देव हे त्याचेच अवयव आहेत, असें ज्ञाते जाणतात. आतां 'शून्य आकाशामध्यें ( त्रिकालीं जगताचा अभाव असलेल्या ब्रह्मामध्यें ) मनाच्या ठिकाणीं जग निर्माण करणारी शक्ति कोठून

आली ?' असें कदाचित् तूं विचारशील; तर त्याचे उत्तर असें कीं, अधिष्ठान-चैतन्याच्या अनुग्रहामुळें संकल्पप्रधान मन ब्रह्मदेव बनून त्यानें शून्य आकाशामध्यें ( ब्रह्यामध्यें ) त्रिजगत्पुर निर्माण केलें आहे. अत्यंत विस्तृत अशीं हीं चतुर्दश भुवनें हे त्यांचे मोठाले खजिने होत. ज्यांत वनें, उपवनें आणि उद्यानें यांच्या रांगा पसरलेल्या आहेत; सह्य, मंदर, मेरु इत्यादि क्रीडापर्वत विराजमान होत असतात; शीत उष्ण प्रकाश देणारे चंद्र-सूर्य हे ज्यामध्यें मोठाले दीप प्रकाशमान होत आहेत; ज्यांत सिंधु, गंगा इत्यादि नद्या वहात असून त्यांमधील तरंगावर सूर्यकिरण पडून मोत्यासारखे चमकत असल्यामुळें त्या जणुं चंचल मुक्तावलीच दिसत आहेत; इक्षुक्षीरादि सप्तसमुद्र ह्या रत्नरूपी बिसांकुर आणि वडवानलरूपी कमलें यांच्या योगानें शोभणाऱ्या जणुं सात विहिरी आहेत. असें त्याचें नगर आहे. त्या संकल्पराजानें ह्या जगद्रूपी अनेक विचित्र खोल्या निर्माण केल्या आहेत. त्यांतील कित्येक खोल्यांना देव हें नांव देऊन त्यांची योजना वरच्याजागीं करण्यात आली आहे. कित्येकांना नर-नागादि नांवें देऊन त्यांची योजना मध्यें व खालच्या जागीं करण्यांत आली आहे. मांसरूपी मातीनें लिंपलेल्या ह्या खोल्या वायूच्या यंत्र प्रवाहामुळें चलनवलन पावतात. शुभ्र अस्थी ही त्या खोल्यांची वहालें असून मृदु त्वचा हा त्यांवर केलेला गिलावा होय. त्यांतील कित्येक खोल्या लवकर जीर्ण होऊन मोडतात, तर कित्येक अनेक वर्षे टिकतात; म्हणजे मनुष्यादिकांचीं शरीरें लवकर नाश पावतात व देवादिकांचीं पुष्कळ काळ टिकतात. कित्येकांच्या शरीरांवर भूमीवर पसरलेल्या गवताप्रमाणें केसांचें आच्छादन असतें. त्या देहरूपी खोल्यांना कान, नाक, डोळे इत्यादि नऊ दरवाजे आहेत. त्या खोल्यांना कान, नाकपुड्या ह्या अनेक खिडक्या असून त्यांतून प्राण, अपान इत्यादि उष्ण आणि शीतल वायु वहातात. दोन हात हेच त्यांतील दोन रस्ते आणि पंच ज्ञानेंद्रियें हेच त्यांतील दिवे होत. त्या संकल्प राजानें प्रत्येक देहरूपी खोलीमध्यें अहंकार नांवाचा यक्ष रक्षक म्हणून ठेविला आहे. हा यक्ष परमात्मदर्शनास फार भितो. कारण परमात्म्याचें दर्शन होतांच त्याची इतिश्री झालीच म्हणून समजावें ! अर्थात् त्याला वाटणारी भीति

योग्य आहे. या मिथ्या अहंकार यक्षांबरोबर तो खोत्थ राजा सदोदित क्रीडा करीत असतो. याचा अर्थ असा कीं, समुद्रांतील तरंगाप्रमाणें ह्या देहरूपी गृहांतील संकल्पवृत्ती क्षणांत उदय पावतात आणि क्षणांत नष्ट होतात. आतां खोत्थराजा भविष्य नगरांत कसा प्रवेश करतो ? तें तुला सांगतों. तो जेव्हां स्वप्नकाळीं आपल्या इष्ट नगरीचा संकल्प करतो, तेव्हां ती त्याला दिसूं लागते व त्यामुळें त्याला तींमध्यें सहज प्रवेश करतां येतो. पुढें जागृतीमधील देहाचें अजीबात विस्मरण होतांच तो देह त्याला नाश पावल्यासारखाच होतो. जाग्रत आणि स्वप्न या दोन अवस्थांत भ्रमण करून कष्टी झालेला जीव शेवटीं विश्रांति घेण्याकरितां संकल्पाचा त्याग करून आपल्या कारणरूपी अविद्येमध्यें लीन होतो व तेथें त्याला आपोआप विश्रांति मिळते. तो राजा आपल्या सत्तेनें हें विस्तृत जग म्हणजे दुःखाचा एक मोठा पर्वतच उत्पन्न करतो ! तसेंच ज्याप्रमाणें प्रकाश असद्रूप अंधकाराचा नाश करतो, त्याप्रमाणें तो स्वतःच उत्पन्न केलेल्या असद्रूपी जगाचा नाश करतो. तो आपल्याच दुःखकारक चेष्टामुळें स्वतःच रडत बसतो व एखादेवेळीं इच्छित विषयानंदाचा थोडासा अंश जरी मिळाला, तरी वित्तवयानें त्याच्या अंगांत गर्वाचा ताठा भरतो आणि लगेच तो छाती वर करून चालूं लागतो !

याप्रमाणें खोत्थराजाच्या गोष्टीचें तात्पर्य सांगून दाशूर पुढें आपल्या मुलाला म्हणालाः—

दाशूरः—बाळा ! तूं आपली चित्तवृत्ति बाह्य विषयांपासून परावृत्त करून सर्वच समाधीचा दृढ अभ्यास आणि तत्त्वज्ञान या साधनांच्या योगानें चित्त निर्वासन करून तें अंतःपदाच्या ठिकाणीं तद्रूप होऊन राहील असें कर.

वसिष्ठः—रात्रीच्या वेळीं त्या कदंब वृक्षाग्रावर बसलेल्या त्या पिता-पुत्रांचा अशा रीतीनें चाललेला संवाद मी ऐकला आणि आकाशांतून खालीं उतरून त्या वृक्षाग्रावर मुक्कामानें जाऊन बसलों. मला पहातांच दाशूरानें मला बसावयास आसन दिलें आणि अर्घ्यपाद्यादि साहित्यानें माझी यथाविधि पूजा केली. नंतर संसारांतून तरून नेण्यास समर्थ असलेली जी ब्रह्म-

चर्चा त्यानें आपल्या पुत्राच्या बोधासाठीं चालविली होती, तीच मीहि पुढें चालविली. त्या दाशूराच्या पुत्राला अनेक रम्य कथा सांगून परमात्मज्ञानाचा चांगला बोध करून दिला. अशा रीतीनें आमच्या रमणीय कथा चालल्या असतां एखाद्या प्रेमसंलाप करणाऱ्या जोडप्याप्रमाणें ती रात्र केव्हां संपून गेली, त्याचें आम्हांलाहि भान राहिलें नाहीं. पुढें प्रातःकाळ झाल्यावर मी त्या कदंबवृक्षावरून नभोमार्गानें स्वर्गगेवर जाण्यासाठीं निघालों. त्यावेळीं मला पोहोंचविण्यासाठीं आकाशमार्गापर्यंत आलेल्या त्या पितापुत्रांना निरोप देऊन मी पुढें चाललो. नंतर मंदाकिनीमध्यें स्नान करून पुन्हां सिद्धांच्या आकाशमार्गानें स्वस्थानीं परत आलो.

तात्पर्य:—ह्या दाशूराच्या गोष्टीवरून हें जग सत्य भासलें तरी तें आपल्या कल्पनेचें प्रतिबिंब असून असन्मय आहे हें लक्षात आल्यावर आपल्या अंतःकरणांतील सर्व तऱ्हेचे विकल्प, त्यांना आश्रय देणारें मन आणि त्याला हेतुभूत असलेलें अज्ञान यांना साफ धुवून टाकावें, आणि सर्वत्र ओतप्रोत भरलेलें शुद्ध आत्मतत्त्व अखंड पद्दात जावें, म्हणजे परमपदाची प्राप्ति होऊन तो ज्ञानी मनुष्य सर्व जगाला वंदनीय होईल. सारांश या जगताची वास्तविक स्थिति काय आहे, याचें यथार्थ ज्ञान व्हावें, या हेतूनें ही दाशूराची गोष्ट सांगण्यांत आली आहे.



## ( १५ ) कचाची गोष्ट ( कचगाथा )

आरूढस्य पदं पूर्णं सार्वात्म्यस्थितिबोधिनीम् ॥
रामायात्र वसिष्ठेन कचगाथोपदिश्यते ॥ ४-५८-१.

**भावार्थ:**—परमपदावर आरूढ झालेल्या तत्त्ववेत्याच्या सर्वात्मभावाचा बोध करणारी कचगाथा.

देवगुरु बृहस्पतीचा पुत्र कच हा मेरुपर्वताच्या एका निबिड अरण्यांत आत्मज्ञानाचा अभ्यास करीत बसलेला होता. मनन निदिध्यास करितां करितां

## कचाची गोष्टी (कचगाथा)

तो एकदां आत्मानंदांत रंगून गेला. सम्यक्ज्ञानामृतानें पूर्ण झालेली त्याची बुद्धि पांच भौतिक क्षुद्र विषयामध्यें रमेनाशीं झाली. तो जिकडे जिकड दृष्टि फेंकी, तिकडें तिकडें त्याला आत्मतत्त्वावाचून दुसरें कांहींच दिसेना. इतकी त्याची वृत्ति अद्वैतानुभवांत मुरून गेली होती. यामुळें अत्यंत विरक्त झालेला तो कच आपणाशीच गद्गदवाणीनें म्हणाला.

### कचाचे विचार.

कचः—मी काय करूं ? कोठें जाऊं ? काय घेऊं आणि काय टाकूं ? मला यापैकीं कांहींच करितां येत नाहीं. कारण, महाकल्पांताच्या वेळीं ज्याप्रमाणें सर्वत्र जलमय होऊन जातें, त्याप्रमाणें हें अखिल विश्व आत्ममय झालेलें मला दिसत आहे. सुख, दुःख, जीव, आकाश, दिशा इत्यादि सर्व आत्ममय झालेलें आहे. माझें सर्व दुःख नष्ट झालें आहे. चिदानंदरूपी आत्मरस सर्वत्र भरलेला असल्यामुळें मला आतां या जगांत कांहीं ग्राह्य किंवा त्याज्य राहिलेलें नाहीं. देहाच्या आंत बाहेर, खालीं वर चोहोंकडे आत्माच ओतप्रोत भरून राहिलेला आहे. आत्म्यावाचून मला आतां कोठें कांहींच दिसत नाहीं. जिकडे पहावें तिकडें आत्माच स्थित असलेला दिसतो. सारांश, सर्व आत्ममयच आहे. मी सुद्धां आत्म्यामध्येंच स्थित आहे. चेतन आणि अचेतन असें सर्व मीच आहे. एवढें मोठें आकाश पण त्याला व्यापून मीच सर्वत्र तन्मय होऊन राहिलों आहे. फार तर काय ? पण मी परिपूर्ण सुखाचा समुद्रच आहे.

अशा तऱ्हेनें मेरुपर्वतावर भावना करीत असतां घंटेच्या नादाप्रमाणें हळुहळु क्षीण होत जाणाऱ्या ॐ काराचा उच्चार करणारा कच मनांत कोणत्याहि बाह्य आणि आंतर वस्तूंचें चिंतन न करतां ॐकारामधील अर्धमात्रेनें लक्षित होणाऱ्या तुर्यावस्थेमध्यें स्थिर होऊन राहिला.

तात्पर्यः—परमपदावर आरूढ झालेल्या तत्त्ववेत्याच्या ठिकाणीं सर्वात्मभाव कसा प्रतिष्ठित झालेला असतो हें वरील कचानें गाईलेल्या गाथेवरून दिसून येतें.

---

# उपशम प्रकरण.

---

## ( १६ ) जनक राजाची गोष्ट.

इह स्वेन विचारेण किंचिद्व्युत्पन्नचेतसः ॥
वर्ण्यते ज्ञानसंप्राप्तिराकाशफलपातवत् ॥ ५-७-१.

**भावार्थः**—दैववशात् आकाशातून खालीं फळ पडावें, त्याप्रमाणें स्वतःच तत्वविचार अकस्मात् सुचून अनायासे ज्ञान प्राप्ति होते. असें वर्णन या गोष्टींत केलेलें आहे.

विदेह देशाचा जनक नांवाचा एक राजा होऊन गेला. तो अत्यंत पराक्रमी व उदार अंतःकरणाचा होता. तो आपत्तिरहित दैवी संपत्तीनें-युक्त व याचकांना कल्पवृक्षाप्रमाणें असे. मित्ररूपी कमालांना विकसित करणारा सूर्य, बधुरूपी पुष्पांना टंवटवीत करणारा, स्त्रीजनांचा मदन, सौराज्य रत्नांचा समुद्र असून भगवान् विष्णूप्रमाणें पृथ्वीचें पालन करीत असे. अशा तऱ्हेचा तो जनक राजा एकदां वसंत ऋतूला आरंभ झाला असतां, इंद्र जसा आपल्या नंदन वनांत जातो, त्याप्रमाणें आपल्या रमणीय उपवनांत विहार करावयास गेला. त्याठिकाणीं अनेक पुष्पें धारण करणाऱ्या आणि वायूनें चंचल झालेल्या लतांची शोभा अवलोकन करीत आणि सुगंधी वायूचें सेवन करीत तो लीलेनें संचार करूं लागला. नंतर आपल्या सेवकांना दूर रहाण्यास सांगून तो त्या रमणीय उद्यानांतील लताकुंजामध्यें वायूच्या सुगंधि आणि मंद लहरींचा आस्वाद घेण्यासाठीं जाऊन बसला. तेव्हां त्यास अदृश्य असणाऱ्या सिद्धांचा आपसांतील चाललेला संवाद ऐकूं आला. सदरहू संवाद सिद्धगीता म्हणून प्रसिद्ध आहे. ही 'सिद्धगीता श्रुति, स्मृति, पुराणें आणि इतिहास यांची सारभूत असून ती श्रवण

करतांच आत्मसाक्षात्कार करून देण्यास समर्थ आहे. गिरिकंदरांत राह-णाऱ्या वैराग्यसंपन्न सिद्धांनीं गाइलेली गीता पुढीलप्रमाणें आहे.

## सिद्धगीता,

( उपशम प्रकरण, सर्ग ८ श्लोक ९ ते १८ ).

### सर्व आनंदांचें उगमस्थान आत्मा.

**द्रष्टृदृश्यसमायोगात्प्रत्ययानंदनिश्चयः ॥**
**यस्तं स्वमात्मतत्त्वोत्थं निस्पंदं समुपास्महे ॥ १ ॥**

द्रष्ट्याचा इंद्रियांच्या द्वारां दृश्य विषयाशीं संयोग झाला असता विषयाकार झालेल्या बुद्धिवृत्तीमध्यें जो आनंद स्वतःच स्फुरण पावतो, तो आनंद विषयापासून मिळत असतो, असें सामान्य मनुष्यांना वाटतें. परंतु तसें नसून तो आनंद आत्मतत्त्वापासून निर्माण होत असतो. म्हणून वस्तुतः तो ब्रह्मानंद आहे. तथापि तो ब्रह्मानंद विषयाकारवृत्तीनें व्यापल्या-मुळें विषयानंद आहे असा भास होतो. परंतु आत्मतत्त्वाचा चांगला विचार केल्यावर तोच विषयानंद निरतिशय ब्रह्मानंद आहे असें समजून येतें. अशा निरतिशय आनंदरूप आत्म्याची आम्हीं शांत अंतःकरणानें उपासना करतों.

### त्रिपुटींचा साक्षी आत्मा.

**द्रष्टृदर्शनदृश्यानि त्यक्त्वा वासनया सह ॥**
**दर्शनप्रथमाभासमात्मानं समुपास्महे ॥ २ ॥**

द्रष्टा, दृश्य, व दर्शन या त्रिपुटीचा वासनेसह * त्याग करून दर्शना-दिकांच्याहि पूर्वी ( म्हणजे चाक्षुप मानसादि वृत्ति उत्पन्न होण्यापूर्वी ) सिद्ध असणारा त्रिपुटींचा साक्षी अशा ( तुरीय अवस्थेंतील ) स्वयंप्रकाश आत्म्याची आम्हीं एकाग्रचित्तानें उपसना करतों.

---

* द्रष्ट्यादि त्रिपुटींच्या त्यागानें जागृति व स्वप्न या अवस्थांचा निरास केला आहे व वासनेच्या त्यागानें सुषुप्तीचा निरास केला आहे. कारण वासना ही जागृति व स्वप्न या अवस्थांचें बीज आहे.

## सर्व वादांना आधार आत्मा.

द्वयोर्मध्यगतं नित्यमस्ति नास्तीति पक्षयोः ॥
प्रकाशनं प्रकाश्यानामात्मानं समुपास्महे॥ ३ ॥

दर्शनादिकांच्यापूर्वी आत्म्याचें अस्तित्व अथवा नास्तित्व मानणाऱ्या अशा दोन्ही पक्षांमध्यें त्यांना अधिष्ठानभूत असणारें, तसेंच भाववाचक व अभाववाचक पदार्थांना प्रकाशित करणारें असें जें नित्य साक्षीभूत आत्मतत्त्व त्याची आम्हीं निश्चल अंतःकरणानें उपासना करतों.

## सर्वांचें अधिष्ठान आत्मा.

यस्मिन्सर्वं यस्य सर्वं यतः सर्वं यस्मायिदम् ॥
येन सर्वं यद्धि सर्वं तत्सत्यं समुपास्महे ॥ ४ ॥

जो जगांतील सर्व चराचर प्राण्यांचा आधार आहे, जो त्या सर्वांचा स्वामी आहे, जो सर्वांचें उपादान व निमित्त कारण म्हणजे मायबाप आहे, हें सर्व विश्व ज्याच्याकरितां आहे, ज्याच्यामुळें हें सर्व विश्व भासत आहे व शेवटीं हें सर्व विश्व ज्याप्रत जातें, जो सर्व चराचर जगताच्या रूपानें नटलेला आहे, त्या परमार्थ सत्य परमात्म्याची आम्हीं उपासना करतों.

## सर्व नामरूपात्मक जग आत्मा.

अशिरस्कं हकारान्तमशेषाकारसंस्थितम् ॥
अजस्रमुच्चरन्तं स्वं तमात्मानमुपास्महे ॥ ५ ॥

'अहं' हा शब्द आरंभीं 'अ' व अंतीं 'हं' अशा दोन वर्णांनीं बनलेला आहे; व अकारापासून हकारापर्यंत सर्व (वैखरी) वाणींतील वर्ण 'अहं' या जणूं सूत्रभूत पदांत अंतर्भूत झालेले आहेत. म्हणून 'अहं' पदामध्यें अखिल वस्तूंचें प्रकाशक जें वेदशास्त्रादि व इतर सर्व व्यावहारिक शब्दजाल स्थित आहे व ब्रह्म हेंहि सर्व वस्तूंचें प्रकाशक आहे, म्हणून अहं या शब्दाचा ब्रह्म असा अर्थ होतो. अशा अर्थाचें 'अहं' पद आपल्या व्यवहारामध्यें पदोपदीं उच्चारलें जातें. शिवाय या 'अहं' पदाचा अर्थ ( न हन्यते न हीयते ) अशा व्युत्पत्तीनें व ( अह व्याप्तौ )

अशा धात्वर्थानें 'अविनाशी' व 'सर्वव्यापी' असा क्रमानें होत असल्यामुळें 'अहं' म्हणजे ब्रह्म असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. कारण अविनाशीपणा व सर्वव्यापीपणा ही ब्रह्माची स्वरूपभूत लक्षणें आहेत. 'अहं'ला लागलेल्या देहादि सर्व उपाधींचा त्याग करून अवशिष्ट रहाणाऱ्या प्रत्यगात्म्याची आम्हीं उपासना करतों. अथवा

'हशिरस्कं सकारान्तम्'....असा पाट घेतला तर खालीलप्रमाणें अर्थ होऊं शकतो—

'ह' वर्ण ज्याच्या आरंभीं व 'स' वर्ण ज्याच्या शेवटीं आहे असा 'हंस' ['अहं सः' म्हणजे मी तो (परमात्मा) आहे अशा अर्थाचा निदर्शक असणारा] * हा अजपागायत्रीचा मंत्र दररोज २१६०० वेळां प्रत्येक देहधारी प्राण्याच्या ठिकाणीं श्वासोच्छ्वासरूपानें आपोआप उच्चारला जात असतो. ह्या मंत्रानें बोधित होणाऱ्या आत्मस्वरूपाची आम्हीं सिद्ध नित्य उपासना करीत असतो.

---

अजपागायत्रीमंत्राचें स्वरूप.

* हकारेण वहिर्याति सकारेण पुनर्विशेत् ।
हंसहंसेति मंत्रोऽयं जीवो जपति सर्वदा ॥
एकविंशतिसाहस्त्रं षट्शताधिकमीश्वरी ।
प्रत्यहं जपति प्राणी हंस इत्यक्षरद्वयम् ॥

अर्थः—बाहेर येणाऱ्या प्राणवायूचा उच्चार 'हं' असा होतो व आंत जाणाऱ्या अपान वायूचा उच्चार 'सः' असा होतो. असा हंस ('अहं सः' म्हणजे मी तो (परमात्मा) आहे अशा अर्थाचा निदर्शक असणारा) हा अजपागायत्रीचा मंत्र प्रत्येक जीव सदासर्वदा जपत असतो य या जपाची संख्या दररोज (म्हणजे सूर्योदयापासून पुनः दुसरे दिवशीं सूर्योदय होईपर्यंत) २१६०० होत असते.

या दररोज आपोआप होणाऱ्या जपाचें फळ मिळावें अशी इच्छा असल्यास दररोज स्नान करून आचमन करावें व प्राणायम करून सूर्योदयाबरोबर पुढील संकल्प करून उदक सोडावें.

टीप पुढील पानावर पहा...

हा आत्मा सर्वांचे हृदयांत रहातो.

संत्यज्य हृद्गुहेशानं देवमन्यं प्रयांति ये ॥
ते रत्नमभिवांछंति त्यक्तहस्तस्थकौस्तुभाः ॥ ६ ॥

जे आपल्या हृदयामध्यें राहणाऱ्या देवाला सोडून इतर देवांकडे धांव घेतात, ते आपल्या हातांतील कौस्तुभमणि फेंकून देऊन अन्य रत्नाची इच्छा करितात.

आत्मप्राप्तीचें साधन वैराग्य.

सर्वाशाः किल संत्यज्य फलमेतदवाप्यते ॥
येनाशाविषवल्लीनां मूलमाला विलूयते ॥ ७ ॥

सर्व आशा सोडल्या म्हणजे हें हृदयस्थ ब्रह्मरूपी फळ प्राप्त होतें, अर्थात् त्याचें ज्ञान होतें व त्यामुळें उलट आशारूपी विषवल्लींची वासनारूपी बळकट झालेलीं पाळेंमुळें खणून काढतां येतात.

विषयासक्ताची निंदा.

बुध्द्वाप्यत्यंतवैरस्यं यः पदार्थेषु दुर्मतिः॥
बध्नाति भावनां भूयो नरो नासौ स गर्दभः ॥ ८ ॥

विषयांचा उपभोग घेतल्यानंतर त्याच्या संबंधानें अत्यंत विरसता

---

...मागील पानावरून चालू

अजपागायत्री मंत्राचा संकल्प.

श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं अद्य श्रीसूर्योदयमारभ्य परेद्युः श्रीसूर्योदयपर्यंतं षट्शताधिकैकविंशतिसहस्रसंख्याकं हंसहंसेति अजपागायत्रीजपमहं करिष्ये ॥

अजपागायत्री मंत्रजपाचें निवेदन.

अनेन पूर्वेद्युर्यथासंकल्पिताऽजपा गायत्रीजपाख्येन कर्मणा भगवान् श्रीपरमेश्वरः प्रीयतां न मम ॥

( दासबोध दशक १७ समास ५ मध्यें या अजपागायत्रीमंत्राची माहिती दिलेली आहे. )

उत्पन्न होते. त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेत असूनहि जो मूढ योग्य विषयामध्यें पुनः पुनः आसक्त होतो; तो मनुष्य नसून गर्दभच आहे, असें खुशाल समजावें.

## इंद्रियनिग्रह.

उत्थितानुत्थितानेतानिंद्रियाहीन्पुनः पुनः ॥
हन्याद्विवेकदंडेन वज्रेणेव हरिर्गिरीन् ॥ ९ ॥

इंद्र आपल्या वज्रानें पर्वतांचें चूर्ण करून टाकतो, त्याप्रमाणें इंद्रियरूपी सर्पांनीं आपलीं डोकीं वर उचललेलीं असोत किंवा नसोत तीं विवेकरूपी दंडानें पुनः पुनः फोडून टाकावीं.

## मनोनिग्रह.

उपशमसुखमाहरेत्पवित्रं शमवशतःशममेति साधु चेतः ॥
प्रशमितमनसःस्वके स्वरूपे भवति सुखे स्थितिरुत्तमा सुखाय ॥१०॥

बाह्य व आंतर इंद्रियांच्या व्यापारांचा उपरम होणें यालाच 'उपशम' असें म्हणतात. अशा उपशमापासून उत्पन्न होणारें आत्मसुख नेहमीं संपादन करीत जावें. हें विषय सुखाप्रमाणें दोषयुक्त नाहीं तर तें चित्तप्रसादाला कारणीभूत होत असल्यामुळें अत्यंत पवित्र आहे. इंधनें संपल्यावर अग्नि आपोआप शांत होतो, त्याप्रमाणें शमाच्या योगानें चित्त शांत होतें, व अशा रीतीनें शांत झालेलें चित्त क्रमाक्रमानें सप्तभूमिकांचें उल्लंघन करून विदेहकैवल्याची स्थिति प्राप्त होईपर्यंत आत्मस्वरूपभूत निरतिशय आनंदाचा अनुभव घेत स्थिर रहातें.

याप्रमाणें सिद्धगणांच्या मुखांतून निघालेल्या गीता ऐकतांच एखादा भितरा मनुष्य रणवाद्यांची भयंकर गर्जना होतांच जसा घाबरून जातो, तसा जनक राजा अगदीं घाबरून जाऊन खिन्न झाला. लगेच आपला परिवार बरोबर घेऊन आपल्या राजवाड्यांत आला व लागलीच बरोबरच्या सर्व मंडळींना आपआपल्या घरीं जाण्यास सांगून उदयाचलावर सूर्य एकटाच आरूढ होतो, त्याप्रमाणें तो आपल्या राजवाड्यांतील उंच गच्चीवर

एकटाच जाऊन बसला. लोकव्यवहार हा उडणाऱ्या पक्ष्यांच्या पंखांच्या बुडाशीं असणाऱ्या लहान पिसांप्रमाणें अत्यंत चंचल आहे असा विचार मनांत येऊन तो स्वतःशीं विचार करूं लागला.

## जनकराजाचा विचार.

जनकराजाः—शिव ! शिव ! जन्म, जरा, भय, मरण इत्यादिकांच्या योगानें अत्यंत चंचल आणि कष्टप्रद असलेल्या जीवांच्या ह्या दशामध्यें एकाद्या दगडाच्या राशींत दगड जाऊन पडावें त्याप्रमाणें मी लोळत पडावें ना ! माझें जीवित म्हणजे अनंत कालाचा अगदीं अल्प असा भाग आहे. अशा या क्षुद्र जीवितावर विसंबून रहाणाऱ्या माझा धिक्कार असो ! वास्तविक विचार केला तर माझें राज्य एवढेसेंच आहे ! आणि त्याचाहि उपभोग मी जीवंत असेंपर्यंतच घेणार. परंतु अशा ह्या टीचभर जमिनीच्या तुकड्यावरच संतुष्ट राहून आणि त्याच्या उपभोगांत दंग होऊन भावी दुःखांच्या प्रतिकाराचा विचार मनांत न आणतां एखाद्या मूढाप्रमाणें मी स्वस्थ पडलों आहे, याला म्हणावें तरी काय ! या जगांत सत्य, रम्य, सुखरूप आणि अकृत्रिम अशी एकहि वस्तु नाहीं. असें असतां मी कोणत्या वस्तूवर भरंवसा ठेवून दिवस कंठावे ? तसेंच द्रव्यार्जनादि भोग साधनें मिळविण्यासंबंधानें लोकांची एकसारखी चाललेली धडपड पाण्यांतील भोंवऱ्याप्रमाणें क्षणभंगुर असून तिचा परिणाम जन्ममरणादि दुःखांत होतो. असा मला अनेक वेळां अनुभव येत असूनहि विषयसुखाबद्दल आस्था बाळगण्यांत काय अर्थ आहे ! या संसारांत आतां दृष्टीस पडणारी वस्तु पाहतां पाहतांच नष्ट होते. आज जे लोक वैभवाच्या शिखरावर आरूढ झालेले दिसतात, तेच उद्या पहावें तों धुळीस मिळालेले दिसतात. अशा स्थितींत मानवाला नीच स्थितीप्रत नेऊन पोहोंचविणाऱ्या वैभवावर विश्वास कोण ठेवणार ! हरहर ! हा काय चमत्कार आहे कीं, मी दोरीवांचून बांधला गेलों आहे ! चिखलावांचून मलिन झालों आहे ! आणि उच्च स्थानीं स्थित असतांहि अधोगतीस गेलों आहे ! तें वैभव, ते सुखोपभोग, ते मायाळू नातेवाईक सर्व नाहींसे झाले. मग हल्लीं असलेल्या संसारांतील पदार्थांवर तरी मी कसा विश्वास ठेवावा ? भूतकालीन

राजांची संपत्ति व पूर्वीच्या हिरण्यगर्भांची भुवनें तरी आज जाग्यावर आहेत का ? त्याचा आतां मागमूसहि नाहीं. आजपर्यंत झालेले लक्षावधि इंद्रसुद्धां जर पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें अनंत काळाच्या पोटांत गडप झाले आहेत, तर माझी ती कथा काय ? आजपर्यंत कोट्यावधि ब्रह्मदेव होऊन गेले, सृष्टीच्या अनेक परंपरा नाहींशा झाल्या आणि हजारों राजे धुळीच्या कणासारखे उधळून नष्ट झाले, तेथें माझ्या क्षुद्र जीविताची कथा काय ? संसाररूपी रात्रींत दिसणाऱ्या दुःस्वप्नांतील मिथ्या देह आणि त्यांतील अहंममतादि व्यवहारभ्रम यांच्यावर विश्वास ठेवून वसणाऱ्या माझ्या अविवेकाचा धिःकार असो ! हे दिवस एकामागून एक येत आहेत आणि जात आहेत; पण नित्य, निर्दोष आणि आनंदैकरस अशी सद्वस्तु दाखविणारा एकहि शुभ दिवस मला आजपर्यंत उगवलेला दिसला नाहीं. सर्वांच्या अंतःकरणांत विषयोपभोगाविषयीं विचार स्फुरण पावतात, परंतु आत्मज्ञानासंबंधीं विचार स्फुरण पावत नाहींत. अरेरे ! कष्ट सोसण्याचा कळस झाला, दुःख भोगण्याचाहि कडेलोट झाला, तरी मला अजून विषयांबद्दल वैराग्य उत्पन्न होऊं नये ना ? राग लोभादि विकारामुळें दूषित झालेल्या माझा खरोखर धिःकार असो ! आयुष्याच्या मध्यअवस्थेंत वय रमणीय असतें, वृद्धापकाळीं धर्म रमणीय असतो आणि भोगकाळीं विषय रमणीय असतात; परंतु हें सर्व रमणीयत्व विनाशरूपी नरकानें दूषित झालेलें असल्यामुळें अपवित्र होय. मनुष्य ज्या ज्या पदार्थांवर प्रेम करतो, ते ते पदार्थ नष्ट होत असल्यामुळें त्याला त्यापासून दुःख मात्र होतें. अज्ञ मनुष्याला त्याच्या उत्तरवयांत देखील सुखाची आशा नाहीं. कारण तो उत्तरोत्तर राग-लोभादिकांच्या अभिवृद्धीमुळें अधिक पापी होतो, हिंसादि प्रवृत्तींमुळें जास्त क्रूर होतो आणि आपल्या कृतीचीं फळें मिळूं लागलीं म्हणजे दिवसें-दिवस त्याचा खेद वाढत जातो. बाल्यावस्थेंत अज्ञानांत गुरफटलेला, तारुण्यांत मदनानें ग्रासलेला आणि वृद्धापकाळीं कुटुंबपोषणाच्या चिंतेनें झुरणीस लागलेला मूढ पुरुष आत्मोद्धारासाठीं केव्हां आणि कसें प्रयत्न करणार बरें ? वर्तमानकाळीं दिसणाऱ्या सर्व पदार्थांच्या डोक्यावर नाश बसलेला आहे. रम्य पदार्थांच्या चोकांडी अरम्यता ठेवलेली आहे आणि

सुखाच्या मागें दुःखाचा ससेमिरा आहे. अशा स्थितींत मी कोणत्या वस्तूचा आश्रय करूं ? एकसारखें उत्पन्न होऊन मरणाऱ्या क्षुद्र प्राकृत जीवांनीं ही पृथ्वी खच्चून भरलेली असून या जगांत खरे साधू दुर्लभच आहेत ! राजवैभव, धन, दौलत, सुंदर स्त्रिया इत्यादि नानाविध संपत्तीवर मनानें आसक्त होणें म्हणजे मोठाल्या आपत्तींना निमंत्रण करण्यासारखेंच आहे, असें मी समजतों. कारण, संपत्ति प्राप्त करून घेतांना आणि तिचें रक्षण करतांना कष्ट होतात आणि शेवटीं तिचा नाश झाला म्हणजे तर त्या दुःखाला पारावारच नाहीं. आतां दारिद्र्य, बंधुनाश, राज्यादिकांचा नाश वगैरे आपत्ति या जगांत सत्संग, तीर्थाटन, तप, ज्ञान इत्यादिकांना कारणीभूत होत असल्यामुळें श्रेयस्करच आहेत, असें मानूं लागलें आणि त्या आपत्तीपासून वैराग्यादिकांची उत्पत्ति होऊं लागली, तर त्या आपत्ति म्हणजे संपत्तीच आहेत, असें मानण्याला काय हरकत आहे ! रौरवादि नरकांत, दुःख असतें हें खरें, पण एका दृष्टीनें तें संसारांतील दुःखापेक्षां बरें. कारण नरकांतील दुःख एकदां आंगवळणी पडलें म्हणजे त्या दुःखाची तीव्रता भासत नाहीं. परंतु संसारांतील दुःखें सुखाभासमिश्रित असल्यामुळें अत्यंत दुःसह होतात. संसार म्हणजे दुःखांची पराकाष्ठा आहे असें सत्पुरुष सांगतात. तेव्हां अशा संसारांत पडलेल्या जीवांना सुखप्राप्ति कोठून होणार ? पण काय चमत्कार आहे पहा कीं, संसाररूपी स्वाभाविक महादुःखांत पडलेल्या जीवांना ह्यांतील सामान्य दुःखें तुलनेनें मोठीं सुखेंच वाटतात ! तरवारीच्या मारा पुढें चाबकाचा मार सुखकर भासावा, अशांतलाच हा प्रकार होय.

ज्याला संकल्परूपी हजारों अंकुर फुटलेले आहेत, देह भुवनादि शाखांच्या योगानें जो विराट् स्वरूपी बनलेला आहे, तसेंच जो सुखदुःखरूपी फळें आणि रागलोभादि पल्लव यांच्यामुळें सुशोभित झालेला आहे, अशा या संसार वृक्षाचा पहिला अंकुर म्हणजे मन असून संकल्प हेंच मनाचें रहस्य होय. यास्तव प्रथम या संकल्पाचाच क्षय केला म्हणजे संसारवृक्ष आपोआपच सुकून जाईल. अहाहा ! आतां मी चांगला जागा झालो आहे, व माझें परमार्थरूपी द्रव्य हरण करणारा चोर सांपडल्यामुळें मला मोठा

आनंद झाला आहे. या मन नांवाच्या चोराला मी पुरेपूर ओळखलें आहे. यानें माझें नुसतें आत्मधनच चोरलें असें नाहीं, तर यानें मला कितीतरी दिवस छळलें असल्यामुळें हा माझा हाडवैरी झाला आहे. याला आतां ठारच केलें पाहिजे ! आज तागायत हें मनोरूपी मोतीं अविद्ध ( विनछिद्राचें ) होतें, पण मी त्याला आतां भोक पाडलें आहे. तरी यापुढें मी त्याला शमदमरूपी दोरीमध्यें ओंवून टाकणार. हा मनोरूपी जलबिंदु विवेकसूर्याच्या तापानें अनादि ब्रह्मस्वरूपी वायूमध्यें कायमचा मिसळून जाण्याकरितां लवकरच लय पावेल. मला त्या निरनिराळ्या सिद्धांनीं उत्तम उपदेश केला आहे, तरी परमानंद प्राप्त करून देणाऱ्या आत्मतत्त्वाचेंच मी आजपासून अनुसंधान करणार. "हा देह म्हणजेच मी," "धन, राज्य वगैरे वैभव माझें आहे" इत्यादि मिथ्या कल्पना झुगारून देऊन ज्ञानबलानें ह्यांचें मनांतून उच्चाटन करून समाधीच्या अभ्यासानें मी मनोरूपी बलिष्ठ शत्रूला ठार मारीन, तेव्हांच शांत होईन. हें सर्व करण्याला विवेकाचें अवश्य पाठबळ पाहिजे. यास्तव बा विवेका ! मी तुला नमस्कार करीत आहे.

अशा रीतीनें जनक राजा एकांतांत विचार करीत बसला असतां त्याचे नोकर त्याच्यापुढें येऊन उभे राहिले व नम्रतापूर्वक म्हणाले:—

नोकरः—महाराज ! स्नानगृहांत सर्व तयारी झाली असून देवगृहांत पूजेची सर्व तयारी झाली आहे. ह्याप्रमाणें दक्षिणा देण्याला योग्य असणारे विद्वान् ब्राह्मणांचे थवेच्या थवे आपण स्नान, जप व अघमर्षणविधि आटोपून केव्हां एकदांचे येतां, म्हणून मार्गप्रतीक्षा करीत बसले आहेत. महाराज ! भोजनगृहांतहि सर्व तयारी झाली असून सुंदर स्त्रिया चंदनाचा सडा घालून भोजनगृहांत आपली वाट पहात आहेत. म्हणून म्हणतों कीं, महाराजांनीं लवकर उठावें व आपलें नियत अन्हिक कार्य करावें; कारण महात्मे आपल्या कर्तव्यकर्माविषयीं केव्हांहि कालातिक्रम होऊं देत नाहींत.

अशा रीतीनें ह्या नोकरांनीं जनकराजाजवळ जाऊन प्रार्थना केली,

तरीहि संसाराच्या विचित्र गतीसंबंधानें चाललेलें त्याचें चिंतन तसेंच चालू होतें. तो आपल्याशीं म्हणालाः—

जनकराजाः—हें माझें राज्य तें काय आणि त्यांत सुख तें कसलें? या क्षणभंगुर राज्याची मला बिलकूल गरज नाहीं. हें सर्व गोडबंगाल झुगारून देऊन मी आतां एकांतांत समुद्रासारखा शांत बसणार. हे मिथ्या भोग आतां बस झाले व ही कर्मकटकट आतां पुरे झाली! हें सर्व सोडून देऊन केवळ आत्मसुखाचा अनुभव घेत मी आतां स्वस्थ बसतों. बा चित्ता! विषयांचा अभिलाष, त्यांच्या प्राप्तीचा प्रयत्न, त्यांचा उपभोग, त्यांचें वारंवार स्मरण इत्यादि दशांमध्यें जेथें जेथें सुखाचा लवलेश आहे असा तुला भास होईल, तेथें तेथें त्यापासून तुला अखेरीस निःसंशय दुःखच होईल. यास्तव हे नीच चित्ता! ही तुच्छ भोगवासना आतां पुरे झाली, ज्याच्याकडे आपली वृत्ति वळविल्यानें तुला अकृत्रिम आनंदाचा लाभ होईल, अशा वस्तूच्या मार्गी आतां तरी लाग. येणेंप्रमाणें चिंतन करून जनकराजा पुनः स्वस्थ बसला. त्याचें चंचल मन शांत झाल्यामुळें तो त्यावेळीं चित्राप्रमाणें निश्चल दिसूं लागला. अशा स्थितींत थोडा वेळ गेला असेल नसेल, तोंच जनकराजा पुन्हा शांत मनानें विचार करूं लागला.

जनकराजाः—हा माझा देह मिथ्या असल्यामुळें तो कर्म करीत असो किंवा नसो. त्यामुळें माझ्या सम आणि शुद्ध चैतन्याची हानि ती काय होणार? मी अप्राप्त वस्तूची इच्छा करीत नाहीं आणि प्राप्त वस्तूचा त्यागहि करीत नाहीं. तर प्रारब्ध प्राप्त व्यवहार करून आपल्या स्वरूपांत स्वस्थ रहातों. कर्म करून अथवा न करून मला कांहीं साध्य करून घ्यावयाचें आहे अशांतला कांहीं प्रकार नाहीं. मग उगीच अमुक एका गोष्टीसंबंधानें आग्रह धरण्यांत काय अर्थ आहे! यास्तव हा माझा देह उठून पूर्वीप्रमाणें क्रमप्राप्त व्यवहार करीना कां? कारण या देहाची यत्किंचित् हालचाल झाली नाहीं, तर तो सुकून जाईल. परंतु त्यांत काय अर्थ आहे? मन निष्काम, सम आणि आसक्ति रहित असलें म्हणजे मग प्रारब्धानुसार शरीराच्या अवयवांची हालचाल झाली किंवा न झाली, तरी त्यामुळें पापपुण्याचा उदय होण्याची शक्यता न राहिल्यामुळें त्याची किंमत सार-

खीच. सांप्रत माझ्या बुद्धीमधील कर्तृत्व–भोक्तृत्वाचा रोग नष्ट झाला असून त्याला आत्म्याच्या अनुसंधानाशिवाय आतां दुसरा कोणताहि विषय शिल्लक राहिलेला नाहीं. यास्तव सर्व शंका सोडून या देहाला त्याचे प्राप्त व्यवहार मी खुशाल करूं देतों.

अशा रीतीनें आपल्याशींच भाषण केल्यानंतर जनकराजा आपल्या जाग्यावरून उठला; व नेहमींप्रमाणें स्नान, संध्या, देवपूजा, ब्राह्मणांना दान वगैरे सर्व आन्हिक क्रिया त्यानें केल्या आणि ती रात्र पूर्वीप्रमाणें ध्यान करण्यांत घालविली. त्यानंतर रात्र संपून पहाटेची वेळ होतांच, ज्याचा सर्व विषयभ्रम शांत झालेला आहे, अशा मनाला एकाग्र करून तो त्याला बोध करूं लागला.

## चित्ताला बोध

जनकराजाः—बा चंचल मना ! हा संसार तुला सुखदायक होणार नाहीं. यास्तव शांत हो, कारण शांतीनेंच विक्षेप–रहित आणि सारभुत असें आत्मसुख तुला प्राप्त होईल. कारण, हा जन्ममरणरूपी संसार विषय चिंतनाच्या योगानें उत्पन्न झाला आहे. तस्मात् या विचित्र चिंतेचा त्याग करून शांत हो. बा विवेकी चित्ता ! तराजूच्या एका पारड्यांत शमसुख आणि दुसऱ्यांत नश्वर संसारदृष्टि घालून दोहोंची तुलना करून पहा आणि त्यानंतर संसारांत कांहीं सार आहे असें तुला दिसलें, तर मग त्याच्यावर खुशाल आसक्त हो. परंतु ज्या अर्थी हें सर्व असार आहे, त्याअर्थी तूं त्यावरील आस्था टाकून दे. वास्तविक तुझा आणि या दृश्य जगाचा यत्किंचित्‌हि संबंध नाहीं, कारण ज्याप्रमाणें तूं असत् आहेस, त्याप्रमाणें हें दृश्य जगहि असद्रूपच आहे; अर्थात् दोन असत् वस्तूंचा संबंध कोणी कधींतरी पाहिला आहे का ? तुमचा दोघांचा संबंध आहे, हें म्हणणें वंध्या-पुत्र आणि आकाशपुष्प यांचा संबंध आहे, या म्हणण्याइतकेंच असंबद्ध आहे. आतां यावर कदाचित् तूं असें म्हणशील कीं, " दृश्य जग हें असत् आहे पण मी आत्मा असल्यामुळें सद्रूप आहे." परंतु हें तुझें म्हणणें मान्य केलें तर प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, सत् आणि असत् याचा संबंध कसा होणार ? एक मेलेला आणि एक जिवंत यांचा संबंध कधीं तरी

होतो का ? बरें कदाचित् दृश्यहि सत् व तूंहि सत् असें क्षणभर मानलें तर, मग इष्ट वस्तूला वियोग होण्याची शक्यताच न राहिल्यामुळें विषादाला जागा कोठून रहाणार ? यास्तव अभ्यास, वैराग्य इत्यादिकांच्या योगानें ब्रह्माचा अवलंब कर आणि धैर्य धरून चंचलपणाचा त्याग कर.

याप्रमाणें विचार करणारा जनकराजा स्वराज्यांतील आपलें सर्व कामकाज व व्यवहार करूं लागला. परंतु निरंतर आत्मानुसंधान करूं लागल्यामुळें सम्यक् (उत्तम) ज्ञानाची प्राप्ति होऊन त्याची बुद्धि अपरिछिन्न (व्यापक) ब्रह्माकार झाली व तिच्यामध्यें ब्रह्मतेज झळकूं लागलें. अशा तऱ्हेनें जनकराजा जीवन्मुक्त होऊन ज्ञानदृष्टया सर्वांना सारखे लेखूं लागला. तो भावी गोष्टींची चिंता वहात नसे आणि गतगोष्टींचें स्मरण करीत नसे. तसेंच वर्तमानकाळीं सुद्धां सर्व व्यवहार करीत असतां त्याच्या सहजानंद वृत्तीमध्यें यत्किंचित्‌हि खळ पडत नसे.

तात्पर्यः—जनकराजानें स्वतःच्या विचारानेंच सर्व ज्ञान प्राप्त करून घेतलें. जितका जितका विचार करावा तितकी तितकी विचाराची सीमा जवळ येते. यास्तव फलप्राप्ति अर्थात् आत्मज्ञान होईपर्यंत विचार चालू ठेवावा. गुरु, शास्त्र व पुण्य यांच्यायोगानें ह्या परम पदाची प्राप्ति होत नाहीं असें सांगण्यांत येत असतें; परंतु याचा अर्थ हीं साधनें अगदीं कुचकामाचीं आहेत असा नसून त्यांच्या मदतीनें स्वतःची बुद्धि विचारशाली बनविणें हेंच आत्मज्ञानाचें मुख्य साधन, असाच आहे. सच्छास्त्र, सत्संग, व विवेक यांच्या योगानें शोभणारी प्रज्ञा, उहापोह कुशलबुद्धि हीच कोणी सखी असून तिच्या योगानें परम पदाची प्राप्ति होते, याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि उपायानें होत नाहीं. संसार हा ज्ञानानें बाधित होणारा आहे वा ज्ञानाच्या बाबतींत प्रज्ञा हेंच मुख्य साधन आहे, यास्तव

शास्त्रसज्जनसंपर्कात्प्रज्ञामादौ विवर्धयेत ॥ नि. पू. १२०-१.

"मुमुक्षु पुरुषानें प्रथम शास्त्र आणि सत्समागम यांच्या सहाय्यानें आपली प्रज्ञा वृद्धिंगत करावी." ही ज्ञानाची प्रथम भूमिका होय. द्रव्यादि बाह्य पदार्थ प्राप्त करून घेण्यासाठीं ज्याप्रमाणें मनुष्य वारंवार प्रयत्न करितो, त्याप्रमाणें प्रथमतः प्रज्ञावृद्धिसाठीं नेटानें प्रयत्न करावे.

पविवेकी पुरुषाच्या हृदयकोषांत असलेली प्रज्ञा हा चिंतामणीच होय. अथवा चिंतित फल देणारी ती एक कल्पलताच आहे. जसें चिलखत घातलेल्या वीराला बाणापासून भीति नाहीं, त्याप्रमाणें आशा, तृष्णा, मोह, क्रोध, चिंता इत्यादिकांपासून उत्पन्न होणारे दोष प्रज्ञावान् मनुष्याला बाधा करूं शकत नाहींत; ज्याप्रमाणें चांगल्या पिकाची इच्छा करणारा शेतकरी प्रथम जमीन नांगरून तिची उत्तम मशागत करतो, त्याप्रमाणें अतुल अशा परमात्मपदाच्या प्राप्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें प्रथम विवेकाच्या योगानें आपली बुद्धि शुद्ध करून तिची वाढ करावी. आकाशांतून अचानक जमीनीवर फळ पडावें त्याप्रमाणें जनक राजाला ज्ञान झाल्याची ही वरील आख्यायिका लीलेनें ज्ञान प्राप्ति करून देऊन अज्ञान वृक्षाचा छेद करणारी आहे.



## (१७) पुण्य व पावन यांची गोष्ट.

अयं बंधुरयं नेति गणना लघुचेतसाम् ॥
उदारचरितानां तु विगतावरणैव धीः ॥ ५-१८-६१.

'हा माझा बंधु' आणि 'हा माझा बंधु नव्हे' ही विचारसरणी क्षुद्र पुरुषांच्या ठिकाणींच असते; परंतु उदारचरित महात्म्यांच्या बुद्धीवरील असल्या संकुचित भावनेचें आवरण नाहींसें होऊन त्यांची बुद्धि सर्वत्र सम झालेली असते.

ह्या जंबुद्वीपाच्या एका भागांत लहान लहान डोंगरांनीं वेढलेला आणि अरण्यांनीं सुशोभित झालेला महेंद्र नांवाचा एक पर्वत आहे. त्या पर्वताच्या एका विस्तीर्ण आणि मनोरम रत्नमय शिखरावर दीर्घतपा नांवाचा एक मुनि राहत होता. तो मोठा उदार बुद्धीचा असून ब्रह्मज्ञानी व मोठा तपस्वी होता. त्या मुनीस चंद्रासारखे सुंदर असे पुण्य आणि पावन नांवाचे दोन मुलगे होते. तो आपले दोघे मुलगे आणि भार्या ह्या सहवर्तमान तेथें रहात होता. अशा स्थितींत कांहीं काळ लोटल्यानंतर त्याचा वयानें ज्येष्ठ आणि सर्व गुणांनींहि श्रेष्ठ असलेला पुण्य नांवाचा मुलगा तत्त्वज्ञान संपन्न

झाला, परंतु पावन मात्र अर्धवट उमललेल्या कमलाप्रमाणें अपूर्ण ज्ञानी राहिला. तो अगदीं मूर्ख नव्हता, ही गोष्ट जरी खरी, तरी परम पदाप्रत जाऊन न पोहोंचल्यामुळें तो त्रिशंकू सारखा मध्येंच लोंबकळत राहिला होता.

तदनंतर मनुष्यजीविताची शंभर वर्षांची मर्यादा पुरी होतांच त्या मुनीचें आयुष्य क्षीण झालें व संसारावरील आसक्ति सोडून देऊन त्यानें जरेनें जर्जर झालेल्या आपल्या देहाचा त्याग केला. ज्याप्रमाणें एखादा पाणक्या आपल्या खांद्यावरील कावडीचें ओझें घरांत टाकून देऊन शांत होतो, त्याप्रमाणें तो मुनि शांत झाला व पुष्पाचा सुगंध आकाशांत जातो, त्याप्रमाणें चित्त निर्वासन झाल्यामुळें ज्याठिकाणीं सर्व तऱ्हेच्या कल्पना शांत होतात अशा परम पदाप्रत तो जाऊन पोहोंचला. नंतर त्या मुनीचा देह प्राणापानरहित झालेला आहे असें पहातांच त्याची भार्या देंठ तुटलेल्या कमलाप्रमाणें जमिनीवर पडली आणि तिला जरी कोणत्याहि तऱ्हेचा रोग झाला नव्हता किंवा जरा आली नव्हती तरी पतीनें उपदेशिलेल्या आणि तिनें बहुतवर्षें अभ्यासिलेल्या योगसामर्थ्यानें, भ्रमरीनें कमलिनीचा त्याग करावा, त्याप्रमाणें तिनें आपल्या कुडीचा त्याग केला, व पतीच्या मागोमाग तीसुद्धां ब्रह्मपदाला प्राप्त झाली. अशा रीतीनें माता आणि पिता यांचा एकाच वेळीं देहांत झाला, तरी त्यांचा ज्येष्ठ मुलगा पुण्य विवेकी असल्यामुळें व्यग्रचित्त न होतां त्यांचें और्ध्वदेहिक कर्म करूं लागला; परंतु पावन मात्र शोकमग्न होऊन अरण्यांतून इतस्ततः भटकूं लागला व आपल्या भावानें कसें धैर्य धरलें आहे याचा विचार न करितां एकसारखा रडत सुटला. पुढें त्या उदारबुद्धीच्या पुण्यानें मातापित्यांचीं और्ध्वदेहिक क्रिया आटोपून पावनाचें सांत्वन करण्याकरितां ज्याठिकाणीं पावन शोक करीत बसला होता, त्याठिकाणीं जाऊन तो आपल्या धाकट्या भावाला म्हणालाः—

पुण्यः—बाळा पावना! तूं पित्याबद्दल इतका शोक कां करतोस? तुझा पिता तुझ्या मातेसह आपल्या मोक्षनामक परम पदास जाऊन पोहोंचला आहे. परमात्मपद हें सर्व उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांचें आश्रयस्थान

असून ब्रह्मदेवांचें तर तें माहेर घर आहे. मग तुझा पिता आपल्या स्वरूपां-
प्रत जाऊन पोहोंचला असतां तूं त्याच्याबद्दल व्यर्थ शोक कां बरें करतोस?
प्राण्याला प्रत्येक जन्मांत आई, बाप, मुलें, बंधू वगैरे असतातच. तर तूं
या जन्मांतील आईबापाबद्दलच इतका शोक कां करतोस? तर बाळा!
जन्मजन्मांतरीं होऊन गेलेल्या लक्षावधि आईबापाबद्दल तरी शोक
कां करीत नाहींस? बा पावना! तुझा पिता कोण, माता कोण आणि इतर
बांधव तरी कोण? हा पसारा तूं केवळ भ्रमानें कल्पिलेला असून विवेक-
रूपी वावटळीनें हे स्वजनरूपी धुळीचे कण कोठच्या कोठें उडून जातील.
एखाद्या मनुष्यासंबंधानें बंधूची भावना केली, म्हणजे तो बंधु वाटूं लागतो
आणि शत्रूची भावना केली म्हणजे तो शत्रु आहे असें वाटूं लागतें.
विषांत रहाणाऱ्या किड्यांना विष हें अमृताप्रमाणें जीवनदायी होतें परंतु
ते इतरांचा प्राण घेतें. सारांश संसार हा केवळ भावनेचा खेळ आहे.
सर्वत्र एकच आत्मतत्त्व भरलें आहे, हें जर खरें आहे तर मग 'हा आपला'
आणि 'हा परका' असा भेद तरी कसा करतां येईल? रक्त, मांस व
अस्थि यांच्या समूहानें बनलेल्या या देहांत 'मी कोण आहे' याचा तूं
आपल्या मनाशीं विचार कर. परमार्थ दृष्टीनें विचार करतां तूंहि कोणी नाहींस
व मीहि कोणी नाहीं. मी पुण्य व तूं पावन ही कल्पना सुद्धां खोटीच
आहे. बरें लिंगदेहाना आपले आतबांधव समजून त्याच्याबद्दल शोक करीत
असशील तर तसें करणें अयुक्त आहे. कारण तुझ्या आजपर्यंतच्या विविध
योनींत झालेल्या जन्मामध्यें तुझे जे अनेक बांधव होऊन गेले त्यांच्याबद्दल
तूं कां शोक करीत नाहींस? बाळा! आजपर्यंत तुझे किती तरी जन्म झाले
आहेत आणि तूं किती योनी फिरला आहेस तें पहा. तूं दशार्ण देशांत
कपिलवर्णाचा वनवानर झाला होतास. तुषार देशांत राजपुत्र होतास.
पुंड्रदेशांत वनकावळा झाला होतास.पुढे हैहय देशांत हत्ती व त्रिगर्त देशांत
गर्दभ झालास. शाल्व देशांत कुत्रा व सुरुच्या झाडावर पक्षी झालास. याप्र-
माणें अशाच हजारों योनींत तुझे जन्म झाले आहेत. प्राक्तन जन्मांच्या या
इतिवृत्तावरून ही गोष्ट तुझ्या लक्ष्यांत आली असेलच कीं आमचे आजपावें-
तों हजारो आईबाप होऊन गेले आहेत. अशा स्थितींत त्यांपैकीं कोणाबद्दल
शोक करावा आणि कोणाबद्दल करूं नये? अर्थात् कोणाबद्दलहि शोक करूं

नये हेंच उत्तम. कारण ही जगाची नेहमीची गति आहे. वृक्षावर ज्याप्रमाणें असंख्य पानें येतात आणि गळून जातात, त्याप्रमाणें या संसारांत आपले अनंत आईबाप होतात आणि जातात. अशा स्थितींत बाळा! या संसारांतील सुखाला आणि दुःखाला कांहीं प्रमाण आहे कां? यास्तव आपण सर्वांचा त्याग करून परमपदीं स्थिर होऊं या. मनामध्यें स्थित असलेल्या 'मी' या प्रपंच भावनेचा त्याग करून ज्या ठिकाणीं आत्मवेत्ते जाऊन पोहोंचतात, त्या ठिकाणीं तूं जा. बाळा! तुला वास्तविक दुःख नाहीं, जन्म नाहीं, माता नाहीं व पिताहि नाहीं. तूं आत्मा आहेस, तद्व्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहींस. असें अव्यग्रमनानें चिंतन कर व मोह पावूं नकोस. तूं आपल्या मनांतील सर्व एषणामय कलंक नाहींसा करून आपल्या शुद्ध बुद्धीच्या योगानें आत्मसाक्षात्कार करून घे; आणि सर्व संसारभ्रमाचा सर्वथैव त्याग करून आत्मस्वरूपामध्यें स्थिर रहा, म्हणजे तुझ्या अंतःसमाधानाचा केव्हांहि भंग होणार नाहीं.

अशा रीतीनें पुण्यानें आपल्या धाकट्या भावाला बोध केल्यानंतर त्याला आत्मज्ञान झालें आणि प्रभातकाळच्या प्रकाशानें सर्व भूतल सुशोभित दिसतें त्याप्रमाणें पावन प्रबुद्ध झाल्यामुळें शोभूं लागला. नंतर ज्ञान विज्ञान पारंगत आणि सिद्ध झालेले ते दोघे बंधू प्रारब्धक्षय होईपर्यंत त्या अरण्यांत खुशाल संचार करीत राहिले. अशा रीतीनें कांहीं काळ लोटल्यानंतर तेल नाहींसें झालेला दिवा आपोआप विझून जातो, त्याप्रमाणें प्रारब्ध सरताच देहाचा त्याग करून ते दोघेजण निर्वाण पदाप्रत जाऊन पोहोंचले.

तात्पर्य—नानायोनींमधील शेंकडों विचित्र जन्मांनीं युक्त असणाऱ्या या जगांत 'हा माझा मित्र' आणि 'हा माझा शत्रु' अशा तऱ्हेची भेददृष्टि म्हणजे निवळ भ्रम होय. कारण जीवदृष्टीनें विचार केल्यास सर्वच आपले बंधू आहेत; परंतु ब्रह्मदृष्टीनें विचार केल्यास आपणच सर्व असल्यामुळें कोणीहि आपले बंधू नाहींत. म्हणून कोणी कोणाबद्दल शोक करूं नये हेंच योग्य ठरलें.

---

## ( १८ ) वलीची गोष्ट.

( सच्छास्त्राचा अभ्यास आणि सद्गुरुचा अनुग्रह होऊन आत्मविचारानें ज्ञानोदय कसा होतो, हें वलीच्या गोष्टींत दाखविलें आहे. )

या ब्रह्मांडाच्या एका कोपऱ्यांत पृथ्वीच्याखालीं पाताळ या नांवाचा एक विख्यात लोक आहे. त्या पाताळांत विरोचनाचा मुलगा बलि राज्य करीत होता. अखिल त्रिभुवनाला अलंकारभूत असलेल्या इंद्रादि देवांनाहि ज्यानें लीलेनें जिंकलें आहे, अशा त्या दैत्यराजानें पुष्कळ वर्षें राज्यसुख भोगलें. तो राज्य करीत असतां अनेक युगें उलटून गेलीं व तितक्या अवधींत देवासुरांचे अनेक समूह नाहींसे झाले. या दीर्घ कालांत त्या दानवाधिपतीनें त्रिभुवनांतील सर्व उत्कृष्ट भोग यथेच्छ भोगले. अखेरीस त्याच्या मनांत विषयोपभोगासंबंधीं वैराग्य उत्पन्न झालें. एकदां तो आपल्या राजवाड्याच्या रत्नजडित खिडकींत बसला असतां संसार स्थितीसंबंधानें आपल्या मनाशीं विचार करूं लागला.

### वलीचा विचार.

सर्व त्रैलोक्याला अद्भुत वाटणाऱ्या ह्या अफाट राष्ट्राच्या आणि अनेक प्रकारच्या रमणीय विषयांचा उपभोग घेतल्यानें कोणता लाभ होणार ! आरंभीं हे सर्व भोग मनोहर दिसतात. परंतु अखेरीस हे सर्व क्षय पावणारे आहेत. असे हे सर्व भोग मी सतत भोगीत राहिलों तरी त्यापासून मला कोणतें शाश्वतसुख मिळणार ! पुनः पुनः कांतेला आलिंगन देणें, पुनः पुनः तींच तीं अन्नें खाणें, त्याच त्याच गोष्टी करणें, हा निव्वळ पोरखेळ असून मोठ्या मनुष्यांना त्याबद्दल लाज वाटली पाहिजे. यास्तव क्षणिक आणि तुच्छ विषयोपभोगावांचून या जगांत दुसरी कोणती अविनाशी व सत्य वस्तु आहे !

अशा तऱ्हेचा विचार करून वलीनें लगेच ध्यान करण्याला सुरवात केली. कांहीं वेळ आपल्या भुंवया वर चढवून विचार केल्यानंतर कांहीं आठवल्यासारखें होऊन तो पुन्हा आपल्याशीं बोलूं लागला.

## विरोचनांचा उपदेश.

हा आतां सर्व आठवलें! मी पूर्वी माझ्या तत्वज्ञानी वडिलांना ( भगवान् विरोचन यांना ) विचारलें होतें कीं :—

बलिः— बाबा! ज्या ठिकाणीं सुख दुःखें नाहींत व जेथें सर्व प्रकारचे भ्रम नाहींसे होतात, अशें ठिकाण कोणतें? तसेंच मनाचा मोह कोठें नाहींसा होतो? सर्व इच्छा कोठें शांत होतात? ज्या ठिकाणचा आनंद अखंडित आहे आणि जेथें मला चिरकाल विश्रांति घेतां येईल, अशा तऱ्हेचें सुंदर स्थान कोणतें, तें मला सांगा.

विरोचनः—बाळा! मोक्ष नांवाचा एक देश आहे. त्या देशांत दुःखाचें नांवहि ऐकूं येत नाहीं. भगवान् आत्मा त्या देशाचा राजा असून त्यानें मनाला आपला शहाणा मंत्री म्हणून नेमला आहे. सर्व विषयांचे ठिकाणीं पूर्णपणें अनास्था असणें हीच मनोजयाची सर्वोत्कृष्ट युक्ति आहे. ह्या युक्तीचा अवलंब केला म्हणजे तिच्या योगानें मनोरूपी मदोन्मत्त हत्ती तावडतोब वठणीस आणतां येतो.

### मनोजयाची युक्ति

अशिक्षित मनाला शास्त्रीय मार्गांत प्रवृत्त करून त्यावर विजय-संपादनाचें कार्य हळुहळु करावें लागतें. प्रथम दिवसाचे चार भाग करून त्यांपैकीं दोन भाग त्याला अन्नवस्त्रादि विषयोपभोगाकरितां द्यावे व तिसऱ्या भागांत त्याच्याकडून अध्यात्मशास्त्रावलोकन आणि चवथ्यांत गुरु शुश्रूषा करवावी. अशा रीतीनें कांहीं दिवसानंतर मन थोडेंसें सुसंस्कृत झालें म्हणजे त्याला विषयसेवनाकरितां दिवसाचा फक्त एक भाग द्यावा. गुरुशुश्रूषेकरितां दोन भाग द्यावे आणि एक भाग शास्त्रार्थचिंतनाकरितां द्यावा. अशा योजनेनें तें चांगलें व्युत्पन्न झालें आणि त्याच्यावर उत्तम संस्कार घडले म्हणजे त्याला विषयोपभोगाकरितां दिलेला एक भाग तोहि कमी करून दोन भाग शास्त्र आणि वैराग्य यांच्या विचाराकरितां द्यावे आणि बाकीच्या दोन भागांत भगवंताचें ध्यान व गुरुसेवा करावी व अशा तऱ्हेनें त्याला क्रमाक्रमानें सन्मार्गाला लावावें. सद्बुद्धि व सद्विचार

यांच्या योगानें आत्मज्ञान व तृष्णात्याग हीं एकदमच संपादन करावीं. विषयांचे दोष दृष्टीस पडले म्हणजे विचार उत्पन्न होतो व विचार उत्पन्न झाला म्हणजे विषयांतील दोष जास्तच दिसावयास लागतात. सारांश, विचार व भोगवैराग्य हे समुद्र व मेघ यांच्याप्रमाणें एकमेकांना पुष्टिकारक होतात. परंतु हें सर्व साधण्यासाठीं प्रथम मनुष्यानें दैवाला बाजूला सारून आणि मोठ्या नेटानें पौरुष संपादन करून भोगविरक्ति संपादन करावी.

## भोगविरक्ति प्राप्त करून घेण्याचा उपाय

प्रथम देशाचाराच्या विरुद्ध न वागतां सर्व साधूंना संमत होईल अशा मार्गानें द्रव्यार्जन करावें व दानधर्मादिकांच्या योगानें त्याचा सद्व्यय करून साधुपुरुषांना संतुष्ट करावें कारण साधुसंतांचा सहवास घडल म्हणजे विषयासंबंधींची विरक्ति चित्तांत उदित होते. त्यानंतर मनन निदिध्यासानें महावाक्याच्या अर्थाचें ज्ञान, त्या ज्ञानानें अद्वितीय ब्रह्म-संबंधाचा तात्पर्यनिर्णय आणि त्याच्या योगानें अखेर परमपदाची प्राप्ति, अशा तऱ्हेचा ज्ञानक्रम आहे. म्हणून याच क्रमानें पौरुषप्रयत्न करून चित्तांत विषयविरक्ति बाणवून घ्यावी. कारण, विषयविरक्तीवांचून इतर सर्व यत्न निष्फळ होत.

## वलीचा विचार.

वलिः—माझ्या सुविचारी पित्यानें मला अशा रीतीचा जो उपदेश पूर्वी केला होता, त्याचें मला यावेळीं स्मरण झालें, हें माझें महद्भाग्यच, समजलें पाहिजे. कारण, त्या वेळीं माझ्या मनांत जें विषयवैराग्य बाणलें, नव्हतें, तें सांप्रत बाणलें असून मी आतां अमृताप्रमाणें शीतल आणि स्वच्छ अशा शमसुखांत प्रवेश करीत आहे. अहाहा ! ही शांत स्थिति किती रम्य आहे ! या शांत स्थितींत सुखदुःखाची दृष्टि पार नाहींशी होते. अरेरे ! आजपर्यंत मी भोगोत्कंठित होऊन मनोवेगानें कितीतरी देशामध्यें वणवण करीत फिरलों आणि शरीराला किती क्लेश झाले ! मी जगांतील वैभवाची सीमा पाहिली, निष्कंटक राज्यादि सुखांचा उपभोग घेतला आणि संपूर्ण भूतमात्रांना स्वपराक्रमानें आपल्या पायाशीं लोळावयास

लावलें, तथापि त्यापासून कोणत्या शाश्वत सुखाचा लाभ झाला ? या तुच्छ जगताचा लोभ धरून एखाद्या बालिश मनुष्याप्रमाणें मीं एवढा वेळ देवांबरोबर विनाकारण कलह केला, परंतु आतां गत गोष्टीबद्दल शोक करण्यांत काय अर्थ आहे ? सांप्रत मोहाची चिकित्सा करून जन्माचें साफल्य कसें होईल, याचाच विचार करणें युक्त आहे. यास्तव ' मी कोण, आत्मा कोण,' वगैरे गोष्टींचें ज्ञान मिळविण्याचा उपाय गुरुवर्य शुक्राचार्यांना विचारून मी आपल्या अज्ञानाची आतांच्या आतां शांति करून टाकतों म्हणजे झालें. त्यांनीं मला उपदेश केला म्हणजे त्याचा दृढ अभ्यास करून त्या अनंत वैभवानें संपन्न असलेल्या आत्म्याचें ठिकाणीं तद्रूप होऊन राहीन. कारण, महात्म्यांची अर्थपूर्ण उपदेशवाणी केव्हांहि विफल होत नाहीं !

## बलीला शुक्राचार्यांचें दर्शन

अशा रीतीनें विचार केल्यानंतर त्या महापराक्रमी बलीनें डोळे अर्धवट मिटून आकाशमंडळामध्यें विश्रांति घेणाऱ्या शुक्राचार्यांचें स्मरण केलें. त्याबरोबर निरंतर ध्यानामध्यें निमग्न असलेल्या त्या शुक्राचार्यांना आपल्या ब्रह्मस्वरूपी अंतःकरणांत बलीची स्थिति दिसली व तत्त्वजिज्ञासेमुळें तो आपल्या भेटीची इच्छा करीत आहे असें पाहून ज्या रत्नखचित खिडकीमध्यें बलि चिंतन करीत बसला होता, त्या ठिकाणीं येऊन शुक्राचार्यांनीं बलीला साक्षात् दर्शन दिलें. गुरुवर्य शुक्राचार्यांना पाहतांच बलीनें अर्घ्यपाद्यादि उपचारांनीं, कल्पवृक्षावरील मंदार पुष्पांनीं त्यांची पूजा करून त्यांना वंदन केलें. नंतर मूल्यवान् आसनावर गुरुवर्य बसले आहेत, अशा स्थितींत बलीनें भाषण करण्यास सुरुवात केली.

बलिः—भगवन् ! मला मोहांत पाडणाऱ्या भोगाविषयीं मी विरक्त झालों आहे; यास्तव अज्ञानाचा निरास होऊन मोह नाहींसा करणारें तत्त्व काय आहे, तें जाणण्याची मला उत्कंठा लागली आहे. म्हणून मी आपणाला विचारतों कीं, या भोगजालांची मर्यादा तरी कोठपर्यंत आहे ? तसेंच मी, आपण व हे सर्व लोक ह्यांचें तत्त्व काय आहे ? सारांश मोक्ता,

भोग्य आणि भोग यांचें स्वरूप काय आहे हें आपण मला समजून सांगावें, अशी आपणांस माझी प्रार्थना आहे.

श्रीशुक्राचार्यः—दानवश्रेष्ठ बले! उगीच पाल्हाळिक बोलण्यांत काय अर्थ आहे? शिवाय मला लवकरच आकाशमंडळांत स्वस्थानीं जावयाचें असल्यामुळें सध्यां तितका वेळहि नाहीं. याकरितां तुझ्या तिन्ही प्रश्नांचें उत्तर मी थोडक्यांत सांगतों तें ऐक. ह्या सर्व जगांत चित् (ब्रह्म) ओतप्रोत भरून राहिलें आहे आणि हे सर्व भोग्य पदार्थहि चिन्मयच आहेत. तसेंच तूं, मीं वगैरे भोक्तृ वर्गहि चिद्रूपच आहेत. मीं सांगितलेल्या ह्या संक्षिप्त उपदेशावर पूर्ण श्रद्धा ठेवून तूं त्याप्रमाणें विचार करीत रहाशील तर तुला निश्चयानें सर्व प्राप्त होईल. परंतु तसें न करशील, तर मी कितीहि कंठशोष करून उपदेश केला, तरी श्रद्धा आणि विवेक याच्या अभावीं, राखेंत टाकलेल्या आहुतीप्रमाणें तो व्यर्थ झाल्याशिवाय राहणार नाहीं. चित्तत्त्वानें विषयाकार होणें हाच मोठा बंध असून त्यापासून मुक्त होणें हीच मुक्ति होय. कारण चित्तनें चेत्याकाररहित होणें म्हणजेच पूर्णात्मा होणें असून हेंच सर्व सिद्धांतांचें सार आहे. हें तत्त्व लक्षांत ठेवून तूं आपली वृत्ति अखंड चिदाकार करून पाहूं लागशील तर तुला आपोआपच त्या अनंत पदाची प्राप्ति होईल. असो, दानवेंद्रा! आतां मी आकाशांत स्वस्थानीं निघून जातो. त्या ठिकाणीं सप्तऋषी कांहीं देवकार्यासाठीं जमलेले आहेत व मलाहि अवश्य गेलें पाहिजे.

राजन्यावदयं देहस्तावन्मुक्तधियामपि।
यथाप्राप्तक्रियात्यागो रोचते न स्वभावतः॥ ५.२६. १६.

"कारण, जोंपर्यंत हा देह आहे तोंपर्यंत जीवन्मुक्त पुरुषांनाहि आपल्या यथाप्राप्त क्रियांचा त्याग करणें स्वभावतःच आवडत नाहीं."

असें बोलून भगवान् शुक्राचार्य नभोमंडळांत निघून गेले. नंतर तो बुद्धिमतांमधील श्रेष्ठ बलि चित्शक्तीनें भरलेल्या जगाचा विचार करूं लागला.

## बलीचा विचार

बलिः—भगवान् शुक्राचार्यांनीं आतां मला जो उपदेश केला, तो

असर्दी योग्य आहे. हें त्रैलोक्य चित्च आहे. तसेंच मीं, हे लोक, ह्या दिशा आणि आमचीं सर्व कर्मे हीं चिद्रूपच आहेत. जगांतील सर्व पदार्थ चित्प्रकाशानें प्रकाशित होतात. ह्या दगडासारखा स्थूल अचेतन देह चित्‌कडून प्रकाशित केला गेला नाहीं, तर त्याला देह म्हणून कोण म्हणेल ! बोलणें, चालणें वगैरे ज्या ज्या क्रिया मी करितो, तो तो सर्व चित्चा विलास आहे; कारण केवळ शरीरानें कांहींच होणें शक्य नाहीं. मग या अचेतन शरीराचा अभिमान बाळगण्यांत तरी काय अर्थ आहे ? सर्व जगाचा चेतनात्मक आत्मा मी आहे. या विचारानें जर दुजेपणाचा पूर्ण अभाव आहे, तर मग या जगांत शत्रु कोण आणि मित्र तरी कोण आहे ? या बलिनामक शरीराचें मस्तक जरी कोणी तोडलें, तरी त्यामुळें असंग आणि सर्वव्यापी चित्स्वरूपानें युक्त असा जो मी, त्या माझी हानी काय होणार ? गुरुवर्य शुक्राचार्यांना ' मी कोण आहे ' असा प्रश्न केला होता. त्याचें उत्तर मला या विचारानें आतां आपोआपच मिळालें. द्रष्टा, दृश्य व दर्शन या त्रिपुटीनें रहित, केवळ शुद्धस्वरूप, नित्यउदित, निराभास, सर्वसाक्षी परमेश्वर मी आहे. असा जो परमेश्वर त्या मजमध्यें हा जीवभाव आरशांत किंवा पाण्यांत पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाप्रमाणें केवळ मिथ्याच भासमान होत आहे. मी जर चिद्रूप आहे, जें जें आहे तें तें सर्व जर मीच आहे तर मला संकल्प विकल्प करून तरी काय करावयाचें आहे ? मी आजपर्यंत अज्ञानामुळें क्षुब्ध होत असे, परंतु आतां तत्त्वबोध करून घेऊन शांत होतों म्हणजे झालें. "

अशा रीतीनें विचार करतां करतां बलि परम तत्त्वज्ञ बनला. ॐकारामधील ( स्थूल, सूक्ष्म व कारण, किंवा जाग्रत, स्वप्न आणि सुषुप्ति यांच्या दर्शक असलेल्या ) अ, ऊ व म या तीन मात्रांचा त्याग करून अर्धमात्रेनें दर्शित केल्या जाणाऱ्या तुरीय आत्म्याचें ध्यान करीत मौन धारण करून स्वस्थ बसला. त्या वेळीं त्याचे सर्व संकल्प शांत झाले, सर्व वृत्ति लीन झाल्या. चिंतक, चेत्य आणि चिंतन, ध्याता, ध्येय आणि ध्यान इत्यादि त्रिपुटी अजिबात मावळून गेल्या आणि सर्व वासना शांत झाल्या. यामुळें एखाद्या निर्वात प्रदेशांतील दीपज्योतिप्रमाणें त्याची वृत्ति निश्चल होऊन

आत्मस्वरूपामध्यें स्थिर झाली. अशारीतीनें शांतचित्त झालेला बलि त्या रत्नखचित खिडकीमध्यें पुष्कळ काळपर्यंत बसून राहिला. त्या वेळीं पाषाणामध्यें खोदलेल्या एखाद्या मूर्तीप्रमाणें तो स्थिर दिसत होता. सारांश, ज्याच्या सर्व एषणा शांत झाल्या आहेत, तसेच 'जो मननादि दोषांनीं रहित व आत्मसत्तेनें परिपूर्ण झालेला आहे, असा तो शुद्धचित्त बलि शरदृतूंतील स्वच्छ आकाशाप्रमाणें शोभूं लागला.

याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यावर बलीचे सेवक (दानव) आपले स्वामी इतके दिवस राजवाड्याच्या गच्चीवर बसून काय करीत आहेत, हें पाहू-ण्याच्या इच्छेनें त्या ठिकाणीं गेले. त्यावेळीं बलीनें मौन धारण केलें आहे असें पाहून सर्व दानव खिन्न आणि विस्मित झाले. बलीची ती अपूर्व स्थिति पाहून त्याला झालें आहे तरी काय, या संबंधानें त्याच्या मंत्र्यांनीं आणि इतर दानवांनीं पुष्कळ विचार करून पाहिला, पण कोणाचा कांहींच तर्क चालेना. तेव्हां त्या सर्व दानवांनीं सर्वज्ञ शुक्राचार्यांचें स्मरण केलें. त्याबरोबर शुक्राचार्य त्याठिकाणीं एकदम प्रकट झाले व त्यांनीं बलीकडे प्रेमानें अवलोकन करून दानवांच्या अज्ञानाबद्दल हंसून भाषण करण्यास सुरुवात केली.

शुक्राचार्यः—दैत्यांनो ! हा तुमचा स्वामी भगवान् बलि स्वतःच्या विचारानेंच सिद्ध झाला असून सर्वांना अधिष्ठानभूत असलेल्या शुद्ध ब्रह्माप्रत जाऊन पोहोंचला आहे. सांप्रत हा स्वरूपानुभवाचें अनिर्वचनीय सुख आणि विश्रांति घेत स्वस्थ बसला आहे. तरी ह्याठिकाणीं गडबड करून त्याच्या समाधीचा भंग करूं नका. ज्याप्रमाणें बीजकोशामध्यें सुप्त असलेला अंकुर कांहीं कालानें प्रगट होतो, त्याप्रमाणें एक हजार वर्षे उलटून गेल्यानंतर आपल्या समाधीचा त्याग करून भगवान् बलि देह-भानावर येईल. तरी त्या वेळेपर्यंत तुम्ही आपलीं स्वामिकार्यें यथायोग्य रीतीनें करीत जा.

गुरुवर्य शुक्राचार्यांचें हें भाषण ऐकून पूर्वापार चालत आलेल्या पद्धतीला अनुसरून दानवांनीं आपापलीं राज्यकारभाराचीं कामें करण्यास सुरवात केली. अशा रीतीनें देवांचीं एक हजार वर्षे उलटून गेल्यावर तो असुर-

श्रेष्ठ वालि समाधींतून जागा झाला व ही बातमी बलीच्या नगरांत पसरतांच सर्वत्र आनंदी आनंद झाला. बलि आपल्या समाधिकालांतील अनुभवा-संबंधानें विचार करूं लागला. तो म्हणाला 'अहाहा! या समाधींचें सुख खरोखर अनिर्वचनीय आहे! यामुळें मला केवढी विश्रांति मिळाली आहे! वास्तव मी आतां याच पारमार्थिक स्थितीचा अनुभव घेत राहणार.' अशा रीतीनें आपल्याशींच भाषण करून पुन्हां समाधि लावून बसण्याला तयार झाला. परंतु इतक्यांत बलीचे अनुचर त्याच्या भोंवतीं येऊन उभे राहिले व त्यांनीं बलीला मोठया आनंदानें प्रणाम केला. परंतु बलीनें त्या दानवाकडे पहात पहात पुन्हां आपल्याशींच विचार करण्याला सुरवात केली.

बलिः—ज्यांतील सर्व संकल्प क्षीण झाले आहेत, अशी चित् हेंच माझें वास्तविक स्वरूप आहे. अशा चित्स्वरूपाला या जगांत ग्राह्य असें काय आहे? अर्थात् कांहींच नाहीं. मनालासुद्धां जी विषयांची आसक्ति उत्पन्न होते, ती विषयांच्या केवळ दर्शनानें उत्पन्न होत नसून विषयांकडे ग्राह्य बुद्धीनें पाहिल्यामुळेंच उत्पन्न होते. तेव्हां मी आतां समाधि लावून बसूं, कीं व्यवहार करूं? मोक्षाच्या इच्छेनें समाधि लावून बसावें असें म्हटलें, तर मला कोणी बद्ध केलें आहे म्हणून मी मोक्षाची इच्छा धरावी? मला आतां बंध नाहीं आणि मोक्षहि नाहीं. मला आतां ध्यान कशाला पाहिजे आणि समाधि लावून तरी काय करावयाचें आहे? मी आतां शांत चित्तानें सर्व अवस्थांमध्यें सारखा राहणार. माझें शरीर प्राप्त कर्मांत व्यवहार करीत राहिलें तर त्यांत काय बिघडलें? त्यामध्यें माझें मन जोंपर्यंत आसक्त होत नाहीं, तोंपर्यंत या व्यवहारापासून माझें नफा नुकसान कांहींच नाहीं.

## बलीची जीवन्मुक्त स्थिति

याप्रमाणें विचार करून ज्ञानवंतांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या बलीनें

दैत्यांनीं केलेले प्रणाम ग्रहण केले. तदनंतर त्या बलीनें ध्येयवासनात्यागानें* सर्व राज्यकारभार पूर्ववत् करण्यास सुरवात केली. पुढें कालाच्या मानानें राज्य भरभराटीस चढल्यानंतर बलीनें शुक्राचार्यांच्या मदतीनें अश्वमेध यज्ञ केला. बलि हा भोगाची इच्छा करणारा नाहीं, तर मोक्षार्थी आहे, असें जाणून स्वतः श्रीभगवान् विष्णूंनीं वामन अवतार घेऊन भोगाकरिता हपापलेल्या आणि म्हणूनच कींव करण्याला योग्य असलेल्या इंद्राला जगद्रूपी अरण्याचा तुकडा देण्याच्या मिषानें बलीला युक्तीनें फसवून त्याच्यापासून तिन्हीं भुवनें हिरावून घेतलीं व एखाद्या वानराला तळघरांत कोंडून ठेवावें, त्याप्रमाणें त्याला पाताळांत बांधून ठेवलें. तो महात्मा बलि त्या ठिकाणीं जीवन्मुक्त स्थितीचा अनुभव घेत असतां आपत्ति आणि संपत्ति यांना सारखेंच लेखूं लागला. त्याची बुद्धि सुखांमध्यें उल्हसित झाली नाहीं व दुःखामध्यें खिन्न झाली नाहीं; तर सर्व प्रसंगीं चित्तांत काढलेल्या सूर्याप्रमाणें ती सम आणि स्थिर राहूं लागली. जीवनाविषयीं आस्था बाळगणाऱ्या भोगलंपट जीवांचे उत्कर्ष आणि अपकर्ष हजारों वर्षें पाहून पाहून त्याचें मन दुःखपर्यवसायी भोगाविषयीं विरक्त झालें होतें. सुखदुःखाचें आणि संपत्तिविपत्तीचें हजारों आघात सोसल्यानंतर त्यानें मनानें भोगविलासांचा त्याग केला आणि पूर्णात्मा होऊन त्यानें पाताल कुहरांत आत्मस्वरूपाचें ठिकाणीं निरंतर वास्तव्य केलें. इंद्रपदाच्या प्राप्तीनें बलीला हर्ष झाला नाहीं व आपलें तें वैभव नाहींसें झाल्यानें त्याला खेदहि झाला नाहीं. तर सर्व

---

*ध्येयवासनात्यागः—

अंतःशीतलया बुद्धया कुर्वतो लीलया क्रियाम् ॥
यो नूनं वासनात्यागो ध्येयो राम स कीर्तितः॥ (यो. वा.) ५-१६-९

(हा देह मी नव्हे तर मी चिदात्मा आहे अशा निरंतर अनुसंधानानें) बुद्धि आंतून शीतल झाल्यामुळें (स्थिरावल्यामुळें) सर्व व्यावहारिक क्रिया लीलेनें होत असतां जो वासनाचा त्याग होत असतो त्याला ध्येयवासनात्याग असें म्हणतात.

अवस्थांमध्यें चित्ताचा समतोलपणा राखून व नेहमीं संतुष्ट राहून जें जें कर्म प्राप्त झालें, तें तें आकाशाप्रमाणें निर्लेप वृत्तीनें करीत तो जीवन्मुक्ति-सुखाचा अनुभव घेत राहिला.

तात्पर्यः—आत्मज्ञान जरी प्रत्यक् दर्शनेंच होण्यासारखें आहे, तरी आपला अनुभव गुरु आणि शास्त्र यांच्याशीं जमला म्हणजेच प्राज्ञ पुरुषाला आपल्या ज्ञानाबद्दल पुरा विश्वास उत्पन्न होतो, एरवी होत नाहीं. म्हणून निभ्रांत ज्ञान होण्याला शास्त्र पाहिजे आणि गुरूपदेशहि पाहिजे.



## ( १९ ) प्रल्हादाची गोष्ट

( ह्या गोष्टींतील हकीगत हिरण्यकशिपूच्या वधानंतरची आहे. ह्या प्रल्हादाच्या गोष्टींत उपासनेच्या योगानें परमेश्वराचा अनुग्रह होऊन प्रथम आत्मविचार आणि त्यानंतर क्रमानें ज्ञान कसें होतें, हें दर्शविलें आहे. )

ज्यानें आपल्या अद्वितीय पराक्रमानें सर्व इंद्रादि देवांना जिंकलें असा हिरण्यकशिपु' नांवाचा एक मोठा बलाढ्य दैत्य पातालांत राज्य करीत होता. त्यानें आपल्या दुष्ट कर्मानें, त्रिभुवनास छळण्यास सुरवात केली. त्यावेळीं त्याचा वध करण्याविषयीं सर्व देवांनीं श्रीभगवान् विष्णूची प्रार्थना केली. तेव्हां भगवंतानें नरसिंह अवतार घेऊन हिरण्यकशिपूला मारून टाकलें. नंतर प्रल्हाद आपल्या मनाशीं विचार करूं लागला.

### प्रल्हादाचा विचार

प्रल्हादः—ज्या नारायणानें माझ्या वडिलांना मारून टाकलें त्याला वश करून घेण्याकरितां मनानें, बुद्धीनें व क्रियेनें त्यास शरण गेलें पाहिजे. त्या श्रीहरीहून अधिक पराक्रमी असा त्रैलोक्यांत कोणी नाहीं. यास्तव मी आतां याच क्षणापासून त्या अज नारायणाला अनन्य भावानें शरण जातों. तो नारायण म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून मीच तो नारायण आहे. ' नमो नारायणाय ' हा मंत्र सर्व वांछित वस्तु मिळवून देणारा आहे.

आकाशास सोडून वायु जसा रहात नाहीं, तसा हा मंत्र माझ्या अंतःकरणा-
बाहेर मी जाऊं देणार नाहीं.

अविष्णुः पूजयन्विष्णुं न पूजाफलभाग्भवेत् ॥
विष्णुर्भूत्वा यजेद्विष्णुमयं विष्णुरहं स्थितः ॥ ( ५-३१-४० )

" भावनेनें स्वतः विष्णु झाल्यावांचून विष्णूची पूजा करणाराला विष्णु-
पूजेचें फल मिळत नाहीं. अर्थात् मनुष्यानें विष्णु होऊनच विष्णूचें
पूजन केलें पाहिजे. यास्तव हा मी आतां स्वतःच विष्णु झालों आहें."
गरुडावर आरूढ झालेला आणि शंख, चक्र, गदा व पद्म धारण करणारा,
श्यामसुंदर, पीतांबरधारी असा मी साक्षात् विष्णूच आहे.

**प्रल्हादानें केलेली श्रीविष्णूची मानसपूजा व बाह्यपूजा**

याप्रमाणें विचार करून प्रल्हादानें मनानें पूजासाहित्य गोळा करून त्या भगवान् श्रीविष्णूची मानसिक पूजा केली. रत्नजडित अर्घ्यपात्रांनीं अभिषेक केला; उत्तम मौल्यवान् वस्त्रें अंगावर घातलीं, चंदनादिकांच्या उट्या लावल्या, धूप, दीप समर्पण केलें व नाना प्रकारचीं मौल्यवान् भूषणें विष्णूच्या अंगावर घातलीं. अशा रीतीनें आपल्या अंतःकरणांत हरीची मूर्ति स्थापन करून जगांतील सर्व ऐश्वर्य मनानें गोळा केलें आणि मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणानें त्याची मानसपूजा केली. नंतर आपल्या देवघरांत त्या विष्णूच्या मूर्तीची स्थापना करून त्यानें त्या मूर्तीची बाह्यतः मोठ्या थाटानें पूजा केली व यामुळें त्याच्या मनाला मोठा संतोष वाटला. तेव्हांपासून दररोज श्रीविष्णूची पूजाअर्चा करण्याचा क्रम त्यानें सुरू ठेविला. त्याचे नगरांतील सर्व दानवांनीं त्याचें अनुकरण करून विष्णुभक्ति करण्यास प्रारंभ केला. राजा हा प्रजेच्या आचाराला कारणीभूत असल्यामुळें 'जसा राजा तशी प्रजा' हा आचाराच्या बाबतींत ठरलेला नियम आहे. पुढें श्रीविष्णूचा द्वेष करण्याचें टाकून सर्व दैत्य त्याचे भक्त बनले. ही गोष्ट स्वर्गांत इंद्रादि सर्व देवांना समजली. तेव्हां सर्व देव आश्चर्यचकित झाले. दैत्यांनीं असें कां केलें याबद्दल कोणाच्या कांहींच तर्क चालेना. तेव्हां सर्व देव क्षीरसागरामध्यें वास करणाऱ्या श्रीशेषशायी भगवानाजवळ जाऊन त्यांनीं त्या अपूर्व आश्चर्याचें कारण विचारिलें.

## देवांनीं भगवंताजवळ केलेली तक्रार

देवः—भगवन्! हें केवढें आश्चर्य आहे कीं, जे दैत्य नेहमीं आपल्या विरुद्ध असावयाचे, ते आतां आपल्या भजनीं लागले असून आपल्याशीं तन्मय झाले आहेत. यांत त्यांचें कांहीं तरी गुप्त कारस्थान असावें, असें आम्हांला वाटतें. कारण हे अत्यंत अधम, नीचकर्मरत, तामसी आणि दुष्ट दानव कोणीकडे आणि अखेरच्या जन्मीं मोठ्या पुण्याईनेंच प्राप्त होणारी भगवद्भक्ति कोणीकडे! जें ज्या ठिकाणीं युक्त नसतें, तें त्या ठिकाणीं शोभत नाहीं. अयोग्य वस्तूंचा योग्य वस्तूंशीं संबंध जडलेला पाहिला, म्हणजे त्या अनौचित्य दोषामुळें सुज्ञांना जितकें दुःख होतें, तितकें दुःख अंगांत वज्राच्या सुया टोचल्यानेंहि होत नाहीं. एखादी कमलिनी रांठ माळजमिनीवर उगवल्याचें ऐकून जसा ऐकणाराच्या मनाला आनंद होत नाहीं, तसें दैत्य विष्णुभक्त झाल्याचें वर्तमान ऐकून आम्हांला बरें वाटत नाहीं.

## श्रीभगवंतानीं केलेलें देवांचें समाधान

भगवान्‌ः—देवांनो! खिन्न होऊं नका. स्वभावतःच बलाढ्य असलेले दैत्य माझ्या भक्तीमुळें अधिक बलाढ्य आणि उच्छृंखल होतात, हें जरी खरें आहे, तरी प्रल्हादासंबंधानें तशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. प्रल्हादाचा हा अखेरचा जन्म असून तो आतां मोक्षप्राप्तीला योग्य झाला आहे. यास्तव तो प्रबळ होऊन तुमचें राज्य घेईल ही आपल्या मनांतली भीति तुम्ही काढून टाका.

गुणवान्निर्गुणो जात इत्यनर्थक्रमं विदुः ॥
निर्गुणो गुणवान् जात इत्याहुः सिद्धिदं क्रमम् ॥ ५.३३.४

" एखादा मनुष्य प्रथम गुणवान् असून नंतर दुर्गुणी झाला तर त्याचा तो क्रम अनर्थकारक आणि पुरुषार्थविघातक आहे, असें विद्वान् समजतात. परंतु एखादा मनुष्य प्रथम दुर्गुणी असून मागून सद्गुणी झाला तर त्याचा तो क्रम सिद्धि प्राप्त करून देणारा आहे, असेंच सर्व समजतात." यास्तव देवांनो! तुम्ही आपआपल्या स्थानीं जाऊन स्वस्थ रहा. प्रल्हादाची भक्ति तुमच्या दुःखाला कारणीभूत होणार नाहीं.

यांप्रमाणें देवांना सांगून भगवान् विष्णु त्या क्षीरसमुद्रामध्यें अंतर्धान पावले व देवहि भगवान् विष्णूची स्तुति करून स्वस्थानीं निघून गेले. परंतु त्या वेळेपासून प्रन्हादावर देवांचें प्रेम वसतं चाललें.

'महतो यत्र नोद्विग्नास्तत्र विश्वासवन्मनः ॥ ५-३३-८.

कारण ज्या वस्तूवर किंवा मनुष्यावर महात्मे प्रेम करतात, त्यावर सर्वांचा विश्वास बसावा हें अगदीं स्वाभाविक आहे."

## प्रन्हादाला झालेलें भगवान् श्रीविष्णूचें दर्शन.

इकडे प्रन्हादाचें कायावाचामनें करून दररोज देवाधिदेव जनार्दनाचें पूजन करण्याचें काम अव्याहत चाललें असतां त्याच्या मनांत विवेक, आनंद, वैराग्य वगैरे गुणांचा विकास होऊं लागला वाळलेल्या वृक्षांप्रमाणें नीरस असलेल्या भोगांबद्दल त्याला प्रेम वाटेनासें झालें. उपभोगाच्या कल्पना सोडल्यानंतरहि त्याचें चित्त शांत झालें नाहीं, तर झोपाळयाप्रमाणें मधल्यामधेच झोके खात राहिलें. प्रन्हादाच्या मनाची ती आंदोलन पावणारी स्थिति भगवान् विष्णूंनीं क्षीरसमुद्रांतून अंतर्ज्ञानानें पाहिली आणि भक्तांना आल्हाद देणारे भगवान् श्रीविष्णु पातालमार्गानें प्रन्हादाच्या देवघरांत त्याच्यापुढें येऊन उभे राहिले. त्याबरोबर प्रन्हादानें मोठ्या आनंदानें आणि भक्तीनें भगवंताची पूजा केली; व नंतर त्यानें भक्तियुक्त अंतःकरणानें भगवंताची प्रार्थना करण्यास सुरवात केली.

## प्रन्हादानें केलेली श्री विष्णूची प्रार्थना

प्रन्हाद—बाह्य व आभ्यंतर कलंक हरण करणारा, अनाथांचें रक्षण करणारा, रजोगुणामुळें ब्रह्मदेव, सत्त्वगुणामुळें विष्णु आणि तमोगुणामुळें महेश अशीं त्रिगुणात्मक रूपें धारण करणारा जो तूं श्रीहरी, त्या तुला मी अनन्यभावानें शरण आलों आहे. शंख, चक्र, गदा व पद्म धारण करणारा, श्रुतिरूपी गुंजारव करणारा जणुं भ्रमरच, असा ब्रह्मदेव ज्याच्या नाभिकमलामध्यें वसत आहे आणि स्वभक्तांचें हृदयकमळ हें ज्याचें वसतिस्थान आहे, अशा तुला मी शरण आलो आहे.

याप्रमाणें अनेक गुणवर्णनानें युक्त असलेली प्रार्थना ऐकल्यानंतर असुरांचा नाश करणारा हरि संतुष्ट झाला आणि प्रन्हादाला म्हणाला, " हे दैत्य-

कुलचूडामणे! जन्ममरणाच्या दुःखाची कायमची शांति करणारा व निरतिशय सुखाची प्राप्ति करून देणारा ब्रह्मविश्रांतिदायक विचार तुला सुचो, हाच माझा तुला आशीर्वाद आहे." याप्रमाणें प्रऱ्हादाला वर देऊन भगवान् विष्णु अंतर्धान पावले. नंतर उत्तम आसनावर पद्मासन घालून त्यानें स्तोत्रपाठ करण्याला प्रारंभ केला. त्यावेळीं तो आपल्या मनांत विचार करूं लागला.

## प्रऱ्हादाचा विचार

प्रऱ्हादः—" तूं विचारसंपन्न हो," असें मला त्या संसारनाशक श्रीहरीनें सांगितलें आहे ना ? तर मग मी आतां आपल्याशींच विचार करतों. जो मी या जगामध्यें बोलतों, चालतों, उभा राहतों व सर्व तऱ्हेचे व्यवहार करतों, असा मी आहे तरी कोण ? हा देहच मी आहे, असें म्हणावें तर तें जुळत नाहीं. कारण, हा देह पूर्वी नव्हता, तो मातेच्या उदरांतून उत्पन्न झाला आहे. ज्ञानाच्या अभावीं बोलण्याला असमर्थ असलेला, प्राणाच्या योगानें हालचाल करणारा, आणि अल्प कालांतच नाश पावणारा, असा हा जड देह, मी असेन, हें शक्यच दिसत नाहीं. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांच विषय व त्याचप्रमाणें यांचे ग्रहण करणारी पांच श्रोत्रादि ज्ञानेंद्रियें यांपैकीं कोणीहि मी नाहीं. कारण शब्द हा, जड कर्णरंध्राच्या योगानें उत्पन्न होणारा, क्षणभर टिकणारा, शून्याकार व शून्य आकाशापासून उत्पन्न होणारा आहे. असा अचेतन शब्द मी असेन, ही गोष्ट संभवत नाहीं. त्वचेचा विषय जो स्पर्श, तोहि मी नव्हे. कारण तोहि क्षणभंगुर, त्वचेनेंच ग्रहण केला जाणारा आणि अनित्य आहे. जिव्हेचा विषय रस,-पण तोहि मी नव्हे. कारण तो चंचल आणि जड जिव्हेच्या आधीन असून त्याचें ज्ञान फक्त जिभेच्या अग्रावरच होतें व तेंहि क्षणभरच टिकतें. नेत्राचा विषय जें रूप, तेंहि मी नव्हे, कारण दृश्य डोळ्याआड झालें म्हणजे रूप विषय संपला व डोळे नसले किंवा बिघडले म्हणजे दृश्य असून नसून सारखेंच. अर्थात् रूप हा विषय दृश्य आणि त्याला पहाणारे नेत्र यांच्या सर्वस्वीं आधीन आहे. अशा रीतीनें जड आणि अनित्य असलेलें रूप मी कसा असेन ? घ्राणेंद्रियाचा विषय जो गंध, तोहि मी नव्हे. कारण,

आंबळ्यासारख्या जड, दुर्बळ, कालमानानें स्वभाव पालटणाऱ्या अर्थात् अनिश्चित स्वरूपाच्या या इंद्रियांचा विषय मी कसा असूं शकेन? सारांश, शब्दादि विषय नष्ट झाल्यानंतरहि मी असतोच, तेव्हां मी इंद्रियांचे विषय खास नव्हे. तसेंच मन, बुद्धि, चित्त, अहंकार हीं सर्व क्षणिक असल्यामुळें तींहि मी नव्हे; हां! आतां सर्व कांहीं आठवलें! मीच तो सर्वव्यापी, निर्विकल्प व चैतन्यघन आत्मा आहे. अग्निपासून ठिणग्या उडाव्या त्याप्रमाणें या आत्म्याच्या अंतःप्रकाशापासून नाना प्रकारच्या इंद्रियांच्या वृत्ती स्फुरण पावतात. मी सर्वव्यापी आत्मा असल्यामुळें माझें स्वरूप ब्रह्मलोकाच्याहि पलीकडे विस्तारलें आहे व तें कल्पांतानंतरहि टिकणारें आहे, तें कधींच संकुचित होत नाहीं. असा मी देश, काल व वस्तु यांनीं संकोच पावणारा नसतांना हा देह म्हणजे मी, पाताळ हें माझें भुवन इत्यादि संकुचित भावना मी आजपर्यंत उराशीं बाळगून बसलों होतों, हें केवढें आश्चर्य! अनंत आनंदाचा लाभ करून देणारी आणि उत्कृष्ट शांतीनें युक्त असलेली ही शुद्ध चिन्मय दृष्टि कोणीकडे आणि दुष्ट आशारूपी सर्पाच्या योगानें भयंकर बनलेली राज्यलक्ष्मी कोणीकडे! सारांश सर्व वस्तूंच्या अंतर्यामी राहणारा, निर्विषय आणि प्रत्यगात्मरूप असा जो मी, त्या मला नमस्कार असो. हे उत्तम बोधरूपी शाश्वत साम्राज्य टाकून माझें मन या अनर्थकारक राज्यवैभवामध्यें आतां रममाण होत नाहीं. फार लांब कशाला? माझ्या वाडवडिलांचीच गोष्ट घ्या. अज्ञानांत राहून माझ्या वाडवडिलांना (हिरण्यकशिपूना) ह्या जगद्राज्याचें वैभव अनेक वर्षे उपभोगावयास मिळालें होतें; परंतु तेवढ्या अवधींत त्यांनीं पुरुषार्थप्राप्तीचें कोणतें साधन संपादन केलें? खरोखर या स्वानंदसाम्राज्याचा उपभोग न घेतां शेकडों जगद्राज्यें उपभोगिलीं तरी तीं व्यर्थच आहेत! सारांश, माझे पूर्वज निःसंपय मूर्ख होते, असें मी स्पष्ट म्हणतों! कारण ह्या परमोच्च दृष्टीचा त्याग करून ते राज्यरूपी संकटांत दंग झाले होते.

श्रेष्ठ, निर्विकार, सम व निष्कलंक चित्शक्तीपासून नाना तऱ्हेच्या शक्ती निर्माण होतात. ही चित्शक्ति भूत, वर्तमान व भविष्य या तिन्हीं कालीं सम असते. तिच्या ठिकाणीं असणारा कालभेद, वस्तुभेद

बाजूस ठेवला म्हणजे केवळ समता शिल्लक राहते. तिलाच मोक्ष हें नांव दिलें जातें. हे आत्मदेवा! त्रैलोक्याला ज्ञानप्रकाश देणारा सूर्य तूंच असतां तुझी ओळख होण्याला मला इतके दिवस लागावे हें केवढें आश्चर्य! परंतु एवढ्या उशिरानें कां होईना, तूं मला ज्ञात झाला आहेस, माझ्या हातीं आला आहेस, आपल्या परमार्थरूपानें अभिव्यक्त झाला आहेस. आणि मी तुला विकल्प जाळ्यातून वर काढलें आहे. मद्रूप असणारा जो तूं, अनंत, शिव आणि देवाधिदेव परमात्मा तुला माझा नमस्कार असो.

हा आत्मा निष्क्रिय असूनहि स्थिर रहात नाहीं, चालत असूनहि निश्चल असतो, शांत असूनहि व्यवहार करीत असतो आणि सर्व क्रिया करीत असूनहि कोणत्याच क्रियेनें लिप्त होत नाहीं, कारण सर्व गोष्टी देह करतो, प्रत्यक्ष आत्मा कांहींच करीत नाहीं. वायु जसा वृक्षाचीं पानें हालवितो, त्याप्रमाणें हा आत्मा जीवांच्या मनाना हालवून सोडतो. सारथि जसा रथाचे घोडे हाकतो, त्याप्रमाणें हा आत्मा चक्षुरादि इंद्रियांना काम करावयास लावतो अशा ह्या आत्म्याचा शोध केला पाहिजे, त्याची स्तुति केली पाहिजे आणि त्याचेंच निरंतर ध्यान केलें पाहिजे. कारण त्याचा शोध लागला म्हणजे जरामरणरूपी मोहाचें उल्लंघन करून परमपद गांठतां येतें. ज्ञानमात्रानेंच याची प्राप्ति होत असल्यामुळें हा अत्यंत सुलभ आहे आणि स्मरणमात्रेंकरून वश होणारा असल्यामुळें आप्तबंधूप्रमाणें याला जिंकता येणें शक्य आहे. हा सर्वांच्या हृदयकमलामध्यें वास करणारा भ्रमर आहे. यामुळें प्रणवाच्या (ॐकाराच्या) उच्चारानें त्याचें नुसतें स्मरण केलें कीं, तो तत्क्षणीं सन्मुख होतो. या आत्मदेवाचें दर्शन झालें म्हणजे सर्व जग पाहिल्यासारखें होतें, याचें श्रवण झालें, म्हणजे सर्व श्रवण केल्यासारखें होतें, याला स्पर्श केला म्हणजे सर्व जगाला स्पर्श केल्यासारखें होतें व याच्या अस्तित्वामुळें सर्व जगाचें अस्तित्व सिद्ध होतें. मला विषयांचा उपभोग घेण्याची इच्छा नाहीं व त्यांचा त्याग करण्याचीहि इच्छा नाहीं. जें येणार असेल तें येवो व जें जाणार असेल तें जावो. श्रीविष्णूंची स्तुति, प्रणाम, प्रार्थना तसेंच यम व नियम यांच्या योगानें या भगवान् आत्म्याची प्राप्ति झाली. यावेळपर्यंत हा अज्ञानरूपी शत्रूने माझे विवेकरूपी

सर्वस्व हरण करून मला मेल्याप्रमाणें करून टाकलें होतें; परंतु मी मनानें मनाचा नाश केला आहे, व अहंकारहि नष्ट केला आहे, त्यामुळें माझ्या आनंदाला पारावार नाहींसा झाला आहे. भगवन् ! मला आतां तुझें सर्वत्र दर्शन घडत आहे, अशा स्थितींत तूं पळून तरी जाणार कोठें ? तुझ्या माझ्यामध्यें अज्ञानामुळें जें अंतर पडलें होतें, तें आज दूर होऊन तुझें माझें पूर्ण ऐक्य झालें आहे. हातामध्यें चक्र, व कमल धारण करणारा ( विष्णु ) मस्तकावर अर्धचंद्र धारण करणारा ( शिव ) आणि कमलसंभव ( ब्रह्मदेव ) असा जो तूं, त्या तुला माझा नमस्कार असो. तुझ्या माझ्यामधील भेद केवळ व्यवहारदृष्टीनें आहे. परंतु ही भेदकल्पना सुद्धां जलतरंगाप्रमाणें मिथ्याच आहे. हे ब्रह्माण्डाचा आकार धारण करणाऱ्या शांतिपरायण आत्मदेवा ! तुझा जयजयकार असो. सर्व प्रमाणांच्या पलीकडे असलेल्या व सर्व प्रमाणांनीं जाणला जाणाऱ्या देवा ! तुझा जयजयकार असो. मी आतां आनंदित, शांत, व स्थिर झालों आहे. माझें मला पूर्ण ज्ञान झालें आहे ! इतःपर मी प्रारब्ध कर्म संपविण्याकरितांच जगणार आहे. हे भगवन् ! हे परमात्मन् ! तुझा साक्षात्कार होऊन तूं व मी एकरूप झाल्यामुळें माझें सर्व अनर्थ नाहीसे झालें आहेत. अर्थात् आतां मला बंधन, विपत्ति, संपत्ति आणि जन्ममरण तरी कोठचें ! सारांश, मी आतां शाश्वत विश्रांतिसुख अनुभवीत रहाणार.

## प्रऱ्हादाची निर्विकल्प समाधि

अशा रीतीनें विचार करतां करतां प्रऱ्हादाची निर्विकल्प समाधि लागली. दानवांनीं त्याला समाधींतून जागें करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु एखाद्या बीजाला अकालीं कितीहि पाणी घातलें तरी त्याला अंकुर उत्पन्न होत नाहीं, त्याप्रमाणें तो महाबुद्धिमान् प्रऱ्हाद दानवांच्या प्रयत्नांनीं जागा झाला नाहीं. अशा स्थितींत हजारों वर्षे उलटून गेलीं. या कालांत मात्स्यन्याय (बळी तो कान पिळी) सुरू होऊन जिकडे तिकडे अंदाधुंदी माजली. हिरण्यकशिपूचा वध झाला आणि त्याचा पुत्र प्रऱ्हाद तर समाधि लावून बसला. अशा स्थितींत दैत्यांच्या राज्यांत कोणी शास्ता राहिला नाहीं. त्यामुळें सर्व पाताल दुःखाचें माहेरघर बनलें व सर्वत्र भीतीचें आणि

उद्विग्नतेचें साम्राज्य पसरलें ! तेव्हां जगाचें पालन करणें हेंच ज्याचें कर्तव्य असा क्षीरसागरांतील शेषशायी भगवान् श्रीहरि आपल्याशींच विचार करूं लागला.

## श्रीहरीचा विचार

श्रीभगवानः—" अरेरे ! प्रल्हाद समाधिसुखांत विश्रांति घेत असल्यामुळें पातालभूमि अराजक झाली. त्यामुळें सृष्टींतील बहुतेक दैत्य नाहींसे झाले, देव अजिंक्य होऊन शांत झाले आहेत. आतां ते द्वंद्वरहित होतील आणि त्यांच्या ठिकाणीं अभिमान नाहींसा होऊन त्यांना स्वर्गाचीहि पर्वा राहणार नाहीं व ते मोक्षपदास जाऊन पोहोंचतील. सारांश, अशा रीतीनें देव शांत झाले, म्हणजे स्वर्गाचीहि किंमत नाहींशी होऊन यज्ञतपश्चर्यादि क्रिया बंद पडतील, त्यामुळें कर्मभूमि ओस पडेल व अशा तऱ्हेनें भूलोकच नष्ट झाला म्हणजे मग संसार तो काय राहिला ! परंतु असा प्रसंग ओढवणें मला इष्ट नाहीं. कारण हें त्रिभुवन कल्पांतापर्यंत रहावें, असा जो मी संकल्प केला आहे, त्या संकल्पाचा अकालींच नाश होईल. याप्रमाणें तिन्ही लोक नाहींसे झाल्यावर माझा सर्व संसार नाहींसा होईल व मलाहि या माझ्या शरीराचा लय करून आत्मपदीं लीन व्हावें लागेल. परंतु अशा रीतीनें जगताचा आणि माझ्या शरीराचा अकालीं लय होण्यापासून कोणतेंच कल्याण होणार नाहीं. म्हणून हे दैत्य जिवंत राहिलेच पाहिजेत, असेंच मला वाटतें. दैत्य जगले म्हणजे देवहि सावध राहतील, देव असले म्हणजे मनुष्य यज्ञादि श्रुतिस्मृति प्रतिपादित क्रिया करूं लागतील व कर्में सुरू झालीं म्हणजे ह्या संसाराचा गाडा अव्याहत चालू राहील. यास्तव मी अगोदर रसातळांत जाऊन प्रल्हादाला सावध करतो आणि त्याची पुन्हां राज्यपदावर स्थापना करतो. कारण प्रल्हादानें कल्पपर्यंत जिवंत रहावें अशी परमेश्वरानें पूर्वी करून ठेवलेली निश्चित योजना आहे. वास्तविक जगताचे उदय आणि अस्त हें जरी माझ्या दृष्टीनें सारखेच आहेत तरी जी स्थिति आहे ती तशीच चालू ठेवणें इष्ट आहे. असलेली स्थिति बदलण्यापासून काय फायदा आहे !

यावर कोणी असें म्हणेल, योगनिद्रेचें अनिर्वचनीय सुख टाकून

प्रऱ्हादाच्या नगरांत जाण्याचा एवढा खटाटोप तरी मी काय म्हणून करावा ? परंतु ही शंका बरोबर नाहीं. जगताची उत्पत्ति, अनुत्पत्ति, नाश किंवा स्थिति यांच्याप्रमाणें योगनिद्रेनें सुख आणि गमनाचे श्रम हीं सुद्धां माझ्या दृष्टीनें सारखींच आहेत. कारण जो प्रयत्न अबुद्धिपूर्वक, अर्थात् अभिनिवेशरहित होत असतो, तो योगस्थितीमध्येंच होतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं. यास्तव मी आतां पाताळांत जाऊन त्या दैत्येंद्र प्रऱ्हादाला जागृत करतों. परंतु मी पाताळांत गेलों तरी अज्ञ जनांप्रमाणें संसारलीला न करितां आपल्यास्वरूपामध्यें अचलच राहीन.

## प्रऱ्हादाची समाधि उतरली

असा विचार करून तो सर्वात्मा श्रीहरी क्षीरसागरांतून निघून प्रऱ्हादाच्या नगरांत आला व त्यानें त्याच्या राजवाड्यांत शिरून आपल्या सुवर्णमंदिरामध्यें समाधि लावून बसलेल्या प्रऱ्हादाला पाहिलें. त्या वेळीं भगवान् श्रीहरि गरुडावर बसले होते, त्यांच्यावर लक्ष्मी चवरी वारीत होती, त्यांच्या हातांत शंख चक्रादि आयुधें होतीं आणि सर्व देव, ऋषी व मुनी त्यांस वंदन करीत होते. नंतर भगवान् प्रऱ्हादाजवळ गेले व म्हणाले 'हे महात्मन् ! जागा हो' असें म्हणून त्यांनीं आपला पांचजन्य नांवाचा शंख वाजविला. त्याबरोबर दशदिशा दणाणून गेल्या. त्या प्रचंड आवाजानें प्रऱ्हादाचें ठिकाणीं प्राणाचें पुनरुज्जीवन झालें; व तो हळु हळु जागा होऊं लागला. ब्रह्मरंध्रापासून उत्थान पावलेली प्राणशक्ति एका क्षणांत त्याच्या सर्व शरीरांत पसरली व त्याची चित्‌शक्ति सर्व इंद्रियांमध्यें पसरून ती चेत्योन्मुख झाली. तेव्हां आरशामुळें मुखश्री दोन रूपें धारण करते, त्याप्रमाणें विषय आणि मन या दोन रूपांनीं ती भासमान होऊं लागली. चित्ताचा अंकुर उत्पन्न झाल्यामुळें त्याचे डोळेहि हळु हळु उघडू लागले. प्राण व अपान या वायूंची गति सुरू झाली व त्यांनीं शरीरांतील सर्व नाड्या जागृत झाल्या व वायूनें जसें कमल हालतें त्याप्रमाणें त्याच्या देहांत हालचाल उत्पन्न झाली. पुढें निमेषमात्रांत मनाची खळबळ सुरू झाली. नंतर त्याचे नेत्र, मन, प्राण पूर्णपणानें विकास पावून प्रऱ्हाद शोभूं लागला. त्या प्रऱ्हादास भगवान् म्हणाले.

श्रीभगवान्—प्रल्हादा! सावध हो, ऊठ. वा साधो, तूं आपली राज्य-लक्ष्मी व आकृति यांचें स्मरण कर. अकालींच तूं आपल्या देहाचा नाश काय म्हणून करतोस. त्याज्य आणि ग्राह्य ह्या भावनांनीं तूं रहित असल्यामुळें इष्ट व अनिष्ट वस्तूंच्या प्राप्तीनें तुझी कोणती लाभहानि होणार आहे? म्हणून बा प्रल्हादा! ऊठ. जीवन्मुक्त दशेंत उद्वेगरहित राहून तुलीं कल्पांतापर्यंत हें राज्य आणि त्यांतील सर्व व्यवहार केले पाहिजेत. ही तुझी तनु ज्ञानसंपन्न आणि अत्यंत शुद्ध असून कल्पपर्यंत राहून जीवन्मुक्तीचें सुख भोगणारी आहे. तरी कल्पान्तीं नाश पावणाऱ्या या तनूचा तूं आजच नाश काय म्हणून करतोस? तूं जीवन्मुक्त आहेस. यास्तव, बा प्रल्हादा! तूं सर्व प्रारब्धाचा क्षय होईपर्यंत वासनारहित बुद्धीनें झोपेंतून अर्धवट जागा झालेल्या मनुष्याप्रमाणें व्यवहार कर आणि राज्य करून प्रजापालन कर. दानवेश्वरा! ऊठ आणि सिंहासनावर बस म्हणजे मी स्वतः तुला राज्याभिषेक करतों तसेंच माझ्या पांचजन्य शंखाचा शब्द ऐकून या ठिकाणीं जमलेले हे सिद्ध आणि देवगण तुझें मंगल करतील.

## प्रल्हादाचा राज्याभिषेक

असें म्हणून त्या श्रीहरीनें प्रल्हादास सिंहासनावर बसविलें. नंतर श्रीभगवान् विष्णूंनीं आज्ञा केल्यावरून त्या ठिकाणीं क्षीरसागरादि सर्व सागर, गंगा आदिकरून सर्व नद्या आणि तीर्थें आलीं व त्यांतील उदक घेऊन संपूर्ण ब्राम्हण, ऋषी, देव, सिद्ध, विद्याधर व लोकपाल यांसह-वर्तमान श्रीविष्णूंनीं प्रल्हादाला राज्याभिषेक केला; आणि नंतर त्याला आशीर्वाद दिला कीं,

श्रीभगवान्—प्रल्हादा! पृथ्वी, मेरुपर्वत व चंद्रसूर्य कायम आहेत तोंपर्यंत सर्वगुणांनीं संपन्न असलेला तूं या राज्याचा अखंड उपभोग घे. इष्टानिष्ट फलांचा त्याग करून देशकालानुरूप निग्रह अनुग्रह वगैरे ज्या ज्या क्रिया अवश्य केल्या पाहिजेत, त्या त्या यथायोग्य करीत जा. मात्र त्या करीत असतां रागद्वेषांना आपल्या मनांत थारा देऊं नकोस. अशा रीतीनें तूं राज्य करूं लागलास म्हणजे दानवांना मुळींच दुःख होणार नाहीं व मज-कडून त्यांचा नाश करविण्याचा देवानांहि प्रसंग येणार नाहीं. अशा तऱ्हेनें

आजपासून देवदानवांचें युद्ध थांबल्यामुळें सर्व जगतांत शांतता पसरेल. यास्तव कामादि षड्रिपूंचा आपल्यावर पगडा बसणार नाहीं, अशा तऱ्हेनें वागून या राज्यलक्ष्मीचा तूं चिरकाल उपभोग घेत रहा.

याप्रमाणें बोलून श्रीभगवान् विष्णु प्रल्हादाच्या मंदिरांतून निघून परत क्षीरसागरांतील आपल्या शेषासनावर आरूढ झाले. इंद्र स्वर्गांत निर्भय राहिला, प्रल्हाद पाताळांत शांतपणानें जीवन्मुक्तस्थितींत राज्य करूं लागला व सर्व त्रिभुवनांत स्वस्थता व शांतता नांदू लागली.

तात्पर्य:—परमेश्वराला अनन्यभावानें शरण जाऊन त्याला प्रसन्न करून घेतलें कीं त्याच्या प्रसादानें आत्मविचार सुचून आत्मज्ञानाची प्राप्ति होते. यावरून आत्मज्ञान होण्याला स्वतःच्या प्रयत्नाची आणि विचाराची आवश्यकता आहे, यांत शंका नाहीं. ईश्वर जरी अतीशय प्रसन्न झाला तरी तो एकदम अविचारी व आळशी मनुष्याला आत्मज्ञान देत नाहीं, तर तो आपल्या भक्ताला प्रल्हादाप्रमाणें आत्मविश्रांति दायक विचार सुचण्याविषयीं वर देतो; या विचाराच्या योगानें आपल्या भक्तानें ज्ञान संपादन करून मुक्त व्हावें व प्रयत्नाशिवाय कोणालाहि आत्मज्ञानाचा लाभ होऊं नये, अशीच त्या परमेश्वराची इच्छा आहे, यांत मुळींच शंका नाहीं.

---

## (२०) गाधी ब्राह्मणाची गोष्ट.

**जगन्मायाप्रपंचस्य वैचित्र्यप्रतिपत्तये ॥**
**इतिहासमिमं वक्ष्ये शृणुष्वावहितोऽनघ ॥ ५-४३-२**

( या जगद्रूप मायाप्रपंचाचें वैचित्र्य तुझ्या बुद्धीवर चांगलें आरूढ व्हावें, यासाठीं मी तुला हा ( गाधीब्राह्मणाचा ) इतिहास सांगत आहे; तरी तो लक्षपूर्वक ऐक )

या पृथ्वीच्या पाठीवर ' कोसल ' नांवाचा एक देश आहे. तेथें गाधी या नांवाचा एक मोठा विद्वान् आणि बुद्धिमान् ब्राह्मण रहात होता.

एकदा कांहीं इष्टकार्याच्या निमित्तानें आपले बांधव सोडून देऊन तपश्चर्या करण्याकरितां तो अरण्यांत निघून गेला. त्या अरण्यांत एका सरोवरामध्यें श्रीविष्णूचें दर्शन होईपर्यंत तप करण्याचा निश्चय करून त्या सरोवरांतील पाण्यांत आकंठ बुडून राहिला. अशा स्थितींत आठ महिने लोटले, तरी विष्णूचें दर्शन न झाल्यामुळें गाधी अगदीं खिन्न झाला. तरी त्यानें आपला निश्चय सोडला नाहीं. पुढें त्या गाधीच्या उग्र तपश्चर्येनें संतुष्ट होऊन भगवान् त्याच्यापुढें प्रकट होऊन म्हणालेः—

श्रीभगवानः—हे श्रेष्ठ ब्राह्मणा! पाण्यांतून बाहेर ये. तुझ्या तपाचें फल मिळण्याची वेळ प्राप्त झाली आहे. यास्तव तुला वाटेल तो वर माझ्यापासून मागून घे.

गाधीः—भगवान्! जगांतील असंख्य प्राण्यांच्या हृत्कमलामधील जणुं भ्रमर आणि त्रिभुवनरूपी कमलिनीचें जणुं सरोवर अशा आपणाला माझा नमस्कार असो. भगवंता! आपल्या स्वरूपामध्यें भासमान होणारी आणि सर्व जगाला भ्रम उत्पन्न करणारी आपली माया पहावी अशी माझी इच्छा आहे. तरी ती माया मला कृपाकरून दाखवावी हीच माझी आपल्याला प्रार्थना आहे.

भगवान्—गाधे! माझी माया तूं पाहशील व पाहिल्यानंतर तूं तिचा त्यागहि करशील.

असें म्हणून भगवान् अंतर्धान पावले. नंतर तो ब्राह्मण पाण्यांतून वर आला व श्रीहरीच्या दर्शनानें त्याला अतीशय आनंद झाला. त्या आनंदांत आपलीं ब्रह्मकर्में करण्यांत त्या ब्राह्मणाचे कांहीं दिवस गेले. पुढें एकदां प्रफुल्लित कमलांनीं भरलेल्या त्या सरोवरामध्यें गाधि ब्राह्मण स्नान करण्यास उतरला असतां भगवान् श्रीविष्णूंनीं 'तूं माझी माया पहाशील' असा जो वर दिला होता, त्याचें स्मरण झालें; नंतर स्नान करितांना त्यानें हातांत दर्भ घेऊन 'सकल दुरित परिहारार्थ' अघमर्षण मंत्राचा जप करीत दर्भानें पाणी फिरविण्यास सुरवात केली. इतक्यांत त्याच्या बुद्धीला भ्रंश झाला व प्रणवादिमंत्रांचें विस्मरण होऊन त्याला पाण्यामध्यें पुढील विलक्षण प्रकार दिसूं लागला.

## गाधीनें पाहिलेली माया

आपला देह आपल्या घरांत मरून पडला असून भोंवताली आप्तेष्टांची रडारड सुरू झाली आहे, असें त्याला दिसलें. त्याची पत्नी त्याच्या पायापाशीं बसून मोठमोठ्यानें रडूं लागली. त्याची माता त्याची केंसाळ हनुवटी कुरवाळीत त्याच्या जवळ बसली होती. नंतर त्या दुःखाच्या रडारडींत त्याच्या आप्तांनीं त्याचें प्रेत स्मशानांत नेलें. तेथें त्यांनीं चिता पेटवून त्या गाधी ब्राह्मणाच्या शवाचें दहन केलें.

नंतर त्या गाधी ब्राह्मणास आपल्या कलंकित झालेल्या बुद्धीमुळें आपल्याच ठिकाणीं असें दिसलें कीं, भूतमंडल देशाच्या सीमेवरील एका गांवाच्या बाहेरील महारवाड्यांत आपण एका चांडाल स्त्रीच्या उदरांत प्रवेश केला आहे. गर्भवासांत असतांना फार क्लेश झाले. पुढें योग्य कालीं त्या चांडाल स्त्रीला काळाकुट्ट असा एक मुलगा झाला. त्या चांडालाच्या गृहांत तो मुलगा वाढतां वाढतां बारा वर्षांचा झाला, पुढें तो सोळा वर्षांचा झाला. तेव्हां त्याचें शरीर काळ्या मेघाप्रमाणें घट्टपुष्ट झालें. पुढें त्याला एका काळ्याकुट्ट चांडाल कन्येनें वरलें. त्या चांडाल कन्येच्या ठिकाणीं त्याला अनेक मुलगे झाले. याप्रमाणें पुत्र कलत्र संपन्न असलेला तो चांडाल तारुण्य संपून हळु हळु म्हातारा झाला. तेव्हां त्यानें गांवापासून दूर अंतरावर एक झोपडी बांधली व तींत तो एखाद्या मुनीप्रमाणें राहूं लागला. पुढें दुर्दैवानें त्या चांडालाचें कुटुंबांतील माणसें एकामागून एक मृत्यूनें ओढून नेलीं. त्यामुळें त्या चांडालास फार दुःख झालें. तेव्हां तो आपला देश सोडून फार दूरच्या कीर नांवाच्या देशांतील राजधानीस प्राप्त झाला व राजमार्गाच्या मध्यमार्गी येत आहे तों त्या राजधानींत रत्नखचित अलंकार घालून शृंगारलेला एक मोठा धिप्पाड हत्ती आपल्या समोरून येत आहे, असें त्याला दिसून आलें. त्या देशाचा राजा मरण पावल्यामुळें दुसऱ्या राजाची निवड करण्याकरितां तो मंगलकारक हत्ती राजमार्गांतून इतस्ततः संचार करीत होता. त्या हत्तीनें त्या चांडालाला निरखून पाहिलें व नंतर आपल्या सुंदर सोंडेनें त्यास उचलून आपल्या गंडस्थळावर नेऊन बसविलें त्याबरोबर जिकडे तिकडे मंगलवाद्याचे जय-

गाधि ब्राह्मण आहे, मला आतां तर्पणादि कार्ये केलीं पाहिजेत, स्वप्नांत पाहिलेलें तें राज्य माझें नव्हे.' अशा विचार करून तो उदकांतून बाहेर आला व पुनः आपल्याशींच विचार करूं लागला:–' मी नुकतीच पाहिलेली माता व प्रिया कोठली ? माझे आईबाप तर लहानपणींच निवर्तले व मी स्वतः अविवाहित असून अद्याप पावेतों स्त्रीचें मुखावलोकनहि केलें नाहीं ! मी आपल्या मृत्यूची जी स्थिति पाहिली, ती केवळ मायेनें निर्माण केलेली भ्रांति असून त्यांत सत्याचा लवलेशहि नाहीं. यास्तव असल्या भ्रमासंबंधानें विचार करीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. अशा रीतीनें विचार करून त्यानें आपल्या मनांतील मोहाला पार झुगारून दिलें व त्यानंतर कित्येक दिवसपर्यंत तो आपल्या आश्रमांतच राहिला.

पुढें एके दिवशीं त्या गाधि ब्राह्मणाकडे एक अतिथि आला. त्या अतिथीचें गाधि ब्राह्मणानें उत्तम फळें, फुलें व पेय देऊन आदरातिथ्य केलें. पुढें सायंकाळ होतांच त्या दोघांनीं आपलें संध्यावंदन आणि जपजाप्य संपवून निजण्याची तयारी केली. त्या दोघांच्या मध्यें आपआपल्या तपश्चर्यादिकासंबंधानें गोष्टी सुरू झाल्या. प्रसंगवशात् गाधीनें त्या अतिथीला प्रश्न केला, ' महाराज ! आपण इतके कृश कां दिसतां ? व आपल्याला एवढे श्रम कशानें झाले ? ' गाधीचा तो प्रश्न ऐकतांच अतिथीनें उत्तर देण्यास सुरवात केली.

अतिथिः––गाधे ! या भूतलावर उत्तर दिशेस कीर नांवाचा विख्यात व धनाढ्य देश आहे. तेथें मी एक महिनाभर राहिलों होतों. तेथील लोकांनीं माझा मोठा सन्मान केला. त्याठिकाणीं रहात असतां एकदां एका मनुष्यानें संभाषणाच्या ओघांत मला एक विचित्र कथा सांगितली. तो म्हणाला:––' ब्राह्मणा ! येथें कांहीं दिवसांपूर्वी एक चांडाल राजा होऊन गेला व त्यानें या राजधानींत आठ वर्षे राज्य केलें ! ' हें त्याचें भाषण ऐकून ती गोष्ट खरी कीं खोटी यासंबंधाचा निर्णय करण्याकरितां त्या राजधानींतील आबालवृद्धांना मी त्यासंबंधानें प्रश्न केला, तेव्हां सर्वजण सांगूं लागले कीं, ही गोष्ट खरी आहे, आमच्या देशांत एका चांडाल राजानें आठ वर्षे राज्य केलें. इतकेंच नव्हे, तर पुढें ती गोष्ट उघडकीस

आल्यामुळें त्यानें अग्निकुंडांत उडी टाकून आत्महत्या केली. याप्रमाणें सर्वांच्या मुखांतून खरी हकीगत कळतांच मीहि त्या देशांतून निघालों आणि प्रयागावर जाऊन चांद्रायण प्रायश्चित्त केलें. याप्रमाणें तीन चांद्रायणें करून आजच पारणें केलें व यामुळें मी इतका कृश आणि श्रांत झालों आहे.

याप्रमाणें गाधीनें ब्राह्मणाच्या तोंडून ती हकीगत ऐकल्यानंतर त्या संबंधानें त्याला पुनः पुनः प्रश्न केले. परंतु त्यानें प्रत्येक वेळीं तीच हकीगत सांगितली. तेव्हां गाधीच्या मनाची खात्री झाली; ती सर्व रात्र त्यानें आश्चर्यचकित होऊन त्याच विचारांत घालविली. दुसरे दिवशीं सकाळीं त्या अतिथीनें गाधीचा निरोप घेऊन प्रयाण केलें. नंतर गाधीनें विस्मययुक्त मनानें आपल्याशींच विचार करण्यास सुरवात केली.

गाधिः—' मी जें भ्रमांत पाहिलें तेंच या ब्राह्मणानें साक्षात् पाहिल्याचें मला आतांच सांगितलें; मग काय ही शंबरासुराची माया म्हणावी कीं काय म्हणावें ? मी आपल्या घरामध्यें मरून पडलों आहे, असें जें पाहिलें तो निव्वळ भ्रम आहे, यांत मुळींच शंका नाहीं. आतां या अतिथीच्या चांद्रायणाला निमित्तभूत असलेला चांडाल वृत्तांत खरा कीं खोटा, एवढाच काय तो प्रश्न आहे. परंतु ह्या संबंधाचा शोध केल्यास त्याचा खरेखोटेपणा ताडतां येणें शक्य आहे. तर आतां मी त्या भूतमंडलनामक गांवाच्या बाहेर असलेल्या महारवाड्यांत जाऊन या गोष्टीची शहानिशा करितो म्हणजे झालें.

अशा रीतीनें विचार करून लागलीच हां हां म्हणतां अनेक देश उल्लंघून तो गाधि ब्राह्मण भूतमंडल देशांत जाऊन पोहोंचला. त्या भूतमंडल देशाच्या टोंकाला तो महारवाडा दिसला व स्वप्नांत पाहिल्याप्रमाणें त्याला त्या ठिकाणीं सर्व खाणाखुणा जशाच्या तशा दिसल्या तेथें त्यानें पूर्वी पाहिलेलें आपलें घर पाहिलें. तेव्हां त्याला चांडालयोनींत घडलेल्या सर्व गोष्टी आठवल्या, तेथील ग्रामस्थांना हकीकत विचारतां त्यांनीं गाधीनें स्वप्नामध्यें जें पाहिलें होतें तें जसेंच्या तसें इत्थंभूत सांगितलें, तें ऐकून आणि स्वप्नांत पाहिलेल्या सर्व खाणाखुणा गाधीला पटून मोठा विस्मय

घोष सुरू झाले. " आमच्या राजाचा जयजयकार असो ! " असा जयजयकाराचा प्रचंड ध्वनि सर्व दशदिशामध्यें दुमदुमून गेला. नंतर त्याचा बहुमान करण्याकरितां पुष्कळ सुंदर स्त्रियांनीं त्याला वरलें. पुढें अष्टप्रधानांनीं त्याला सिंहासनावर बसवून ब्राह्मणांकडून राज्याभिषेक करविला. अशारीतीनें त्या चांडालाला कीरदेशाचें राज्य अनायासानें प्राप्त झालें. त्या नगरांतील सुंदर स्त्रिया आपल्या कोमल हातांनीं त्याचे पाय चुरण्यांत गढून गेल्या. लवकरच त्याचें राजतेज चोहोंकडें पसरूं लागलें, सर्व मांडलिक राजे त्याची आज्ञा शिरसावंद्य मानूं लागले.थोडक्याच दिवसांत त्याच्या राज्यांत सर्वत्र शांतता आणि सुराज्य नांदूं लागलें व त्याच्या मंत्रिमंडलानें सर्व राज्यकारभार उचलल्यामुळें सर्व राज्य सुव्यवस्थित चालूं लागलें. सारांश, अशारीतीनें गवल या नांवानें तो चांडाल त्या कीरदेशाचें राज्य करूं लागला.

विलासिनी स्त्रियांनीं तो राजा नेहमीं वेढलेला असे; व मंत्रीमंडल त्याची आज्ञा शिरसावंद्य मानीत असत. सर्व मांडलिक राजे त्याला मान देत असत. ज्याच्यावर सदा छत्रचामरादि राजचिन्हें ढाळलीं जात आहेत,अशा त्या गवलराजानें त्या कीरलोकांच्या नगरांत मोठ्या आनंदानें आठ वर्षे राज्य केलें. पुढें एके दिवशीं त्यानें कंटाळून आपल्या अंगावरील वस्त्रालंकारादि सर्व भूषणें काढून ठेवून तो राजा राजमंदिराच्या बाहेरच्या अंगणांत एकटाच बसला होता. तेथें त्यानें कांहीं काळेकुट्ट परंतु धष्टपुष्ट चांडाळ पाहिले. ते हातांत तुणतुणें घेऊन गात होते. त्या चांडाळांपैकीं ज्याचें डोळे तांबडे लाल आहेत आणि सर्वांग धुळीनें मलिन झालें आहे;अशा एका वृद्ध चांडालानें त्या राजास ओळखलें व तो राजाजवळ येऊन म्हणालाः–' अरे कटंजा ! तूं इकडे कोठें ? तूं कोठें रहातोस ? फार दिवसांनीं तुझी गाठ पडली. त्यामुळें मला मोठा आनंद झाला आहे. कारण बंधुदर्शनामुळें उत्पन्न होणारा आनंद म्हणजे सर्व प्रकारचे आनंद, सर्व मोठमोठे लाभ आणि सर्वश्रेष्ठ दर्जाच्या विश्रांती यांची परम सीमाच होय." याप्रमाणें तो वृद्ध चांडाल भाषण करीत आहे, इतक्यांत गवल राजानें त्याचा तिरस्कार करून त्याला दाबलें, तेव्हां त्यानें आपलें भाषण बंद केलें; परंतु इकडे राजवाड्याच्या माडीवरील खिडक्यां-

तून पहाणाऱ्या राजस्त्रिया आणि प्रधान यांच्या दृष्टीस तो सर्व प्रकार पडला व आपला राजा कटंज नांवाचा चांडाळ आहे, असें समजतांच त्या सर्वांचीं तोंडें खरकन् उतरलीं. पुढें ती वातमी सर्व शहरभर हां हां म्हणतां पसरली व त्या वातमीनें सर्वांचीं मुखें म्लान झालीं. पुढें राजा अंतःपुरांत शिरला परंतु तेथील सर्व सुंदर स्त्रियांचीं मुखें उदासीन आणि म्लान झालीं आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. आपला राजा चांडाल आहे असें समजल्यामुळें एखाद्या घरांतील मंडळी शवाला स्पर्श करीत नाहींत त्याप्रमाणें त्या राजाच्या राजवाड्यांत येणारे मंत्री, पौरजन, अंतःपुरांतील स्त्रिया त्याला स्पर्श करीनाशा झाल्या ! त्या राजाचे नोकरचाकर सुद्धां त्याची सेवा चाकरी न करितां त्याच्यापासून दूर दूर राहूं लागले.

अशा रीतीनें राजाची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली. सर्वांच्या मध्यें रहात असून सर्वांनीं टाकल्यामुळें तो एकटाच दिसूं लागला. इकडे पौरजनांची स्थितीहि मोठी चमत्कारिक झाली. सर्वांना असें वाटूं लागलें कीं, ‘ या चांडाळाच्या सहवासांत आमचीं पुष्कळ वर्षें निघून गेलीं असल्यामुळें सामान्य प्रायश्चित्तानें आमची शुद्धि होणार नाहीं; या करितां अग्निकाष्ठें भक्षण करणें हा शुद्ध होण्याचा एकच मार्ग आहे ’ असा मनानें निश्चय करून त्या नगरांतील प्रधान, नागरिक वगैरे सर्वांनीं ठिकठिकाणीं शुष्क काष्ठें आणून चिता तयार केल्या आणि त्यांवर आरोहण करून आपणांस जाळून घेतलें. राजाची बुद्धि सज्जनांच्या सहवासानें पवित्र झालेली असल्यामुळें तो शोकानें व्याकुळ झाला व आपल्या मनांत म्हणाला कीं, “ माझ्यामुळें हा सर्व अनर्थ गुदरला आहे. मग आतां मला तरी जिवंत राहून काय करावयाचें आहे ! मरण हेंच मला महोत्सवाप्रमाणें प्रिय आहे. अशा निश्चय करून त्या गवल राजानें अग्निकुंड तयार केलें व आपल्या शरीराची आहुति दिली. त्यावेळीं त्याला जो अग्नीचा चटका बसला त्या योगानें त्याच वेळीं तिकडे सरोवराच्या पाण्यामध्यें अघमर्षण करीत असलेला गाधि ब्राह्मण त्या दीर्घस्वप्नांतून एकाएकी जागा झाला.

अशा तऱ्हेनें चार घटकांच्या अवधीनंतर गाधीचा भ्रम नष्ट झाला व तो आपल्याशींच म्हणाला. ‘ स्नानाकरितां या सरोवरांत उतरलेला मी

वाटला. नंतर तो त्या भूतमंडल प्रदेशांतून निघून कीर देशाच्या संपन्न राजधानींत जाऊन पोहोंचला. तेथील अनेक पदार्थ आणि स्थानें आपण पूर्वी पाहिल्याचें त्याला आढळून आलें. तेथील खाणाखुणा त्याला बरोबर पटल्या. तसेंच त्यानें तेथील लोकांकडून त्या नगरींत एक चांडाल राजा झाल्याचा सर्व वृत्तांतहि ऐकला. तोहि तंतोतंत त्यानें भ्रमांत पाहिलेल्या वृत्तांताप्रमाणेंच होता. मग तो गाधि ब्राह्मण आपल्याशीं म्हणालाः— 'पूर्वी स्वप्नामध्यें पाहिलेला हा सर्व देखावा सध्यां जागृतीमध्यें माझ्या डोळ्यासमोर दिसत आहे. हें सर्व मायेचें दीर्घ स्वप्न कोणी आणि कां निर्माण केलें आहे कोण जाणे! माझें मन एखाद्या वेडगळ पोराप्रमाणें भ्रमांतील गोष्टींना सत्य मानून चाललें आहे! हां! आतां सर्व आठवलें. मजवर प्रसन्न झालेल्या श्रीविष्णूनें पूर्वी वर दिल्याप्रमाणें ही आपली भयंकर माया मला दाखविली, असा विचार करून त्या नगरांतून तो गाधि ब्राह्मण निघून आपल्या नेहमीच्या पर्वतावरील गुहेंत सिंहाप्रमाणें जाऊन बसला. तेथें रोज चुळकाभर पाणी पिऊन त्या महातेजस्वी ब्राह्मणानें भगवान् विष्णूचा प्रसाद व्हावा म्हणून दीड वर्षेपर्यंत घोर तपश्चर्या केली. अखेरीस भगवान् विष्णु त्याच्यावर प्रसन्न झाले व गाधीच्या पुढें येऊन म्हणालेः— "गाधे! माझी महाभयंकर माया पाहिलीस ना? मग तूं हें तप कशाकरितां करीत आहेस? तुझी आणखी कांहीं इच्छा आहे कीं काय?"

याप्रमाणें भाषण करणाऱ्या श्रीविष्णूला अवलोकन करतांच त्या द्विजश्रेष्ठ गाधीनें अर्घ्य, पाद्य, पुष्पें यांनीं मोठ्या भक्तीनें त्या श्रीहरीचें पूजन केलें व हात जोडून श्रीहरीशीं भाषण करण्यास सुरवात केली.

गाधिः—भगवन्! ही घोर माया आपण मला दाखविली, परंतु तिचें खरें तत्त्व मला समजलें नाहीं. मी पाहिलेला भ्रम खरा कसा ठरला तें मला सांगा.

भगवानः— गाधे! हा सर्व आपल्या वासनांचा खेळ आहे. तुला जो जगाचा विस्तीर्ण भ्रम दिसला, तो तुझ्या चित्तांतच दिसला. पर्वत, नद्या, समुद्र, वृक्ष इत्यादि जे जे पदार्थ आपल्याला प्रत्यक्ष बाहेर दिसतात, ते ते सर्व आपल्या चित्तांतच असतात.

चित्त हें स्वप्नभ्रमांत वेगवेगळे पदार्थ कसे बनतें, याचा लहाना-
पासून थोरापर्यंत सर्वांना अनुभव आहे. ज्याच्यामध्यें अनंत जगाचें जाळें
पसरलेलें आहे, अशा चित्तानें आपल्या प्रभावानें चांडालत्व प्रकट केलें,
तर त्यांत आश्चर्य तें काय? चांडालत्व जसें भ्रांतीनें तूं अवलोकन केलेस;
तसेंच तुझ्याकडे अतिथि येणें, त्याच्या सहवर्तमान तूं भोजन करणें वगैरे
प्रकारहि भ्रमांतलाच आहे. तसेच स्वप्नांतील गोष्टी कितपत खऱ्या आहेत,
हें पहाण्यासाठीं तुझें भूतमंडलांत जाणें, त्याच्या बाहेरच्या महारवाड्यांत
तूं पाहिलेलें तुझें पडकें घर, तेथील लोकांनीं सांगितलेली कटंजाची हकीगत,
तुझें कीर देशांत गमन, कीर देशांतील लोकांनीं चांडाळ राजा झाल्या-
बद्दल सांगितलेला वृत्तान्त, हा सर्व प्रकार तुझ्या मनाचा भ्रम होता. गाधे!
भूतमंडल देशांत कटंज नांवाचा चांडाल होता व त्याला पुढें राजपद
प्राप्त झालें वगैरे गोष्टी पूर्वीं खरोखरी घडलेल्या होत्या व त्याच कालांतरानें
तुझ्या चित्तांतील संकल्प दोषामुळें तुला अघमर्षण कालीं दिसल्या. एवढेंच
काय तें. फक्त ही पूर्वीं घडलेली हकीगत मी अनुभवीत आहे असा तुला
भ्रम झाला. त्रिकालज्ञ योग्यांना जर भविष्यकाळीं घडणाऱ्या गोष्टी
भूतकालांत घडल्याप्रमाणें दिसूं शकतात, तर बा गाधे! तुला भूत-
काळांतील गोष्टी वर्तमानकाळीं घडत असल्याप्रमाणें दिसल्या तर त्यांत
विशेष काय? आतां या ठिकाणीं तूं कदाचित् असें विचारशील कीं,
'कटंज नांवाचा चांडाल पूर्वीं होऊन गेला असेल, पण तोच मी, असा भ्रम
मला कसा झाला?' परंतु यांत विशेष आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं.
कारण, आत्मज्ञान नसलेले पुरुष आत्म्याहून भिन्न असलेल्या देह, पुत्र,
मित्र, स्त्री इत्यादिकांच्या संबंधानें 'हा मी' आणि 'हे माझे' अशा
तऱ्हेचा मिथ्या अभिमान धारण करतांना दिसतात. मग तुला सुद्धां 'मी
कटंज आहें' व 'हें माझें कुटुंब आहे' असा भ्रम उत्पन्न झाला
त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचें काय कारण? 'मी' आणि 'माझे' हा
अभिनिवेश आत्मज्ञान रहित पुरुषांच्या ठिकाणीं उत्पन्न होतो. आत्म-
वेत्त्यांच्या ठिकाणीं असला भ्रम केव्हांच उदय पावत नाहीं. हे गाधे!
माझ्या या संसाररूपी मायेचा अंत फक्त आत्मचिंतनानेंच होतो. इतर
कोणत्याहि उपायानें होत नाहीं. तुझ्या ठिकाणीं आत्मज्ञानाची परिपक्वता

झालेली नसल्यामुळें तुला आपल्या मनोमोहाचा प्रवाह बंद करतां आला नाहीं. सर्वत्र भ्रमण करणाऱ्या या मायाचक्राचा चित्त हा तुंबा आहे. अर्थात् त्याचें आक्रमण केल्यास ह्या मायाचक्राची गति कुंठित होईल. एकदां चित्ताला स्वाधीन करून घेतलें म्हणजे या मायेची बाधा होण्याचें कारणच उरत नाहीं. याकरितां ऊठ आणि या पर्वतावर दृढ निश्चयानें दहा वर्षेपर्यंत तप कर म्हणजे तुला आत्मज्ञानाची प्राप्ति होईल.

अशा रीतीनें गाधीला उपदेश करून भगवान् विष्णु त्याच ठिकाणीं क्षणांत अंतर्धान पावले. नंतर गाधीनें सुद्धां चित्त नियमनाचा अभ्यास करण्याकरितां विवेकजन्य वैराग्यानें युक्त होऊन ऋष्यमूक पर्वतावर जाऊन सर्व संकल्पांचा त्याग करून दहा वर्षेपर्यंत उत्कृष्ट तप केलें व तेणें-करून त्याला आत्मज्ञान प्राप्त झालें. अशा रीतीनें तो महात्मा गाधि आपल्या पारमार्थिक स्थितीप्रत जाऊन भयशोकरहित होत्साता आत्म-स्वरूपांत रममाण झाला आणि प्रशांत चित्तानें जीवन्मुक्त बनून पूर्ण चंद्राप्रमाणें परिपूर्ण होऊन अपरिच्छिन्न ब्रह्माकाशामध्यें विश्रांति पावला.

तात्पर्यः—याप्रमाणें ही परमात्म्याची माया अति विस्तृत, अचिंत्य आणि महाभयंकर आहे. म्हणून ज्याचें चित्त बेसावध असतें, त्याला ती संकटांत ढकलल्याशिवाय रहात नाहीं. स्वतः भ्रमण करणाऱ्या आणि इतरांना भ्रांतींत पाडणाऱ्या या संसाररूपी मायाचक्राचा चित्त हा मध्यवर्ती तुंबा असून मनुष्यानें दीर्घ प्रयत्नानें आणि बुद्धिसर्वस्व खर्च करून त्या तुंब्याची गति बंद पाडली, म्हणजे या मायाचक्राची गति आपोआप बंद पडते.



## (२१) उद्दालक मुनीची गोष्ट.

श्रृणु राम यथापूर्वं भूतवृंदविचारणात् ॥
उद्दालकेन संप्राप्ता परमा दृष्टिरक्षता ॥ ५-५१-७

(पंचमहाभूतांसंबंधानें सूक्ष्म विचार करून उद्दालकानें परमोच्च तत्त्वज्ञान-दृष्टि आपल्या अंगीं कशी बाणवून घेतली, या संबंधाचा जो प्राचीन वृत्तान्त मी तुला सांगत आहे, तो एकाग्र चित्तानें ऐक.)

## उद्दालक मुनीची गोष्ट.

गंधमादन नांवाच्या पर्वतावरील एका सरल नांवाच्या वृक्षाखालीं उद्दालक नांवाचा महाबुद्धिमान् मुनि पौरुष प्रयत्नांच्या योगानें परम पदाची प्राप्ति करून घ्यावी, अशा दृढनिश्चयानें तपश्चर्या करीत बसला होता. त्यानें कित्येक दिवसपर्यंत मोठ्या नेटानें तपश्चर्या चालविली होती; परंतु त्याच्या ठिकाणीं अभिमान वृत्ति असल्यामुळें त्याला परमपदाच्या ठिकाणीं विश्रांति प्राप्त झाली नाहीं. परंतु परमात्मज्ञानाला अनुकूल अशा संस्कारांनीं त्याचें अंतःकरण भरून गेलेलें असल्यामुळें त्यानें आपली तपश्चर्या अव्याहत चालविली होती. पुढें कांहीं काळानें त्याच्या तपश्चर्येचा परिपाक झाल्यामुळें त्याच्या चित्तांत विवेकाचा उदय झाला व तो आपल्या मनाशीं विचार करूं लागला.

### उद्दालकाचा विचार

उद्दालकः—या जगाला अधिष्ठानभूत असें कोणतें तत्त्व आहे कीं, ज्याच्यामध्यें विश्रांति प्राप्त झाली असतां पुन्हा शोक करण्याचा प्रसंग येणार नाहीं आणि पुनःपुनः जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत भ्रमण करीत राहाण्याचें कारण उरणार नाहीं! माझ्या ठिकाणचे मनोव्यापार अस्तंगत होऊन मी परमपावन अशा पदाच्या ठायीं केव्हां एकदां कायमची विश्रांति घेऊं लागेन? माझ्या मनात एकसारख्या उसळणाऱ्या भोगतृष्णा केव्हां एकदांच्या शांत होतील? इष्ट अनिष्ट, ग्राह्य,त्याज्य इत्यादि मिथ्या भावनांचा सर्वस्वीं त्याग करून मी आपल्या स्वयंप्रकाश आत्मपदाच्या ठिकाणीं केव्हां एकदांचा आनंदानें स्थिर होईन? एखाद्या पर्वताच्या गुहेंत जाऊन माझी मननक्रिया केव्हां बंद पडेल आणि माझें मन निर्विकल्पसमाधीमध्यें स्थिर केव्हां होईल?

अशा रीतीनें चिंतन केल्यानंतर त्या उद्दालक मुनीनें पुनःपुनः ध्यानाचा अभ्यास करण्यास सुरवात केली. परंतु माकडाप्रमाणें चंचल असलेलें त्याचें चित्त पुनःपुनः विषयोन्मुख होऊं लागल्यामुळें त्यानें आपणाकडून त्याला ध्यानामध्यें निमग्न करण्यासाठीं शिकस्त करून पाहिली. तरी त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. यामुळें त्याला समाधीस्थितींतील दिव्यानंद प्राप्त होईना. एखादे वेळीं प्रत्याहारानें बाह्यविषयांचा त्याग करून

त्यानें आपलें चित्त सत्वस्थितीमध्यें स्थिर करण्याचा प्रयत्न करूं लागावें, तों चित्तांत रजोगुणी आणि तमोगुणी वृत्तींचा उदय होऊन तें समाधिस्थितींतून मागें फिरावें, कित्येक वेळां त्याचें चित्तरूपी चंचल माकड सत्त्वस्थितींतून एकदम उडी मारून बाहेर पडे. कित्येक वेळीं योगाभ्यास करीत असतां त्याच्या हृदयांत नुकत्याच उगवलेल्या सूर्याच्या तेजासारखें तेज दिसतें न दिसतें, तोंच त्याचें चित्त विषयोन्मुख होई. केव्हां केव्हां त्याचें मन बाह्य व आंतर विषयांचा त्याग करून अज्ञानांधकार आणि आत्मज्योति यांच्या संधीमध्यें बराच वेळ स्थिर रहात असे, म्हणजे स्वरूपानुसंधान करितां करितां त्याला अखेर गाढ झोंप येई. अशा तऱ्हेनें आपलें मन निरंतर व्यग्र होत आहे, असें पाहून उद्दालक मुनीला अत्यंत खेद झाला व तो त्या गंधमादन पर्वतावर भ्रमिष्टाप्रमाणें एकटाच भटकूं लागला. पुढें भटकतां भटकतां त्याला त्या पर्वतावर एक अत्यंत रम्य अशी गुहा दिसली. तेथें माणसानें जाणें फारच कठीण होतें, ती गुहा म्हणजे प्रत्यक्ष मोक्षदशाच आहे कीं काय असें त्याला वाटलें.

त्या मुनीनें त्या गुहेच्या बाहेरच्या वृक्षावरील ताजी पानें आणून त्यांचें एक मृदु आसन तयार केलें व तें गुहेमध्यें नेऊन ठेवलें व त्यावर एक सुंदर मृगाजिन घातलें. त्या आसनावर तो जाऊन बसला. त्या ठिकाणीं उत्तरेकडे तोंड करून त्यानें पद्मासन घातलें व निर्विकल्प समाधीचा अभ्यास करण्याचा दृढ निश्चय केला. त्यावेळीं विषयामध्यें इतस्ततः संचार करणाऱ्या आपल्या मनोरूपी मृगाला, वासनांमधून परावृत्त करून निर्विकल्प समाधींत राहण्यासाठीं तो त्याला उपदेश करूं लागला.

## उद्दालकाचा मनाला उपदेश

उद्दालकः—बा मूढ मना ! संसारांत व्यर्थ का भटकतोस ? तुला त्यापासून कोणतें फल प्राप्त होणार आहे ? कारण शहाणे पुरुष दुःखदायक गोष्टी करण्यास प्रवृत्त होत नाहींत. ज्ञानरूपी अमृताचा त्याग करून जो मनुष्य भोगाच्या पाठीमागें धावत सुटतो, तो कल्पवृक्षांनीं भरलेलें नंदनवन सोडून विषवृक्षांनीं युक्त असलेल्या अरण्याचा आश्रय करीत आहे, असेंच म्हणण्यास हरकत नाहीं. वेड्या मना ! तू पाताळांत जा कीं ब्रह्मलोकांत

जा, उपदेशरूपी अमृतावाचून तुला निर्वाणाची प्राप्ति केव्हांहि होणार नाहीं, हें पूर्णपणें लक्षांत ठेव. या जगांत इष्टानिष्टरूपी विचित्र विषयसंकल्प तुझ्या तीव्र दुःखालाच कारणीभूत होतात, सुखाला केव्हांहि कारणीभूत होत नाहींत. शब्दादि दुष्ट विषयांच्या मार्गे कां जातोस ? ज्याच्यापासून विदेह कैवल्यसुख किंवा जीवन्मुक्तीचें श्रेष्ठ सुख मिळणार आहे, अशा समाधीच्या अभ्यासाकडे तुझी प्रवृत्ति कां बरें होत नाहीं ? ज्याप्रमाणें एखादें हरिण पारध्याच्या मधुर गीताला भुलून त्यानें पसरलेल्या जाळ्या-मध्यें अडकून पडतें, त्याप्रमाणें आपली वृत्ति बहिर्मुख करून आणि श्रोत्रें-द्रियांशीं तादात्म्य करून तूं विनाकारण आपला नाश करून घेऊं नकोस. ज्याप्रमाणें एखादा रानटी हत्ती पाळून शिकविलेल्या हत्तिणीच्या स्पर्श-सुखानें मोहित होत्साता तिच्या मागोमाग धांवूं लागतो आणि अखेरीस खड्डयांत पडून जसा पकडला जातो, त्याप्रमाणें त्वगिंद्रियाचें सुख प्राप्त करून घेण्याच्या भरीस पडून तूं आपणावर आपत्ति ओढवून घेऊं नकोस. ज्याप्रमाणें एखादा मासा गळाला लावलेल्या मांसाच्या लोभांत गुंतून आपली मान गळांत अडकवून घेतो, त्याप्रमाणें दुष्ट अन्नाच्या लालचीनें अंध बनून तूं आपला नाश करून घेऊं नकोस. बा मूढा! एखादा पतंग दिव्याच्या ज्योतीवर लुब्ध होऊन त्यावर एकदम झडप घालून स्वतःला दग्ध करून घेतो, तद्वत् जगांतील लावण्यावर लुब्ध होऊन तूं आपला नाश करून घेऊं नकोस. तसेंच एखादा भ्रमर सुगंधाच्या लोभानें कमला-मध्यें प्रवेश करून आपल्याला बद्ध करून घेतो, त्याप्रमाणें जगांतील सुगंधी पदार्थांचा उपभोग घेण्यांत दंग होऊन तूं आपल्या स्वतःला ह्या शरीररूपी कमळामध्यें बद्ध करून घेऊं नकोस.

कुरंगालिपतंगेभमीनास्त्वेकैकशोहताः ॥
सर्वैर्युक्तैरनर्थैस्तु व्याप्तस्याज्ञ कुतःसुखम् ॥५-५२-२१

शब्दस्पर्शादि विषय इतके अनर्थ कारक आहेत कीं, त्यांच्यापैकीं एकेका विषयामध्यें आसक्त होणारे हरिण, भ्रमर, पतंग, हत्ती व मासा हे जीव जर नाश पावतात; हे वेड्या ! तूं तर या सर्व विषयांच्या नादीं लागला आहेस, मग तुला सुख कसें मिळेल ?

बा चित्ता ! हें वासनांचें जाळें तुझ्या बंधालाच कारण होत आहे. पण हें वासनाजाल टाकून देऊन जर तूं शांत होशील तर तुझा जयजयकार होईल. अरे ! पण मी तुला हा उपदेश करण्याच्या भानगडींत काय म्हणून पडावें ? तुला जबरदस्तीनें कह्यांत आणून विचारानें तुझा कायमचा क्षय करून टाकणें हेंच युक्त आहे. कारण विचार केल्यावर असें आढळून येतें कीं, चित्त हें खरोखरी नाहींच. म्हणून मी तुझ्या मिथ्या स्वरूपाचा त्याग करतो म्हणजे झालें. अहंकाररूपानें चित्त आहे असें म्हणावें, तर पायाच्या आंगठ्यापासून तों मस्तकापर्यंत सर्व शरीराच्या प्रत्येक लहानमोठ्या भागांत मी शोध करून पाहिला, पण 'अहं' म्हणून कोणी मुळींच सांपडत नाहीं. सर्व दिशांना व्यापून राहिलेला असा एकमेवाद्वितीय संविद्रूप आत्मा या जगांत सर्वत्र पसरलेला आहे असें मला दिसत आहे. तो आत्मा देशकालादिकांनीं मर्यादित होत नाहीं; त्याच्या ठिकाणीं एकता, अनेकता, स्थूलता किंवा अणुता इत्यादि कल्पना मुळींच संभवत नाहींत. हा आत्माच मी आहे व तो संवेदनरूप असल्यामुळें मी तुला साक्षीरूपानें जाणतो व ज्या अर्थी तूं दुःख देण्यालाच कारणीभूत झाला आहेस त्या अर्थी विवेकजन्य बोधानें मी तुला आतां ठार मारणार आहे. ह्या देहांत मांस, रक्त, अस्थि, प्राणवायु वगैरे दिसतात, पण हा अहंकार कांहीं दिसत नाहीं. स्पंद ही प्राणाची शक्ति आहे, ज्ञान ही महाचैतन्याची शक्ति आहे आणि जरामरण हे तर शरीराचे धर्म आहेत. मग हा 'अहं' आहे तरी कोण ? परमार्थ दृष्टीनें पाहिलें तर मन किंवा चित्त म्हणजे 'अहं' नव्हे व आत्मा हा तर शुद्ध चित्स्वरूप असल्यामुळें त्याला अहंकाराचा स्पर्श होणें केव्हांहि शक्य नाहीं. आतां अध्यारोप दृष्टीनें विचार करूं लागलें असतां जें जें इंद्रियगोचर दिसत आहे, तें तें सर्वच तो 'अहं' आहे. परंतु अपवाद दृष्टीनें विचार केल्यास खऱ्या 'अहं' चा कोठेंच पत्ता लागत नाहीं. खरी सन्मय दृष्टि ती हीच असून प्रत्येक देहामध्यें परिच्छिन्नरूपानें असणारा जो 'अहं' ह्याला वास्तविक अस्तित्वच नाहीं. परंतु अरण्यांत एकीकडे सांपडलेल्या हरिण बालकाला एखाद्या उन्मत्त लांडग्यानें घाबरून सोडावें, त्याप्रमाणें मला आजपर्यंत अज्ञानरूपी धूर्त अहंकारानें फसवून अतिशय छळलें आहे, ह्या अज्ञानरूपी चोरानें

माझ्या पारमार्थिक धनाचा इतके दिवस अपहार केला होता व माझे महद्भाग्य म्हणूनच या चोराचें स्वरूप मी आतां बरोबर ओळखलें असून इतःपर मी त्याच्या तावडींत केव्हांहि सापडणार नाहीं. त्याची संगति आतांपर्यंत झाली तेवढी पुरे झाली. यास्तव देहादि मी आहे ही वासना अजिबात टाकून दिली पाहिजे. आतां ही वासना सोडली तर बाह्य वृत्तीचा अभाव होऊन मनुष्याचें जीवितच अशक्य होऊन जाईल. परंतु ही शंका बरोबर नाहीं. कारण हें शरीर चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारें जीवनाला आवश्यक असणारीं सर्व कर्में वासनेच्या साहाय्यावाचून करीत असतें; आणि ज्या क्रिया वासनारहित बुद्धीनें केल्या जातात, त्यांच्या-पासून सुखदुःखादि भयंकर दशा केव्हांहि भोगाव्या लागत नाहींत. यास्तव, बा चित्ता ! मूर्ख इंद्रियें आणि वासना यांचा अजिबात त्याग करून स्वभावतः प्राप्त होणारीं कर्में तूं करीत जा. म्हणजे तुला केव्हांहि दुःख भोगावें लागणार नाहीं.

आतां मी संकल्परूपी वृक्ष आणि त्यावरील तृष्णारूपी लता तोडून टाकून हें मनोरूपी अरण्य साफ करून टाकतों आणि अशा रीतीनें त्या विस्तृत भूमीमध्यें सुखानें विहार करतो. मी आतां त्या परमपदाप्रत जाऊन पोहोंचलों आहे. मी केवळ आत्मस्वरूप बनलों आहे, मी विजयी झालों आहे, मी शांत, निराश, निरिच्छ आणि निर्वासन झालों आहे. ज्याप्रमाणें तिळांतून तेल काढलें म्हणजे त्या तेलाचा आणि तिळांचा कांहीं संबंध उरत नाहीं, त्याप्रमाणें मन इंद्रियें व देह यांचा आणि माझा आतां मुळींच संबंध राहिलेला नाहीं. सारांश, सर्व विषयासंबंधाचे राग, द्वेष आणि त्यांच्यापासून उद्भवणारीं सुखदुःखें हीं माझ्या मनांतून आतां अजिबात नाहींशीं झालीं आहेत. यास्तव मोहरहित, निर्मनस्क आणि विकल्परहित झालेला मी, सर्व दृश्यभावांचा त्याग करून आपल्या निर्मल आत्मस्वरूपामध्यें आतां कायमची विश्रांति घेतो.

## उद्दालकाचा समाधीचा अभ्यास

अशा रीतीनें आपल्या शुद्ध आणि उदार बुद्धीनें विचार करून तो उद्दालक मुनि आपले नेत्र अर्धोन्मीलित करून पद्मासन घालून बसला व

उच्च स्वरानें ध्वनि ब्रह्मरंध्रापर्यंत जाईल इतक्या मोठ्यानें ' ॐ ' काराचा उच्चार करण्यास त्यानें सुरुवात केली. तो आवाज घंटेतील लोळा हलविल्यामुळें निघणाऱ्या आवाजाप्रमाणें निघत होता. जीवचैतन्य ब्रह्मचैतन्याशीं एकरूप होण्याला सन्मुख होईपर्यंत त्यानें 'ॐ' काराचा उच्चार चालविला. ' ॐ 'कारामधील साडेतीन मात्रांपैकीं पहिल्या मात्रेचा म्हणजे अकाररूपी उदात्त मात्रेचा उच्चार करितांच त्याचा प्राणवायु मूलाधारापासून निघून ओठापर्यंत येई व त्यामुळें अगस्ति मुनीनें प्राशन केलेला सागर ओकून टाकावा, त्याप्रमाणें त्याच्यातील प्राणवायूचा रेचक होई. याप्रमाणें प्राणवायु बाहेर निघून ब्रह्मचैतन्यानें भरलेल्या बाह्य आकाशांत जाऊन राही. रेचकानें हृदयांत उत्पन्न होणारा अग्नि त्याच्या सर्व शरीराला जाळून टाकी. ' ॐ ' कारामधील अकाराचा उच्चार करीत असतां त्या मुनीची स्थिति भावनेमुळें अशा प्रकारची होऊन जाई. त्याकरितां त्यानें हटयोगांतील प्राणायामाचा अभ्यास केला होता असें नाहीं. कारण हटयोग हा दुःखप्रद आहे. ' ॐ 'कारामधील दुसऱ्या उकाररूपी अनुदात्त मात्रेचा उच्चार करीत असतां एखाद्या घटांतील उदकाप्रमाणें त्याच्या प्राणवायूचा आपोआप कुंभक होई. तेव्हां त्याचा प्राणवायु, बाहेर, आंत, खालीं, वर इतर ठिकाणीं जात नसे तर स्तंभित केलेल्या पाण्याप्रमाणें तो क्षुब्ध होऊन जाई व त्यामुळें उत्पन्न होणारा अग्नि एका क्षणांत शांत होऊन जाई, परंतु त्यामुळें आपल्या शरीराचें शुभ्र भस्म झालें आहे, असें त्याला आढळून येई. ही उद्दालक मुनीची कुंभकस्थितीहि केवळ भावनेमुळें होऊन जाई. आतां ' ॐ ' कारामधील तिसऱ्या ' म ' या शांतिप्रद अक्षराचा उच्चार करतांच त्याच्या शरीरांतील प्राणवायूचा पूरक होई. यावेळीं त्याचें प्राण भावनेनें चैतन्यांतील अमृत स्वरूपाच्या मध्यभागीं स्थित होत व वेगेंकरून वर्फाचा स्पर्श होतांच अंगाला शीतलता येते त्याप्रमाणें त्याचे प्राण शांत होऊन जात व हळु हळु गगनमध्यांतून चंद्रमंडलरूप बनत. तेथून ते प्राणवायु अमृतधारा बनून शंकराच्या मस्तकावरून पडणाऱ्या आकाशगंगेप्रमाणें त्याच्या शरीराच्या अवशिष्ट असलेल्या भस्मावर येऊन पडत. त्यामुळें उद्दालक मुनीचें शरीर चतुर्भुज, नारायणात्मक बनलें व चंद्रबिंबाप्रमाणें सुंदर झालें. नंतर त्या अमृतमय प्राणांनीं

त्यांचें शरीर व्यापून टाकलें व नंतर त्यांनीं कुंडलिनीला जागृत करून सुषुम्ना नाडीलाहि भरून टाकलें,

तदनंतर त्या उद्दालक मुनीनें पद्मासनावर स्थिर होऊन एखाद्यानें उन्मत्त हत्तीला खांबाला बांधून टाकावें त्याप्रमाणें त्यानें आपल्या ज्ञानेंद्रियांना आंवरून निर्विकल्प समाधीमध्यें स्थिर होण्याकरितां प्रयत्न चालविले. मनोरूपी चंचल भ्रमरास त्यानें हृदयरूपी कमलांत बलात्कारानें निरुद्ध केलें. बांध घातल्यानें पाणी जसें कोंडलें जातें, तसें मन अडकून राहिलें. त्यानें आपलें नेत्र अर्धोन्मीलित केले. त्यामुळें त्याच्या डोळ्यांतील बुबुळें निश्चल झालीं. मौन धारण करून त्यानें आपल्या प्राणापान वायूचा प्रवाह सौम्य केला, इंद्रियें विषयापासून मागें खेचलीं. सर्व बाह्य विषयांचा त्याग केल्यामुळें सर्व इंद्रियांनीं आपल्या वृत्ती सोडून तीं अंतर्मुख झालीं. ज्याप्रमाणें एखाद्या पाण्यानें भरलेल्या घटाचें फडक्यानें तोंड बांधून तो उलटा टांगून ठेवला असतां पाणी बाहेर पडत नाहीं, त्याप्रमाणें त्यानें आपल्या पाठीचा कणा ताठ करून मूलाधाराचा अवष्टंभ केला व अशा रीतीनें आपल्या शरीरांतील नऊ द्वारामधील वायूचें आकर्षण करून त्यांना आपल्या हृदयांत स्थिर केलें. प्रत्याहारादि उपायांच्या योगानें त्यानें आपल्या मनाला वश करून हृदयांत स्थिर केलें. अशा रीतीनें चित्त प्रसादामुळें ब्रह्मरूप स्थितीप्रत जाऊन पोहोंचल्यानंतरहि त्याच्या चित्तांत मधूनमधून विपरीत भावना उदय पावत, परंतु आपल्या ब्रह्माकार वृत्तिप्रवाहाचा विच्छेद करणाऱ्या त्या विकल्पांचा तो तत्काल निरास करी. अशा रीतीनें सर्व विक्षेपांना छिन्नभिन्न करून टाकल्यानंतर तमोगुणरूपी अंधकारानें आच्छादित झालेला आणि चंचल वृत्तिरूपी काजळीच्या योगानें कलंकित झालेला विवेकरूपी सूर्य त्याला हृदयाकाशांत दिसूं लागला. परंतु लगेच अंतःकरणांत सत्त्वगुणाच्या भावना करून सम्यक्‌ज्ञानाच्या योगानें त्यानें त्या तमोगुणाचा निरास केला. पण त्याला पुनः आपल्या हृदयाकाशांत सत्त्वगुणरूपी तेजाचा विशाल पुंज दिसूं लागला. पण लगेच अभिज्ञान दत्त्वाच्या दर्शनाच्या अभ्यासानें त्या तेजोभ्रमालाहि त्या मुनीनें बाधित केलें. पुढें रजोगुणाच्या योगानें समाधींतून वारंवार चाळवलें गेलेलें मन अखेरीस गाढ निद्रासुख अनुभवूं लागलें. परंतु त्या निद्रेचाहि त्यानें क्षणांत

नाश केला. पुढें त्याचें मन मूढ झालें. परंतु रात्रीच्या वेळीं पृथ्वीवर उत्पन्न झालेल्या अंधकाराचा सूर्यानें निरास करावा, तद्वत् त्या मोहादादि त्या बुद्धिमान् उद्दालकानें निरास केला. अशा क्रमानें तम, तेज, निद्रा मोह इत्यादि वृत्तींचें परिमार्जन केल्यानंतर त्याचें मन क्षणभर निर्विकल्प समाधीच्या अनिर्वचनीय स्थितीमध्यें विश्रांति पावलें. परंतु क्षणांत तें मन बाह्य प्रपंचाकार झाले. लगेच त्यानें आपल्या संविस्कलेला स्वस्वरूपामध्यें पुन्हां स्थिर करण्याचा प्रयत्न केला व त्यानें बहुत काळ ध्यानाचा अभ्यास केलेला असल्यामुळें आणि निर्विकार समाधीतील आनंद त्याला अनुभूत असल्यामुळें त्याचें मन हळु हळु सुवर्ण जसें अलंकाराच्या स्थितीप्रत जाऊन पोहोंचावें त्याप्रमाणें चिद्रूप झालें. घटांतील चिखल शुष्क होऊन तो घट-रूप बनावा, तद्वत् त्याचें चित्त इंधनरहित अग्नीप्रमाणें क्षीण होत होत अखेर दूध आणि पाणी यांच्या अखंडैक्याप्रमाणें * चिदेकरस बनलें. अशा रीतीनें त्याच्या चित्ताचा चित्तभाव नाहींसा होऊन तरंगादि भेदांचा नायनाट करून समुद्रानें जलाचें सामान्य रूप धारण करावें, त्याप्रमाणें त्याच्या चित्तातील चित्प्रतिबिंब चिद्बिंब स्थितीप्रत जाऊन पोहोचलें. सारांश, निर्विकल्प समाधीचा परिपाक झाल्यामुळें ज्यामधील सर्व द्वैताभास अस्तंगत झाला आहे, अशा सर्वाधिष्ठानभूत शुद्ध चिदाकाशाच्या अत्युच्च स्थितीप्रत तो जाऊन पोहोचला व त्या स्थितीमध्यें ब्रह्मादिदेवांना प्राप्त होणाऱ्या नित्य निरतिशय आनंदाचा तो जणु अनंत सागरच बनून सत्तासामान्यरूप बनला. अखेरीस आत्मानुभवाच्या अद्वितीय व अनिर्वचनीय स्थितीप्रत जाऊन पोहोंचला व आनंदसागरांत स्थिर झाला. तेव्हां तो शरद्कालाच्या पूर्ण चंद्राप्रमाणें शोभूं लागला. अशा तो उद्दालक मुनि निर्वात प्रदेशांतील दीप, चित्रांतील मूर्ति, निस्तरंग समुद्र किंवा पर्जन्यवृष्टीनंतर जल नाहींसें

---

* दुधाचा काढा करण्याचे वेळी जितकें दूध तितकेंच पाणी घालीत असतात, काढा तयार होण्यापूर्वी दुधाचें व पाण्याचें जें ऐक्य होत असतें त्यास **खंडैक्य** असें म्हणतात. काढा तयार झाल्यावर म्हणजे पाणी आटून गेल्यावर जें ऐक्य होत असतें, त्यास **अखंडैक्य** असें म्हणतात.

झाल्यामुळें मूक वृत्ति धारण करणारा मेघ त्यांच्याप्रमाणें शांत आणि स्थिर दिसूं लागला.

### उद्दालकाला सिद्धींची प्राप्ति

अशा त्या दिव्य स्थितीमध्यें पुष्कळ काल लोटल्यानंतर आकाशांत संचार करणारे सिद्ध, विद्याधर व देव यांचे संघच्या संघ त्याच्या दृष्टीस पडले. ते सिद्धसमूह, तसेच अप्सरांचे गण त्याच्या भोंवती जमा झाले; व इंद्र, सूर्य इत्यादि श्रेष्ठ लोक प्राप्त करून देणाऱ्या सिद्धी त्याच्यापुढें हात जोडून उभ्या राहिल्या. परंतु त्या ब्रह्मज्ञान संपन्न उद्दालकानें त्या सिद्धिजा-लाकडे ढुंकून सुद्धां पाहिलें नाहीं. त्या मुनीनें त्या गुहेमध्यें समाधीस्थितींत सहा महिने घालविले. समाधीचें विसर्जन केल्यावर त्यानें आपल्या भोंवती सिद्ध, विद्याधर व विद्याधरी पाहिल्या. ते सर्वजण त्या महात्म्या उद्दालक मुनीला म्हणाले:–" भगवन् ! आमच्याकडे कृपादृष्टीनें अवलोकन करा. आपण या विमानांत बसा व स्वर्गलोकीं चला. कारण जगांतील श्रेष्ठ भोग स्वर्गलोकीं मिळतात. तेथें आपणास आवडतील असे भोग कल्पपर्यंत खुशाल भोगीत रहा." असें त्यांचें भाषण ऐकून उद्दालकमुनीनें त्या सिद्धादि अतिथींचें यथासांग पूजन केलें. परंतु त्यांनीं केलेलें स्वर्गाचें वर्णन ऐकून त्याच्या मनावर मोहाचा यत्किंचित् सुद्धां पगडा बसला नाहीं. त्या सिद्धगणाला उद्देशून तो फक्त इतकेच म्हणाला कीं, 'अहो सिद्धानो ! आपण आतां येथून गमन करावें,' असें बोलून तो मुनि लगेच निर्विकल्प समाधीमध्यें स्थिर झाला. अशा रीतीनें विषयोपभोगांबद्दल पूर्णपणें विरक्त झालेल्या त्या उद्दालकमुनीची कांहीं दिवस सेवा केल्यानंतर ते सिद्धहि तेथून निघून गेले.

### उद्दालकाचें निर्वाण

पुढें तो उद्दालकमुनि जीवन्मुक्त स्थितींत राहून वनांत मुनींच्या आश्रमांत त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें पुष्कळ काळ काढला. त्यावेळीं कधीं कधीं एक दिवसभर, कधीं महिनाभर, तर कधीं वर्षभर तो समाधींत रहात असे; व तो काळ लोटल्यानंतर समाधींतून जागा होई. चित्तत्वाचा अभ्यास

दृढ झाल्यामुळें तो मुनि अपरिच्छिन्न चित्स्वरूपास प्राप्त झाला; व पुढें चित्सामान्याच्या चिराभ्यासामुळें तो सत्तासामान्याच्या * स्थितीप्रत जाऊन पोहोचला. जीवन्मुक्तपदाची प्राप्ति झाल्यामुळें त्याचें चित्त शांत झालें व त्याचे सर्व संशय गलित झाले. अशा तऱ्हेचा तो उद्दालक मुनि शरदृतूं-तील आकाशाप्रमाणें शांत, विस्तृत, निरतिशय सुखस्वरूप आणि आवरण-शून्य अशा ब्रह्मभावाच्या स्थितीप्रत जाऊन पोहोचला. अशा रीतीनें पुष्कळ वर्षे या स्थितींत राहिल्यानंतर तो उद्दालकमुनि विदेहस्थितीस प्राप्त झाला. म्हणजे आपल्या आधिभौतिक शरीराचा त्याग करून त्याचे प्राण विमल अशा परमपदीं विलीन झाले व तो ब्रह्मरूप झाला. सारांश, तो मुनि दिशा, काल यांनीं ज्याची परिमिति करतां येत नाहीं, सर्वविश्वव्यापी, वाणीनें ज्याचें वर्णन करता येत नाहीं, सत्य, अमृतमय, अनंत अशा ब्रह्मस्वरूपीं लीन झाला.

तात्पर्यः—उद्दालकमुनीनें आपल्या चित्ताला मोठ्या युक्तीनें उपदेश करून कसें आपल्या ताब्यांत आणलें व नंतर निर्विकल्प समाधीचा कसा अभ्यास केला हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

---

* **चित्सामान्यः**—अंतःकरणामध्यें सर्व प्राणीमात्रासंबंधीं समत्वभाव उत्पन्न होणें, या स्थितीला **चित्सामान्य** असें म्हटलें आहे. (ही स्थिति ज्ञानाच्या सहाव्या भूमिकेवर आरूढ झालेल्या ज्ञानी पुरुषाची असते.)

**सत्तासामान्यः**—या जगांतील सर्व जडचेतनात्मक भूतांचा अत्यंत अभाव आहे. अशी निरंतर भावना करीत गेल्यानें जी स्वतःसिद्ध आणि चित् व अचित् (म्हणजे चेतन व जड) अशा दोहोंमध्ये अनुस्यूत असणारी सत्ता तीच केवल जेव्हां अवशिष्ट रहाते, तेव्हां त्या स्थितीला **सत्तासामान्य** असें म्हटलें आहे. (ही स्थिति ज्ञानाच्या सातव्या भूमिकेवर आरूढ झालेल्या ज्ञानी पुरुषाची असते.)

# ( २२ ) सुरघूची गोष्ट

अत्रैवोदाहरंतीममितिहासं पुरातनम् ॥
किरातेशस्य सुरधोर्वृत्तांतं विस्मयास्मदम् ॥ ५-५८-१

भावार्थः—ही शब्दमयी दृष्टि बोध करून देण्याकरिताच आहे. यासंबंधानें एक पुरातन किरात देशाचा राजा जो पुरुष त्याची गोष्ट सांगितली आहे.

हिमालयपर्वतावर कैलास नांवाचें शिखर आहे. त्याच्या पायथ्याशीं हेमजट नांवाचे किरात रहात असत. त्यांचा सुरघु नांवाचा एक मोठा उदार व पराक्रमी राजा होता. देवासारखया बलाढ्य शत्रूंचा गर्व हरण करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं होतें. एकदां त्या राजास असें वाटलें कीं, "ही माझी प्रजा अगोदरच दुःखानें पिडित झालेली असून घाण्यामध्यें घातलेल्या तिळांप्रमाणें मी तिला आणखी पिळून काढावी, हें सर्वथा अनुचित आहे! माझ्या राजशासनानें माझ्याप्रमाणेंच ह्या सर्व प्राण्यांना दुःख होत असलें पाहिजे. तरी हें माझें उग्र शासन पुरें झालें! परंतु दुसऱ्या दृष्टीनें विचार केला असतां प्रजांना यथान्याय शासन करणें हें माझें कर्तव्य असून तें मला केलेंच पाहिजे. कारण निग्रहावांचून प्रजा आपल्या मर्यादेमध्यें रहाणें केव्हांहि शक्य नाहीं, अशा तऱ्हेचे विचार मनांत येऊन यापुढें आपण कसें वागावें त्याविषयीं त्याचें चित्त आंदोलन पावूं लागल्यामुळें त्याला समाधान वाटेना. अशा स्थितींत कांहीं दिवस निघून गेल्यानंतर एकदा मांडव्यऋषी त्याचेकडे आले. राजानें त्या मुनींची यथाविधि पूजा करून विचारलें,

सुरघुः—हे मुने! आपल्या आगमनानें मला आज अतिशय आनंद झाला आहे. आपण माझ्याकडे कृपादृष्टीनें अवलोकन करीत असल्यामुळें मी आज मोठा धन्य झालों आहे. आपण सर्व धर्म जाणणारे असून आत्मपदीं विश्रांति घेत आहां, यास्तव माझ्या मनांत आलेला संशय कृपा करून नाहींसा करावा, अशी माझी आपणास सविनय प्रार्थना आहे. कारण महात्म्यांचा सहवास घडला असतां कोणत्या पुरुषाचें दुःख नाहींसें होत नाहीं? ज्ञाते लोक असें समजतात कीं, संशय उत्पन्न होणें याच्यासारखें

भयंकर संकट या जगांत दुसरें कोणतेंच नाहीं. निग्रहा-नुग्रहानें माझ्या प्रजेस पीडा होत आहे व ही पीडा माझ्या मनाला त्रास देत आहे. म्हणून म्हणतों कीं, माझ्या ठिकाणीं सूर्याप्रमाणें समता कशी उत्पन्न होईल, तें सांगा.

मांडव्यः—राजा ! आपल्या स्वतःच्या प्रयत्नानें मनाची संशयवृत्ति वर्फाप्रमाणें पार वितळवून टाकतां येते. आत्मविचाराच्या योगानें मनोज्वर लवकरच शांत होतो. यास्तव " मी कोण आहे ? हें सर्व जगत् कसें उत्पन्न झालें आहे ? मरण आणि जन्म यांची उत्पत्ति कशी होते ? " या प्रश्नांचा तूं आपल्या मनाशीं नीट विचार कर. म्हणजे तुझ्या मनाचा मल नाहींसा होईल. अशा तऱ्हेनें आत्मविचारानें तुझें मन सम आणि शांत झालें, म्हणजे तें निर्विकार होऊन ब्रह्मपदीं स्थिर होईल. परंतु जोंपर्यंत परमात्म्याचा साक्षात् अनुभव येऊन तुला त्याचें सर्वत्र दर्शन होऊं लागलें नाहीं, तोंपर्यंत अखिल विषयांचा अंतःकरणानें त्याग करणेंच अत्यंत आवश्यक आहे. कारण सर्व वस्तूंचा त्याग केल्यावरच आत्मा शिल्लक रहातो. अशा तऱ्हेचें उपनिषदांतहि " निषेधावधिभूतं ब्रह्म " असें सांगितलें आहे. शुद्ध सोनें मिळविण्याकरितां त्यांत मिसळलेल्या रुपें वगैरे इतर धातूंचा संशोधनानें त्याग करावा लागतो, मग आत्मलाभाच्या बाबतींत सर्व वस्तूंचा त्याग केल्यावाचून कसें भागेल ? सारांश, बा सुरघो ! कार्यकारण परंपरेनें संबद्ध असलेल्या ह्या जगामध्यें जी जी वस्तु भासमान होत आहे ती ती मनानें केवळ आपल्या कल्पनेनें निर्माण केली आहे. असें जाणून सर्व दृश्य विषयांचा त्याग कर; व नंतर मूल अज्ञानासह त्या शुद्ध मनाचाहि निरास कर, म्हणजे जें शिल्लक राहील तेंच ब्रह्मस्वरूप होय.

अशा रीतीनें मांडव्यऋषींनीं त्या सुरघु राजाला उपदेश केला आणि आपल्या मुनिमंडलाप्रत निघून गेले. नंतर तो राजाहि एकांतस्थानीं जाऊन बसला व आपल्या आत्मस्वरूपासंबंधानें विचार करूं लागला.

## सुरघूचा विचार

सुरघुः-मी हस्तपादादि युक्त देह खास नव्हे; बारकाईनें विचार करूं

पहातां अस्थि, मांस व रक्त ह्या जड द्रव्यांनीं बनलेला हा देह जडच आहे. म्हणून हा देह मी नाहीं. मी कर्मेंद्रियें नाहीं व कर्मेंद्रियेंहि माझीं कोणीं नाहींत. तसेंच ज्ञानेंद्रियें सुद्धां जड असल्यामुळें तीं मी नव्हे व तीं माझीं नव्हेत. या संसृतिदोषाचें मूळ जें मन तेंहि जड असल्यामुळें मी नव्हे. तसेंच बुद्धि आणि अहंकार हीं सुद्धां मनाचींच भिन्न रूपें असल्यामुळें तीं मी नव्हे. सारांश, या शरीरापासून तों तहत मन व ज्ञानेंद्रियें इत्यादिकांपर्यंत जो स्थूल व सूक्ष्म भूतांचा संघात आहे, तोहि अनित्यस्वरूपाचा असल्यामुळें मी नव्हे. आतां या सर्वांच्या पलीकडे असणारें जें जीवतत्त्व तें सचेतन आहे. ह्या जीवाला जें ज्ञान होतें, तें त्रिपुटीमय असतें व तेंहि त्रिपुटीच्या पलीकडील तत्त्वांच्या प्रेरणेमुळेंच होतें. अर्थात् जीव हा अशा रीतीनें परावलंबी असल्यामुळें जीव हें आत्म्याचें तात्त्विक स्वरूप असणें संभवनीय दिसत नाहीं. तसेंच चेत्य म्हणजे विषय हेंहि माझें स्वरूप असणें शक्य नाहीं. यासाठीं मी या सर्वांचा आतां त्याग करतो. अशा रीतीनें अनात्म विषयांचा निरास केल्यानंतर जें अवशिष्ट रहातें, तें विकल्परहित आणि शुद्ध असें साक्षितत्त्व हेंच आत्मस्वरूप, असा माझा आतां निश्चय झाला आहे. ह्या माझ्या अनंत आत्मस्वरूपाचा केव्हांहि नाश होणें शक्य नाहीं. ब्रह्मादि देव व इतर सर्व भूतगणांमध्यें मोत्यांच्या माळेंतील तंतूप्रमाणें हा मी भगवान् आत्मा भरून राहिलो आहे; अहो! मी आतां अज्ञान निद्रेंतून जागा झालों असून माझें संसाररूपी दुःस्वप्न अजीबात नष्ट झालें आहे. सारांश, आत्मदृष्टीनें हें सर्व जग जर मिथ्या ठरतें, तर प्रजेचा निग्रहानुग्रह आणि तज्जन्य हर्ष व शोक यांना तरी सत्यत्व कोठून असणार? अर्थात् ह्या सर्व कल्पना निराधार आहेत, यांत तिळमात्र शंका नाहीं. मी पूर्वीं मोहानें ग्रस्त झालों होतो; परंतु आतां सुदैवानें माझा तो मोह अस्तंगत झाला आहे. अहाहा! मी आतां चांगला जागा झालो असून मला सम्यक् (खरें) ज्ञान झालें आहे. एवंच माझी चित्तशुद्धि होऊन मी अवस्थात्रयाच्या पलीकडे जाऊन पोहोंचल्यामुळें आणि माझ्या ठिकाणच्या भवभ्रमाचा संपूर्ण निरास झाल्यामुळें, मला अखंड ज्ञानसमाधि प्राप्त झाली आहे. अशा रीतीनें मी आत्मस्वरूपीं तद्रूप होऊन शांति सुखाचा अनुभव घेत रहातों.

अशा रीतीनें तो सुरघु केवळ विवेकाच्या बळावर आत्मपदाला जाऊन पोहोंचला. म्हणूनच त्या राजावर कितीहि अनर्थकारक प्रसंग ओढवले, तरी तो राजा आपलीं राजकार्यें करीत असतां खिन्न होईनासा झाला. त्या दिवसापासून तो निग्रहानुग्रहादि सर्व व्यवहार करीत असतांहि तो मनानें अगदीं निर्विकार आणि शांत राहूं लागला. अशा रीतीनें त्या सुरघूला सहजसमाधीची स्थिति प्राप्त होऊन तो जीवन्मुक्त स्थितींत आनंदानें व्यवहार करूं लागला.

त्याचा परिघ नांवाचा एक परम मित्र होता. हा परिघ पारसीक नांवाच्या देशाचा एक मोठा पराक्रमी राजा होता. रथाला ज्याप्रमाणें परिघ म्हणजे आस आधारभूत असतो त्याप्रमाणें आपल्या देशाचा आधारस्तंभ असल्यामुळें तो परिघ या नांवानें लोकांत विख्यात झाला होता. त्या परिघाच्या राज्यांत एकदां मोठा दुष्काळ पडला, त्यामुळें प्रजा क्षुधेनें व्याकुळ होऊन पटापट प्राण सोडूं लागली. त्या भयंकर संकटापासून परिघ राजाला आपल्या प्रजेचें संरक्षण करितां येईना. मग तो राजा आपलें सर्व राज्य सोडून देऊन वनांत तपश्चर्या करण्याकरितां निघून गेला. त्यानें आपली बुद्धि शांत ठेवून व वाळलेलीं पानें खाऊन पुष्कळ काल तप केलें. तेव्हांपासून त्या परिघ राजास लोक पर्णादि ( पानें खाणारा ) असें म्हणूं लागले. याप्रमाणें एक हजार वर्षें दारुण तपश्चर्या केल्यानंतर दृढ अभ्यासाच्या योगानें त्याची चित्तशुद्धि होऊन त्याच्यावर ईश्वराचा अनुग्रह झाला व त्यामुळें त्याला आत्मज्ञानाची प्राप्ति झाली व तो जीवन्मुक्त झाला. अशा स्थितींत सर्व पृथ्वीवर शांतपणानें संचार करीत असतां तो एकदां सुरघूच्या राजमंदिरांत जाऊन पोहोंचला. तेव्हां फार दिवसांनीं भेट झाल्यामुळें दोघांनाहि मोठा आनंद झाला. ते दोघेहि ब्रह्मज्ञानसंपन्न असल्यामुळें एकमेकांना भेटतांच त्यांनीं एकमेकांची यथाविधि पूजा केली. " आज फार दिवसांनीं आपली अकस्मात् भेट झाल्यामुळें माझें पुण्यच फळाला आलें असें मी समजतों !" अशा शब्दांनीं त्यांनीं परस्परांचा गौरव केला व त्यांनीं एकमेकांना मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें नंतर ते दोघे ब्रह्मनिष्ठ जेव्हां एका आसनावर विराजमान झाले, तेव्हां ती चंद्रसूर्याची जोडी एकाच वेळीं भूतलावर अवतीर्ण झाली आहे की काय; असा भास झाला.

परिघः—मित्रा ! तूं जसें ज्ञान प्राप्त करून घेतलें आहेस, तसेंच मीहि तपश्चर्येनें ज्ञानप्राप्ति करून घेतली आहे. तूं राजा असल्यामुळें प्रजेसंबंधाचीं आपलीं अवश्य कर्तव्यें समदृष्टीनें करतोस ना ? तुझी प्रकृति ठीक आहे ना ? सकृद्दर्शनीं रमणीय भासणाऱ्या परंतु परिणामीं प्राप्त करणाऱ्या विषयसर्पाच्या संबंधानें तुझें मन विरक्त आहे ना ? मित्रा ! या संसारांत जें जें कर्म केलें जातें, तें तें ज्ञानसमाधीच्या योगानें ज्याचें चित्त शांत झालें आहे, अशा पुरुषालाच सुख देण्याला कारणीभूत होतें, अज्ञ मनुष्यांना सुख देण्याला कारणीभूत होत नाहीं. यास्तव मी विचारतों कीं, संसारांतील सर्व विक्षेपदुःखांचा निरास करणाऱ्या आणि व्यवहारांतील सर्व सुखाहून श्रेष्ठ सुखाची प्राप्ति करून देणाऱ्या निर्विकल्प समाधीचा तू अभ्यास करतोस ना ?

## सहजसमाधीचें स्वरूप

सुरघुः—मित्रा ! जो पुरुष आत्मज्ञानी आहे, तो व्यवहार करीत असो किंवा नेहमीं स्वस्थ बसलेला असो, तो समाधि स्थितीमध्यें नसतो, असें कसें म्हणतां येईल ? ज्ञानसंपन्न असल्यामुळें तो जगांतील क्रिया करीत असला तरी नित्य आत्मनिष्ठ असतो, त्यामुळें तो सदैव समाधिसुखांतच असतो. एखादा पुरुष आसन घालून बसला व त्यानें ब्रह्मांजलि* जरी केली असली, तथापि जर त्याचें चित्त शांत आणि स्थिर नसेल, तर त्याची ती स्थिति समाधीची आहे, असें तरी कसें म्हणावयाचें ? कारण आत्मतत्त्वाचा बोध सर्व आशारूपी तृणाला दग्ध करून टाकणारा अग्नि असून समाधिशब्दाचा अर्थहि असाच आहे. समाधि ( सम्+आ+धा ) म्हणजे परमात्मस्वरूपीं स्थिर असणें असाच अर्थ ज्ञाते पुरुष करतात. नुसतें स्वस्थ बसणें म्हणजे समाधि असा अर्थ कोणीहि करीत नाहींत. जी बुद्धि नेहमीं तृप्त असून जिला आत्मस्वरूपाचें अखंड अनुसंधान असतें, त्या पराप्रज्ञेलाच समाधि हें श्रेष्ठ नांव ज्ञानी पुरुषांकडून दिलें जातें. जी बुद्धि केव्हांहि क्षुब्ध होत नाहीं, जी नेहमीं निरहंकार असते, जिला सुखदुःखादि-

---

* ब्रह्मांजलिः—ब्रह्मादिदेवांना प्रणाम करण्याकरितां हात जोडून बसणें, याला ब्रह्मांजलि असें म्हटलें आहे.

अशा रीतीनें तो सुरघु केवळ विवेकाच्या बळावर आत्मपदाला जाऊन पोहोंचला. म्हणूनच त्या राजावर कितीहि अनर्थकारक प्रसंग ओढवले, तरी तो राजा आपलीं राजकार्यें करीत असतां खिन्न होईनासा झाला. त्या दिवसापासून तो निग्रहानुग्रहादि सर्व व्यवहार करीत असतांहि तो मनानें अगदीं निर्विकार आणि शांत राहूं लागला. अशा रीतीनें त्या सुरघूला सहजसमाधीची स्थिति प्राप्त होऊन तो जीवन्मुक्त स्थितींत आनंदानें व्यवहार करूं लागला.

त्याचा परिघ नांवाचा एक परम मित्र होता. हा परिघ पारसीक नांवाच्या देशाचा एक मोठा पराक्रमी राजा होता. रथाला ज्याप्रमाणें परिघ म्हणजे आस आधारभूत असतो त्याप्रमाणें आपल्या देशाचा आधारस्तंभ असल्यामुळें तो परिघ या नांवानें लोकांत विख्यात झाला होता. त्या परिघाच्या राज्यांत एकदां मोठा दुष्काळ पडला. त्यामुळें प्रजा क्षुधेनें व्याकुळ होऊन पटापट प्राण सोडूं लागली. त्या भयंकर संकटापासून परिघ राजाला आपल्या प्रजेचें संरक्षण करितां येईना. मग तो राजा आपलें सर्व राज्य सोडून देऊन वनांत तपश्चर्या करण्याकरितां निघून गेला. त्यानें आपली बुद्धि शांत ठेवून व वाळलेलीं पानें खाऊन पुष्कळ काल तप केलें. तेव्हांपासून त्या परिघ राजास लोक पर्णादि ( पानें खाणारा ) असें म्हणूं लागले. याप्रमाणें एक हजार वर्षें दारुण तपश्चर्या केल्यानंतर दृढ अभ्यासाच्या योगानें त्याची चित्तशुद्धि होऊन त्याच्यावर ईश्वराचा अनुग्रह झाला व त्यामुळें त्याला आत्मज्ञानाची प्राप्ति झाली व तो जीवन्मुक्त झाला. अशा स्थितींत सर्व पृथ्वीवर शांतपणानें संचार करीत असतां तो एकदां सुरघूच्या राजमंदिरांत जाऊन पोहोचला. तेव्हां फार दिवसांनीं भेट झाल्यामुळें दोघांनाहि मोठा आनंद झाला. ते दोघेहि ब्रह्मज्ञानसंपन्न असल्यामुळें एकमेकांना भेटतांच त्यांनीं एकमेकांची यथाविधि पूजा केली. " आज फार दिवसांनीं आपली अकस्मात् भेट झाल्यामुळें माझें पुण्यच फळाला आलें असें मी समजतों !" अशा शब्दांनीं त्यांनीं परस्परांचा गौरव केला व त्यांनीं एकमेकांना मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें नंतर ते दोघे ब्रह्मनिष्ठ जेव्हां एका आसनावर विराजमान झाले, तेव्हां ती चंद्रसूर्यांची जोडी एकाच वेळीं भूतलावर अवतीर्ण झाली आहे की काय; असा भास झाला.

तात्पर्यः—सहजसमाधीचें खरें स्वरूप काय असतें तें ह्या गोष्टींत स्पष्ट दाखविलें आहे. अशा तऱ्हेची समाधि ज्याला प्राप्त झालेली असते त्यांनें निग्रहानुग्रहासारखी कृत्यें केलीं तरी त्यांपासून त्याला सुखदुःख प्राप्त होत नाहीं.

## (२३) भास आणि विलास यांची गोष्ट

अत्रैवोदाहरंतमिमितिहासं पुरातनम् ॥
संवादं सुहृदोः सह्यसानौ भास विलासयोः ॥ ५-६५-४,

**भावार्थः**—मनानेंच मनाचा नाश करून अहंता व ममता यांचा निरास करून मानवानें जर आत्मज्ञान संपादन करण्याचा प्रयत्न केला नाहीं, तर त्याचें दुःख कधींहि नाहींसें होत नाहीं व त्याच्यावर अनंत आपत्ती येऊन कोसळतात. याविषयीं भास व विलास यांची गोष्ट सांगितली आहे.

सह्याद्रि पर्वताच्या शिखरावर उत्तरेच्या बाजूला अत्रि ऋषीच्या आश्रमांत दोन तपस्वी रहात होते. त्या दोघा तपस्व्यांना तेथें रहात असतांना भास आणि विलास या नांवाचे दोन मुलगे झाले. पुढें क्रमाक्रमानें ते दोघे मुलगे लहानाचे मोठे झाले. त्या दोघांचें एकमेकावर अत्यंत प्रेम होतें. त्या दोघांच्या विचारांत इतकें विलक्षण साम्य होतें कीं, एकच मन दोन शरीरांत राहिलें आहे कीं काय, असा भास होत असे. पुढें कांहीं कालानें त्या दोघांचें आईबाप आपल्या देहाचा त्याग करून स्वर्गलोकाला निघून गेले. नंतर त्या दोघांनीं त्यांची और्ध्वदेहिक क्रिया केली व नंतर त्यांच्याकरितां पुष्कळ शोक केला. नंतर आपल्या आईबापांच्या विरह दुःखानें विरक्त होऊन त्या दोघांनीं त्या ठिकाणीं उग्र तपश्चर्या करण्यास सुरवात केली. पुष्कळ दिवस तपश्चर्या केल्यानें त्या दोघांचीं शरीरें शुष्क झालीं. परंतु इतक्या दीर्घकाल तपश्चर्या करूनहि त्यांना आत्मज्ञान झालें नाहीं. एकेवेळीं ते दोघेजण एकत्र जमले असतां त्यांनीं आपापसांत येणेंप्रमाणें भाषण करण्यास सुरवात केली.

द्वंद्वाची बाधा होत नाहीं; जिची स्थिति मेरुपर्वतापेक्षांहि स्थिर आहे, त्या स्थिर बुद्धीलाच समाधि असें म्हणतात. ज्याच्या मनाची स्थिति नेहमीं चिंतारहित असते, ज्याच्या सकल कामना तृप्त झालेल्या असतात, ज्याच्या ठिकाणीं ' हें ग्राह्य ' व ' हें त्याज्य ' ही भावना मुळींच शिल्लक राहिलेली नसते, अशा पूर्ण स्थितीला समाधि हें नांव देण्यांत येतें. काल जसा आपल्या गतीला विसरत नाहीं, त्याचप्रमाणें ज्ञान्याच्या बुद्धीला आपल्या स्वानुभूत आत्मस्वरुपाचें विस्मरण होणें केव्हांहि शक्य नाहीं. आतां खुद्द माझ्या स्वतः संबंधानें विचारशील, तर मी सर्वदा प्रबुद्ध, निर्मल आणि शांतचित्त असून माझ्या सहजसमाधीमध्यें केव्हांहि व्यत्यय येत नाहीं. आत्मस्वरुपाव्यतिरिक्त या जगांत दुसरी कोणतीच वस्तु नाहीं. असा माझा अखंड अनुभव असल्यामुळें माझ्या समाधीचें व्युत्थान कोणत्याहि काळीं होऊं शकत नाहीं. म्हणून म्हणतों कीं, माझें मन कोणत्याहि काळीं समाधिरहित स्थितीमध्यें नसतें. तत्त्वदृष्टीनें विचार करितां एकटा आत्माच काय तो असून तो सर्वव्यापी आत्माच सर्वथा सर्वकालींहि आहे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें समाधि कशाला म्हणावयाची आणि असमाधि म्हणजे तरी काय ? यास्तव समाधि आणि असमाधि हा भेदभाव कल्पित असून तूं आतां जें भाषण केलेंस, त्याला वास्तविक कांहींच आधार नाहीं, असेंच म्हणणें रास्त ठरत नाहीं का ?

परिघ:—राजा ! तूं खरोखर ज्ञानी आहेस. तुला ब्रह्मपदाची प्राप्ति झालेली आहे; म्हणून तुझें अंतःकरण अत्यंत शांत आहे. तुझें हें भाषण फारच गंभीर आहे. तूं निर्मल आहेस; तुझा अहंकार नाहींसा झाला आहे. त्यामुळें तुला अत्यंत शोभा आली आहे. फार सांगण्याची काय आवश्यकता आहे ? मन सर्व विषयसुखापासून निवृत्त झालें म्हणजे अंतःकरणांत अत्यंत सुखकारक दृष्टि उत्पन्न होते, हीच या जगांतील परमोच्च सुखाची खरीखुरी दृष्टि होय.

अशा रीतीनें सुरघु आणि परिघ यांनीं जगद्भ्रमासंबंधानें चर्चा केल्यानंतर एकमेकांची मोठ्या आदरानें पूजा केली व त्यानंतर ते दोघेजण आपआपल्या पुढील कार्ये करण्याकरितां निघून गेले.

पडलेल्या जीवाला संसारांतून तरून जाण्याला ज्ञानावांचून दुसरा उपाय नाहीं.

---

## (२४) वीतहव्याची गोष्ट.

**अथेमामपरां राम शृणु दृष्टिं पदप्रदाम् ॥**
**मुनिना वीतहव्येन यथास्थितमशंकितम् ॥ ५-८२-३,**

**भावार्थः**—इंद्रियें आणि मन यांचें प्रबोधन करणाऱ्या ज्या ज्ञानदृष्टीच्या योगानें वीतहव्य मुनीनें ब्रह्मपदावर निःशंक आरोहण केलें, त्या ज्ञान दृष्टीचें वर्णन ऐक.

फार दिवसांपूर्वीं वीतहव्य नांवाच्या एका महातेजस्वी मुनीला संसारभ्रम उत्पन्न करणारीं अनेक तऱ्हेचीं कर्में करण्याचा कंटाळा आल्यामुळें एकांतवास पत्करून समाधीचा अभ्यास करावा, अशा विचारानें विंध्य पर्वतावर समाधीचा अभ्यास करण्याकरितां एखादी योग्य गुहा मिळावी म्हणून हिंडतां हिंडतां त्याला हवी होती तशी गुहा मिळाली नाहीं; अखेरीस त्या पर्वतावरील अरण्यामध्यें आपल्याला राहण्याकरितां त्यानें केळीच्या पानांची एक पर्णकुटिका तयार केली. त्या ठिकाणीं सारख्या व शुद्ध केलेल्या भूमीवर कृष्णाजिन पसरून त्या आसनावर बसला. त्यानें पद्मासन घातलें. हाताचीं बोटें पायावर ठेवलीं व आपलें शरीर अचल आणि सरळ ठेवून त्यानें आपली मान किंचित् वर उचलून धरली व इंद्रियांच्या द्वारां दशदिशाकडे फाकलेलें आपलें मन वीतहव्यानें हळु हळु हृदयाचें ठिकाणीं आवरून घेतलें. नंतर विषयोपभोगासंबंधाचे सर्व विचार क्रमाक्रमानें आवरून शुद्ध मनानें वीतहव्य-मुनि विचार करूं लागला.

### वीतहव्याचा विचार

वीतहव्यः—पाण्यामधील तरंगामध्यें फिरणाऱ्या झाडाच्या पानाप्रमाणें अत्यंत चंचल असलेलें हें मन कितीहि आवरून धरलें तरी क्षणभर

विलासः—मित्रा भासा ! तुझें स्वागत असो. तुझा माझा वियोग होऊन फार दिवस झाले. इतके दिवस तूं कोठें होतास ? तुझी तपश्चर्या फलद्रूप झाली आहे ना ? तुझी बुद्धि आतां शोकरहित आणि संतापरहित झाली आहे ना ? तुला एवढया अवधींत आत्मज्ञानाची प्राप्ति झाली आहे ना ? तुझी विद्या सफल झाली आहे ना ? तुझी प्रकृति ठीक आहे ना ?

भासः—मित्रा ! आज तुझें दर्शन झाल्यामुळें मला मोठा आनंद झाला आहे. आतां तूं माझें कुशल विचारलेस पण संसारामध्यें निमग्न झालेल्या आमच्या सारख्यांचें कुशल कसें असणार ? जोंपर्यंत आत्मवस्तूची प्राप्ति झाली नाहीं व चित्तांतील कामसंकल्पादिकांचा अजीबात क्षय होऊन मी संसारसागर तरून गेलों नाहीं, तोंपर्यंत माझें कुशल कसें असणार ? अंतःकरणांत उत्पन्न होणाऱ्या आशांचा जोंपर्यंत उच्छेद करण्यांत आला नाहीं, तोंपर्यंत आमचें कुशल असण्याची गोष्ट सुद्धां बोलावयास नको ! जोंपर्यंत 'त्वं' पदार्थाचें शोधन करून आत्म्याची ओळख पटली नाहीं, जोंपर्यंत चित्तांत समता उत्पन्न झाली नाहीं व महावाक्याचा पूर्ण बोध झाला नाहीं, तोंपर्यंत आमचें कुशल असणें शक्य तरी आहे का ? बा साधो ! अज्ञानरूपी रोगावरील रामबाण औषध असें जें आत्मज्ञान त्याची जोंपर्यंत प्राप्ति झाली नाहीं, तेथपर्यंत ही संसृतिरूपी दुःखकारक महामारी पुनः पुनः उदय पावल्याशिवाय रहाणार नाहीं; सारांश, विलासा ! नानाप्रकारच्या सुखदुःखांनीं भरलेल्या या संसारांत पडल्यामुळें जरा, मरण यांच्या आघातांनीं वरचेवर पीडित झाल्यामुळें मी अत्यंत जर्जर झालों आहे.

अशा रीतीनें संसाराच्या असारतेसंबंधानें त्या दोघांनीं पुष्कळ चर्चा केली. पुढें कालांतरानें त्या दोघांना विमलज्ञानाची प्राप्ति होऊन अखेरीस ते दोघेजण मुक्त झाले.

तात्पर्यः—मनानेंच मनाचा छेद करून आणि अहंममत्वाच्या भावनेचा निरास करून आत्मदर्शन करून घेण्याचा मनुष्यानें प्रयत्न केला नाहीं, तर चित्रांतील सूर्य कधीं अस्तंगत होत नाहीं, तद्वत् जगांतील दुःख नाहींसें होत नाहीं; यावरून असें स्पष्ट दिसून येतें कीं संसारपाशांत अडकून

देखील सर्वतोपरी निर्वाण स्थितीप्रत जाऊन पोहोंचलों आहे, शांत झालों आहे, च संतापशून्य झालों आहे. हें माझें मोठें भाग्यच म्हटलें पाहिजे. मी आतां तुर्यावस्थेस प्राप्त होऊन स्वात्मपदाच्या ठिकाणीं स्थिर झालों आहे.

## वीतहव्याची समाधि

याप्रमाणें निश्चय करून वासनारहित झालेला तो वीतहव्य मुनि विंध्यपर्वतावरील आपल्या पर्णकुटीमध्यें समाधि लावून बसला, त्याच्या चित्तवृत्तीचा स्पंद अजिबात बंद झालेला असून स्वात्मप्रकाशरूपी आनंदाच्या योगानें तो सुंदर दिसत होता; ज्याप्रमाणें काष्ठें जळून गेल्यानंतर त्यांतील अग्नीच्या ज्वाला क्रमाक्रमानें नाहींशा होतात, त्याप्रमाणें त्याचे पंचप्राण आंतल्या आंत शांत झाले. त्याचे नेत्र अर्धोन्मीलित झाले होते. नासिकाग्राच्या ठिकाणीं एकाग्रतेनें अवलोकन करणाऱ्या त्याच्या नेत्रांना अर्धवट उमललेल्या कमलाच्या कळ्यांची शोभा प्राप्त झाली होती. सारांश, शरीर, मस्तक आणि मान अगदीं सरळ रेषेंत ठेऊन बसलेला तो बुद्धिवान् वीतहव्य मुनि एखाद्या पर्वतावरील पाषाणामधून कोरून काढलेल्या प्रतिमेप्रमाणें किंवा चित्रांतील मूर्तीप्रमाणें अगदीं निश्चल दिसत होता. अशा रीतीनें तो वीतहव्य मुनि तीनशें वर्षें समाधि लावून बसला होता, परंतु इतका मोठा काल त्याला एका घटकेप्रमाणें गेला. तो समाधीमध्यें स्थित असतां मेघांचा गडगडाट, अरण्यांतील सिंह, व्याघ्र वगैरे हिंस्र पशूंच्या गर्जना, विजांचा कडकडाट, वगैरे मोठमोठे प्रचंड ध्वनि निर्माण होत असतांहि त्याच्या समाधीचा केव्हांहि भंग झाला नाहीं. त्या तीनशें वर्षांत पावसाळ्यांत चिखलाचे थरावर थर साचत जाऊन त्यामध्यें त्या मुनीचा देह खांद्यापर्यंत रुतून गेला. पुढें तो समाधींतून जागा झाला, परंतु त्याचा देह चिखलांत रुतल्यामुळें त्याला हालचाल करितां येईना. त्याच्या प्राणाचा स्पंद, शरीराचीं सर्व छिद्रें बंद झाल्यामुळें फारच सूक्ष्म झाला होता. केवळ लिंग देहांत असलेल्या संवितमुळेंच त्याच्या देहाचें रक्षण झालें होतें.

## वीतहव्याच्या मनानें घेतलेले विचित्र अनुभव

समाधि उतरल्यावर त्याच्या ठिकाणीं जी जाणीव उत्पन्न झाली तिची हळु हळु वाढ झाली, तिचेंच पुढें मन बनलें. तेंच मन हृदयामध्यें कल्पनेनें

सुद्धां स्थिर होत नाहीं, हें केवढें आश्चर्य आहे ! ज्याप्रमाणें एखादें माकड ह्या झाडावरून त्या झाडावर उड्या मारतें, त्याचप्रमाणें हें मन निरनिराळ्या शब्दस्पर्शादि विषयांवर एकसारखें उड्या मारीत असतें. वाणी, नेत्र, कर्ण, जिव्हा आणि नाक हीं मनाचीं पांच द्वारें आहेत. या हतभागी इंद्रियांनो ! समाधीच्या योगानें आत्मदर्शन करून देण्याचें कामीं मला मदत करण्याला तुम्हांला मुळींच वेळ मिळत नाहीं कां ? नका नका ! अनर्थाला कारणीभूत होणारी चंचलता धारण करूं नका ! तुमचा आणि आत्मस्वरूपाचा बिलकूल संबंध नाहीं. अरे इंद्रियप्रवर्तका ! चारी दिशांना भटकणाऱ्या भिकारड्या मना ! परिणामीं अनर्थालाच कारणीभूत होणारें असें हें कुत्र्यासारखें जगभर भटकणें आतां सोडून दें. मी चेतनरूप आहे, अशी तुला भ्रांति झाली असेल तर ती निखालस खोटी आहे. ती सोडून दे. चिद्रूप आत्मा आणि तूं याचीं स्वरूपें परस्पराहून अत्यंत भिन्न असल्यामुळें तुमचें ऐक्य होणें कालत्रयींहि शक्य नाहीं. अरे मूर्खा ! माझ्यामुळें देह जिवंत आहे, असा तुला अहंकार झाला असेल, तर त्याचा त्याग कर. कारण तो निःसंशय असत्य असून तो तुझ्या दुःखालाच कारण होईल. गाढ झोपेच्या वेळीं तुझें व अहंकाराचें अस्तित्व नसतां जड देह जिवंत रहात असतो, तर तुझा अभिमान व्यर्थच ठरत नाहीं कां ? हे मना ! विषय भोगतांना ' मी भोक्ता आहें ' व कार्य करितांना ' मी कर्ता आहें ' अशा प्रकारची भावना तुला अमृताप्रमाणें गोड वाटत असेल; परंतु परिणामीं ती तुला विषाप्रमाणें दुःखदायकच होईल. तूं कर्ता नाहींस व भोक्ताहि नाहींस, तर तूं जड आहेस. अर्थात् चिदात्म्याच्या ओंजळीनें पाणी पिणारा आहेस. मी जीव आहे, चिदात्मा आहे, ही तुझी व्यर्थ बडबड आहे. तूं अविचारामुळें असें बडबडतोस. अविचार हेंच तुझें खरें स्वरूप होय. आत्मविचार उत्पन्न झाला कीं, तुझा नाशच होईल. आरंभापासूनच तुझें स्वरूप मिथ्या आहे, व मधल्या स्थितींतहि तुझें जें भ्रामक अस्तित्व भासतें, तें विचाराच्या योगानें आतां अजिबात नष्ट झालें आहे. तूं पूर्वी कधीं उत्पन्न झालेलाच नव्हतास, सांप्रतहि तूं विद्यमान नाहींस व पुढेंहि तूं उत्पन्न होणार नाहींस. चित्ता ! ज्या अर्थी आतां विचारानें तुझ्या स्वरूपाचा अंत होऊन तूं आत्मस्वरूपाप्रत जाऊन पोहोंचला आहेस, त्या अर्थी तुझं कल्याण असो ! मी

देखील सर्वतोपरी निर्वाण स्थितीप्रत जाऊन पोहोंचलों आहे, शांत झालों आहे, च संतापशून्य झालों आहे. हें माझें मोठें भाग्यच म्हटलें पाहिजे. मी आतां तुर्यावस्थेस प्राप्त होऊन स्वात्मपदाच्या ठिकाणीं स्थिर झालों आहे.

## वीतहव्याची समाधि

याप्रमाणें निश्चय करून वासनारहित झालेला तो वीतहव्य मुनि विंध्य-पर्वतावरील आपल्या पर्णकुटीमध्यें समाधि लावून बसला, त्याच्या चित्तवृत्तीचा स्पंद अजिबात बंद झालेला असून स्वात्मप्रकाशरूपी आनंदाच्या योगानें तो सुंदर दिसत होता; ज्याप्रमाणें काष्ठें जळून गेल्यानंतर त्यांतील अग्नीच्या ज्वाला क्रमाक्रमानें नाहींशा होतात, त्याप्रमाणें त्याचे पंचप्राण आंतल्या आंत शांत झाले. त्याचे नेत्र अर्धोन्मीलित झाले होते. नासिकाग्राच्या ठिकाणीं एकाग्रतेनें अवलोकन करणाऱ्या त्याच्या नेत्रांना अर्धवट उमल-लेल्या कमलाच्या कळ्यांची शोभा प्राप्त झाली होती. सारांश, शरीर, मस्तक आणि मान अगदीं सरळ रेषेंत ठेऊन बसलेला तो बुद्धिवान् वीतहव्य मुनि एखाद्या पर्वतावरील पाषाणामधून कोरून काढलेल्या प्रतिमेप्रमाणें किंवा चित्रांतील मूर्तीप्रमाणें अगदीं निश्चल दिसत होता. अशा रीतीनें तो वीतहव्य मुनि तीनशें वर्षे समाधि लावून बसला होता, परंतु इतका मोठा काल त्याला एका घटकेप्रमाणें गेला. तो समाधीमध्यें स्थित असतां मेघांचा गडगडाट, अरण्यांतील सिंह, व्याघ्र वगैरे हिंस्र पशूंच्या गर्जना, विजांचा कडकडाट, वगैरे मोठमोठे प्रचंड ध्वनि निर्माण होत असतांहि त्याच्या समाधीचा केव्हांहि भंग झाला नाहीं. त्या तीनशें वर्षांत पावसा-ळ्यांत चिखलाचे थरावर थर साचत जाऊन त्यामध्यें त्या मुनीचा देह खांद्यापर्यंत रुतून गेला. पुढें तो समाधींतून जागा झाला, परंतु त्याचा देह चिखलांत रुतल्यामुळें त्याला हालचाल करितां येईना. त्याच्या प्राणाचा स्पंद, शरीराचीं सर्व छिद्रें बंद झाल्यामुळें फारच सूक्ष्म झाला होता. केवळ लिंग देहांत असलेल्या संवित्मुळेंच त्याच्या देहाचें रक्षण झालें होतें.

## वीतहव्याच्या मनानें घेतलेले विचित्र अनुभव

समाधि उतरल्यावर त्याच्या ठिकाणीं जी जाणीव उत्पन्न झाली तिची हळु हळु वाढ झाली, तिचेंच पुढें मन बनलें. तेंच मन हृदयामध्यें कल्पनेनें

अनेक विचित्र अनुभव घेऊं लागले. कैलास पर्वतावरील सुंदर अरण्यामध्ये कदंब वृक्षाच्या तळाखालीं त्या मुनीनें शंभर वर्षे जीवन्मुक्त स्थितींत घालविलीं. पुढें आणखी शंभर वर्षे त्यानें विद्याधर या नात्यानें आनंदानें घालविली व पुढें पांच युगेंपर्यंत त्यानें इंद्रपदाचा उपभोग घेतला. पुढें एक कल्पपर्यंत तो चंद्रमौली शंकराचा गण होऊन राहिला. हा सर्व वरील अनुभव वीतहव्यानें त्या आपल्या मनाच्या कल्पनेनेंच घेतला. नंतर आपले पूर्वींचे सर्व जन्म अवलोकन करावे अशी इच्छा त्याच्या मनांत उत्पन्न झाली. त्याबरोबर त्यानें आपले पूर्वींचे कित्येक नष्ट झालेले व कित्येक अस्तित्वांत असलेले असे सर्व देह पाहिले. त्याच्या विद्यमान असलेल्या देहापैकीं पृथ्वीच्या उदरामध्यें अडकून पडलेल्या आपल्या देहाची स्थिति अवलोकन करतांच त्या देहाचा उद्धार करावा अशी इच्छा यदृच्छेनें त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. तो आपल्या बुद्धीच्या योगानें विचार करूं लागला, तो म्हणाला:—"हें माझें शरीर पृथ्वीच्या बाहेर काढण्याची माझ्या अंगांत यत्किंचित्‌हि शक्ति राहिलेली नाहीं. यास्तव मी आतां तावडतोब सूर्याच्या देहांत प्रवेश करतो म्हणजे त्याचा पिंगलनामक गण त्याच्या आज्ञेवरून माझ्या पूर्वदेहाचा पृथ्वीच्या उदरांतून उद्धार करील" असा विचार करून त्या मुनीनें वायुरूप धारण करून सूर्य नारायणाच्या हृदयांत प्रवेश केला. भगवान् सूर्यानें आपल्या देहांत मुनीनें प्रवेश केला आहे असें ओळखलें. त्या मुनीचा आशयहि जाणला. मग समोरच उभा असलेल्या पिंगल नांवाच्या आपल्या गणास हाक मारून सूर्यानें वीतहव्याच्या देहाचा उद्धार करण्यास आज्ञा केली. त्यावेळीं वीतहव्याच्या त्या लिंगदेह धारण करणाऱ्या वायुरूप संवित्कलेनें पिंगलाच्या देहांत प्रवेश केला. पुढें सूर्याच्या आज्ञेनें निघालेला तो पिंगलगण आकाशांतून संचार करीत त्या विंध्य पर्वतावरील अरण्यांत येऊन पोहोंचला. नंतर ज्याप्रमाणें एखादा सारस पक्षी आपल्या नखांनीं एखाद्या कमलाचा देठ चिखलांतून उकरून काढतो, त्याप्रमाणें पिंगलानें आपल्या नखाच्या योगानें वीतहव्याच्या देहाच्या भोंवतालची माती उकरून त्या मुनीचा देह बाहेर काढला. नंतर मुनीच्या लिंगदेहानें पिंगलाचा देह सोडून आपल्या पूर्वीच्या स्थूलदेहामध्यें प्रवेश केला. नंतर पिंगल गण आकाशांत निघून गेला आणि वीतहव्यमुनि मातीनें भरलेलें आपलें अंग

धुण्याकरितां निर्मळ सरोवरांत त्यानें बुडी मारून स्नान केलें. नंतर जप करून त्या मुनीनें भगवान् सूर्यनारायणाची मोठ्या भक्तीनें पूजा केली. पूर्वीप्रमाणें सर्व व्यवहार करण्यास समर्थ असलेलें तें आपलें पूर्वीचें शरीर प्राप्त झाल्यामुळें वीतहव्यमुनीला अतीशय आनंद झाला. सारांश, अशा रीतीनें बुद्धीची समता, पराशांति, सर्वभूतासंबंधानें मित्रभाव, सत्प्रज्ञा, आनंदवृत्ति, ईश्वरी कृपा व त्यामुळें प्राप्त होणारें ऐश्वर्य इत्यादि गुणांनीं युक्त असलेला तो मुनि विषयासक्तिरहित अशा अंतःकरणानें विंध्यपर्वतावरील सरोवराच्या काठीं फक्त एकच दिवस समाधिविरहित स्थितीमध्यें सुखानें राहिला.

पुढें तो दिवस संपल्यानंतर वीतहव्यमुनी पुनः समाधि लावण्यकरितां विंध्यपर्वतावरील पूर्वपरिचित अशा एका विस्तृत गुहेमध्यें शिरला व आपल्याशींच विचार करूं लागला.

“ मी आपल्या इंद्रियांना विचारानें बाधित करून टाकलेंच आहे; तरी आतां त्यासंबंधानें पुनः विचार करण्यांत अर्थ नाहीं. जगताच्या सत्यासत्यतेबद्दलची भेद दृष्टि नाहींशी करून आत्मस्वरूपाचें दृढ अनुसंधान करीत मी एखाद्या पर्वताच्या शिखराप्रमाणें स्थिर होऊन रहातों.” अशा रीतीनें विचार करून आपणांस विदेह कैवल्याची स्थिति प्राप्त करून घेण्याकरितां तो मुनि त्या पर्वताच्या गुहेंत पद्मासन घालून बसला व त्यानें दीर्घ व उच्च स्वरानें ॐकाराचा उच्चार करण्यास सुरवात केली. या त्रैलोक्यांतील सर्व आंतर व बाह्य विषयांचा त्यानें त्याग केला. नंतर ॐकारांतील दीर्घनादाच्या ठिकाणीं विलीन झाला व वायु जसा गंधाचा त्याग करतो, त्याप्रमाणें इंद्रियें व त्यांचे विषय यांचा त्यानें त्याग केला. नंतर त्यानें आपल्या अंतःकरणांतील तमरूपी अज्ञानाचा त्याग केला, नंतर त्याच्या ठिकाणीं सात्त्विक बुद्धीचें तेज उत्पन्न झालें, त्याचाहि त्यानें क्षणभर विचार करून त्याग केला. मग त्याची स्थिति तम आणि प्रकाश यांनीं रहित झाली. अशी स्थिति प्राप्त झाल्यानंतरहि त्याचें मनोरूपी तृण थोडेंसें स्फुरण पावत होतें, परंतु त्या मुनीनें लगेच विचार करून त्याचाहि निकाल लावला. अशा रीतीनें तो मुनि ब्रह्मरूप झाला.

सारांश, वर सांगितल्याप्रमाणें वीतहव्याच्या मनाचा अत्यंत नाश

झाला. तो संसाराच्या सीमेला पोचला, दुःखसागरांतून पार झाला. वीतहव्यमुनि शोकरहित होत्साता जीवन्मुक्त स्थितींत अनेक वर्षे विहार करीत राहिला.

तात्पर्य:—ही जी अनेक विचारांनी भरलेली वीतहव्याची गोष्ट सांगितली तिचा आपल्या बुद्धीनें विचार करावा व वीतहव्याप्रमाणें शुद्ध दृष्टीचा आश्रय करून श्रेष्ठ ज्ञान संपादन करावें. आत्मसाक्षात्काररूप श्रेष्ठ ज्ञानानेंच मुक्ति मिळते. मनुष्य ज्ञानानेंच दुःखरहित होतो, ज्ञानानेंच त्याच्या अज्ञानाचा नाश होतो व त्यानेंच त्याला मोक्ष प्राप्त होतो. दुसऱ्या कोणत्याहि उपायांनीं मनुष्य वस्तुतः कृतार्थ होत नाहीं.



# निर्वाण प्रकरण पूर्वार्ध.

## (२५) भुशुंडाची गोष्ट.

असक्तबुद्धयः सर्वे भुशुंडवदवास्थितिम् ॥
प्राप्नुवंति परे तत्त्वे प्राणापानावलोकिनः ॥ नि. पू. २८-४.

**भावार्थः**—प्राण व अपान यांची भुशुंडाप्रमाणें उपासना करणारे व आपल्या बुद्धीला कोठेंहि आसक्त होऊं न देणारे असें सर्व लोक परब्रह्मामध्यें स्थिर होतात.

मेरुपर्वताच्या ईशान्य कोपऱ्यांत पद्मरागरत्नमय शिखरावर 'चूत' या नांवाचा प्रसिद्ध कल्पवृक्ष आहे. त्या कल्पवृक्षाच्या शेंड्यावर दक्षिणे-कडील शाखेच्या सुवर्णरौप्यमय वेलींनीं झाकलेल्या ढोलींत अत्यंत विरक्त भुशुंड या नांवाचा कावळा रहात आहे, तो चिरंजीव आहे. तो मोठा बुद्धिमान् आहे. त्याची बुद्धि आत्मपदीं विश्रांत पावल्यामुळें तो शांत व सतेज दिसतो. अशा तऱ्हेची हकीकत एकदां स्वर्गांत शातातप नांवाच्या मुनीच्या तोंडून वसिष्ठांच्या कानावर आली असतां, त्या भुशुंडास पहावें अशी त्यांना इच्छा झाली व लगेच वसिष्ठ ज्या ठिकाणीं तो रहात होता तेथें जाऊन भुशुंडाचे समोर उभे राहिले. भुशुंडानें त्यांच्याकडे पाहिल्या-बरोबर 'हे वसिष्ठ आले आहेत' असें त्यानें ओळखिलें व तो लगेच उठून वसिष्ठांना 'हे मुने! तुमचें स्वागत असो' असें म्हणाला. नंतर त्यानें आपल्या संकल्पानें उत्पन्न केलेल्या हातांनीं वसिष्ठांना पुष्पांजलि अर्पण केली. नंतर त्या पक्षिराजानें आपण स्वतः त्या कल्पवृक्षाचें एक पान वसिष्ठांच्या पुढें करून 'ह्या आसनावर बसा' असें तो म्हणाला. वसिष्ठ आसनावर बसल्यानंतर त्या संतुष्टमानस भुशुंडानें अर्घ्यपाद्यादि पूजासाहित्यानें वसिष्ठांची

पूजा केली. नंतर तो भुशुंड मोठ्या प्रेमानें व मधुरवाणीनें भाषण करूं लागला.

भुशुंडः—हे मुने! फार दिवसांनीं आपण आम्हास दर्शन देण्याची कृपा केलीत. आज आपलें काय निमित्तानें येणें झालें? इतक्या दूरवर आल्यानें आपणास फार कष्ट झाले असतील? आपली आज्ञा काय आहे? हें ऐकण्यास माझे कान उत्कंठित झाले आहेत. आपल्या चरणाच्या दर्शनानें आपण कां आलात हें मला समजलेंच आहे. तरी मी तें आपणास विचारतों कारण आपल्या वचनामृताचा आस्वाद घेण्याची इच्छा माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाली आहे.

वसिष्ठः—हे महाराज पक्षिश्रेष्ठा! आपण म्हणता तें अगदीं बरोबर आहे. मला आपणास कांहीं विचारावयाचें आहे. तें हें कीं 'आपला जन्म कोणत्या कुलांत झाला? आपणास ब्रह्मज्ञान कसें झालें? आपलें आयुष्य–वय किती आहे? मागील कांहीं वृत्तांत आपणास आठवतो कां? हें राहण्याचें ठिकाण आपणास कोणी दाखविलें.

भुशुंडः—या जगांत हर नांवाचा देवाधिदेव आहे. त्याचे पुष्कळ गण (खेळगडी) आहेत. या गणांप्रमाणेंच मातांचा समुदायहि शंकराजवळ आहे. या मातृदेवतांच्या पुढें जगांतील सर्व प्राणी नम्र असतात. पण या मातृदेवता शंकरासमोर नृत्य करतात. या मातृदेवतांमध्यें जया, विजया, जयंती, अपराजिता, सिद्धा, रक्ता, अलंबुषा, उत्पला ह्या आठजणी नायिका आहेत. यामध्यें सातवी अलंबुषा म्हणून जी माता प्रसिद्ध आहे तिचें वाहन चंड या नांवाचा एक कावळा आहे. त्याची चोंच वज्राप्रमाणें कठीण हाडाची आहे. इंद्रनीलमण्यांच्या ढिगाप्रमाणें त्याची कांति आहे. त्या भयंकर मातृदेवता एकदां उत्सवाकरितां आकाशांत एकत्र जमल्या. त्या उत्सवांत रममाण झाल्यामुळें त्यांची वाहनेंहि उत्सव करूं लागलीं. त्यांनींहि मद्य प्राशन केलें. त्या मद्यानें उन्मत्त झाल्यानंतर ब्राह्मी देवीच्या रथाच्या हंसी अलंबुषा मातेच्या चंड काकाबरोबर रममाण झाल्या. तेव्हां त्या हंसी अतिशय संतुष्ट होत्सात्या गर्भवती झाल्या. पुढें त्या हंसींनीं झालेला सर्व वृत्तांत जशाच्या तसा ब्राह्मी देवीला निवेदन केला. तेव्हां ती देवी आपल्या

हंसींना म्हणाली, ' हे मुलींनो ! आतां तुम्ही गर्भवती असल्यामुळें माझा रथ वाहून नेण्याचें काम तुमच्यास होणार नाहीं म्हणून सध्या तुम्ही स्वैर संचार करून रहा. ' पुढें त्या हंसी प्रसूत झाल्या व त्यांना एकवीस पुत्र ( कावळे ) झाले. हे मुने ! अशा रीतीनें आम्ही एकवीसजण भाऊ हंसींपासून उत्पन्न झालों. पुढें त्या ब्राह्मी देवीची आम्ही पुष्कळ वर्षे सेवा केली, त्यामुळें देवीनें आमच्यावर कृपा करून आम्हाला ज्ञानाचा उपदेश केला. त्या योगानें आम्ही सर्वजण मुक्त झालों.

नंतर शांत चित्त होऊन एकांतांत ध्यानस्थ रहावें म्हणून आम्ही आपल्या पित्याकडे गेलों व पित्यास व अलंबुषा देवीस नमस्कार केला. त्यांनीं कृपादृष्टीनें आम्हाकडे अवलोकन केल्यानंतर आम्ही आपल्या पित्याला म्हणालों, " तात ! ब्राह्मीदेवीच्या कृपेनें आम्हाला आत्मज्ञान झालें आहे. पण आम्हांला एकांतांत ध्यानस्थ रहाण्याकरितां उत्तम जागा कोणती, हें विचारण्यास आम्ही आपल्याकडे आलों आहोंत. " नंतर त्या सर्वज्ञानी पित्यानें आम्हास ' हें कल्पवृक्षाचें स्थान देवांनाहि दुर्गम आहे त्या ठिकाणीं तुम्ही जा व तेथें निर्विघ्नपणें भोग व मोक्ष यास प्राप्त व्हा ' असें सांगितलें, तेव्हां आम्ही पित्यास वंदन करून तो देश सोडून या कल्पवृक्षावरील घरट्यांत घेऊन राहिलों आहोत. तेव्हांपासून आम्हाला कोणत्याहि प्रकारची पीडा नाहीं.

मुने ! दीर्घकालापासून साचलेलें माझें पुण्य आज फळास आलें कारण आज निर्विघ्नपणें आपलें दर्शन झालें. आपल्या दर्शनानें आज हें घरटें, ही शाखा, हा मी व हा वृक्ष हीं सर्व पावन झालीं आहेत. आतां आणखी मी काय सांगूं त्याची मला आज्ञा करा.

' हे अर्घ्य व पाद्य ' असें म्हणून पुनः दुसऱ्यांदा स्वतः तें देणाऱ्या भुशुंड पक्ष्याला वसिष्ठांनीं विचारलें.

वसिष्ठः—हे पक्षिश्रेष्ठा ! आपल्यासारखे महाबुद्धीमान् असे आपले ते बंधू येथें कोठें दिसत नाहींत ? आपण एकटेच आम्हाला दिसत आहां, हें कसें ?

भुशुंडः—हे मुने ! आम्ही येथें रहावयास आल्यापासून युगांच्या

सनत्कुमार इत्यादि ब्रह्मर्षि, कार्तिकस्वामी, गणपती, गौरी, सरस्वती, गायत्री, लक्ष्मी या सर्वांची उत्पत्ति मला स्मरते. हे मुने ! ब्रह्मदेवाचा पुत्र असे जे तुम्ही त्या तुमचा हा आठवा जन्म आहे. तुम्ही केव्हां आकाशापासून झालात, केव्हां वायुपासून, केव्हां जलापासून, केव्हां पर्वतापासून, व केव्हां अग्नीपासून झालात. अंतर्धान पावलेली पृथ्वी कूर्मरूपी परमेश्वरानें पांच वेळां समुद्रांतून वर काढली. बारावेळां अमृतासाठीं समुद्राचें मंथन झालें. हिरण्याक्षानें पृथ्वीचें हरण तीन वेळा केलें. रेणुकेच्या पोटीं श्रीहरीनें सहा वेळां जन्म घेतला व क्षत्रियांचा नाश केला. प्रत्येक द्वापरयुगाच्या शेवटीं पुराणांचा कर्ता निरानिराळा असल्यामुळें सर्व पुराणांचा अर्थ जरी एक असला तरी पाठ भिन्न भिन्न होतात. ' रामायण ' या नांवाचा एक मोठा आश्चर्यकारक इतिहास मला आठवतो. त्याचें ग्रंथप्रमाण एक लक्ष आहे. ते ब्रह्मदेवानें वसिष्ठ–विश्वामित्रादिकांना उपदेशिलेलें ज्ञानशास्त्र आहे. त्यांत रामाप्रमाणें व्यवहार करावा, रावणाप्रमाणें दुराचरण करूं नये. असें ज्ञान बुद्धिमानांच्या हातांत फलाप्रमाणें अर्पिलेलें आहे. हें रामायण वाल्मिकीनें केलें आहे. आतां यापुढे तो जें दुसरें करणार आहे, त्याचाहि मला दिव्य दृष्टीनें अनुभव आलेला असून तें मला आठवत आहे. तूंहि त्याला लवकरच जाणशील. आतां विसरलेलें तेंच रामायण बाराव्या वेळीं केलें जाईल. याच्यासारखेंच भारत या नांवाचें दुसरें एक भारत पूर्व कल्पांत व्यासांनीं रचिलेलें मला आठवतें. तें कधीं व्यासांनी रचलें तर कधीं अन्य ऋषींनीं रचिलें आहे. तें वारंवार विसरल्यामुळें सात वेळां केलेलें आहे. राक्षसांचा नाश करण्याकरितां श्रीरामाचा अवतार दहा वेळां झाला व आतां होईल तो अकरावा रामाचा अवतार. तसेंच पृथ्वीचा भार दूर करण्याकरितां वसुदेवाच्या घरीं श्रीकृष्णाचा आतां सोळावा अवतार होईल. सारांश, ही दृश्य जगाची भ्रांति खरी नाहीं. जलांत जशी लाट तशी ती चिदात्म्यामध्यें उत्पन्न होते व पुनः लीन होते.

## प्राण चिंतेचें स्वरूप

ही सर्व भ्रांति नाहींशी होण्याला उपाय म्हणजे आत्मसाक्षात्कार होईपर्यंत केला जाणारा आत्मविचार–आत्मचिंता–हाच होय. ही आत्मचिंता

आपल्या सारख्यांस सहज प्राप्त करून घेता येते. पण आमच्या सारख्यांस ती दुष्प्राप्य आहे. या आत्मचिंतच्या सारख्याच योग्यतेच्या तिच्या पुष्कळ मैत्रिणी आहेत. त्यांपैकी एकीला मी वश करून घेतलें आहे. ती सर्व दुःखांची क्षय करणारी, सर्व प्रकारचें सौभाग्य वाढविणारी व सर्व जीविताचें कारण अशी आहे. तिचें नांव प्राणचिंता (प्राणवायूचें चिंतन) हें होय. या देहांत संचार करणाऱ्या प्राणवायूचे मुख्य दोन भाग आहेत. एक वर जाणारा (प्राण) व खालीं येणारा (अपान). देहाच्या मधोमध हृदयकमल आहे. तेथें हे दोन्हीं प्राणवायु समस्थितींत असतात. त्या प्राणवायूच्या गतीचें अनुसंधान मी नित्य करीत असतो. वायु शरीरांतच परिच्छिन्न होऊन राहिला आहे अशी जी साधारण समजूत आहे, तिचा परित्याग करून मी 'अधिदैव सूत्रात्मा आहे' अशा धारणेनें इंद्रियांच्या व्रतांचा त्याग करणें व केवळ प्राण व्रतच धारण करणें हेंच प्राणापानाचें अनुसरण आहे. वाणी, 'मी भाषणच करीन,' असें व्रत धरून बसली. चक्षु, 'मी पाहीनच.' असें म्हणाले. श्रोत्रादि इतर इंद्रियांनींहि असेंच श्रवणादिकांचें व्रत धरलें. पण सर्व इंद्रियांचीं तीं सर्व व्रतें आसक्तिरूप पापानें दूषित झालीं होतीं. म्हणून श्रमरूपी मृत्यूनें त्यांच्या त्या व्रतांचा भंग केला. प्राणाचें मुख-नासिकादि स्थानांतून संचार करणें हेंच व्रत आहे. तें विषयासक्तीनें दूषित झालेलें नाहीं, त्यामुळें श्रमरूप मृत्यु त्याचा भंग करण्यास समर्थ झाला नाहीं. त्यामुळें व्रतभंग न झालेला एकटा प्राणच मृत्यूकडून ग्रासला जात नाहीं. वास्तव 'तोच मी आहे,' अशी धारणा व केवळ त्याच्या व्रताचें आचरण एतद्रूप प्राणचिंतेनें मी मृत्यूला जिंकलें आहे. (अशाच तऱ्हेची ही व्रतमीमांसा बृहदारण्यांतहि प्रसिद्ध आहे.) या प्राणापानांचे संधी एक आंत व दुसरा बाहेर असे होत असतात. त्यांस आंतर व बाह्य कुंभक असें म्हणतात. ह्या दोन कुंभकांच्या ठिकाणीं आत्मा प्रकट होतो असें योगी म्हणतात. अशा या निरुपाधिक चिदात्म्याची आम्ही उपासना करीत असतो. अशा तऱ्हेनें आत्म्याच्या ठिकाणीं मला प्राप्त झालेली ही उत्तम समाधि मी जात असतांना, उभा असतांना, जागतांना, निजतांना व स्वप्नांतहि ढळत नाहीं.

## चिरंजीव होण्याचीं कारणें

भुशुंडः—याप्रमाणें प्राणांचें सतत चिंतन करून मी आपल्या निर्मल चिदात्म्यांत विश्रांति घेत राहिलों आहे. मी कधीं मागें होऊन गेलेल्या अगर पुढें होणाऱ्या गोष्टींचें चिंतन करीत नाहीं; फक्त चालू गोष्टीवर दृष्टि ठेवून आत्मस्वरूपीं स्थिर असतों, आज मला हें मिळालें, ही सुंदर वस्तु मला कशी प्राप्त होईल? ही चिंता मला मुळींच नसते. मी कधीं कोणाची निंदा करीत नाहीं व स्तुतिहि करीत नाहीं. चांगली गोष्ट प्राप्त झाली म्हणजे मला संतोष वाटत नाहीं व वाईट गोष्ट प्राप्त झाली म्हणजे दुःखहि होत नाहीं. माझें मन नेहमीं सम असतें, म्हणूनच मी चिरंजीव झालों आहे. सुखी पुरुषास पाहून मला सुख होतें व दुःखी पुरुषास पाहून मला त्याच्या दुःखाबद्दल वाईट वाटतें. मी सर्वांचा आवडता मित्र आहे. आपत्ति, संपत्ति वगैरे द्वंद्वामध्यें मी निर्विकारी असतो, म्हणूनच मी चिरंजीव आहें.

वसिष्ठः—भगवन्! आपण सांगितलेली ही हकीगत फारच आश्चर्यकारक आहे. या जगांत आपल्यासारखा मोठा तत्त्वज्ञानी मी कोठेंहि पाहिला नाहीं. महाराज! आपण आपल्या शुभ गुहेंत प्रवेश करा. माझाहि माध्यान्ह कर्म करण्याचा समय आला आहे. यास्तव मी आपल्या सप्तर्षि लोकांतील घरीं जातो. हें ऐकून त्या चिरंजीव भुशुंडानें अर्घ्य–पाद्य–पुष्पांनीं माझी पायापासून मस्तकापर्यंत पूजा केली. 'माझ्या मागोमाग पोंहोचवावयास येण्याचे श्रम आपण उगीच घेऊं नका' असें बोलून मी आसनावरून उठलों आणि त्या वृक्षावरून पक्ष्याप्रमाणें उड्डाण केलें. तरी तोहि माझ्या मागोमाग आकाशांत एक योजनपर्यंत आलाच. नंतर मी मोठ्या कष्टानें त्यास परत जाण्याबद्दल विनंति केली. कारण सज्जनांची संगति सोडवत नाहीं. गेल्या कृतयुगाच्या आरंभीं दोनशें वर्षें होऊन गेलीं असतां पुनः एकदां त्या भुशुंडाची व माझी त्या मेरुपर्वतावरील त्याच कल्पवृक्षावर गांठ पडली होती.

तात्पर्यः—भुशुंडानें सांगितल्याप्रमाणें प्राणचिंतेचें स्वरूप ध्यानांत घेऊन त्याची उपासना केली असतांहि परब्रह्माचें ठिकाणीं स्थिर होऊन राहतां येतें.

## (२६) शिवपूजेची गोष्ट.

**अत्रेमां परमां दृष्टिं महामोहविनाशिनीम् ॥**
**शृणु या कथिता पूर्वं मम कैलासकंदरे ॥** नि. पू. २९-८५.
**संसारदुःखशांत्यर्थं देवेनार्धेंदुमौलिना ॥** नि. पू. २९-८६.

**भावार्थः**—आपल्या मस्तकावर अर्धचंद्र धारण करणाऱ्या महादेवानें संसार-दुःखाची शांति होण्याकरितां महामोहाचा विनाश करणारी खरी देवपूजा कोणची याविषयीं कैलासपर्वताच्या गुहेंत जो उपदेश केला तो ऐक.

वसिष्ठ एकदां पूर्वी कैलासपर्वतावर, गंगानदीचे काठीं आश्रम बांधून राहिले होते. त्या ठिकाणीं नित्य श्रीशंकराची पूजा करीत असत. पुढें अशा रीतीनें बराच काल लोटल्यावर एकदां श्रावण वद्य अष्टमीचे दिवशीं प्रदोष-काळीं श्रीशंकराची पूजा करून वसिष्ठ ध्यानस्थ बसले होते. ध्यानसमाधि उतरल्यावर बाहेर पहातात तों श्रीशंकर पार्वतीसह प्रकट झालेले दिसले. तेव्हां वसिष्ठांनीं लागलीच तेथें असलेल्या आपल्या शिष्यवर्गास सावध करून अर्घ्य, पाद्य, फुलें, वगैरे पूजेचें साहित्य घेऊन त्या महादेवाची यथासांग पूजा केली व साष्टांग नमस्कार घातला. पार्वतीचीहि त्यांनीं पूजा केली, वसिष्ठांनीं अर्पण केलेल्या पूजेनें संतुष्ट झालेले भगवान् शंकर म्हणाले :—

**श्रीशंकरः**—वसिष्ठा ! तुझ्या चित्तवृत्ती अत्यंत शांत होऊन कल्याण-कारक श्रेष्ठ आत्मपदाच्या ठिकाणीं विश्रांति पावल्या आहेत ना ? तुझें तप निर्विघ्नपणें पार पडून त्यापासून तुझें कल्याण होत आहे ना ? तुला जें श्रेष्ठ ब्रह्मपद प्राप्त करून घ्यावयाचें आहे, तें तुला प्राप्त झालें आहे ना ? तुझ्या सर्व भीति नाहींशा झाल्या आहेत ना ?

**वसिष्ठः**—हे महेश्वरा ! तुझ्या नित्य स्मरणानें माझें सतत कल्याण झालें आहे, मला दुष्प्राप्य असें कांहीं राहिलें नाहीं व मला कोणापासून कसलीहि भीति वाटत नाहीं. हे प्रभो ! तुझें नित्य स्मरण पूर्व संचित पुण्यकर्मांना अनंत पटीनें फलद्रूप करितें व पुढें केल्या जाणाऱ्या पुण्याच्या वृद्धीसाठीं बीज पसरतें. तुझें नित्य चिंतन ज्ञानामृताचा मुख्य कलश आहे, संतोषरूपी चांदण्याचा चंद्रमा आहे व मोक्षपुराचें द्वार आहे.

हे भूतपते ! तुझें स्मरण हा एक चिंतामणीच आहे व तो आपल्यापाशीं सतत बाळगल्यानें मी सर्व आपत्तींतून सुटलों आहे. भगवन् ! आपल्या प्रसादानें माझ्या सर्व दिशा इष्टार्थांनीं परिपूर्ण भरलेल्या आहेत. मला एक संशय आला आहे, त्याचें कृपा करून निवारण करा. हे प्रभो ! ज्या देवार्चनाच्या योगानें उद्वेग उत्पन्न होत नाहीं, जें निरुपद्रव, सर्व पापांचा क्षय करणारें आहे, सर्व कल्याणाला प्रसविणारें आहे, असें देवपूजेचें विधान कोणत्या प्रकारचें आहे, तें मला सांगा.

## खरा देव कोणता ? व खरी देवपूजा कोणती ?

श्रीशंकरः—हे ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठा ! मी तुला अती उत्तम देवार्चन सांगतो. देव कोण हें तूं जाणतोस कां ? पुंडरीकाक्ष विष्णु हा देव नव्हे, त्रिलोचन शंकर हा देव नव्हे, ब्रह्मदेव हा मुख्य देव नव्हे, मग इंद्रादिकांना देव कसें म्हणतां येईल ? अकृत्रिम, अनादि, अनंत, आनंदरुप व चिद्रूप परब्रह्मच मुख्य देव आहे. ज्यांना ह्या शिवतत्त्वाचें ज्ञान झालेलें नसतें, त्यांच्याकरितां विष्णुशंकरादि आकार धारण करणाऱ्या देवांचें पूजन सांगितलें आहे. ज्ञान, सर्वत्र समदृष्टि व शांति हीं ह्या मुख्यदेवाच्या पूजेंतील उत्तम पुष्पें आहेत. पूज्य आत्म्याला जाणणारे ज्ञानी निर्मल चिन्मात्र शिवाला पूज्य मानतात. समता, बोध इत्यादि पुष्पांनीं आत्मदेवाची पूजा करणें, हेंच खरें देवार्चन होय. साकार देवांचें पूजन करणें ही खरी देवपूजा नव्हे.

## परमात्म्याचें बाह्यपूजन

हे मुनिश्रेष्ठा ! तूं विवेकी मुख्य अधिकारी आहेस, म्हणून तुला ही मुख्य देवपूजा सांगितली आहे. खरा देव त्रिभुवनाचा आधार परमात्माच आहे. तो शिवस्वरूप ब्रह्म–विष्णु–रुद्रादि सर्व देवांहून श्रेष्ठ आहे. हा चिन्मात्र सर्व ठिकाणीं असणारा, निराकार परमात्मा आहे. तथापि त्याची इच्छा सत्ता ( मी अनेक व्हावें अशी इच्छा ) आकाशसत्ता, कालसत्ता, नियतिसत्ता व महासत्ता या क्रमानें व्यक्त झाली आहे. तसेंच ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, प्रवृत्तिशक्ति, निवृत्तिशक्ति इत्यादि अनंतशक्ति त्या पर-

मात्म्याच्या आहेत ( यांपैकीं पहिल्या पांच सत्ता या परमात्म्याच्या ठिकाणीं दिसतात; व शेवटच्या चार शक्ति जीवात्म्याच्या ठिकाणीं दिसतात. ) त्या परमात्म्याच्या उल्हासशक्तीमुळें संसाराची ( जगद्रूपी संसाराची ) सुरुवात होते व त्याच्या निरोधशक्तीनें या संसाराचा क्षय होतो. अशा तऱ्हेनें सर्व शक्तींनीं संपन्न असणारा हा परमात्मा लक्षावधि सूर्याप्रमाणें तेजःपुंज आहे व तोच सर्व तेजस्वी पदार्थांचे ठिकाणीं तेज उत्पन्न करतो. थोडक्यांत असें सांगतां येईल की, सर्व विश्व हेंच त्याचें स्वरूप आहे. या विराट्रूपी चिन्मात्र परमात्म्यास ज्ञानानें सतत ओळखणें हेंच त्याचें ध्यान व हीच त्याची श्रेष्ठ पूजा होय. एखाद्यानें या परमात्म्याचें ध्यान तेरा निमेषपर्यंत केल्यास त्यास गोप्रदानाचें पुण्य प्राप्त होतें. शंभर निमेष ध्यान केल्यास अश्वमेध यज्ञ केल्याचें पुण्य प्राप्त होतें; व अर्ध घटकापर्यंत ध्यान केल्यास सहस्र अश्वमेध यज्ञ केल्याचें श्रेय प्राप्त होतें. एक घटकापर्यंत पूजन केल्यास राजसूय यज्ञाचें फल मिळतें. सकाळपासून मध्यान्हापर्यंत ध्यान केल्यास लक्ष राजसूय यज्ञांचें फल प्राप्त होतें; व एक दिवसपर्यंत त्या परमात्म्याचें ध्यान केल्यास तो पुरुष परमसमाधानामध्यें नित्य राहतो. श्रेष्ठ प्रकारचा योग तो हाच, उत्तम क्रिया ती हीच होय. वसिष्ठा ! हें ह्या परमात्म्याचें बाह्यपूजन तुला सांगितलें.

### परमात्म्याचें अंतःपूजन

आतां तुला परमात्म्याचें अंतःपूजन कसें करावें तें सांगतों. आपल्या शरीरांत असणाऱ्या परमकल्याणकारक आत्म्याचें नित्य ध्यान करावें. जाग्रतादि सर्व अवस्थेमध्यें प्रारब्धयोगानें प्राप्त झालेल्या विषयांचें सेवन करणें, ह्या स्नानानें शुद्ध करून नित्य अनुभवरूप पूजासामुग्रीनें या बोधरूप लिंगाची ( ज्ञानस्वरूप आत्म्याची ) पूजा करावी. मनाच्या मननशक्तींत असलेला, प्राण व अपान यांच्यामध्यें असणाऱ्या अंतरांतून व्यक्त होणारा, हृदय, कंठ व तालु यांच्या मध्यें राहणारा, भ्रूमध्य व नासापुटाच्या ठिकाणीं असणारा, असा जो स्वतःच्या देहाच्या ठिकाणीं चित्‌चा भास होतो तोच तो देव होय. त्याच्या अशा स्वरूपाचें चिंतन करावें. स्त्रिया जशी पतीची सेवा करितात त्याप्रमाणें इंद्रियांच्या नानाप्रकारच्या शक्ती निरंतर

माझी उपासना करितात. मन हा माझा द्वारपाल आहे, तो मला त्रिभुवनाचा वृत्तांत सांगतो. चिंता ही माझी प्रतिहारी आहे. विचित्र प्रकारची ज्ञानें ( शास्त्रांतील ) हीच माझीं अंगभूषणें होत. ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें हीं माझीं द्वारें आहेत. असा हा मी अनंतात्मा आहे. माझी आकृति मर्यादित नाहीं.मी सर्व पदार्थांना भरून अखंड एकरूप होऊन राहिलों आहे. असें चिंतन करावें. प्रारब्धवशात् प्राप्त झालेल्या सर्व शब्दस्पर्शादि विषयांच्या योगांनीं त्याची पूजा करावी. सारांश,जी जी वस्तु दिसते, ती ती ब्रह्म आहे, असा निश्चय ठेवून आत्मदेवाच्या पूजेचें व्रत आचरण करावें.

अशा तऱ्हेचें आत्मदेवाचें पूजन सिद्ध होण्याकरितां अंतःकरणांतील वासना शुद्ध केल्या पाहिजेत. त्या शुद्ध वासनारूपी अविद्येनें मलिन अविद्येचा नाश केल्यावर गुरुपदेशाच्या ठिकाणीं शिष्याची प्रवृत्ति झाली म्हणजे तो आत्मा दाखवितां येण्यासारखा नसला व दिसतहि नसला, तरी तो आपणहूनच प्रसन्न होतो. नुसत्या शास्त्रार्थानें किंवा गुरुपदेशानें आत्म्याची ओळख पटत नाहीं. तो आपला आपण स्वतःच्या बोधानें जाणला पाहिजे. तथापि गुरूपदेश व शास्त्रार्थ यांच्या वाचून आत्म्याचा ( परोक्ष ) बोध होत नाहीं. शास्त्रार्थ, गुरुपदेश व शिष्याचा स्वबोध, यांचा संयोग हाच आत्मज्ञानाला प्रकाशित करणारा आहे. अशा रीतीनें देवार्चन करणारा ज्ञानी पुरुष श्रेष्ठ ब्रह्मपदाप्रत जातो. तेथें आमच्यासारखे (शंकरासारखे) देव चाकराप्रमाणें असतात. म्हणजे सृष्टींतील नेमून दिलेलीं कार्यें नोकराप्रमाणें करीत असतात.

हे मुने ! जें जें तूं विचारलेस, तें तें मी तुला सांगितलें. तुझें कल्याण असो. आतां मी आपल्या स्वस्थानीं जातो. पार्वति ! उठ, चल आपण जाऊं या.

वसिष्ठः—असें म्हणून तो महेश्वर आपल्या परिवारासह आकाशांत निघून गेला. प्रारब्धानें प्राप्त झालेलीं कर्में करून मी त्या परमात्म्याचें पूजन करीत असतो. झोपेंतहि माझें पूजन बंद पडत नाहीं. कारण त्यावेळीं मी अविद्या पुष्पानें आत्म्याचें पूजन करितों.

तात्पर्यः—क्रमानें प्राप्त झालेल्या क्रियांनीं व आचाररूपी पुष्पांनीं त्या

परमात्म्याचें पूजन करावें. तें पूजन लौकिक दृष्टया खंडित आहे असें दिसलें तरी ज्ञानी पुरुष करीत असलेल्या त्या परमात्म्याचें अनुसंधान निरंतर सुरु असल्यामुळें तें खंडित नसतें. ज्ञानी व अज्ञानी अशा सर्व पुरुषांच्या ठिकाणीं इंद्रियें आणि त्यांचे विषय यांचा संबंध, सारख्याच तऱ्हेनें होतो. परंतु ज्ञानी पुरुष त्या बाबतींत सावध असतो व तो ह्या सर्व विषयांच्या सेवनानें परमात्म्याचें पूजन करितो व इतर पामर तें करीत नाहींत.



## ( २७ ) विल्वफळाची गोष्ट.

**स्वानंदरससंपूर्णं त्रिजगत्कल्पनास्पदम् ॥**
**इह विल्वफलत्वेन परब्रह्मोपवर्ण्यते ॥** नि. पू. ४५

**भावार्थ**—त्रिभुवनाच्या कल्पनेचें अधिष्ठान व आनंदरसानें भरलेलें परब्रह्म या गोष्टींत बेलफळाच्या रूपानें वर्णिलें आहे.

हजारो योजनें पसरलेलें, अत्यंत निर्मळ व अनंत युगें होऊन गेलीं तरी जें जीर्ण होत नाहीं, असें एक विल्वफळ ( बेलफळ ) आहे. तें जरी फार जुनाट आहे तरी बालचंद्राप्रमाणें किंवा कोमल पल्लवाप्रमाणें मृदु असल्यामुळें तें फारच सुंदर आहे. तें कल्पांतकालच्या वायूंच्या योगानेंहि हालत नाहीं. जगाच्या स्थितीचें तें आद्यमूळ आहे. त्या विल्वफळाच्या जवळ ब्रह्मांडांचे ओघ, पर्वताच्याजवळ मोहरीच्या कणांप्रमाणें भासतात. तें विल्वफळ गळून पडण्याइतकें परिपक्व कधींच होत नाहीं. तें नेहमीं पिकलेलें असल्यामुळें रसाळ असतें. असें असूनहि त्याला नासण्याची भीति नाहीं, कारण तें निर्विकार आहे. या महाआकृतीच्या फळाचा मगज संविद्रूपच बनला आहे. ब्रह्मा, विष्णु, रुद्र, इंद्र इत्यादि दीर्घायु देवहि त्याची उत्पत्ति, मूळ किंवा देठ जाणत नाहींत. त्याचा अंकुर व वृक्ष कोणी पाहिला नाहीं व ज्याच्या पुष्पाची आकृति कोणाच्या दृष्टीस पडलेली नाहीं. अशा या मोठ्या आकृतीच्या फळाला मूळ नाहीं व आधार नाहीं. शिळेच्या

भगवान् यमराज प्रत्येक चतुर्युगाच्या समाप्तीनंतर सर्व भूतांना मारल्यामुळें आपल्याला कांहीं पाप लागलें असेल अशा शंकेनें पुष्कळ तप करितो. तेव्हां तो कधीं आठ वर्षे, कधीं दहा, कधीं बारा, कधीं पांच, कधीं सात व कधीं सोळा वर्षेंहि तप करतो. अशा रीतीनें तो यम नियम पाळून तपामध्यें स्थिर झाला असतां मृत्यु कोणत्याहि प्राण्यांना मारीत नाहीं. त्या अहिंसेच्या कारणानें सर्व भूतल असंख्य भुतांनीं भरून जातें. त्यांची त्यांत इतकी दाटी होते कीं, कोणाला इकडे तिकडे संचारहि करितां येत नाहीं. ज्याप्रमाणें पावसाळ्यांत मदस्राव करणाऱ्या हत्तीच्या अंगावर असंख्य मशकांची दाटी होते व त्याचें शरीर त्यांनीं झांकून जातें, त्याप्रमाणें भूतल भूतांनीं आच्छादित होतें. तेव्हां देव पृथ्वीचा भार दूर करण्याकरितां त्या प्राण्यांना नानाप्रकारच्या युक्तींनीं ठार मारतात. हा प्रकार हजारों युगें सतत चालला आहे; व आजवर अनंत भूतें व जगें होऊन गेलीं आहेत; आज हा जो सूर्यपुत्र यम पितृनायक आहे तो आणखी एकदोन युगें क्षीण झालीं असतां आपल्या पापाचा क्षय करण्यासाठीं बारा वर्षेंपर्यंत तपश्चर्या करील. त्यावेळीं तो लोकांना मारण्याचें काम बंद ठेवील. तेव्हां मृत्यु नसल्यामुळें ही पृथ्वी प्राण्यांनीं दाट भरून जाईल. तेव्हां पृथ्वीस भार झाल्यामुळें ती श्रीहरीला शरण जाईल. मग श्रीहरी दोनरूपें घेऊन पृथ्वीवर अवतीर्ण होईल. एका देहानें, तो वसुदेवाचा मुलगा वासुदेव म्हणून प्रसिद्ध होईल व दुसरा पंडुराजाचा मुलगा (पांडव) अर्जुन नांवानें प्रसिद्ध होईल. तो अर्जुन आपल्या भावासह धृतराष्ट्राच्या दुर्योधनादि पुत्रांबरोबर युद्ध करण्यास तयार होईल. तेव्हां अर्जुन आपलेच सर्व नातेंवाईक मरणास तयार झालेले असे दोन्ही सैन्यांत उभे आहेत, असें पाहून खिन्न होईल व युद्धापासून निवृत्त होईल. मग त्या अर्जुनाला प्राप्त झालेलें हें युद्ध करण्याकरितां श्रीकृष्ण अनेक युक्तींनीं बोध करील. तो बोध असाः—

श्रीभगवानः—हे अर्जुना! तुझ्यामध्यें देह व आत्मा असे दोन प्रकार आहेत. त्यांपैकीं आत्मा सर्वव्यापी, आदिअंतरहित, चिद्रूप असा आहे व तोच तूं आहेस, देह कांहीं तूं नव्हेस. आत्मा जन्मास येत नाहीं व कधीं

मरत नाहीं, तो अज, नित्य अपक्षयरहित, वृद्धिरहित आहे. शरीरास जरी ठार मारलें तरी तो आत्मा मारला जात नाहीं.

सिद्धि व असिद्धि यांच्याबद्दल समत्व ठेवून (योगस्थ होऊन) व आसक्ति सोडून सर्व क्रिया कर. तूं आपलीं सर्व कर्में ब्रह्मार्पण कर. म्हणजे तूंच ब्रह्म होशील. तूं सर्व संकल्पांचा त्याग कर व कर्मफलत्यागरूप संन्यास योगानें आपलें चित्त निरामय करून मुक्त हो. तूं आपले सर्व अर्थ ईश्वराला अर्पण करून ईश्वरात्मा हो.

अर्जुनः—भगवन्! माझा मोह घालविण्याकरतां ज्ञान, योग, ब्रह्मार्पण, ईश्वरार्पण, संन्यास व अनासक्ति यांचें स्वरूप मला क्रमानें सांगा.

भगवान्ः—अर्जुना! तुझ्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें ऐक.

(१) ज्ञानः—सर्व प्रकारचे संकल्पः (विषयांचे विचार) शांत झाल्यावर, कोणत्याहि पदार्थाच्या अस्तित्वाची कल्पना संपल्यावर जे अनुभवाला येतें तें ब्रह्म होय. त्या ब्रह्माची प्राप्ति करून घेण्याकरितां चित्तवृत्ति ब्रह्माकार करण्याचा जो उद्योग त्याला ज्ञान असें म्हणतात.

(२) योगः—ब्रह्माकार वृत्ति होण्यास अनुकूल अशी जी एकाकार चित्तवृत्तींची धारा तिला योग म्हणतात.

(३) ब्रह्मार्पणः—सर्व जगत् व मी ब्रह्म आहें असें समजून 'जगत्' व 'अहं' यांचा बाध करणें, हें ब्रह्मार्पण होय.

(४) ईश्वरार्पणः—सर्व द्वैतजात केवल ईश्वर मात्र आहे अशा दृढ भावनेमुळें द्वैताचा अनुभव न येणें हेंच ईश्वरार्पण होय.

(५) संन्यासः—केलेल्या कर्मांच्या फलांचा त्याग (फलाबद्दल आस्था न बाळगणें) हाच संन्यास होय.

(६) अनासक्तिः—सर्व विषयांचे संकल्प (विचार) सोडून देणें यालाच अनासक्ति असें म्हणतात.

हे अर्जुना! तूं आपलें मन माझ्या ठिकाणीं लाव, तूं माझीच भक्ति कर. माझेंच पूजन कर व मलाच नमस्कार कर. अशा रीतीनें तूं मत्परायण होऊन आपलें स्वकर्म म्हणजे जें सध्यां तुला प्राप्त झालेलें युद्ध तें मात्र

गाभ्याप्रमाणें घन, विस्तीर्ण, निर्विकार व निरंजन असा त्याचा मध्यभाग आहे. अमृताचा स्राव करणाऱ्या चंद्रबिंबाप्रमाणें गोड निरतिशय आनंद रसाचा तें सतत स्राव करीत असतें. हें सर्व सौख्यांचा कोश आहे. सारांश, चिद्रूप ब्रह्माचेंच हें असें बिल्वफळाच्यारूपानें वर्णन केलें आहे.

तात्पर्य:—बिल्वफळाच्यारूपानें महाचित्घनसत्ताच सांगितली आहे. अहंतादिकांनीं विस्तृत असलेलें हें सर्व जग चित्रूपी मगजानें भरलेलें आहे. ज्याप्रमाणें ब्रह्मांडरूपी कोहळ्यांतील मेरु पर्वतादिक हे मगज आहेत, त्याप्रमाणें या चित्रूपी बिल्वफळांत ब्रह्मांडादि जगस्थिति हा मगज आहे. ज्याप्रमाणें बेलफळाची कवची त्यांतील गराचा आधार असते, त्याप्रमाणें सृष्टिरूप मगजाहून त्याचा आधार निराळा आहे असें होईल, पण सर्वव्यापी ब्रह्माचा असा सर्वरूपानें अथवा एक देशानें परिणाम होतो असें मानल्यास त्याचा विनाश दुर्वार आहे. पण आकाशाप्रमाणें निरवयव असलेल्या ब्रह्माचा मुख्य अंतःप्रवेश किंवा परिणाम संभवत नाहीं. यास्तव येथील मज्जा हा शब्द परिणामवाची नाहीं. तर चिद्रूप सूक्ष्म बीजाची ही जगद्रूप मिथ्या चमत्कृति आहे.

---

## ( २८ ) महाशिलेची गोष्ट.

**इह शिल्पिमनोदृष्टपद्मिनीखंडमंडितम् ॥**
**शिलोदरमिव ब्रह्मप्रपंचाभासमीर्यते ॥** नि. पू. ४६.

**भावार्थ:**—कारागिराच्या मनानें पाहिलेल्या, कमलिनींनें मंडित झालेल्या एखाद्या शिलेच्या उदराप्रमाणें ब्रह्माच्या ठिकाणीं प्रपंचाचा आभास सांगितला आहे.

कोणे एके ठिकाणीं अती गुळगुळीत, मृदु, अतीशय विस्तृत, निबिड, कधींहि क्षुब्ध न होणारी अशी एक महाशिला आहे. तिच्या आंत एखाद्या सरोवरांत जशीं कमळें असतात, तशीं मोठी रमणीय व

फुललेलीं असंख्य कमलें आहेत. त्या कमलांचीं पानें एकमेकांत गुर-फटलेलीं आहेत. त्यापैकीं कांहीं एकमेकापासून निरनिराळीं आहेत, कांहीं एकमेकावर आहेत. सारांश, तीं कमलें गूढहि आहेत व प्रकटहि आहेत. त्यांतील कांहींची मुळें खालीं आहेत तर कांहींचीं वरतीं आहेत. कांहींना मुळेंच दिसत नव्हतीं. त्या कमळांच्या जवळ हजारों शंख आहेत. मोठ्या आकारांच्या चक्रांचे समूहहि त्यांच्या जवळ आहेत.

तात्पर्यः—ज्या महाशिलेच्या आंत सर्व जगतांची स्थिति आहे अशी चित् शिला वरील गोष्टींत सांगितली आहे. स्वर्गलोक, पृथ्वी, वायु, आकाश, पर्वत, नद्या, दिशा हे सर्व त्या शिळेंत आहेत. तरी देखील ती छिद्ररहित आहे. एखाद्या पाषाणावार शंख, कमलें वगैरेचीं चित्रें जशी काढतात, त्याप्रमाणें भूत, वर्तमान व भविष्यकाळची सर्व जगें त्या चित्रूपी दगडाच्या बाहुलीवर खोदलेलीं आहेत. शिलेवर काढलेली कमलें जशीं शिलेहून भिन्न नसतात, त्याप्रमाणें चित्‌च्या ठिकाणीं कल्पिलेली सृष्टि ही चिद्रूपाहून वेगळी नाहीं. सारांश, शांत, सम, चिद्घन आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं दिसणारा हा जगद्विलास शिलेवर खोदलेल्या सृष्टींतील कमला-प्रमाणें होय. तो दिसला तरी खोटा असतो. त्यास खरें स्वरूप कधींहि प्राप्त होत नाहीं.

## (२९) अर्जुनाची गोष्ट.

### ( भावी भगवद्गीता )

**जीवस्वप्नो जगत्तत्रासंसक्त्या तत्परिक्षयः ॥**
**तदर्थमर्जुनाख्यानं वसिष्ठेनावतार्यते ॥** नि. पू. ५२.

**भावार्थः**—जीवाचें स्वप्न असें जें जगत् त्याचा अनासक्तीनें क्षय होतो, हें स्पष्ट करण्यासाठीं वसिष्ठांनीं अर्जुनाची गोष्ट सांगितली आहे.

( ही अर्जुनाची गोष्ट ज्यावेळीं वसिष्ठांनीं सांगितली, त्यावेळीं ती भविष्य काळांत घडणारी होती. तरी वसिष्ठ सर्वज्ञ व त्रिकालज्ञानी असल्यामुळें त्यांनीं तो भूतकालांत घडल्याप्रमाणेंच सांगितली आहे )



इदं च ते पांडुसुत स्वकर्म क्षात्रमुत्तमम् ॥
अपि क्रूरमतिश्रेयः सुखायैवोदयाय च ॥ नि. पू. ५३-१३.

तुला आवश्य केलें पाहिजे कारण

इदं च ते पांडुसुत स्वकर्म क्षात्रमुत्तमम् ॥
अपि क्रूरमतिश्रेयः सुखायैवोदयाय च ॥ नि. पू. ५३-१३.

हे अर्जुना! हें युद्ध तुझें क्षत्रियाचें श्रेष्ठ स्वकर्म आहे, तें जरी क्रूर असलें, तरी अत्यंत श्रेयस्कर आहे. तें तुझा धर्म, यश, राज्य, स्वर्ग वगैरे सर्वांच्या अभ्युदयाला व तुझ्या ( चित्तशुद्धिद्वारा ) आत्मसुखालाहि कारण होईल. म्हणून हे स्वधर्मरूप युद्ध करून त्यांत विजयी हो.

अर्जुनः—हे भगवंता! तुझी पर व अपर अशीं दोन रूपें आहेत. त्यांपैकीं कोणत्या रूपाचा आश्रय करून मी मोक्षसिद्धि संपादन करूं?

भगवान्:— हे अर्जुना! सामान्य व परम अशीं माझीं दोन रूपें आहेत. हस्तपादादि अवयवांनीं युक्त, शंखचक्रगदाधारी असें माझें रूप सामान्य होय. आदिअंतरहित, एक, अनामय, असें जें माझें दुसरें रूप आहे, तें परम-रूप होय. त्यास ब्रह्म, आत्मा इत्यादि शब्दांनीं बोधिलें जातें. अर्जुना! जोंपर्यंत तुला ज्ञान झालेलें नाहीं, तोंपर्यंत तूं चतुर्भुजाकार सामान्यरूपाचें पूजन करीत जा. ही पूजा करितां करितां तुला ज्ञान उत्पन्न झालें म्हणजे तूं माझें परमश्रेष्ठ अनादि, अनंत रूप ओळखशील. मग तुला पुनः जन्म-मरणाची पीडा होणार नाहीं. ज्यांना अहंकार नाहीं, अज्ञान नाहीं, आसक्ति नाहीं, जे नित्य आत्म्यामध्यें निश्चल आहेत, जे सुखदुःखादि द्वंद्वापासून मुक्त झालेले आहेत, असे ज्ञानी पुरुष त्या अव्ययपदाला जातात. ज्या पुरुषाचे सर्व उद्योग, इच्छा व संकल्प यांनीं रहित असतात, ज्यांचीं कर्मे ज्ञानाग्नीनें दग्ध झालेलीं आहेत, त्याला ज्ञानी लोक पंडित असें म्हणतात. अर्जुना! तूं सुखदुःखादि द्वंद्वरहित होत्साता आत्मस्वरूपीं नित्य रहा. योगक्षेमाची पर्वा न करितां निरंतर तूं धैर्यवान् होऊन रहा; व जें प्राप्त होईल त्याचा स्वीकार करून पृथ्वीचें राज्य कर. विंध्याद्रि पर्वताचे तुकडे तुकडे होवोत, किंवा प्रलयकालचे वारे वहावयास लागोत, बुद्धिमान् पुरुषानें गुरु व शास्त्र यांनीं सांगितलेला मार्ग सोडून देऊं नये. आपल्या अज्ञाना-मुळें वासना उत्पन्न होते; पण तीच वासना आत्मज्ञानाच्या अभ्यासानें विलयास जाते.

वरील उपदेश ऐकल्यानंतर अर्जुनाच्या मनांतील सर्व शंका दूर झाल्या व तो म्हणाला 'भगवन्! तुझ्या प्रसादानें माझा सर्व मोह व शोक नाहींसा झाला. मला आत्मतत्त्वाची स्मृति झाली. मी आपल्या बंधूंच्या वधाचा कर्ता आहे, इत्यादि प्रकारचा जो मोह होता तो आतां नाहींसा झाला आहे. यास्तव 'नित्य तत्त्वनिष्ठ हो व प्रारब्धप्राप्त व्यवहार समबुद्धीनें कर' असें जें तूं मला सांगितलें आहेस त्याप्रमाणें मी वागेन.'

असें बोलून श्रीहरी ज्याचा सारथी आहे असा तो अर्जुन युद्धास सज्ज होऊन उठेल व सर्व कौरवांचा निःपात करील.

तात्पर्यः—या गोष्टींत असंसक्ति योगाचें स्वरूप सांगून त्यायोगें जीवन्मुक्ति कशी प्राप्त करून घेतां येते, याचें निरूपण केलेलें आहे.



## ( ३० ) जीवटाची गोष्ट.

विचित्रवासनायोगान्नानादेहाप्तिविभ्रमम् ॥
वर्ण्यते जीवटाख्याने भिक्षुमानसचेष्टितम् ॥ नि. पू. ६२

**भावार्थः**—विचित्र वासनांच्या योगानें जीवाला नाना तऱ्हेचे देह प्राप्त होतात हें समजून सांगण्याकरितां जीवटाच्या गोष्टीमध्यें भिक्षूच्या मनाच्या चेष्टेचें वर्णन केलें आहे.

समाधि लावण्याच्या अभ्यासांत तत्पर झालेला असा कोणी एक भिक्षु (संन्यासी) होता. समाधीच्या अभ्यासानें शुद्ध झाल्यामुळें त्याच्या चित्ताला इतकें सामर्थ्य प्राप्त झालें होतें कीं, तें ज्याचें ज्याचें चिंतन करी, तें तें तसेंच घडत असें. एकदा त्याची समाधि उतरल्यावर तो आपल्या मनात कांहीं विचार करीत असतांना त्याला असें वाटलें कीं, "आपण सामान्य (अज्ञानी) जनांच्या चित्तवृत्तींचें क्षणभर ममतीनें अनुकरण करावें," असा विचार करून त्याच्या चित्तानें "आपण भिक्षु नसून अन्य पामर पुरुष आहों." अशी भावना केली. एका क्षणांत

त्याचें चित्त त्या पामर पुरुषाच्या आकाराचें बनलें. अर्थात्—यतिधर्माचें नियंत्रण सुटलें. नंतर त्यानें आपल्याला कांहींतरी नांव असावें, अशी इच्छा केल्याबरोबर त्याला काकतालीयन्यायानें जीवट असें नांव पडलें. तो जीवट नांवाचा स्वप्नपुरुष निजला असतां त्यानें आपल्या स्वप्नांत असें पाहिलें कीं, आपण एका नगरींतील रस्त्यांतून हिंडत आहोंत व रस्त्यांतून हिंडतांना त्यानें पुष्कळ मद्य प्राशन केलें, त्यामुळें त्यास मदनिद्रा प्राप्त झाली. त्याला स्वप्न पडलें, त्यांत त्यानें आपण वेदपठन व सत्कर्माचें अनुष्ठान करणारा ब्राह्मण आहों असें पाहिलें. एकदां तो श्रेष्ठ ब्राह्मण दिवसभर पुष्कळ काम केल्यामुळें दमला व निजला तेव्हां त्यास एक स्वप्न पडलें. त्यांत मी मांडलिक राजा झालो आहे, असें त्यास दिसलें. तो मांडलिक राजा एकदां भोजन झाल्यावर गाढ झोपीं गेला. तेव्हां त्यानें स्वप्नांत असें पाहिलें कीं, आपण दशदिशांचे पालन करणारा सार्वभौम राजा झालो आहे. तो सार्वभौम राजा आपलीं सर्व कामें संपल्यावर स्वस्थपणानें निजला असतां त्यास स्वप्न पडलें. त्यानें स्वप्नांत मी स्वतः अप्सरा झालों आहे, असें पाहिलें. ती अप्सरा रतिश्रांत झाल्यामुळें गाढ झोपी गेली. तिनें स्वप्नांत स्वतःला अति चंचल हरिणी झालेलें पाहिलें. त्या चंचलदृष्टीच्या हरिणीला एकदां निद्रा आली. तेव्हां तिनें आपण एकलता झालों आहोंत असें पाहिलें; कारण पशुपक्ष्यादि जीवांनाहि चित्तामुळें स्वाभाविकपणेंच स्वप्नें पडतात. त्यांनाहि पाहिलेल्या ऐकलेल्या गोष्टींचें स्मरण असतें. ती लता वनदेवीच्या वनांतील क्रीडेच्या लतागृहास शोभविणारी होती. बीजाचे ठिकाणीं जसा अंकुर असतो, त्याप्रमाणें त्या वेलीच्या ठिकाणीं असलेल्या चैतन्यशक्तीमुळें त्या वेलीनें आपल्या सुषुप्त अवस्थेत 'आपण वृक्षावर लोंबणारी लता आहों' असें पाहिलें. ती लताहि कांहीं कालपर्यंत सुषुप्त अवस्थेत जड स्थितीस प्राप्त झाली असतां 'आपण भ्रमर झालों आहों' असें तिनें पाहिलें. तो भ्रमर कमलांतील तंतु व नाद यांचा व्यसनी बनून त्यांतच राहूं लागला. कारण जड बुद्धीचे प्राणी वाटेल त्या वस्तूवर आसक्त होतात. एकदां एक हत्ती तीं कमळें उपटून टाकण्याकरितां प्राप्त झाला. त्या गजानें त्या कमलिनीला उपटून तिचें चूर्ण करून टाकलें त्याबरोबर त्या भ्रमराचेंहि चूर्ण झालें. मरणाचे वेळीं भ्रमरानें हत्तीला पाहिला असल्यामुळें

त्या भावनेनें तो भ्रमर उन्मत्त हत्ती झाला. तो उन्मत्त हत्ती सागराप्रमाणें खोल असणाऱ्या एका ( हत्तींना पकडण्यासाठीं बनविलेल्या ) खड्ड्यांत पडला. पकडणाऱ्या लोकांनीं त्यास बांधून राजाकडे नेलें. तो राजास फारच आवडला. त्या राजानें तो हत्ती आपल्याजवळ ठेवून घेऊन त्यास चांगल्या प्रकारचें शिक्षण दिलें. तो हत्ती एकदां युद्धावर गेला असतां त्यावर शस्त्रांचे फार आघात झाले; त्यामुळे तो हत्ती नाश पावला. त्या हत्तीला गंडस्थलावरील भ्रमर पाहण्याचा अभ्यास असल्यामुळें त्यानें मरतांना भ्रमराची भावना केली व तो हत्ती पुनः भ्रमर झाला. पुनः तो भ्रमर एका हत्तीनें तोडून चिरडून टाकलेल्या कमलाबरोबर चिरडून गेला. तेथें जवळ आलेल्या हंसपक्षाच्या ज्ञानामुळें तो भ्रमर कलहंस झाला. त्या हंसानें पुष्कळ कालपर्यंत अन्ययोनींत जन्म घेऊन शेवटीं पुनः ब्रह्मदेवाचा हंस झाला. ब्रह्मदेवाचा हंस झाल्यावर त्या हंसानें नानाप्रकारचे विहार केले. तो हंस एकदां ब्रह्मदेवाबरोबर रुद्रलोकीं गेला तेथें त्यानें रुद्रास पाहिलें. तेथें त्यास असें वाटलें कीं, " आपण रुद्र व्हावें " व असा त्याचा निश्चय होतांच तो रुद्र झाला. मग तो रुद्र शिवपुरांतील आचारांनीं व विलासांनीं यथेच्छ विहार करूं लागला. तो रुद्र अत्युत्तम ज्ञान व ऐश्वर्यविलास यांच्या योगानें मुख्य रुद्राशीं साम्य पावलेला असल्यामुळें आपल्या अति शुद्ध बुद्धीनें आपला मागील सर्व वृत्तांत पाहूं लागला. कारण तो भगवान् रुद्र त्यावेळीं अज्ञानाचें आवरण नष्ट होऊन विज्ञानरूप झाला होता. आपल्या शेकडों स्वप्नांनीं विस्मित झालेला तो एकांतांत आपल्याशींच म्हणाला:—अहाहा! खरोखर ही विश्वाला मोह पाडणारी विचित्र माया पसरलेली आहे. ती असत्यच आहे. तथापि मरु भूमीवरील मृगजलाप्रमाणें सत्य अशी भासते. आजपर्यंत मी निरनिराळ्या चमत्कारिक संसारण्यांतून भटकलों. तीं संसारण्येंहि खोटींच आहेत. एका सृष्टींत मी जीव झालों. एका जन्मांत मी श्रेष्ठ ब्राह्मण झालों, एकदां राजा झालों, एकदां पद्मवनांत हंसाचे जन्मास गेलों, एकदां विंध्यपर्वतावर हत्ती झालों. याप्रमाणें शेकडों योनी हिंडून मी आतां रुद्र झालों आहे; या भ्रमणांत माझीं हजारों वर्षे, अनेक चतुर्युगें, असंख्य दिन—ऋतुचर्या निघून गेल्या आहेत. मी आतां माझ्या निरनिराळ्या संसारांतील निरनिराळ्या देहांना पाहून त्यांना उठवून योग्य

ज्ञानदान करीन, असा विचार करून त्या रुद्रानें प्रथम मठांत गाढ झोपलेल्या भिक्षूकडे जाऊन त्यास जागें केलें व त्याला उपदेश केल्यावर, तो ज्ञानी झाला. त्या ज्ञानी झालेल्या भिक्षूला आपल्या भ्रमाची आठवण झाली व आपल्या स्वरूपाची ओळख पटली. आपण रुद्र, भिक्षु व जीवट वगैरे आहों असें पाहून त्या तत्त्वज्ञानी भिक्षूस जरी आश्चर्य वाटण्याचें कारण नव्हतें तरी त्यास आश्चर्य वाटलें. नंतर ते रुद्र व भिक्षु दोघेजण, चिदाकाशाच्या कोपऱ्यांत जीवटाचा संसार होता, तिकडे गेले. त्याला जागें करून रुद्रानें त्याला ज्ञानी बनविलें, नंतर ते तिघे झाले. तेव्हां त्यास आश्चर्य वाटण्यासारखी स्थिति असूनहि ते ज्ञानसंपन्न असल्यामुळें विस्मित झाले नाहींत. ते रुद्र, भिक्षु व जीवट तिघेहि शरीरानें वेगळे असूनहि एकरूप होते. नंतर ते ब्राह्मणादिकांच्या संसाराकडे गेले. त्यानाहि रुद्रानें ज्ञानी बनवून आपणाबरोबर घेतलें. असे ते सव रुद्रांश दिव्य ज्ञानानें फार शोभूं लागले. ते सर्व पूर्ण ज्ञानी झाले आहेत, असें पाहून रुद्रानें त्या सर्वांना आपापल्या स्थानास पाठविलें. तेथें त्यांनीं आपल्या कुटुंबासह कांहीं काल घालविल्यानंतर देहांतीं ते सर्व रुद्रपदास प्राप्त झाले.

तात्पर्यः—या भिक्षूच्या गोष्टीनें सर्व जीवांचेंच स्वरूप सांगण्यांत आलें आहे. परमात्म्यापासून भ्रष्ट झालेला प्रत्येक जीव भिक्षुप्रमाणें एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत, दुसऱ्यांतून तिसऱ्यांत अशा अनेक प्रपंचांतून फिरत रहातो व मोक्ष मिळेपर्यंत नाना तऱ्हेचीं दुःखें भोगीत रहातो.

---

## ( ३१ ) वेताळाची गोष्ट.

मायाभ्रांत्यनवस्थाने चिदात्मपरिशुद्धये ॥
वेतालराजसंवादकथोदाहियते शुभा ॥ नि. पू. ७०

**भावार्थः**—मायेची भ्रांति जाऊन चिदात्म्याची शुद्धि होण्याकरितां वेताळ व राजा यांच्या संवादाची शुभकथा या गोष्टींत सांगितली आहे.

विंध्याद्रीपर्वताजवळच्या एका महान् अरण्यांत एक अति धिप्पाड वेताळ रहात होता. तो गर्विष्ट वेताळ एकदां लोकांचा संहार करण्याकरितां एका देशांत प्राप्त झाला. परंतु त्याला कितीही जरी भूक लागली असली तरी निरपराधी मनुष्यास तो निमित्तावांचून मारीत नसे. कारण साधू मोठे न्यायी असतात. तो रानांत राहाणारा वेताळ, क्षुधेनें पीडित झाल्यामुळें न्यायानें मनुष्यांना मारून खाण्याकरितां एका नगरांत प्राप्त झाला. तो तेथें त्यास रात्रीं चोरादिकांच्या निग्रहासाठीं फिरावयास निघालेला राजा दृष्टीस पडला. तेव्हां तो भयंकर वेताळ त्या राजास मोठ्यानें म्हणाला.

वेताळः—राजा! तूं आतां भयंकर वेताळाच्या हातांत सापडला आहेस. आतां जातोस कोठें? तूं आतां मेलास असें समज. आज तूं आतां माझें भोजन झाला आहेस.

राजाः—हे निशाचरा! अन्यायानें जर तूं मला खाशील, तर तुझ्या मस्तकाचे हजारो तुकडे होतील, यांत मुळींच संशय नाहीं.

वेताळः—मी तुला अन्यायानें खाणार नाहीं. असा न्याय आहे कीं, राजानें सर्व याचकांच्या इच्छा तृप्त कराव्या. माझी ही इच्छा तूं परिपूर्ण कर. मी जे प्रश्न तुला विचारीत आहे त्याचीं उत्तरें दे. तीं उत्तरें देण्यास तूं योग्य आहेस. ते प्रश्न ऐकः—

(१) कोणत्या सूर्याच्या किरणांतील परमाणु हीं ब्रम्हांडें आहेत?

(२) कोणत्या वायूमध्यें महाकाशरुपी रेणू उडत असतात?

(३) एका स्वप्नांतून दुसऱ्या हजारों स्वप्नांत जाणारा व पुढच्या पुढच्या स्वप्नांत पूर्व पूर्व स्वप्नाची सत्यता सोडणारा असा कोण वरें आपलें अत्यंत प्रकाशरूप व स्वच्छ स्वरूप सोडीत नाहीं?

(४) केळीच्या खांबांत जसें एका सोपटाच्या आंत दुसरें सोपट असतें, त्याप्रमाणें सर्व पदार्थांच्या आंत राहणारा जो एक अणु आहे तो कोण?

(५) ज्या अणूपुढें ब्रह्मांडें, आकाश, भुवनें, सूर्यमंडळ व मेरु पर्वत हीं परमाणुप्रमाणें लहान दिसतात, इतका तो मोठा असूनहि जो आपलें अणुत्व सोडीत नाहीं, असा तो अणु कोण आहे?

( ६ ) कोणत्या निरवयव व परमाणुरूप असणाऱ्या महापर्वताच्या शिलेच्या मध्यभागीं असणारा घन गाभा हें जगत्रय बनला आहे ?

असे वेताळाचे प्रश्न ऐकून तो राजा मोठयानें हसून त्या प्रश्नांचीं उत्तरें सांगूं लागला.

राजाः—( १ ) चिदात्मा हाच सूर्य आहे. हा या सर्व जगांना प्रकाशित करितो. हीं जीं ब्रह्मांडें या चिदाकाशांत विस्तार पावलीं आहेत, तीं या विज्ञानसूर्याचे त्रसरेणू आहेत. या श्रेष्ठ सूर्याच्या योगानें हीं ब्रह्मांडें उत्पन्न होतात व अनुभवास येतात.

( २ ) कालसत्ता, आकाशसत्ता, वायुसत्ता, चिदाभाससत्ता इत्यादि सर्व चित् स्वरूप आहेत. या सर्व सत्ता ·परमात्ममय वायूमध्यें चंचल रजाप्रमाणें स्फुरण पावतात.' पुष्प आपल्या ठिकाणीं सुवास धारण करतें, त्याप्रमाणें परमात्मा आपल्या ठिकाणीं कालादिसत्तांची कल्पना करतो.

( ३ ) जगद्रूपी महास्वप्नांत ब्रह्म हें जीवरूपानें एका स्वप्नांतून दुसऱ्या स्वप्नांत ( एका जन्मांतून दुसऱ्या जन्मांत ) जातें, तथापि तें आपलें निर्विकार व शांत स्वरूप सोडीत नाहीं.

( ४ ) केळीच्या खांबांत जसें एका सोपटावर दुसरें सोपट असतें, त्याप्रमाणें हें विश्व जरी विचित्र प्रकारचें दिसत आहे, तरी तें ब्रह्माच्या आंत विवर्त पावणारें आहे.

( ५ ) तो परमात्मा अतीशय सूक्ष्म आहे, तो कोणत्याहि इंद्रियास गोचर होत नाहीं, त्यामुळें तो परमाणुरूप आहे. तसेंच तो परमात्मा अनंत ( अमर्यादित ) असल्यामुळें मेरु आदि करून अनंत मोठया पदार्थांना मूळ आधार झाला आहे. मेरु आदिकरून अती मोठे पदार्थ त्या परमात्म्यापुढें परमाणुप्रमाणें भासतात. परंतु तो कोणत्याहि इंद्रियास गोचर न होण्याइतका सूक्ष्म असल्यामुळें तो परमाणु आहे. सर्वत्र त्याची व्याप्ति असल्यामुळें तो महापर्वताप्रमाणें आहे.

( ६ ) हा परमात्मा सावयव ( स्थूल प्रपंचाकार ) दिसतो, तथापि वस्तुतः तो निरवयव आहे. हा पुरुष विज्ञानरूप आहे व तो सर्वांना

आधाररूप आहे. या विज्ञानरूप परत्म्याच्या आंत मज्जेप्रमाणें जगत्रय राहिलेलें आहे. सारांश, जगत्रय हें विज्ञानाच्यामध्यें राहिलेलें आहे.

अशीं राजानें दिलेलीं सर्व उत्तरें एकून वेताळ शांत झाला. नंतर त्याच्या ठिकाणीं विचार उत्पन्न झाला; मीच आत्मा आहे अशी त्यानें भावना केली. त्याचें मन शांत झालें. एकांताचा आश्रय करून ध्यान करितां करितां असह्य क्षुधेलाहि विसरून तो समाधिस्त झाला.

तात्पर्यः--सारांश, हें सर्व जग चिद्रूप अणूमध्यें संस्थित आहे. लहान मुलाच्या भ्रांतीनें कल्पिलेल्या वेताळ शरीराप्रमाणें चिदणूच्या उदरांत असलेलें जगत् विचारानें विलीन होतें. त्यानंतर जें अवशिष्ट राहतें तेंच परमपद होय.

## ( ३२ ) भगीरथाची गोष्ट.

स्थिरबुद्धिरसंमूढो यथाप्राप्तानुवर्तिनः ॥
राज्ञोभगीरथस्येव दुःसाध्यमपि साध्यति ॥ नि. पू. ७३-७

भावार्थः—ज्याची बुद्धि स्थिर झाली आहे व ज्याचा मोह नाहींसा झाला आहे व जो प्रारब्धानें जें प्राप्त होईल त्याप्रमाणें वागणाऱ्या भगीरथराजाप्रमाणें इतरांना कष्टसाध्य असलेलें कार्यहि (गंगेला पृथ्वीवर आणणें) साध्य करितां येतें.

भगीरथ नांवाचा एक परमधार्मिक राजा होता. तो समुद्रवलयांकित पृथ्वीचा जणूं काय कपाळावरील तिलकच होता. त्यानें स्वर्ग व पाताळ यांतून वहाणाऱ्या जगाच्या यज्ञोपवीतरूप गंगाप्रवाहाचा तिसरा पदर या पृथ्वींत नित्य उतरावयास लावून पुरा केला. ब्रह्मदंडानें दग्ध झालेल्या व म्हणूनच अधोगतीस प्राप्त झालेल्या आपल्या पितरांना—( सागरपुत्रांना ) गंगारूपसोपान पद्धतीनें ब्रह्मलोकांत नेऊन प्रतिष्ठित केलें. असा तो राजा तरुण असतांना अत्यंत दुःखमय व संकटमय प्रपंचाचा विचार करीत असे. त्यावेळीं त्याच्या मनांत वैराग्याचा एक कण उत्पन्न झाला. भर तारु-

पर्यंत वैराग्य उत्पन्न होणें म्हणजे मारवाड देशांत दैवयोगानें उत्तम वेल उगवण्याप्रमाणेंच कठीण होय. एकदां तो राजा एकांतांत बसून या जगद्यात्रेचा असा विचार करूं लागला.

भगीरथः—दररोज दिवस उगवावयाचा, पुनः रात्र पडावयाची. दररोज तींच तींच दानें द्यावयाचीं व तेच तेच शेकडों उपभोग घ्यावयाचे. तींच तींच कर्में करून तेंच शुद्ध नीरस फल प्राप्त व्हावयाचें. जें प्राप्त झालें असतां या लोकांत अधिक मिळवावयाचें शिल्लक रहात नाहीं, तेंच मिळविण्याकरितां कर्म करणें त्याला मी सुकृत समजतो. बाकीचीं कर्में केवळ दुःखदायक होत. मूढबुद्धि मनुष्याला पुनः पुनः तींच तींच कर्में करण्यास लाज वाटत नाहीं. पण मूर्खाप्रमाणें असें दुसरा कोणता विचारी मनुष्य करील ?

याप्रमाणें भगीरथ राजा आपल्याशीं पुष्कळ विचार केल्यावर उद्विग्न झाला व संसारास भिऊन आपले गुरु त्रितलमुनि यास एकांतांत भेटून विचारूं लागला.

भगीरथः—भगवन् ! जरा, मरण, मोह इत्यादिकापासून उत्पन्न होणाऱ्या भयंकर दुःखाचा अंत कशानें करतां येतो, तें मला सांगा.

त्रितलः—राजा ! परमात्मा सर्वत्र सारखा भरलेला आहे, असें समज. नित्य समदृष्टि ठेवल्यानें, निर्विशेष रीतीनें स्फुरण पावणाऱ्या परमात्म्याच्या सतत ध्यानानें, ज्ञेय वस्तु जें ब्रह्म त्याचें ज्ञान झाल्यानें व अखंड आत्म्याचें अनुसंधान ठेवल्यानें संसारांतील सर्व दुःखें नाहींशीं होतात. अहंकारादि ग्रंथी तुटतात, सर्व संशय लयास जातात, सर्व कर्में समत्वास प्राप्त होतात. शुद्ध ज्ञान स्वरूप असणारा परमात्मा हाच ज्ञेय होय. तोच सर्वत्र भरलेला आहे. त्याचा कधीं अस्त होत नाहीं; उदयहि होत नाहीं.

भगीरथः—मुनीश्वर ! हें सर्व चिन्मात्र, सर्वव्यापी, शांत अच्युत ब्रह्म आहे. देहादि इतर कोणतीहि वस्तु सत्य नाहीं, हें मला समजतें. पण त्या ब्रह्माचें ठिकाणीं माझें मन स्थिर होत नाहीं, याचें कारण काय तें सांगा.

त्रितलः—राजा ! ज्ञानसंपादन करण्याचा अभ्यास केला असतां चित्त आत्मनिष्ठ बनतें. आत्मज्ञानाचा अभ्यास अशा तऱ्हेचा आहे. कर्मामध्यें व

फळामध्यें आसक्ति न ठेवणें, पुत्र, स्त्री व गृहादिक यांत हीं माझीं अशा अभिनिवेश न ठेवणें, इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली असतां मनाचा समतोलपणा राखणें, आपण आत्माच आहों अशी सतत भावना करणें, एकांत व पवित्र देशाचें सेवन करणें, जनसमूहांत रहाण्याचें प्रेम नसणें, श्रवण-मनन-निदिध्यासनाचा अभ्यास करणें, तत्त्वज्ञानानें परमार्थ उत्त्वाचें स्पष्ट दर्शन, हें ज्ञानाचें उपाय म्हणजे ज्ञान आहे. याच्या जें उलट, तें सर्व अज्ञान होय. हें ज्ञान, राग व द्वेष यांचें क्षय करणारें आहे. संसाररूप व्याधीवर जालीम औषध आहे. सर्व साधनांचा अहंकार हें मूळ साधन आहे. यास्तव हे राजन्! अहंभावाची शांति झाली असतां ज्ञान प्राप्त होतें.

भगीरथः--हे महाभाग ! हा अहंकार या शरीरांत दीर्घ कालापासून आरूढ झाला आहे, याला कसें काढून टाकतां येईल, तें मला सांगा.

त्रितलः—राजा ! अत्यंत दीर्घ प्रयत्नानें विषयोपभोगाची वासना सोडून परिपूर्ण आत्मसत्तेचा आश्रय केल्यानें हा अहंकार नाश पावतो. ' मी राज्य टाकलें तर लोक मला मानणार नाहींत, शत्रू मला हसतील, सर्वांच्या इच्छा पूर्ण करण्यास समर्थ असलेल्या मी भिक्षा कशी मागावी? निकृष्ट दर्जाच्या अन्नपानानें मी जिवंत कसा राहूं शकेन ? " इत्यादि चिंतनामुळें प्राप्त झालेली लज्जा, अभिमान व ममता यांमुळें गृहांत पूर्वी-प्रमाणेंच अडकून राहणें, हा प्रपंचरूपी पिंजरा जोंवर सर्वस्वत्यागानें भग्न झाला नाहीं, तोंवर अहंकार अत्यंत विकसित होऊन नाच करणारच. यास्तव आपल्या विवेकशाली बुद्धीनें तूं त्या सर्व लज्जादिकांचा त्याग करून जर निश्चल राहशील, तर तुझा अहंकार तत्काल विलय पावून तूंच परमपद होशील. ज्याचीं छत्रचामरादि चिन्हें शांत झालीं आहेत असा व खरो-खर अकिंचन होऊन तूं सर्व राज्यश्री शत्रूंच्या हवाली करून सर्व देहा-भिमान टाकून दे. शत्रूंच्या घरीं भिक्षा माग. मग गुरुचाहि संतुष्टचित्त होऊन त्याग कर. कारण तूं जर अशा मुमुक्षूंच्या सर्व उच्च लक्षणांनीं संपन्न झालास तर तूं सर्वोत्तम ब्रह्मच आहेस. मग तुझ्या ठिकाणीं संसाराची संभावनाहि नाहीं.

त्या गुरूच्या तोंडचें हें भाषण ऐकून भगीरथ राजानें आपलें पुढील कर्तव्य ठरविलें व लगेच त्याप्रमाणें वागण्यास सुरवात केली. कांहीं दिवस गेल्यानंतर भगीरथ राजानें सर्वस्वाचा त्याग करण्याकरितां अग्निष्टोम नांवाचा यज्ञ सुरू केला. या यज्ञांत त्यानें गाई, भूमि, अश्व, सुवर्ण वगैरे सर्व प्रकारच्या धनाचें, द्विज, देव, पंडितजन, बंधु वगैरे लोकांना त्यांच्या गुणावगुणांचा विचार करून दान केलें. तीन दिवसांत त्यानें आपलें सर्वस्वाचें दान केलें; फक्त अंगावरील वस्त्र तेवढें शिल्लक ठेविलें. नंतर आपलें सर्व संपत्तिविहीन राज्य आपल्या राज्याच्या सीमेवर राहणाऱ्या आपल्या शत्रूला तृणाप्रमाणें देऊन टाकिलें. नंतर तो भगीरथ राजा फक्त नेसलेल्या वस्त्रानिशी आपल्या देशाच्या बाहेर पडला व जेथें त्याला नांवानें अगर तोंडावरून कोणी ओळखणार नाहीं अशा गांवांतून, अरण्यांतून व नगरांतून तो धैर्यवान् राजा हिंडूं लागला. पुढें थोडक्याच कालांत त्याच्या सर्व तृष्णा शांत झाल्या; त्याच्या ठिकाणीं परम शांति प्राप्त होऊन तो परमात्म्याच्या ठिकाणीं विश्रांति पावला. पुढें एकदां पृथ्वीचे पाठीवर फिरतां फिरतां तो शत्रूनें व्यापलेल्या आपल्या राज्यांत शरीराचें भान नसल्यामुळें प्राप्त झाला. तेथें आपल्यासमोर असलेल्या नागरिकांच्या व प्रधानांच्या घरांत जाऊन त्यानें भिक्षा मागितली. तेव्हां नागरिकजनांनीं व प्रधानांनीं खिन्न होऊन त्याची पूजा केली व ते म्हणाले, 'प्रभो! तूं आपल्या राज्याचा स्वीकार कर.' त्याच्या शत्रूनेंसुद्धां त्याची याप्रमाणें विनंति केली. पण त्यानें भिक्षेवांचून कशाचाहि स्वीकार केला नाहीं. तृणाप्रमाणें सर्वांचा त्याग केला. याप्रमाणें कांहीं दिवस तेथें राहून तो दुसरीकडे निघून गेला. तेव्हां त्यास पाहून 'अरे! हा भगीरथ राजा, काय ही याची दशा!' असें म्हणून लोक दुःख करूं लागत. नंतर तो आत्म्याशिवाय इतर कोणत्याहि गोष्टीबद्दल पर्वा न करणारा, केवल आत्म्यामध्यें विश्रांति पावलेला भगीरथ एकदां सहज त्रितल गुरूस भेटला. तेव्हां त्या त्रितलमुनीनें आपल्या योग्यतेप्रमाणें त्याचें स्वागत केलें. नंतर ते गुरुशिष्य कांहीं काल पर्वतावर, वनांत, ग्रामांत व नगरांत असे राहिले. ब्रह्मस्वरूपाला प्राप्त झालेले ते दोघे समतेस प्राप्त झालेले होते. पुढें त्या स्वस्थ चित्त झालेल्या गुरुशिष्यास देह धारण करण्याबद्दल दुःख वाटूं लागलें. ते

म्हणाले:—हा देह धारण करून काय करावयाचें आहे; अथवा ह्याचा त्याग करून तरी काय मिळवावयाचें आहे ? तर मग हा देह आहे तसाच ठेवून आपल्या आचाराप्रमाणें वागून प्राप्त होतील तीं कर्में आचरावीत. असा निश्चय करून एका वनांतून दुसऱ्या वनांत संचार करीत ज्यांत विषयानंदाचा लेशहि नाहीं अशा परमानंदास प्राप्त झाले. त्याच्या अशा आचरणानें सिद्ध संतुष्ट झाले व त्यांनीं द्रव्य, घोडे, अणिमादि ऐश्वर्य त्यांस अर्पण केलें. परंतु त्याचा त्यांनीं मुळींच स्वीकार केला नाहीं.

पुढें भगीरथ राजा फिरतां फिरतां दुसऱ्या एका देशांतील राजधानींत आला. त्या देशांतील राजा नुकताच मरण पावला होता. त्याला अपत्य नव्हतें. म्हणून कोणा एखाद्या सद्गुणी मनुष्यास राज्यपदावर बसवावें म्हणून तेथील मंत्रिमंडळ शोध करीत असतां त्यांना भगीरथ भिक्षा मागत असतांना आढळला. त्यास ओळखून त्यांनीं त्याला राज्यपदावर बसविलें. भगीरथ राजा हत्तीवर आरूढ झाला. नंतर 'भगीरथाचा जयजयकार असो' असा जयशब्द प्रजाजनांनीं उच्चारिला. त्या शब्दानें मोठमोठ्या पर्वताच्या गुहा दणाणून गेल्या. तेथें त्या राज्याचें पालन करीत असतां त्याच्या पूर्वीच्या राज्यांतील प्रधानमंडळी त्याच्याकडे येऊन मोठ्या आदरानें राजास म्हणाली,

प्रधान मंडळी:— महाराज ! आपण पूर्वी राज्य सोडतांना आपला जो सामंत शत्रु राजा करून दिला होता, त्याला मृत्यूनें हरण केलें आहे. यास्तव आपण आमचें पालन करण्याची आमच्यावर कृपा करा. अनायासें प्राप्त झालेल्या लक्ष्मीचा त्याग करणें योग्य नाहीं.

याप्रमाणें त्या प्रधानमंडळींनीं प्रार्थना केल्यानंतर भगीरथ राजानें त्यांच्या विनंतीचा अंगीकार केला. मग तो सप्तसमुद्रवलयांकित पृथ्वीचा सार्वभौम राजा झाला. तो सर्वत्र समदृष्टि, शांतचित्त, मौनी, आसक्तिविरहित, मत्सरशून्य, प्रारब्धकर्मानुसार प्राप्त होणारें कार्य करणारा व तत्त्वज्ञानानें फार मोठें कौतुक पाहूनहि आश्चर्यचकित न होणारा असा होता. पुढें त्या भगीरथ राजानें एक हजार वर्षेपर्यंत अत्यंत उग्र तपश्चर्या केली; व आपले पूर्वज साठ हजार सगरपुत्र कपिलमुनीचा अपमान केल्यामुळें अधोगतीस गेले

होते, त्यांचा उद्धार करण्याकरितां त्यानें स्वर्गांतून पृथ्वीवर गंगा आणली. तेव्हांपासून पृथ्वीवर आलेल्या गंगेला भागीरथी असें नांव प्राप्त झालें.

तात्पर्यः—भगीरथ राजानें राज्यत्याग केल्यावरहि फिरून राज्याचा स्वीकार केला व राज्य करीत असतां जी समदृष्टि धारण केली, अशीच समबुद्धि व शांतबुद्धि प्रत्येक मुमुक्षूनें आपल्या अंगीं बाणवून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. यावरून जीवन्मुक्ताच्या ठिकाणीं कोणत्याच तऱ्हेचा आग्रह नसतो व तो प्रारब्धकर्मानुसार वागत असतो.

---

## (३३) किराटाची गोष्ट.

**एवं यथा किराटेन कपर्दान्वेशणेन तत् ॥**
**रत्नं लब्धं जगन्मूल्यमहोरात्रमखेदिना ॥** नि. पू. ८३-२३.

**भावार्थ**—अहोरात्र खिन्न न होतां एका कवडीला निग्रहानें शोधीत रहाणाऱ्या किराटाला जगाच्या मोलाचें रत्न ( चिंतामणि ) सापडलें.

विंध्य पर्वतावरील अरण्याच्या एका कोपऱ्यांत धनधान्य संपन्न किराट ( खेडेगांवांतील वाणी ) या नांवाचा एक अत्यंत कृपण मनुष्य रहात होता. तो एकदां विंध्यपर्वताच्या जंगलांतून जात असतां त्याच्या जवळची एक कवडी रानांतील गवतांत पडली. कृपणस्वभावामुळें तो त्या कवडी-करितां त्या रानांतील सर्व गवत, धुसकट वगैरे मध्यें तीन दिवस मोठया यत्नानें शोध करीत राहिला. त्यावेळीं त्याच्या मनांत असा विचार आला कीं, ' ही कवडी मिळाली असता तिचें कांहीं तरी विकत घेऊन मी तें विकून एका कवडीच्या चार कवड्या मिळवीन. कांहीं कालानें त्या चार कवड्यांच्या आठ करीन, त्यांच्या शंभर, सहस्र इत्यादि अनंत कवड्या करून पुष्कळ धन संपादन करीन. इत्यादि मनोराज्य करीत तो अत्यंत दीन झालेला किराट त्या जंगलांत अहोरात्र आळस सोडून ती हरवलेली कवडी हुडकीत राहिला. लोक त्याचा नाना प्रकारें उपहास करूं लागले.

पण त्यानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. त्यानंतर तीन दिवसांनीं त्याला त्या जंगलांत पूर्ण चंद्रबिंबाप्रमाणें मोठा तेजस्वी चिंतामणि सांपडला. तो मिळाल्यामुळें त्याचें चित्त अतिशय संतुष्ट झालें. नंतर तो चिंतामणि घेऊन आपल्या घरीं आला व त्या चिंतामणीच्या लाभामुळें त्याचे सर्व दारिद्र्यादि दोष नाहींसे झाले व तो आपल्या घरीं मोठ्या आनंदानें राहिला.

तात्पर्यः—अहोरात्र खिन्न न होतां कवडीला निग्रहानें शोधीत रहाणाऱ्या किराटाला जसें जगाच्या मोलाचें रत्न (चिंतामणि) मिळालें, त्याप्रमाणें गुरूचा उपदेश ऐकल्यानंतर अधिकारी शिष्यानें रात्रंदिवस आत्मचिंतन केल्यास त्याला आत्मसाक्षात्कार होत असतो. कवडीला अनन्य चित्तानें हुडकल्याशिवाय किराटाला चिंतामणि मिळाला नाहीं. यास्तव चिकाटीनें केलेला शोध या श्रेष्ठ उपायाच्या द्वारां, कवडी जशी चिंतामणीच्या प्राप्तीचा उपाय झाली, त्याप्रमाणें मननाच्या द्वारा गुरुपदेश वस्तुतः आत्मज्ञानाचें कारण नसला तरी कारण होतो. सारांश, यत्नानें एकाद्या क्षुद्र वस्तूचा शोध करितां करितां उत्तम वस्तूचा लाभ होत असतो.



## (३४) चूडालेची गोष्ट.

### (अथवा शिखिध्वज राजाचें आख्यान.)

द्वंद्वं पूर्वं परित्यज्य क्रोडीकृत्य मनः खगम् ॥
शांतमात्मनि तिष्ठ त्वं शिखिध्वज इवाचलः ॥ नि. पू. ७७-२.

भावार्थः—अगोदर या सर्व वैभवाचा त्याग करून व मनोरूप पक्षाला हृदयांत निरुद्ध करून तूं शिखिध्वज राजाप्रमाणें आत्म्यामध्यें शांत रहा.

पूर्वी द्वापारयुगामध्यें या भरतखंडांतील उज्जयिनी नगरींत शिखिध्वज या नांवाचा एक मोठा राजा होऊन गेला. तो धैर्य, औदार्य, क्षमा, दया, शांति वगैरे गुणांनीं युक्त होता. तो मोठा शूर, सदाचारी व सद्गुणी होता. त्याचा पिता मांडलिक राजाच होता. पण शिखिध्वज राजाच्या

## चूडालेची गोष्ट

लहानपणींच तोहि स्वर्गवासी झाल्यामुळें शिखिध्वज राजानें आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षीच दिग्विजय करून सार्वभौमराज्य संपादन केलें. नंतर त्यानें सुराष्ट्राधिपतीच्या चूडाला या नांवाच्या सुंदर कन्येशीं विवाह केला. पुढें त्या दोघांचें एकमेकावर अत्यंत प्रेम बसलें. व तें दिवसानुदिवस वाढत जातां जातां इतकें वाढलें कीं, दोघांचे पाचभौतिक देह जरी भिन्न होते, तरी आंतून तीं दोघेहि एकरूपच होऊन राहिलीं होतीं. तीं दोघे पुष्कळ वर्षेपर्यंत यौवनदशेंतील विषयांचा यथेच्छ उपभोग घेण्यांत दंग झाली. अशा-हेनें अनेक वर्षे लोटल्यानंतर फुटलेल्या कुंभातून पाणी गळून जातां जातां जसें कमी होतें, त्याप्रमाणें हळु हळु त्यांचें आयुष्य कमी कमी होत चाललें. याप्रमाणें तारुण्याचा भर दिवसानुदिवस कमी होत जाऊन त्यांच्या शरीरावर म्हातारपणाची कळा दिसूं लागली. पिकलेलें फळ जसें झाडावरून खालीं पडल्याशिवाय रहात नाहीं, तसें या क्षणभंगुर प्रपंचांत मरण टळणें शक्य नाहीं; तें केव्हां तरी आपल्याला प्राप्त होणारच, असा विचार मनांत येऊन संसारांतील सर्व व्यवहार केळीच्या गाभ्याप्रमाणें असार आहेत, असें त्यांना वाटूं लागलें व शेवटीं त्याविषयीं पूर्ण विरक्ति उत्पन्न झाली. 'या संसारांत अत्यंत शुभकारक व स्थिर असें म्हणण्यासारखें कांहीं नाहीं' असें त्यांना वाटूं लागलें. 'जें प्राप्त करून घेतलें असतां पुनः जन्ममरणादि दुर्दशा भोगण्याचा दुःखद प्रसंग आपणावर येणार नाहीं, असें कांहीं तरी प्राप्त करून घ्यावें' असा त्या दोघांनीं निश्चय केला व शेवटीं पुष्कळ विचार करून अध्यात्मशास्त्र हेंच संसारव्याधीवर जालीम औषध आहे व त्या शास्त्रांत सांगितलेल्या आत्मज्ञानरूप पवित्र मंत्रानेंच संसाररूप महाव्याधि नाहींशी होईल, असा निर्णय करून त्यांनीं एकनिष्ठपणानें त्या शास्त्राचा अभ्यास करण्यास सुरवात केली. त्यांनीं त्या शास्त्राचें पुष्कळ श्रवण करून मननहि केलें; तीं एकमेकास त्याचाच बोध करूं लागलीं व अशा तऱ्हेनें त्यांतच त्यांचें चित्त रममाण होऊं लागलें. त्यांचीं सर्व कर्मेंहि निष्कामपणानें होऊं लागलीं. नंतर ती चूडाला आत्मज्ञानी लोकांच्या तोंडून संसारसमुद्रांतून तरून जाण्यास अत्यंत उपयोगी पडणारे अनेक तात्त्विक सिद्धांत ऐकून रात्रंदिवस आपल्याशीं आत्म्याबद्दल विचार करूं लागली. ती रोजचीं व्यवहारांतील कर्मे करीत असतांना किंवा तीं करीत नसतांनाहि आपल्या

शुद्ध बुद्धीनें शरीर, इंद्रियें, प्राण, इत्यादिकांच्या संघातांत हा चिद्रूप आत्मा कोण आहे? मी कोण आहे? हा संसाराचा मोह कोणाला प्राप्त झाला आहे? तो कोठून उत्पन्न झाला आहे? व तो कोठें आहे? या संबंधीं पुढीलप्रमाणें सतत विचार करीत असेः—

## चूडालेचा विचार

चूडालाः—मी स्वतः पाषाणाप्रमाणें जड नसून चेतन आत्मा आहे म्हणून हा स्थूल हाडामासाचा देह 'मी' नव्हे; कारण तो जड व मूढ आहे. हात पाय वगैरे कर्मेंद्रियें या स्थूल देहाहून भिन्न नाहींत म्हणून तींहि जडच आहेत. चक्षु, श्रोत्र वगैरे ज्ञानेंद्रियेंहि जडच आहेत. कारण काठीनें मातीचें ढेकूळ जसें उडविलें जातें, त्याप्रमाणें ज्ञानेंद्रियगणास मनाकडून प्रेरणा केली जाते. अर्थात् मनहि काठीप्रमाणें जडच आहे. कारण तें फक्त संकल्प विकल्प करितें व गोफणीनें जसा दगड फेकला जातो तसें निश्चयात्मक बुद्धीच्या योगानें मनाला प्रेरणा होते. बुद्धि सुद्धां जडच आहे. कारण दोन उंच डगरीच्या मधील सखल प्रदेशांतून नदी जशी वहाते, त्याप्रमाणें अहंकाराकडून बुद्धीला प्रेरणा होते. अहंकारहि निःसार व शवाप्रमाणें जड आहे. कारण बालक भ्रमानें यक्षाला जसा उत्पन्न करितो, त्याप्रमाणें जीव अहंकाराला उत्पन्न करितो; त्यामुळेंच बालकानें निर्माण केलेल्या यक्षाच्या काल्पनिक देहाप्रमाणेंच हा अहंकार तुच्छ व जड आहे. जीव हा हृदयांत असणाऱ्या चिदात्म्याचा आभास आहे. तो आंतून विंबभूत चैतन्यानें परिपूर्ण होऊन ज़िवंत राहतो. त्याच्या चैतन्यामुळेंच हा सत्तावान् होतो. हां! मला आतां सर्व कांहीं समजलें. दृश्य पदार्थांचा संबंध घडल्यामुळें जणुं कलंकित झालेल्या या नित्य चिद्रूप आत्म्याकडून हा जीव जिवंत राखला जातो. सुगंध हा वायूच्या योगानें जसा पसरतो, किंवा सखलप्रदेशामुळें नदी जशी वेगानें वाहते, त्याप्रमाणें दृश्यपदार्थांचा संबंध झाल्यामुळें हा चिद्रूप आत्माहि जडासारखा झाला आहे. तापलेल्या पाण्यांत संसर्गानें शिरलेला किंवा समुद्राच्या पाण्यांत नित्य तादात्म्य पावून राहिलेला अग्नि जसा आपलें प्रकाशस्वरूप सोडतो, त्याप्रमाणें आत्मा अनात्म्यादीं संसर्ग पावून आपलें भास्वर स्वरूप सोडतो व स्वतः चिद्रूप

असूनहि तो जड बनतो व नसल्यासारखा भासतो. तथापि आत्मस्वरूपाच्या ज्ञानानें त्याचा मोह जातो. आतां ही गुह्य चित् कोणत्या उपायानें या दृश्य भ्रमाला सोडून साक्षात्कारयुक्त होईल बरें ?

अशातऱ्हेनें पुष्कळ वेळ विचार केल्यावर चूडालेला आत्मतत्त्वाचा बोध झाला व नंतर ती आपल्याशीं म्हणाली:—

चूडालाः—अहो ! खरोखर हें निरामय ज्ञेय आत्मतत्त्व समजण्यास मला फार काळ लागला. अहो ! मन, बुद्धि व इंद्रियें हीं सर्व व्यापक चिद्रूप आत्मस्वरूपाला संकुचित करणारीं आहेत. परंतु वस्तुतः ती मिथ्याच आहेत. महासत्ता असें जिला म्हणतात, ती एक महाचित्च आहे. ती निष्कलंक, सर्वात्मक, शुद्ध व अहंकाररहित आहे. अध्यात्मशास्त्रामध्यें हिलाच ब्रह्म, परमात्मा इत्यादि नांवें दिलीं आहेत. अशी ही महाचित्च मी आहे. अहाहा ! मला हें फार दिवसांनीं समजलें आतां मला पूर्ण शांतता मिळून मी सर्वप्रकारें सुखी झाली आहे.

याप्रमाणें चूडाला दररोज विचार करून अंतर्मुख झाली व आत्मस्वरूपांत अधिक स्थिर होत चालली. तिच्या सर्व इच्छा नाहींशा झाल्या. ती कोणत्याहि वस्तूचा द्वेषामुळें त्याग किंवा लोभामुळें स्वीकार करीनाशी झाली. तर प्रारब्धकर्मानुसार जें कांहीं प्राप्त होईल त्याचा स्वीकार करूं लागली. तिला परमात्म्याचा लाभ झाल्यामुळें ती आपल्याच ठिकाणीं पूर्ण विश्रांत पावली. त्यामुळें तिला इतका आनंद झाला कीं त्याचें वर्णन शब्दांनीं करण्यासारखें नाहीं. आत्मानात्मविवेकाचा दृढ अभ्यास केल्यामुळें तिच्या ठिकाणीं आत्म्याचा उदय होऊन निरतिशय आनंदाचा आविर्भाव झाल्यामुळें ती फारच शोभिवंत दिसूं लागली. अशा त्या सुंदर चूडालेची अपूर्व शोभा पाहून एकदा शिखिध्वजराजा तिला हंसत हंसत म्हणाला:—

## चूडालेचें सौंदर्य वाढलें

शिखिध्वजः—हे सुकुमार चूडाले ! अलीकडे तूं पुनः तरुण झाल्याप्रमाणें अधिकच शोभूं लागली आहेस. तूं त्याच आकारानें व त्याच कोमल हस्तपादादि अवयवांनीं युक्त असलीस, तरी या तुझ्या ठिकाणीं

दिसणाऱ्या अधिक शोभेमुळें तूं पहिल्याहिपेक्षां निराळीच झाल्यासारखी दिसत आहेस. तूं काय अमृत प्यालें आहेस ? कीं तुला साम्राज्यच प्राप्त झालें आहे ? कीं रसायनादि प्रयोग व मंत्रसिद्धि यांच्या योगानें अमर बनली आहेस ? हे प्रिये ! साम्राज्याहून किंवा इंद्रपदाहून अधिक कांहीं तूं मिळविलें आहेस कीं काय ?

चूडाला:—महाराज ! मी हें सर्व मूढ जनांना प्रसिद्ध असलेलें 'शरीरच मी ! हा भ्रम सोडून नामरूपरहित 'ब्रह्मच मी आहे' असें मला पूर्ण ज्ञान झाल्यामुळें मी इतकी शोभिवंत झाली आहे. फार दूर असलेल्या व न भोगलेल्याहि भोगांनीं मी त्यांचा जणुं भोग घेऊन संतुष्ट झाल्यामुळें शोभिवंत दिसत आहे. मला हृदयस्थ ब्रह्म स्वरूपांतच रममाण व्हावेसें वाटतें. राज्यातील ऐश्वर्यात रममाण व्हावेसें वाटत नाहीं. मी आत्मरूप झाल्यामुळें सर्व जगाची स्वामिनी झाली आहे. मी सुखाची व अर्थाची इच्छा करीत नाहीं, अनर्थाला सोडण्याचीहि इच्छा करीत नाहीं व आहे या स्थितीहून निराळ्या स्थितीचीहि इच्छा करीत नाहीं. जें कांहीं प्राप्त होईल त्यांतच मी संतुष्ट रहाते. म्हणून, महाराज ! मी आपणाला इतकी सुंदर दिसत आहे. सात्विक प्रज्ञा व शास्त्रदृष्टि याच माझ्या सख्या असून त्यांच्याच बरोबर मी रममाण होते. म्हणून मला माझ्या करमणुकीसाठीं बाहेरच्या दुसऱ्या सख्यांची जरूरी नाहीं. सारांश, हे नाथ ! केवळ आत्मज्ञानानेंच मी आताशा इतकी शोभिवंत व सुंदर दिसत आहे.

याप्रमाणें आत्मविश्रांति हेंच आपल्या अतिशय शोभेचें कारण सांगणाऱ्या त्या सुंदरीच्या भाषणाचा अर्थ न समजल्यामुळें राजा मोठ्यानें हसला व म्हणाला:—

शिखिध्वजः—हे चूडाले ! तूं कांहींतरी बडबडत आहेस; तूं अगदीं वेडी आहेस. माझ्यासारख्या शहाण्याला पटेल असें भाषण तुला करितां येत नाहीं. मी देह नाहीं तर देहाहून निराळी आहे, मी न भोगलेल्या भोगांनींच संतुष्ट झाली आहे, असें परस्परविरुद्ध भाषण जी करिते, ती खरोखर शोभेल तरी कशी ? यास्तव हे विलासिनी ! तूं अगदीं मूढ आहेस. मी जसा राजाचें ऐश्वर्य भोगण्यांत रममाण होत आहे, तशीच तूंहि रममाण हो.

यांप्रमाणें शिखिध्वजराजा चूडालेशीं भाषण करून तिच्याकडे पाहून मोठ्यानें हंसत हंसत अंतःपुरांतून उठून स्नान करण्यास निघुन गेला. इकडे चूडाला " अरेरे! हा माझा पति आत्मस्वरूपामध्यें विश्रांति पावलेला नाहीं व त्यानें माझें म्हणणेंहि ऐकून घेतलें नाहीं. " असें म्हणून अतिशय खिन्न झाली व आपल्या नेहमीच्या प्रपंचांतील उद्योगाला लागली. अशा तऱ्हेनें पुष्कळ काल लोटल्यानंतर एकदां शिखिध्वजराजा दिग्विजयाच्या निमित्तानें राजधानींतून बराच दूर गेला असतां चूडाला नित्यतृप्त व निरिच्छ असूनहि सहज लीलेनें आपल्याला आकाशांतून जातां येतां यावें अशी तिला इच्छा झाली, तेव्हां अशा तऱ्हेच्या सिद्धी मिळविण्याकरितां तिनें एकांतांत आसनावर बसून प्राणायामाचा दीर्घकाल अभ्यास केला व लवकरच तिनें सर्व सिद्धी* संपादन केल्या; परंतु तिनें राजाला त्यासंबंधीं कांहींहि दाखविलें नाहीं.

पुढें बराच काल लोटल्यानंतर शिखिध्वजराजाला संसाराविषयीं हलके हलके विरक्ति येत चालली व त्यामुळें त्याला त्याचें राज्य व त्यांतील विषयसुख विषासारखें वाटूं लागलें. त्याच्या मनानें असें घेतलें कीं घरदार सोडून अरण्यांत गेल्याशिवाय खरी विश्रांति व सुख मिळणार नाहीं. एकदां एकांतांत जवळ आलेल्या चूडालेला तो शिखिध्वज मधुर वाणीनें म्हणालाः—

शिखिध्वजः—हे प्रिय चूडाले! मी चिरकाल राज्याचा उपभोग घेतला पण मला खरें सुख न मिळाल्यामुळें मी विरक्त झालों आहे. यास्तव या राज्याचा त्याग करून मी अरण्यांत जातों. त्या ठिकाणीं एकांत मिळेल व त्यामुळें मन पवित्र होऊन पूर्ण शांत होईल. अशी शांति चंद्र, इंद्र व ब्रह्मदेव यांच्या लोकांतहि मिळणार नाहीं, असें मला वाटतें. म्हणून हे सुंदरी ! ह्या माझ्या वनांत जाण्याच्या उत्तम विचारांत तूं मला विघ्न करूं नकोस. **कुलस्त्रिया भर्त्यांची इच्छा स्वप्नांतहि मोडीत नाहींत.**

---

* सिद्धी किती आहेत व त्या कशा प्राप्त होतात या संबंधाची सर्व माहिती ' योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान ' या पहिल्या भागांतील ' सिद्धि सामर्थ्य ' या नांवाच्या २० व्या प्रकरणांत आली आहे.

चूडालाः—हे नाथ ! वृद्ध झालेल्या मनुष्यांनींच वनाचा आश्रय करणें योग्य आहे; आपल्यासारख्या तरुणांनीं वनाचा आश्रय करणें अगदीं अनुचित आहे. म्हणून मला आपला हा विचार मुळींच पसंत नाहीं. भलत्याच वेळीं प्रजापालनरूप मुख्य धर्म सोडणाऱ्या क्षत्रियाला मोठें पाप लागतें; यास्तव वनांत जाण्याचा आपला बेत सध्यां रद्द करावा. आपल्याला म्हातारपण आल्यावर आपण दोघेहि अरण्यांत जाऊं.

शिखिध्वजः—हे कमलनयने ! मला अत्यंत आवडणाऱ्या या गोष्टीला असें विघ्न करूं नकोस. मी येथून दूर निर्जन अरण्यांत गेलोंच म्हणून समज. तूं स्त्री आहेस, फार सुकुमार आहेस. यास्तव तूं मात्र माझेबरोबर वनांत येऊं नकोस. तूं राज्याचें परिपालन करीत येथेंच रहा. कारण पती कोठें प्रवासांत गेला असतां कुटुंबाचें पालन करणें हें स्त्रियांचें कर्तव्य आहे.

## राजाचा राज्यत्याग

याप्रमाणें चूडालेशीं भाषण करून शिखिध्वजराजा स्नान करावयास उठला व वनांत जाण्याचा निश्चय करून संध्याकाळपर्यंत राजानें आपली दररोजचीं सर्व कर्मे केलीं; व रात्रीं चूडालेसह आपल्या शयनमंदिरांत जाऊन तो राजा आपल्या पर्यंकावर निजला, परंतु त्याला झोंप लागली नाहीं. चूडालेला मात्र त्या शय्येवर गाढ झोंप लागली. असें पाहून राजानें दोघांनीं पांघरलेल्या वस्त्रांतून आपल्याला हळु हळु बाहेर काढून घेतलें; व पर्यंकावरून उठून शयनमंदिराच्या बाहेर आला व 'चोरांचा निग्रह करण्याकरितां मी बाहेर जात आहे' असें द्वारपालांना सांगून तो निस्पृह राजा नगरांतून बाहेर निघाला. 'हे राज्यलक्ष्मी ! तुला नमस्कार असो' असें म्हणून तो राजा आपल्या देशांतून बाहेर पडला व बारा दिवस अरण्यांतून प्रवास करून शेवटीं तो मंदर पर्वताच्या तटावरील अरण्यांत पोहोंचला. त्या ठिकाणीं एका रम्य जागीं राजानें आपल्याकरितां एक पर्णकुटि तयार केली व त्यांत एक गुळगुळीत वेळूचा दंड, फलभोजनाचें पात्र, अर्घ्यपात्र, फुलें ठेवण्याकरितां एक पात्र, रुद्राक्षाची माळा, कंथा, दर्भासन व मृगाजिन इतकी सामग्री मिळवून ठेवली. तो प्रातःकाळीं पहिल्या प्रहरांत स्नान करून संध्यापूर्वक जप करीत असे. दुसऱ्या प्रहरांत फुलें, फळें आणून

पुनः स्नान करून देवार्चन करीत असे. नंतर वनांतील फळें, कंद वगैरे कांहीं खाऊन जप करीत असे. याप्रमाणें मालव देशाचा शिखिध्वज राजा त्या मंदर पर्वतावरील पर्णकुटिकेंत अगदीं खिन्न न होतां अठरा वर्षेपर्यंत राहिला. आतां इकडे राजा निघून गेल्यावर चूडालेनें काय केलें तें पाहूं.

राजाच्या वियोगाला भिऊन चूडाला जरी सदा जागत असे तरी त्या रात्रीं दैववशात् तिला गाढ झोप लागली. राजा निघून गेल्यावर ती एकदम दचकून जागी झाली, तेव्हां राजा तिला दिसेना. लागलीच पर्यंकावर उठून बसून आपल्या मनाशीं विचार करूं लागली. "अरेरे! एकूण माझा प्रभु राज्याचा त्याग करून अरण्यांत गेलाच म्हणावयाचा! आतां मला तरी येथें राहून काय करावयाचें आहे? मी त्याच्याच जवळ जातें. कारण शास्त्रानें '**स्त्रियांनीं मुख्य आपल्या पतीचाच आश्रय केला पाहिजे**' असें सांगितलें आहे," असा विचार करून ती पतीच्या मागोमाग जाण्यासाठीं पर्यंकावरून उठली; व आपल्या योगसिद्धीच्या सामर्थ्यानें ती आपल्या शयन मंदिराच्या खिडकींतूनच बाहेर पडून आकाशमार्गानें वातस्कंधांतून भ्रमण करूं लागली. कांहीं वेळानें तिनें आपल्या पतीला मार्गानें जातांना आकाशांतून पाहिलें व लागलीच आकाशांतच स्थिर होऊन तिनें आपल्या पतीच्या सर्व भावी गोष्टींचें शांतपणानें चिंतन केलें व ती आपल्याशींच म्हणाली, "यावेळीं मला पतीपाशीं जाणें योग्य नाहीं. लवकरच मला त्याच्यापाशीं जावें लागेल; कारण परमेश्वरी नेमानेम असाच आहे" असें चिंतन करून चूडाला आपल्या अंतःपुरांत परत आली व आपल्या पर्यंकावर स्वस्थ निजली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं "महाराज सध्यां कांहीं कामाकरितां राज्याबाहेर गेले आहेत, लवकरच परत येतील" असें नगरवासी लोकाना सांगून ती आपल्या पतीच्या राज्याचें समदृष्टीनें परिपालन करूं लागली.

## चूडाला राजाच्या भेटीस निघाली

अशा तऱ्हेनें अठरा वर्षें निघून गेल्यावर अरण्यांत राहणाऱ्या त्या राजाला जरा प्राप्त झाली. राजाच्या राग–द्वेषादि दोषांचा परिपाक व्हावा म्हणून चूडालेनें इतके दिवस वाट पाहिली व नंतर आपल्या भर्त्याला

आत्मज्ञानाचा उपदेश करण्याचें कार्य आपल्यालाच केलें पाहिजे, असा परमेश्वरी नेमानेम असल्यामुळें, आतां मला त्याच्या जवळ जाण्यास हा योग्य काल आहे, असें ठरवून ती लागलीच रात्रीच्या वेळीं आकाशमार्गानें निघाली. जातां जातां तिनें मेघाशीं संलग्न असलेल्या विजेला पुनः पुनः पाहून आपल्याशींच ती म्हणाली—" काय हा हा चमत्कार आहे ! जीवाचा स्वभाव मरेपर्यंत शांत होत नाहीं. म्हणूनच माझेंहि मन यांना पाहून पतीला पाहण्याविषयीं मोठें उतावीळ होत आहे. हे जड चित्ता ! तूं आंतल्याआंत उगीचच असें विक्षिप्त होऊन कां राहिला आहेस ? तुझा तो आकाशासारखा निर्मळ विवेक कोठें गेला ? आतां तूं जरी इतका उतावीळ झालास तरी त्यांत माझी कांहींच हानि होत नाहीं. कारण तुझा माझा आतां कांहीं संबंध उरलेलाच नाहीं. हे मूर्ख स्त्री शरीरा ! तूं तरी विनाकारण उतावीळ कां होतेस ? कारण तुझा तो भर्ता आतां जरेनें ग्रस्त झाला असेल ! त्यामुळें तो तुझ्या संबंधानें अगदीं वासनाशून्य झाला असेल ! या चित्ता ! तूं आतां शांत रहा. मी लवकरच आपल्या पतीला तत्त्वज्ञानी बनवून पुनः त्याला परत राज्यांत आणून तुझ्याशीं संयुक्त करविते. मग आम्ही उभयतां दीर्घकाल सुखानें वास करूं. "**कारण समान मनोवृत्तीच्या मनुष्याच्या समागमाचें सुख अनुभविणें ही सर्वोत्तम आनंदाची स्थिति आहे.** " याप्रमाणें चिंतन करीत करीत ती मंदरपर्वतावर येऊन पोंचली; व तेथील अरण्यांतील पर्णकुटिकेंत राहिलेल्या आपल्या पतीला तिनें पाहिलें. त्यावेळीं तो अत्यंत कृश झालेला, काळवंडलेला, पिकलेल्या पानाप्रमाणें निस्तेज, फुलांच्या माळा करीत बसलेला असा एकटाच तिच्या दृष्टीस पडला. अशा त्या राजाला पाहून चूडालेला फार वाईट वाटलें व ती आपल्याशींच म्हणालीः—"हर हर ! आत्मस्वरूपाला न जाणणें हा भयंकर मूढपणा आहे ! कारण या मूढपणामुळें अशी दुर्दशा मनुष्याला प्राप्त होत असते ! या माझ्या पतीला आतांच उपदेश करून ज्ञानी बनवितें. पण याच रूपानें मी ह्याला तत्त्वज्ञान सांगूं लागल्यास ही माझी कांता मूढ आहे, हिला काय समजतें आहे ?' अशा अश्रद्धेनें मी सांगितल्याप्रमाणें हा वागणार नाहीं. म्हणून मी एका तपस्व्याच्या रूपानें

या माझ्या पतीला एका क्षणांत बोध करतें. याचें चित्त तपश्चर्येनें शुद्ध झाल्यामुळें त्या ठिकाणीं आत्मतत्त्व बरोबर प्रतिबिंबित होईल."

## चूडाला ब्राह्मणपुत्र बनली

असा विचार करून चूडाला एका क्षणांत सिद्धिसामर्थ्यानें ब्राह्मण पुत्र बनली व तिनें त्या स्वरूपांत आपण दुसऱ्या वनांतून राजाकडे जात आहों असें भासविलें. राजाला तो ब्राह्मण पुत्र मूर्तिमंत तपच भासला. तो फारच गोरापान व मोठा तेजस्वी होता. त्यानें पांढरें स्वच्छ यज्ञोपवीत गळ्यांत घातलें होतें. त्यानें नेसलेलें व पांघरलेलें वस्त्रहि पांढरें स्वच्छ होतें. हातांत कमंडलू होता. तो जमिनीला स्पर्श न करतां अधांतरींच चालत चालत शिखिध्वज राजाकडे आला. त्याला पहातांच 'हा देवपुत्रच आला आहे,' असें वाटून त्यानें आपल्या पायांतील पादुका काढून तो उठून उभा राहिला व म्हणाला 'हे देवपुत्रा! आपणास नमस्कार असो. या आसनावर आपण बसावें.' असें म्हणून त्यानें एक पानांचें आसन त्याला बसावयास दिलें. 'हे राजर्षे! तुला नमस्कार असो' असें म्हणत तो द्विजपुत्रहि त्या आसनावर बसला.नंतर राजानें त्याची अर्घ्य,पाद्य,फुलें, फळें वगैरे उपचारांनीं यथाविधि पूजा केली व तो म्हणालाः—

शिखिध्वजः-भगवन्! आपण मोठे ज्ञानी दिसतां आहां.आपली अंगकांति फारच सुंदर आहे. आपलें हें सुंदर व सुकुमार शरीर माझ्या प्रिय कांतेच्या शरीराप्रमाणेंच अगदीं हुबेहूब आहे असें मला भासत आहे. आपल्या दर्शनानें मी आज मोठा कृतार्थ झालों आहे. महाराज ! आपण कोण ? कोणाचे चिरंजीव ? आपण येथें कां आला आहांत ? या सर्व प्रश्नांचीं उत्तरें कृपा करून द्यावीत, अशी माझी आपणांस नम्र विनंति आहे.

चूडालाः—राजा ! तुझ्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें ऐक. या जगांतील प्रसिद्ध नारद मुनि तुला माहीतच आहेत. एकदां हे नारदमुनि मेरुपर्वताच्या गुहेंत ध्यान करीत बसले होते. त्या पर्वताच्या सोन्याच्या तटांजवळून गंगानदी वहात होती. नारदमुनि ध्यान करून उठले असतां त्यांच्या कानावर कंकणांचा आवाज ऐकूं आला. तेव्हां 'हें काय आहे,' असें

म्हणून ते त्या गुहेच्या बाहेर येऊन पाहूं लागले तों, त्या नदींतून रंभा, तिलोत्तमा या सारख्या पुष्कळ सुंदर स्त्रिया नग्न स्थितींतच बाहेर येतांना दिसल्या. त्या सर्व स्त्रिया इतक्या देखण्या व सुंदर होत्या कीं त्यांची अंगकांति अतिशय स्वच्छ असल्यामुळें त्या आरशाप्रमाणें एकमेकींचें प्रतिबिंब ग्रहण करीत होत्या. त्यामुळें तो स्त्रीसमूह " सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् " या श्रुतींत वर्णन केल्याप्रमाणें भगवंताच्या विश्वरूपाप्रमाणेंच दिसत होता. असो, अशा प्रकारचा तो अत्यंत रमणीय स्त्रीसमूह पाहून नारदमुनींचें मन एकाएकीं विवेक सोडून फार क्षुब्ध झालें व लागलीच प्राणवायु क्षुब्ध होऊन त्या मुनीचें वीर्यस्खलन झालें ! त्या नंतर त्या मनोरूपी मत्त हत्तीला विवेकाच्या ठिकाणीं शुद्धबुद्धिरूप चर्मरज्जूनें बांधून ठेवून जवळ असलेल्या स्फटिकाच्या कुंभांत नारदांनीं आपलें तें गळलेलें वीर्य ठेविलें व तो कुंभ त्यांनीं संकल्पित दुधानें भरला. त्या दुधानें भरलेल्या कुंभांत त्या मुनीच्या वीर्यापासून निर्माण झालेला गर्भ हलकें हलकें वाढीस लागून शेवटीं योग्य कालीं तो कुंभ सुंदर मुलगा प्रसवला. नारदमुनींनीं त्या मुलाचे जातकर्मादि सर्व संस्कार करून आपलें सर्व विद्या धन त्याला अर्पण केलें. नंतर त्याला बरोबर घेऊन नारदमुनि ब्रह्मलोकीं आपल्या पित्याकडे गेले, व त्या दोघांनीं ब्रह्मदेवाला वंदन केलें. ब्रह्मदेवानें त्या मुलाची वेदशास्त्राची परीक्षा घेतली. त्याची विद्वत्ता पाहून त्याच्यावर संतुष्ट होऊन त्याला आपल्या मांडीवर घेतलें, नुसत्या आशीर्वादानेंच त्याला ज्ञानी बनविलें व त्याचें नांव कुंभ असें ठेविलें. हे राजा ! तोच हा मी कुंभ तुझ्यापुढें बसलों आहे. मी आपल्या पित्यासहवर्तमान ब्रह्मलोकीं सुखानें राहतो. चार वेद हे माझे मित्र आहेत. 'सरस्वतीलाच मी माझी माता समजतों. कोणताहि हेतु मनांत न बाळगतां मी वाटेल त्या ठिकाणीं लीलेनें विहार करतो. आज मी आकाशमार्गानें जात असतां तुला खालीं पाहिलें आणि म्हणून येथें तुझ्याकडे सहज आलों.

शिखिध्वजः—माझ्या अनेक जन्मांतील फलोन्मुख झालेल्या पुण्यकर्मांनींच जणुं आपणाला मजकडे येण्याची प्रेरणा केली, असें मला वाटतें. आपल्यासारख्या साधु पुरुषांचा मला समागम झाल्यामुळें मी स्वतःला

मोठा धन्य समजतों. कारण साधुसमागमामध्यें जितका आनंद मला आज होत आहे, इतका आनंद राज्यामध्यें मी असतांना मला कधींच मिळाला नाहीं.

चूडालाः—हे राजन्! माझी प्रशंसा पुरे कर. तूं कोण व या पर्वतावर काय करीत आहेस? तें मला सांग. तूं या वनांत किती काळ राहणार आहेस? या वनवासानें तुला काय साधावयाचें आहे? तें खरें सांग.

शिखिध्वजः—मी शिखिध्वज नांवाचा राजा आहे. या जन्ममरणरूपी संसाराची मला फार भीति वाटल्यामुळें राज्य सोडून मी येथें येऊन राहिलों आहे. मी आज अठरा वर्षें तप करीत आहे, तरी मला अजून खरी विश्रांति मुळींच लाभली नाहीं. त्यामुळें मी फारच दुःखी झालों आहे.

## ज्ञान हेंच परम श्रेय आहे.

चूडालाः—हे राजन्! माझ्या प्रश्नावरून ब्रह्मदेवानें मला पूर्वी एकदां असें सांगितलें कीं, ज्ञान हेंच परम श्रेय आहे. कारण त्यानें मोक्ष प्राप्त होतो. आयुष्याचा काळ घालविण्यासाठींच क्रिया सांगितली आहे. ज्यांना ज्ञानदृष्टि प्राप्त झाली नाहीं, त्यांनींच कर्म करीत रहावें. परंतु आत्मज्ञान संपादन करण्याचें ध्येय मात्र आपल्यापुढें ठेवावें. अज्ञ पुरुषांच्या सर्व क्रिया वासनायुक्त असतात; म्हणून त्यांना त्याचीं फळें भोगावीं लागतात. परंतु ज्ञानी पुरुषांच्या सर्व क्रिया वासनारहित असल्यामुळें निष्फळ होतात. वासनायुक्त मन असणें, हेंच अज्ञान व वासनाशून्य मन, हेंच ज्ञान होय. ज्ञानानेंच त्या परम ब्रह्मपदाचा लाभ होतो; म्हणून ज्ञान हेंच परम श्रेय आहे असें ब्रह्मादि देवाचें सांगणें आहे. मग तूं असा अज्ञानाचा आश्रय करून नुसता तपश्चर्या करीत काय बसला आहेस? 'मी कोण? हें जग कसें उत्पन्न झालें? याची शांति कशी होईल?' या गोष्टींचा विचार कां करीत नाहींस? 'बंध कसा होतो? मोक्षाचा उपाय काय?' इत्यादि प्रश्न आत्मवेत्त्यांस विचारून त्यांचा उलगडा कां करून घेत नाहींस? त्यांचीच सेवा केल्यानें व त्यांचीच संगति धरल्यानें जीवांना संसारांतून मुक्त होण्याची युक्ति लाभत असते.

शिखिध्वजः—महाराज ! फार दिवसांनीं मला हा बोध ऐकावयास मिळाला. मी अज्ञानामुळें श्रेष्ठ पुरुषांचा समागम सोडून या वनांत येऊन राहिलों आहे. अहाहा ! आज माझें सर्व पाप नाहींसें झालें आहे, असें मी समजतों. त्यामुळें आपण स्वतः मजकडे येऊन मला बोध करीत आहां. महाराज ! आपणच माझे गुरु आहांत, मी आपला शिष्य आहे. मी आपल्या चरणाला वंदन करितो. मजवर कृपा करा. ज्याच्या योगानें पुनः शोक करण्याचा प्रसंग येणार नाहीं व ज्याच्या योगानें मला पूर्ण विश्रांति मिळेल अशा ब्रह्मज्ञानाचा आपण मला सत्वर उपदेश करा.

चूडाला ( कुंभ ):—हे राजर्षे ! माझ्या बोलण्यावर जर तुझा विश्वास असेल तरच मी तुला उपदेश करितो. कारण विश्वास किंवा श्रद्धा नसणाऱ्या मनुष्यास कितीहि चांगला उपदेश केला तरी तो व्यर्थ जातो.

शिखिध्वजः—महाराज ! आपण जें सांगाल तें मला वेदाच्या आज्ञेप्रमाणें कांहीं एक विचार न करतांच ग्राह्य आहे. हें मी आपणास अगदीं खरें सांगतों.

चूडाला ( कुंभ ):—हे राजन् ! तुझ्या चरित्रासारखेंच असलेलें व मंद बुद्धीच्याहि पुरुषांना मोठा बोध करून देणारें असें एक सुंदर कथानक मी तुला सांगतो तें ऐक.

---

## चिंतामणीची गोष्ट.

चूडाला ( कुंभ ):—हे राजन् ! एक मोठा श्रीमान्, सद्गुणी व विद्वान् गृहस्थ होता. आत्मज्ञान नसल्यामुळें तो ऐश्वर्याचा फार लोभी होता. म्हणून त्यानें चिंतामणि मिळविण्याकरितां पुष्कळ दिवस प्रयत्न केले; शेवटीं चिंतामणि त्याच्या समोर एक हाताच्या अंतरावर येऊन प्रकट झाला व तो त्यानें पाहिला. परंतु त्या गृहस्थाला हा चिंतामणिच् आहे, अशी खात्री पटेना. तो आश्चर्यचकित होऊन विचार करूं लागला.

" हा खराच चिंतामणि आहे का ? छे, हा चिंतामणि कसा असेल ! तथापि मी हा हातांत घेऊन पहातों. पण नको, कारण हा चिंतामणि जर खराच असेल, तर हा स्पर्श होतांच नाहींसा होईल. इतक्या अल्पकालांत चिंतामणीची सिद्धि होणें शक्य नाहीं. मी कृपण असल्यामुळें मला हा भ्रम झाला असावा ! मी इतका भाग्यवान् कोठें आहे ? कीं ज्यामुळें मला इतक्या लवकर चिंतामणि रत्नाची प्राप्ति व्हावी ! " अशा तऱ्हेचे विचार त्या अज्ञान्याच्या मनांत पुष्कळ वेळां येऊन त्यानें त्या दिव्य रत्नाचा अनादर केला व त्याला उचलून घेण्याचा प्रयत्न केला नाहीं, म्हणून तें रत्न तेथून उडून गेलें. नंतर त्या गृहस्थानें पुनः चिंतामणि मिळविण्याकरितां प्रयत्न सुरू केला. तेव्हां कांहीं लबाड थट्टेखोर लोकांनीं एक चकचकीत कांचेचा मणि त्याच्या नकळत त्याच्या पुढें ठेविला. त्या मूर्खानें त्याला पाहून, हाच चिंतामणि आहे, असा निश्चय केला व लागलीच तो उचलून घेऊन " आतां आपल्याला काय कमी आहे " अशा विचारानें आपली सर्व संपत्ति, घरदार वगैरे सर्वांचा त्याग करून त्या कांचेच्या मण्याला घेऊन एकटाच एका दूरच्या शून्य अरण्यांत गेला. तेथें त्याला फार आपत्ति मात्र भोगावी लागली.

तात्पर्यः—चूडाला ( कुंभ ):—वरील गोष्टींतील रत्नशोधक जो मी सांगितला, तो तूंच होय. खरा सर्वस्वाचा त्याग हाच चिंतामणि होय. राज्य, स्त्री, धन इत्यादि सर्वांचा तूं त्याग केलास, पण अहंकार सोडला नाहींस; त्यामुळें तुला सर्वत्यागाचें सुख मिळालें नाहीं. शेवटीं तो सर्वत्यागरूपी चिंतामणि निघून गेला व तुझ्या पदरांत तपरूपी कांचेचा मणि मात्र पडला. हाच चिंतामणि आहे, असें तुला वाटत आहे, परंतु तुला स्फटिकाचा तुकडाहि अद्याप मिळालेला नाहीं.

— ~ —

## हत्तीची गोष्ट.

चूडाला ( कुंभ ):—हे राजा ! आतां तुला दुसरी एक गोष्ट सांगतो. ती तुझ्या वृत्तांतासारखीच आहे. विंध्यपर्वतावरच्या वनांत एक मोठा हत्ती

होता. त्याला एका मनुष्यानें लोखंडी जाळ्यांत पकडलें. परंतु त्या मत्त हत्तीनें आपल्या दांताच्या तडाख्यानें तें जाळें फोडून टाकलें. तें पहातांच त्या हत्तीला पकडणारा तो मनुष्य तेथील एका उंच ताडाच्या झाडावर चढला व तो हत्ती त्या झाडाखालून जात असतां एकदम त्याच्या मस्तकावर त्या मनुष्यानें उडी मारली. परंतु हत्तीच्या मस्तकावर न पडतां तो खालीं जमिनीवर पडला. त्याला पहातांच हत्तीला त्याची दया आली व त्या मनुष्यास सोडून तो हत्ती अरण्यांत निघून गेला. पुढें त्या मनुष्यानें त्या हत्तीला पकडण्याकरितां त्या अरण्यांत एक मोठा खड्डा खणला व त्यावर हिरवेगार गवत, लता वगैरे अंथरून तो खड्डा मुळींच नाहीं असें करून ठेविलें. कांहीं दिवसांनीं तो हत्ती वनांत संचार करण्यास निघाला असतां चुकून त्या खड्ड्यांत पडला व भयंकर दुःख भोगूं लागला.

तात्पर्यः—चूडाला (कुंभ):—हे राजा! वरील गोष्टींतील हत्ती म्हणजेच तूं आहेस. हत्तीला पकडणारा मनुष्य म्हणजे तुझ्या ठिकाणीं असणारें अज्ञान होय. यानेंच तुला आशापाशाच्या लोखंडी जाळ्यांत पकडलें. परंतु राज्य, स्त्री वगैरे सर्वांचा त्याग करून विवेक व वैराग्य या दोन वज्रप्राय दातांनीं आशारूपी जाळें तोडून टाकलेंस व तें अज्ञान तुझ्यावर पुनः झडप मारीत असतां तें तुझ्यापुढें खालीं पडलें. परंतु त्यास तूं सर्वत्यागरूपी खड्गानें मारून टाकलें नाहींस. त्यामुळें तें पुनः उठलें व आपल्या पराभवाची आठवण ठेऊन त्यानें तुला या तपरूपी गहन खड्ड्यांत चांगलेंच डाबून ठेविलें आहे. राजा! अशा रीतीनें हा तुझाच वृत्तांत सांगितला आहे. तरी या तपोरूप खड्ड्यांतून वर नीघ व या तुझ्या अज्ञानरूपी शत्रूच्या नाशासाठीं मोठ्या चिकाटीनें प्रयत्न कर.

## सर्वत्याग

राजा! तुझ्या त्या तत्त्वज्ञानी चूडालेनें जें पूर्वीं तुला सांगितलें तें ज्ञान तूं कां स्वीकारलें नाहींस? बरें तिचें बोलणें ऐकलें नाहींस तर नाहीं, पण तूं तरी आपल्या बुद्धीनें सर्वत्याग चांगला करावयाचा होतास कीं नाहीं? तो असा अर्धवट कां केलास? धन, स्त्री, गृह, राज्य इत्यादि सर्वांचा त्याग करून सर्वत्याग होत नाहीं. या सर्वांहून अत्यंत श्रेष्ठ असा भाग तूं अद्यापि सोडला

नाहींस. त्याचा जेव्हां निःशेष त्याग करशील, तेव्हां तुला खरा आनंद व विश्रांति मिळेल.

हें वरील कुंभाचें बोलणें ऐकून "माझ्याजवळ या ठिकाणीं फक्त ही पर्णकुटी व त्यांतील सामान काय तें शिल्लक आहे. त्याचाहि मी आतां त्याग करतो" असें म्हणून राजा उठला व त्यानें आपल्या पर्णकुटींतील सर्व सामान एके ठिकाणीं गोळा केलें व मोठा अग्नि प्रज्वलित करून त्यांत सर्व सामानाची आहुति दिली. नंतर आपली पर्णकुटीहि त्यानें दग्ध करून टाकली. जें जाळण्यासारखें नव्हतें तें त्यानें फेंकून दिलें व फोडून टाकलें. असें सर्व टाकल्यानंतर तो राजा कुंभाला म्हणाला.

शिखिध्वजः—गुरुजी ! आतां माझा सर्वत्याग झाला ना ? कारण मी आतां फक्त एकटाच दिगंबर होऊन राहिलो आहे. माझ्याजवळ आतां कांहींहि शिल्लक राहिलें नाहीं.

चूडाला (कुंभ):—हे राजा ! तुझा अजून सर्वत्याग झाला नाहीं. 'मी सर्वत्याग केला' असें मानून तूं उगीच परमानंदाचा अभिनय करूं नकोस. कारण तूं अजून सर्वांहून श्रेष्ठ असा भाग सोडला नाहींस.

असें ऐकून राजानें थोडासा विचार केला व म्हणाला:—

शिखिध्वजः—गुरुजी ! आतां फक्त हा हाडामांसाचा देहच काय तो शिल्लक राहिलेला दिसतो आहे. यास्तव याचा आतांच कडेलोट करून सर्वत्यागी होतो.

असें बोलून राजा लगेच उठला व पुढेंच असलेल्या त्या मंदरपर्वताच्या मोठ्या कड्यावरून आपल्याला खालीं लोटून देण्याकरितां जो वेगानें निघाला तों, लागलीच कुंभानें त्याचा हात धरला व त्याला म्हणाला.

चूडाला (कुंभ):—हे राजा ! या निरपराधी देहाला कां टाकून देतोस ? अरे वेड्या, तूं जरी या शरीराचा त्याग केलास, तरी तुझा सर्वत्याग सिद्ध होणार नाहीं. हा देह ज्याच्यामुळें क्षुब्ध होतो, त्या पाप्याला जर तूं टाकशील, तर मात्र तूं खरा सर्वत्यागी होशील. हा पापी म्हणजेच तुझें चित्त होय. चित्त हेंच सर्व जगद्रूपानें परिणाम पावलें आहे. यास्तव याचा त्याग केला असतां सर्वांचा त्याग होतो. म्हणूनच चित्तत्याग म्हणजेच खरा सर्वत्याग

समजतात. अशा तन्हेचा सर्वत्याग केल्यावर परमानंदाचा अनुभव अवश्य येऊन तुला पूर्ण आत्मविश्रांतिहि मिळेल.

शिखिध्वजः—गुरुमहाराज ! अगोदर मला या चित्ताचें स्वरूप सांगा व नंतर त्याचा त्याग कसा करावा तें सांगा.

कुंभः—राजन् ! वासना हेंच चित्ताचें स्वरूप आहे व त्याचें मूळ अहंकार आहे. या अहंकाराचा नाश झाला कीं चित्ताचा नाश होतो. याचा नाश करण्यास ' मी कोण आहे ' याविषयीं पूर्ण विचार करणें हाच मुख्य उपाय आहे. तूं या संबंधानें विचार केला आहेस का ?

शिखिध्वजः—मी आपल्या बुद्धीनें देहापासून अहंकारापर्यंत सर्व तत्त्वांचा विचार करून मी त्यांना अनात्मा म्हणजे ' मी नव्हे ' असें जाणलें आहे. पण अंतरात्म्याचा परिचय न झाल्यामुळें जडपदार्थांच्या ठिकाणीं पुनः पुनः होणारी आत्मपणाची भ्रांति दूर होत नाहीं. मी वस्तुतः शुद्ध असतांना ' हा मी आहे ' असा अभिमानाचा मळ मला लागला आहे. पण तो सकारण आहे कां निष्कारण आहे, हें मला समजत नाहीं.

कुंभः—राजा ! ज्याप्रमाणें चित्ताचें मूळ कारण अहंकार आहे, तसें अहंकाराचें कारण शोधून मला सांग.

शिखिध्वजः—हे मुने ! देहाचें वेदन ( जाणीव ) झालें तरच ' देह मी ' असा अभिमान उत्पन्न होतो. यास्तव देहाचें ज्ञान हेंच अहंकाराचें कारण, असें मी समजतों.

कुंभः—राजा ! देह जर खरा असेल, तर त्याचें वेदन ( जाणीव ) होऊन अहंकार तयार होईल. पण अगोदर देहच मुळांत खरा नाहीं, तर तुझ्या वेदनाचा विषय कोण होणार ?

शिखिध्वजः—महाराज ! हा हस्तपादादि अवयवानें युक्त असणारा हाडामांसाचा देह जर प्रत्यक्ष दिसतो आहे, तर तो मुळींच नाहीं, असें कसें म्हणतां येईल ?

कुंभः—राजा ! जें कार्य कारणावांचून प्रतीतीला येतें, तो निव्वळ भ्रम होय. लौकिकदृष्ट्या या देहाचें कारण असणारा त्याच्या पित्याचा

देह होय, पण तोहि असत्च आहे. आतां त्याच्या अजोबाचा, पणजोबाचा देह या क्रमानें शेवटीं मूळचा पितामह–जो ब्रह्मदेव–त्याचा देह हा तरी सर्व शरीरांच्या उत्पत्तीचें कारण मानून सर्व देह खरे आहेत, असेंहि म्हणतां येणार नाहीं. कारण तो आद्य पितामहाचा देहहि कारणाच्या अभावीं वस्तुतः मृगजळाप्रमाणें भ्रांतिरूपच आहे. असो, याप्रमाणें मी वर सांगितलेल्या युक्तीनें ब्रह्मदेवाच्या शरीरापासून आपल्या शरीरापर्यंत जी ही कार्यकारण परंपरा आहे, ती मिथ्या आहे. हें तुझ्या आतां ध्यानांत आलेंच असेल व त्यामुळें हा प्रपंच सत्य आहे अशी जी तुझी समजूत झाली होती, तीहि आतां निवृत्त झालीना ?

शिखिध्वजः—आद्य पितामहाच्या उत्पत्तीला ब्रह्म कारण मानण्यास काय हरकत आहे ?

कुंभः—'तदेतत्ब्रह्मापूर्वमनपरम्', 'असंगोह्ययं पुरुषः' इत्यादि श्रुतीवरून त्या कूटस्थ व असंग ब्रह्माचा परिणाम होऊन तें जगास कारण होतें, असें म्हणतां येत नाहीं. म्हणून तें कोणाचें कारण व कोणाचें कार्यहि नाहीं. वास्तव जगाचें कांहीं कारण नसल्यामुळें तें कोणाचेंहि वस्तुतः कार्य नाहीं. परंतु कारणावांचूनहि तें जर दिसतें आहे, तर तो निव्वळ भ्रम आहे, असें तुला मी वर सांगितलेंच आहे. म्हणून, राजा ! तूं कर्ता नाहींस, भोक्ता नाहींस, तर सत्, चित् व आनंद असें शांत ब्रह्मच आहेस. मग बंध व मोक्ष याची गोष्टच बोलावयास नको.

शिखिध्वजः—भगवान् ! मला सर्व समजलें. आपण मला फारच उत्तम तऱ्हेनें समजून सांगितलेत, मीच शुद्ध परमात्मा आहे, मला नमस्कार असो ! अहाहा ! सर्व दृश्य जग असत् ठरल्यामुळें आतां तें पूर्ण शांत झालें आहे. मी शांत निर्विकार ब्रह्मच शिल्लक राहिलों आहें. मी आतां पूर्ण शांत व सुखी झालो आहे !

याप्रमाणें ब्रह्मामध्यें विश्रांति पावून शिखिध्वज राजा एक क्षणभर शांत झाला, असें पाहून कुंभानें फिरून बोलण्यास सुरवात केली.

कुंभः—हे राजन् ! तूं आतां अज्ञाननिद्रेंतून जागा झाला आहेस. तूं आतां परब्रह्मरूप होऊन राहिला आहेस. आतां खरोखर तूं जीवन्मुक्त

झाला आहेस. तूं यथाप्राप्त व्यवहार करीत शांत रहा. राजा ! तूं आतां ज्ञानी झाला आहेस, कारण तूं चित्ताचा त्याग केला आहेस. यास्तव तूं आतां आपल्या निर्मल स्वरूपांत स्थिर होऊन रहा.

शिखिध्वजः—महाराज ! तत्त्वज्ञानी पुरुषांच्या ठिकाणीं जर चित्त नसतें, तर हे जीवन्मुक्त व्यवहार कसे करितात ?

कुंभः—राजा ! पुनर्जन्माला योग्य अशी जी दृढ वासना तिलाच चित्त म्हणतात. तसली वासना ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं नसते. ज्ञानी ज्या वासनेनें युक्त होऊन व्यवहार करतात, ती पुनर्जन्मरहित सत्त्वसंज्ञक वासना आहे, असें समज. **मूढ चित्ताला चित्त म्हणतात व ज्ञानसंपन्न चित्ताला सत्त्व म्हणतात.** चित्त पुनः उत्पन्न होतें, सत्त्व पुनः उत्पन्न होत नाहीं. हे राजा ! तूं चित्ताचा त्याग केल्यामुळें, आज महात्यागी झाला आहेस. अर्थात् तूं सत्त्ववान् झाला आहेस. तुला जें कांहीं सांगावयाचें होतें, तें सर्व तुला सांगितलें आहे. याचें आतां तूं मनन करून यथार्थ ज्ञान करून घे. मग तुझी जशी इच्छा असेल त्याप्रमाणें कांहीं वेळ समाधींत व कांहीं वेळ व्यवहारांत रहा. मी आतां स्वर्गलोकाला जातो. आमचे वडील नारदमुनि ब्रह्मलोकाहून तेथें आले असतील. त्यांनीं जर मला तेथें पाहिलें नाहीं तर त्यांना राग येईल.

असें कुंभाचें बोलणें ऐकल्यावर शिखिध्वजराजा कुंभाला जों नमस्कार करीत आहे, तोंच कुंभ अंतर्धान पावला. असें पाहून राजाला फारच आश्चर्य वाटलें व आपल्या मनाशींच म्हणाला “ अहाहा ! त्या देव पुत्रानें मला अगदीं यथार्थ व युक्तियुक्त बोध केला. मी आतां शांत झालों आहे. मी आतां अतिशय तृप्त झालों आहे. मला काडीचीहि इच्छा राहिली नाहीं. मी आपल्या स्वाभाविक स्वरूपांत स्थित आहे. ” असें चिंतन करणारा राजा खरोखर वासनाशून्य झाला व लागलीच खऱ्या निर्विकल्प समाधींत स्थिर झाला. अशा तऱ्हेनें त्याला पूर्ण आत्मविश्रांति मिळाली. आतां चूडालेनें पुढें काय केलें त्याचा विचार करूं.

अंतर्धान पावल्यावर चूडालेनें मोठ्या वेगानें आकाशांत उड्डाण केलें व तेथें कुंभरूपाचा त्याग करून तिनें आपलें स्त्रीचें सुंदर रूप धारण केलें.

ती आकाशमार्गानेंच आपल्या राजधानींत येऊन सर्व लोकांना भेटली व तिनें राज्यकारभार केला. ती तीन दिवसांनीं पुनः आकाशांत जाऊन योगसामर्थ्यानें पुनः कुंभ बनली व शिखिध्वजाकडे प्राप्त झाली.

## शिखिध्वज राजाची समाधि.

त्यावेळीं राजा निर्विकार समाधींत स्थिर झालेला दृष्टीस पडला. 'काय आश्चर्य आहे, फार दिवसांनीं हा राजा आत्म्यामध्यें विश्रांति पावला आहे' असें ती आपल्याशींच पुनः पुनः म्हणाली.

"याचें प्रारब्धकर्म अजून भोगावयाचें शिल्लक आहे. तें संपेपर्यंत आम्हीं दोघेजण जीवन्मुक्त अवस्थेंत राहून शेवटीं बरोबर विदेह स्थितीला प्राप्त होऊं. यास्तव मी आतां याला परमपदापासून जागृत करिते." असा विचार करून चूडालेनें सिंहनाद केला तरीहि तो जागा झाला नाहीं. तेव्हां तिनें त्याला आपल्या हातानें हलविलें, तेव्हां राजा जमिनीवर पडला, पण जागा झाला नाहीं. तेव्हां चूडालेनें असा विचार केला, "आतां मी याला कोणत्या युक्तीनें देहभानावर आणूं बरें? किंवा हा असाच विदेह स्थितीला प्राप्त होऊं दे. मीहि या स्त्रीदेहाचा त्याग करून या माझ्या पतीबरोबरच विदेह स्थितीला प्राप्त होऊं." असा विचार करून ती आपला देह सोडण्यास तयार झाली; पण राजाचें प्रारब्धकर्म अद्याप भोगावयाचें शिल्लक आहे, असें पाहून तिनें पुनः असा विचार केला कीं, "राजाच्या या देहांत जर सत्त्व असेल तर तो अवश्य जागा होईल व माझ्याप्रमाणें जीवन्मुक्त होऊन व्यवहार करील." असा विचार करून तिनें त्याच्या शरीराला स्पर्श केला, तोंच तें उष्ण आहे व तें म्लानहि झालेलें नाहीं, असें पाहून तिनें त्याच्या शरीरांत सत्त्वशेष आहे, असें ठरविलें व लागलीच आपल्या देहांतून निघून ती राजाच्या देहांत शिरली. त्या ठिकाणीं स्थिर झालेल्या चेतनेमध्यें हालचाल उत्पन्न करून लागलीच आपल्या शरीरांत प्रविष्ट झाली व कुंभरूपामध्यें राजाच्या पुढें आसनावर बसली; तिनें सामगायन करण्यास प्रारंभ करतांक्षणीच राजानें आपले डोळे उघडले. आपल्यापुढें बसलेल्या कुंभाला पाहून राजा म्हणाला.

शिखिध्वजः—भगवन्! माझ्या सुदैवानेंच आपल्या पवित्र चित्तांत

माझी आठवण झाली. अहाहा! पावन करणें हेंच आपल्या आगमनाचें प्रयोजन आहे, कीं आणखी कांहीं कारण आहे? तें मला सांगा.

कुंभः—राजा! तुझ्या दर्शनाच्या उत्कंठेनेंच माझें आगमन झालें आहे. मी तर असें समजत आहे, कीं तुझ्यासारखा विश्वासु शिष्य या जगांत दुसरा कोणी नाहीं. परब्रह्माचें ठिकाणीं तूं विश्रांति पावला आहेस ना?

शिखिध्वजः—भगवन्! आपल्या कृपाप्रसादानें मला तीन दिवस आत्मस्वरूपाचें ठिकाणीं पूर्ण विश्रांति मिळाली आहे. मला जें समजत नव्हतें तें समजलें आहे. मला जें मिळवावयाचें होतें, तें आज मिळालें आहे. जें मला त्याग करण्यास योग्य होतें, त्याचा मी आज त्याग केला आहे. त्यामुळें मी आतां पूर्ण शांत व सर्व प्रकारें तृप्त झालों आहे.

अशा तऱ्हेनें ते दोघेजण एकमेकांशीं अध्यात्मविषयक गोष्टी बोलत बराच वेळ स्वस्थ बसले व नंतर तेथून उठून त्या दोघांनीं त्या अरण्यांतील निरनिराळ्या प्रदेशांत जीवन्मुक्तदशेंत राहून संचार केला व आध्यात्म-गोष्टींचीच चर्चा करीत त्यांनीं आठ दिवस घालविले.

अशा रीतीनें ते दोघे आनंदांत रहात असतां कांहीं दिवसांनीं राजाचें चित्त वासनारहित व अत्यंत सम झालें, त्यामुळें तो कुंभाप्रमाणेंच शोभिवंत दिसूं लागला. असें पाहून चूडाला आपल्या मनाशीं विचार करूं लागली, "माझ्या पतीचें चित्त आतां आनंदी व निश्चिंत झालें आहे. शरीर आरोग्यसंपन्न आहे. आम्ही दोघेंहि तरुण आहोंत. या वनांत सुंदर व रमणीय पुष्पलतांचे समूह गृहासारखेच आहेत. इतकी सर्व सुखाचीं साधनें उपलब्ध असतांना जी साध्वी स्त्री आपल्या पतीशीं रममाण होत नाहीं, त्या दुर्दैवी स्त्रीचा धिक्कार असो. तत्त्वज्ञानी मनुष्यानें प्रारब्धप्राप्त व अनिषिद्ध असें विषयसुख जर टाकलें तर त्यानें त्यामुळें अधिक सुख कोणतें मिळविलें? यास्तव मी आपल्या चातुर्यानें या वनांत मोठा चमत्कारिक प्रपंच रचून या माझ्या पतीसह विषयसुखाचें यथेच्छ सेवन करते, असा विचार करून ती कुंभरूप धारण करणारी चूडाला राजाला म्हणाली:—

कुंभः—राजा ! आज चैत्र शुद्ध प्रतिपदा म्हणजे पाडवा आहे. आज स्वर्गांत देवेंद्राच्या सभेंत देव, ऋषि यांचें मोठें संमेलन भरतें, त्यावेळीं मला माझे वडिलांचे जवळ अवश्य हजर राहिलें पाहिजे. मी आज संध्याकाळीं वेथून खचित परत येईन. कारण मला स्वर्गापेक्षां तुझ्या सहवासांतच फार संतोष होतो.

असें बोलून कुंभानें राजाला एक कल्पवृक्षाचें फूल दिलें. "महाराज आपण लवकर परत या" असें जों राजा बोलत आहे तोंच कुंभ त्या वनांतून आकाशांत उड्डाण करून निघून गेला व शिखिध्वजाच्या आड गेल्यावर चूडालेनें आकाशांत कुंभाचें रूप टाकून आपलें मूळरूप धारण केलें व ती आकाशमार्गानें आपल्या नगरास प्राप्त झाली. ती कोणाला न दिसतांच स्त्रियांनीं गजबजलेल्या अंतःपुरांत शिरली. तेथील सर्व राजकार्यें लवकर संपवून पुनः शिखिध्वजाच्या पुढें वृक्षावरून फूल किंवा फळ जसें पडावें त्याप्रमाणें ती वरून एकदम उतरली.

## कुंभाला दुर्वास मुनींचा शाप.

ती राजापुढें त्या कुंभरूपांत आपलें मुख खिन्न करून उभी राहिली; पण आंतून तिचें मन मुळींच खिन्न झालेलें नव्हतें. तशा प्रकारच्या त्या कुंभाला पाहून राजा उठून उभा राहिला व स्वतः खिन्न होऊन मोठ्या आदरानें म्हणालाः—

शिखिध्वजः—महाराज ! आपणाला नमस्कार असो; आपण उद्विग्नसे दिसत अहा ! पण आपण ज्ञानी आहात म्हणून हा सर्व क्षोभ सोडावा. या आसनावर बसा. कमल जसें पाण्यानें ओलें होत नाहीं, तसें आपल्या-सारखे जे तत्त्वज्ञानी असतात, ते हर्ष-विषाद मुळींच धारण करीत नाहींत.

राजाचें असें भाषण ऐकून कुंभ आसनावर बसला व पिंजलेल्या कळकाच्या आवाजासारख्या खिन्न वाणीनें म्हणालाः—

कुंभः—हे राजा ! चित्ताचा समतोलपणा हेंच ज्ञानाचें फळ आहे. पण त्यामुळें प्रारब्धकर्म मात्र चुकत नाहींत. अर्थात् समचित्त स्थितींत होणारीं जीं कर्मे तीं वासनांचीं बीजें होत नसल्यामुळें कर्मेच नव्हेत. हे

राजा ! वास्तव हट्टानें कर्मेंद्रियांचा निग्रह करून दुःखांना सहन करण्यापेक्षां चित्तसमाधानाच्या बळावर त्यांच्याकडे लक्षच न देणें चांगलें. तत्वज्ञानी, पुरुषानें देह असेपर्यंत सर्व दशांमध्यें सदाचारानें वागावें एवढाच नियम आहे. हे राजा ! या प्राण्यानें या जन्मांत सुखामध्यें असें रहावें व दुःखामध्यें असें रहावें, असें अगोदरच ठरलेलें असतें. वास्तव जीवांनीं आपल्या कर्मानुसार जें जसें प्राप्त झालें असेल, त्यांतच समाधान मानून राहिलें पाहिजे.

शिखिध्वजः—महाराज ! आपण श्रेष्ठ ज्ञानी व देव. असूनहि आपण असे कसे उद्विग्न झाला, तें मला सांगा.

कुंभः—राजा ! आज स्वर्गांत काय झालें, तें मी तुला सर्व सांगतों; कारण आपलें दुःख दुसऱ्यास सांगितलें असतां कमी होतें. स्वर्गातील संमेलन संपल्यावर मी आपल्या वडिलांना विचारून परत तुझ्याकडे येण्याकरितां निघालों, तोंच आकाशमार्गानें खालीं येतां येतां मेघमालेंतून वेगानें येणाऱ्या दुर्वास मुनीला पाहिलें; मी त्याला नमस्कार करून म्हटलें, "हे मुने ! नील अभ्र हें जणुं वस्त्र व विद्युल्लता हे अलंकार धारण करणारे आपण अभिसारिकेसारखेच दिसत आहां." हें ऐकतांच त्या क्रोधी ऋषीनें मला शाप दिला–"तुझ्या दुर्भाषणामुळें तूं रोज रात्रीं सुंदर स्त्री होशील." त्या क्रुद्ध ब्राह्मणाच्या मुखांतून निघालेले हे शब्द ऐकून मी थोडासा विचार करीत आहे, तोंच तो मुनि दूर निघून गेला. यामुळें मी उद्विग्न मनानें आकाशांतून येथें आलों. माझ्या खेदाचें कारण तुला सांगितलें आहे. राजा, मी आतां दररोज रात्रीं स्त्री होणार ! या संसारांत भवितव्यता मोठी कठीण आहे ! आतां स्वर्गलोकांत कामी तरुण पुरुषामध्यें माझा अपहार करण्यासाठीं मोठा कलह होईल. राजा ! रात्रीं स्त्री झाल्यावर देव, गुरु, वडील माणसें यांच्यापुढें कसें उभें रहावें ?

असें बोलून कुंभ एक क्षणभर स्वस्थ बसला व तदनंतर थोडेसें धैर्य धारण करून म्हणालाः—

कुंभः—हा मी अज्ञ पुरुषाप्रमाणें शोक काय करीत बसलों आहें ? माझ्याहून अगदीं निराळा असलेला हा देहच प्रारब्धप्राप्त स्त्रीत्वाचा अनुभव घेईल, त्यांत असंग व चिन्मात्र मज आत्म्याची कांहीं हानि नाहीं.

शिखिध्वजः—महाराज ! आपण म्हणतां तेंच बरोबर आहे. आतां आपण अगदीं शोक टाकून द्यावा. कारण आपणच असा खेद करूं लागलांत तर मग इतरांना मार्गदर्शक कोण होणार ? अज्ञ जनांना अविवेकामुळें होणाऱ्या खेदाची चिकित्सा करणारे आपल्यासारखे, शास्त्र व तत्त्व यांचा अनुभवसिद्ध उपदेश करणारे गुरु कोठें मिळणार ? हा आपला वास्तविक खेद आहे, असें मला वाटत नाहीं. कारण खेदाच्या वेळीं खेदाला उचित असें बोललें पाहिजे, म्हणूनच आपण हें बोलत आहां. पण आतां समचित्त होऊन प्राप्त झालेल्या स्थितींत खेद टाकून स्वस्थ रहा.

याप्रमाणें परस्परांचें समाधान केल्यानंतर संध्याकाळची वेळ होत चालली, त्यावेळीं त्या दोघांनीं संध्यावंदन करून जप केला व ते तेथील वृक्षाखालीं बसले. त्यानंतर कुंभ तेथें हळु हळु स्त्रीशरीर धारण करूं लागला व जवळच समोर बसलेल्या शिखिध्वजास खिन्नवाणीनें म्हणाला.

कुंभः—राजा ! हा पहा, मी स्त्री बनत चाललों आहें ! हें पहा ! माझे केस वाढत चालले आहेत. हें पहा माझ्या वक्षस्थलावर स्तन उत्पन्न होत आहेत. माझ्या ठिकाणीं सर्व स्त्रियांचे अलंकार, वस्त्रें वगैरे आपोआप उत्पन्न होत आहेत. हे राजा ! खरोखरच आतां तर माझ्या ठिकाणीं सर्व स्त्रीचिन्हें उत्पन्न झालीं आहेत. हरहर ! फार वाईट झालें, मला मोठा खेद होत आहे. काय करूं ? मी आतां स्त्री झालों आहें.

असें बोलून कुंभ मुकाट्यानें खिन्न होऊन बसला. राजाहि त्याला पाहून तसाच खिन्न झाला व थोड्या वेळानें आपल्याशींच म्हणाला, "अरेरे, फार वाईट झालें. हा महाज्ञानी तरुण स्त्री झाला आहे" व नंतर स्त्री बनलेल्या कुंभाला म्हणाला.

शिखिध्वजः—महाराज ! आपण ज्ञानी आहांत. अवश्य होणाऱ्या गोष्टीविषयीं आपण खेद मानूं नका. संसारांतील दुर्दशांची पीडा ज्ञानी पुरुषांच्या देहालाच फक्त होत असते. त्यांचें चित्त निर्विकारी व शांत असावें; म्हणून त्या ठिकाणीं त्यांची बाधा होत नाहीं. यास्तव आपण शांत रहा.

कुंभः—राजा ! ठीक आहे. जसें व्हावयाचें असेल तसेंच होऊं दे. मी आतां मुळींच खिन्न होत नाहीं. नियतीचें उल्लंघन कोण करणार ?

असा विचार करून त्या दोघांनीं आपला खेद कमी केला आणि एकाच शय्येवर त्यांनीं मुकाट्यानें ती रात्र बऱ्याच वेळानें घालविली.

## कुंभरुपी चुडालेचा राजाशीं विवाह.

नंतर सकाळीं तें स्त्रीशरीर टाकून चुडाला पुन कुंभ बनली. अशा तऱ्हेनें कांहीं दिवस गेल्यावर ती कुंभरूप धारण करणारी चुडाला राजाला म्हणाली:—

कुंभः—राजा! मी दररोज रात्रीं स्त्री होतो हें निश्चित आहे. यास्तव मी आतां आपला स्त्रीधर्म सफल करण्यासाठीं कोणातरी भर्त्याला विवाहविधीनें आपलें दान करतो. या त्रिभुवनांत मला तुझ्याशिवाय दुसरा योग्य भर्ता दिसत नाहीं. राजा! प्रयत्न व इच्छा यावांचून प्राप्त झालेल्या स्त्रीसुखाचा मी आपल्या प्रिय मित्रासह उपभोग घेण्याची इच्छा करीत आहे. तरी 'नाहीं' असें म्हणून या माझ्या इच्छेचा विमोड करूं नकोस. सृष्टिकालापासून आरंभ होऊन देव-ऋषी इत्यादिकांमध्यें आजवर क्रमानें चालत आलेलें, अनायासानें साध्य होणारें, हें विवाहकार्य, निरिच्छ स्थितींत जर तूं केलेस, तर तुला कोणता दोष लागणार आहे? यास्तव आपण विवाहविधीनें बद्ध होऊन राहूं या.

शिखिध्वजः—महाराज! मला या विवाहानें कांहीं मोठें सुख किंवा कांहीं त्रास होईल, असें दिसत नाहीं. यास्तव आपली जशी इच्छा असेल तसें करा.

कुंभः—राजा! असें जर असेल, तर आजच शुभ लग्न आहे. आज या श्रावण महिन्याची ही पूर्णिमा आहे. मी कालच विवाहलग्नादि सर्व गणित केलें आहे. यास्तव आज रात्रीं चंद्राचा उदय झाला, कीं आपला दोघांचा विवाह गांधर्वविधीनें होईल. तर, हे राजा! ऊठ, आपण आपल्या विवाहासाठीं सर्व तऱ्हेची सामग्री या अरण्यांतून गोळा करून आणूं या.

असें बोलून कुंभ उठला व त्यानें राजासहवर्तमान पुष्कळ पुष्पें, रत्नें वगैरे गोळा केली. याप्रमाणें सर्व विवाहाची तयारी केल्यानंतर त्या दोघांनीं

## चूडालेची गोष्ट

एकमेकांना मंदाकिनी नदींत स्नान घातलें व त्यांनीं एकमेकांना इष्ट असलेलें भोजन केलें. संध्याकाळ होण्याबरोबर कुंभ स्त्री बनला व राजास म्हणाला, " राजा ! मी मदनिका या नांवाची तुझी भार्या आहे, मी तुझ्या पायावर हा प्रणाम करते " असें बोलून ती सुंदरी लज्जेनें नम्र झाली. नंतर त्या रात्रीं मुमुहूर्तावर त्यांचा गांधर्वविधीनें विवाह झाला व स्वतःच शृंगारलेल्या त्या सुवर्णगुहेंतील पुष्पशय्येवर त्या दोघां सुंदर पतिपत्नींनीं ती रात्र नाना तऱ्हेचे विलास भोगण्यांत घालविली. पुनः दुसरे दिवशीं सकाळीं शिखिध्वजाची पत्नी कुंभ बनली. याप्रमाणें ते दोघेजण दिवसभर गुरु-शिष्य व रात्रीं पती-पत्नी या नात्यानें एकमेकांशीं संयुक्त होऊन राहिले.

### लोभाची परीक्षा

अशा तऱ्हेनें कांहीं महिने लोटल्यानंतर ती कुंभरुप धारण करणारी चूडाला मनाशींच म्हणाली " मी आतां इंद्राचें ऐश्वर्य निर्माण करून याच्या ठिकाणीं त्याचा भोग घेण्याची इच्छा होते कां नाहीं याची आतां परीक्षा पहातें. " असा विचार करून तिनें आपल्या योगमायेनें त्या अरण्यभूमींत देव व अप्सरा यांसह इंद्र आला आहे, असें दाखविलें. इंद्राला पाहून शिखिध्वजराजानें त्याचें यथाविधि पूजन केलें.

शिखिध्वजः—हे देवेंद्रा ! तूं स्वतः इतक्या दुरून येथें येण्याचे श्रम कशाला व कोणत्या उद्देशानें घेतलेस, तें कृपा करून मला सांग.

इंद्रः—राजा ! तुझे सद्गुण ऐकून आम्हाला स्वर्गांतून येथें यावें लागलें. तर आतां उठ स्वर्गलोकीं चल. तेथें देवस्त्रिया तुझ्या विषयीं अतिशय उत्कंठित होऊन राहिल्या आहेत. स्वर्गांत येऊन देवांच्या घरांत जीवन्मुक्त झालेला तूं विविध भोगांचा उपभोग घे. राजा ! तुझ्यासारखे साधू अनायासें आलेल्या भोगश्रीचा तिरस्कार करीत नाहींत व न प्राप्त झालेल्या तिचा अभिलाषहि करीत नाहींत.

शिखिध्वजः—हे देवेंद्रा ! मी सर्व प्रदेशाला स्वर्गाप्रमाणेंच समजतो. कारण मी सर्व ठिकाणींच संतुष्ट होतो. माझें मन वांछारहित असल्यामुळें मी सर्वत्र आनंदी आहे. नियमानें एकाच ठिकाणीं असलेल्या अशा तुच्छ

स्वर्गाला येण्याची मला मुळींच इच्छा नाहीं. यास्तव आपली आज्ञा पाळतां येत नसल्यामुळें मला फार वाईट वाटतें.

इतकें बोलून राजा स्वस्थ बसला असतां " तूं जर स्वर्गाला येत नसशील तर मी परत जातों " असें इंद्र म्हणाला व जाऊं लागला. तेव्हां 'मी आजच स्वर्गाला येत नाहीं, तर पुनः राज्यावर प्रतिष्ठित झालों व तुझ्या शत्रूबरोबर लढण्याचा प्रसंग आला, म्हणजे मी स्वर्गलोकीं येईन' असें शिखिध्वज म्हणाला असतां 'हे कुंभा! तुझें कल्याण असो!' असें कुंभाला म्हणून इंद्र अंतर्धान पावला. त्याबरोबरच बाकीचा देवसमूहहि क्षणांत अदृश्य झाला.

वरील सर्व प्रकार पाहून चूडालेनें असा विचार केला, " हा राजा भोगेच्छेनें व्याकूळ होत नाहीं. ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. इंद्र आल्यावर राजानें इंद्राचें पूजन व त्याच्याशीं भाषण वगैरे सर्व व्यवहार अगदीं शांतपणानें पण मनापासून केला.

## क्रोधाची परीक्षा.

'मी पुनः दुसऱ्या एखाद्या, चित्ताला क्षुब्ध करणाऱ्या रागद्वेषप्रधान प्रपंचला मायेनें निर्माण करून याची परीक्षा पाहतें. " असा विचार करून रात्रीं चंद्राचा उदय झाला असतां ती साध्वी मदनिका झाली. त्यावेळीं शिखिध्वजराजा नदीच्या तीरावर संध्या व जप करीत बसला होता. इतक्यांत पुष्पगुच्छानीं भरलेल्या लतागृहांत संकल्पित पुष्पशय्येवर संकल्पानेंच उत्पन्न केलेल्या एका प्रियकराजवळ ती बसली. शिखिध्वजराजा नदीवरून संध्या संपल्यावर परत आला व आपल्या प्रिय कांतेला हुडकूं लागला. तो त्याला त्या लतागृहांत आपल्या प्रियकराला अलिंगन देऊन बसलेली मदनिका दिसली. तीं दोघें एकमेकांशीं रममाण झालेलीं दिसलीं. तो त्यांचा चाललेला कामविलास पाहून राजा निर्विकार चित्तानें आपल्याशीं म्हणाला, " अहो! हीं दोघें कामसुख भोगीत आहेत, यांना आपल्या इच्छेप्रमाणें हें सुख खुशाल भोगूं द्या! मला पाहून भयभीत झालेल्या यांना मी विघ्न करीत नाहीं " असें म्हणून राजा तेथून निघून गेला.

त्यानंतर दोन घटकांनीं तो मायिक प्रपंच नाहींसा करून ती मदनिका त्या प्रियकराच्या संभोगानें व्याकूळ झालेलें शरीर राजाला दाखविण्याच्या उद्देशानें लतागृहांतून बाहेर आली व राजाच्यापुढें लज्जेनें मुख खालीं घालून थोडावेळ स्वस्थ बसली. इतक्यांत राजा आपलें ध्यान सोडून अगदीं अक्षुब्ध चित्तानें तिला म्हणाला.

शिखिध्वजः—हे सुंदरी ! तूं आपलें कामविलासाचें सुख सोडून इतक्या लवकर कशाला आलीस ? तूं पुनः जाऊन आपल्या त्या प्रियकराला संतुष्ट कर. हे मानिनि ! मी असल्या गोष्टींनीं मुळींच उद्विग्न झालों नाहीं. विरक्त कुंभ व मी यांचा स्नेह आहे तो तसाच रहाणार. तूं कुंभाहून निराळी आहेस. दुर्वासाच्या शापामुळें तूं स्त्री झाली आहेस. यास्तव तुला वाटेल तसें कर.

मदनिकाः—महाराज ! स्त्रियांचा स्वभाव हा असाच चंचल आहे. आपण संध्या व जप करण्यास बसला असतां या गृहस्थानें माझी प्रार्थना केली. तेव्हां माझा नाइलाज झाला. पुरुषांना वश करण्यास समर्थ अशा सौंदर्यास प्राप्त झालेल्या स्त्रिया परपुरुषाच्या जर सन्मुख झाल्या तर विवाहित पतीचा क्रोध, शास्त्रीय निषेध, जनापवाद व पातिव्रत्याचा भंग यांतील कोणींहि त्यांचें त्या पापकर्मापासून निवारण करूं शकत नाहीं. कारण अतिप्रबल आसक्ति झाल्यावर त्या जाराच्या संगाला निरोध करण्यास समर्थ नसतात. महाराज ! मी अबला स्त्री आहे ! मूढ बाला आहे ! अपराधी आहे ! मला क्षमा करा. साधु क्षमावान् असतात.

शिखिध्वजः—बाले ! मी तुझ्यावर मुळींच रागावलों नाहीं. केवळ साधूंनीं निंद्य मानल्यामुळें यापुढें मी तुला आपली पत्नी मानीत नाहीं. हे अंगने ! आपण पूर्वीप्रमाणें या वनामध्यें मित्रत्वानें व विरक्तपणानें राहूं.

याप्रमाणें त्यावेळीं राजा सम व शांत झालेला पाहून चूडालेला मोठा आनंद झाला व आपल्या मनांत म्हणाली " खरोखर मोठें आश्चर्य आहे ! हा भगवान् परम साम्यास प्राप्त झाला आहे, वैराग्यामुळें क्रोधशून्य झाला आहे व त्यामुळें जीवन्मुक्त होऊन राहिला आहे. यास्तव मी आतां आपला सर्व वृत्तांत राजाला सांगून टाकते. मी हें कुंभरूप टाकून चूडालाच बनतें "

## चूडाला राज्यापुढें प्रकट झाली.

असा विचार करून लागलीच तिनें तें मदनिकेचें रूप टाकलें व चूडालेचें रूप तेथें राजाच्या पुढें प्रकट केलें. त्या आपल्या प्रिय कांतेला पाहून राजाचें नेत्र विस्मयानें प्रफुल्लित झाले व तो आश्चर्यचकित होऊन म्हणाला.

शिखिध्वजः—हे कमलनयने ! तूं कोण आहेस ? तूं कोठून आलीस ? तूं आपल्या ह्या शरीराकृतीनें, व्यवहारानें, स्मित हास्यानें, प्रेमळ व नम्र भाषणानें माझ्या पत्नीचीच मूर्ति आहेस, असें वाटतें.

चूडालाः—हे प्रभो ! आपण असेंच समजा, मी आपली चूडालाच आहे. यांत संशय नाहीं. महाराज ! आपणास बोध करण्यासाठींच मी कुंभादिकांचीं रूपें धारण केलीं. आपण आतां सर्वज्ञ झाला आहांत, तरी आपण ध्यानानें हें सर्व कांहीं जाणू शकाल. तर लवकर ध्यानानें पहा.

राजानें लागलीच ध्यानानें आतांपर्यंत घडलेला सर्व वृत्तांत पाहिला व मोठा आनंदित होऊन त्यानें चूडालेला जवळ घेऊन तिला मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें व त्या स्थितींत दोन घटकाभर तीं दोघें परमानंदाचा उपभोग घेत शांत राहिलीं. नंतर राजा तिला अतीशय प्रेमानें म्हणालाः—

शिखिध्वजः—हे सुंदरी ! पत्नीच्या पुरुषार्थाची सिद्धि व्हावी म्हणून तूं कितीतरी क्लेश सहन केलेस ! जिनें आपल्या पतीला संसारसमुद्रांतून वर काढलें तिची तुलना कोणाशीं बरें करतां येणार ? कुलस्त्रिया जशा आपल्या भर्त्याचा उद्धार करूं शकतात, तसें शास्त्रार्थ, गुरु, मंत्र इत्यादिकहि त्याचा उद्धार करण्यास समर्थ नाहींत. खरोखर ! ज्यांच्यामुळें पुरुषाला इहलोकीं पूर्ण सुख मिळून शेवटीं मोक्ष सुखाचाहि लाभ होतो, अशा कुलस्त्रिया सर्वदा सर्व प्रकारें पूज्य आहेत. निरिच्छ असलेल्या व संसारसागराच्या पार गेलेल्या तुझ्या या उपकाराची फेड मी कशी करूं ? या लोकांत मी तुलाच कुलांगना समजतो. तूं खरी साध्वी आहेस. चूडाले ! ये, तुझ्या गुणांनीं अत्यंत उत्सुक झालेल्या मला तूं पुनः एकदां आलिंगन दे.

याप्रमाणें बोलून शिखिध्वजराजानें चूडालेला जवळ घेऊन पुनः मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें.



शिखिध्वजः—चूडाले ! ये, तुझ्या गुणांनी अत्यंत उत्सुक झालेल्या मला तूं पुनः एकदां आलिंगन दे. ( पृष्ठ २३४ ).

चूडालाः—महाराज ! आपण तपासारख्या शुष्क क्रियेमध्यें तत्पर झाला हें पाहून मला फार वाईट वाटलें. त्यामुळें आपणाला ज्ञान करून देणें हा स्वार्थच मी संपादन केला आहे. तेव्हां आतां त्याविषयीं आपण माझा गौरव कशाला वर्ें करतां ?

शिखिध्वजः—हे सुंदरी ! तूं जसा यावेळीं शुभ स्वार्थ संपादन केला आहेस, तसाच स्वार्थ सर्व कुलस्त्रिया संपादन करोत !

चूडालाः—हे प्रभो ! त्या तुच्छ तृष्णावृत्ती, त्या संकल्परूप कुकल्पना आपल्या ठिकाणीं आतां मुळींच दिसत नाहींत. महाराज ! आपण आतां कसे आहा ? आपणास कशाची इच्छा आहे ?

शिखिध्वजः—हे प्रिय चूडाले ! मी निरिच्छ आहे, आकाशाप्रमाणें स्वच्छ व निस्पृह आहे. फार दिवसांनीं देहादिकांना ' मी ' म्हणण्याचें सोडून स्वरूपाच्या ठिकाणीं स्थित आहे. जगांतील सर्व पदार्थांसंबंधीं विषमदृष्टि नाहींशी करून मी आतां पूर्ण समदृष्टि होऊन राहिलों आहे, मी शांत आहे, मी पूर्ण परमानंदस्वरूप आहे. हे पतिव्रते ! मी अगदीं तुझ्यासारखाच आहे. सारांश, मी जो कोणी आहे, तो आहे. मी या पलीकडे कांहीं बोलूं शकत नाहीं. हे चंचलनयने ! तूं माझा गुरु आहेस, तुला माझा नमस्कार असो. तुझ्या प्रसादानें मी या भवसागरांतून तरलों आहे. मी सर्व दृश्याहून अगदीं विलक्षण, सर्वव्यापी असा होऊन राहिलों आहे.

चूडालाः—हे प्राणेशा ! आतां आपणांस काय आवडतें तें सांगा.

शिखिध्वजः—मला अमूक एक आवडतें व अमूक एक आवडत नाहीं असें मला आतां कांहींच माहीत नाहीं. यास्तव हे सुंदरी ! तूं जें कर्तव्य म्हणून जाणत असशील तें कर. प्रतिबिंबाप्रमाणें मी आपल्या हृदयांत त्याचेंच कर्तव्यत्वानें धारण करीन. यदृच्छेनें जें कांहीं अनिषिद्ध कार्य प्राप्त होईल, त्याची मी स्तुति किंवा निंदा करीत नाहीं; यास्तव जशी तुझी इच्छा असेल तसें कर.

चूडालाः—असें जर असेल तर, हे महाबाहो ! माझें मत ऐका व त्याप्रमाणें करा. आम्हीं सर्वत्र ऐक्यभावनेनें सर्व भूतांमध्यें एकच आत्मा

आहों, असा अनुभव घेतल्यानें आमच्या अज्ञानाचा क्षय झाला आहे. आम्हीं निरिच्छ व आकाशाप्रमाणें निर्लेप होऊन राहिलों आहों. यास्तव आपण आतां सांप्रत. राज्य करून शिल्लक राहिलेलें आयुष्य जीवन्मुक्त अवस्थेंत घालवून क्रमानें कांहीं कालानें विदेह स्थितीस प्राप्त होऊं. आपण आपल्या उज्जयिनी नगरांत पुनः राजे व्हा व मी आपली महाराणी होईन.

शिखिध्वजः—हे प्रिय चूडाले ! तूं योग्य बोललीस. राज्याचें ग्रहण अथवा त्याग करण्यांत काय अर्थ आहे ? सुखदुःख दशा टाकून निर्मत्सर होऊन आपण दोघें शांत स्थितींत विहार करूं.

याप्रमाणें परस्पर गोष्टी बोलून चूडालेनें आपल्यापुढें सात समुद्रांच्या पाण्यानें परिपूर्ण असा एक रत्नजडित कुंभ संकल्पानें निर्माण केला व त्यांतील उदकानें पूर्वेकडे तोंड करून बसलेल्या आपल्या भर्त्याला तिनें एकांतांत स्वराज्यावर अभिषेक केला; व राजानेंहि चूडालेला महाराणीपदावर अभिषेक केला व म्हणाला " हे प्रिये ! तूं एका क्षणांत आपल्या योगसामर्थ्यानें असंख्य सैन्य निर्माण कर. " हें राजाचें बोलणें ऐकून तिनें असंख्य सैन्य निर्माण केलें. नंतर तो शिखिध्वजराजा आपल्या चूडालाराणीसह हत्तीच्या अंबारींत बसून सर्व सैन्यासह त्या महेंद्रपर्वतावरून निघाला व लवकरच आपल्या राजधानीला प्राप्त झाला. राजाला योग्य अशा लौकिक व शास्त्रीय मंगलांनीं युक्त असलेल्या आपल्या राजवाड्यांत प्रवेश करून त्या राजानें आपल्या अतीशय नम्र प्रजेचा उत्तम तऱ्हेनें सन्मान केला. या प्रमाणें चूडालेसह दहा हजार वर्षे या भूलोकीं राज्य करून तो राजा या पांचभौतिक देहाचा त्याग करून निर्वाणास प्राप्त झाला.

तात्पर्यः—चित्त, अहंकार यांचा त्याग केल्याशिवाय सर्वत्याग होत नाहीं व सर्वत्याग झाल्याशिवाय आत्मज्ञानाचा लाभ होत नाहीं. हें तत्त्व या गोष्टींत सिद्ध केलें आहे. तसेंच काम, क्रोध, लोभ, राग व द्वेष हे विकार पूर्णत्वानें नाहींसे होणें हेंच जीवन्मुक्तीचें खरेखुरें लक्षण आहे. हेंहि तत्त्व या गोष्टींत विशद करून दाखविलें आहे.

## (३५) कचाची गोष्ट.

**राज्ञा राजेव पित्रात्र सर्वस्वं त्याजितः कचः ॥**
**अंतेऽहंकारसंत्यागात्पूर्णोऽभूदिति वर्ण्यते ॥ नि. पू. १११**

**भावार्थः**—चूडालेनें शिखिध्वज राजाला जसा बोध केला, त्याचप्रमाणें बृहस्पतींनीं आपला मुलगा जो कच त्याच्याकडून सर्वस्वाचा त्याग करविला व शेवटीं तो सर्वत्याग अहंकारत्यागानें पूर्ण झाला, हें सर्वत्यागाचें स्वरूप ह्या गोष्टींत सांगितलें आहे.

देवगुरु बृहस्पतीचा मुलगा कच भर तारुण्यांतच मुमुक्षु बनला व आपल्या वडिलांना ( बृहस्पतीला ) म्हणाला 'भगवन् ! या भयंकर संसारांतून कसें सुटता येतें, तें मला कृपा करून सांगा.'

बृहस्पतिः—बाळा ! या संसार सागरांतून सर्वत्यागानें शीघ्र बाहेर निघतां येतें. पण तो सर्वत्याग उद्वेगरहित असावा लागतो; म्हणजे अतिशय दृढ वैराग्यामुळें विषयांचा त्याग केल्यावर त्याबद्दल पश्चात्ताप होतां कामा नये. अशा सर्व त्यागानें संसारांतून सुटता येतें.

असें बृहस्पतीचें बोलणें ऐकून सर्वांचा त्याग करून कच निर्जन अरण्यांत गेला. तरी त्यामुळें बृहस्पतीला वाईट वाटलें नाहीं, कारण महात्मे संयोग व वियोग या प्रसंगीं मेरुसारखे स्थिर असतात त्यानंतर आठ वर्षांनीं तो कच पुनः एका महारण्यांत असलेल्या आपल्या पित्यापाशीं आला व म्हणाला 'बाबा ! मी सर्वत्याग करून आतां आठ वर्षे झालीं. तथापि अजून मला आत्मविश्रांति मिळत नाहीं. यास काय करावें ?' असें कचानें विचारलें असतां 'सर्वांचा त्याग कर' असें बोलून बृहस्पति स्वर्गास निघून गेले. नंतर कचानें आपल्या अंगावरील वल्कलादिकाचाहि त्याग केला; आणि शरद् ऋतूंतील आकाशासारखा झाला. इतकें करून देखील त्याचें मन स्थिर होईना. म्हणून खिन्न मनानें तो पुनः आपल्या पित्यापाशीं आला.

कचः—बाबा ! कन्था, दंड, आसन इत्यादि सर्वांचा त्याग केला. तथापि मला स्वस्वरूपीं विश्रांति प्राप्त होत नाहीं. याला काय करूं ?

बृहस्पतिः—बाळा कचा ! चित्ताला सर्व म्हणून म्हटलें आहे, यास्तव त्याचा त्याग केलास म्हणजे तुला स्वस्वरूपीं विश्रांति मिळेल. सर्वज्ञ लोक चित्तत्यागालाच सर्वत्याग असें म्हणतात.

असें कचाला सांगून बृहस्पति वेगानें आकाशांत निघून गेले. इकडे कच खिन्न न होतां चित्ताचा त्याग करण्यासाठीं त्याचेंच संशोधन करूं लागला. त्या अरण्यांत पुष्कळ विचार केल्यावरहि 'जेव्हां त्याला चित्त काय आहे, हें कळेना, तेव्हां, चित्ताचें स्वरूप जाणण्यासाठीं मी पित्याजवळ जातो व त्याचें स्वरूप तत्काल समजून घेऊन निःशोक होऊन राहतो. असा विचार करून तो कच स्वर्गास गेला व आपल्या पित्याला साष्टांग नमस्कार घालून म्हणालाः—

कचः—भगवन् ! मला चित्ताचें स्वरूप सांगा, म्हणजे मी त्याचा त्याग करीन

बृहस्पतिः—बाळा कचा ! चित्तवेत्ते लोक आपला अहंकार हेंच चित्त आहे असें जाणतात. प्रत्येक जंतूच्या आंत हा जो अहंभाव आहे तेंच चित्त आहे, असें समज.

कचः—बाबा ! मला तर अहंकाराचा त्याग दुष्कर वाटतो, तो कसा सिद्ध होईल तें मला सांगा.

बृहस्पतिः—एखाद्या नाजूक फुलाला चुरगळून टाकण्यापेक्षां किंवा डोळे मिटण्यापेक्षा अहंकाराचा त्याग करणें फारच सुकर आहे. त्यांत क्लेश मुळींच नाहींत. केवळ अज्ञानानें सिद्ध झालेली वस्तु ज्ञानानें नाश पावते. बाळा ! मिथ्या भ्रम जसा नसतो तसा वस्तुतः अहंकार नाहीं. रज्जूच्या ठिकाणीं जसा साप भासतो तसाच वस्तुतः असत् असलेला हा अहंकार बालानें कल्पिलेल्या वेताळा प्रमाणें भासत आहे. तो सत्य नाहीं व मिथ्याहि नाहीं. तर केवळ अनादि, अनंत, शुद्ध, चिन्मात्र तत्त्वच आहे. अशा या तत्त्वामध्यें हा अहंभाव कोण, कोठून, कसा उद्भवेल ? जलामध्यें धुळीचा लोट केव्हां तरी उद्भवतो का ? अग्नीपासून पाण्याचा प्रवाह सुरू होणें शक्य आहे का ? यास्तव, हे बाळा कचा ! 'हा मी, हें शरीरा-

दिकच मी ' हा वृथा भ्रम सोड. कारण तो तुच्छ आहे. तूं तर स्वतः सर्वव्यापक केवल चिन्मात्र आहेस. हे कचा! तूं नित्य, अत्यंत शुद्ध, अनंत, सन्मात्रच आहेस; अशा तुझ्या ठिकाणीं हा परिच्छिन्न ' अहं ' निश्चय कोण आहे? कोणी नाहीं.

असा बृहस्पतीचा उपदेश ऐकून व त्याप्रमाणें अभ्यास करून कच जीवन्मुक्त झाला.

तात्पर्यः--सारांश, सर्वत्याग केल्यावर म्हणजे अहंकार सोडल्यावरच म्हणजे अहंकार मुळींच नाहीं, असें चांगलें समजल्यावर आत्मतत्त्वाचें ज्ञान होतें.



## ( ३६ ) मिथ्या पुरुषाची गोष्ट.

**मिथ्यापुरुषबोधाय शृणु राघव शोभनाम् ॥**
**इमामाख्यायिकां हासजननीं मदुदीरिताम् ॥** नि. पू. ११२-१५

**भावार्थः**—मिथ्या पुरुष कोण आहे, हें समजून सांगण्याकरितां हास्योत्पादक अशी ही मिथ्या पुरुषाची गोष्ट सांगितली आहे.

कोणी एक मायावी मिथ्या पुरुष एकान्त स्थानीं उत्पन्न झाला आहे व त्या शून्य स्थानींच राहिला आहे. त्याच्या त्या आश्रयस्थानीं त्या मिथ्या पुरुषाहून दुसरें कांहीं नाहीं व जें कांहीं आहे असें वाटतें, तें त्याहून निराळें नाहीं. तो जें दुसरें कांहीं पहातो, तो तें त्याच्या भ्रांतीनेंच पहातो. त्या एकान्तस्थलीं रहाणारा तो मिथ्या पुरुष असा संकल्प करूं लागला कीं " आकाशाचा मी उपजीवक आहे. आकाश माझें उपजीव्य आहे. यास्तव आकाशच असलेला मी आकाशाला आच्छादित करून त्याचें रक्षण करतो. " असें चिंतन करून त्यानें आकाशाच्या रक्षणासाठीं गृह निर्माण केलें व त्यावर ' मी याचें रक्षण केलें आहे ' अशी त्यानें आस्था ठेवली व त्यानें तो मोठा संतुष्ट झाला. पुढें कांहीं कालानें त्याचें

तें गृह नाश पावलें. तेव्हां 'हाय हाय! हे माझ्या गृहाकाशा! तूं नष्ट झालास, एका क्षणांत कोठें गेलास?' असें म्हणून तो त्याच्यासाठीं फार शोक करूं लागला. अशा तऱ्हेनें पुष्कळ शोक करून त्या मूढमतीनें आकाशाच्या रक्षणासाठीं तेथेंच एक कूप (विहिर) खणला, आणि पूर्वीच्या गृहाकाशावर जसा आसक्त होता तसाच या नव्या कूपाकाशावरहि आसक्त झाला. त्यानंतर कांहीं कालानें त्या कूपाकाशाचाहि नाश झाला. तेव्हां तो कूपाकाशाकरितां पुनः शोक करूं लागला. नंतर त्यानें कुंभाकाश निर्माण केलें. पुढें कांहीं कालानें त्या कुंभाचाहि निकाल लागला. पुढें त्यानें आकाशाचें रक्षणासाठीं एक कुंड बनविलें. कांहीं कालानें त्याचें तें कुंडहि नाश पावलें. कुंडाकाशाकरितां शोक करून एक चौसोपी वाडा तयार केला पण कांहीं कालानें तो मोठा वाडाहि जमीनदोस्त झाला. पुढें त्यानें एक कुसूल (धान्याचें कोठार-कणग) तयार केलें. पुढें कांहीं कालानें त्याचाहि निकाला लागला. याप्रमाणें गृह, कूप, कुंभ, कुंड, चौसोपी वाडा व कुसूल इत्यादि निरनिराळ्या वस्तू आकाशाच्या रक्षणाकरितां निर्माण करण्यांत, त्याच्यावर आसक्ति ठेवण्यांत व त्याविषयीं शोक करण्यांत त्याचा सर्व काल जाऊं लागला. अशा तऱ्हेनें एका दुःखांतून दुसऱ्या दुःखांत व दुसऱ्यांतून तिसऱ्या दुःखांत तो पडत आहे व त्याचा अशा तऱ्हेचा व्यवहार सतत चालला आहे.

तात्पर्यः—हा जो वर मिथ्या पुरुष सांगितला तो अहंकार होय. हा शून्य माया-आकाशांत उत्पन्न झाला आहे व त्यांतच लहानाचा मोठा होऊन हजारों कल्पना करितो. हें मला इष्ट आहे, हें अनिष्ट आहे, असें समजतो. कूप, कुंड, कुंभ वगैरे स्थूल देहांस निर्माण करून त्यांच्या योगानें मी आत्म्याचें रक्षण केलें आहे, असें समजतो व त्या त्या देहाकाशाशीं भावनेनें तादात्म्य पावतो म्हणजे तोच मी, असें समजतो. शरीराचा नाश झाला असता 'आत्मा नष्ट झाला' अशा शंकेनें सर्व लोक व्यर्थ शोक करितात. पण घटादिकांचा नाश झाला तरी ज्याप्रमाणें त्यांतील आकाश नाश पावत नाहीं, त्याप्रमाणें हे स्थूल देह जरी नष्ट झाले तरी त्यांत असणारा आत्मा नाश पावत नाहीं.

## ( ३७ ) भृंगीशाची गोष्ट.

एतद्व्रतत्रयं राम पुरा चंद्रार्धमौलिना ॥
भृंगीशाय तु संप्रोक्तं येनासौ विज्वरः स्थितः ॥ नि. पू. ११५-३

भावार्थः—जें व्रतत्रय (महाकर्ता, महाभोक्ता व महात्यागी) पूर्वी शंकरानें भृंगीशाला सांगितलें, त्यामुळें तो शोकरहित झाला. तें व्रतत्रय या गोष्टींत सांगितलें आहे.

पूर्वी मेरुपर्वताच्या अग्निसारख्या दैदीप्यमान अशा उत्तर दिशेच्या शिखरावर श्री भगवान् शंकर आपल्या परिवारासह रहात असतांना महातेजस्वी व बुद्धिमान् अशा भृंगीशानें शंकरांना नमस्कार करून व हात जोडून असें विचारलें:—

भृंगीशः—भगवन् ! या संसार रचनेस पाहून मी अत्यंत मोहित होत आहे. काय केलें असतां माझा मोह दूर होऊन मला आत्मविश्रांति लाभेल ?

श्रीशंकरः—हे भृंगीशा ! तूं पुण्यपापादि सर्व शंकांचा त्याग करून व शाश्वत धैर्याचा म्हणजे कूटस्थ आत्मभावाचा आश्रय करून **महाकर्ता, महाभोक्ता** व **महात्यागी** हो.

भृंगीशः—हे भगवन् ! महाकर्ता, महाभोक्ता व महात्यागी कोणाला म्हणतात, तें मला समजून सांगा.

श्रीशंकरः—हे महाभागा भृंगीशा ! जो सर्व कर्मे निष्काम बुद्धीनें केवल लोकसंग्रहाकरितां करीत असतो, तो **महाकर्ता** होय. ज्याची बुद्धि दैववशात् घडलेल्या अश्वमेध–कलंजभक्षणादि शुभाशुभ कार्यांत मी 'धार्मिक आहे, किंवा मी पापी आहे,' अशा कुतर्कोनें कल्पिलेल्या धर्माधर्मांनीं लिप्त होत नाहीं, तो महाकर्ता होय. जो कोणत्याहि इष्ट भोगांची आकांक्षा करीत नाहीं व अनिष्टांचा द्वेष करीत नाहीं, वर प्रारब्धप्राप्त सर्व निर्विकार चित्तानें भोगतो, त्याला महाभोक्ता असें म्हणतात. कडू, आंबट, खारट, तिखट, मिष्ट, अमिष्ट, उत्तम, अधम इत्यादि अन्न एकसारख्याच चित्त वृत्तीनें जो खातो, तो महाभोक्ता होय. देह माझा नव्हे, जन्महि माझें नव्हे, युक्तायुक्त कर्मेंहि माझीं नव्हेत असा जो आंत निश्चयवान् असतो

तो महात्यागी होय. हे सर्व दृश्य पदार्थ ज्यानें यथार्थ दर्शनानें उत्तम प्रकारे टाकले आहेत तो महात्यागी होय.

तात्पर्यः—या संसारांत जें कांहीं भासतें, तें सर्व जन्मादिविकार-शून्य ब्रह्मच आहे. असा निश्चय करून जर अंतर्मुख होऊन अहंकार टाकला तर बाहेरील सर्व कार्ये जरी करीत राहिला तरी तो केव्हांहि खेदाला प्राप्त होणार नाहीं.

---

## ( ३८ ) इक्ष्वाकूची गोष्ट.

कोऽहं कथं जगदिति विचारोऽत्र निदर्शनम् ॥
इक्ष्वाकोर्मनुना प्रोक्तो विवेकः संप्रकीर्त्यते ॥ नि. पू. ११७

**भावार्थः**—मी कोण ? व हें जगत् कसें उत्पन्न झालें आहे ! हें कळण्यासाठीं मनूनें इक्ष्वाकु राजाला सांगितलेला विवेक या गोष्टींत वर्णिला आहे.

इक्ष्वाकु नांवाच्या राजानें एकदां एकांतांत बसून 'या दृश्य प्रपंचाचा हेतु कोण बरें असेल !' याचा त्यानें आपल्या मनाशीं पुष्कळ विचार केला. पण त्याला ह्या जगाचें कारण कळलें नाहीं. तेव्हां त्यानें एकदां भगवान् प्रजापति मनूची पूजा करून त्याला असें विचारलें:—

इक्ष्वाकुः—हे करुणानिधे ! हे भगवन् ! हें सर्व जग कोठून उत्पन्न झालें ? त्याचें स्वरूप कशा प्रकारचें आहे ? हें जगत् संख्येनें व परिमाणानें केवढें आहे ? हें कोणाचें आहे ? मी या विषम संसारबंधनांतून कसा मुक्त होईन ?

मनुः—अरे राजा ! हें जें कांहीं दिसत आहे, तें कांहीं नाहीं, तर जसें आकाशांतील गंधर्व नगर किंवा मारवाड देशांतील मृगजळ तसें तें आहे. ही सर्व दृश्यांनीं संपन्न असलेली सर्गपरंपरा त्या अविनाशी आत्मतत्त्वांतच आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें स्थित आहे. त्यांतील कांहीं चिदाभास स्थूल समष्टि-अभिमानानें ब्रह्मांडाच्या स्वरूपास प्राप्त झाले

आहेत व कांहीं पृथिव्यादि–अभिमानानें भूतत्वास प्राप्त झाले आहेत. आणखी कांहीं चतुर्विध भूतसमूहत्वास प्राप्त झाले आहेत. अशा प्रकारें ही जगत्स्थिति झाली आहे. अर्थात् बंधमोक्षादि सर्व कल्पना भ्रामक असल्यामुळें वस्तुतः बंध नाहीं, मोक्ष नाहीं. तर निर्विकार एक ब्रह्मच आहे. एकच जल जसें तरंगभेदांनीं नानाप्रकारें स्फुरण पावावें, त्याप्रमाणें चित्हि जगद्भेदांनीं स्फुरण पावतें. पण तें स्फुरण मायामय असल्यामुळें वस्तुतः कांहींच नाहीं. यास्तव तूं बंधमोक्षभ्रम टाकून देऊन अभयब्रह्मरूप होऊन रहा. **शास्त्रें किंवा गुरू यांच्या योगानें परमेश्वर दिसत नाहीं तर तो आपल्या स्वस्थ बुद्धीनेंच मात्र स्वतःकडून पाहिला जातो.** प्रवासी ज्या मार्गानें जातात, त्या मार्गावर आसक्ति ठेवीत नाहींत, त्याचप्रमाणें या आपल्या देहेंद्रियादिकांस राग-द्वेषरहित बुद्धीनें पहावें. त्यांच्या ठिकाणीं आदर करूं नये. किंवा त्यांचा तिरस्कारहि करूं नये. उपवासादिकांच्या योगानें त्यांना पीडाहि करूं नये, तर त्या देहेंद्रियांना प्रत्येक पदार्थामध्यें त्यांच्या स्वभावानुसार खुशाल राहूं द्यावें. उदासीन पदार्थाप्रमाणें देहादि प्रत्येक पदार्थाचा मनानें सर्वथा त्याग करावा व अंतःकरणांत अत्यंत शीतल होऊन रहावें. यास्तव मुमुक्षु पुरुषानें 'मी देह आहे' या बुद्धीचा त्याग करून 'मी चिन्मात्र आहे' या बुद्धीचा सतत स्वीकार करून रहावें. असें केलें असतां तुला संसारांतून मुक्त होतां येईल.

असें बोलून तो भगवान् मनु ब्रह्मलोकास निघून गेला आणि इक्ष्वाकूहि त्या दृष्टीचा आश्रय करून स्थिर झाला.



## ( ३९ ) व्याध व मुनी यांची गोष्ट.

**निर्विकल्पा हि चित्तुर्यं तदेवास्तीह नेतरत्॥** नि.पू. १२४–३६

**भावार्थः**—निर्विकल्प चित् हीच तुर्य अवस्था आहे, हा सिद्धांत या गोष्टींत स्पष्ट करून दाखविला आहे.

## व्याध व मुनी यांची गोष्ट

एकदां एका व्याधानें एका मोठ्या अरण्यांत महामौन धारण करून बसलेल्या एका अद्भुत मुनीला पाहून असें विचारलें, 'हे मुने! माझ्या बाणानें विद्ध झालेला हरिण येथें आला होता, तो कोठें गेला, हें तुला माहीत आहे?' तेव्हां तो मुनी त्यास उलट बोलला, 'हे साधो! आम्ही वनवासी मुनि समदृष्टि आहों. व्यवहार करण्यास जो समर्थ असतो तो अहंकार आम्हांला नाहीं. हे मित्रा! सर्व इंद्रियांचीं कर्में मन करितें. पण तें माझें अहंकारमय मन फार दिवसापासून क्षीण झालें आहे. जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त या नांवाच्या कोणत्याच दशा मी जाणत नाहीं. मी केवळ तुर्यावस्थेंतच स्थित आहे. त्या अवस्थेंत दृश्य नाहीं.' त्या मुनिनायकाचें तें भाषण ऐकून त्याचा कांहींच अर्थ न कळल्यामुळें तो व्याध त्याला इष्ट असलेल्या दिशेस निघून गेला.

तात्पर्य:—तुर्यावस्थेचें स्वरूप सांगण्याकरितां वरील गोष्ट सांगितली आहे.

जाग्रत्, स्वप्न व सुषुप्त ह्या तीन अवस्था चित्ताच्या आहेत. ह्या तीन अवस्थांनीं रहित असणारें चित्त मृत होय व त्याला मृत झाल्यावर 'सत्त्व' असें नांव वेदांतशास्त्रांत दिलेलें आहे. या 'सत्त्व' संज्ञक चित्तांत निर्मलतेचें आधिक्य असतें त्यामुळें त्यांत स्वात्मसुखाचा सर्वदाच आविर्भाव होतो. म्हणून योगी इतर व्यवहार सोडून यत्नानें निर्विकल्प समाधीचाच अभ्यास करितात.



# निर्वाण प्रकरण–उत्तरार्ध.

## (४० ) विद्याधराची गोष्ट.

स्वभावं स्वं विजित्यादाविंद्रियाणां सचेतसाम्॥
प्रवर्तते विवेके यः सर्व तस्याशु सिध्यति ॥ नि. उ. ५-१.

भावार्थः—आपापल्या विषयाकडे धावणें, या इंद्रियांच्या स्वभावाला मनासह अगोदर जिंकून नंतर जो नित्यानित्यवस्तुविवेकादि साधनांमध्यें प्रवृत्त होतो, त्यालाच शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाचें सर्व फळ मिळतें, हें तत्त्व ह्या गोष्टींत दाखविलें आहे.

पूर्वी एक अज्ञानी विद्याधर होता. त्याचीं इंद्रियें त्याच्या आधीन नसल्यामुळें त्याला फार खेद होत असे. त्यानें त्याकरितां अनेक तऱ्हेनें तप करून व यमनियम धारण करून आपलें शरीर शुष्क करून घेतलें. तो विचारी असल्यामुळें आयुष्याची वृद्धि करणाऱ्या सदाचारानें संपन्न होता. त्यामुळें त्याचें आयुष्य क्षीण झालें नाहीं. असा तो पूर्वी चार कल्प जिवंत राहिला. त्यानंतर चवथ्या कल्पाच्या शेवटीं त्याच्या मनांत विवेकाचा उदय झाला. तो आपल्या मनांत म्हणालाः–– " मला पुनः पुनः जन्म व मरण न येवो, मला जरा न येवो. या गोष्टींचा वारंवार विचार करण्याचा मला अगदीं कंटाळा आला आहे. ही चिंता आता पुरे झाली. या सर्व प्रपंचांत एक स्थिर वस्तु कोणती आहे ? ती मला शोधून काढली पाहिजे." असा विचार करून ती स्थिर वस्तु कोणती, हें विचारण्यासाठीं तो विद्याधर एकदा भुशुंडाकडे आला व साष्टांग नमस्कार घालून म्हणालाः—

विद्याधरः––महाराज ! आपापल्या विषयांवर झडप घालणारीं हीं दहा इंद्रियें यांनीं मी अत्यंत त्रस्त झालों आहे. त्या सर्व इंद्रियांना व

त्यांच्या आश्रयभूत मनाला जिंकल्याशिवाय मी सुखी होणार नाहीं. मला विद्याधरांच्या भोगरूप विषयांचें काय प्रयोजन आहे? म्हणून मी त्या सर्वाविषयीं विरक्त होऊन आत्मज्ञानाच्या इच्छेनें आपणांस अनन्यभावानें शरण आलों आहे.

भुशुंडः--हे विद्याधरा! फार उत्तम आहे. तूं आपल्याच कल्याणासाठीं असा विवेकी झालास, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. आतां मी तुला जें सांगत आहे त्याचा तूं 'होय, ठीक आहे' अशा बुद्धीनेंच स्वीकार कर. कारण आम्ही या गोष्टीचा दीर्घकाल शोध केला आहे, त्याविषयीं तूं कांहीं विचार करूं नकोस. निःशंकपणें त्याचा स्वीकार कर. तुझ्या हृदयांत दृश्यरूपानें अहंकारादि जें कांहीं भासत आहे, तें तूं नाहींस. कारण या बुद्ध्यादि दृश्यवर्गांतीलच कोणी आत्मा आहे व मला त्याची प्राप्ति करून घ्यावयाची आहे, असें समजून तूं दीर्घकाल जरी त्याचा शोध करीत राहिलास तरी तुला त्याची प्राप्ति होणार नाहीं. यास्तव तूं दृश्याचा त्याग करून त्याचा साक्षी जो आत्मा त्याला जाण.

## जगाचें वृक्षरूपानें वर्णन.

हें दृश्य जग जणुं एक मोठा वृक्ष आहे अशी कल्पना केलीस तर त्याचें बीज 'अहंपणा' आहे. स्वर्गादि पुण्यवानांचे लोक हे ह्या वृक्षाच्या मोठमोठ्या शाखा आहेत, सात समुद्र हीच त्या वृक्षाची आळीं आहेत. पाताळ हेंच मूळ कोटर म्हणजे अगदीं बुंधांतील ढोल आहे. अज्ञान हीच त्याची उत्पत्ति भूमि आहे. जीव हेंच त्यावरील पक्षीसमूह आहेत. अव्याकृत आकाश हें त्याचें विपुल वन आहे. अशा प्रकारचा हा संसारवृक्ष मूळप्रदेशीं पाताळास, मध्यप्रदेशीं दिग्भागास व अग्रभागीं अंतरिक्षास व्यापून वस्तुतः नसतांना असल्यासारखा दिसत आहे. अशा प्रकारचा हा जगत्वृक्ष अहंत्व बीजापासून उत्पन्न होतो. पण तें बीज ज्ञानाग्नीनें दग्ध झालें म्हणजे हा वृक्ष पार नाहींसा होतो.

हा अहंकार तत्त्वतः आहे तरी काय? असें रत्नपरीक्षेप्रमाणें त्याचें परीक्षण करूं लागलें असतां हा अहंकार ब्रह्मरूपच आहे, असा निश्चय

होतो. यामुळें अहंकार म्हणून कांहीं वस्तु नाहीं असें कळतें. ज्ञान, ज्ञान म्हणून म्हणतात तें हेंच होय. विद्याधरा ! यावरून तुझ्या ध्यानांत आलें असेलच कीं, मीपणा, तूंपणा व हें जग वगैरे तत्त्वतः कांहीं एक नाहींत तर जगत् हा चित्‌चाच चमत्कार आहे असें तूं जाण. सारांश, तू, मी, हें जगत् सर्व ब्रह्ममात्र आहे हें जाणून शांत हो.

अशा तऱ्हेनें भुशुंडानें विद्याधराला निरनिराळ्या तऱ्हेनें उपदेश केला शेवटीं त्याचें दृश्यजगाचें ज्ञान अगदीं शांत झालें व त्याचें चित्त चिद्रूप ब्रह्मामध्यें तादात्म्य पावलें. नंतर त्याची समाधि लागली. त्यानंतर भुशुंडानें त्याला पुनः पुनः देहभानावर आणण्याचा जरी प्रयत्न केला तरी तो फिरून देहभानावर आला नाहीं. तो विद्याधर उत्तम अधिकारी होता; त्यामुळें भुशुंडाच्या एवढ्याशाच उपदेशानें तो ज्ञानी झाला. त्याला श्रवणाची आवृत्ति, मनन, निदिध्यासन इत्यादि अधिकाधिक साधन परंपरेची आवश्यकता नव्हती.

तात्पर्यः—सारांश, ज्यानें मन अभ्यासानें अत्यंत शुद्ध झालेलें असतें त्यांना थोडासा जरी उपदेश केला तरी तें ब्रह्मप्राप्तीचें साधन जें ज्ञान तें त्यांस प्राप्त होतें.



## ( ४१ ) इंद्राची गोष्ट.

यं प्रत्युदेति सर्गोऽयं स एवैनं हि चेतति ॥
पदार्थाः संनिवेशं स्वमिव स्वप्नं पुमानिव ॥ नि. उ. १३-४.

**भावार्थः**—जसा मनोराज्यांत कल्पिलेला पदार्थ साक्षालाच तेवढा दिसतो, किंवा स्वतःचें स्वप्नच स्वतःलाच दिसतें, त्याप्रमाणें हा प्रपंच ज्याला स्फुरतो त्यालाच त्याचा अनुभव येतो. याविषयीं ही इंद्राची गोष्ट सांगितली आहे.

ह्या ब्रह्मांडाच्या उदरामध्यें त्रिभुवनाचा ईश्वर व देवांचा राजा इंद्र राज्य करीत असतां, त्याला त्याच्या गुरूनें आत्मतत्त्वाचा उपदेश केला.

त्याचा चांगला अभ्यास केल्यामुळें त्याच्या बुद्धीवरील अज्ञानाचें आवरण क्षीण झालें, त्यामुळें, तो महात्मा झाला. त्यानें 'सर्वांची पराकाष्ठा आत्मा आहे' अशी भावना केली व त्यामुळें तो सर्व लौकिक व वैदिक ज्ञानी लोकांत श्रेष्ठ झाला. पुढें एकदां त्या इंद्राचें असुरांशीं युद्ध झालें. शेवटीं त्या शूर दैत्यांनीं त्याला जिंकलें. तेव्हां तो लागलीच पळत सुटला पण शत्रूंनीं त्याचा पाठलाग केला, त्यामुळें त्याला कोठेंहि विश्रांति घेण्यास सांपडेना. पण इतक्यांत शत्रूंना थोडीशी भ्रांति पडून ते तेथल्या तेथें घुटमळत आहेत, असें पाहून, तेंच तेवढें त्यांचें छिद्र सांपडतांच आपल्या ज्ञान सामर्थ्यानें स्थूलशरीरास भूतसूक्ष्मांत शांत करून तो स्वतः अतिशय अणुमात्र बनला आणि भुंगा कमलकोशांत जसा प्रवेश करतो, त्याप्रमाणें तो बाहेर सूर्यकिरणांच्या कोशांत असलेल्या त्रसरेणूंत * शिरला. तेथें त्यानें लागलीच पूर्ण विश्रांति घेतली. फार वेळानें त्याच्या चित्तास स्थिरता प्राप्त झाली. संग्रामाचा त्याला विसर पडला व तो परमसुखास प्राप्त झाला.

## त्रसरेणूच्या उदरांत जगाचा अनुभव.

नंतर त्यानें त्या त्रसरेणूच्या उदरांत एका क्षणांत आपल्या कल्पित गृहाचा अनुभव घेतला. ब्रह्मदेव आपल्या आसनभूत कमलांत जसा रममाण होतो, तसा तो आपल्या संकल्पित गृहांत रममाण झाला. गृहांत स्थित असलेल्या त्या इंद्रानें आपलें तें कल्पित नगर पाहिलें, रत्नें, मोत्यें, प्रवाल इत्यादिकांचे ज्याला तट आहेत, असें त्याचें त्या नगरांत मंदिर होतें. नंतर त्या नगरांत असलेल्या इंद्रानें मोठा देश पाहिला. तो नाना पर्वत, देश, ग्राम, गोकुलें, अरण्यें यांनीं विराजमान झाला होता. त्यानंतर तसा त्या देशाच्या संकल्पानें युक्त झालेला इंद्र भूलोक पाहूं लागला. त्या भूलोकांत सागर, पर्वत, भूमि, नद्या, रानें, देशाच्या सीमा, इत्यादिकांसहवर्तमान काल, क्रिया इत्यादि सर्व भुवनाची कल्पना होती. त्यानंतर त्या संकल्पांत निमग्न झालेल्या इंद्रानें त्रिभुवन पाहिलें. पाताल, भूमि, स्वर्ग, अंतरिक्ष, सूर्य इत्यादिकांसह तें त्रिभुवन अत्यंत शोभत होतें. विषयभोगांच्या भरानें भूषित झालेला तो त्या त्रिभुवनांत पुनः देवेंद्र होऊन राहिला.

* त्रसरेणुः-सूर्याच्या कवडशांत उडणारे रज.कण.

## इंद्राचा वंशविस्तार.

कुंद या नांवाचा त्याला एक मोठा वीर्यवान् पुत्र झाला. त्यानंतर आयुष्याची समाप्ति होतांच देहाचा त्याग करून तो इंद्र तैलरहित दिपाप्रमाणें निर्वाणाला प्राप्त झाला. त्याच्यामागें त्याचा पुत्र कुंद त्रैलोक्याचा राजा झाला. त्यालाहि एक मुलगा झाला. नंतर पुष्कळ दिवसांनीं जीविताचा क्षय झाला असतां कुंदहि परमपदास प्राप्त झाला. त्याचा पुत्रहि पित्याप्रमाणेंच आपल्या पुत्राला राज्यावर बसवून आयुष्याच्या अंतीं पवित्र परमपदाप्रत जाऊन पोहोंचला. याप्रमाणें इंद्राचे हजारो वंशज तेथें होऊन गेले. त्या राज्यावर हल्लींहि अंशक या नांवाचा राजा बसलेला आहे. वर वर्णन केल्याप्रमाणें या क्षणापर्यंत इंद्रानें त्रसरेणूच्या आंत संकल्पानें उत्पन्न केलेल्या जगांत त्याचेच वंशज इंद्रपदाचा उपभोग घेत आहेत. फार काय पण एकादे वेळीं आकाशांत सूर्य जरी गळून नष्ट झाला तरी त्याचें राज्य नष्ट होत नाहीं. त्या इंद्राच्याच कुलांत झालेला कोणी एक इंद्र होता. तो मोठा सद्गुणी व अतिशय श्रीमान् होता. त्याचें तें शरीरहि शेवटचेंच होतें. बृहस्पतीच्या उपदेशवाणीनें तेथें त्या इंद्राला आत्मतत्त्वाचें ज्ञान होऊन त्याचा साक्षात्कार झाला. त्यामुळें त्याला खरें ज्ञेयतत्त्व कळलें. प्रारब्ध प्राप्त जें कर्तव्य प्राप्त होईल तें तो निःशंकपणें करूं लागला. याप्रमाणें तो देवाचा अधीश्वर जगाचें राज्य करूं लागला. त्यानें दानवाशीं युद्ध केलें. सर्व शत्रूंना जिंकलें. त्यानें शंभर अश्वमेध यज्ञ केले. एकदां काहीं कार्यवशात् तो बराच वेळ कमलातील सूक्ष्म तंतूंत राहिला. तेथें त्यानें दुसरीहि शेकडों राज्य, युद्ध, जय, पराजय इ. गोष्टी अनुभविल्या.

## इंद्राला विराट्स्वरूपाचें दर्शन.

आत्मसाक्षात्काररूप प्रबोधानें प्राप्त झालेल्या बलानें शोभणाऱ्या त्याला एकदा "उत्तम ध्यान लावून मायाशबल ब्रह्मास पहावें," अशी इच्छा झाली. त्यानंतर एकांतांत उत्तम प्रकारें स्थित असलेल्या त्यानें तें शबल ब्रह्म ध्यानानें पाहिलें. त्यावेळीं त्यानें बाह्य व आंतर अशा दोन्ही प्रकारच्या विक्षेप कारणाचा त्याग केला होता. त्यामुळें त्याची बुद्धि अतिशय शांत झाली. तेव्हां त्यानें सर्व शक्तिसंपन्न व व्यापक असें ब्रह्माचें विराट् स्वरूप

पाहिलें. तें सर्व इंद्रियादि शक्तींनीं युक्त आहे. त्याला सर्व बाजूला हात पाय वगैरे आहेत, सर्वतः डोळे, मस्तकें, व मुखें आहेत, तें श्रोत्रेंद्रिययुक्त आहे, या लोकीं तें सर्वाला व्यापून राहिलें आहे. तें सर्व इंद्रिय गुणांनीं रहित आहे. पण सर्व इंद्रियांच्या गुणग्रहणशक्तींनीं युक्त आहे. तें परमार्थतः असक्त व व्यवहारदृष्टया सर्वभृत आहे. तें भूतांच्या बाहेरहि आहे व आंतहि आहे. तें अचर व चर आहे. सूक्ष्म असल्यामुळें तें अविज्ञेय आहे. तें दूर आहे व विद्वत् दृष्टया अगदीं समीपहि आहे. तें सर्वत्र चंद्रसूर्यमय, सर्वत्र धरामय, सर्वत्र पर्वतमय, समुद्रमय, सर्वत्र आकाशमय, सर्वत्र संसृतिमय, सर्वत्र जगन्मय, सर्वत्र मोक्षमय, सर्वत्र आद्यचिन्मय, सर्वत्र सर्वार्थमय, सर्वतः सर्ववर्जित असें ब्रह्म त्यानें पाहिलें.

सारांश, त्या इन्द्रानें परमाणूच्या उदरांत ध्यानानें सर्व कांहीं पाहिलें. त्या महाबुद्धिमान् इंद्रानें आपण पहात असलेलें हें जगत्हि त्यानें त्यांत पाहिलें. त्यानंतर पाताल, भूलोक इत्यादि लोकांमध्यें मनानें संचार करणारा तो इंद्र प्रत्यक्ष स्वर्गांत आल्यावर तेथील इंद्राला पाहतांच 'मी इंद्र आहें' ही त्याची भावना उद्बुद्ध झाली व पूर्वी केलेल्या शंभर अश्वमेधांचें फल मिळणें अवश्य असल्यामुळें तो स्वतः इन्द्रत्वास प्राप्त झाला. शेंकडों वृतान्तांनीं अत्यंत सुशोभित झालेलें जगाचें राज्य त्यानें केलें. त्या त्रसरेणूंतील इन्द्राच्या कुलांत उत्पन्न झालेला तो इन्द्र आज या ब्रह्मांडांतहि देवेंद्र होऊन राहिला आहे. असें जाणल्यानंतर 'हा इन्द्र मी आहें' अशी भावना केल्यावर बीजाप्रमाणें हृदयांत संस्कार रूपानें असलेल्या प्राचीन मुख्य ज्ञानयोगाभ्यासाच्या योगानें त्याला आपण विसतंतूंत राहिलों होतों व तेथें ध्यानाच्या योगानें हें सर्व पहात आहों इत्यादि सर्व वृतान्त त्याला आठवला. त्याला आपल्या सर्व पूर्व वृतान्ताचा अनुभव आला.

तात्पर्यः—सारांश, असेच आणखी सहस्त्रावधि इन्द्र आकाशांत त्रसरेणूंच्या उदरांत इकडे तिकडे पसरलेले आहेत. त्यांचेहि व्यवहार वरील इन्द्राच्या व्यवहाराप्रमाणेंच होत,असतात. आजवर असंख्य इन्द्र होऊन गेले, हल्लीं आहेत व पुढेंहि होतील.

## (४२) मंकी ब्राह्मणाची गोष्ट.

मंकिर्नामाभवत्पूर्वं ब्राह्मणः संशितव्रतः ॥
स कथं शृणु निर्वाणमाप्तवान्मद्विबोधतः ॥ नि. पू. २३-२०

**भावार्थः**—पूर्वी मंकी नांवाचा एक ब्राह्मण होता. त्यानें आपल्या स्वकर्माचें यथाविधि आचरण केल्यामुळें व उग्रव्रतांचेंहि आचरण केल्यामुळें त्याचें चित्त शुद्ध झालें होतें. म्हणून त्याला वसिष्ठाच्या उपदेशानें मोक्ष कसा प्राप्त झाला तें या गोष्टींत सांगितलें आहे.

वसिष्ठ एकदां आकाशांतून भूलोकीं आल्यावर अयोध्येकडे जाण्याच्या हेतूनें एका मोठ्या अरण्यांतून जात असतांना समोरून येणारा कोणीएक पांतस्थ त्यांच्या दृष्टीस पडला व तो आपल्याशींच कांहीं बोलत असतांना त्याचें पुढील बोलणें वसिष्ठांच्या कानावर आलें.

पांथः—या सूर्याच्या तापानें मी अगदीं संतप्त झालों आहे. यास्तव मी आता या समोर दिसणाऱ्या गावांत जातो. तेथें थोडा वेळ विश्रांति घेऊन त्वरेनें पुढील मार्ग आक्रमीन.

असा विचार करून तो समोर दिसणाऱ्या किराताच्या गावांत जाण्याची जों इच्छा करीत आहे तों वसिष्ठांनीं त्याला हटकलें व ते त्याला म्हणालेः—

वसिष्ठः—हे मित्रा! तुझें स्वागत असो. हे सुकुमारा! निष्कांचन लोकांना संचार करण्याला योग्य व जेथें आतिथ्य करणारे लोक पुष्कळ आहेत असा मार्ग तुला माहीत नाहीं. म्हणूनच तूं असल्या रुक्ष व दुर्गम अरण्यांतून संचार करीत आहेस. परंतु बाबारे! ज्या गांवांत तूं चालला आहेस त्या गांवांत तुला खरी विश्रांति मिळणार नाहीं. मनुष्यलोकांमध्यें कर्मानुष्ठान करून दक्षिणमार्गानें जीव पितृलोकीं जातो व उपासना करून उत्तरमार्गानें देवादिलोकीं जातो. तेथें काहीं काल सुखहि भोगतो. पण कर्म व उपासना या साधनांनीं तो जन्ममरण परंपरेंतून मुक्त होत नाहीं. हे मित्रा! तूं ज्या गांवांत जात आहेस, तेथें पामरजन रहातात. तेव्हां त्यांच्या संगतीनें तुला समाधान तर वाटणार नाहींच पण उलट क्षोभ मात्र होईल. मित्रा! अंधकारानें भरलेल्या गुहेंत सर्प होऊन पडणेंहि बरें, एखाद्या

मोठ्या शिळेच्या सांधींत किडा होऊन रहाणें बरें, निर्जन प्रदेशांत पंगु मृग होणेंहि बरें; पण ग्राम्यजनांचा समागम बरा नाहीं.

असें वसिष्ठांचें बोलणें ऐकल्यावर तो मंकी ब्राह्मण अमृतजलानें स्नान केल्याप्रमाणें अत्यंत शांत होऊन म्हणाला.

मंकीः—' हे भगवन् ! तूं कोण आहेस ? तुझ्या चर्येवरून तूं आपल्या अंतःकरणामध्यें अतिशय संतुष्ट आहेस असें दिसतें. तूं कोणी आत्मज्ञ महात्मा तर नाहींस ? हे मुने ! मी शांडिल्यकुलांत उत्पन्न झालेला मंकी या नांवाचा एक ब्राह्मण आहे. मी तीर्थयात्रा करून आतां फार दिवसांनीं आपल्या घरीं चाललों आहें. परंतु आतां आपल्या दर्शनानें माझें मन संसाराविषयीं विरक्त झाल्यामुळें घरीं जाण्याची मला उत्सुकता वाटत नाहीं. यास्तव हे भगवन् ! कृपा करून आपण कोण आहां तें मला सांगा. **केवळ दर्शनानेंच मित्रत्व करणाऱ्या आपल्यासारख्या महात्म्यांवर सर्व प्राणी विश्वास ठेवतात.** म्हणून आपण कृपा करून मला तत्त्वोपदेश करा म्हणजे माझें संसारदुःख नाहींसें होईल.

वसिष्ठः—हे महाभागा ! मी वसिष्ठ मुनि आहे. माझें निवासस्थान अंतरिक्षांत आहे. सूर्यवंशांतील 'अज' या नांवाच्या राजर्षीच्या कांहीं कार्यासाठीं मी या मार्गानें अयोध्येस चाललों आहे. हे सज्जना ! तूं आतां खिन्न होऊं नकोस. कारण तूं आतां विद्वानांच्या मार्गांत प्रविष्ट झाला आहेस, त्यामुळें तूं बहुतेक संसारसागराच्या परतीरास पोहोंचलाच आहेस असें म्हणण्यास हरकत नाहीं. हे साधो ! तूं जन्ममरणादि सर्व दुःखापासून मुक्त होण्याची इच्छा करीत आहेस, असें तुझ्या भाषणावरून स्पष्ट दिसतें. म्हणून तूं ज्ञानाचा उत्तम अधिकारी आहेस याविषयीं मला मुळींच शंका नाहीं. म्हणून मी तुला ज्ञान सांगतों.

असें सांगून वसिष्ठांनीं त्याला आत्मज्ञानाचा उपदेश केला. तो ऐकून मंकीनें आपला मायामोह निःशेष टाकला आणि कात टाकल्यावर सर्प जसा सुखी होतो, तसा तोहि सुखी झाला. त्यानंतर प्रारब्धप्राप्त कर्तव्य कर्माचें आचरण वासनाशून्य मनानें करीत तो शंभर वर्षें पर्वतावर शांत चित्तानें राहिला व प्रारब्ध संपल्यावर ब्रह्मपदीं विलीन झाला.

## (४३) पाषाणाची गोष्ट.

चिदेव सर्वं सर्वत्र सर्वं चिदिति निश्चितेः ॥
दृढीकाराय पाषाणाख्यायिकात्रोपवर्ण्यते ॥ नि. उ. ५६.

**भावार्थः**—चित्च सर्व आहे, ती सर्वत्र आहे आणि सर्व चिद्रूप आहे; हा निश्चय दृढ करण्यासाठीं ही पाषाणाची गोष्ट सांगितली आहे. (या गोष्टीसंबंधानें वसिष्ठ असें सांगतात कीं ही गोष्ट शृंगारादि रसांनीं युक्त आहे व यांतील सर्व हकीगत मी स्वतः पाहिलेली आहे.)

एकदां वसिष्ठांनीं या भ्रामक लोक व्यवहाराला सोडून एकांतामध्यें पूर्ण विश्रांति घ्यावी असें आपल्या मनाशीं ठरविलें. सिद्ध, इंद्र, देव, दैत्य इत्यादिकांना दुर्गम असलेल्या एखाद्या उत्तम प्रदेशामध्यें जाऊन वसावें व सर्व भूतांना अदृश्य होऊन निर्विकल्प समाधि लावून आत्मस्वरूपी स्थिर व्हावें; ह्या हेतूनें त्यांनीं पर्वताच्या उंच शिखरावरील सपाट प्रदेश, पर्वताच्या गुहा, समुद्राचें तीर, पातालादि भूछिद्रें इत्यादि अनेक प्रदेशांचें निरीक्षण केलें. पण त्या ठिकाणीं कोणता ना कोणता तरी उपसर्ग आहेच, असें पाहून आकाशांतच फार दूर जाऊन एका शून्यस्थानीं वसिष्ठांनीं आपल्या सत्यसंकल्पानें एक पर्णकुटि तयार केली. तिचा वरचा भाग उघडा होता; पण तिच्या भोंवतालीं मात्र एक कुड घातलेलें होतें व त्याला एक दार ठेवलें होतें. आपल्या सत्यसंकल्पानें तेथें कोणत्याहि प्राण्यानें येऊं नये अशी कल्पना करून सर्व भूतांना अगम्य असलेल्या त्या पर्णकुटीमध्यें वसिष्ठ पद्मासन घालून बसले. आपल्या मनाला त्यांनीं अतिशय शांत केलें आणि शंभर वर्षांनीं या समाधींतून आपलें व्युत्थान व्हावें असा संकल्प करून निद्रित झाल्याप्रमाणें त्यांनीं निर्विकल्प समाधीमध्यें प्रवेश केला. त्यानंतर शंभर वर्षांच्या शेवटीं समाधींतून जागे झाल्यावर त्यांना एक आवाज ऐकूं आला. पण त्यांतील अक्षरें किंवा शब्द स्पष्ट ऐकूं आले नाहींत. पण तो आवाज स्त्रीच्या कंठांतून निघाल्याप्रमाणें मोठा मधुर, मृदु व रमणीय होता. पण तो फार दुरून येत असल्यामुळें त्यांना स्पष्ट ऐकूं आला नाहीं. भ्रमराच्या गुंजारवाप्रमाणें किंवा वीणेच्या मधुर ध्वनीप्रमाणें तो अतिशय चित्ताकर्षक

होता. तो ध्वनि ऐकून, तो कोणाचा आहे, हें जाणण्याची त्यांना इच्छा झाली. मोठ्या विस्मयानें ते दशहि दिशांकडे पाहूं लागले. पुनः पुनः निरीक्षण करूनहि जेव्हां त्या आवाजाचें उगमस्थान दिसेना, तेव्हां त्यांनीं आपल्या मनांत असा विचार केला, ' मी प्रथम या शरीररूपी उपाधीचा त्याग करून चिदाकाशरूप होतों. त्यावर आरोपित असलेलें जें अव्याकृत आकाश, त्याच्याशीं एकत्वास प्राप्त होतों व त्या अव्याकृत आकाशाचें कार्य जें भूताकाश त्यांत असलेला त्याचा गुण म्हणजे शब्द व त्याचा अर्थ यांचा मी अनुभव घेतों ' असा विचार करून वसिष्ठांनीं पुनः समाधि लावली व चिदाकाशांत स्थित झाले. त्या ठिकाणीं त्यांना ह्या ब्रह्मांडासारखीं असंख्य ब्रह्मांडें दिसूं लागलीं. त्यानंतर पूर्वी ऐकलेला ध्वनि पुनः ऐकूं येऊं लागला. थोड्या वेळानें त्यांना त्या ध्वनीचा प्रत्येक शब्द अगदीं स्पष्ट ऐकूं येऊं लागला. शेवटीं तोच शब्द आर्यावृत्तांत कोणीतरी म्हणत आहे असें त्यांच्या प्रत्ययाला आले. जेथून तो शब्द येत होता तिकडे त्यांची दृष्टि वळली, तों तिकडे त्यांना एक सुंदर स्त्री दिसली. ती गोरीपान होती. तिचे सर्व अवयव मोठे रेखीव व सुंदर होते. तिचें मुख पूर्ण चंद्राप्रमाणें आल्हादकारक होतें. तिचें नवयौवन जणु काय तिला सोडून जाऊं लागलें होतें. अशी ती मृदु हास्य करणारी बाला वसिष्ठांच्या जवळ आली व मधुरस्वरानें त्यांना उद्देशून ही पुढील आर्या म्हणाली:—

**असदुचितरिक्तचेतन संसृतिसरिति प्रमुह्यमानानाम् ॥**
**अवलंबनतटविटपिनमभिनौमि भवंतमेव मुने ॥** नि. उ. ६०-९.

' हे मुने ! दुष्टांच्या ठिकाणीं स्वभावतःच असणाऱ्या राग, द्वेष, काम, क्रोध इत्यादि दोष ज्यांच्या ठिकाणीं मुळींच नाहींत व जे आपण संसाररूपी नदीमध्यें अतिशय मोहित झालेल्या जीवांना तीरावरील आधारभूत वृक्षासारखे आहांत, अशा तुम्हाला मी वंदन करतें. '

ही आर्या ऐकून वसिष्ठांनीं तिच्या त्या सुंदर मुखकमलाकडे पाहिलें व तिच्या कंठांतून निघालेला स्वर अत्यंत मधुर व मनोहर आहे, असें त्यांना वाटलें. पण " ही स्त्री आहे, हिच्याशीं आपल्याला काय करावयाचें

आहे." असें म्हणून व तिचा अनादर करून वसिष्ठ पुढें निघून गेले व चिदाकाशांतील अनंत ब्रह्मांडांची मोठी अपूर्व शोभा पाहूं लागले. त्यांना असें वाटलें कीं, आतां ही स्त्री कोठें तरी निघून गेली. परंतु ती स्त्री त्यांच्या मागोमाग येऊन पूर्वीप्रमाणेंच वरील आर्या म्हणत आपल्या अगदीं जवळच आकाशांत एखाद्या देवीप्रमाणें राहिलेली आहे, असें वसिष्ठांना दिसलें. समाधीकालीं वसिष्ठ चिदाकाशरूप झालेले होते व ती स्त्रीहि चिदाकाशरूपिणी होती. इतकेंच नव्हे तर जीं ब्रह्मांडें वसिष्ठ पहात होते तींहि चिदाकाशरूपच होतीं.

ती स्त्री जर आकाशस्वरूपिणी होती, तर जिव्हा, तालु, ओंठ, दांत, प्राणवायु इत्यादिकांच्या अभावीं तिनें आर्या कशी म्हटली ? त्याचप्रमाणें वसिष्ठहि जर चिदाकाशरूप झालेले होते, तर त्या स्त्रीचें रूप दिसणें, तिच्याविषयीं विचार करणें व तिच्याशीं संभाषण करणें वगैरे कसें संभवतें ? या प्रश्नांचें थोडक्यांत उत्तर असें आहे कीं, ज्याप्रमाणें मनुष्य स्वप्नामध्यें सर्व व्यवहार करतो, त्याप्रमाणें त्या चिदाकाशांत रूपदर्शन, आलोचन, संभाषण, शब्दोच्चार इत्यादि सर्व संभवतें. वसिष्ठांनीं त्या सुंदर स्त्रीला विचारलें:—

वसिष्ठः—'हे आर्ये ! तूं कोण ? कोणाची कन्या किंवा पत्नी आहेस ? येथें मजपाशीं कशासाठीं आली आहेस ? तुझी काय इच्छा आहे ? तूं कोठें गेली होतीस ? व तुझें निवासस्थान तरी कोठें आहे ?

विद्याधरीः—हे मुने ! मी आपला सर्व वृत्तांत खरा सांगतें तो आपण ऐका. ह्या तुमच्या ब्रह्मांडामध्यें पृथ्वीवर सात द्वीपें व सात समुद्र यांच्या पलीकडे भूमीच्या सीमेवर लोकालोक या नांवाचा मोठा पर्वत आहे. त्या पर्वताच्या एका सर्वांत उंच शिखरावर पूर्व दिशेच्या बाजूस असणाऱ्या एका मोठ्या शिलेच्या उदरांत मी रहातें. त्या शिलेचा वरचा भाग वज्रासारखा कठीण असल्यामुळें तो कधींहि भंग पावत नाहीं. त्या शिलेमध्यें मी एकटीच रहातें, असें नसून माझा भर्ताहि माझ्याप्रमाणेंच तेथें बद्ध होऊन राहिला आहे. तेथें आमचीं पुष्कळ वर्षे निघून गेलीं. त्या पाषाणामध्यें आमच्यासारखे आणखी कित्येक बद्ध होऊन

राहिले आहेत. माझा पति पुराण पुरुष द्विज आहे. तो तेथें शेकडों युगें जिवंत असूनहि आपल्या स्थानापासून हालत नाहीं. तो बालपणापासून ब्रह्मचारी असून स्वतः वेदशास्त्राचें अध्ययन करणारा व इतरांना वेद शास्त्र पढविणारा आहे. मी त्याची व्यसनिनी भार्या आहे. हे ब्रह्मन्, पूर्वी हा ब्राह्मण वार्धक्यावस्थेंत असतांना आपल्याला अनुरूप अशी भार्या कशी मिळेल? असा पुष्कळ विचार करून स्वतः निर्दोष व सुस्वरूप अशा मला त्यानें आपल्या मनानें उत्पन्न केलें. मी पुढें लहानाची मोठी झालें. सहज वस्त्रानें आच्छादित असलेली मी इतर प्राण्यांच्या चित्ताचें हरण करूं लागलें. पूर्ण चंद्रबिंबाप्रमाणें माझें मुख असून हरिणीप्रमाणें माझे नेत्र विशाल आहेत. मला गायन व वादन फार आवडतें. मी इतकी विपयासक्त आहे, कीं मी कधींच तृप्त होत नाहीं. मी त्या ब्राह्मणाचेंच नुसतें गृह धारण करितें, असें नसून हें सर्व त्रैलोक्यगृह मी धारण करितें. पुढें उन्नत स्तन धारण करणारी मी तरुणी झाले व त्यामुळें फारच सुंदर दिसूं लागलें. पण माझा तो पति दीर्घसूत्री व मोठा विद्वान् असल्यामुळें तपश्चर्या करण्यांत गढून गेला आहे. मोक्षाच्या अपेक्षेनें अद्यापिहि माझ्याशीं विवाह करीत नाहीं. त्यामुळें मी मोठ्या दुःखानें आतल्या आंत संतप्त होत आहे. अशा तऱ्हेनें पुष्कळ काल निघून गेल्यावर तो माझा अनुराग विरक्ततेस प्राप्त झाला. वृद्ध, एकांतप्रिय, नीरस, स्नेहरहित व मौनी भर्ता असल्यामुळें मी आपल्या जीविताचें साफल्य कशानें करावें? बालपणापासून वैधव्य आलेलें बरें. मरणहि पत्करेल. व्याधि किंवा आपत्तीहि सहन करवतील; पण प्रेमरहित पति सहन करवत नाहीं. स्त्रीला तरुण, रसिक व विलासी पति असणें हेंच जन्मसाफल्य व अखंडित सौभाग्य होय. जिचा पति नीरस आहे अशा स्त्रीचें जिणें व्यर्थ आहे. हे मुनिश्रेष्ठा! माझ्या ऐन तारुण्यांत मी असलीं दुःखें असंख्य वर्षे भोगलीं. माझ्या दुर्भाग्याचा विलास कसा आहे तो पहा! थंडीनें करपलेल्या नलिनीची टवटवी जशी नाहींशी होते, त्याप्रमाणें माझा तो अनुराग वैराग्यास प्राप्त झाला. त्यामुळें सर्व प्रेमाचा अस्त होऊन माझ्या वैराग्य-वासना दृढ झाल्या. यास्तव मी आतां आपल्या उपदेशानें माझ्या

चित्ताची शांति करून घेण्याची इच्छा करीत आहे. माझा भर्ताहि परम तत्त्वामध्यें विश्रांति न पावल्यामुळें आपल्या स्वतःच्या मनानेंच मनाला जिंकण्यासाठीं अगदीं दक्ष होऊन राहिला आहे. म्हणून आमच्या दोघांचें अज्ञान घालविण्यासाठीं आपण आम्हाला आत्मस्वरूपाचा बोध करून द्या. मी योगाभ्यासानें आकाशगमनादि सिद्धिसामर्थ्य संपादन केलें आहे व त्यामुळें मी आपल्या जगांतील सर्व वस्तु पाहून त्यांतून बाहेर पडून इतरांना अगम्य अशा या आपल्या एकांत स्थळीं येऊन आपल्याशीं संभाषण करण्यास समर्थ झालें आहे. यास्तव आम्हा दोघांना आत्मतत्त्वाचा उपदेश करून या संसारांतून सोडवा, अशी माझी आपल्या चरणीं ही केलेली प्रार्थना सफल करणेंच आपणाला उचित आहे. हे मुने ! या सर्व सिद्धांच्या मध्यें आपल्यासारखा ह्या घन अज्ञानाचें निरसन् करणारा दुसरा कोणीहि दिसला नाहीं. त्यामुळें मी आपणास अनन्य भावानें शरण आलेली आहे. तरी माझी उपेक्षा करणें आपणास योग्य नाहीं

याप्रमाणें विद्याधरीची प्रार्थना ऐकून वसिष्ठ तिच्याबरोबर आकाशांतील पुष्कळ मार्गांचें उल्लंघन करून लोकालोक पर्वतावर असलेल्या त्या शिलेच्या जवळ आले व त्यानीं विद्याधरीला विचारलें कीं ' तुझें तें शिलेंतील जग कोठें आहे ?' विद्याधरीनें सांगितलें कीं, ' माझें जग ह्या शिलेमध्येंच आहे. आपण आतिवाहक देह धारण कराल तरच शिलेंतील जगांत आपणास प्रविष्ट होतां येईल, ' अशा त्या विद्याधरीच्या सांगण्यावरून वसिष्ठांनीं आतिवाहिक देह धारण करून तिच्या सहवर्तमान त्या शिलेच्या उदरांत असलेल्या सर्गांत प्रवेश केला. नंतर ती विद्याधरी त्या जगांतील ब्रह्मलोकांत जाऊन ब्रह्मदेवाच्यापुढें येऊन म्हणाली:--" हे नाथ ! हा माझ्याबरोबर आलेला मुनि दुसऱ्या एका जगांतील ब्रह्मदेवाचा पुत्र आहे. आपण अर्घ्य पाद्यादिकांनीं याची पूजा करावी" असें तिचें बोलणें ऐकल्यावर ब्रह्मदेव समाधींतून जागा झाला व वसिष्ठाना प्रणाम करून म्हणाला:--

ब्रह्मदेवः--हे आत्मज्ञानसंपन्न मुने ! तुझें स्वागत असो. इतका दीर्घ मार्ग चालून या माझ्या अतिशय दूर असलेल्या स्थानास प्राप्त झाला आहेस. त्यामुळें तूं फारच थकला असशील, तरी या आसन वर बैस. "

त्यानें असें म्हटलें असतां " हे भगवन्! मी अभिवादन करतो " असें म्हणून त्यानें आपल्या डोळ्यानें दाखविलेल्या रत्नजडित आसनावर वसिष्ठ बसले व म्हणाले:—

वसिष्ठ:—हे भगवन्! ही विद्याधरी मजकडे आली व आम्हां दोघांना 'तूं आ मज्ञानाचा उपदेश कर' असें म्हणाली; हे काय आहे! तूं सर्व भूतांचा ईश्वर, स्वयंप्रकाश व सर्वज्ञानपारंगत आहेस. पण ही कामामुळें मूर्ख झालेली विद्याधरी काय बोलतें त्याचा आपण उलगडा करून सांगा. तूं हिला पत्नी होण्याकरितां उत्पन्न केलेंस, पण हिला पत्नीपदाला पोहोंचविली नाहींस. हिचा असा विरस कां केलास?

ब्रह्मदेव:—हे मुने! सर्व वृत्तांत ऐक. मी हिला उत्पन्न केलें, हें खरें. पण माझी पत्नी होण्यासाठीं हिला उत्पन्न केलें, असें जें हिला वाटतें, तें हिच्या वासनेमुळेंच वाटतें. म्हणून तें खोटें आहे. मला उत्पत्तिसिद्ध * तत्त्वज्ञान आहे व म्हणूनच प्रजेच्या दृष्टीनें माझें 'स्वयंभू' असें नांव आहे व मी तत्त्वतः ब्रह्मरूपच आहे.

वसिष्ठ:—तर मग अशा तुझ्यापासून ही विद्याधरी कशी उत्पन्न झाली?

ब्रह्मदेव:—पूर्व पूर्व अहंकाराच्या संस्कारापासून उत्पन्न झालेल्या स्मृतिरूप 'अहं' भ्रांतीची व जगत्स्थितीच्या वासनेची ही अधिष्ठात्री देवता आहे. अर्थात् ही माझी गृहिणी नव्हे व हिनें गृहिणी व्हावें म्हणून मी हिला उत्पन्न केलेंहि नाहीं.

वसिष्ठ:—तर मग ही तुला आपला पति कसा समजते?

ब्रह्मदेव:—वसिष्ठा! हीच ज्या अर्थी माझ्या अंतःकरणांतील सर्व

---

* ज्ञानमप्रतिघं यस्य वैराग्यं च जगत्पते।
ऐश्वर्यं चैव धर्मश्च सहसिद्धं चतुष्टयम्॥
अप्रतिबद्ध ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य व धर्म या चार गोष्टी प्रजापतीच्या सहजसिद्ध आहेत.

जगद्वासना आहे, त्या अर्थी 'मी ब्रह्मदेवाची गृहिणी' असें ही स्वतःच समजून विनाकारण अतिशय दुःखी झाली आहे.

वसिष्ठः—हिचा विरस कां केलास ?

ब्रह्मदेवः—आपल्या संकल्पानें कल्पिलेलें द्विपरार्ध आयुष्य संपल्यामुळें मी आपल्या स्वरूपभूत स्थितीला प्राप्त होण्याची इच्छा करीत आहे, त्यामुळें माझ्या वासनेमुळें कल्पिलेल्या जगाचा प्रलयकाल आतां उपस्थित झाला आहे. हे मुनीश्वरा ! या महाप्रलयीं मी आतां हिच्या मूल कारणाचें उच्छेदन करून हिला स्वसत्तेपासून प्रच्युत करण्यास आरंभ केला आहे. त्यामुळें ही अशी विरस झाली आहे. या जगांत आज कलीचा ( म्हणजे शेवटचा कल्प, शेवटचें मन्वंतर, व शेवटचें कलियुग यांचा ) समाप्तिकाल आला आहे. त्यामुळें प्रजा, मनु, इंद्र, देव यांचा आजच अंत होणार. आजच ह्या कल्पाचा अंत, ह्याच महाकल्पात, माझ्या वासनेचा अंत व देहाकाशाचाहि अंत होणार. म्हणजे एकाच वेळीं चारी प्रलयांची प्राप्ति झाली आहे. ह्याप्रमाणें आत्मस्वरूपाला साक्षात् जाणण्याची इच्छा होणें, या कारणानें ही वासना क्षय पावण्यास उद्युक्त झाली आहे. हे वसिष्ठ मुने ! तू आतां आपल्या जगांत जा. तेथें पूर्वी एकांतांत कल्पिलेल्या आपल्या आसनावर समाधीच्या शांतीचा म्हणजे निर्विक्षेप सुखाचा अनुभव घे. आम्ही हिरण्यगर्भाच्या उपाधीसह मूल अज्ञानाचा बाध करून कैवल्यसंज्ञक परमपदाला प्राप्त होतों.

असें बोलून भगवान् ब्रह्मदेव ब्रह्मलोकांतील जनांसह पद्मासन घालून बसला व समाधीमध्यें तत्पर झाला. तेव्हां त्याचेंच अनुकरण करणारी त्याची ती वासनाहि तशीच ध्याननिष्ठ झाली. तो परमेष्ठी ( ब्रह्मदेव ) सर्व संकल्पशून्य होऊन आपल्या सर्व वासनांचा क्षय झाल्यामुळें उत्तरोत्तर सूक्ष्म अवस्थेस प्राप्त होऊं लागला. जसा जसा त्याचा संकल्प क्षीण होऊं लागला, तशी तशी पर्वत, द्विपें व समुद्र यांसह पृथ्वी व तिच्यांतील सर्व पदार्थ उत्पन्न करण्याची शक्ति हळुहळु क्षीण होत चालली. ब्रह्मदेव ध्यान-परायण झाला असतां बारा सूर्य उदय पावले व सर्व जगाला जाळून टाकण्याकरितां प्रलयकालचा अग्नि भडकला. त्या अग्नीमुळें हिमालय पर्वत लाखेप्रमाणें

एका क्षणांत वितळला. प्रलयाग्नीमध्यें सर्व वस्तूंची राखरांगोळी झाली. पण त्यामध्यें सोनें व आकाश या दोन वस्तूच जळाल्या नाहींत. पुढें भयंकर वारे वाहूं लागले व त्यांनीं पुष्करावर्त मेघांना निर्माण केलें. त्या मेघांनीं केलेल्या वृष्टीनें सर्व जगत् जलमय झालें. तो एकार्णव इतका वृद्धि पावला कीं त्यानें शेवटीं सूर्यमंडळालाहि ग्रासून टाकण्यास सुरवात केली. त्या वेळीं आकाश नव्हतें, दिशांत नव्हता, एखादें भूतहि नव्हतें व सृष्टि नव्हती. तर केवल एक जलच जिकडे तिकडे परिपूर्ण स्थितींत पसरलेलें होतें.

याप्रमाणें तपोलोकापर्यंत सर्व लोक एकार्णवाच्या जलानें भरून गेले असतां ब्रह्मलोक तेजःपुंज दिसत होता. वसिष्ठ त्याकडे जों पहात आहेत, तों ब्रह्मदेव तेथील सर्व लोकांसह समाधि लावून बसला होता. त्या वेळीं शुक्र, बृहस्पति इंद्र, कुबेर, यम, चंद्र, वरुण, अग्नि, तसेंच दुसरे देव, गंधर्व, सिद्ध वगैरे ध्यानपरायण झालेले वसिष्ठांच्या दृष्टीस पडले. त्या सर्वांनीं पद्मासन घातलें होतें व ते निर्जीव असल्यासारखे दिसत होते. त्यानंतर बारा आदित्यहि तेथेंच आले व इतर देवांप्रमाणें तेहि पद्मासन घालून बसले व ध्यानपरायण झाले. पुढें ब्रह्मदेवाच्या द्विपरार्ध आयुःप्रमाणाच्या अगदीं शेवटच्या क्षणांत त्याच्या चरमसाक्षात्काररूप–आत्मज्ञानानें प्रदीप्त झालेल्या ब्रह्मचैतन्यानें त्याच्या अविद्येनें कल्पिलेल्या त्याच्या त्या देहासह त्याच्या सर्व प्रपंचाचा बाध झाला. हा स्वसाक्षात्कारानें बाध होणें हाच वैज्ञानिक किंवा आत्यंतिक प्रलय होय. ज्यांतील वात संपली आहे अशा दीपाप्रमाणें ते सर्व ब्रह्मलोकनिवासी अदृश्य झाले. नंतर ते बारा आदित्य ब्रह्मदेवाच्या लोकालाहि जाळूं लागले व शेवटीं त्या लोकाला दग्ध करून ब्रह्मदेवाप्रमाणेंच निर्वाणपदाला प्राप्त झाले. पुढें एकार्णवाच्या जलानें त्या ब्रह्मदेवाच्या नगरांत प्रवेश केला. ब्रह्मलोकापर्यंत सर्व जगत् जलानें भरून गेलें. त्यामुळें पिकलेलें द्राक्ष जसें आंतून सर्व बाजूंनें रसानें भरलेलें असतें तसें तें झालें.

## संहारकर्त्या रुद्राचा अवतार.

इतक्यांत वसिष्ठांनीं आकाशांतून उदय पावलेलें रुद्राचें भयानक रूप



वसिष्ठांनीं आकाशांतून उदय पावलेलें पंचमुखी व दशभुज अशा रुद्राचें भयानक रूप पाहिलें. प्रलयोदकानें भरलेल्या ब्रह्मांडाला आपल्या हातांनीं धरून त्यांतील उदक हा रुद्र पिऊन टाकीत आहे, असेंहि वसिष्ठांना दिसलें. (पृष्ठ २६१.)

पाहिलें. त्याचा वर्ण काळा होता. त्यानें सर्व आकाश भरून सोडलें होतें. त्यामुळें त्या कल्पाच्या आरंभापासून अंतापर्यंत प्रतिदिवशीं रात्रीं झालेला सर्व अंधकार एकत्र सांठवून त्याचाच हा देह बनविला आहे कीं काय ? असा भास झाला. त्याचा रंग जरी काळा होता तरी तो सूर्यासारखा तेजस्वी होता. त्याला पांच तोंडें, दहा हात व तीन नेत्र असून एका हातांत त्रिशूळ होता. तो रुद्र एकार्णवानें भरलेल्या ब्रह्मांडाच्या बाहेरच स्थित होता. त्यामुळें आकाशच हस्तपादादि अवयवांनीं युक्त होऊन उभें राहिलें आहे असें वाटलें. तें रुद्ररूप श्वासवायूच्या परिवर्तनांनीं (भ्रमणांनीं) एकार्णवाच्या जलाला क्षुब्ध करीत होतें, त्यामुळें आपल्या भुजदंडानें क्षीरसागराला क्षुब्ध करणारा तो महाविष्णूच आहे, असें भासलें. हा रुद्र या नावाचा ईश्वर अहंकार या रूपानें उत्पन्न झाला. सर्व भूतांचा आत्मा हाच त्याचा आत्मा असल्यामुळें व तो सर्वव्यापी असल्यामुळें त्याची आकृति फार मोठी होती. प्रत्येक शरिरांत असणारीं जीं पांच ज्ञानेंद्रियें तींच त्या रुद्राचीं मुखें आहेत, असें तत्त्ववेत्ते सांगतात. पांच कर्मेंद्रियें हे त्याचे उजवे हात; आणि वचन, आदान विहरण, उत्सर्ग व आनंद हीं त्या इंद्रियांचीं कर्में हे डावे हात होत. याप्रमाणें तो दशभुज होता. आतां त्याचे प्रत्येक मुखातील तीन नेत्र कोणते तें सांगतात:—(१) सत्त्व, रज, व तम हे तीन गुण (२) चित्त, अहंकार व बुद्धि (३) प्रणवाचे अ-उ-म हे तीन वर्ण (४) ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे तीन वेद, (५) भूत, वर्तमान, भविष्य हे तीन काल. हेंच त्याच्या प्रत्येक मुखांतील तीन तीन नेत्र होत. त्रैलोक्य हाच त्रिशूल त्यानें आपल्या हातांत धरिला होता, त्यामुळें त्याचें स्वरूप जास्तच उग्र दिसत होतें.

अशा या भयानक रुद्रानें मोठ्या प्रयत्नानें आपल्या श्वासवायूनें त्या महासागरास आकर्षण करून घेऊन पिऊन टाकलें. त्यावेळीं आकाशासारखे निर्मळ व निस्पंद असे केवळ चार पदार्थ तेथें दिसत होते. त्यांपैकीं एक हा रुद्र. दुसरा पदार्थ म्हणजे ब्रह्मांडांतील सर्व पदार्थ जळून गेल्यामुळें त्याची झालेली रक्षा प्रलयोदकानें भिजल्यामुळें ब्रह्मांडाच्या तळाशीं तिचा झालेला चिखल होय. ब्रह्मांडाचा ऊर्ध्व भाग हाच तेथील

तिसरा पदार्थ होय. ब्रह्मांडाचें अधःखंड व ऊर्ध्वखंड यांमध्यें फारच अंतर होतें. त्यांमधील जो अंतराल प्रदेश तेंच आदि अंत शून्य आकाश असून तोच चवथा पदार्थ होता. या चार पदार्थांहून वसिष्ठांना तेथें दुसरें कांहीं दिसलें नाहीं.

## रुद्ररूप विलीन झालें.

त्यानंतर वसिष्ठांनीं त्या महाकाशांत त्या रुद्राला नाचतांना पाहिलें. पुढें त्याच्या शरीरापासून एक छाया उत्पन्न झाली. ती रुद्राच्या नर्त-नाचें अनुकरण करीत होती. ही छायाच त्या रुद्राची ( शिवाची ) शक्ति होय. हीं दोघें म्हणजे शिव व शक्ति नृत्य करूं लागलीं. तें त्यांचें नृत्य मोठें अद्भुत होतें, शेवटीं ती शक्ति त्या शिवाला स्पर्श करून त्याच्या अंगामध्येंच विलीन झाली. पुढें त्या रुद्रानें त्या दोन ब्रह्मांडखंडांना पाहिलें आणि आपल्या श्वासानें एका क्षणांत त्यांचें आपल्यापाशीं आकर्षण करून घेऊन पातालासारख्या आपल्या मुखांत त्यांना टाकून गट्ट केलें. त्यानंतर एका क्षणांत तो रुद्रहि अभ्रासारखा लहान झाला. पुढें एखाद्या लांब काठीप्रमाणें दिसूं लागला. त्यानंतर त्याच्या देहाचें प्रमाण टीचभर झालें. पुढें त्याचा आकार काचेच्या एका तुकड्याप्रमाणें झाला, असें वसिष्ठांना दिसलें. पुढें तोच आकाशाहूनहि अति सूक्ष्म झाला आहे, असें दिव्य दृष्टीनें वसिष्ठांनीं पाहिलें. शेवटीं तो परमाणुएवढा होऊन अंतर्धान पावला. त्यानंतर शांत, निर्मल, आदि मध्य अंत रहित असें चिदाकाशच शिल्लक राहिलें.

## सृष्टिप्रलयाची व्यवस्था

सृष्टीच्या वेळीं परमेश्वरानें ' बहुस्यां प्रजायेय ' असा संकल्प करून महादेवाला उत्पन्न करून सृष्ट्युन्मुख केलें, तेव्हां त्यानें सृष्टि रचली आणि आतां सर्व जगाचा संहार होऊन ' मी एकरूप व्हावें ' असा संकल्प करून रुद्राला निर्माण केलें व त्यानें सृष्टिक्रमाच्या उलट क्रमानें सर्व जगाला गिळंकृत करून तो आकाशभावानें स्थित झाला व परमशांतीला प्राप्त झाला. असा ब्रह्मदेवाची प्रत्येक ब्रह्मांडांतील ही सृष्टिप्रलयाची नित्य स्थिति असते.

## वसिष्ठांनीं शिलेमध्यें पाहिलेले चमत्कार.

याप्रमाणें वसिष्ठांनीं त्या शिलाखंडाच्या उदरांत आरशांतील प्रतिबिंबा-प्रमाणें महाप्रलयरूप फार मोठा भ्रम पाहिला आणि ती विद्याधरी, ती शिला व त्यांतील तो विभ्रम या सर्वांना आठवून वसिष्ठ अतीशय विस्मित झाले व त्यांनीं त्या सुवर्णशिलेच्या इतर प्रदेशींहि अवलोकन केलें; तों तिच्या सर्व प्रदेशीं असंख्य ब्रह्मांडें आहेत, असें दिसलें. हें सर्व वसिष्ठांनीं जें पाहिलें तें दिव्य दृष्टीनें पाहिलें, कारण मांसल दृष्टीनें ती एक शिलाच आहे असें दिसत होतें. त्यांत ब्रह्मांडें मुळींच नव्हतीं. पुढें वसिष्ठांनीं मोठ्या कौतुकानें त्या पर्वताच्या सर्व शिला पाहिल्या, तसेंच पृथ्वीचे तृण गुल्मादि भाग पाहिले, तों त्यांत सर्वत्र तशींच ब्रह्मांडें स्थित आहेत, असें त्यांना आढळून आलें.

पुढें हे सर्व चमत्कार पाहिल्यानंतर वसिष्ठ आपल्या पूर्वीच्या समाधि-स्थानीं म्हणजे ती आकाशांतील कुटी जेथें होती, त्या ठिकाणीं आले आणि जों पहातात तों त्यांचा देह कोठेंच दिसेना. त्या ठिकाणीं दुसराच कोणी एक सिद्ध समाधि लावून बसलेला दिसला. पुढें आपण आपल्या सूक्ष्म देहानें सप्तर्षि लोकांत जावें असा निश्चय करून 'संकल्पानें निर्माण केलेली ती पर्णकुटी आतां आपल्याला काय करावयाची आहे, ती नाहींशी करून टाकावी,' म्हणून वसिष्ठांनीं तिचा संकल्प नाहींसा करण्याबरोबर ती पर्णकुटी नाहींशी झाली व तेथें केवल आकाशच झालें. तो समाधिस्थ सिद्धहि निराधार झाल्यामुळें खालीं पडला. स्वप्नांतील संकल्प शांत झाला असतां स्वप्न-संकल्पानें कल्पिलेलें नगर जसें शांत होतें, तसा त्या कुटीचा प्रकार झाला. तें पाहून वसिष्ठांना फार वाईट वाटलें व सौजन्यानें त्या सिद्धाची काय अवस्था होते तें पहाण्यासाठीं खालीं पडत असलेल्या त्या सिद्धाबरोबरच मनानें म्हणजे सूक्ष्म देहानेंच वसिष्ठ आकाशांतून भूतलीं आले. वावटळींत पानें जशीं गरगर फिरत असतात, त्याप्रमाणें तो सिद्ध प्रवहादि वातस्कंधांतून भ्रमण करीत खालीं देवांच्या क्रीडेचें स्थान अशा सुवर्णभूमीवर पडला. पण त्याचें आसन ढळलें नाहीं, कारण त्याच्या प्राणापानाची गति ऊर्ध्व होती. त्यामुळें विहिरींत सोडलेला घट, रज्जूमुळें जसा ऊर्ध्वमुखच असतो,

त्याप्रमाण तो ऊर्ध्वमुख स्थितींत भूमीवर पडला. पण देहभानावर आला नाहीं. त्याचा देह योगबलानें वज्रासारखा झाला होता, म्हणून इतक्या दूर उंचावरून खालीं पडला, तरी त्याचें शरीर छिन्न भिन्न झालें नाहीं. वसिष्ठांनीं त्याला आपल्या योगसामर्थ्यानें समाधींतून जागें केलें व ते म्हणाले:—

वसिष्ठः—हे मुनिनायका ! तूं कोण आहेस ? हें काय करीत आहेस ? तूं केवढया दूर अंतरावरून खालीं पडलास, तें तुला कसें कळलें नाहीं ?

सिद्धः—महाराज ! मी संसाराविषयीं पुष्कळ विचार करून अत्यंत विरक्त झालों व चिरकाल विश्रांति घ्यावी या हेतूनें तुमच्या प्रमाणेंच मी त्या आकाशस्थानीं आलों. मी तेथें ती कुटी पाहिली. ती कुटी आपली आहे हें मला आतां कळलें. आपण पुनः तेथें याल अशी मला कल्पनाहि नव्हती, त्यामुळें मला असें वाटलें कीं, हा कोणी एक योगी स्वतःच देहत्याग करून येथें निर्वाणास प्राप्त झाला आहे. म्हणून त्या शवीभूत झालेल्या त्या मुनीला तेथून खालीं फेकून दिलें. अशी सर्व वस्तुस्थिति आपणास निवेदन केली आहे. आतां वाटल्यास या अपराधाबद्दल आपण मला दंड करा किंवा अनुग्रह करा. पण मी आपणास अशी प्रार्थना करितों कीं, या माझ्या अपराधाची क्षमा करा. हे मुने ! **आपल्यासारखे सिद्ध सुद्धां जोंवर चित्त एकाग्र करून पहात नाहींत, तोंवर त्यांना त्रिकालाचें ज्ञान होत नाहीं.**

वसिष्ठः—हे साधो ! हा अविचाररूपी अपराध माझ्या हातूनहि झाला आहे. अंतर्दृष्टीनें मी तुझ्या वृत्तांताचा विचार करून ती कुटी आकाशांत तशीच स्थिर केली असती, तर त्यामुळें तूं इतक्या उंचावरून खालीं पडला नसतास. परस्परांचा अपराध परस्परांनीं सहन करणें उचित आहे. तर आतां, हे साधो ! उठ, आपण आपल्या सिद्ध लोकीं जाऊन राहूं या. कारण आपलीं निर्विक्षेप स्थिति होण्यास आपापलीं स्थानेंच अत्यंत उपयोगी असतात. यास्तव मी आपल्या सप्तर्षि लोकीं जाऊन रहातो व तूं आपल्या नंदनवनांत जाऊन रहा. असा निर्णय करून एक-मेकांना प्रणाम करून ते दोघे आपापल्या लोकाला निघून गेले.

तात्पर्यः—सर्व चिद्रूप ब्रह्मच आहे. सृष्टिकर्ता जो ब्रह्मदेव तोहि

चिद्रूप ब्रह्मच व त्यानें निर्माण केलेली ही सर्व सृष्टि चिद्रूपच आहे. महाप्रलयीं ब्रह्मदेव ज्यावेळीं चिद्रूप ब्रह्मामध्यें विलीन झाला त्यावेळीं हें सर्व ब्रह्मांड त्यांतच विलीन झाले. यावरून ह्या सृष्टींतील दृश्य कांहींहि, कोठेंहि व केव्हाच नाहीं, तर मिठाच्या खड्यांत जसा खारट रस, तसें एक अखंड ब्रह्मच आनंदरूपी एकारसांत स्थित आहे. सारांश, सृष्टीपासून महाप्रलयापर्यंत जगाच्या रूपानें चिद्रूप ब्रह्मच नटलेलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

## (४४) विपश्चित् राजाची गोष्ट.

**अविद्या विद्यते येषामज्ञानां भूतलादिका ॥**
**तेषामस्यां ब्रह्मणीव नास्त्यंतोऽत्र कथां शृणु ॥** नि. उ. १०८-३

**भावार्थः**—ज्या अज्ञ पुरुषाना ही दृश्यरूप अविद्या खरी असल्यासारखी भासते, त्याना ब्रह्मप्रमाणेंच हिचाहि अंत लागत नाही. हें तत्त्व ह्या गोष्टींत सांगितलें आहे.

चिदाकाशाच्या एका कोपऱ्यांत याच जगासारखें एक जग आहे. त्यामध्यें तत् या नांवाची एक पुरी आहे. त्या पुरींत विपश्चित् या नांवाचा राजा राज्य करीत होता. तो मोठा विद्वान् व शूर होता. असा हा विपश्चित् राजा आनंदानें राज्य करीत असता शत्रूंनीं त्याच्या नगरीला वेढा दिला. तेव्हां राजानें आपल्या सर्व सेनापतींना हाक मारून 'युद्धासाठीं सत्वर निघा व युद्धाची सर्व तयारी करा, मी स्नान करून व अग्नीचें पूजन करून रणांगणावर येतों ' असें सांगून अग्नीनारायणाची पूजा करून मनांत विचार करूं लागला कीं ' या युद्धांत आपला जय होईलच असें दिसत नाहीं. यास्तव या अग्नीनारायणालाच मी आपल्या मस्तकाची आहुति देतों.' असें आपल्या मनाशीं ठरवून तो अग्नीनारायणाला म्हणालाः—

राजाः—हे अग्नीनारायणा देवा !. हें माझें मस्तक आतां मी तुझ्या

ठिकाणीं आहुति म्हणून अर्पण करीत आहें. पूर्वी इष्टीच्या वेळीं मी जसा पुरोडाश देत होतों, तसें आतां हें मस्तक देत आहें. भगवन् ! या माझ्या कृत्यानें जर तूं संतुष्ट होत असशील, तर तुझ्या कुंडांतून मला चार देह उत्पन्न होवोत. हे माझे देह बलवान् व तेजस्वी होवोत. या चार देहांनीं मी चार दिशेंतील शत्रूंना निर्विघ्नपणें मारावें. हे प्रभो ! तूं मला दर्शन दे.

असें बोलून त्या राजानें हातांत खड्ग घेऊन, एखादें बालक लीलेनें जसें कमल तोडतें, तसें त्यानें आपलें मस्तक तोडलें. तोडलेलें मस्तक अग्निकुंडांत पडत आहे, तोंच त्याचें शरीरहि कुंडांत पडलें. तेव्हां अग्नीनें त्याच्या देहाला भक्षण करून त्याला चौपट फल दिलें. महात्म्यांनीं ज्याचा स्वीकार केला असतो, तें तत्क्षणीं वृद्धि पावत असतें. त्यानंतर तो विपश्चित् राजा चार रूपें धारण करून अग्नींतून बाहेर निघाला. त्याचे ते चारहि देह सूर्यासारखे तेजस्वी होते. ते उत्तम भूषणांनीं व वस्त्रांनीं विभूषित होते. त्यांनीं आपल्या हातांत आयुधें धारण केलीं होतीं. त्यांच्या शरीरावर कवचें असून मस्तकावर रत्नजडित मुगुट होते. सर्वांचे आकार एकसारखे होते. चंद्रासारख्या शुभ्र हास्यांनीं दिशांना प्रकाशित करणारे ते चार विपश्चित् राजे आहुतींनीं तृप्त केलेल्या अग्नीपासून जणुं काय चार विष्णूच किंवा साक्षात् चार वेदच प्रकट झाले कीं काय असें वाटलें.

इतक्यांत नगराला वेढा दिलेल्या शत्रूबरोबर भयंकर युद्ध सुरू झालें. पुढें आपलें सैन्य पराभूत होत आहे, तों ते चार विपश्चित् राजे आले व त्यांनीं वायव्यास्त्रानें चारी दिशांतील शत्रूंवर तुटून पडून थोडक्याच अवधींत त्यांनीं शत्रुसेनेची दाणादाण उडवून दिली. शत्रूंचा पाठलाग करीत ते विपश्चित् राजे समुद्रापर्यंत येऊन पोहोंचले. अशा तऱ्हेनें शत्रूंचा नायनाट करून ते विपश्चित् राजे समुद्रतटावर वस्ती करून राहिले. रात्र झाल्यावर आपलीं सर्व कृत्यें आटोपून ते आपापल्या शय्येवर बसले व आपल्या मनाशीं विचार करूं लागले, " अहो काय चमत्कार आहे ! आम्हीं यत्नावांचून अग्नीनारायणाच्या प्रभावानें आपल्या दिव्य वाहनांनीं इतके दूर चालून आलों. ही पसरलेली दरपश्री आणखी किती लांबवर पसरलेली असेल ! या जंबुद्वीपाच्या सभोंवार क्षारसमुद्र आहे. त्याच्यापलीकडे प्लक्षद्वीप आहे.

त्यानंतर त्याच्या दुप्पट विस्तीर्ण इक्षुरस (उसाचा रस) समुद्र आहे, त्याच्या पलीकडे कुशद्वीप आहे. त्यापुढें सुरोद (मद्याचा समुद्र) सागर आहे. याप्रमाणें सात द्वीपें व सात समुद्र यांच्या पलीकडे काय असेल? ही दृश्यरूपी माया केवढी मोठी असेल व वस्तुवैचित्र्यानें ती कशा प्रकारची असेल वगैरे, हें सर्व जाणण्यासाठीं आपण अग्निनारायणाची प्रार्थना करूं या. त्याच्या वरामुळें आम्हीं या सर्व दिशा अगदीं सीमेपर्यंत अनायासानें पाहूं." असा विचार करून सर्वांनीं त्या समुद्राच्या तीरावर एकाच वेळीं भगवान् अग्नीचें आवाहन केलें. तेव्हां तो अग्नि त्यांच्यापुढें प्रकट झाला आणि 'बाळांनो! वर मागा' असें म्हणाला.

विपश्चित्:—हे अग्निनारायणा! या पंचभूतात्मक दृश्याचा अंत, जोंवर या देहानें जाणें शक्य आहे, तोंवर या देहानें पहावा व पुढें वैदिक मंत्राच्या प्रभावानें संस्कृत झालेल्या याच देहानें पहावा व त्याचीहि गति कुंठित झाल्यावर मनानेंहि आम्हांला पहातां यावा. प्रत्यक्ष, अनुमान व शब्द (वेद) या प्रमाणांनीं जेवढे पदार्थ पहाण्याजोगे आहेत, ते सर्व आम्हांला प्रत्यक्ष दिसावेत, असा उत्तम वर आम्हांला दे. जेथवर योगी जातात, तेथवर आम्हांला जातां यावें व आम्हांला तेथवर मृत्यु न येवो आणि ज्या उत्तरायण-दक्षिणायनादि मार्गांत मरूनच जातां येणें शक्य आहे, तेथें आम्हांला मनानें जातां यावें.

याप्रमाणें त्यांनीं वर मागितला असतां अग्नि 'तथास्तु' असें म्हणून अंतर्धान पावला. नंतर सकाळीं राज्यपरिपालनाची व्यवस्था करून 'समुद्राच्या पलीकडील दिगंत पाहून आम्हीं लवकरच परत येतों' असें सर्वांना सांगून अग्नीच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या सिद्धिसामर्थ्यानें नौकादि उपायांची अपेक्षा न करितां त्यांनीं पायांनींच समुद्रांत प्रवेश केला. ते चारहि राजे प्रत्येक दिशेस एक एक असे निघाले; व महासागरावर पावलें टाकीत जाऊं लागले.

याप्रमाणें समुद्र व द्वीपें यांतून पायानें संचार करणारे हे विपश्चित् राजे दृश्यरूप अविद्येचा शेवट कोठें होतो याचा शोध करण्यास प्रवृत्त झाले. ते समुद्रांतून द्वीपामध्यें व पुनः द्वीपांतून समुद्रामध्यें याप्रमाणें द्वीप, पर्वत,

वर्नें यांतून मोठ्या वेगानें जाऊं लागले. त्यांना मार्गांत कोठल्याहि प्रकारें पीडा झाली नाहीं. त्यांतील पश्चिम दिशेचा अंत पहावयास गेलेला विपश्चित् राजा 'मी अमर आहें' अशा अभिमानानें युक्त असलेल्या माशाकडून गिळला गेला. तो मासा विष्णुमीन कुलामध्यें उत्पन्न झालेला असून अतीशय वेगवान् होता. त्या माशानें राजाला क्षीरसागरांत आणून तोंडातून बाहेर टाकलें. कारण त्याला आपल्या पोटात जिरविणें अशक्य झालें. तेव्हा त्या राजानें क्षीरसागराचें उल्लंघन करून दूर दिगंतरीं गमन केलें. दक्षिण दिशेकडे गेलेल्या विपश्चित् राजाला इक्षुरसार्णवांतील यक्ष-नगरांत वशीकरण विद्येंत कुशल असणाऱ्या यक्षिणीनें त्याला आपणा-विषयीं कामुक बनविलें. पूर्व दिशेकडे गेलेला राजा गंगेचीं हजारों मुखें पहात असतां त्याला खावयास तयार झालेला एक मगर त्याच्यापाशीं आला. पण राजानें मोठ्या सामर्थ्यानें त्याला पकडून त्याचा उद्धार करण्यासाठीं त्यानें त्याला गंगेंत आणून विदीर्ण केलें, तेव्हां गंगेनें त्याला पुनः कान्यकुब्ज देशांत आणून टाकलें. उत्तर दिशेकडे गेलेला विपश्चित् उत्तर कुरूंतील देवींसह क्रीडा करीत असलेल्या ईश्वराची आराधना करून अणिमादि ऐश्वर्यास प्राप्त झाला, त्यामुळें त्या दिशेमध्यें वाटेल तेथें संचार करणाऱ्या त्या विपश्चिताला मरणाचें भय वाटलें नाहीं. अशा रीतीनें ते चार विपश्चित् राजे दिगंतरांत संचार करीत असता एका हत्तीनें आपल्या गंडस्थळानें एका विपश्चित् राजाचें चूर्ण करून टाकलें. दुसऱ्या विपश्चित् राजाला एका राक्षसानें युद्धांत छिन्नभिन्न करून आकाश मार्गानें नेलें व समुद्रांतील वडवाग्नींत टाकलें व तेथें त्याचें भस्म झालें. तिसऱ्या विपश्चित् राजाला विद्याधरानें देवाच्या लोकीं नेलें, तेथें इंद्रसभेंत गेल्यावर त्यानें कोणालाच नमस्कार केला नाहीं, त्यामुळें रागावलेल्या इंद्रानें शाप देऊन त्याचें भस्म केलें. चवथ्या विपश्चित् राजाला कुशद्वीपांतील व त्याच्या तटावरील नदीच्या दलदलीत प्रदेशांत एका भयंकर मगरानें फाडून त्याचे तुकडे केले, त्यामुळें तो मरण पावला. अशा रीतीनें ते चारी विपश्चित् राजे मरण पावले. मरणानंतर त्यांचे आत्मे त्या आका-शातच पूर्वीप्रमाणें भूमंडल पाहूं लागले. पुढें त्यांना पूर्व संस्कारवशात्

स्थूल देहाची प्राप्ति होऊन अविद्येची इयत्ता पहाण्यासाठीं ते चौघेहि राजे द्वीपांतरांत भ्रमण करूं लागले. सप्तद्वीपांचें उल्लंघन करून सातसमुद्राच्या पलीकड जाऊन प्रश्चिम विपश्चित् राजा सुवर्णभूमींत क्रीडा करीत असलेल्या जनार्दनाजवळ सुदैवानें प्राप्त झाला. त्या जनार्दनापासून ब्रह्मज्ञान प्राप्त करून घेऊन त्याच दशेंत तो पांच वर्षे समाधि लावून बसला. त्यानंतर देहभावाचा त्याग करून चित्त असत्तेला प्राप्त झालें असता तो विपश्चित् परमकैवल्यास प्राप्त झाला. पूर्व दिशेस प्रवृत्त झालेला विपश्चित् राजा 'पौर्णिमेच्या पूर्ण चंद्रापाशीं आपलें शरीर स्थित आहे,' असें दीर्घकाल चिंतन करीत राहिला. त्यामुळें त्याचा देह नष्ट होऊन तो चंद्रलोकीं स्थित झाला. दक्षिण दिशेंतील विपश्चित् सर्व शत्रूंचा उच्छेद करून शाल्मली द्वीपामध्यें अद्यापि राज्य करीत राहिला आहे. उत्तर विपश्चित् चंचल व उग्र तरंगांनीं दुस्तर झालेल्या सातव्या समुद्रांत एका मगरानें गिळल्यामुळें त्याच्या उदरांत एक हजार वर्षें राहिला. तेथें तो त्या मगराच्या उदरांतील मांस खात असे. हजार वर्षांनीं तो श्रेष्ठ मगर मरण पावला असतां तो मगराच्या उदरांतून एखाद्या दुसऱ्या मगराप्रमाणें बाहेर आला. पुढें त्या समुद्राचें उल्लंघन करून तो सुवर्ण भूमीस प्राप्त झाला. ती भूमि दशसहस्र योजनें विस्तीर्ण होती. त्यांतून देवाचा संचार होत होता. त्या भुमींत येतांच तो विपश्चित् राजा मरण पावला व पुढें तो देवयोनीस प्राप्त झाला. याप्रमाणें तो देवश्रेष्ठ होऊन पूर्वीच्या दिगंत पहाण्याच्या वासनेनें लोकालोक पर्वतास प्राप्त झाला. तो लोकालोक पर्वत म्हणजे मेरु पर्वताच्या शिखरापर्यंत उंच वाढलेल्या या भूमंडलाचें जणु काय कुंपणच होतें. या लोकालोक पर्वताचा पन्नास हजार योजनें उंच भाग व त्याच्या जवळचा सर्व प्रदेश सूर्य प्रकाशानें प्रकाशित आहे. त्या लोकालोक पर्वतावर चढून त्याच्या शिखरास प्राप्त झालेल्या या देवविपश्चिताला खालचे लोक हें नवीन नक्षत्रच उदयाला आलें आहे कीं काय असें पाहूं लागले. त्या महागिरीच्या त्या प्रदेशाच्या पलीकडे अंधार पसरलेला आहे व सभोंवार फार मोठा खोल खड्डा आहे. एखाद्या किल्ल्याच्या सभोंवार जसा खंदक असतो, तसाच तो होता. आकाशा-

प्रमाणें तो खड्डा प्राणिशून्य व अनेक योजनें विस्तीर्ण आहे. तेथें या वर्तुलाकार भूगोलाची समाप्ति होते. त्यापुढें आकाशासारखें शून्य व अंधकारानें भरलेलें महाखात ( मोठाखड्डा ) आहे. लोकालोक पर्वताच्या पार असलेलें जें आकाशमंडळ त्याच्या दाही दिशांमध्यें फार दूर अंतरावरून नक्षत्रचक्र भ्रमण करीत आहे. हें नक्षत्र मंडल पातालासह सर्व भूलोकाला, लोकालोक पर्वताला अनुलक्षून प्रदक्षिणा घालतें. लोकालोक पर्वतासह भूलोकाचा जेवढा विस्तार आहे, त्याच्या दुप्पट आकाशाच्या पलीकडे असलेलें नक्षत्रचक्र त्या आकाशाच्या दुप्पट भागांत पसरलें आहे. नक्षत्र चक्राच्या पलीकडे त्याहून दुप्पट दुसरें आकाश आहे. तें कांहीं ठिकाणीं प्रकाशानें युक्त आहे व कांहीं ठिकाणीं गाढ अंधकारानें युक्त आहे. त्या आकाशाच्या शेवटीं दोन्ही बाजूस दोन कपालें ( कवच्या ) असून त्यांतील एक खालच्या बाजूला व दुसरी वरच्या बाजूला आहे. त्या दोन्हींमध्यें हें महाकाश आहे. त्याचें प्रमाण शेकडों कोटि योजनें आहे. दोन्ही कवच्यांच्या पलीकडे दसपट जलावरण आहे, त्याच्या पलीकडे दसपट तेज आहे, त्याच्या पलीकडे दसपट वायु व त्याच्या पलीकडे दसपट आकाश आहे. त्याच्या पलीकडे शांत व अनंत ब्रह्माकाश आहे. तें प्रकाशरूपहि नाहीं व तमोरूपहि नाहीं; तर अव्यय व महाचिद्घन आहे. त्या चिदाकाशांत वर वर्णन केलेल्या स्वरूपाचीं लक्षावधि ब्रह्मांडें दूर दूर पुनः पुनः उत्पन्न होतात व पुनः पुनः लय पावतात.

पुढें तो विपश्चित् राजा लोकालोक पर्वताच्या शिखरावरून वर सांगितलेल्या अंधाराच्या अत्यंत खोल अशा प्रदेशांत शिरला. पुढें त्याचा देह गृध्रादिकांनीं फाडून खाल्ला आहे असें त्यानें पाहिलें. तरीपण दिगंतदर्शनास त्याचा मनोदेहच प्रवृत्त झाला. त्या अंधाराच्या शेवटीं ब्रह्मांडाच्या कपाटासारखा जो भूतलरूप खंड कोटीयोजनें विस्तीर्ण होता, त्याचे व त्याच्या पलीकडील जल, तेज, वायु व आकाश या ब्रह्मांडावरणांचें उल्लंघन करून अनंत शबल ब्रह्माकाशास म्हणजेच चिदाकाशास जाऊन पोंहोंचला, त्या ब्रह्माकाशांत तो मनानें भ्रमण करीत राहिला व दूर दूर गेला. पुढें या ब्रह्मांडासारखीं अनंत ब्रह्मांडें त्याच्या दृष्टीस पडलीं, अद्यापि दीर्घ काल त्या चिदाकाशांत

तो विहार करीत तसाच राहिला आहे. जगत् सत्य आहे, हा निश्चय दृढ झाल्यामुळें तो त्या आपल्या उद्योगापासून निवृत्त होत नाहीं. अविद्येचा अंत नाहीं, म्हणूनच तो विपश्चित् राजा अज्ञानामुळें त्याच किंवा तत्सदृश अन्य ब्रह्मांडोदरांत एखाद्या वनांतील हरणाप्रमाणें आपल्या दृढ वासनेमुळेंच पुनःपुनः भ्रमण करीत राहिला आहे. तो ज्यांत भ्रमण करीत आहे तीं विश्वें वासनामात्र असल्यामुळें अतीशय सूक्ष्म आहेत.

याप्रमाणें चार विपश्चितांपैकीं एक भगवान् विष्णूच्या प्रसादानें ज्ञान होऊन मुक्त झाला. दुसरा अद्यापि वर वर्णन केल्याप्रमाणें अविद्येंतच भ्रमण करीत राहिला आहे. तिसराहि विपश्चित् राजा दुसऱ्याप्रमाणेंच अविद्येंतच भ्रमण करीत राहिला आहे.

## मृग विपश्चित् मनुष्यरूपानें प्रकट झाला.

चवथा विपश्चित् चंद्राच्या जवळ राहिल्यामुळें त्याच्यावर असलेल्या लांछनभूत मृगाशीं त्याचा अतीशय स्नेह जमला. त्या देहाचा त्याग केल्यावर त्या मृगाच्या आसक्तीमुळेंच तो आतां हरीण होऊन राहिला आहे. या मृगासंबंधानें वसिष्ठांनीं असें सांगितलें कीं, त्रिगर्तनायानें जो क्रीडामृग रामाला दिला आहे, तोच हा मृग विपश्चित् आहे. अग्नि हेंच विपश्चित् राजाचें दैवत असल्यामुळें त्यानें अग्नींत प्रवेश केला म्हणजे तो मृगशरीर सोडून पूर्व देहानें युक्त होईल. हें मी प्रत्यक्षच करून दाखवितों, असें सांगून वसिष्ठांनीं आपल्या कमंडलूंतील जलानें यथाशास्त्र आचमन करून राजसभेच्या मध्यभागीं ज्वालायुक्त पण काष्ठरहित अग्नि निर्माण केला व त्याला पाहून तो हरीण त्यांत प्रवेश करण्याच्या इच्छेनें उड्या मारीत मारीत त्या अग्नीजवळ आला. इतक्यांत वसिष्ठ हात जोडून अग्नीला म्हणाले, "हे भगवन् अग्ने! या जीवाच्या प्राचीन भक्तीचें स्मरण करून प्रसन्न हो व या हरिणाला 'विपश्चित् राजा' कर." इतकें वसिष्ठ बोलत आहेत तोंच त्या हरीणानें धावत धावत येऊन अग्नींत उडी मारली व एका क्षणांत सर्व सभा पहात असतांनाच तो मनुष्याच्या आकारास प्राप्त झाला. लागलीच

तो अग्नीचा ज्वालासमूह अदृश्य झाला. देवालयाच्या भिंती पडल्या असतां त्यांतील देवाची मूर्ति जशी एकटीच प्रकट झालेली दिसते किंवा पडद्यांतून नट जसा बाहेर यावा त्याप्रमाणें तो पुरुष मात्र तेथें अवशिष्ट राहिला. त्यानें रुद्राक्षमाला धारण केली होती. तो शांत होता. त्याच्या गळ्यांत सुवर्णाचें यज्ञोपवीत होतें. तो मोठा तेजस्वी होता. सर्वांनीं त्याला पहातांच 'अहो भा:' असें म्हटल्यामुळें, सूर्याप्रमाणें त्याची 'भाः' म्हणजे प्रभा अतीशय विस्तृत असल्यामुळें तो 'भास' या नांवानें लोकांकडून संबोधित केला गेल्यामुळें 'भास' या नांवानें प्रसिद्धीस आला. त्याला आपल्या पूर्वजन्माची चांगली आठवण झाली. थोड्याशा ध्यानानें एका क्षणांत आपला सर्व वृत्तांत पाहून वसिष्ठांच्याकडे येऊन त्या भासानें त्याना प्रणाम केला आणि म्हणाला, 'मला ज्ञान व प्राण देणाऱ्या हे ब्रह्मन्! तुला नमस्कार असो.' तेव्हां वसिष्ठहि हातानें त्याच्या मस्तकाला स्पर्श करीत म्हणाले 'हे राजन्! फार दिवसांनीं आज आतां तुझ्या अविद्येच्या क्षय होवो' नंतर दशरथ राजा त्याला म्हणाला 'भो राजन्! तुझें स्वागत असो. या आसनावर बैस, अनेक संसारांत भ्रमण करणाऱ्या तुला येथें थोडीशी विश्रांति मिळो.' असें दशरथ राजाचें बोलणें ऐकून भास नांव धारण करणारा विपश्चित् राजा विश्वमित्रादि मुनींस नमस्कार करून त्यांच्या जवळच आपल्या आसनावर बसला. त्याला उद्देशून विश्वामित्र म्हणाले. "ज्यांना तत्त्वज्ञान झालेलें नाहीं, असे या विपश्चित् राजा सारखे विचित्र भ्रमांनीं ग्रासलेले पुष्कळ लोक या जगांत आहेत व ते आपल्या विचित्र वासनांनीं अनंत कोट्यवधि जगें साक्षात् पहात रहातात." असें सांगून विश्वामित्रांनीं वटधाना राजपुत्रांची गोष्ट सांगितली.



## ( ४५ ) वटधाना राजपुत्रांची गोष्ट.

अद्य सप्तदशं वर्षलक्षमक्षीणानिश्चयाः ॥
एकमेव भ्रमंतोऽस्यां वटधाना भुवि स्थिताः नि. पू. १३१–४.

**भावार्थः**—हें दृश्य जग खरें आहे असा ज्याचा निश्चय क्षीण झालेला नाहीं, असे **वटधाना** नांवाचे राजपुत्र आज सतरा लक्ष वर्षे भूलोकीं भ्रमण करीत राहिले आहे.

या भूगोलाच्या एका दिशेमध्यें वटधाना या नांवाचा एक देश असून त्याचे राजे वटधाना नांवाचेच क्षत्रिय आहेत. त्यांच्या कुळांत पूर्वी तीन राजपुत्र होऊन गेले. तेहि विपश्चित् राजाप्रमाणें 'या दृश्य जगाचा अंत कोठें होतो,' तें पाहण्याचा संकल्प करून दृढनिश्चयानें ते तो अंत पहाण्यासाठीं निघाले. निरनिराळीं द्वीपें व समुद्र यांतून जात असतांना त्यांना पुनः पुनः जल व पुनः पुनः भूमि लागली. पण तसेंच ते पुढें आक्रमण करीत गेले. ते पुष्कळ दिवस प्रवास करीत होते. मध्यें मध्यें मरून त्यांनीं नवीन शरीरें धारण केलीं. याच क्रमानें त्यांचा दीर्घकाळ निघून गेला. वाटोळ्या चेंडूवर चालणाऱ्या मुंगीप्रमाणें ते अहर्निश भ्रमण करीत होते. पण त्यांना या दृश्याचा अंत लागला नाहीं. आकाशांतील चेंडूवर भ्रमण करीत असलेल्या मुंगीप्रमाणें ते अद्यापि त्या भ्रमणांतच व्यग्र होऊन राहिलेले आहेत. त्यांना त्याचा कंटाळाहि येत नाहीं. या भूगोलाच्या ज्या ज्या खालच्या, वरच्या किंवा मधल्या प्रदेशीं ते जातात, तेथें तेथें त्यांना खालीं वर अशाच दिशा दिसतात. ते म्हणतात 'जर इतक्या उद्योगानेंहि आम्हाला याचा अंत लागत नाहीं, तर आम्ही असेंच पुढें आणखी संचार करीत राहूं."

तात्पर्यः—याप्रमाणें दिसत असलेले हें सर्व दृश्य वस्तुतः कांहीं नाहीं. तर सर्व ब्रह्मदेवाच्या संकल्पाचा विलास आहे, स्वप्नांतील दृश्याप्रमाणें किंचित् संकल्पमय असलेलें हें अज्ञान अनंत आहे.

## ( ४६ ) शवाची गोष्ट.

(ही शवाची गोष्ट म्हणजेच मागील ४४ व्या विपश्चित् राजाच्या गोष्टीच्या शेवटीं प्रकट झालेल्या भासानें म्हणजेच विपश्चितानें पाहिलेलें एक आश्चर्य होय. ही गोष्ट विपश्चितानें दशरथराजाच्या सभेंत स्वतः सांगितलेली आहे.)

भास ( विपश्चित् ):—या जगासारख्या दुसऱ्या एका जगांत विहार करीत असतां मी सहज आकाशाकडे पाहूं लागलों, तों पृथ्वीवर भ्रमरांच्या थव्यासारखी काळी व पर्वताएवढी मोठी छाया भ्रमण करीत असलेली मला दिसली. ती फारच मोठी असल्यामुळें अत्यंत आश्चर्यकारक अशी ही छाया कशाची बरें असावी, असा विचार करीत मी आपली दृष्टि वर अंतरिक्षांत जों लावीत आहे, तों एका पर्वतावर पुरुषाचें शरीर आकाशांतून खालीं पडत आहे, असें मला दिसलें. तें धिप्पाड शरीर खालीं पडत असतांना वावटळींतील पानाप्रमाणें गरगर फिरत होतें. पर्वताप्रमाणें जड व आकाशाला भरून सोडणारा असा ज्याचा देह आहे, तो हा पुरुष कोण बरें असावा? हा ब्रह्मदेव आहे, कां ब्रह्मांड हें ज्याचें शरीर आहे, असा विराट् पुरुष आहे? त्याच्यामुळें सूर्यहि दिसेनासा झाला आहे. मी असा विचार करीत आहें, तों आकाशांतून एकाएकीं सूर्यवेगानें खालीं पडला. तेव्हां मोठा भयंकर आवाज झाला. तें धिप्पाड शरीर खालीं पडत असतांना आपलें शरीर त्याच्या खालीं चिरडून जाईल अशा भीतीनें जवळच असलेल्या अग्नींत मी प्रवेश केला. पण पूर्वी कित्येक जन्मांत त्याची भक्ति केली असल्यामुळें तो भगवान् अग्नि चंद्राप्रमाणें शीतल झाला व "बाळा! भिऊं नको! भिऊं नको!" असें मला म्हणाला. तेव्हां 'हे देवा! तुझा जयजयकार असो, प्रत्येक जन्मामध्यें आम्हाला परम आधार तूंच आहेस. हा अकालींच कल्पांत ओढवला आहे; यास्तव हे प्रभो! माझें रक्षण कर' असें मी बोललों असतां "भिऊं नको! भिऊं नको! चल आपण अग्निलोकीं जाऊं या" असें म्हणून त्यानें मला पोपटाच्या पाठीवर बसविलें व खालीं पडत असलेल्या शवाच्या कांहीं भागाला जाळून व छिद्र करून तो त्यांतून वर आकाशांत

निघून गेला. तेव्हां आकाशांत येऊन ती विशाल आकृति खालीं पडत असतांना समुद्र, पर्वत, वनें, जंगलें यांसह सर्व पृथ्वी चळचळ कांपूं लागली व या वेळीं प्रत्यक्ष प्रलयच ओढवला आहे कीं काय, असें वाटलें. शेवटीं, तें शव खालीं पडलें. त्यानें सर्व पृथ्वीला आच्छादित केलें. सर्व पर्वतांचें चूर्ण झालें ! तें पाहून मी अग्नीला विचारलें कीं ' हे प्रभो ! हें काय आहे ? हा मांसमय देह कसा पडला ? त्याच्याबरोबर हा सूर्यहि आकाशांतून कसा पडला ? पर्वत, वनें व सागर यांसह सर्व भूपृष्ठांतहि हा मावत नाहीं !

अग्निः—बाळा ! तूं एक क्षणभर धीर धरून रहा. याच्या पतनामुळें उत्पन्न झालेला दोष पूर्णपणें शांत होऊं दे. मग मी तुला सर्व कांहीं सांगेन.

भगवान् अग्नि असें जों बोलत आहे, तों सर्व दिशांतून आकाशांत संचार करणारे जीव तेथें जमले. सिद्ध, साध्य, अप्सरा, दैत्य, गंधर्व, नाग, किन्नर, ऋषि, मुनि, यक्ष, पितर हे सर्व तेथें जमले आणि भक्तीनें आपलीं मस्तकें नम्र करून सर्वेश्वरी काळरात्री देवीचें रक्षण करण्याबद्दल स्तवन केलें. थोड्या वेळानें ती देवता प्रसन्न झाली तेव्हां ते देव तिला म्हणाले:— ' हे अंबिके ! हें शव तुझ्या उपहारासाठीं अर्पण केलें आहे, तें आपल्या परिवारासह तूं शीघ्र भक्षण कर ' अशी प्रार्थना केल्यावर ती देवी प्रसन्न झाली व लागलीच तिनें आपल्या प्राणवायूनें त्या शवांतील सर्व रक्त प्राशन करून टाकलें. त्या रक्ताच्या प्राशनानें ती देवी चांगलीच पुष्ट झाली. तिचें उदर लांब होतें. त्या भगवतीनें भयंकर सर्पांचीं भूषणें धारण केलीं होतीं. तिनें आपल्या शरीरानें अर्धे आकाश भरून सोडलें व ती तेथें नृत्य करूं लागली. त्यानंतर पिशाच्च, कूष्मांड, रूपिका इत्यादि महागणांनीं त्या शवाला चोहोंबाजूंनीं घेरलें. हातपाय, मांड्या, स्कंध इत्यादि त्याचे अवयव भूतसंघातापासून इतके दूर दिगंतरीं पसरले होते, म्हणून त्यांच्या तावडींत ते सांपडलेच नाहींत. तें शव आपले हातपाय पसरून अधोमुख पडलें होतें व त्याला तो भूतसमुदाय खात होता. मातृकागण नाचत होता. रक्ताचे प्रवाह वहात होते व मेदाचा दुर्गंध सभोंवार पसरला होता. या पृथ्वीला मेदसमूहानें मेदिनी करून म्हणजे मेदानी सारवून तो देवीचा भूतगण मत्त

झाला व आकाशांत नाचूं लागला. देवांनीं पृथ्वीवरील शिल्लक राहिलेले रक्त सात समुद्रांपैकीं एका समुद्रांत नेऊन टाकलें. देवांनीं त्याला सुरार्णव बनविलें. तेव्हांपासून अद्यापि तो मदिरार्णव होऊन राहिला आहे. त्या भूतांनीं पिऊन अवशिष्ट राहिलेला मेद भूतलावर पडून सुकून गेला. त्यामुळें या पृथ्वीला तेव्हांपासून मेदिनी हें नांव पडलें. त्याचप्रमाणें देवांनीं सूर्यादि स्वस्थानीं नेऊन बसविलें. याप्रमाणें हळुहळु तें शव क्षय पावलें असतां दिवस व रात्र यांचा क्रम पूर्वीप्रमाणेंच सुरू झाला. प्रजापतीनें नवीन प्रजा उत्पन्न केल्या आणि या भूतलीं पूर्वीप्रमाणेंच सृष्टि झाली.

## शवाचा आरंभापासून वृत्तांत.

भास (विपश्चित्):—हे भगवन्, हे हुताशना! आतां जें हें शव झालें, तें पूर्वी काय होतें व तें शव कां झालें? हें सर्व मला कृपा करून सांग.

अग्निः—हे राजा! सर्व ऐक. मी तुला त्रैलोक्यासारख्या विशाल व अनंत अशा या शवाचा पहिल्यापासून इतिहास सांगतों. पूर्वी एका उन्मत्त झालेल्या दैत्यानें एका महामुनीचा आश्रम छिन्नभिन्न करून टाकला; तेव्हां त्या मुनीनें त्याला असा शाप दिला कीं "ज्या अर्थी आपल्या फार मोठ्या शरीरानें तूं माझ्या आश्रमाचा नाश केला आहेस, त्या अर्थी तूं मरून अति क्षुद्र मशक हो." लागलीच तो मृत होऊन मशक झाला. पुढें एकदां तो मशक एके ठिकाणीं विश्रांति घेत असतां हरिणाचा पाय त्याच्या अंगावर पडून त्याच्या देहाचा चूर झाला. हरिणाचा आकार पाहून त्याचें चिंतन करीत त्यानें प्राण सोडल्यामुळें तो हरिणयोनींत जन्माला आला. पुढें अरण्यांत स्वेच्छेनें विहार करीत असतां व्याधानें त्याला तीक्ष्ण बाण मारून त्याचा प्राण घेतला. तें हरिणाचें शरीर सोडतांना व्याधशरीराकडे त्याची दृष्टि लागल्यामुळें तो स्वतः व्याध झाला. तो व्याध वनांतून विहार करीत असतांना एका मुनीच्या आश्रमांत आला. तेथें सत्संगाचा लाभ झाल्यामुळें त्याला विश्रांति मिळाली. मुनीनें त्याला उपदेश केला.

मुनिः—अरे बाबा! तूं दीर्घ दुःख भोगण्यासाठींच असा कां भटकत आहेस? धनुष्यापासून सोडलेल्या बाणांनीं या गरीब बिचाऱ्या हरिणांना

कां मारतोस ? या क्षणभंगुर जगामध्यें महाफल देणारी अहिंसा, अभयदान इत्यादि शास्त्रमर्यादा कां पाळीत नाहींस ?

व्याधः—अहो ! मृगाला मारणें हा आमचा कुलाचार आहे व त्यावर आम्ही आपली उपजीविका करीत असतों. तेव्हां कुलपरंपराप्राप्त असें जीविताचें साधन आम्ही कसें सोडावें ? आणि तें सोडल्यावर आम्ही जिवंत कसें रहावें ?

मुनिः—जिवंत रहाणें व भोग भोगणें हा कांहीं मोठा पुरुषार्थ नव्हे. उलट हिंसादि दोषांनीं त्यांचें संपादन केल्यास अनंतकालपर्यंत नरकांतील अनंत दुःखें भोगावीं लागतात. हें जीवित नित्य नाहीं. भोग चंचल आहेत. यास्तव भावी अनर्थपरंपरारूप संसाराला भिऊन अभयदान, अहिंसा इत्यादि उपायांनीं नित्य, सर्व संसार अनर्थांची निवृत्ति करणाऱ्या निरतिशय आनंदरूप परब्रह्माची गुरु व शास्त्र या उपायांनीं प्राप्ति करून घे.

अग्निः—याप्रमाणें त्या मुनीनें व्याधाला निरनिराळ्या तऱ्हेनें उपदेश केला व तेथें ते दोघेंजण तप करूं लागले. त्यानंतर अल्पकालानें तो मुनि आपला देह टाकून परमपदाला प्राप्त झाला. त्यानंतर पुष्कळ काळ लोटल्यावर व्याधाचा मनोरथ पूर्ण करण्याकरितां ब्रह्मदेव तेथें आला व म्हणालाः—'मी तुझ्या तपानें प्रसन्न झालों आहे. तुला काय वर मागावयाचा असेल तो माग.' असें ब्रह्मदेवाचें बोलणें ऐकल्यानंतर व्याध म्हणालाः— 'भगवन् ! हें माझें शरीर स्वच्छंद मृत्यु होवो. तें रोगरहित व आकाशांत उडणारें होवो. हें माझें शरीर प्रत्येक क्षणीं अवयवशः एकेक योजन विस्तीर्ण होवो, असें झालें म्हणजे मला या दृश्य जगाचें काय प्रमाण आहे, तें समजून घेतां येईल. देवा ! असा वर मला दे.' ब्रह्मदेव 'तथास्तु' म्हणून अंतर्धान पावले. व्याधहि त्याचें फल भोगण्याकरितां पक्ष्याप्रमाणें आकाशांत उडाला. आपल्या वाढणाऱ्या शरिरानें त्रैलोक्याच्या पलीकडे अव्याकृत आकाशांत मोठ्या वेगानें अगणित कालपर्यंत पर्वताप्रमाणें फिरत राहिला; महागरुडाच्या वेगानें खालीं, वर, आसपास असा संचार करीत असतां पुष्कळ काळ निघून गेला, तरी त्याला अविद्याभ्रमाचा अंत लागेना. तेव्हां अतिशय उद्विग्न होऊन तो विरक्त झाला. प्राणोच्चलधारणा करून त्यानें

प्राणत्याग केला. त्याबरोबर प्रेत झालेलें त्याचें शरीर आकाशांतून खालीं पडूं लागलें व प्राणयुक्तचित्त वर आकाशांत गेलें. त्याचा देह शंभर मेरूंच्या आकाराचा महाशव झाला आणि दुसऱ्या पृथ्वीप्रमाणेंच आकाशांतून खालीं पडला. त्यानें आपल्या विशाल आकारानें सर्व पृथ्वी व पर्वतमंडल झांकून टाकलें. याप्रमाणें त्या महाशवाचा सर्व वृत्तांत तुला सांगितला.

तात्पर्यः—विपश्चित् राजा, वटधानाराजपुत्र व शव यांच्या वरील तिन्ही गोष्टींमध्यें ह्या दृश्यजगद्रूप अविद्याभ्रांतीचा अंत कोठें होतो, हें पहाणाऱ्या विपश्चितादिकांनीं दीर्घ प्रयत्न केला, तरीहि त्यांना तिचा अंत लागला नाहीं, यावरून असें सिद्ध होतें कीं, अविद्येचा अंत पहाण्याचा प्रयत्न करणें म्हणजे शुद्ध वेडेपणा आहे. ही दृश्यरूप अविद्या मुळींच नाहीं, असा निश्चय केल्यानेंच व तशा तऱ्हेचें दृढ अनुसंधान ठेवल्यानेंच अविद्येचा नाश होऊन ब्रह्मपदाची प्राप्ति होते.

## ( ४७ ) शिलेची गोष्ट.

परमात्ममहासत्ता कथितैषा मया तव ॥
अनयैव वचोभंग्या न त्वेषा विपुला शिला ॥ नि.उ. १६६-३२

**भावार्थः**—( या ग्रंथाचा 'तत्त्वज्ञान' नांवाचा भाग पहिला, प्रकरण २६ ( विवर्तवाद ) या मध्यें सांगितलेल्या आत्मख्यातीचें स्वरूप समजावून देण्याकरितां ही गोष्ट सांगितली आहे ). या गोष्टींत परमात्म्याची सत्ता किती मोठी आहे हें दाखविलें आहे.

एक अतिशय स्वच्छ व विस्तीर्ण शिला आहे. तिचा घेर हजारों कोटि योजनें आहे. हें सर्व बाजूंनीं नीलवर्ण दिसणारें आकाश जर भिंतीप्रमाणें कठिण असतें, तर त्यालाच ही शिला म्हणता आलें असतें. त्या शिलेमध्यें चिरा वगैरे मुळींच नाहींत. ती अतिशय निबिड, वज्रासारखी दृढ, व्यापक, अत्यंत कठीण, आकाशाप्रमाणें निर्मल, असंख्य कल्प गेले तरी विनाश न

प्रावणारी, घनस्वरूप, रमणीय अंगानें युक्त व निर्मल असल्यामुळें, ती आकाशरूपच दिसत होती. तिची विशिष्ट जाति कोणालाच कळत नव्हती. ती कशी, कोठें व केव्हां झाली, हें कोणाला ठाऊक नव्हतें. महाभूतें व जरायुजादि चार प्रकारचे भूतसमूह यांनीं रहित असलेल्या तिच्या जठरांत असंख्य कमलें, शंख, गदा, चक्र इत्यादि होतीं. त्या शिलेच्या उदरांत आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी इत्यादि जगत् नव्हतेंच. तथापि तिनें त्या त्या भूताप्रमाणें भासणाऱ्या आपल्या रेषांना आकाश, वायु, इत्यादि नांवें दिलीं होतीं आणि तिनें आपण आपल्या देहरेषांमध्येंच असल्यामुळें स्वतःला जीव असें नांव दिलें होतें.

रामः—ही शिला अचेतन असली पाहिजे, तेव्हां ती चेतनाप्रमाणें आपलें नांव जीव असें कसें ठेवते ? त्याचप्रमाणें ती जर अचेतनच आहे तर आपल्या अंगांतील रेषांना आकाश, वायु, इत्यादि नांवें कशी देते ?

वसिष्ठः—ही शिला चेतनहि नाहीं व जडहि नाहीं तर ही विपुल व उज्ज्वल आहे. तिची जातिच जर कोणी जाणत नाहीं, तर तिच्यामध्यें दुसरा कोणता धर्म असणार ? व तिला कोण जाणणार ?

रामः—तिच्यामध्यें तिला जाणणारा जर कोणी नाहीं, तर वर सांगितलेल्या तिच्या जठरस्थ वायु, आकाश इत्यादि रूपरेषा कोण पहातो ? त्या रेषा तिच्या जठरांत कशा स्थित आहेत ? तिच्या उदरांत त्या रेषा कोणी व केव्हां कोरल्या ?

वसिष्ठः—ही अति दृढ शिला कोणालाहि तोडतां येत नाहीं व तिचा भेदहि करतां येत नाहीं. तिचा देह दूरवर पसरला आहे. अशा हिनें सर्व व्यापलें आहे. तिच्यामध्यें रेखामय अनंत वृक्ष, पर्वतसमूह, नगरें व पुरें आहेत. तिच्यामध्यें रेखामयच देव, दानव, मानव इत्यादि सूक्ष्माहून सूक्ष्म निराकार पण साकार असल्याप्रमाणें दिसणाऱ्या आकृती आहेत. त्यांत आकाश या नांवाची विद्युल्लतेप्रमाणें शोभणारी एक रेघ आहे. चंद्र व सूर्य या नांवाच्या त्या आकाश रेघेमध्यें दुसऱ्या उपरेषा आहेत.

रामः—त्या रेषा तेथें कोणी पाहिल्या ? व त्या कशा प्रकारच्या आहेत ? अतिघन अशा त्या शिलेच्या कोशामध्यें त्या कशा दिसतात ?

प्राणत्याग केला. त्याबरोबर प्रेत झालेलें त्याचें शरीर आकाशांतून खालीं पडूं लागलें व प्राणयुक्तचित्त वर आकाशांत गेलें. त्याचा देह थंभर मेरूंच्या आकाराचा महाशव झाला आणि दुसऱ्या पृथ्वीप्रमाणेंच आकाशांतून खालीं पडला. त्यानें आपल्या विशाल आकारानें सर्व पृथ्वी व पर्वतमंडल झांकून टाकलें. याप्रमाणें त्या महाशवाचा सर्व वृत्तांत तुला सांगितला.

तात्पर्यः—विपश्चित् राजा, वटधानाराजपुत्र व शव यांच्या वरील तिन्ही गोष्टींमध्यें ह्या दृश्यजगरूप अविद्याभ्रांतीचा अंत कोठें होतो, हें पहाणाऱ्या विपश्चितादिकांनीं दीर्घ प्रयत्न केला, तरीहि त्यांना तिचा अंत लागला नाहीं, यावरून असें सिद्ध होतें कीं, अविद्येचा अंत पहाण्याचा प्रयत्न करणें म्हणजे शुद्ध वेडेपणा आहे. ही दृश्यरूप अविद्या मुळींच नाहीं, असा निश्चय केल्यानेंच व तशा तऱ्हेचें दृढ अनुसंधान ठेवल्यानेंच अविद्येचा नाश होऊन ब्रह्मपदाची प्राप्ति होते.



## ( ४७ ) शिलेची गोष्ट

**परमात्ममहासत्ता कथितैषा मया तव ॥**
**अनयैव वचोभंग्या न त्वेषा विपुला शिला ॥** नि.उ. १६६-३२

भावार्थः—( या ग्रंथाचा ' तत्त्वज्ञान ' नांवाचा भाग पहिला, प्रकरण २६ ( विवर्तवाद ) या मध्यें सांगितलेल्या आत्मख्यातीचें स्वरूप समजावून देण्याकरितां ही गोष्ट सांगितली आहे ). या गोष्टींत परमात्म्याची सत्ता किती मोठी आहे हें दाखविलें आहे.

एक अतिशय स्वच्छ व विस्तीर्ण शिला आहे. तिचा घेर हजारों कोटि योजनें आहे. हें सर्व बाजूंनीं नीलवर्ण दिसणारें आकाश जर भिंतीप्रमाणें कठिण असतें, तर त्यालाच ही शिला म्हणता आलें असतें. त्या शिलेमध्यें चिरा वगैरे मुळींच नाहींत. ती अतिशय निबिड, वज्रासारखी दृढ, व्यापक, अत्यंत कठीण, आकाशाप्रमाणें निर्मल, असंख्य कल्प गेले तरी विनाश न

तथाप्रकारच्या ब्रह्मात्म्यानें सृष्टि, जगत्, भुवन इत्यादि पर्याय नांवांनीं प्रसिद्ध असलेली दृश्य नांवाची कल्पना स्वतःच स्वीकारली आहे.

## ( ४८ ) ब्रह्मांडाची गोष्ट.

**अणावणावसंख्यानि तेन संति जगंति खे ॥**
**अत्रैव मे पुरा प्रोक्तं ब्रह्मांडाख्यानमेव च ॥** नि. उ. १७६-१०

**भावार्थः**—प्रत्येक अणूमध्यें असंख्य जगें आहेत, याविषयीं हें ब्रह्मांडाख्यान सांगितलें आहे.

या आकाशामध्यें, आकाशाहून निराळा नसणारा असा चिदाकाश नांवाचा परमाणु आहे. आकाशांतील शून्य रूपाप्रमाणें किंवा वायूंतील स्पंदाप्रमाणें तो त्यांत अभिन्न रूपानें रहातो. आकाश आपल्या शून्य रूपाला किंवा वायु आपल्या स्पंदाला जसा पहातो, तसेंच त्यानें स्वप्नाप्रमाणें आपल्या स्वरूपांतच आपल्याला जीवभाव आलेला आहे असें पाहिलें. आपला निर्विकारीपणा, पूर्णपणा व सूक्ष्मपणा न सोडतांच त्या जीवाला आपल्या ठिकाणीं 'अहं' रूपाचा अनुभव आला. त्या अहंकारानें आपल्या रूपांतच 'मी बुद्धि आहे' अशी कल्पना केली. ती बुद्धि निश्चयरूप असून मायेप्रमाणें असद्धर्मांचा भ्रम उत्पन्न करणारी होती. बुद्धीनें 'मी मन आहे' असें खोटेंच स्वप्न पाहिलें. विकल्पाभासाच्या आरोपांनीं आपल्या स्वतःला हीन करणाऱ्या तिनें मनःकल्पना केली. अज्ञ पुरुषाची बुद्धि स्वप्नांत निराकार व अमूर्त असतांनाहि मूर्त पर्वतादि जसें पहातें, त्याचप्रमाणें त्या मनानें पंचेंद्रियें पाहिलीं. पुढें तो चिदाकाश परमाणु अशा रीतीनें मनोदेह समष्टिरूप होऊन त्रिभुवनात्मक विराट् शरीर पाहूं लागला. तो स्वतः आकाशरूपच असून निराकार असलेलें तें त्रिभुवन साकार व भासुर पसरलेलें त्याला दिसलें. तें अनेक भूतांनीं युक्त होतें. नाना प्रकारच्या स्थावर जंगमांनीं भूषित झालेलें होतें. कल्पना व काल यांनीं युक्त होतें. त्यांतील पदार्थांचा अन्योन्य समागम झाला होता. हाच समष्टि जीव व्यष्टि जीव-

वसिष्ठः—मी त्या तशा प्रकारच्या रेषा त्यांत पाहिल्या आहेत. कोणाची इच्छा असेल तर त्यालाहि त्या त्यांत पहातां येतील. ती तशा प्रकारची वज्राप्रमाणें दृढ असलेली शिला कोणालाहि तोडतां येत नाहीं.

रामः—तथापि तिच्या कोशामध्यें तुम्ही त्या रेषा कशा पाहिल्यात ?

वसिष्ठः—शिलेच्या जठरांत बसून मी त्या रेषा पाहिल्या; तिच्या उदरांतच मी स्थित असल्यामुळें तें अक्षत रेषाजाल मी पाहूं शकतों. नाहींतर त्या शिलेला मध्यें तोडण्यास कोण समर्थ होणार ? माझा देहहि तिच्या उदरांतील एक रेषाच आहे. त्यामुळें तिच्या अगदी हृदयप्रदेशीं असणाऱ्या मी तें सर्व पाहिलें.

राम—ती शिला कोणती ? तुम्ही कोण व कोठें स्थित आहां ? आपण काय सांगत आहां व आपण काय पाहिलें ?

## गोष्टीचें स्पष्टीकरण.

वसिष्ठः—मी या अशा शिलाख्यानाच्या निमित्तानें ही परमात्म्याची महासत्ता सांगितली. ती खरोखरच कांहीं शिला नव्हे. परमसत्तारूप शिलेच्या अवकाशरहित उदरांत आम्ही हें सर्व शरीरांतील मांसाप्रमाणें स्वरूपभूत स्थित आहोत. त्या शिलेचें अंग, आकाश आहे. सदागतिमान् वायुहि त्या शिलेचें अंगच आहे. त्याचप्रमाणें पंचभूतें व सर्व भूतभौतिक धर्म म्हणजे क्रिया, वासना, काल, कल्पना इत्यादि सर्व त्याशिलेचीं अंगें आहेत. भूमि जल, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि, अहंकार हीं सर्व तत्त्वें त्या शिलेचें अंगच म्हटलें आहे. परमात्मसत्ता हीच ती शिला व तिच्या अंगातील मांस हेंच सर्व तुम्ही आम्ही आहोंत त्यामुळें आम्ही सर्व अनन्य असून भ्रांतीनें तिच्याहून भिन्न आहों, असें जाणतो. चिन्मात्र एकरूप अशी जी फार मोठी शिला आहे, हिच्याहून भिन्न असें कोठें काय आहे. शुद्ध वेदनच स्वप्नांतील पदार्थांप्रमाणें हें सर्व घटपटादिक वस्तुजात भासत आहे. जलच लाटेच्या रूपानें जसें भासतें, तसें वेदनच पदार्थरूपानें भासतें. हें ब्रह्म सर्वघन आहे व चिन्मात्रघन पसरलेलें आहे. तें परमार्थघन शांत सर्व एकघन. आहे. तें अवकाशरहित, अपार, अनंत, आदि-अंत-मध्यशून्य आहे. त्या

तशाप्रकारच्या ब्रह्मरूप्यानें सृष्टि, जगत्, भुवन इत्यादि पर्याय नांवांनीं प्रसिद्ध असलेली दृश्य नांवाची कल्पना स्वतःच स्वीकारली आहे.

---

## ( ४८ ) ब्रह्मांडाची गोष्ट.

अणावणावसंख्यानि तेन संति जगंति खे ॥
अत्रैव मे पूरा पोक्तं ब्रह्मांडाख्यानमेव च ॥ नि. उ. १७६-१०

**भावार्थः**—प्रत्येक अणूमध्यें असंख्य जगें आहेत, याविषयीं हें ब्रह्मांडाख्यान सांगितलें आहे.

या आकाशामध्यें, आकाशाहून निराळा नसणारा असा चिदाकाश नांवाचा परमाणु आहे. आकाशांतील शून्य रूपाप्रमाणें किंवा वायूंतील स्पंदाप्रमाणें तो त्यांत अभिन्न रूपानें रहातो. आकाश आपल्या शून्य रूपाला किंवा वायु आपल्या स्पंदाला जसा पहातो, तसेंच त्यानें स्वप्नाप्रमाणें आपल्या स्वरूपांतच आपल्याला जीवभाव आलेला आहे असें पाहिलें. आपला निर्विकारीपणा, पूर्णपणा व सूक्ष्मपणा न सोडतांच त्या जीवाला आपल्या ठिकाणीं 'अहं' रूपाचा अनुभव आला. त्या अहंकारानें आपल्या रूपांतच 'मी बुद्धि आहे' अशी कल्पना केली. ती बुद्धि निश्चयरूप असून मायेप्रमाणें असद्धर्मांचा भ्रम उत्पन्न करणारी होती. बुद्धीनें 'मी मन आहे' असें खोटेंच स्वप्न पाहिलें. विकल्पाभासाच्या आरोपांनीं आपल्या स्वतःला हीन करणाऱ्या तिनें मनःकल्पना केली. अज्ञ पुरुषाची बुद्धि स्वप्नांत निराकार व अमूर्त असतांनाहि मूर्त पर्वतादि जसें पहातें, त्याचप्रमाणें त्या मनानें पंचेंद्रियें पाहिलीं. पुढें तो चिदाकाश परमाणु अशा रीतीनें मनोदेह समष्टिरूप होऊन त्रिभुवनात्मक विराट् शरीर पाहूं लागला. तो स्वतः आकाशरूपच असून निराकार असलेलें तें त्रिभुवन साकार व भासुर पसरलेलें त्याला दिसलें. तें अनेक भूतांनीं युक्त होतें. नाना प्रकारच्या स्थावर जंगमांनीं भूषित झालेलें होतें. कल्पना व काल यांनीं युक्त होतें. त्यांतील पदार्थांचा अन्योन्य समागम झाला होता. हाच समष्टि जीव व्यष्टि जीव-

भावाला प्राप्त होतो. स्वप्नांत प्रत्येक जीव आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें द्रष्टा, दृश्य, दर्शन; भोक्ता, भोग्य, भोग; कर्ता, कर्म, करण; या तीन त्रिपुटींनीं मनोहर झालेलें त्रैलोक्य नगर जसा पहातो, त्याप्रमाणें व्यष्टि जीवभावाला प्राप्त झालेला हा समष्टि जीव प्रत्येक व्यष्टि-जीवाच्या अंतःकरणांत आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणें पूर्वोक्त तीन त्रिपुटींनीं मनोहर झालेलें त्रिजगत् पहातो.

सारांश, प्रत्येक परमाणुच्या सूक्ष्म उदरामध्यें अशीं मोठमोठीं असंख्य जगें आहेत. तीं सर्व चराचर भूतें व पृथिव्यादि महाभूतें यांनीं भरलेलीं असतात. अविद्या दृष्टीनें पाहिल्यास हीच अनंत अविद्या होते; व ब्रह्मदृष्टीनें जाणल्यास तेंच निर्मल ब्रह्म होतें. ब्रह्मत्वानें पाहिलें असतां जो जगद्रूप स्वप्नजाल पहाणारा तोहि कांहींच नाहीं; कारण त्यांत द्रष्टा कोठचा, दृश्य कोठचें व दर्शन तरी कोठचें? अत्यंत शांत, प्रकाशरूप, शून्य, भेदरहित, केवल स्वच्छ, आद्यंतशून्य असें ब्रह्मच स्वरूपामध्यें स्थित आहे.

तात्पर्यः—जोंवर अज्ञाननिद्रा आहे, तोंवर परमात्म्यामध्यें लक्षावधि ब्रह्मांडसमूह वर वर्णन केल्याप्रमाणें नित्य, अनन्यामध्येंहि अन्यवत् स्थित आहेत. समुद्रामध्यें सतत पसरणाऱ्या तरंगाच्या वेगानें चंचल झालेल्या जलाचे जसे असंख्य तुषार उडत असतात, तसेंच परमात्म्यामध्यें हे अगणित ब्रह्मांडसमूह रहात असतात.

---

## (४९) इंदु ब्राह्मणाच्या मुलांची गोष्ट. (दुसरी)

जगच्चामूर्तचिन्मात्रमेदवाख्यानतः स्फुटम् ॥ नि. उ. १७८.

भावार्थः—या गोष्टींत जगत् अमूर्त असून चिन्मात्र कसें आहे हें दर्शविलें आहे.

(हें जगत् मनोमात्र आहे, हें दाखविण्यासाठीं पूर्वी हीच गोष्ट सांगितलेली आहे. आतां जगत् चिन्मात्र आहे, असें सांगण्याकरितां तीच गोष्ट पुनः

सांगितली आहे. (गोष्ट ५ वी, पृष्ठें ४९-५२). यांत वर्णन केल्याप्रमाणें जंबुद्वीपाच्या एका कोपऱ्यांत सुवर्णजट नांवाच्या प्रांतांत एक इंदु नांवाचा ब्राह्मण रहात होता. तप, वेद व सत्कर्में यांचा जणु काय तो आगारच होता. त्याला दहा मुलगे होते. ते मोठे बुद्धिवान् व दृढनिश्चयी होते. कालवशांत त्यांचा तो पिता मरण पावला. त्या इंदु ब्राह्मणाची भार्या वैधव्यभीतीनें आपल्या पतीबरोबर सती गेली. त्याचे दहा मुलगे वियोगदुःखानें व्याकूळ झाले व दोघांचेंही और्ध्वदेहिक करून सर्व व्यवहार सोडून ते अरण्यांत गेले. 'सर्व धारणांमध्यें उत्तम सिद्धि देणारी धारणा कोणती बरें आहे? कीं, ज्या धारणेमध्यें तन्मय होऊन आम्ही सर्वेश्वर हिरण्यगर्भ होऊं,' याप्रमाणें पुष्कळ विचार करून ते दहाही इंदुचे पुत्र, हिंस्र प्राण्यांचा उपद्रव ज्या ठिकाणीं होणार नाहीं, अशा एका पर्वताच्या दरींत पद्मासन घालून "ब्रह्मदेवासह सर्व जगत्च मी आहे" अशी धारणा करून दीर्घकाल बसले. त्या सर्वांनीं आपले नेत्र मिटले व चित्राप्रमाणें निश्चल झाले. त्या धारणेपासून च्युत न होतां अठरा महिने तसेच राहिले, तों त्यांचे तें आधिभौतिक देह शुष्क झाले व शेवटीं शवरूपास प्राप्त झाले; कच्चें मांस खाणाऱ्या पशुपक्ष्यांनीं त्यांच्या अंगाचे लचके तोडले. अशा तऱ्हेनें तें दहाही इंदुपुत्र नाश पावले. परन्तु 'मी ब्रह्मदेव आहे व जगत्हि ब्रह्मदेव आहे' असें मनानें दृढ ध्यान करणाऱ्या त्यांचा तसाच आणखी दीर्घकाल निघून गेला. त्यांचीं ती देहरहित दहा चित्तें एका परिपक्व ध्यानामुळें दहा ब्रह्मदेव व दहा ब्रह्मांड रूप बनलीं. त्याप्रमाणें त्यांचीं चित्तच सकल जगत् बनलीं. त्यांचीं तीं सर्व विश्वें सचिन्मय असल्यामुळें त्यांतील भूमि, पर्वत वगैरे सर्व चिदात्मकच आहे. जलाहून तरंग जसा भिन्न नाहीं त्याप्रमाणें संवित्तत्त्वाहून हें दृश्य जगत् निराळें नाहीं. हीं ऐंदवांचीं जगें जशीं आकाशांत चिन्मयच आहेत, त्याप्रमाणें त्यांतील काष्ठलोष्ठ पाषाणादि सर्व पदार्थ चिन्मयच होत. ज्याप्रमाणें ऐंदवाचें संकल्प जगद्रूपास प्राप्त झाले. त्याप्रमाणें या जगांतील ब्रह्मदेवाचा संकल्पहि जगद्रूपास प्राप्त झालेला आहे. तस्मात् येथें दिसणारे हे पर्वत, ही पृथ्वी, वृक्ष, मेघ, महाभूतें इत्यादि सर्व चिन्मात्रच विस्तारलें आहे. सारांश, त्या

देऊन त्या सर्वांचे मनोरथ पूर्ण केले. त्यानंतर तप करणारे ते बंधू आपल्या घरीं गेले. तूंहि आतां आपल्या घरीं जा. तेथें तुमची सर्वांची भेट होईल.'

असें त्या वृद्धतापसाचें बोलणें ऐकून कुंददंतानें विचारलें, कीं—

कुंददंतः—भगवन्! ही सप्तद्वीपवती पृथ्वी एकच आहे; तेव्हां एकाच वेळीं आठ बंधू सप्तद्वीपवती पृथ्वीचे अधिपती कसे होणार?

कदंबतापसः—अरे बाबा! यांत हें एवढेंच एक असंबद्ध आहे असें नाहीं, तर दुसरेंहि यापेक्षां अधिक असंबद्ध मी तुला सांगतो तें ऐक. हे आठ बंधू तप करण्यासाठीं गेले असतां यांच्या आठ भार्या अतिशय दुःखित झाल्या; व आपल्या भर्त्याकरितां त्यांनीं शतचंद्रायण नांवाचें दारुण तप केलें. त्यामुळें पार्वती त्यांच्यावर प्रसन्न होऊन म्हणाली, 'तुम्हाला काय वर मागावयाचा असेल तो मागून घ्या.' त्या सर्व स्त्रिया म्हणाल्या, 'हे जगदंबे! आमचे पती अमर होवोत. पण असें शक्य नसेल तर, त्यांचे जीव आमच्या गृहांतून कधींच बाहेर न जावोत, असा वर आम्हाला दे.' असें त्या स्त्रियांचे बोलणें ऐकून त्या देवीनें त्यांच्या इच्छेप्रमाणें वर दिले व आपण अंतर्धान पावली.

हे कुंददंता! आणखीहि एक आश्चर्यकारक वृत्त ऐक. हे आठहि बंधू तप करीत असतां त्यांचे आईबाप दुःखी कष्टी होऊन आपल्या आठी सुनांना बरोबर घेऊन तीर्थयात्रा करण्यास निघाले. जातांना वाटेंत एक ठेंगू पुरुष दिसला. त्याचा वर्ण पिंगट होता. त्यानें सर्वांगाला भस्म फासलें होतें, त्याचे केस वर उभारलेले होते. तो कोणी एक वृद्ध पांथस्थ असेल, अशी शंका आल्यामुळें त्याचा अनादर करून त्वरेनें जात असतां पायानें त्याच्या अंगावर धूळ उडवीत तीं दोघें त्याच्या अंगावरून निघून गेलीं. तेव्हां त्या अपराधानें क्रुद्ध झालेला तो मुनि म्हणाला, "हे महामूर्खा! सुनांना बरोबर घेऊन स्त्रीसह तीर्थयात्रा करण्याकरितां निघाला असतां मज दुर्वासाचें उल्लंघन करून मला वंदन न करतांच जात आहेस, म्हणून तुझ्या सुनांनीं व पुत्रांनीं तपानें संपादन केलेले वरहि विपरीत होतील." असा शाप ऐकतांक्षणींच तो ब्राह्मण त्या मुनीची प्रार्थना

करावयास जों जात आहे, तों तो दुर्वासमुनि अंतर्धान पावला. तेव्हां त्यांचे ते मातापितर आपल्या मुलांसह अतिशय दुःखी झाले व ते आपल्या घरीं परत आले. म्हणून मी म्हणतो कीं, त्यांच्या चरित्रामध्यें असें एकच असंबद्ध वृत्त नाहीं, तर अशी लक्षावधि असंबद्ध वृत्तें आहेत.

कुंददंतः—भगवन्! या जगांत सप्तद्वीपवती पृथ्वी एकच आहे. तेव्हां ते आठजण सप्तद्वीपवती पृथ्वीचे अधिपती कसे होणार? ज्याचा जीव घरांतून बाहेर जाऊच शकत नाहीं, तो सप्तद्वीपांचा ईश्वर होऊन दिग्विजय कसा करील? ज्या वरददेवानें वर दिले तेच शापानीं तद्विरुद्ध स्वभावास कसे प्राप्त होतील?

कंदबतापसः—हे साधो! यामध्यें तूं विरुद्ध व असमंजस असें काय पहात आहेस? त्यानंतर काय घडेल तें तूं ऐक, म्हणजे तुझें समाधान होईल. तुम्ही येथून आजपासून आठव्या दिवशीं त्या मथुरा प्रदेशीं जाऊन पोहोंचाल व त्या आपल्या बांधवांसह सुखानें रहाल. त्यानंतर ते आठहि बंधू क्रमानें त्या गृहांतच मरण पावतील. त्यांचे आप्त त्यांच्या देहांना अग्निसात् करतील. पृथक् पृथक् असलेले त्यांचे जीव झोपेमध्यें जड झाल्या-प्रमाणें कांहीं काल रहातील.

### वरशापांचा कलह.

इतक्यांत कर्माचें फल अवश्य प्राप्त होणें हा स्वभावच असल्यामुळें त्यांचीं वरशापात्मक कर्में त्यांच्या चित्तावच्छिन्न आकाशांत एकत्र जमतील. त्या कर्मांचे अधिष्ठाते म्हणजे त्यांचें फल देणारे देव तद्रूप होऊन आपापल्याला अनुकूल अशा समूहानें पृथक् पृथक् संघटित होतील. याप्रमाणें संघटित झालेले वर व शाप पृथक् पृथक् शरीरें धारण करतील. त्यांतील जे वररूप असतील ते मोठे भाग्यवान् असल्यामुळें दिव्य चतुर्भुज रूपें धारण करतील आणि जे शापरूप असतील ते घोर रूपें धारण करतील व त्यांचा पुढीलप्रमाणें संवाद होईल.

वरः—हे शापांनो! तुम्ही अगदी दूर निघून जा. हा आमचा काल प्राप्त झाला आहे. त्याचें उल्लंघन करण्यास कोण समर्थ आहे?

शापः—अरे वरांनो ! तुम्हींच दूर व्हा. हा आमचाच काळ आला आहे.

वरः—तुम्हाला मुनीनें केलें आहे व आम्हाला सूर्यानें केलें आहे. देव मुनीपेक्षा अधिक आहेत; कारण भगवान् सूर्याला ब्रह्मदेवानें मुनींच्या आधीं उत्पन्न केलें आहे.

शाप ( अतिशय रागावून म्हणतील ):—वरांनो ! तुम्हाला सूर्यानें केलें आहे पण आम्हाला रुद्राच्या अंशानें उत्पन्न केलें आहे.

असें बोलून शाप पर्वतांच्या शिखराप्रमाणें आपल्या त्रिशूलांचीं अग्रें वर करून वरांच्यावर धावून जावयास लागतील, तेव्हां वर हंसत हंसत म्हणतील:—

वरः—हे शापांनो ! असलें अनुचित कर्म सोडून कार्याच्या परिणामाचा विचार करा. ह्या कलहाचा शेवट कसा करावयाचा याचा निर्णय आम्हाला ब्रह्मदेवाकडे जाऊनच करावा लागेल, हें जर निश्चित आहे, तर आपण अगोदर असेंच कां करूं नये ?

हें वरांचें बोलणें ऐकून शाप ब्रह्मलोकीं जाण्याचें कबूल करून वरासह तेथें जातील व ब्रह्मदेवाला प्रणाम करून घडलेलें सर्व वृत्त कथन करतील. त्यांचें म्हणणें ऐकून घेऊन ब्रह्मदेव असा निर्णय देईल.

## शापापेक्षां वर श्रेष्ठ.

ब्रह्मदेवः—वर शापांच्या अधिपांनो ! जे अंतःसार* असतात, त्यांचाच नेहमी विजय होत असतो. तेव्हां तुमच्यापैकीं अंतःसार कोण आहेत, याचा तुम्हीं एकमेकांशीं स्वतः विचार करा.

तें ऐकून अंतःसाराचें परीक्षण करण्यासाठीं वरांच्या हृदयांत शाप प्रवेश करतील व शापांच्या हृदयांत वर प्रवेश करतील× आणि ते

---

* अंतःसारः—शास्त्राच्या अनुरोधानें व दृढ अभ्यासानें ज्यानीं आपली संविद् दृढ केलेली असते त्यांना **अंतःसार** असें म्हणतात.

× ' परस्परांच्या हृदयांत प्रवेश करणें ' ही केवळ कल्पना आहे. याचा अर्थ असा आहे कीं वर शापांनीं ' आपल्या पैकीं अंतःसार कोण आहेत ' याचा परस्परांनीं आपल्या अंतःकरणांत विचार केला.

परस्परांच्या हृदयांतील सारत्व स्वतःच शोधून, तें जाणून, व एकत्र जमून ब्रह्मदेवाला असें म्हणतीलः—

शापः—हे प्रजानाथ ! आमचा पराभव झाला, कारण आम्हीं अंतः-सार नाहीं. तर हे वरच अंतःसार आहेत. वराची इच्छा करणारे लोक आपल्याला अमुक वर मिळावा म्हणून दीर्घकाल तोच संकल्प करीत असतात व त्या संकल्पामुळें देवता प्रसन्न होऊन त्यांना वर देतात; त्यामुळें वरांनाच दृढत्व असतें. संविद् दीर्घकाल ज्या गोष्टीचा अभ्यास करते, तेंच तिचें तत्काल सार बनलेलें असतें. हे प्रभो ! आपल्यापासून आम्ही जें शिकलों तेंच आपल्यापुढें प्रकट केलें आहे, असें समजून आम्हाला क्षमा करा. आपणास नमस्कार असो. आम्हीं आतां सत्वर स्वस्थानीं जातों."

इतकें बोलून ते शापगण कोठें तरी निघून जातील.

## विरुद्ध वरा वरांचा कलह व त्यांची समजूत.

त्यानंतर त्या आठी भावांनीं त्यांच्या इष्टदेवतेकडून मिळालेल्या वरा-प्रमाणें सप्तद्वीपवती पृथ्वीचें अधिपत्य मिळविण्याकरितां मृत झाल्यावर आपल्या घरांतून बाहेर पडण्यास सुरवात करतील. त्यावेळीं त्यांच्या भार्यांना पार्वतीनें दिलेले वर त्या आठी भावांच्या मृतास्त्यांना शापा-प्रमाणेंच विरुद्ध फल देणारे होतील, म्हणजे त्यांना त्या घरांतून बाहेर जाण्यास प्रतिबंध करतील व ते ब्रह्मदेवाकडे येऊन म्हणतीलः—

शापस्थानीं असलेले वरः—हे देवेश ! त्यांना मिळालेल्या वरा-प्रमाणें भावी सप्तद्वीपवती पृथ्वीचे अधिपती होण्याची इच्छा करणाऱ्या जीवांना त्या शवगृहांतून बाहेर पडणें शक्य आहे, असें आम्हाला वाटत नाहीं. आम्हीं त्यांस प्रतिबंध करूं. पण हे श्रेष्ठ वर ह्या जीवांना सप्त-द्वीपेश्वर केल्याशिवाय रहाणार नाहींत. तेव्हां, हे देवाधिदेवा ! अशल्या अनिवार्य विरोधाचे वेळीं आम्हीं दोघेहि सफल होण्यास काय करावें ? तें सांगा.

ब्रह्मदेवः—हे सप्तद्वीपेश्वर वरांनो ! व हे गृहांत निरोध करणाऱ्या वरांनो ! तुमची दोघांचीहि इच्छा परिपूर्ण झाली आहे. कारण तुम्हीं

परस्परांच्या विरुद्ध असतांहि ते आठ बंधू मरणानंतर लागलीच दीर्घकाल आपल्या गृहांतच सप्तद्वीपेश्वर होऊन राहिले आहेत.

सर्व वर (म्हणतील):—भगवन्! आठ भूमंडलें कोठें आहेत? आठ सप्तद्वीपें कोठें आहेत व इतकें ऐश्वर्य तरी कोठें आहे? श्रुतीमध्यें व प्रत्यक्ष एकच भूपीठ प्रसिद्ध आहे, दुसरें नाहीं. तेव्हां तीं एका गृहाच्या कोपऱ्यामध्यें कशीं रहातील. कमलाक्षाच्या सूक्ष्म उदरामध्यें हत्ती कधींतरी रहातात का?

ब्रह्मदेवः—तुम्हीं व्यष्टि जीव व मी समष्टि जीव यांनीं युक्त असें हें सर्व जगत् चिदणुमध्यें स्थित आहे. हा चिदणु परमाणूपेक्षांहि सूक्ष्म आहे. चिद्वस्तूच्या एका सूक्ष्म अणूमध्यें सुद्धां जर जगत् भासतें, तर सप्तद्वीपयुक्त पृथ्वी त्यांच्या गृहोदरात भासली तर त्यांत काय आश्चर्य आहे? हें जें जगत् भासत आहे, तें चिद्रूप ब्रह्मच आहे.

याप्रमाणें ब्रह्मदेवानें त्या वरांना सांगितलें. तेव्हां आधिभौतिक भ्रांतिमय देहांना सोडून व प्रणाम करून ते वर आतिवाहिक देहानें एकदम तेथून निघून गेले. सप्तद्वीपामध्यें देवांच्या गृहकोशांत ते येऊन पोंचले. तों ते सर्व आठहि बंधू आठ जगामध्यें आठ दिवस स्वयंभु मनूच्या कुलांत सप्तद्वीपाचे नायक झाले, ते परस्परांना अज्ञात होते. प्रत्येकानें आपण आपल्या बंधूसह आहों अशी कल्पना केल्यामुळें आपण सर्व एके ठिकाणीं आहों असें प्रत्येकाला जरी भासत होतें, तरी पण प्रत्येकाचें राज्य भिन्न भिन्न होतें. याविषयीं ते सर्व अज्ञ होते. त्यामुळें ते एकमेकांचें हित करण्याविषयीं तत्पर होते. त्यांच्या घरामध्येंच कोणी एक बंधु उज्जयिनी नांवाच्या महापुरींत म्हणजे आपल्या राजधानींत सुखानें राज्य करीत होता. कोणी एक शाकद्वीपामध्यें राज्य करीत होता. कोणीएक कुश-द्वीपामध्यें आपल्या राजधानींत आपल्या स्त्रीसह सुखानें निजला होता. कोणीएक शाल्मलीद्वीपामध्यें एका पर्वतावरील सरोवरांत विद्याधरींच्या बरोबर जलक्रीडा करण्यांत रत झाला होता. कोणी क्रौंचद्वीपांत सप्त-द्वीपांतून आणलेल्या महासमृद्धींनीं युक्त अशा हेमपुरांत अश्वमेध यज्ञ करण्यांत दंग झाला होता. कोणी शाल्मलीद्वीपांत शत्रूबरोबर युद्ध कर-

ण्यास प्रवृत्त झाला होता. गोमेदद्वीपामध्यें राहणारा कोणी त्यांतील आठवा भ्राता पुष्करद्वीपांतील राजाच्या कन्येला जिंकून तिच्याशीं विवाह करण्यासाठीं कालवशात् शत्रूच्या देशाला पीडा देणारी सेना बरोबर घेऊन गेला. पुष्करद्वीपांत राहणारा कोणी एक भ्राता लोकालोक पर्वतावरील राजाची निधनभूमि पहाण्याच्या इच्छेनें निघाला. याप्रमाणें त्यांतील प्रत्येकजण द्वीप-द्वीपांचें अधिपत्य करीत होता. ते आपल्या प्रतिभेप्रमाणें स्वगृहा-काशांतच हा सर्व व्यवहार करीत होते. त्यानंतर ते होन्ही प्रकारचे वर आतिवाहिक देहावरील अभिमान टाकून त्या आठहि जीवांच्या संविदेशीं एकरूप होतील. शून्य शून्याशीं जसें मिळून जातें, तसें ते त्या गृहामध्यें परस्पर मिळून जातील आणि त्यांना चिरकाल अभिमत गोष्टींचा लाभ होईल. संतोष देणारें राज्य प्राप्त झाल्यामुळें ते आठहि भ्राते सप्तदीपेश्वर होऊन संतुष्ट राहतील.

तात्पर्यः—शापापेक्षां वर श्रेष्ठ आहेत, कारण वर हे अंतःसार आहेत, हें वरील गोष्टीवरून सिद्ध होतें. चिदणूमध्यें जगत् स्थित आहे हें मोठ्या युक्तीनें या गोष्टींत दर्शविलें आहे.



## ( ५१ ) कावडी वाहणाऱ्यांची गोष्ट.

गुरुशास्त्राद्युपायेन यथा ब्रह्मेह लभ्यते ॥
दारुवैवधिकाख्यानं तथा संक्षिप्य वर्ण्यते ॥ नि. उ. १९६.

भावार्थः—गुरु, शास्त्र इत्यादि उपायांनीं ब्रह्म कसें प्राप्त होतें, या सिद्धांताचें स्पष्टीकरण ह्या गोष्टींत केलें आहे.

कोणे एके ठिकाणीं कावडी वाहणारे, दारिद्र्यानें पीडलेले कीरक या नांवाचे शूद्र रहात होते. ग्रीष्म ऋतूमध्यें जसे जीर्ण झालेले वृक्ष जळून जातात, त्याप्रमाणें ते सर्व दुःखामुळें होरपळत होते. त्या कावडी वाहणारांना वैवधिक असें म्हणतात. बांध फुटून सरोवरांतील सर्व पाणी निघून गेले

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४४ | १२ | कल्पनिक | काल्पनिक |
| ५० | ११ | मगट | प्रकट |
| ६७ | २ | जवळेंचें | जवळचें |
| ६८ | ७ | देल्यास | देण्यास |
| ७३ | ६ | दुखाचा | दुःखाचा |
| ७५ | १० | फुटलेल्या | फुटलेला |
| ७७ | ४ | भोगाविनाथर्व | भोगाधिनायर्व |
| ७७ | २२ | लवणरूपी | लावण्यरूपी |
| ८८ | २५ | कार्ष्टे | कार्ष्टे |
| १०३ | २ | जिकड | जिकडे |
| १२३ | १० | घडल | घडला |
| १३३ | २२ | रूणें | रूपें |
| १४२ | ११ | भगवान् | भगवन् |
| १५० | २२ | श्रुणु | शृणु |
| १५५ | १८ | निरश | निरंश |
| १६१ | ६ | हिमालयपर्वतार | हिमालयपर्वतावर |
| १७९ | २३ | संसाराधिकार | संहाराधिकार |
| १८७ | ८ | कल्पनास्यदम् | कल्पनास्पदम् |
| १९२ | २ | कूरमनिश्रेयः | क्रूरमतिश्रेय |
| १९६ | २४ | जीव | जीवट |
| २०१ | १७ | समाज | समज |
| २०६ | २१ | द्वापारयुग | द्वापरयुग |
| २२३ | २० | भगवान् | भगवन् |
| २३४ | १ | रांज्यापुढें | राजापुढें |
| २४५ | ८ | तुर्यावस्यतच | तुर्यावस्थेंतच |
| २५८ | ११ | निरसन् | निरसन |
| २८५ | २६ | चगांतील | जगांतील |



महर्षि श्रीवाल्मीकिप्रणीत

# योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान सुरस गोष्टी व सुभाषितें.

★

## भाग तिसरा.

## योगवासिष्ठांतील सुभाषितें.

# प्रस्तावना.

योगवासिष्ठामध्यें अनेक सुभाषितें आलेलीं आहेत, त्यामुळें या ग्रंथाला फारच मोठी शोभा आली आहे. सुभाषितासंबंधानें एका कवीनें असें वर्णन केलें आहे कीं,

> द्राक्षाम्लानमुखी जाता शर्करा चाश्मतां गता ।
> सुभाषितरसस्याग्रे सुधा भीता दिवं गता ॥

"सुभाषितांतील माधुरी अशी अजब आहे कीं, तिच्यापुढें द्राक्षें आंबट झालीं, शर्करा दगडासारखी बनली आणि अमृतानें तर भयानें स्वर्गाला प्रयाण केलें."

याच अनुसंधानानें दुसऱ्या एका कवीनें असें म्हटलें आहे कीं,

> पृथिव्यां त्रीणि रत्नानि जलमन्नं सुभाषितम् ।
> मूढैः पाषाणखण्डेषु रत्नसंज्ञा विधीयते ॥

"जगांत तीनच रत्नें आहेत, तीं म्हणजे पाणी, अन्न आणि सुभाषित. पाषाणाला 'रत्न' हें नांव मूर्खांनीं दिलें आहे."

विविध प्रकारच्या दृष्टांतांनीं या योगवासिष्ठाला जशी शोभा आलेली आहे, तशीच सुभाषितांनींहि आली आहे. फुलांच्या हारांत कलाबतूच्या तंतूंचें जें स्थान आहे, तेंच एखाद्या काव्यमय ग्रंथांत सुभाषितांचें होय. सुभाषितांच्या योगानें ग्रंथाला उजाळा मिळतो व जीवननौकेला दीपगृहासारख्या धोक्याच्या सूचना देण्यालाहि सुभाषितें उपयोगीं पडत असतात, म्हणूनच घरोघर भिंतीवर किंवा तुळयावर ठोवळ अक्षरांनीं हीं सुभाषितें लिहिलेलीं आढळतात. हीं वासिष्ठांतील सुभाषितें म्हणजे मौल्यवान् रत्नें आहेत. रत्नांचा हव्यास बाळगून रत्नजडित दागिने गळ्यांत घालून नटण्यापेक्षां हीं सुभाषितें कंठगत करण्यांत आलीं, तरच ती खरी श्रीमंती होय, हा वरील कवीवचनांतील अर्थ आहे.

अज्ञातन्हेच्या योगवासिष्ठांतील अनेक सुभाषितांपैकीं निवडक सुभाषित वचनें या ग्रंथाच्या तिसऱ्या भागांत ग्रथित केलीं आहेत आणि त्या वचनांच्या

खालीं त्यांचें मराठी भाषांतरहि दिलें आहे. या सुभाषितांचे तीन प्रकार करण्यांत आले आहेत. ( १ ) आध्यात्मिक सुभाषितें-संख्या १७८, ( २ ) नैतिक सुभाषितें-संख्या १११ व ( ३ ) धार्मिक सुभाषितें-संख्या १६. अशीं एकूण ३०५ सुभाषितें आहेत, सुभाषित वचनांच्या मागें क्रमांक घातले आहेत आणि पुढें मूळ योगवासिष्ठांतील स्थलांचा निर्देश केला आहे. या स्थल निर्देशांतील पहिला अंक प्रकरणाचा, दुसरा सर्गाचा व तिसरा श्लोकाचा समजावा. निर्वाण प्रकरणाचे पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन भाग असल्यामुळें पूर्वार्धांतील व उत्तरार्धांतील वचनांपुढें ' ६ ' आकडा घालण्याऐवजीं ' नि. पू. ' व ' नि उ. ' म्हणजे ' निर्वाण पूर्वाध व निर्वाण उत्तरार्ध असे शब्द घातले आहेत.

या सुभाषितांपैकीं कांहीं थोडीं सुभाषितें व त्यांतील अर्थ विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. तीं ' सुभाषितें ' व त्यावरील विचार पुढें दिला आहे.

## ( १ ) आध्यात्मिक सुभाषितांपैकीं

### सुभाषित १ लें.

यांत असें सांगितलें आहे कीं, केवळ नुसत्या कर्माचरणानें किंवा नुसत्या ज्ञानाभ्यासानें मोक्ष मिळत नाहीं, तर स्वकर्मांच्या आचरणानें चित्त शुद्ध झाल्यावरच ज्ञानाचा अभ्यास केला असतां मोक्ष मिळतो. हा या सुभाषितांतील भावार्थ ध्यानांत ठेवण्यासारखा आहे, कारण पुष्कळ लोकांना आपल्या वर्णाश्रमविहित कर्मांचें आचरण करण्याचा कंटाळा येत असतो व ते नुसत्या अध्यात्मशास्त्राचाच अभ्यास करीत असतात. त्यामुळें त्यांना प्रत्यक्ष आत्मसाक्षात्कार होऊन जें समाधान व आनंद प्राप्त व्हावयास पाहिजे तो होत नाहीं. म्हणून स्वकर्मांचें आचरणहि पाहिजे व ज्ञानाचा अभ्यासहि केला पाहिजे. असा ह्या सुभाषिताचा गर्भित अर्थ आहे.

### सुभाषित ३४ वें.

राजा व मंत्रि समदृष्टि असावा लागतो व हें खरेखुरें समदृष्टित्व

राजविद्येनें म्हणजेच अध्यात्मविद्येनें प्राप्त होत असतें; आणि ही विद्या ज्यानें प्राप्त करून घेतली नाहीं तो खरा राजाहि नव्हे व खरा मंत्रिहि नव्हे. तेव्हां ज्याला मंत्रिपदावर आरूढ व्हावें असें वाटत असेल, त्यानें ही विद्या प्रथम संपादन केली पाहिजे असें वसिष्ठांचें सांगणें आहे.

### सुभाषित ५९ वें.

या सुभाषितांत केलेली सज्जनांची व्याख्या लक्षांत ठेवण्याजोगी आहे. अशा सज्जनांची संख्या राष्ट्रांत जर वाढली तर त्या राष्ट्राची उन्नति होऊं शकेल असें वसिष्ठांचें म्हणणें आहे.

### सुभाषित ७३ वें.

या सुभाषितांत सांगितल्याप्रमाणें मनुष्य जर प्रपंचांत वागेल, तरच तो सुखी व समाधानी होईल.

### सुभाषित १०८ वें.

या सुभाषितांत सत्पुरुषांची आराधना म्हणजे त्यांनीं सांगितल्याप्रमाणें वागणें ही जी आराधनेची व्याख्या केली आहे ती योग्य आहे. त्यांची पूजाअर्चा करणें ही खरी आराधना नव्हे.

### सुभाषित १२६ वें.

या सुभाषितांत केलेली 'आर्य' शब्दाची व्याख्या ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

## ( २ ) नैतिक सुभाषितांपैकीं

### सुभाषित ५ वें.

या सुभाषितांत असें सांगितलें आहे कीं, श्रीमंत व्हावें पण ती श्रीमंति लोकांनीं निंदिलेली नसावी; म्हणजे धर्मानें व नीतीनें ती प्राप्त झालेली असावी, अशी श्रीमंतीच टिकून रहाते.

### सुभाषित ६८ वें.

या सुभाषितांत असें सांगितलें आहे कीं, माणसाला किती जरी आपत्ति प्राप्त झाली तरी त्यानें आपला सन्मार्ग व स्वधर्म सोडूं नये; कारण

' यतो धर्मस्ततो जयः ' म्हणजे जेथें धर्म आहे, तेथेंच जय हा शेवटीं ठरलेलाच आहे.

सुभाषित ९४ वें.

या सुभाषितांत असें सांगितलें आहे कीं, व्हावयाचें असेल तर खरे ज्ञानी व्हावें, ज्ञानबंधु होऊं नये. ज्ञानबंधु म्हणजे नुसता बोलघेवडा ज्ञानी होय. अशा ज्ञानबंधूपेक्षां अज्ञानीच श्रेष्ठ आहे असें वसिष्ठांचें मत आहे.

## ( ३ ) धार्मिक सुभाषितांपैकीं

सुभाषित २ रें व ७ वें.

हीं सुभाषितें सध्यांच्या काळाबाजारावर आहेत असें दिसतें. यांत असें स्पष्ट सांगितलें आहे कीं, अंतःकरणांत लोभाचें प्राबल्य झाल्यामुळें मनुष्य दुसऱ्याला लुबाडून म्हणजे वाजवीपेक्षां जास्त फायदा घेऊन पुष्कळ द्रव्य संपादन करून मोठा गबर होतो. पुढें त्याला त्याचा पश्चात्ताप होतो. म्हणून आपल्या मनाच्या शांतीकरितां त्या द्रव्यापैकीं थोड्याशा द्रव्याचा दानधर्म करितो; पण अशा दानधर्मापासून मिळालेलें पुण्य त्याला न लागतां ज्यांच्यापासून त्यानें तें द्रव्य मिळविलें असेल त्यांना तें पुण्य प्राप्त होत असतें, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे. म्हणून अनीतीनें, व अधर्मानें द्रव्यार्जन करूं नये. अन्यायानें मिळविलेल्या अन्नाच्या सेवनानें आपलें पोट भरण्यापेक्षां माणसानें मरून जाणें श्रेयस्कर आहे. असें वसिष्ठांचें मोठें कळकळीचें सांगणें आहे. अशा तऱ्हेनें जर राष्ट्रांतील पुष्कळ लोक वागतील तर त्या राष्ट्राची उन्नति होईल यांत मुळींच शंका नाहीं.

अशाच स्वरूपाचीं आणखींहि पुष्कळ सुभाषितें आहेत, पण तीं सर्व येथें त्यांच्या भावार्थासह देणें शक्य नाहीं. हीं सर्व सुभाषितें तोंडपाठ करण्यासारखीं आहेत व तीं नित्य आपल्याला दिसावींत म्हणून आपल्या घरांतील भिंतीवर लिहून ठेवावींत.

रघुनाथ भास्कर पावगीशास्त्री.

# अनुक्रमणिका.







# योगवासिष्ठांतील सुभाषितें.

## (१) आध्यात्मिक सुभाषितें.

केवलात्कर्मणो ज्ञानान्न हि मोक्षोऽभिजायते ॥
(१) किं तूभाभ्यां भवेन्मोक्षः साधनं तूभयं विदुः ॥ १-१-८

केवळ कर्मानें किंवा केवळ ज्ञानानें मोक्ष साध्य होत नाहीं, तर (प्रथम) कर्म व (नंतर) ज्ञान हीं मोक्षाचीं साधनें आहेत.

दृश्यात्यंताभावबोधं विना नत्नानुभूयते ॥
(२) कदाचित् केनचिन्नाम स्वबोधोन्विष्यतामिह ॥ १-३-३

दृश्य जगाचा अत्यंताभाव (मुळींच नसणें) आहे. हें समजल्याशिवाय कोणाला केव्हांहि (त्याचें पूर्णपणें विस्मरण होऊन) आत्मवस्तूचा अनुभव येणार नाहीं. म्हणून स्वप्रयत्नानें दृश्याचा बाध होण्याकरितां आत्मसाक्षात्काराची स्थिति प्राप्त करून घेतली पाहिजे.

कोपं विषादकलनां विततं च हर्षं ॥
(३) नाल्पेन कारणवशेन वहन्ति संतः ॥ १-५-१५

सत्पुरुषांना अल्पकारणावरून क्रोध, खेद किंवा हर्ष कधींहि उत्पन्न होत नाहीं.

(४) युज्यते वेष्टनं वायोराकाशस्य च खंडनम् ॥
ग्रथनं च तरङ्गाणामास्था नायुषि युज्यते ॥ १-१४-५

वाऱ्याची गुंडाळी करतां येते, आकाशाचे तुकडे करतां येतात, पाण्यावरील लाटांना एकत्र ओंवता येतें. इत्यादि गोष्टींवर एक वेळ विश्वास बसेल परंतु आयुष्यावर विश्वास बसत नाहीं.

(५) तरवोपि हि जीवंति जीवंति मृगपक्षिणः ॥
सजीवति मनो यस्य मननेन न जीवति ॥ १-१४-११

जगांत वृक्ष किंवा पशुपक्षी जगतच आहेत; परंतु तें जगणें खरें नव्हे. तोच खरा जिवंत आहे कीं, ज्याचें मन वासनाक्षयामुळें जिवंत नाहीं, किंवा तत्त्वबोधामुळें जो मनाला तुच्छ लेखतो.

(६) भारोऽविवेकिनः शास्त्रं भारो ज्ञानं च रागिणः ॥
अशांतस्य मनो भारो भारोनात्मविदो वपुः ॥ १-१४-१३

अविवेकी मनुष्याला शास्त्र, विषयी मनुष्याला ज्ञान व रागीट मनुष्याला मन हें भारभूत वाटतें. परंतु आत्मज्ञान झालेल्या मनुष्याला शरीर हें भारभूत होत नाहीं.

(७) अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि ॥
अपि वह्न्यशनात्साधो विषमश्चित्तनिग्रहः ॥ १-१६-२४

समुद्र पिऊन टाकणें, मेरुपर्वत उपटून काढणें किंवा अग्नि भक्षण करणें याच्याहिपेक्षा चित्ताचा निग्रह करणें जास्त कठीण आहे.

(८) अपि मेरुसमं प्राज्ञमपिशूरमपि स्थिरम् ॥
तृणीकरोति तृष्णैका निमेषेण नरोत्तमम् ॥ १-१७-५०

एखादा मनुष्य मेरुप्रमाणें अढळ असला, विद्वान्, शूर आणि स्थिर बुद्धीचा असला तरी त्याला तृष्णा एका क्षणामध्यें तुच्छ करून टाकते.

(९) नाहं देहस्य नो देहो मम नायमहं तथा ॥
इति विश्रान्तचित्ता ये ते मुने पुरुषोत्तमाः ॥ १-१८-५३

( राम वसिष्ठांना म्हणतात ) 'मी देहाचा कोणी नाहीं, देह माझा कोणी नाहीं व हा देह हें माझें खरें स्वरूप नव्हे,' या भावनेनें जे परमात्मस्वरूपांत स्थिर होतात, तेच उत्तम पुरुष होत.

(१०) तडित्सु शरदभ्रेषु गन्धर्वनगरेषु च ॥
स्थैर्यं येन विनिर्णीतं स विश्वसतु विग्रहे ॥ १-१८-६१

आकाशांतील वीज, शरदृतूंतील मेघ आणि गंधर्व नगर हीं सर्व स्थिर आहेत, असें ज्याला वाटत असेल त्यानें देहाच्या शाश्वतीविषयीं खुशाल विश्वास बाळगावा.

(११) दासाः पुत्राः स्त्रियश्चैव बांधवाः सुहृदस्तथा ॥
हसन्त्युन्मत्तकमिव नरं वार्धककम्पितम् ॥ १-२२-६

उन्मत्त मनुष्याकडे पाहून लोक हसतात, त्याप्रमाणें म्हातारपणीं मनुष्याचें शरीर कांपूं लागलें म्हणजे त्याचे नोकरचाकर, मुलगे, बायका, बंधु आणि मित्र त्याच्याकडे पाहून हंसूं लागतात.

(१२) कृच्छ्रेषु दूरास्तविषादमोहाः
स्वास्थ्येषु नोत्सिक्तमनोभिरामाः ॥
सुदुर्लभाः संप्रति सुन्दरीभि-
रनाहतान्तःकरणा महान्तः ॥ १-२७-८

विपत्तीमध्यें ज्यांना विषाद वाटत नाहीं व मोह पडत नाहीं आणि संपत्ति प्राप्त झाली असतां जे गर्वानें फुगून जात नाहींत; तसेंच सुंदर स्त्रिया पाहून ज्यांच्या अंतःकरणांत मुळींच विकार उत्पन्न होत नाहीं असे महात्मे सांप्रतकाळीं फारच दुर्मिळ आहेत.

(१३) क्षणमानन्दितामेति क्षणमेति विषादिताम् ॥
क्षणं सौम्यत्वमायाति सर्वस्मिन्नटवन्मनः ॥ १-२८-३८

मनाची स्थिति एखाद्या नटाप्रमाणें क्षणात आनंदाची वर क्षणांत खिन्नतेची व क्षणांत सौम्यतेची दिसून येते.

(१४) विषं विषयवैषम्यं न विषं विषमुच्यते ॥
जन्मान्तरघ्ना विषयाः एकदेहहरं विषम् ॥ १-२९-१३

ज्याला आपण विष म्हणून म्हणतो, तें वास्तविक विष नसून विषय हेंच खरें विष होय. विष प्राशन केलें असतां एकाच देहाचा नाश होतो; परंतु विषयांचें सेवन हें अनेक जन्मांचा नाश करतें.

(१५) ज्ञातज्ञेयस्य मनसो नूनमेतद्धि लक्षणम् ॥
न स्वदन्ते समग्राणि भोगवृन्दानि यत्पुनः ॥ २-२-३

ज्ञेय तत्त्व जाणल्याची म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार झाल्याची हीच खूण आहे कीं, त्या स्थितीनंतर सर्व तऱ्हेच्या विषयोपभोगाबद्दल त्या ज्ञानी पुरुषाला कायमचा वीट येतो.

(१६) तज्ज्ञानं सच शास्त्रार्थस्तद्वैदग्ध्यमनिंदितम् ॥
सच्छिष्याय विरक्ताय साधो यदुपदिश्यते ॥ २-२-२०

विरक्त आणि निर्मल अंतःकरणाच्या शिष्याला आत्मज्ञानाचा उपदेश केला, तरच तें ज्ञान, ती शास्त्रनिपुणता आणि विद्वत्ता खरोखरच शोभायमान होते.

(१७) अशिष्यायाविरक्ताय यत्किंचिदुपदिश्यते ॥
तत्प्रयात्यपवित्रत्वं गोक्षीरश्वदृताविव ॥ २-२-२१

परंतु जें ज्ञान विषयासक्त व अश्रद्धालु अशा माणसाला दिलें जातें, तें चामड्याच्या पिशवींत टाकलेल्या गोरसाप्रमाणें अपवित्र होतें.

(१८) अनंतं समतानन्दं परमार्थं विदुर्बुधाः ॥
स येभ्यः प्राप्यते नित्यं ते सेव्याः शास्त्रसाधवः ॥
२-६-३४

समत्वापासून होणाऱ्या शाश्वत आनंदाला ज्ञाते लोक परमार्थ म्हणतात. या परमार्थाची प्राप्ति शास्त्र आणि सत्पुरुष यांच्या योगानें होते, म्हणून निरंतर त्यांची सेवा करावी.

(१९) अनंतानीह दुःखानि सुखं तृणलवोपमम् ॥ *
नातः सुखेषु बध्नीयात् दृष्टिं दुःखानुबंन्धिषु ॥ २-१३-२३

या जगांत सुख पहावें तर अत्यंत अल्प आहे व दुःख पहावें तर अनंत आहे; यासाठीं परिणामीं दुःख देणाऱ्या विषयसुखाची आस्था बाळगूं नये.

---

* संत तुकाराम महाराजांनीं असेंच म्हटलें आहे:—
सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वता एवढें ॥

(२०) नास्ति चेत्तद्विचारेण दोषः को भवतां भवेत् ॥
अस्ति चेत्तत्समुत्तीर्णा भविष्यथ भवार्णवात् ॥
२-१३-३५

ब्रह्म नाहीं असें जरी असलें तरी त्यासंबंधीं ( अध्यात्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ) विचार केला तर त्यांत तुम्हांला कोणता दोष लागणार आहे ? पण जर कदाचित् त्याचा विचार करितां करितां तें आहे अशी खात्री झाली, तर त्याचें ज्ञान होऊन तुम्ही भवसागरांतून तरून जाल.

(२१) योऽन्तः शीतलतां यातो योऽभावेषु न मज्जति ॥
व्यवहारी न संमूढः सशांत इति कथ्यते ॥ २-१३-७८

ज्याचें अंतःकरण तृप्त आहे, विषयांच्या पश्चात्याप राहूनहि जो विषयासक्त होत नाहीं, आणि व्यवहार करीत असूनहि जो मोह पावत नाहीं, तोच खरा शांत होय.

(२२) कोऽहं कथमयं दोषः संसाराख्यउपागतः ॥
न्यायेनेति परामर्शो विचार इति कथ्यते ॥ २-१४-५०

मी कोण आहे ? व हा संसाररूपी दोष माझ्या ठिकाणीं कसा उत्पन्न झाला आहे ? इत्यादि प्रश्न सोडविण्याकरितां शास्त्रानें सांगितलेल्या मार्गानें चिंतन करणें यालाच विचार असें म्हणतात.

(२३) संतोषः साधुसंगश्च विचारोथ शमस्तथा ॥
एते एव महांभोधावुपायास्तरणे नृणाम् ॥ २-१६-१८

संतोष, सत्संग, विचार आणि शम ( शांति ) हींच काय तीं मनुष्यांना संसारसागरांतून तरून नेणारीं साधनें आहेत.

(२४) संतोषः परमोलाभः सत्संगः परमागतिः ॥
विचारः परमं ज्ञानं शमोहि परमं सुखम् ॥ २-१६-१९

संतोष हा अत्यंत श्रेष्ठलाभ, सत्संग ही परमगति, विचार हें परम ज्ञान आणि शम हेंच परमसुख होय.

(२५) देशे यं सुजनप्राया लोकाः साधुं प्रचक्षते ॥
स विशिष्टः स साधुः स्यात्तं प्रयत्नेन संश्रयेत् ॥३-६-२०

ज्या एकाद्या ठिकाणचे सदाचारनिष्ठ पुरुष ज्याला साधु म्हणून समजतात, असा मनुष्य ज्ञानवैराग्यादि गुणांनीं युक्त असेल तर तो सत्पुरुष आहे असें समजून त्याचा प्रयत्नानें आश्रय करावा.

(२६) अध्यात्मविद्या विद्यानां प्रधानं तत्कथाश्रयम् ॥
शास्त्रं सच्छास्त्रमित्याहुर्मुच्यते तद्विचारणात् ॥
३-६-२१

सर्व विद्यांमध्यें अध्यात्मविद्या श्रेष्ठ असून ज्या शास्त्रामध्यें अध्यात्म विषयक कथा प्राधान्यें करून असतात त्याला सच्छास्त्र असें म्हणतात.

(२७) साधुसंगमसच्छास्त्रपरो भवसि राम चेत् ॥
तद्दिनैरेव नो मासैः प्राप्नोषि परमं पदम् ॥ ३-८-६

सत्पुरुष आणि सच्छास्त्र यांची कांस धरशील तर कांहीं महिन्यांत नव्हे तर काहीं दिवसांतच तूं परमपदाप्रत पोहोंचशील.

(२८) प्रायः परपरित्राणमेव कर्म निजं सताम् ॥ ३-२६-२०
दुसऱ्याचें रक्षण करण्यासाठींच सत्पुरुषांच्या हातून कर्म घडत असतें.

(२९) यन्मुहूर्तः प्रजेशस्य स मनोर्जीवितं मुनेः ॥
जीवितं यद्विरिंचस्य तद्दिनं किल चक्रिणः ॥ ३-६०-२५

मनूच्या सबंध आयुष्याचा काल म्हणजे मननशील प्रजापतीचा एक मुहूर्त होय. ब्रह्मदेवाचें सर्व आयुष्य म्हणजे विष्णूचा एक दिवस होय.

(३०) विष्णोर्यज्जीवितं राम तद्रूपांकस्य वासरः ॥
ध्यानप्रक्षीणचित्तस्य न दिनानि न रात्रयः ॥
३-६०-२६

विष्णूचें संपूर्ण आयुष्य म्हणजे शंकराचा एक दिवस होय. परंतु निर्विकल्प समाधीमध्यें ज्याचें चित्त क्षीण झालें आहे, अशा योग्याला दिवस व रात्र यापैकीं कशाचेंच भान नसतें.

(३१) मूढोत्तारणमेवेह स्वभावो महतामिति ॥ ३-७६-१२

मूढ (अज्ञानी) लोकांचा उद्धार करणें हाच महात्म्यांचा स्वभाव आहे.

(३२) इहामुत्र च नाशाय मूढो दुःखाय जीवति ॥ ३-७७-२०

इहपरलोकीं आपला नाश करून घेण्याकरितां व केवळ दुःख भोगण्याकरितांच मूढ मनुष्य जगत असतो.

(३३) अपश्यतः स्वमात्मानं मृतिर्मूढस्य जीवितम् ॥
मरणेनोदयोऽस्यास्ति पापासंपत्तिहेतुतः ॥ ३-७७-२१

ज्याला आत्म्याचें दर्शन झालें नाहीं अशा मूढाचें मरण म्हणजेच खरें जीवित होय; कारण जिवंतपणीं सुरू असलेल्या पापकर्मांचें आचरण मरणानें बंद पडत असल्यामुळें त्या प्राण्याचा अभ्युदयच होत असतो.

(३४) प्रभुत्वं समदृष्टित्वं तच्च स्याद्राजविद्यया ॥
तामेव यो न जानाति नासौ मंत्री न सोऽधिपः ॥ ३-७८-४१

प्रभुत्व हें समदृष्टीपासून उत्पन्न होत असतें आणि समदृष्टि राजविद्येच्या (अध्यात्मविद्येच्या) योगानें प्राप्त होत असते. अर्थात् ही राजविद्या जो जाणीत नाहीं, तो खरा राजा नव्हे आणि तो खरा मंत्रीहि नव्हे.

(३५) मनोहि जगतां कर्तृ मनोहि पुरुषः परः ॥
मनःकृतं कृतं लोके न शरीरकृतं कृतम् ॥ ३-८९-१

मन हेंच अखिल जगांचा कर्ता आहे. मन म्हणजेच परम पुरुष आहे. ह्या लोकांत जें मनानें केलें जातें, तेंच खरें कर्म असून केवल शरीरानें जें केलें जातें तें खरें कर्म नव्हे.

(३६) कर्मेंद्रियैर्यत्क्रियते तद्रोद्धुं किल युज्यते ॥
न मनोनिश्चयकृतं कश्चिद्रोधयितुं क्षमः ॥ ३-८८-१८

जें कर्म कर्मेंद्रियांनीं केलें जातें, त्याचा नाश करणें शक्य आहे. पण मनाच्या निश्चयानें जें केलें जातें, त्याचा नाश करण्याला कोणीहि समर्थ नाहीं

(३७) यो बद्धपदतां यातो जंतोर्मनसि निश्चयः ॥
स तेनैव विना ब्रह्मज्ञान्येन विनिवार्यते ॥ ३-८८-१९

प्राण्यांच्या चित्तांत जो निश्चय एकदां दृढमूल झाला, त्याचें निवारण करण्याचें काम त्याच्यावाचून दुसऱ्या कोणालाहि करतां येणें शक्य नाहीं.

(३८) समकालप्रयुक्तेन सहसा दंडराशिना ॥
धीरं मनो भेदयितुं मनागपि न शक्यते ॥ ३-८९-३७

( शासनांचा अंमल शरीरावर होऊं शकतो ) परंतु कोणत्याहि विषयाच्या भावनेमध्यें स्थिर झालेल्या मनावर कोणतींहि शासनें आपला पगडा बसवूं शकत नाहींत.

(३९) एककार्यनिविष्टं हि मनो धीरस्य भूपते ॥
न चाल्यते मेरुरिव वरशापबलैरपि ॥ ३-८९-४८

एका कार्यामध्यें प्रविष्ट झालेल्या धीर पुरुषाच्या मनाला वर किंवा शाप मेरुपर्वताप्रमाणें चाळवूं शकत नाहींत.

(४०) देहोहि वरशापाभ्यामन्यत्वामिव गच्छति ॥
ननु धीरं मनो राजन्विजिगीषुतया स्थितम् ॥३८-९-४९

वर शापाचें परिणाम देहावर होतात, परंतु धैर्यशाली मन केव्हांहि अजिंक्यच आहे.

(४१) अपश्यन्काष्ठरन्ध्रस्य वृषणाक्रमणं यथा ॥
कीलोत्पाटी कपिर्दुःखमेतीदं हि तथा मनः ॥ ३-९९-४१

लाकडामध्यें ठोकलेली पाचर उपटणाऱ्या एखाद्या अविचारी वानराचा वृषण फटीमध्यें सांपडून तो मूर्ख वानर जसा संकटांत सांपडतो; त्याप्रमाणें नेहमीं कांहींना कांहीं उलाढाली करण्यांत दंग झालेलें चंचल मन दुःख भोगीत असतें.

(४२) ईप्सितावेदनाख्यात्तु मनःप्रशमनादृते ॥
गुरूपदेशशास्त्रार्थमंत्राद्या युक्तयस्तृणम् ॥ ३-१११-१४

इष्ट वस्तुविषयीं वैराग्य उत्पन्न होऊन मन शांत झाल्याशिवाय गुरुपदेश, शास्त्रार्थ, मंत्र इत्यादि युक्त्या व्यर्थ होत.

(४३) मनएव समर्थं वो मनसो दृढनिग्रहे ॥
अराजा कःसमर्थः स्याद्राज्ञो राघव निग्रहे ॥ ३-११-२१९

तुमच्या मनाचा दृढनिग्रह करण्याला तुमचें मनच समर्थ आहे. हे रामा ! राजाचा निग्रह करण्याला जो राजा नाहीं, असा कोणता सामान्य मनुष्य समर्थ होईल.

(४४) इच्छामात्रमविद्येह तन्नाशोमोक्ष उच्यते ॥
सचासंकल्पमात्रेण सिद्धो भवति राघव ॥ ३-११४-७

इच्छा हेंच अविद्येचें स्वरूप आहे, इच्छेचा नाश करणें ह्या स्थितीलाच मोक्ष म्हणतात. हा मोक्ष संकल्प न केल्यानेंच सिद्ध होत असतो.

(४५) नाहं ब्रह्मेति संकल्पात्सुदृढाद्बध्यते मनः ॥
सर्वं ब्रह्मेति संकल्पात्सुदृढान्मुच्यते मनः ॥ ३-११४-२३

" मी ब्रह्म नाहीं " अशा दृढसंकल्पानें मन बद्ध होतें आणि ' सर्वच ब्रह्म आहे ' अशा संकल्पानें तें मुक्त होतें.

(४६) संकल्पः परमो बंधस्त्वसंकल्पो विमुक्तता ॥ ३-११४-४४
संकल्प हें परम बंधन असून सकल्प न करणें हाच खरा मोक्ष आहे:—

(४७) शास्त्रसत्संगमाभ्यासात्सविवेको जितेंद्रियः ॥
अत्यंताभावमेतस्य दृश्यस्याप्यवगच्छति ॥ ४-४-२

अध्यात्मशास्त्र आणि सत्संग यांच्या योगानें मनुष्याच्या मनांत विवेक जागृत होतो, विवेकाच्या योगानें इंद्रियांना जिंकतां येतें, आणि एकदां मनुष्य जितेंद्रिय बनला म्हणजे तो या सर्व दृश्य जगाचा अत्यंताभाव (म्हणजे मुळींच नाहीं ) अशा अनुभवाप्रत जाऊन पोहोंचतो .

(४८) सर्वेषामेव देहानां सुखदुःखार्थभाजनम्
शरीरं मन एवेह न तु मांसमयं मुने ॥ ४-१३-८.

या जगांतील सर्व जीवांना सुखदुःखाचे भोग देण्याला कारणीभूत हें मन आहे. मांसमय शरीर कारणीभूत नाहीं. (देहानां तदात्मतापन्नजीवानाम्)

(४९) स्वया वासनया लोको यद्यत्कर्म करोति यः ॥
स तथैव तदाप्नोति नेतरस्येह कर्तृता ॥ ४-१३-११

जगामध्यें आपल्या वासनेप्रमाणें लोक जें जें कर्म करितात, त्या त्या कर्माचेंच फळ ते भोगतात, त्यांत इतरांच्या कर्तृत्वाचा मुळींच संबंध नाहीं.

(५०) विचारः सफलस्तस्य विज्ञेयो यस्य सन्मतेः ॥
दिनानुदिनमायाति तानवं भोगगृध्नुता ॥ ४-१८-६५

चांगली बुद्धि असलेल्या ज्या पुरुषाचा विषयोपभोगांचा लोभ दिवसेंदिवस कमी होत असतो, त्याचाच आत्मविषयक विचार सफल होतो.

(५१) चित्रामृतं नामृतमेवविद्धि
चित्रानलं नानलमेवविद्धि ॥
चित्रांगना नूनमनंगनेति
वाचा विवेकस्त्वविवेक एव ॥ ४-१८-६९

तोंडाच्या बडबडींत मात्र विवेक पण अंतर्यामीं त्याचा गंधहि नाहीं, असें असेल तर चित्रांतील अमृत, अग्नि व स्त्री याप्रमाणें असल्या वाचिक विवेकाचा काडीमात्र उपयोग नाहीं.

(५२) परिज्ञातोपभुक्तोहि भोगो भवति तुष्टये ॥
विज्ञाय सेवितो मैत्रीमेति चोरो न शत्रुताम् ॥ ४-२३-४१

अमुक चोर आहे असें पक्कें ज्ञान झाल्यावर त्याच्याशीं केलेली मैत्री उपद्रव करूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें विषयांचें वास्तविक स्वरूप ओळखून त्यांचें यथाप्राप्त सेवन करणाराला ते उपद्रव करूं शकत नाहींत.

(५३) हस्तं हस्तेन संपीडय दंतैर्दंतान्विचूर्णयेत् ॥
अंगान्यंगैरिवाक्रम्य जयेदिंद्रियशात्रवान् ॥ ४-२३-५८

हातावर हात चोळून, दातांनीं दांत चावून व अंगांनीं अंगांना आवळून, अर्थात् पाहिजे तेवढे प्रयत्न करून या इंद्रियशत्रूंना जिंकावें.

(५४) न तथा सुखिता भूपा मृन्मयोग्रपुरीजुषः ॥
यथा स्वाधीनमनसः स्वशरीरपुरीश्वराः ॥ ४-२४-७

ज्यांनीं आपलें मन आपल्या ताब्यांत ठेवलें आहे, अशा आत्मसंयमी पुरुषांना शरीररूपी नगरीमध्यें जें सुख प्राप्त होतें, तसलें सुख मातीचें प्रचंड बांधकाम करून त्यांत राहणाऱ्या राजांनाहि प्राप्त होत नाहीं !

(५५) यस्यांतर्वासनारज्वा ग्रंथिबंधः शरीरिणः ॥
महानपि बहुज्ञोऽपि स बालेनाऽपि जीयते ॥ ४-२७-२०

जो पुरुष आंत वासनारूपी दोरीनें बद्ध झालेला असतो, तो कितीहि सामर्थ्यवान् असो किंवा पंडित असो, प्रसंगीं लहान पोराकडूनहि पराजित होतो.

(५६) आस्थामात्रमनंतानां दुःखानामाकरं विदुः ॥
अनास्थामात्रमभितः सुखानामाकरं विदुः ॥
४-२७-२५

आस्था हीच अनंत दुःखांची जननी आहे; व अनास्था—आसक्ति-रहित स्थिति-हीच सर्व सुखांची खाण आहे.

(५७) येषां गुणेष्वसंतोषो रागो येषां श्रुतं प्रति ॥
सत्यव्यसनिनो ये च ते नराः पशवो परे ॥ ४-३२-४३

ज्यांचा हवरेपणा सद्गुणाविषयीं आहे, ज्यांना प्रेम अध्यात्म श्रवणाचें आहे आणि व्यसन सत्याचें आहे, तेच खरोखर मनुष्य होत; इतर लोक केवळ पशुतुल्य होत.

(५८) अनर्थायार्थसंपत्तिर्भोगौघो भवरोगदः ॥
आपदः संपदः सर्वाः सर्वत्रानादरोजयः ॥ ४-३२-५८

संपत्तीरूपी अर्थ हे अनर्थच आहेत, नानाविध भोग हे भवरोगच आहेत, आणि सर्व प्रकारच्या संपत्ती ह्या आपत्तीच आहेत ! यास्तव या सर्वांचा अनादर करणें हाच खरा जय आहे.

(५९) लोभमोहरुषां यस्य तनुतानुदिनं भवेत् ॥
यथाशास्त्रं विहरति स्वस्वकर्मसु सज्जनः ॥ ४-३३-१५

ज्यांचे लोभ, मोह, क्रोध हे दोष प्रत्यहीं क्षीण होत चालले आहेत आणि जे आपलीं कर्मे यथाशास्त्र करण्यांत मग्न झाले आहेत, ते सज्जन होत.

(६०) मनसोऽभ्युदयोनाशो मनोनाशो महोदयः ॥
ज्ञमनोनाशमभ्येति मनोऽज्ञस्य विवर्धते ॥ ४-३५-१८

मनाचा अभ्युदय हाच त्याचा नाश आणि मनाचा नाश हाच त्याचा अभ्युदय होय. ज्ञानी मनुष्याचें मन नाश पावतें आणि अज्ञानी मनुष्याचें मन पुष्ट होतें.

( हाच श्लोक मुक्तिकोपनिषदांत 'विवर्धते' या पदाऐवजीं 'हि शृंखला' इतक्या पाठभेदानें आलेला आहे. अ. २-३९ )

(६१) आदौ शमदमप्रायैर्गुणैः शिष्यं विशोधयेत् ॥
पश्चात्सर्वमिदं ब्रह्म शुद्धस्त्वमिति बोधयेत् ॥ ४-३९-२३

शम दम वगैरे गुण शिष्याच्या ठिकाणीं प्रथम निर्माण होतील व त्याची बुद्धि शुद्ध होईल अशा तऱ्हेनें प्रथम त्याला उपदेश करून नंतर हें सर्व ब्रह्म आहे, व तूंहि शुद्ध ब्रह्म आहेस, असा त्याला उपदेश करणें योग्य आहे.

(६२) अपरीक्ष्य च यःशिष्यं प्रशास्त्यतिविमूढधीः ॥
स एव नरकं याति यावदाभूतसंप्लवम् ॥ ४-३९-२६.

शिष्याची परीक्षा न करितां आणि त्याची योग्यता न जाणतां जो गुरु त्याला ज्ञानोपदेश करितो, तो चिरकाल नरकवासाचें दुःख भोगितो.

(६३) अनागतानांभोगानामवांछनमकृत्रिमम् ॥
आगतानां च संभोग इति पंडितलक्षणम् ॥ ४-४६-८.

अप्राप्त विषयांची स्वाभाविक इच्छा नसणें आणि प्राप्त विषयांचा उपभोग घेणें हेंच पंडिताचें लक्षण आहे.

(६४) नष्टं नष्टमुपेक्षस्व प्राप्तं प्राप्तमुपाहर ॥ ४-४६-७.

जें जें नाश पावलें असेल त्याची उपेक्षा कर आणि प्रारब्धानें जें जें प्राप्त होईल त्याचा अंगिकार कर.

(६५) जीवन्मुक्ता महात्मानो नित्यतृप्तामहाधियः ॥
आचारस्तुर्गतव्या न भोगकृपणाः शठाः ॥ ४-४६-२५.

नित्यतृप्त आणि महाबुद्धिमान् अशा महात्म्या जीवन्मुक्तांचें तूं अनुकरण कर; केवळ भोगेच्छेनें परवंचक बनलेल्या मूर्खांचें अनुकरण करूं नकोस.

(६६) अवश्यभाव्यस्तमयो जातस्याहर्पतेरिव ॥ ४-४८-२७

सूर्याचा उदय झाला म्हणजे त्याचा अस्त व्हावयाचा हा नियम जसा ठरलेला आहे, तसा जो प्राणी जन्माला आला तो केव्हां तरी मरणारच.

(६७) जायते जीव्यते पश्चादवश्यं च विनश्यति ॥ ४-४८-२५.

उत्पन्न होऊन जगणें, हें जसें सृष्टींतील एक कार्य आहे, तसेंच शेवटीं मरणें हेंहि एक अवश्य कार्य आहे.

(६८) ये केचन समारम्भा ये जनस्य क्रियाक्रमाः ॥
ते सर्वे देहमात्रार्थमात्मार्थे न तु किंचन ॥ ४-५७-३१.

बाह्य विषयांवर दृष्टि ठेवणारे लोक सर्व वैदिक किंवा लौकिक कर्में केवळ देहाच्या सुखासाठीं करीत असतात; परंतु आत्मज्ञानासाठीं मुळींच प्रयत्न करीत नाहींत.

(६९) भूयोभूयः परामृष्टं हृदये सुनियोजितम् ॥
प्रयोजनं फलत्युच्चे नहेलाहतसंस्थितेः ॥ ५-४-२७.

तत्त्वोपदेश श्रवण केल्यानंतर त्याचें वारंवार मनन केलें तरच तो फलद्रूप होतो, तोच उपदेश अनादरानें श्रवण करणाऱ्या व मनन न करणाऱ्या मूढाच्या पदरांत ऐकण्याच्या श्रमाशिवाय दुसरें कांहींहि पडत नाहीं.

(७०) त्यागो न युक्त इह कर्मसु नापि रागः ॥ ५-५-५४.

अवश्य प्राप्त कर्मांचा त्याग करणें व त्यांविषयीं आसक्ति ठेवणें हीं दोन्ही युक्त नव्हेत.

(७१) संसार एव दुःखानां सीमान्त इति कथ्यते ॥
तन्मध्ये पतिते देहे सुखमासाद्यते कथम् ॥ ५-९-५२.

संसार म्हणजे दुःखाची पराकाष्ठा असें सत्पुरुष सांगतात. तेव्हां अशा संसारांत पडलेल्या देहामध्यें असतांना सुखप्राप्ति कोठून होणार !

(७२) न कालमतिवर्तन्तो महान्तः स्वेषु कर्मसु ॥ ५-१०-९

मोठीं माणसें आपल्या कर्तव्यकर्माविषयीं केव्हांहि कालातिक्रम होऊं देत नाहींत.

(७३) भविष्यं नानुसंधत्ते नातीतं चिन्तयत्यसौ ॥
वर्तमाननिमेषं तु हसन्नेवानुवर्तते ॥ ५-१२-१४.

तत्त्वज्ञानी भावी गोष्टींची चिंता वहात नसतो आणि गत गोष्टींचें स्मरण करीत नसतो, तसेंच वर्तमानकाळीं सर्व व्यवहार आनंदानें करीत असतो.

(७४) जडत्वान्निःस्वरूपत्वात्सर्वदैव मृतं मनः ॥
मृतेन मार्यते लोकश्चित्रेयं मौर्ख्यचक्रिका ॥ ५-१३-१००.

मन हें जड आणि निःस्वरूप असल्यामुळें सर्वदा मेलेलेंच आहे. परंतु या मृत मनाकडून अनेक लोक मारले जातात, ही मूर्ख परंपरा विचित्रच म्हणावयाची.

(७५) भावाद्वैतमुपाश्रित्य सत्ताद्वैतमयात्मकः ॥
कर्माद्वैतमनादृत्य द्वैताद्वैतमयो भव ॥ ५-१७-२९.

आतून अद्वैतपर रहा व बाह्यतः कर्मामध्यें द्वैतपर रहा. अशा तन्हेनें ब्रह्माप्रमाणें द्वैताद्वैतमय होऊन रहा ( कारण व्यवहार कालींसुद्धां तूं अद्वैतपर राहू लागलास तर जगत् व्यवस्था आणि धर्मशास्त्रादि आचारशास्त्रें यांना बाध येईल. )

(७६) अंतर्नैराश्यमादाय बहिराशोन्मुखेहितः ॥
बहिस्तप्तोऽन्तरा शीतो लोके विहर राघव ॥ ५-१८-२१.

हे राघवा ! आंतून निराश रहा, पण बाहेरून आशावान् असल्यासारखा उद्योग कर, तसेंच धनादिकांचा नाश झाला असतां आंतून शांत रहा, पण बाह्यतः संतप्त असल्याप्रमाणें वर्तन ठेव.

(७७) अंतः संत्यक्तसर्वाशो वीतरागो विवासनः ॥
बहिः सर्वसमाचारो लोके विहर राघव ॥ ५-१८-१८

हे रामा ! अंतःकरणांतील सर्व आशा, विषयप्रेम व वासना यांना पार झुगारून दे, आणि बाह्यतः सर्व लोकव्यवहार करीत जा.

(७८) न स्वधैर्यादृते कश्चिदभ्युद्धरति संकटात् ॥ ५-२१-१०

स्वतःच्या धैर्यावाचून आपणांला संकटांतून कोणीहि पार पाडणार नाहीं.

(७९) विषयान्प्रति भोः पुत्र सर्वानेव हि सर्वथा ॥
अनास्था परमा ह्येषा सा युक्तिर्मनसो जये ॥ ५-२४-१७

हे पुत्रा ! सर्व विषयासंबंधानें पूर्णपणें अनास्था असणें हीच मनोजयाची सर्वोत्कृष्ट युक्ति आहे.

(८०) राजन्यावदयं देहस्तावन्मुक्तधियामपि ॥
यथा प्राप्तक्रियात्यागो रोचते न स्वभावतः ॥ ५-२६-१६

जोंपर्यंत हा देह आहे, तोपर्यंत जीवन्मुक्त पुरुषांनाहि आपल्या यथाप्राप्त क्रियांचा त्याग करणें स्वभावतःच आवडत नाहीं.

(८१) अविष्णुः पूजयन्विष्णुं न पूजाफलभाग्भवेत् ॥
विष्णुर्भूत्वा यजेद्विष्णुमयं विष्णुरहं स्थितः ॥ ५-३१-४०

स्वतः भावनेनें विष्णु न होतां विष्णूची पूजा करणाराला विष्णुपूजेचें फल मिळविण्याला तद्रूप झालें पाहिजे; अर्थात् मनुष्यानें विष्णु होऊनच विष्णूचें पूजन केलें पाहिजे. प्रऱ्हाद म्हणतो, 'वास्तव हा मी स्वतःच विष्णु झालों आहे.'*

(८२) अस्तिचेदिंद्रियाक्रांतिः किं प्राप्यं पूजनैः फलम् ॥
नास्तिचेदिंद्रियाक्रांतिः किं प्राप्यं पूजनैःफलम् ॥ ५-४३-२२

इंद्रियजय असेल तर पूजनाचें निराळें फल तें कोणतें मिळावयाचें राहिलें ? बरें, इंद्रियाना जिंकण्याचें काम होत नसेल, तर पूजनापासून तरी कोणतें फल प्राप्त होणार आहे ?

---

* अशाच अर्थाचा श्लोक विष्णु पुराणामध्यें आला आहे.
" नाविष्णुः पूजयेद्विष्णुं नाशिवः पूजयेच्छिवः ॥ "

(८३) गुरुश्चेदुद्धरत्यज्ञमात्मीयात्पौरुषादृते ॥
उष्ट्रं दान्तं बलीवर्दं तत्कस्मान्नोद्धरत्यसौ ॥ ५-४३-२६

शिष्यानें स्वतः प्रयत्न केला नसतांहि जर गुरु त्याचा अज्ञानांतून उद्धार करूं शकतात, तर वठणीस आणलेल्या उंट, बैल इत्यादि पशूंनासुद्धां त्या गुरूनें आत्मज्ञानी केलें असतें.

(८४) न स्वकर्म विना श्रेयः प्राप्नुवन्तीह मानवः ॥ ५-४८-६९

स्वकर्माचें अनुष्ठान केल्याशिवाय मनुष्यांना या जगांत श्रेयःप्राप्ति होत नाहीं.

(८५) धीमन्तो न विषेवन्ते पर्यन्ते दुःखदां क्रियाम् ॥ ५-५२-८

ज्या कृत्याचा परिणाम दुःखदायक होणार, असें कृत्य करण्याला विचारी लोक केव्हांच तयार होत नाहींत.

(८६) कुरङ्गालिपतङ्गेभमीनास्त्वेकैकशो हताः ॥
सर्वैर्युक्तैरनर्थैस्तु व्याप्तस्याज्ञ कुतः सुखम् ॥ ५-५२-२१

हे अज्ञानी चित्ता ! शब्दस्पर्शादि विषय इतके अनर्थकारक आहेत कीं, एकेका विषयामध्यें आसक्त होणारे हरिण, भ्रमर, पतंग, हत्ती आणि मासा हे जीव घात करून घेतात. पांचहि विषयांमध्यें रममाण होणाऱ्या मनुष्यावर सर्व तऱ्हेचे अनर्थ कोसळतील यांत नवल काय ! त्याला सुख कोठून मिळणार ?

(८७) अन्तः शीतलता या स्यात्तदनन्ततपः फलम् ॥ ५-५६-९

अंतःकरण शांत असणें, हें अनंत तपाचें फल होय.

(८८) अन्तस्तृष्णोपतप्तानां दावदाहमयं जगत् ॥
भवत्यखिलजन्तूनां यदन्तस्तद्बहिः स्थितम् ॥ ५-५६-३४

तृष्णेमुळें अंतःकरण संतप्त झालेल्या लोकांना हें जग वणवा लागल्यासारखें दिसतें. कारण जें मनुष्याच्या मनांत असतें, तेंच त्याच्या दृष्टीला बाह्य जगांत दिसतें.

(८९) आत्मवत्सर्वभूतानि परद्रव्याणि लोष्ठवत् ॥
स्वभावादेव न भयाद्यः पश्यति स पश्यति ॥ ५-५६-४९.

जो सर्व भूतांना आपल्यासारखे मानतो आणि भयामुळें नव्हे, तर स्वभावतःच परद्रव्याला मातीच्या ढेकळांप्रमाणें समजतो, तोच खरा तत्त्ववेत्ता होय.

(९०) यावत्सर्वं न संत्यक्तं तावदात्मा न लभ्यते ॥
सर्वावस्थापरित्यागे शेष आत्मेति कथ्यते ॥ ५-५८-४४.

जोंपर्यंत मनानें सर्व विषयांचा पूर्णपणें त्याग केला नाहीं, तोंपर्यंत कोणालाहि आत्मप्राप्ति होणार नाहीं. कारण मनाच्या सर्व अवस्थांचा त्याग झाल्यानंतर अवशिष्ट राहणारा तोच आत्मा असा सिद्धान्त आहे.

(९१) परमपदप्रतिमोहि साधुसंगः ॥ ५-६१-४८

सत्पुरुषांच्या सहवासापासून जें सुख प्राप्त होतें, त्याची किंमत प्रत्यक्ष मोक्षसुख प्राप्त होण्याइतकी श्रेष्ठ आहे.

(९२) तत्त्वावबोधो भगवन्सर्वाशातृणपावकः ॥
प्रोक्तः समाधिशब्देन न तु तूष्णीमवस्थितिः ॥ ५-६२-८

आत्मतत्त्वाचा बोध हा सर्व आशारूपी तृणाला दग्ध करून टाकणारा अग्नि असून समाधि शब्दाचा अर्थहि असाच आहे. समाधि ( सम + आ + धा ) म्हणजे 'आत्मस्वरूपीं स्थिर असणें' असाच अर्थ ज्ञाते पुरुष करितात. नुसतें स्वस्थ बसणें म्हणजे समाधि असा अर्थ कोणीहि करीत नाहींत.

(९३) अनुभूतिं विना राम खंडादेर्नानुभूयते ॥
अनुभूतिं विना रूपं नात्मनश्चानुभूयते ॥ ५-६४-४३

ज्याप्रमाणें खडीसाखरेची गोडी माहीत नसलेल्या माणसानें ती खाल्ल्याशिवाय तिच्या गोडीचें ज्ञान होत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्याच्या परमार्थ-स्वरूपाचें ज्ञान स्वानुभवावांचून होणें शक्य नाहीं.

(९४) अन्तःसंसक्तिरेवैकं कारणं बन्धमोक्षयोः ॥ ५-६७-३४

अंतःकरणामध्यें विषयाविषयीं आसक्ति असणें व नसणें हेंच बंध आणि मोक्ष यांचें मुख्य कारण होय.

(९५) यथा न किंचित्कलयन्मञ्चके स्पन्दते शिशुः ॥
तथा फलान्यकलयन्कुरु कर्माणि राघव ॥ ५-७०-२०

हे रामा ! एखादें लहान बालक कोणत्याहि तऱ्हेचा संकल्प न करितां आनंदानें पलंगावर लोळत असतें; त्याप्रमाणें कर्मफलाचा मुळींच विचार न करितां तूं आपलीं प्राप्तकर्मे करीत जा.

(९६) न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले ॥
मोक्षोहि चेतो विमलं सम्यग्ज्ञानविबोधितम् ॥५-७३-३५

मोक्ष हा कांहीं कोठें आकाशांत, पाताळांत किंवा पृथ्वीवर आहे असें नाहीं, तर योग्य तऱ्हेचें ज्ञान होऊन झालेली मनाची निर्मल स्थिति म्हणजेच मोक्ष होय.

(९७) अपि राज्यादपि स्वर्गादपींदोरपि माधवात् ॥
अपि कांतासमासंगान्नैराश्यं परमं सुखम् ॥ ५-७४-४४

राज्य, स्वर्ग किंवा चंद्रमंडळ, तसेंच वैकुंठाधिपती विष्णु किंवा सुंदर कांता यांच्या समागमापासून जें सुख कालत्रयींहि प्राप्त होणार नाहीं, अशा तऱ्हेचें परमसुख नैराश्यापासून प्राप्त होतें.

(९८) सत्यां प्रज्ञामहानावि विवेके सति नाविके ॥
संसारसागरादस्माद्यो न तीर्णोधिगस्तु तम् ॥५-७६-१३

बुद्धिरूपी मोठी नौका व विवेकरूपी नावाडी असता या संसारसागराच्या पैलतीराला जो जात नाहीं त्याचा धिक्कार असो.

(९९) सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः ॥
संयोगा विप्रयोगान्ताः सर्वे संसारवर्त्मनि ॥ ५-८६-५५

या संसारांत सर्व संग्रहांचा शेवटीं नाश होतो, उंचावर चढलेले अखेरीस पतन पावतात, आणि ज्यांचा संयोग झाला असेल, त्या सर्वांचा शेवटीं वियोग होतो.

(१००) सर्वज्ञोऽपि बहुज्ञोऽपि माधवोऽपि हरोऽपि च ॥
अन्यथा नियतिं कर्तुं न शक्तः कश्चिदेव हि ॥ ५-८९-२६

कोणी एखादा सर्वज्ञ असो, बहुज्ञ असो, स्वतः भगवान् विष्णु असो, किंवा शंकर असो, नियतीला म्हणजे सृष्टिनियमाला बदलण्यास कोणीहि समर्थ नाहीं.

(१०१) जन्मान्तरशताभ्यस्ता राम संसारसंस्थितिः ॥
सा चिराभ्यासयोगेन विना न क्षीयते क्वचित् ॥ ५-९२-२३

संसारस्थितीचा अभ्यास मागील शेंकडों जन्मांत झालेला आहे. त्यामुळें दीर्घकाल साधनांचा अभ्यास केल्यावांचून संसारस्थिति क्षीण होणार नाहीं.

(१०२) ज्ञानवानेव सुखवान् ज्ञानवानेव जीवति ॥
ज्ञानवानेव बलवांस्तस्माज्ज्ञानमयो भव ॥ ५-९२-४९

जो ज्ञानी असतो, तोच खरा सुखी, तोच खरा जिवंत आणि तोच बलवान् असतो, म्हणून तूं ज्ञानी हो.

(१०३) रागद्वेषविकाराणां स्वरूपं चेन्न भाव्यते ॥
ततः सन्तोप्यसद्रूपाः सेविता अप्यसेविताः ॥ नि. पू. ३-१८

राग, द्वेष व त्यांचे कार्यरूप विकार यांच्या स्वरूपाचा जर विचार केला नाहीं तर संत म्हणून प्रसिद्ध असलेलेहि असंत ठरतात. त्यामुळें त्यांचें सेवन जरी केलें तरी तें वृथा होतें.

(१०४) वासनायास्तथा वह्नेर्ऋणव्याधिद्विषामपि ॥
स्नेहवैरविषाणां यः शेषः स्वल्पोपि बाधते ॥ नि. पू. १०-२१

वासना, अग्नि, ऋण, व्याधि, शत्रु, स्नेह, वैर, व विष यांचा अत्यंत थोडा अवशेषहि फार पीडा देतो.

(१०५) दीपहस्तोयथाऽभ्येति तमोरूपदिदृक्षया ॥
तथा विलीयन्ते सर्वं तमस्तापर्यृतं यथा ॥ नि. पू. १०-३४

हातांत दिवा घेऊन जर कोणी अंधकाराला पहावयास गेला तर ऊष्णतेनें तूप जसें विरघळतें तसा सर्व अंधार नाहींसा होतो; त्याप्रमाणें ज्ञानानें अविद्येसह सर्व जगत् क्षीण होतें.

(१०६) अज्ञस्य दुःखौघमयं ज्ञस्यानंदमयं जगत् ॥
अंधं भुवनमंधस्य प्रकाशं तु सचक्षुषः ॥
नि. पू. ११-३२ व ३३

अज्ञानी माणसाला जगत् दुःखरूप भासतें व ज्ञानी माणसाला सुखरूप भासतें. आंधळ्याला सर्व जग अंधळें वाटतें व डोळसाला तें प्रकाशरूप वाटतें.

(१०७) आपातमात्ररम्येभ्यो भोगेभ्यः किमवाप्यते ॥
सत्सङ्गचिन्तामणितः सर्वसारमवाप्यते ॥
नि. पू. २०-३५

विचार करीपर्यंतच रम्य वाटणाऱ्या भोगापासून काय मिळणार ? पण सत्संगरूपी चिंतामणीपासून सर्वांमध्यें श्रेष्ठ असलेलें पद प्राप्त होतें.

(१०८) आज्ञाचरणमेवाहुर्मुख्यमाराधनं सताम् ॥
नि. पू. २३-४

संताच्या आज्ञेप्रमाणें अनुवर्तन करणें हेंच त्यांचें मुख्य आराधन होय.

(१०९) अन्येन रचितो देहो यक्षेणान्येन संश्रितः ॥
दुःखमन्यस्य भोक्तान्यश्चित्रेयंमौर्ख्यचक्रिका ॥
नि. पू. २९-८१

मनानें देहाला रचलें आहे. त्याचा अहंकाररूपी राक्षसानें आश्रय केला आहे. दुःख हा मनाचा धर्म आहे. पण जीव त्याचा उपभोग घेतो ! अशी ही मूर्खपणाची परंपरा अतिशय आश्चर्यकारक आहे.

(११०) पूजनं ध्यानमेवान्तर्नान्यदस्त्यस्य पूजनम् ॥
तस्मात्त्रिभुवनाधारं नित्यं ध्यानेन पूजयेत् ॥ नि. पू. ३८-६

परमेश्वराचें अंतःकरणांत ध्यान करणें हेंच त्याचें मुख्य पूजन होय. त्याहून दुसरें पूजन नाहीं. यासाठीं त्रिभुवनाचा आधार जो परमात्मा, त्याचें ध्यानाच्या योगानें नेहमीं पूजन करावें.

(१११) नष्टं नष्टमुपेक्षेत प्राप्तं प्राप्तमुपाहरेत् ॥
निर्विकारतयैतद्धि परमार्चनमात्मनः ॥ नि. पू. ३९-४४

जें जें नष्ट झालें असेल त्याची उपेक्षा करावी आणि जें जें यदृच्छेनें प्राप्त होईल त्याचा स्वीकार करावा व ह्या दोन्ही गोष्टी निर्विकार चित्तानें करणें हेंच आत्म्याचें श्रेष्ठ पूजन होय.

(११२) शास्त्रार्थैर्बुध्यते नात्मा गुरोर्वचनतो न च ॥
बुध्यते स्वयमेवैष स्वबोधवशतस्ततः ॥ नि. पू. ४१-१५

आत्मा शास्त्रार्थांनीं जाणला जात नाहीं व गुरूच्या उपदेशानेंहि जाणला जात नाहीं, तर तो स्वतःच आपल्या बोधाच्या बळानेंच जाणला जातो.

(११३) गुरुशास्त्रार्थशिष्याणां चिरसंयोगसत्तया ॥
अहर्नीव जनाचार आत्मज्ञानं प्रवर्तते ॥ नि. पू. ४१-१७

गुरु, शास्त्र व शिष्य यांचा चिरकाल संयोग झाला असतां दिवसा जसा जीवांचा व्यवहार होतो, तसें आत्मज्ञान प्राप्त होतें.

(११४) यादृगाद्यंतयोर्वस्तु तादृगेव तदुच्यते ॥
मन्ये यस्य यदन्यत्वं तदबोधाद्विजृंभितम् ॥ नि.पू. ४९-७

जी वस्तु उत्पत्तीपूर्वी व नाशानंतर जशी असते तशीच ती सांगितली जाते आणि त्या वस्तूचें मध्यें जें निराळे स्वरूप भासतें तें अज्ञानामुळेंच होय.

(११५) गुरुस्त्वैव बोधयित्वैष जीव आत्मनि योज्यते ॥
यद्युक्त्या साध्यते कार्यं न तद्यत्नशतैरपि ॥ नि.पू. ४९-१९

युक्तीनेंच बोध करून या जीवाला आत्मप्राप्ति करून द्यावी लागते, कारण जें कार्य युक्तीनें साधतें, तें शेकडों प्रयत्नांनींहि साधत नाहीं.

(११६) युक्त्या प्रबोध्यते मूढः प्राज्ञस्तत्त्वेन बोध्यते ॥

नि. पू. ४९-२१

मूढाला युक्तीनें बोध करावा लागतो व जाणत्याला तत्त्व सांगून बोध करावा लागतो.

(११७) इतो नाभिमताः सर्वे ह्यस्य भोगाः स्वभावतः ॥
भवंति कोऽतितृप्तोहि दुरन्नं किल वांछति ॥

नि. पू. ५९-३०

ज्ञानी पुरुषाला स्वभावतःच कोणताहि भोग भोगणें मान्य नसतें; कारण जो मिष्टान्नानें अतिशय तृप्त झालेला असतो तो कदन्नाची इच्छा कधी करील ?

(११८) सुविरागचमत्कारविचारकणिकोद्‌भूत् ॥
वयस्यपि च तारुण्ये दैवाद्वल्ली मराविव ॥

नि. पू. ७४-३४

केवळ दैवानेंच मारवाडदेशांत जशी वेल उगवावी त्याप्रमाणें भर तारुण्यांत वैराग्ययुक्त विचाराचा लेश उत्पन्न झाला.

(११९) येन प्राप्तेन लोकेस्मिन्न प्राप्यमवशिष्यते ॥
तत्कृतं सुकृतं मन्ये शेषं कर्मविषूचिका ॥

नि. पू. ७४-१७

जें प्राप्त झालें असतां या लोकांत कांहीं अधिक प्राप्य अवशिष्ट रहात नाहीं, तेंच करणें याला मी सुकृत समजतों.

(१२०) उपदेशक्रमोराम व्यवस्थामात्रपालनम् ॥
ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव राघव ॥

नि. पू. ८३-१३.

हे रामा ! उपदेश करणें हें केवळ शास्त्रीय व्यवस्थेचें परिपालन करणें आहे. पण साक्षात्कारभूत ज्ञानाचें कारण शिष्याची शुद्धबुद्धीच कारण आहे.

(१२१) अलब्धज्ञानदृष्टीनां क्रिया पुत्र परायणम् ॥
यस्य नास्त्यम्बरं पट्टं कम्बलं किं त्यज्यत्यसौ ॥
नि. पू. ८७-१७.

ज्यांना ज्ञानदृष्टि प्राप्त झाली नाहीं, त्यांनीं कर्मांचेंच आचरण करणें योग्य आहे. ज्याचेपाशीं उंची वस्त्र नाहीं त्यानें आपल्या जवळचा कांबळा टाकून देणें योग्य होईल काय ?

(१२२) नोद्विजन्ते स्वकार्येषु जना अध्यवसायिनः ॥
नि. पू. ८८-१९.

निश्चयी लोक आपल्या कार्याविषयीं कधीं उद्विग्न होत नाहींत.

(१२३) अमितानंदमुत्सृज्य सुसाध्यं यः प्रवर्तते ॥
मिते वस्तुनि दुःसाध्ये स्यात्महा स शठः स्मृतः ॥
नि. पू ९०-२२

जो सुसाध्य व परिपूर्ण आनंदाला सोडून दुःसाध्य व परिमित वस्तूमध्यें प्रवृत्त होतो, त्याला शठ आत्मघातकी असें म्हटलें आहे.

(१२४) आशा हि लोहरज्जुभ्यो विषमा विपुला दृढा ॥
कालेन क्षीयते लोहं तृष्णा तु परिवर्धते ॥ नि. पू. ९१-६

आशा ही लोखंडी साखळदंडाहून अतीशय वळकट व मोठीच मजबूत आहे. लोखंड कांहीं काळानें घासून घासून किंवा गंज चढून नष्ट होतें, पण आशा उत्तरोत्तर वाढतच असते.

(१२५) अनहंवेदनं सिद्धिरहंवेदनमापदः ॥ नि. पू ९९-१३

'अहम्' असें जाणणें 'अहम्' असें न जाणणें हीच सिद्धि व ह्याच सर्व आपत्ति.

(१२६) यावत्तिलं यथा तैलं यावद्देहं तथा दशा ॥
यो न देहदशामेति स छिनत्त्यसिनाम्बरम् ॥
नि. पू. १०४-४२

जोंपर्यंत तीळ आहे तोंपर्यंत त्यांत तेल असतेंच, त्याप्रमाणें जोंपर्यंत देह आहे तोंपर्यंत हर्ष, खेद इत्यादि विकार होणारच. देह असेपर्यंत जो ह्या देहदशास प्राप्त होत नाहीं तो तरवारीनें आकाशालाच कापून काढतो.

(१२७) सुहृद्यावेदितं दुःखं परमायाति तानवम् ॥
नि. पू. १०५-३

आपलें दुःख आपल्या मित्राला सांगितल्यानें पुष्कळच हलकें होतें.

(१२८) संसृतौ भवितव्यानामहो नु विषमा गतिः ॥
नि. पू. १०५-१५

या संसारांत दैवगति मोठी कठीण आहे !

(१२९) सर्वं स्वर्गसमाचारं वेद्मि देवाधिनायक ॥
किंतु सर्वत्र मे स्वर्गो नियतो नतु कुत्रचित् ॥
नि. पू. १०७-२६

शिखिध्वजः—हे इंद्रा ! मी सर्व प्रदेशाला स्वर्गाप्रमाणेंच समजतों. स्वर्गांत अनायासानें विहार होतो हें खरें, पण मला सर्वत्र स्वर्गच आहे. कोठेंहि नियत देशालाच मी स्वर्ग समजत नाहीं.

(१३०) आनन्दायैव भूतानि यतन्ते यानि कानिचित् ॥
नि. पू. १०८-१०

सर्व प्राणी आनंद मिळविण्यासाठींच प्रयत्न करीत असतात.

(१३१) न शास्त्रैर्नापि गुरुणा दृश्यते परमेश्वरः ॥
दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्त्वस्थया धिया ॥
नि. पू. ११८-४

शास्त्रें व गुरु यांच्या योगानें परमेश्वर दिसत नाहीं, तर आपल्या स्वतःच्या सत्त्वस्थ बुद्धीनेंच त्याला आपल्याला पहातां येतें.

(१३२) देहोऽहमिति या बुद्धिः सा संसारनिबन्धनी ॥
न कदाचिदियं बुद्धिरादेया हि मुमुक्षुभिः ॥
नि. पू. ११८-८

'मी देह आहे' अशी बुद्धि संसारांत जखडून टाकणारी आहे. यासाठीं मुमुक्षूंनीं या बुद्धीचा स्वीकार केव्हांहि करूं नये.

(१३३) सिद्धान्तोऽध्यात्मशास्त्राणां सर्वापन्हव एव हि ॥
नाविद्याऽस्तीह नो माया शांतं ब्रह्मेदमक्रमम् ॥
नि. पू. १२५-१

सर्व द्वैत जगाचा निषेध हाच अध्यात्मशास्त्राचा सिद्धांत आहे. येथें अविद्या नाहीं व मायाहि नाहीं, तर हें केवळ शांत व शास्त्रांनाहि ज्याच्या स्वरूपाचें आकलन करितां येत नाहीं, असें नित्य अपरोक्ष ब्रह्मच आहे.

(१३४) जाग्रत्येव सुषुप्तस्थः कुरु कर्माणि राघव ॥
अन्तःसर्वपरित्यागी बहिः कुरु यथागतम् ॥
नि. पू. १२५-६

हे रामा ! जागेपणीं झोपेंत असल्याप्रमाणें कर्मे करीत रहा. आंतून सर्वांचा परित्याग कर, पण बाहेर प्राप्त झालेला व्यवहार करण्यास चुकूं नकोस.

(१३५) कर्तव्यमाचरन्काममकर्तव्यमनाचरन् ॥
तिष्ठति प्राकृताचारो यः स आर्य इति स्मृतः ॥
नि. पू. १२६-५४

जो कर्तव्य कर्माचें आचरण प्रेमानें करीत असतो व अकर्तव्याचें आचरण करावें असें मनांत सुद्धां आणीत नाहीं व जो नित्य नैमित्तिक कर्मे निष्कामपणानें करीत रहातो त्याला आर्य असें म्हणतात.

(१३६) यथाचारं यथाशास्त्रं यथाचित्तं यथास्थितम् ॥
व्यवहारमुपादत्ते यः स आर्य इति स्मृतः ॥
नि. पू. १२६-५५

वृद्धांचा आचार व शास्त्र यांच्या अनुरोधानें प्रसन्न चित्तानें यथास्थित कर्म करणारा व लौकिक व्यवहारादि पाळणारा त्याला आर्य असें म्हणतात.

(१३७) ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष नच कश्चिच्छृणोति माम् ॥
असंकल्पः परं श्रेयः सकिमन्तर्न भाव्यते ॥
नि. पू. १२६-९४

मी हात वर करून मोठमोठ्यानें ओरडून सांगत आहे, पण माझ्या ओरडण्याकडे कोणीच लक्ष देत नाहीं. संकल्पांचा त्याग केल्यानेंच मोक्ष-प्राप्ति होत असते. पण ही गोष्ट लोक आपल्या अंतःकरणांत कां ठसवून घेत नाहींत ?

(१३८) बहुनात्र किमुक्तेन संक्षेपादिदमुच्यते ।
संकल्पनं परो बन्धस्तदभावो विमुक्तता ॥
नि. पू १२६-९७

अधिक बोलून काय करावयाचें आहे ? थोडक्यांत सांगावयाचें हें कीं, संकल्प करणें हाच मोठा बंध होय व संकल्परहित असणें हाच मोक्ष होय.

(१३९) संन्तोऽतीतं न शोचन्ति भविष्यं चिन्तयन्ति नो ॥
वर्तमानं च गृह्णन्ति कर्मप्राप्तमखंडितम् ॥ नि.पू.१२४ १३

सज्जन भूतकालीन गोष्टींविषयीं शोक करीत बसत नाहींत व पुढील गोष्टींविषयींहि चिंता करीत नाहींत, तर वर्तमानकाळीं प्राप्त झालेलें कर्म मात्र सतत करीत रहातात.

(१४०) अहं ममेति संविद्या दुःखतो विमुच्यते ॥
असंविदन्विमुच्यसे यदीप्सितं तदाचर ॥ नि. उ. १-३५

तूं जोंपर्यंत 'हा मी आणि हें माझें' जाणत राहशील तोंपर्यंत दुःखांतून मुक्त होणार नाहींस आणि हें जाणण्याचें बंद करशील तर मुक्त होशील, यास्तव त्यांतील तुला इष्ट असेल तें कर.

(१४१) गेहमेवोपशांतस्य विजनं दूरकाननम् ॥
अशांतस्याप्यरण्यानी विजना सजना पुरी ॥ नि.उ.३-३८

शांत पुरुषाला त्याचें घर हें अगदीं दूर असलेलें निर्जन अरण्यच आहे. पण शांत नसलेल्या पुरुषाला निर्जन अरण्यहि असंख्य लोकांनीं भरून गेलेल्या नगराप्रमाणेंच आहे.

आध्यात्मिक सुभाषितें

(१४२) स्वभावं स्वं विजित्यादाविन्द्रियाणां सचेतसाम् ॥
प्रवर्तते विवेके यः सर्वं तस्याशु सिध्यति॥ नि.उ. ५-१

मनासहवर्तमान आपापल्या विषयाकडे धावणें, या इंद्रियांच्या स्वभावाला अगोदर जिंकून त्यानंतर जो नित्यानित्य वस्तुविवेकादि साधनामध्यें प्रवृत्त होतो त्यालाच शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाचें फल मिळतें.

(१४३) प्राप्तेन येन नो भूयः प्राप्तव्यमवशिष्यते ॥ नि. उ. ६-३१
तत्प्राप्तौ यत्नमातिष्ठेत्कष्टयापि हि चेष्टया ॥

जें मिळविलें असतां पुन्हां कांहीं एक मिळावयाचें उरत नाहीं, अशेंच पद मिळविण्याविषयीं जोराचा प्रयत्न करावा. मग त्यामध्यें कितीहि कष्ट पडले तरी चालवील.

(१४४) इंद्रियोत्तमरोगाणां भोगाशावर्जनादृते ॥
नौषधानि न तीर्थानि न च मन्त्राश्च शान्तये ॥ नि. उ. ६-४५

इंद्रियरूपी रोगावर भोगांची आशा सोडणें यावांचून दुसरें कोणतेंहि औषध नाहीं. तीर्थें, मंत्र इत्यादिकांच्या योगानें हे रोग नाहींसे होत नाहींत.

(१४५) शस्त्राणि दयिताङ्गानि लग्नान्यङ्गे निरन्तरे ॥
यो बुध्यमानः सुसमः स परस्मिन्पदे स्थितः ॥ नि. उ. ११-१

ज्याच्या उघड्या अंगावर झालेले शस्त्रांचे प्रहार आणि स्त्रीच्या अवयवांचे स्पर्शहि दोन्हीं ज्याला सारखींच वाटतात, तो ब्रह्मपदाला पोहोंचलेला आहे असें समजावें.

(१४६) आत्मज्ञानं विदुर्ज्ञानं ज्ञानान्यन्यानि यानि तु ॥
तानि ज्ञानावभासानि सारस्यानवबोधनात् ॥ नि. उ. २१-७

तत्त्वज्ञानी आत्मज्ञानालाच ज्ञान असें म्हणतात. दुसरीं जीं भौतिक ज्ञानें आहेत तीं केवळ ज्ञानाचे आभास आहेत, कारण त्यापासून ब्रह्मानंदाचा लाभ होत नाहीं.

(१४७) अन्नाहारार्थं कर्म कुर्यादनिंद्यं
कुर्यादाहारं प्राणसंधारणार्थम् ॥
प्राणाः संधार्यास्तत्त्वजिज्ञासनार्थं
तत्त्वं जिज्ञास्यं येन भूयो न दुःखम् ॥ नि. उ.२१–१०

मुमुक्षु पुरुषानें या लोकीं आहारासाठीं निंद्यकर्म करूं नये. आहार प्राणाचें रक्षण करण्यासाठींच करावा, प्राण तत्त्वजिज्ञासेसाठीं धारण करावेत व तत्त्वालाच जाणण्याची इच्छा करावी, कारण त्या तत्त्वज्ञानानें पुनः दुःख उत्पन्न होण्याचा प्रसंग येणार नाहीं.

(१४८) प्रवाहपतिते कार्ये कामसंकल्पवर्जितः ॥
तिष्ठत्याकाशहृदयोयः स पंडित उच्यते ॥ नि. उ. २२-५

जो पुरुष प्रारब्धप्राप्त कर्तव्यकर्माचें आचरण काम व संकल्प सोडून शांत चित्तानें करीत रहातो तो पंडित होय.

(१४९) सुखान्येवातिदुःखानि वरं दुःखान्यतो मुने ॥
दृढदुःखवदंतत्वात्दुःखयंति सुखानि माम् ॥
नि. उ. २४-५

( सुखाचा परिणाम दुःखांतच होत असल्यामुळें ) सर्व सुखेंहि दुःखद दुःखेंच आहेत. अशा सुखापेक्षां दुःखें पत्करलीं. सुखांचा अंत दुःखांत होत असल्यामुळें या संसारांतील सुखेंहि मला दुःखच देतात.

(१५०) द्विविधो भवति प्रष्टा तत्त्वज्ञोऽज्ञोथवापि च ॥
अज्ञस्याज्ञतया देयो ज्ञस्य तु ज्ञतयोत्तरः ॥
नि. उ. २९-३२

तत्त्वज्ञ आणि अज्ञ असे दोन प्रकारचे प्रश्न करणारे असतात. तत्त्वज्ञाला तात्त्विक उत्तर दिलें पाहिजे आणि अज्ञ मनुष्याला त्याच्यासारखें सांगून शांत केलें पाहिजे.

(१५१) एतद्रूपमविद्यायाः प्रेक्षितं यन्न लभ्यते ॥
प्रेक्षिता लभ्यते चेत्सा तद्विद्यैव पराभवत् ॥ नि. उ. ३५-४

विचारपूर्वक पाहूं लागलें असतां जें उपलब्ध होत नाहीं तेंच अविद्येचें स्वरूप आहे. विचार केल्यावरहि जर अविद्या उपलब्ध झाली असती, तर तिला परा विद्याच म्हणतां आलें असतें.

(१५२) इच्छोदयो यथा दुःखमिच्छाशान्तिर्यथा सुखम् ॥
तथा न नरके नापि ब्रह्मलोकेऽनुभूयते ॥ नि. उ. ३६-२४

इच्छा उत्पन्न झाल्यानें दुःख होतें, तसें नरकांतहि होत नाहीं; आणि इच्छा नाहींशी झाली असतां जें सुख मिळतें तसें श्रेष्ठ सुख ब्रह्मलोकामध्येंहि अनुभवाला येत नाहीं.

(१५३) इच्छोपशमनं कर्तुं यदि कृत्स्नं न शक्यते ॥
स्वल्पमप्यनुगंतव्यं मार्गस्थो नावसीदति ॥ नि. उ. ३६-३०

सर्व इच्छा एकदम नाहींशा करणें अशक्य झाल्यास क्रमाक्रमानें थोड्या थोड्या इच्छा सोडीत जाव्या. कारण, सन्मार्गानें जाणारा पुरुष कधींहि क्लेश भोगीत नाहीं.

(१५४) इच्छामात्रं हि संसारो निर्वाणं तदवेदनम् ॥
इच्छानुत्पादने यत्नः क्रियतां किं वृथा श्रमैः ॥ नि. उ. ३६-३२

इच्छा हाच संसार व तिचा अभाव हेंच निर्वाण, यास्तव इच्छा उत्पन्नच होणार नाहीं असा यत्न करावा.

(१५५) यस्येच्छानतुसंधानमात्रे दुःसाध्यता मतेः ॥
गुरूपदेशशास्त्रादि तस्य नूनं निरर्थकम् ॥ नि. उ. ३६-३५

इच्छेच्याकडे दुर्लक्ष करणें एवढें देखील ज्याच्या बुद्धीला दुःसाध्य वाटत असेल त्यानें घेतलेला गुरूपदेश, त्याचें शास्त्रज्ञान इत्यादि सर्व खरोखर व्यर्थ होय.

(१५६)　निरिच्छतैव निर्वाणं सेच्छतैव हि बंधनम् ॥
यथाशक्ति जयेदिच्छां किमेतावाति दुष्करम् ॥
नि. उ. ३६-३८

निरिच्छता हेंच निर्वाण ( मोक्ष ) व इच्छायुक्त असणें हें बंधन होय. यास्तव यथाशक्ति इच्छेला जिंकावें. यांत दुष्कर तें काय आहे ?

(१५७)　स्वभाव एव सर्वस्मै स्वदते किल सर्वदा ॥ नि. ३९-१५
अस्वभावे महद्दुःखं स्वभावे केवलं शमः ॥
नि. उ. ३९-२०

ह्या स्वभाव म्हणजेच प्रत्येकाचा आत्मा होय ह्या प्रत्येकाला फारच आवडतो, कारण ह्या स्वभावस्थितीतच मोठा आनंद होत असतो व स्वभावाला सोडल्यावर मोठें दुःख होत असतें.

(१५८)　भोगाभवमहारोगा बंधवो दृढबंधनम् ॥
अनर्थायार्थसंपत्तिरात्मनात्मनि शाम्यताम् ॥
नि. उ. ४०-४

भोग हेच संसारांतील महारोग आहेत. बांधव हेच दृढ बंधन आहे. अर्थसंपत्तिच अनर्थांत पाडणारी आहे. यास्तव विवेकयुक्तबुद्धीनें स्वस्वरूपांतच शांत रहावें.

(१५९)　अतज्ज्ञायैव विषयाः स्वदंते न तु तद्विदः ॥
नहि पीतामृतायांतः स्वदते कटु कांजिकम् ॥
नि. उ. ४५-५६

अज्ञानी पुरुषालाच विषय आवडतात, ज्ञानी पुरुषाला आवडत नाहींत. अमृत पिऊन तृप्त झालेल्याला कटु कांजी पिण्याची इच्छाच होणार नाहीं.

(१६०)　श्रुतपाठजपान्तेषु समाधिविरतो भवेत् ॥
समाधिविरतः श्रान्त श्रुतपाठपाञ्छ्रयेत् ॥ नि. उ ४६-२३

गुरुमुखानें वेदांतशास्त्राचें श्रवण करावें. उपनिषदांचा पाठ करावा. प्रणवादिकांचा जप करावा, नंतर ध्यान करावें. ध्यानाभ्यासाचा कंटाळा आला असतां पुनः श्रवण, पठन व जप करावा.

(१६१) अस्ति चेद्भोगवैतृष्ण्यं किमन्यध्यानदुर्धिया ॥
नास्ति चेद्भोगवैतृष्ण्यं किमन्यध्यानदुर्धिया ॥
नि. उ. ४६-१९

भोगाविषयींची विरक्ति जर असेल, तर निराळ्या ध्यानाचा आग्रह कशाला ? आणि विषयवैराग्य जर नसेल तर ध्यानादिकांचा काय उपयोग ?

(१६२) पदार्थादानविरतिं पूर्वमभ्यस्य यत्नतः ॥
आहर्तव्या विविकेन ततः स्वार्थेष्वरक्तता ॥
नि. उ. ४७-३५

दुसऱ्याच्या धनाचा अपहार करण्याची बुद्धि मोठ्या प्रयत्नानें अगोदर कमी करावी, नंतर स्वार्थाविषयींहि आसक्ति धरूं नये.

(१६३) न तादृशं जगत्यास्मिन् दुःखं नरककोटिषु ॥
यादृशं यावदायुष्कमर्थोपार्जनशासनम् ॥
नि उ. ४७-३७

यावज्जीव द्रव्योपार्जन करीत रहाणें यांत जितकें दुःख आहे, तितकें कोट्यवधि नरकांतहि नाहीं.

(१६४) अर्थोपार्जनरक्षाणां जानन्नपि कदर्थनाम् ॥
यः करोति स्पृहां मूढो नृपशुं तं न स्पृषेत् ॥
नि. उ. ५१-३१

धनसंपादन करणें व त्याचें रक्षण करणें यांत किती क्लेश होतात हें माहीत असून जो त्याची इच्छा करतो, तो मूढ नरपशु होय.

(१६५) तद्विदा तत्पदस्थेन तन्मुक्तेनानुभूयते ॥
अन्यैः केवलमाम्नातैरागमैरेव वर्ण्यते ॥ नि.उ. ५२-२९

ज्याला आत्म्याचें ज्ञान झालें आहे, जो आत्मस्वरूपीं स्थित असतो व जो खरोखरच सर्व बंधनांपासून मुक्त झालेला असतो, त्याला तें आत्मतत्त्व अनुभवास येतें; बाकीचे परोक्षज्ञानी केवल शब्द प्रामाण्याच्या ( म्हणजे वेद प्रामाण्य ) आधारानें त्याचें वर्णन करितात.

इंद्रियरूपी सेनेचा अधिपती चित्त आहे. या चित्ताला जिंकलें असतां इंद्रियें जिंकलीं जातात. पायांत जोडे घातलेल्या मनुष्याला सर्व पृथ्वी चामड्यानें आच्छादिल्यासारखीच आहे. ( जोडे घालून पाय झाकले म्हणजे पृथ्वीवरील सर्व कांट्यांचें व खड्यांचें निवारण होतें, त्याप्रमाणें एका चित्ताला जिंकल्यानें सर्व इंद्रियांना जिंकल्यासारखेंच होतें. )

(१७६) तातस्य कूपोऽयमिति ब्रुवाणाः
क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति ॥ नि. उ. १६३-५६

हेकेखोर लोक जवळ असलेलें गंगोदक न पितां ' ही आमच्या बापाची विहीर आहे, ' असें म्हणून तिचेंच खारट पाणी पितात.

(१७७) सहस्रेभ्यः सहस्रेभ्यः कश्चिदुत्थाय वीर्यवान् ॥
भिनत्ति वासनाजालं पञ्जरं केसरी यथा ॥
नि. उ. १९४-३९

ज्याप्रमाणें सिंह पिंजरा फोडून बाहेर पडतो त्याप्रमाणें हजारों माणसांतील एखादाच सामर्थ्यवान् माणूस वासनेचें जाळें तोडून मोकळा होतो. ( अशाच तऱ्हेचें वर्णन भगवद्गीतेंतहि आढळतें. )*

(१७८) नगर्यां दह्यमानायां भूषितायां तथोत्सवे ॥
समएव महीपालो जनको भूभृतां वरः ॥ नि. उ. १९८-३१

मिथिलानगरी ( राजधानी ) जळूं लागली असतां किंवा उत्सवाचे वेळीं ती सुशोभित केली असतां राजश्रेष्ठ जनकराजाच्या अंतःकरणाची समतोल स्थिति बिघडत नसे.



* मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ भ. गी. ७-३.

## (२) नैतिक सुभाषितें.

(१) अर्थिनां यन्निराशत्वं सत्तमेऽभिभवोहि सः ॥ १-७-१०

आपल्याकडे याचना करण्यासाठीं आलेल्या मनुष्याची निराशा करणें ह्या गोष्टीचा सत्पुरुष तिरस्कार करतात.

(२) न तदस्ति जगत्यस्मिन्यन्नदेयं महात्मनाम् ॥ १-७-१९

महात्मे पुरुष जगांतील कोणतीहि वस्तु दुसऱ्यांना देणार नाहींत असें केव्हांहि होत नाहीं.

(३) कार्यमण्वपि काले तु कृतमेत्युपकारताम् ॥
महदप्युपकारोऽपि रिक्ततामेत्यकालतः ॥ १-७-२६

योग्य कालीं एखाद्याचें लहानसें काम केलें तरी तो मनुष्य आभारी होतो; परंतु वेळ निघून गेल्यावर एखाद्यावर कितीहि उपकार केला तरी तो फुकट जातो.

(४) नो युक्तियुक्तकथनेन विनैति तोषम् ।
धीमानपूरितमनोभिमतश्चलोकः ॥ १-७-२८

( सामान्य लोकांचे मनोरथ पूर्ण झाले म्हणजे त्यांना संतोष होतो ) परंतु बुद्धिमान् पुरुषाची स्थिति निराळी असते. आपल्या प्रश्नाचें युक्तीला धरून उत्तर मिळाल्याशिवाय त्यांच्या मनाचें समाधान होत नाहीं; मग योग्य उत्तर मिळाल्यानंतर त्यांची इच्छा पूर्ण झाली किंवा न झाली तरीहि त्यांना विषाद वाटत नाहीं.

(५) श्रीमानजननिंद्यश्च शूरश्चाप्यविकत्थनः ॥
समदृष्टिः प्रभुश्चैव दुर्लभाः पुरुषास्त्रयः ॥ १-१३-११

जननिंदेला पात्र न झालेला श्रीमान्, स्वतःची प्रौढी न सांगणारा शूर आणि सर्वत्र समदृष्टि असणारा राजा; हे तीन पुरुष ह्या जगांत दुर्लभ आहेत.

(१६६) अज्ञानमपि नास्त्येव प्रेक्षितं यन्न लभ्यते ॥
विचारिणा दीपवता स्वरूपं तमसो यथा ॥ नि उ.५७-५

ज्याप्रमाणें हातांत दिवा घेऊन अंधकाराचा शोध करणाऱ्याला अंधकार कधींहि दिसावयाचा नाहीं, त्याप्रमाणें विचारपूर्वक पहाणारास अज्ञानाचा कधींहि अनुभव येणार नाहीं.

(१६७) अभ्यासेन कटु द्रव्यं भवत्यभिमतं मुने ॥
अन्यस्मै रोचते निंबस्त्वन्यस्मै मधु रोचते ॥
नि. उ. ६६-२८

अभ्यासानें कडू पदार्थहि गोड वाटूं लागतो. एखाद्याला मध आवडतो तर एखाद्याला अभ्यासामुळें कडूलिंबच आवडतो.

(१६८) अबन्धुर्बन्धुतामेति नैकट्याभ्यासयोगतः ॥
यात्यनभ्यासतो दूरात्स्नेहोबन्धुषु तानवम् ॥
नि. उ. ६७-२९

नेहमींच्या सहवासामुळें जो आप्त नसतो तोहि आप्त होतो, आणि प्रत्यक्ष बंधु असून तो निरंतर दूर राहिल्यास स्नेहसंबंध कमी होऊन परक्याप्रमाणें भासतो.

(१६९) जीर्यन्ते जीर्यतः केशाः दन्ता जीर्यन्ति जीर्यतः ॥
क्षीयते जीर्यते सर्वं तृष्णैवैका न जीर्यते ॥
नि. उ. ९३-८६

वृद्ध झालेल्या प्राण्याचे केस पिकतात, दांत पडतात, सर्व अवयव शिथिल होतात, पण एक तृष्णा मात्र तरुण रहाते, ती मात्र कमी होत नाहीं.

(१७०) इहैव नरकव्याधेश्चिकित्सां न करोति यः ॥
गत्वा निरौषधं स्थानं सरुजः किं करिष्यति ॥
नि. उ. १०३-५१

जिवंतपणींच पुढच्या नरकव्याधीची चिकित्सा केली नाहीं तर औषध मिळणार नाहीं अशा ठिकाणीं रोगग्रस्त मनुष्य गेल्यावर काय करणार ?

(१७१) लोकैरनिंदिता लक्ष्मीरारोग्यं श्रीसमन्वितम् ॥
धर्म्यं युद्धं परार्थेन जीवितस्योत्तमं फलम् ॥ नि. उ. ११६-४

लोकांनीं न निंदलेली संपत्ति, ऐश्वर्ययुक्त आरोग्य, परार्थासाठीं धर्मयुद्ध हें सर्व जीविताचें उत्तम साफल्य होय.

(१७२) पाताले भूतले स्वर्गे सुखमैश्वर्यमेव वा ॥
न तत्पश्यामि यन्नाम पांडित्यादतिरिच्यते ॥ नि. उ. १४२-२

पांडित्याच्या सुखाहून ज्याची योग्यता अधिक आहे, असें सुख किंवा ऐश्वर्य पाताळ, भूतळ किंवा स्वर्ग यांतील कोठेंच मला दिसत नाहीं.

(१७३) यच्चित्तस्तन्मयो जंतुर्भवतीत्याजगत्स्थितेः ॥
आबालमेतत्संसिद्धं कर्तुं शक्नोति नान्यथा ॥ नि. उ. १५६-३१

ज्याचें जसें चित्त असतें तसाच प्राणी बनत असतो ही गोष्ट जगाची स्थिति असे पर्यंत सिद्ध आहे. आबालवृद्धांना प्रसिद्ध असलेल्या या गोष्टीचें उल्लंघन करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. (अशा अर्थाचें श्रुतिवचन* प्रसिद्ध आहे.)

(१७४) अविद्यैवमविज्ञाता चिरानंतावभासते ॥
परिज्ञाता तु नास्त्येव मृगतृष्णा नदी यथा ॥ नि. उ. १६०-८

जोंपर्यंत ही अविद्या अज्ञात आहे तोंपर्यंत ती नित्य व अनंत आहे, असें भासतें. पण मृगजलाची नदी अधिष्ठानरूपानें म्हणजे सूर्याचे किरण आहेत, असें पहातांच जशी नाश पावते, त्याप्रमाणें ही अविद्या अधिष्ठानरूपानें म्हणजेच ब्रह्मरूपानें ज्ञात होतांच नाहींशी होते.

(१७५) चित्तमिंद्रियसेनाया नायकं तज्जयाज्जयः ॥
उपानद्गूढपादस्य ननु चर्मावृतेव भूः ॥ नि. उ. १६३-६

* यश्चित्तस्तन्मयो भवति गुह्यमेतत्सनातनम्। इतिश्रुतिः

(६) सुनिर्मलापि विस्तीर्णा पावन्यापि हि यौवने ॥
मतिः कलुषितामेति प्रावृषीव तरङ्गिणी ॥ १-२०-१८

पावसाळ्यांत नदीचें पाणी गढूळ होतें, त्याप्रमाणें बुद्धि कितीहि निर्मळ, उदार आणि शुद्ध असली, तरी ती तारुण्यांत मलिन होते.

(७) परोपकारकारिण्या परार्तिपरितप्तया ॥
बुद्ध एव सुखी मन्ये स्वात्मशीतलया धिया ॥ १-२६-३९

परोपकार करणारी, दुसऱ्याच्या दुःखानें दुःखित होणारी व आत्मज्ञानानें तृप्त झालेली अशी बुद्धि ज्या पुरुषाची आहे तो खरा सुखी आहे, असें मी समजतों.

(८) आपदः क्षणमायान्ति क्षणमायान्ति संपदः ॥
क्षणं जन्म क्षणं मृत्युर्मुने किमिव शोभनम् ॥ १-२८-३१

क्षणांत आपत्ति, क्षणांत संपत्ति; क्षणांत जन्म, क्षणांत मृत्यु, अशा वन्हेनें हे मुने! जगांतील सर्व गोष्टी क्षणिक आहेत.

(९) शतादेकतमस्यैव सर्वोदारचमत्कृतिः ॥
ईप्सितार्थार्पणैकान्तदक्षा भवति भारती ॥ १-३३-३२

शेंकडों वक्त्यांमध्यें एखाद्याचेंच भाषण सहृदय मनुष्यांच्या अंतःकरणांत विस्मय उत्पन्न करणारें आणि इच्छिलेल्या अर्थाचा निश्चयानें बोध करणारें असतें.

(१०) सुभगाः सुलभारोहाः फलपल्लवशालिनः ॥
जायन्ते तरवो देशे न तु चन्दनपादपाः ॥ १-३३-४०

दिसण्यांत सुंदर आणि चढण्याला सुलभ असें फल आणि पल्लव यांनीं युक्त असलेले वृक्ष सर्वत्र दिसून येतात, परंतु चंदनाचे वृक्ष मात्र विरळ आहेत.

(११) परं पौरुषमाश्रित्य दन्तैर्दन्तान्विचूर्णयन् ॥
शुभेनाशुभमुद्युक्तं प्राक्तनं पौरुषं जयेत् ॥ २-५-५

दातांनीं दातांचें चूर्ण होईल इतक्या जोरानें शास्त्रीय प्रयत्न करून अनर्थ उत्पन्न करणाऱ्या पूर्वजन्मींच्या कर्माचा पाडाव करावा.

(१२) प्रत्यक्षमानमुत्सृज्य योऽनुमानमुपेत्यसौ ॥
स्वभुजाभ्यामिमौ सर्पाविति प्रेक्ष्य पलायते ॥ २-५-१९

प्रत्यक्ष ज्याचें फळ दिसत आहे अशा पौरुष प्रयत्नाचा त्याग करून केवळ अनुमानानें सिद्ध होणाऱ्या दैवाचा आश्रय जो मनुष्य करतो, तो आपल्याच हातांना सर्प मानून पळूं लागतो असें म्हणण्यास काय हरकत आहे ?

(१३) दैवं संप्रेरयति मामिति दग्धधियां मुखम् ॥
अदृष्टश्रेष्ठदृष्टीनां दृष्ट्वा लक्ष्मीर्निवर्तते ॥ २-५-२०

" मला दैव प्रेरणा करीत आहे " असें म्हणणाऱ्या लोकांची बुद्धि होरपळून गेली आहे, असें समजावें. ज्यांच्या दृष्टीला दैवच श्रेष्ठ आहे असें वाटतें, अशा लोकांचें तोंड दिसल्याबरोबर लक्ष्मी त्यांच्याकडे पाठ फिरवितें.

(१४) आलस्यं यदि न भवेज्जगत्यनर्थः
कोनस्याद्बहुधनको बहुश्रुतो वा ।
आलस्यादियमवनिः ससागरान्ता
संपूर्णा नरपशुभिश्च निर्धनैश्च ॥ २-५-३०

या जगामध्यें अनर्थकारक आळस नसता, तर प्रत्येक मनुष्य संपत्तिमान् आणि विद्वान् झाला असता. परंतु आळसामुळें ही समुद्रवलयांकित संपूर्ण पृथ्वी नरपशूंनीं आणि निर्धन लोकांनीं भरून गेली आहे.

(१५) पौरुषाद्दृश्यते सिद्धिः पौरुषाद्धीमतां क्रमः ॥
दैवमाश्वासनामात्रं दुःखे पेलवबुद्धिषु ॥ २-७-१५

कार्यसिद्धि उद्योगानें होते. ज्ञाते पुरुष आपला वर्तनक्रम पौरुषाच्याच योगानें चालवितात. दुबळ्या बुद्धीच्या लोकांना दुःखाचे वेळीं थोडें बरें वाटावें म्हणून दैवाची कल्पना करण्यांत आली आहे.

(१६) ये समुद्योगमुत्सृज्य स्थिता दैवपरायणाः ॥
ते धर्ममर्थं कामं च नाशयंत्यात्मविद्विषः ॥ २-७-३२

उद्योग न करतां जे केवळ दैवावर अवलंबून रहातात, ते धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थाचा नाश करून आपलें अकल्याण करून घेतात.

(१७) अज्ञतातज्ज्ञते पूर्वं वक्तुर्निर्णीय कार्यतः ॥
यः करोति नरः प्रश्नं प्रच्छकः स महामतिः ॥ २-११-४७

व्यवहारावरून वक्ता तज्ज्ञ आहे किंवा नाहीं, याचा प्रश्न करण्यापूर्वीं विचार करून नंतर जो मनुष्य प्रश्न करतो, तो खरोखरीच मोठा बुद्धिमान् होय.

(१८) न व्याधिर्न विषं नापत्तथा नाधिश्च भूतले ॥
खेदाय स्वशरीरस्थं मौर्ख्यमेकं यथा नृणाम् ॥ २-१२-१२

स्वतःच्या मूर्खपणामुळें जितकें दुःख भोगावें लागतें तितकें दुःख मानसिक चिंता, शारीरिक पीडा, विष व अपत्ति यांच्यापासूनहि भोगावें लागत नाहीं.

(१९) वरं शरावहस्तस्य चाण्डालागारवीथिषु ॥
भिक्षार्थमटनं राम न मौर्ख्यहतजीवितम् ॥ २-१३-२७

हे रामा ! चांडाळांच्या वस्तींतून हातांत थाळी घेऊन भीक मागण्याचा प्रसंग आला तरी पुरवला, परंतु मूर्खपणामुळें निष्फळ झालेलें जीवित कंठण्याचा प्रसंग नको.

(२०) एकस्मिन्नेव फलदे गुणे बलमुपागते ॥
क्षीयंते सर्वएवाशु दोषा विवशचेतसाम् ॥ १-१६-३१

मनुष्याच्या अंगीं कितीहि दोष असले तरी त्यानें एक उत्तम गुण दृढ केला असतां त्याचे सर्व दोष क्षणांत क्षीण होतात.

(२१) अपि पौरुषमादेयं शास्त्रं चेद्युक्तिबोधकम् ॥
अन्यत्त्वार्षमपि त्याज्यं भाव्यं न्यायैकसेविना ॥ २-१८-२

युक्तीनें बोध करून देणारें शास्त्र, मग तें एखाद्या सामान्य पुरुषापासून जन्म पावलेलें असलें तरी तें ग्राह्य आहे. परंतु एखाद्या प्राचीन ऋषीनें केलेलें शास्त्र तत्त्वनिर्णयाला निरुपयोगी असले, तर न्यायाला अनुसरून वागणाऱ्या मनुष्यानें त्याचा त्याग करणेंच उचित आहे.

(२२) युक्तियुक्तमुपादेयं वचनं बालकादपि ॥
अन्यत्तृणमिव त्याज्यमप्युक्तं पद्मजन्मना ॥ २-१८-३

एखाद्या मुलानेंहि केलेलें संयुक्तिक भाषण ग्राह्य समजावें, परंतु प्रत्यक्ष ब्रह्मदेवानेंहि केलेलें भाषण युक्तीच्या विरुद्ध असल्यास तें त्याज्य समजावें.

(२३) योऽस्मत्तातस्य कूपोऽयमिति कौपं पिबत्यपः ॥
त्यक्त्वा गाङ्गं पुरःस्थं तं को न शास्त्यतिरागिणम् ॥
२-१८-४

" ही विहिर आमच्या वडिलांनीं खणलेली आहे " असें म्हणून आपल्यापुढें असलेलें गंगेचें पाणी टाकून जो त्या विहिरीचेंच पाणी पितो त्या हट्टी मनुष्याला कोण काय सांगणार !

(२४) न किंचन फलं धत्ते स्वाभ्यासेन विना क्रिया ॥ २-१८-११

अभ्यास केल्याशिवाय कोणतेंच कृत्य फलद्रूप होत नाहीं.

(२५) न कुतार्किकतामेत्य नाशनीया प्रबुद्धता ॥
अनुभूत्यपलापांतैरपवित्रैर्विकल्पितैः ॥ २-१८-२८

कुतर्कांच्या बळी पडून अनुभवाच्या विरुद्ध म्हणून अपवित्र अशा विकल्पांनीं आपल्या शहाणपणाचा नाश करूं नये.

(२६) योयो येन गुणेनेह पुरुषः प्रविचार्यते ॥
शिष्यते तं तमेवाशु तस्माद्बुद्धिं विवर्धयेत् ॥ २-२०-२

( सर्वच गुण एकाच पुरुषाच्या ठिकाणीं आढळून येत नाहींत) तरी ज्या मनुष्याच्या ठिकाणीं जो जो गुण असेल त्याचें ग्रहण करून आपली बुद्धि वाढवावी.

(२७) त्यजंत्युद्यमसुद्युक्ता न स्वकर्माणि केचन ॥ ३-२-५

जे उद्योगी पुरुष असतात, ते स्वकर्मापासून कधींहि पराङ्मुख होत नाहींत.

(२८) योयमर्थं प्रार्थयते तदर्थं यतते तथा ॥
सोऽवश्यं तदवाप्नोति न चेच्छ्रांतो निवर्तते ॥३-८-५

मनुष्याला ज्या वस्तूंची आकांक्षा असते, त्यासाठीं पराङ्मुख न होतां तो सतत उद्योग करीत राहील तर त्याला ती वस्तु अवश्य प्राप्त होईल.

(२९) तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम् ॥
एतदेकपरत्वं च तदभ्यासं विदुर्बुधाः ॥ ३-२२-२४

श्रवणाच्या योगानें समजलेलें तत्त्व आपल्या बुद्धींत आरूढ व्हावें अशा दृष्टीनें त्याचें निरंतर चिंतन करणें, ज्ञात्या पुरुषांशीं संवाद करणें, समान अधिकाऱ्यांनीं तें तत्त्व एकमेकांना सांगून त्या संबंधानें परस्परांना बोध करून देणें, त्या तत्त्वासंबंधानें अखंड तदाकार वृत्ति राखण्याचा प्रयत्न करणें, याला ज्ञाते पुरुष अभ्यास असें म्हणतात.

(३०) किं दूरं व्यवसायिनाम् ॥ ३-२९-३८

उद्योग करणाऱ्या लोकांना मिळविण्यास कठीण असें या जगांत काय आहे ?

(३१) गोरर्थे ब्राह्मणस्यार्थे मित्रस्यार्थे च सन्मते ॥
शरणागतयत्नेन समृतः स्वर्गभूषणम् ॥ ३-३१-२८

गाई, ब्राह्मण, मित्र आणि शरण आलेला यांच्या रक्षणासाठीं लढत असतां जो वीर पुरुष मरतो, तो स्वर्गलोकाला खरोखरच अलंकृत करतो.

(३२) परस्परेच्छाविच्छित्तिर्न हि सौहार्दबन्धनी ॥ ३-५५-७२

परस्परांच्या इच्छांचा भंग झाला असतां खरी मैत्री टिकत नाहीं.

(३३) अमृतत्वं विषं याति सदैवामृतभावनात् ॥
शत्रुर्मित्रत्वमायाति मित्रसंवित्तिवेदनात् ॥ ३-६०-१७

भावना तिलक्या तऱ्हेनें दृढ झाली असतां विषसुद्धां अमृताप्रमाणें जीवदायी होतें. 'हा माझा मित्र आहे' अशी दृढ भावना केल्यास शत्रुसुद्धां आपला शत्रूभाव टाकून मित्र बनतो.

(३४) यथाभावितमेतेषां पदार्थानां निजं वपुः ॥
तदेव हि चिराभ्यासान्नियतेर्वशमागतम् ॥ ३-६०-१८

जीवांनीं ज्या ज्या पदार्थांची जशीजशी दृढ भावना केली असेल, त्या त्याप्रमाणें पदार्थ अर्थक्रिया करण्याला समर्थ व्हावे असें नियतीनें ठरविलें आहे.

(३५) दुःखितस्य निशा कल्पः सुखितस्यैव च क्षणः ॥३-६०-२२.

मनुष्य दुःखी कष्टी असला म्हणजे त्याला एक रात्र कल्पाप्रमाणें दीर्घ वाटते आणि सुखामध्यें कितीहि काळ लोटला, तरी तो त्याला एका क्षणाप्रमाणेंच वाटतो.

(३६) अविरुद्धैव सा युक्तिर्ययापदि हि जीव्यते ॥ ३-६८-१२.

आपत्तीमध्यें वाटेल ती युक्ति योजून जिवंत रहाणें ही गोष्ट शास्त्राला केव्हांहि संमतच आहे.

(३७) नानर्थबुद्धेः स्फुरति पूर्वापरविचारणा ॥ ३-७०-१८.

मूर्ख प्राण्यांच्या चित्तांत पूर्वापर विचार स्फुरण पावत नाहींत.

(३८) नाशोऽपि सुखयत्यज्ञमेकवस्त्वातिरागिणम् ॥ ३-७०-२३.

एका वस्तुवर आसक्त झालेल्या मनुष्याला स्वतःचा नाश झाला तरी तो सुध्दां सुखदायकच वाटतो.

(३९) सर्वः स्वसंकल्पवशाल्लघुर्भवति वा गुरुः ॥ ३-७०-३०.

जो तो प्राणी आपल्या संकल्पाच्या योगानें उच्च किंवा नीच स्थिति प्राप्त करून घेत असतो.

(४०) तुच्छोऽप्यर्थोऽल्पसत्त्वानां गच्छति प्रार्थनीयताम् ॥ ३-७०-३१.

क्षुद्र अंतःकरणाचे लोक नेहमीं क्षुद्र फलासाठींच धडपडत असतात.

(४१) अदर्शितमुखा एव दुर्जना मर्मवेधिनः ॥ ३-७०-६०.

दुर्जनमाणसें नेहमीं आपलें तोंड लपवून दुसऱ्याचा मर्मभेद करीत असतात.

(४२) उत्सवादपि नीचानां कलहोपि सुखायते ॥ ३-७०-७६.

नीच वृत्तीच्या लोकांना आनंदोत्सवापेक्षांहि कलहच अधिक प्रिय असतो.

(४३) दुर्जनो येन केनैव नाशितेनेति हृष्यताम् ॥ ३-८०-८२.

कोणत्या तरी रीतीनें दुसऱ्याचा नाश झाला म्हणजे दुर्जनाला आनंद होत असतो.

(४४) यथानाशेन वा भाव्यं तथोदेत्यशुभामतिः ॥ ३-७१-१७.

जशा रीतीनें नाश व्हावयाचा असतो, तशा तऱ्हेची दुर्बुद्धि अगोदर उत्पन्न होते.

(४५) अकृत्रिमं सुखं कीर्तिमायुश्चैवाभिवांछता ॥
सर्वाभिमतदानेन पूजनीया गुणान्विताः ॥ ३-७७-२६.

अकृत्रिम सुख, कीर्ति आणि आयुष्य ह्यांची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें सर्वांना अभिमत अशा दानाच्या योगानें गुणिजनांचा सत्कार करणेंच उचित आहे.

(४६) अपि जीवितदानेन गुणिनं परिपालयेत् ॥ ३-७७-२८.

गुणिजनांच्या रक्षणासाठीं प्रत्यक्ष जीविताबर पाणी सोडण्याचा प्रसंग आला तरी तें करण्यास माघार घेतां कामा नये.

(४७) मृतिर्गुणितिरस्कारो जीवितं गुणिसंश्रयः ॥ ३-७७-३१.

गुणिजनांचा तिरस्कार म्हणजेच मृत्यु आणि गुणिजनांचा आश्रय म्हणजेच खरें जीवित.

(४८) न तदस्ति विमोहाय यद्विविक्तस्य चेतसः ॥ ३-७८-२१

( जी स्थिति सामान्य मनुष्यांना भेदरून सोडते ) तीच विवेकशील चित्ताला ( सत्यासत्य निर्णय करतां येत असल्यामुळें ) केव्हांहि मोह पाडूं शकत नाहीं.

(४९) विषये हि प्रवर्तंते धीमंतः स्वार्थसाधकाः ॥ ३-७८-२३

बुद्धिमान् पुरुष आपल्या कार्यसिद्धीच्या बाबतींत आडमार्गांत न शिरतां सरळ मार्गांचेच अवलंबन करीत असतात.

(५०) प्राज्ञं प्राप्य न पृच्छन्ति ये केचित्ते नराधमाः ॥३-७८-३३

विद्वानांची गांठ पडली असतां प्रश्न विचारून जे आपला संशय नाहींसा करून घेत नाहींत, ते केवळ नराधम होत.

(५१) जायते दर्शनादेव मैत्री विशद्‌चेतसाम् ॥ ३-७८-३५

मोकळ्या मनाचीं माणसें एकमेकांना भेटतांक्षणींच त्यांची परस्पर मैत्री जमत असते.

(५२) राज्ञोरात्रिं दिनं धर्मो दुष्टभूतविनिग्रहः ॥
स्वधर्मत्यागिनो ये तु ते विनाशानलेंधनम् ॥ ३-७८-३७

रात्रंदिवस दुष्ट प्राण्यांचा निग्रह करणें हाच राजाचा धर्म आहे, व जे राजे या स्वधर्माचा त्याग करतात, ते अखेरीस विनाशरूपी अग्नीचें इंधन बनल्याशिवाय रहात नाहींत.

(५३) यस्याग्रे न गलति संशयः समूलो
नैवासौ कचिदपि पंडितोक्तिमेति ॥ ३-७९-३३

ज्याच्यापुढें कोणी संशय मांडिला असतां जो त्याचा समूळ उच्छेद करूं शकत नाहीं, असा पुरुष पंडित या पदवीला प्राप्त होत नाहीं.

(५४) पूर्वसिद्धस्वभावोयमादेहं न निवर्तते ॥ ३-८२-४०

जोंपर्यंत देह आहे तोंपर्यंत त्याचा पूर्वसिद्ध स्वभाव पालटणें केव्हांहि शक्य नाहीं.

(५५) महाशनानामेकांते भोजनं हि सुखायते ॥ ३-८२-४४

ज्यांचा मोठा आहार आहे अशा लोकांना एकांतांत भोजन करणेंच सुखावह होत असतें.

(५६) असतामपि संरूढं सौहार्दं न निवर्तते ॥ ३-८२-४७

दुष्टांच्याहि अंतःकरणांत एकदा प्रेम दृढ झालें म्हणजे तें नाहींसें होणें शक्य नसतें.

(५७) यथाप्राप्तं हि कर्तव्यमसक्तेन सदा सता ॥
मुकुरेणाकलङ्केन प्रतिबिम्बक्रिया यथा ॥ ३-८८-११

एखादा स्वच्छ आरसा आपल्या समोर येणाऱ्या पदार्थाचें प्रतिबिंब धारण करतो, त्याप्रमाणें आसक्त न होतां आपलें प्राप्त झालेलें कर्तव्य प्रत्येकानें अवश्य करीत राहिलें पाहिजे.

(५८) न हि जानाति दुर्बुद्धिर्विनाशं प्रत्युपस्थितम् ॥ ३-१०२-३६

दुर्बुद्धि मनुष्याला आपल्यापुढें येऊन ठेवलेला आपला स्वतःचा नाश समजून येत नाहीं.

(७१) प्रज्ञावानसहायोऽपि कार्यान्तमधिगच्छति ॥
दुष्प्रज्ञः कार्यमासाद्य प्रधानमपि नश्यति ॥ ५-१२-२३

बुद्धिमान् मनुष्याला कोणत्याहि प्रकारची मदत नसली तरी तो मोठ-मोठीं कार्यें तडीस नेत असतो. पण दुर्बुद्धि मनुष्याला केवढेंहि मोठें सहाय्य असलें तरी त्याच्या मुख्य कार्याचाच नाश होतो.

(७२) एतया तदलं मेऽस्तु तुच्छया पूर्वचिन्तया ॥
पौरुषं याति साफल्यं वर्तमानचिकित्सया ॥ ५-२५-१६

गतगोष्टीबद्दल शोक करण्यांत काय अर्थ आहे? वर्तमानकाळीं कोणती गोष्ट कर्तव्य आहे, याचा विचार केल्यानें पुरुषप्रयत्न सफल होतो.

(७३) न क्षमन्ते महान्तोऽपि पौनः पुन्येन दुष्क्रियाम् ॥५-३०-१२

वारंवार अपराध करणाऱ्या दुर्जनांचें पारिपत्य करणें महात्म्यांनाहि अखेरीस भाग पडतें.

(७४) राजा ह्याचारकारणम् ॥ ५-३२-२० *

राजा हा प्रजेच्या आचाराला कारणीभूत असतो.

(७५) न तथा दुःखयंत्यगे मज्जंत्यो वज्रसूचयः ॥
वैसादृश्येन संवद्धा यथैता वस्तुदृष्टयः ॥ ५-३२-३०

अयोग्य वस्तूचा योग्य वस्तूंशीं संबंध जडलेला पाहिला म्हणजे अनौचित्य दोषामुळें सुज्ञांना जितकें दुःख होतें, तितकें दुःख अंगांत वज्राच्या सुया टोचल्यानेंहि होत नाहीं.

(७६) गुणवान्निर्गुणो जात इत्यनर्थक्रमं विदुः ॥
निर्गुणो गुणवान् जात इत्याहुः सिद्धिदं क्रमम् ॥ ५-३३-४

एखादा मनुष्य प्रथम गुणवान् असून नंतर निर्गुण झाला तर त्याचा तो क्रम अनर्थकारक आहे असें विद्वान् पुरुष समजतात. परंतु एखादा पुरुष प्रथम निर्गुण असून नंतर गुणवान् झाला तर त्याचा तो क्रम सिद्धि प्राप्त करून देणारा आहे, असेंच सर्व मानतात.

---

* राज्ञि धर्मिणि धर्मिष्ठाः पापे पापाः समे समाः ॥
तं धर्ममनुवर्तंते यथा राजा तथा प्रजाः ॥

(७७) महान्तो यत्र नोद्विग्नास्तत्र विश्वासवन्मनः ॥ ५-३३-८

ज्या मनुष्यावर किंवा ज्या वस्तूवर महात्मे म्हणजे आपल्याला पूज्य असे आपले वडील, गुरु वगैरे प्रेम करतात, त्यावर सर्वांचा विश्वास बसावा हें अगदीं स्वाभाविक आहे.

(७८) लोकनिन्द्यस्य दुर्जन्तोर्जीवितान्मरणं वरम् ॥ ५-४६-४३

लोकांच्या निंदेला प्राप्त झालेल्या दुष्ट पुरुषानें जगण्यापेक्षां मरून जाणेंच श्रेयस्कर आहे.

(७९) धीमन्तो न निषेवंते पर्यंते दुःखदां क्रियाम् ॥ ५-५२-८

बुद्धिमान् पुरुष दुःखपर्यवसायी क्रिया करण्याला केव्हांच प्रवृत्त होत नाहींत.

(८०) मौर्ख्यं परममेवाहुः परित्याज्याऽनुशासनम् ॥ ५-५२-३०

ज्याचा सर्वथा त्याग करणेंच उचित आहे, त्याला विनाकारण उपदेश करीत बसणें याच्यासारखा मूर्खपणा दुसरा कोणताच नाहीं.

(८१) नास्ति शत्रुः प्रकृत्यैव न च मित्रं कदाचन ॥
सुखदं मित्रमित्युक्तं दुःखदाः शत्रवः स्मृताः ॥ ५-५३-५८

कोणी कोणाचा मूळचा शत्रु नाहीं व मूळचाच मित्रहि नाहीं. सुख देणारा तो मित्र व दुःख देणारा तो शत्रु असें मानलें आहे.

(८२) महतां संगमेनार्तिः कस्य नाम न नश्यति ॥
संदेहं तु परामार्तिमाहुरार्तिविदोजनाः ॥ ५-५८-२६

महात्म्याचा सहवास घडला असतां कोणत्या पुरुषाचें दुःख नाहींसें होत नाहीं ? मनांत संशय कल्लोळ उत्पन्न होणें याच्यासारखें भयंकर संकट या जगांत दुसरें कोणतेंच नाहीं, असें ज्ञात्या पुरुषांचें म्हणणें आहे.

(८३) रामवद्व्यवहर्तव्यं न रावणाविलासवत् ॥ नि. पू. २२-२३

रामाप्रमाणें व्यवहार करावा पण रावणाप्रमाणें दुराचरण करूं नये.

(५९) राजते हि पदार्थश्रीर्महतामर्पणाच्छुभा ॥ ३–१०४–३७

एखादी मौल्यवान् आणि शुभवस्तु महात्म्याला अर्पण केली तरच ती शोभायमान होते.

(६०) देहि दीनार्तिहरणात्स्फारतां यांति संपदः ॥ ३-१०६-४२

( 'देहि' या पदाचा संबंध मागील श्लोकाशीं आहे ) दीन झालेल्या मनुष्याचें दुःख निवारण केलें असतां दुःख निवारण करणाऱ्याची संपत्ति वृद्धिंगत होत असते.

(६१) यत्कृतं मनसा तात तत्कृतं विद्धि राघव ॥
यत्त्यक्तं मनसा तावत्तत्त्यक्तं विद्धि चानघ ॥ ३–११०–१४

जें मनानें केलें तेंच खरोखर केलें असें जाण. आणि ज्याचा मनानें त्याग केला त्याचाच त्याग केला असें समज.

(६२) अनुद्वेगः श्रियोमूलमनुद्वेगात्प्रवर्तते ॥
जंतोर्मनोजयो येन त्रिलोकीविजयस्तृणम् ॥ ३–१११–२२

उद्विग्न न होणें हेंच संपत्तीचें मूळ आहे. उद्वेगाचा त्याग करून दृढ प्रयत्न केल्यानेंच संपत्ति मिळवितां येते. ज्यानें आपल्या मनाला जिंकलें, अशा पुरुषाला त्रैलोक्यावर संपादन केलेला विजय सुद्धां तृणाप्रमाणें तुच्छ वाटतो.

(६३) कोहि नाम जगज्ज्ञातमाचारं नानुतिष्ठति ॥ ४–१६–२२

सदाचाराचें उल्लंघन कोणता ज्ञाता पुरुष करणार आहे ?

(६४) अनार्तेन हि संमानो बहुमानो न बुध्यते ॥
पूर्णानां सरितां प्रावृट्पूर स्वल्पो न राजते ॥ ४–२३–५४

पाण्यानें नेहमीं भरलेल्या नद्यांना पावसाच्या लहान लहान सरींनीं येणाऱ्या पुराचें महत्त्व नाहीं, त्याप्रमाणें ज्याला दुःख कधीं माहीत नाहीं, अशा मनुष्याचा सन्मान केला असतां त्याला त्याची फारशी किंमत वाटत नाहीं.

(९१) प्रवृत्तिमुद्यमं प्रज्ञां प्रयुंक्ते चेदखेदवान् ॥
अकिंचनोऽपि शक्तत्वं समवाप्नोत्यविघ्नतः ॥ नि. पू. ८८ ५

दृढनिश्चयी पुरुषानें कधींहि खिन्न न होतां प्रज्ञेचा आश्रय करून प्रवृत्ति व उद्यम यांचा जर प्रयोग केला तर तो कंगाल जरी असला तरी निर्विघ्नपणें मोठा समर्थ होतो.

(९२) नोद्विजंते स्वकार्येषु जना अध्यवसायिनः॥ नि. पू.८८-१९
निश्चयी लोक आपल्या कार्याविषयीं उद्विग्न होत नाहींत.

(९३) मौर्ख्यादागामिनं कालं वर्तमानक्रियाक्रमैः ॥
अशोधयन्नरो दुःखं याति विंध्यगजोयथा नि. पू. ८९-२९

जो पुरुष मूर्खपणानें पुढें ओढवणाऱ्या संकटाचें विवारण करण्याची तजवीज अगोदरच करीत नाहीं त्याला विंध्य गजाप्रमाणें * दुःख भोगावें लागते.

(९४) ज्ञानिनैव सदा भाव्यं राम न ज्ञानबंधुना ॥
अज्ञातारं वरं मन्ये न पुनर्ज्ञानबंधुताम् ॥ नि. उ. २१-१

प्रत्येकानें ज्ञानी व्हावें, पण ( दुसऱ्याला ज्ञान सांगणारा पण त्याप्रमाणें आपण स्वतः न वागणारा) ज्ञानबंधु होऊं नये. अशा ज्ञानबंधूपेक्षां अज्ञानीच श्रेष्ठ आहे, असें मी समजतों.

(९५) व्याचष्टे यः पठति च शास्त्रं भोगाय शिल्पिवत् ॥
यतते न त्वनुष्ठाने ज्ञानबंधुः स उच्यते ॥ नि. उ. २१-३

एखाद्या कारागिराप्रमाणें जो भोगासाठीं अध्यात्मशास्त्राचें पठण व व्याख्यान करितो; पण त्याप्रमाणें वागण्याचा मुळींच प्रयत्न करीत नाहीं तो ज्ञानबंधु होय.

---

* या ग्रंथाचा भाग २ रा, चूडालेची गोष्ट ३४ वी. यांतील हत्तीची गोष्ट ( पृष्ठ २१९-२२० )

(८४) प्रज्ञासौजन्ययुक्तेन शास्त्रसंवलितेन च ॥ नि. पू. २९-६
पौरुषेण न यत्प्राप्तं न तत्क्वचन लभ्यते ॥ नि. पू. २९-६

शास्त्रयुक्त प्रज्ञा व सौजन्य यांसहवर्तमान जें पौरुष त्यानेंहि जें प्राप्त होत नाहीं तें (दुसऱ्यां कशानें) कोठेंहि प्राप्त होणें शक्य नाहीं.

(८५) यथा प्राप्तिक्षणे वस्तु प्रथमं तुष्टये तथा ॥
न प्राप्त्येकक्षणादूर्ध्वमिति को नानुभूतवान् ॥ नि.पू. ४४-२

वस्तूची प्राप्तिःहोते तेव्हां त्या प्रथमक्षणीं ती जशी संतोष देते, तशी त्याच्या पुढच्याक्षणीं देत नाहीं, याचा अनुभव कोणाला आलेला नाहीं ?

(८६) रम्यवस्तुक्षयायैव मूढनां जृम्भते पदम् ॥ नि. पू. ६२-२५

सुंदर वस्तूंचा नाश करण्यासाठींच मूढ लोकांचें स्थान वाढत असतें.

(८७) सर्वं ह्यभिमतं कार्यमेकनिष्ठस्य सिध्यति ॥ नि. पू. ६४-१७

जो एकनिष्ठ असतो त्याचें सर्व इच्छित कार्य सिद्ध होतें.

(८८) प्राप्तकाले कृतं कार्यं राजते नाथ नेतरत् ॥
वसन्ते राजते पुष्पं फलं शरदि राजते ॥ नि. पू. ८४-२२

योग्यसमयीं केलेलेंच कार्य शोभतें, दुसरें शोभत नाहीं. वसंतऋतूमध्यें फूल शोभतें आणि शरदृतूंत फळ शोभतें.

(८९) अप्राप्तकारिणं भूपं रोधयंति च वै प्रजाः ॥
रोधयंति ह्यकार्येभ्यः प्रभुं भृत्याः परस्परम् ॥ नि. पू. ८४-२७

अप्राप्तकार्य करणाऱ्या राजाला प्रजा रोध करतात. खरे सेवक आपल्या प्रभूला अकार्यापासून परतवितात व प्रभूहि आपल्या सेवकांचें अकार्यापासून निवारण करतात.

(९०) समग्रानंदवृंदानामेतदेवोपरि स्थितम् ॥
यत्समानमनोवृत्तिसंगमास्वादनं सुखम् ॥ नि. पू. ८५-४३

समान मनोवृत्तीच्या मनुष्यांच्या समागमाचें सुख अनुभविणें हें सर्व आनंद समूहाच्या अग्रभागीं स्थित आहे.

(१०१) सा स्त्री यानुगता भर्त्रा सा श्रीर्यानुगता सता ॥
सा धीर्या मधुरोदारा साधुता समदृष्टिता ॥ नि. उ. ६५-६

जिचा पति अनुकूल असतो तीच (खरी भाग्यवती) स्त्री, जिचा साधु पुरुष उपभोग घेतात तीच ( सार्थकी लागलेली ) लक्ष्मी, जी शमदमादि संपत्तीनें मधुर व उदार असते तीच बुद्धि आणि समदृष्टि असणारा मनुष्यच खरा साधु होय.

(१०२) नाधयो व्याधयोनैव नापदो न दुरीतयः ॥
कुर्वन्ति मनसोबाधां दंपत्योरनुरक्तयोः ॥ नि. उ. ६५-७

परस्परावर अनुरक्त असलेल्या पतिपत्नींच्या मनाला आधि, व्याधि, आपत्ति व अतिवृष्टि इत्यादि संकटें दुःख देत नाहींत.

(१०३) अज्ञोऽपि तज्ज्ञतामेति शनैः शैलोऽपि चूर्ण्यते ॥
बाणोऽप्येति महालक्ष्यं पश्याभ्यासविजृंभितम् ॥नि.उ.६७-२६

अभ्यासाचा म्हणजे पुनः पुनः एखादी गोष्ट केल्याचा परिणाम पहा. या अभ्यासानें अज्ञदेखील तज्ज्ञ होतो. पर्वताचें चूर्ण देखील अभ्यासानें हळहळु होऊं शकतें आणि अचेतन असलेला बाण देखील धनुर्धराच्या अभ्यासामुळेंच सूक्ष्म लक्ष्याचा वेध करूं शकतो.

(१०४) अभ्यासेन कटु द्रव्यं भवत्यभिमतं मुने ॥
अन्यस्मै रोचते निंबस्त्वन्यस्मै मधु रोचते ॥नि. उ. ६७-२८

अभ्यासानें कडू पदार्थहि आवडूं लागतो. एखाद्याला मध आवडतो तर एखाद्याला अभ्यासामुळें कडु लिंबच आवडतो.

(१०५) पौनःपुन्येन करणमभ्यास इति कथ्यते ॥
पुरुषार्थः स एवेह तेनास्ति न विना गतिः ॥ नि.उ.६७-४३

पुनः पुनः तेंच तेंच करणें याला अभ्यास असें म्हणतात. हाच पुरुषार्थ होय. या अभ्यासावांचून मनुष्याला ( आपली सर्व बाजूंनीं उन्नति करून घेण्याकरितां ) दुसरा मार्ग नाहीं.

(१०६) द्वे हेमनभसी तास्मिन्न नष्टे प्रलयानले ॥ नि. उ. ७५-५४

त्या प्रलयाग्नीमध्यें सोनें व आकाश या दोन वस्तूच फक्त जळल्या नाहींत.

(९६) यो यो बोधातिशयवांस्तं तं पृथगुपास्व भोः ॥
संगमे कथयोदेति तेषां वादपिशाचिका ॥ नि. उ. ३२-२०

जो जो अतिशय ज्ञानसंपन्न असेल त्या एकट्याची तूं उपासना कर. कारण एकाचवेळीं अनेक विद्वानांचा सहवास केल्यास त्यांच्या संभाषणांतून वादरूपी पिशाच्च उत्पन्न होतें.

(९७) अतः प्रत्येकमेकांते प्राज्ञः सेवेत पंडितम् ॥
एकीकृत्य तदुक्तांस्तानर्थान् बुध्या विचारयेत् ॥
नि. उ. ३२-२२

यास्तव शहाण्या पुरुषानें प्रत्येक विद्वानांचा एकांतांत सहवास करावा आणि त्यांनीं सांगितलेल्या सर्व गोष्टींचा स्वतःच्या बुद्धीनें चांगला विचार करावा.

(९८) विपश्चित्संगमैर्बुद्धिं नीत्वा परमतीक्ष्णताम् ॥
अज्ञानलतिका सैका कणशः क्रियतामलम् ॥नि. उ. ३२ २४

विद्वानांच्या संगतीनें बुद्धीला अतिशय तीक्ष्ण करून तिच्या योगानें अज्ञानरूपी लतिकेला छिन्नभिन्न करून टाकावी.

(९९) इहैव नरकव्याधेश्चिकित्सां न करोति यः ॥
गत्वा निरौषधं स्थानं सरुजः किं करिष्यति ॥नि.उ. ३३-१४

जो मनुष्य नरकव्याधीची चिकित्सा येथेंच करीत नाहीं, तो साधुसमागम व सच्छास्त्र एतद्रूप औषध जेथें मिळणें शक्य नाहीं, अशा स्थावरादि योनींत जाऊन काय करणार ?

(१००) हता नीरसनाथा स्त्री हताऽसंस्कारिणी च धीः ॥
हता दुर्जनभुक्ता श्री हता वेश्याहृता च ह्रीः ॥ नि. उ. ६५-५

जिचा पति नीरस आहे, अशा स्त्रीचें जिणें व्यर्थ आहे. शास्त्रसंस्कार शून्य बुद्धि फुकट आहे, दुर्जनांनीं उपभोगिलेली संपत्ति नष्ट झाल्यासारखीच आहे, तद्वीच सत्कुल, आचार इत्यादिकास उचित असलेली पुरुषांची लज्जा वेश्यांनीं हरण केल्यास तीहि नष्टच झाली आहे.

(१०१) सा स्त्री यानुगता भर्त्रा सा श्रीर्यानुगता सता ॥
सा धीर्या मधुरोदारा साधुता समदृष्टिता ॥ नि. उ. ६५-६

जिचा पति अनुकूल असतो तीच (खरी भाग्यवती) स्त्री, जिचा साधू पुरुष उपभोग घेतात तीच ( सार्थकी लागलेली ) लक्ष्मी, जी शमदमादि संपत्तीनें मधुर व उदार असते तीच बुद्धि आणि समदृष्टि असणारा मनुष्यच खरा साधु होय.

(१०२) नाधयो व्याधयोनैव नापदो न दुरीतयः ॥
कुर्वन्ति मनसोबाधां दंपत्योरनुरक्तयोः ॥ नि. उ. ६५-७

परस्परावर अनुरक्त असलेल्या पतिपत्नींच्या मनाला आधि, व्याधि, आपत्ति व अतिवृष्टि इत्यादि संकटें दुःख देत नाहींत.

(१०३) अज्ञोऽपि तज्ज्ञतामेति शनैः शैलोऽपि चूर्ण्यते ॥
बाणोऽप्येति महालक्ष्यं पश्याभ्यासविजृंभितम् ॥नि.उ.६७-२६

अभ्यासाचा म्हणजे पुनः पुनः एखादी गोष्ट केल्याचा परिणाम पहा. या अभ्यासानें अज्ञदेखील तज्ज्ञ होतो. पर्वताचें चूर्ण देखील अभ्यासानें हळूहळू होऊं शकतें आणि अचेतन असलेला बाण देखील धनुर्धराच्या अभ्यासामुळेंच सूक्ष्म लक्ष्याचा वेध करूं शकतो.

(१०४) अभ्यासेन कटु द्रव्यं भवत्यभिमतं मुने ॥
अन्यस्मै रोचते निंबस्त्वन्यस्मै मधु रोचते ॥नि. उ. ६७-२८

अभ्यासानें कडू पदार्थहि आवडूं लागतो. एखाद्याला मध आवडतो तर एखाद्याला अभ्यासामुळें कडु लिंबच आवडतो.

(१०५) पौनःपुन्येन करणमभ्यास इति कथ्यते ॥
पुरुषार्थः सएवेह तेनास्ति न विना गतिः ॥ नि.उ.६७-४३

पुनः पुनः तेंच तेंच करणें याला अभ्यास असें म्हणतात. हाच पुरुषार्थ होय. या अभ्यासावांचून मनुष्याला ( आपली सर्व बाजूंनीं उन्नति करून घेण्याकरितां ) दुसरा मार्ग नाहीं.

(१०६) द्वे हेमनभसी तस्मिन्नष्टे प्रलयानले ॥ नि. उ. ७५-५४

त्या प्रलयाग्नीमध्यें मेरु व आकाश या दोन वस्तूच फक्त जळल्या नाहींत

(१०७) अद्यैव न चिकित्सां यः करोति मरणापदः ॥
संप्राप्तायां मृतौ मूढः करिष्यति किमातुरः ॥
नि. उ. १०३-३८.

मरणरूपी आपत्तीची चिकित्सा जो मूढ मनुष्य आजच्या आज करीत नाहीं, तो मरणकाल प्राप्त झाला असतां पीडित झाल्यावर काय करूं शकेल?

(१०८) अवश्यं भवितव्योर्थः न कदाचन केनचित् ॥
विधातुमन्यथा शक्यस्तन्न क्षरति यत्नतः ॥ नि.उ.१५५-५३

अवश्य होणारी गोष्ट कधींच कोणाला वर्तमान प्रयत्नानेंहि टाळतां येणें शक्य नाहीं.

(१०९) ना यथा यतते नित्यं यद्भावयति यन्मयः ॥
यादृगिच्छेच्च भवितुं तादृग्भवति नान्यथा ॥
नि. उ. १५७-३१

मनुष्य नित्य ज्यासाठीं अगदीं तन्मय होऊन अनन्य भावानें प्रयत्न करतो व जसें होण्याची इच्छा करतो, तसाच तो होतो. एरवीं कधींहि होत नाहीं.

(११०) अद्यैव कुरु यच्छ्रेयो वृद्धःसन्किं करिष्यसि ॥
स्वगात्राण्यपि भाराय भवन्ति हि विपर्यये ॥
नि. उ. १६२-२०

आजच आपलें कल्याण करून घे. तूं वृद्ध झाल्यावर काय करणार? कारण वृद्धापकाळीं आपलीं गात्रेंच आपणांला भारभूत होत असतात.

(१११) आयुषः क्षण एकोऽपि सर्वरत्नैर्न लभ्यते ॥
नीयते तद्वृथा येन प्रमादः सुमहानहो ॥ नि. उ. १७५-७८

आयुष्याचा एक क्षणसुद्धा रत्नांच्या राशी दिल्यानेंहि मिळणार नाहीं, हें जर निश्चित आहे, तर आयुष्य व्यर्थ घालविणें हा मोठा बेसावधपणा नव्हे काय?

---

# ( ३ ) धार्मिक सुभाषितें.

(१) रागद्वेषतमःक्रोधमदमात्सर्यवर्जनम् ॥
विना राम तपोदानं क्लेश एव न वास्तवम् ॥ ३-६-१०

राग, द्वेष, तम, क्रोध, मद, मत्सर हे दोष टाकल्याशिवाय जें तप, दान वगैरे केलें जातें, तें केवल क्लेशच आहेत. ( तें चित्तशुद्धीचें खरें साधन नव्हे. )

(२) रागाद्युपगते चित्ते वंचयित्वा परं धनम् ॥
यदर्ज्यते तस्यदानाद्यस्यार्थास्तस्य तत्फलम् ॥ ३-६-११

लोभादिकांनीं चित्त मलिन झालें असतां दुसऱ्याला फसवून त्याच्या-पासून जें धन मिळविलें जातें त्या द्रव्याचें दान करण्यापासून जें पुण्यफल प्राप्त होतें, तें दान करणाऱ्याला न मिळतां ज्याला लुबाडून तें द्रव्य मिळविलें असतें त्याला त्याचें पुण्य फल मिळतें.

(३) रागाद्युपगते चित्ते व्रतादि क्रियते च यत् ॥
तद्दंभः प्रोच्यते तस्य फलमस्ति मनाङ्‌ न ॥ ३-६-१२

कामक्रोधादिकांनीं अभिभूत झाला असतां जीं व्रतें किंवा जे नियम केले जातात, त्याला दंभ असें म्हणतात. कर्त्याला त्याचें फळ मुळींच मिळत नाहीं.

(४) स्वकर्मधर्मे ऱ्हसति ऱ्हसत्यायुर्नृणामिह ॥
वृद्धे वृद्धिमुपायति सममेव भवेत्समे ॥ ३-५४-३०

ज्या मनुष्यानीं स्वकर्माचें व स्वधर्माचें आचरण केलें नाहीं तर त्यांचें आयुष्य कमी होतें; व जर तसें त्यांनीं केलें तर युगमर्यादेनें मनुष्याच्या आयुष्याची मर्यादा ठरलेल्या मुदतीपर्यंत ती माणसें वाचतात व जास्त उच्च भावनेनें आणि श्रद्धेनें कर्में करणाऱ्या मनुष्यांची आयुमर्यादा युग मर्यादेपेक्षांहि जास्त वाढते.*

---

* याचें सविस्तर वर्णन या ग्रंथाचा भाग १ ला. 'मृत्यु व मृत्यूनंतरची स्थिति पृष्ठ १३६ यांत करण्यांत आलेलें आहे.

(५) तपसैव महोग्रेण यद्दुरापं तदाप्यते ॥ ३-६८-१४

कोणतीहि दुर्लभ गोष्ट उग्र तपश्चर्येनें साध्य होत असतें.

(६) अपि पुण्यशरीराणां जातिबंधो न शाम्यति ॥ ३-७०-३२

मोठी तपश्चर्या करून एखाद्या प्राण्यानें कितीहि पुण्य संपादन केलें तरी शेवटीं तो आपल्या जातीवर जायचाच.

(७) यदार्यगर्हितं यद्वा न्यायेन न समर्जितम् ॥
तस्माद्ग्रासाद्वरं मन्ये मरणं देहिनामिदम् ॥ ३-७६-७

न्यायाला विरुद्ध किंवा आर्यजनांनीं निंद्य ठरविलेलें एखादें कृत्य करून आपलें पोट जाळण्यापेक्षां मनुष्यानें मरून जाणेंच श्रेयस्कर !

(८) अन्यायोपार्जितस्त्वर्थो भुक्तः सन्हि गरायते ॥ ३-७६-८

अन्यायानें मिळविलेल्या अन्नाचें सेवन केलें असतां तें अन्न विषवत् होत असतें. ( अनर्थ निर्माण करीत असतें )

(९) स्वधर्मेण च हिंसैव महाकरुणया समा ॥ ३-८२-४६

( वंध्यजनांचा वध करणें ही धर्मशास्त्रदृष्टया हिंसा होत नाहीं. ) कारण धर्मानुरूप केलेल्या हिंसेची योग्यता दयेइतकीच श्रेष्ठ आहे.

(१०) यदवध्यवधात्पापं वध्यत्यागात्तदेव हि ॥ ३-९०-३

अवध्याचा वध केल्यानें जितकें पातक लागतें, तितकेंच पातक वध्याचा वध न केल्यानें लागत असतें.

(११) केनापदि विचार्यंते वर्णधर्मकुलक्रमाः ॥ ३-१०६-५२

आपत्तींमध्यें कोणताहि मनुष्य वर्ण, धर्म किंवा आपली कुलपरंपरा याचा विचार करतो का ?

(१२) पापस्य हि भयाल्लोको राम धर्मे प्रवर्तते ॥ ५-७५-३७

पापाच्या भयानेंच लोकांची धर्माकडे प्रवृत्ति होत असते.

(१३) येन प्राप्तेन लोकेऽस्मिन्न प्राप्यमवशिष्यते ॥
तत्कृतं सुकृतं मन्ये शेषं कर्मविषूचिका ॥ नि. उ. ७४-१७

जें प्राप्त झालें असतां या लोकांत काहीं अधिक मिळावयाचें रहात नाहीं तेंच करणें याला मी 'सुकृत' समजतों. बाकीचें कर्म म्हणजे पटकीप्रमाणें अपवित्र व दुःखदायक होय.

(१४) सर्वं त्यजति यस्तस्य सर्वमेवोपतिष्ठते ॥ ९३-५९-१

जो सर्व टाकतो त्याला प्रारब्धवशात् सर्व अनायासानें प्राप्त होतें.

(१५) सर्वत्यागो महाराज सर्वसंपत्समाश्रयः ॥
न गृण्हाति हि यत्किंचित्सर्वं तस्मै प्रदीयते ॥ नि.पू.९३-६२

हे राजन्! सर्वत्याग हाच सर्व संपत्तीचा श्रेष्ठ आश्रय आहे. जो कांहीं घेत नाहीं त्यालाच सर्व दिलें जातें.

(१६) एतावज्जन्मसाफल्यं सौभाग्यमविखंडितम् ॥
रसिकः पेशलाचारो यन्नार्यास्तरुणः पतिः ॥ नि. उ. ६५-४

स्त्रीला तरुण, रसिक व विलासी पती असणें हेंच जन्मसाफल्य व अखंडित सौभाग्य होय.



# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | सुभाषित. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|
| ७ | (३१) | १ | मूठोत्तारण | मूढोत्तारण |
| १६ | (८५) | ९ | विपेवन्ते | निपेवन्ते |
| २४ | (१३१) | १६ | शास्त्रैः | शास्त्रैः |
| २७ | (१४३) | १० | चालवील | चालतील |
| २७ | (१४६) | २२ | विदुर्ज्ञानं | विदुर्ज्ञानं |
| २९ | (१५२) | ७ | शान्तियथा | शान्तिर्यथा |
| ३० | (१६०) | २४ | श्रुतपाठपाञ्छ्रयेत् | श्रुतपाठजपाञ्छ्रयेत् |
| ३० | (१६०) | २६ | प्राणवादिकांचा | प्रणवादिकांचा |
| ३१ | (१६५) | २२ | मात्राते | मात्राते |
| ३३ | (टीप) | २७ | गुह्यं | गुह्य |
| ३८ | (२२) | २७ | संयुक्तिक | सयुक्तिक |
| ४५ | (६८) | १९ | मार्गांचा | मार्गांचें |
| ४६ | (७५) | १५ | दुःखयंत्यगे | दुःखयंत्यंगे |
| ४८ | (८४) | २ | यंत्प्रातं | यत्प्रातं |



# या ग्रंथांत आलेले पारिभाषिक शब्द व त्यांच्या व्याख्यांचें स्थलनिर्देश.

---